Dr. BABASAHEB AMBEDKAR WRITINGS AND SPEECHES

Vol. 18

PART 3

डॉ. बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे

खंड १८

भाग ३




# डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची भाषणे

## भाग ३

## १९४६ ते १९५६





डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समिती,

शिक्षण विभाग,

महाराष्ट्र शासन

२०१६

**Dr. BABASAHEB AMBEDKAR WRITINGS AND SPEECHES**

*Published Volumes*

**Vol. 1**
*Pages 520, Rs. 40.00*
Castes in India and 11 other essays.
1st Edi. 1982, 2nd Edi. 1989.
3rd Edi. 2010, 4th Edi. 2016.

**Vol. 2**
*Pages 826, Rs. 80.00*
Dr. Ambedkar In the Bombay Legislature, with the Simon Commission and at the Round Table Conferences- 1927 to 1939.
1st Edi. 1982, 2nd Edi. 2005.

**Vol. 3**
*Pages 508, Rs. 40.00.*
Philosophy of Hinduism, India and the Pre-requisites of Communism.
Revolution and Counter-Revolution.
Buddha or Karl Marx.
1st Edi. 1987.

**Vol. 4**
*Pages 368, Rs. 35.00*
Riddles in Hinduism.
1st Edi. 1987, 2nd Edi. 1996.

**Vol. 5**
*Pages 496, Rs. 40.00*
Essays on Untouchables and Un-touchability.
1st Edi. 1989, 2nd Edi. 2016

**Vol. 6**
*Pages 712, Rs. 55.00*
The Evolution of Provincial Finance In British-India.
The Problem of the Rupee.
1st Edi. 1989.

**Vol. 7**
*Pages 390, Rs. 40.00*
Who were the Shudras ? The Untouchables.
1st Edi. 1991, 2nd Edi. 2016.

**Vol. 8**
*Pages 510, Rs. 40.00*
Pakistan or the Partition of India.
1st Edi. 1990.

**Vol. 9**
*Pages 500, Rs. 50.00*
What Congress and Gandhi have Done to the Untouchables.
Mr. Gandhi and the Emancipation of the Untouchables.
1st Edi. 1990, 2nd Edi. 2015.

**Vol. 10**
*Pages 1080, Rs. 95.00*
Dr. Ambedkar As Member of the Governor General's Executive Council 1942-46.
1st Edi. 1991, 2nd Edi. 2016.

**Vol. 11**
*Pages 620, Rs. 70.00*
The Buddha and His Dhamma.
1st Edi. 1990, 2nd Edi. 2010.

**Vol. 11 (Supplement)**
*Pages 45, Rs. 10.00*
The Buddha and His Dhamma.
1st Edi. 1995.

**Vol. 12**
*Pages 794, Rs. 95.00*
Unpublished Writings.
Ancient Indian Commerce, Notes on Laws Waiting for a Visa.
Miscellaneous Notes etc.
1st Edi. 1993.

स्वातंत्र्य ही आनंदाची बाब आहे याबद्दल शंका नाही. परंतु या स्वातंत्र्याने आपल्यावर फार मोठ्या जबाबदाऱ्या टाकलेल्या आहेत याचा आपण विसर पडू देता कामा नये. या स्वातंत्र्यामुळे, कोणत्याही वाईट गोष्टीसाठी आपल्याला आता इंग्रजांवर दोषारोपण करता येणार नाही. यापुढे जर काही वाईट घडले तर त्यासाठी आपल्याशिवाय इतर कुणालाही दोषी धरता येणार नाही. अनुचित घटना घडण्याचा मोठा धोका आहे. काळ वेगाने बदलतो आहे. आपले लोकसुद्धा, नवनवीन विचारप्रणालींचा मागोवा घेत आहेत. लोकांच्या राज्याचा आता त्यांना कंटाळा येऊ लागला आहे. आता त्यांना लोकांसाठी राज्य हवे आहे. आणि राज्य लोकांचे व लोकांनी निवडलेले आहे किंवा नाही याची चिंता ते करणार नाहीत. ज्या संविधानात आपण लोकांचे, लोकांकरिता निवडलेले शासन या तत्त्वाचे जतन केले आहे ते जर आपल्याला सुरक्षित ठेवायचे असेल तर, आपल्या मार्गात कोणते अडथळे येणार आहेत ते आपण ओळखले पाहिजेत की, जेणेकरून लोकांनी निवडून दिलेल्या सरकारच्या तुलनेत लोकांसाठी असलेल्या सरकारला लोक प्राधान्य देण्याकडे वळतील. यासाठी पुढाकार घेण्यात आपण दुर्बल ठरता कामा नये. देशाची सेवा करण्याचा हाच एकमेव मार्ग आहे. दुसरा अधिक चांगला मार्ग मला माहीत नाही.

— (पृ. क्र. १७५-१७६)

— डॉ. बाबासाहेब आंबेडकर



आपल्या रक्ताचा शेवटचा थेंब असेपर्यंत आपल्या स्वातंत्र्याच्या रक्षणासाठी आपण निर्धार केलाच पाहिजे.

-- डॉ. बाबासाहेब आंबेडकर




# Dr. BABASAHEB AMBEDKAR WRITINGS AND SPEECHES

## Vol. 18

## PART 3

## डॉ. बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे

## खंड १८

## भाग ३

# डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची भाषणे

## भाग ३

## १९४६ ते १९५६

संपादक

वसंत मून    हरी नरके

प्रा. अशोक गोडघाटे    प्रा. डॉ. म. ल. कासारे    एन. जी. कांबळे

- द्वितीय आवृत्ती -

प्रा. अविनाश डोळस

---

डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समिती, महाराष्ट्र शासन,
शासकीय कुटीर क्र. १८, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०२१

Dr. Babasaheb Ambedkar Writings and Speeches Vol. 18, Part 3 (Dr. Babasaheb Ambedkar Yanchi Bhashane) Marathi book, Edited by Vasant Moon, Hari Narke, Ashok Godghate, M. L. Kasare, N. G. Kamble, for Dr. Babasaheb Ambedkar, Source Material Publication Committee, Govt. of Maharashtra, Barrack No. 18., Opp. Mantralaya, Mumbai–400 021. INDIA.

**First Edition** - 15th October 2002.

**प्रथमावृत्ती :** १५ ऑक्टोबर २००२
(धम्मचक्र प्रवर्तन दिन.)

**प्रती :** ३०,०००

**द्वितीय आवृत्ती :** १४ एप्रिल २०१६

**प्रती :** १ लाख



**प्रकाशक :**
डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समिती,
महाराष्ट्र शासन,
शासकीय कुटीर क्र. १८,
मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०२१.



**मूल्य :** रुपये १००

**मुद्रक :**
व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर.

मुख्यमंत्री
महाराष्ट्र




Chief Minister
Maharashtra
५ मे २०१६

# शुभेच्छा

महाराष्ट्र शासनाच्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समितीतर्फे खंड १८ - डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची भाषणे भाग-१, भाग-२ आणि भाग-३ यांचे प्रकाशन करण्यात येत आहे.

या खंडात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी जानेवारी १९४६ ते २० मे १९५६ या कालावधीत ठिकठिकाणी केलेल्या भाषणांचे संकलन आहे. विशेषत: या भाषणांमध्ये निवडणुकीच्या प्रचार सभांपासून ते त्यांच्या सत्कारापर्यंतच्या प्रसंगांनिमित्त व्यक्त केलेल्या विचारांचा समावेश आहे. ही भाषणे बहुतांशी प्रासंगिक स्वरूपाची असली तरी त्यातून बाबासाहेबांच्या व्यक्तिमत्त्वाचे अनेक पैलू उलगडतात. त्याचबरोबर या भाषणांमधून त्यांचा प्रचंड व्यासंग आणि सखोल चिंतनाची प्रचिती येते. धम्मासारखा गहन विषयही ते अतिशय सोप्या आणि सुव्यवस्थित पद्धतीने स्पष्ट करतात.

मराठी वाचकांसाठी हे खंड विशेष महत्त्वाचा आहेत, कारण यापूर्वी प्रसिद्ध झालेले खंड हे इंग्रजी भाषेत असल्याने काही वाचकांची अडचण होत होती. या खंडाने बाबासाहेबांचे विचार वाचकांना त्यांच्या मातृभाषेतून वाचावयास मिळणार आहेत, हे प्रशंसनीय आहे.

(देवेंद्र फडणवीस)

मंत्री,
शालेय शिक्षण, क्रीडा व युवक कल्याण,
उच्च व तंत्र शिक्षण, वैद्यकीय शिक्षण,
मराठी भाषा, सांस्कृतिक कार्य,
महाराष्ट्र शासन




मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
www.maharashtra.gov.in
दिनांक : ११ मार्च २०१६.

# शुभ संदेश

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे जीवन, विचार व त्यांची शिकवण प्रेरणादायी आहे. प्रभावी व्यक्तिमत्त्व, निकोप विचार व कार्याप्रतीची निष्ठा यांच्या बळावर डॉ. आंबेडकरांनी त्यांच्या अनुयायांच्या जीवनात आमूलाग्र परिवर्तन घडवून आणले. सर्व क्षमतांनिशी जीवनात यशस्वी होण्याची ऊर्मी त्यांनी निर्माण केली.

भारताच्या सामाजिक व राजकीय संरचनेच्या उद्धारासाठी डॉ. आंबेडकरांनी दिलेले महान योगदान शब्दांत वर्णन करणे कठीण आहे; परंतु त्यांनी आखून दिलेल्या मूल्यांचे प्रामाणिकपणे आचरण करणे आपल्या हातात आहे. जेणेकरून डॉ. आंबेडकरांनी आजीवन ज्या भारताचे स्वप्न पाहिले ते प्रत्यक्षात नक्की साकार होईल.

१९४६-१९५६ या कालावधीत डॉ. आंबेडकरांची भाषणे, त्यांनी वेळोवेळी व्यक्त केलेले विचार यांचे सार या आपल्या खंडात आपल्या मातृभाषेत मराठीत मांडलेले आहे. मला खात्री आहे की, वाचकांना, विशेषत: युवकांना डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांमधून प्रेरणा देण्यात हे पुस्तक मोलाची भूमिका बजावेल. जेणेकरून आपली युवापिढी जीवनात उमेदीने यशस्वी वाटचाल करू शकेल.

धन्यवाद.

आपला,

**( विनोद तावडे )**

# द्वितीय आवृत्तीच्या निमित्ताने

या खंडाची प्रथम आवृत्ती ही १५ ऑक्टोबर २००२ ला प्रकाशित झाली, तेव्हापासून या ग्रंथाची मागणी जनतेकडून सातत्याने होत आहे, ही बाब लक्षात घेऊन या खंडाची द्वितीय आवृत्ती प्रकाशित करावी, असे समितीने ठरविले व त्यानुसार ही द्वितीय आवृत्ती आपल्यासमोर येत आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे लेखन हे बहुसंख्येने इंग्रजी भाषेत आहे. मराठीपेक्षाही त्यांचे सर्व महत्त्वाचे ग्रंथ हे इंग्रजी भाषेत लिहिलेले आहेत, त्यामुळे बाबासाहेबांच्या ग्रंथाला जगभरातील वाचकवर्ग लाभला; परंतु इंग्रजी भाषेशी ज्याचे फारशे देणे-घेणे नाही अशा मराठी भाषकाला मात्र ते समजून घेणे दुरापास्त होते. बाबासाहेबांची चळवळ ही जिवंत होती व या चळवळीचा एक महत्त्वाचा भाग म्हणून बाबासाहेब अनेकदा लोकांना मार्गदर्शन करीत असत. सभा ही त्या काळातील लोकप्रबोधन व लोकजागृतीचे मोठे माध्यम होते. भाषण हे त्यातील सर्वात महत्त्वाचे माध्यम होते. बाबासाहेब हे जसे लेखक म्हणून ओळखले जात तेवढेच ते वक्ते/ व्याख्याते म्हणूनही लोकप्रिय होते. 'पुढारी' हा एक रोल त्यांनी केला. पुढाऱ्याच्या शब्दाला त्याकाळी वजन होते. त्यांच्या शब्दाशब्दांतून व्यक्त झालेला विचार त्यांच्या अनुयायांचा एक जीवनमार्ग ठरत होता. हे सारे प्रत्यक्ष घडत होते त्याचे माध्यम होते भाषण- आणि ही भाषणे मराठी भाषेत होत होती. त्यामुळे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी जेवढे ज्ञान त्यांच्या ग्रंथात मांडले होते तेवढेच ते भाषणकृतीतून आपल्या जनतेसाठी मराठीतून व्यक्त केले आहे. या भाषणात प्रश्नांची केलेली मांडणी, ती सोडविण्यासाठी करावयाचे उपाय व त्यासाठी करावी लागणारी कृती असा त्रिवेणी संगम झाला आहे. हे एकप्रकारचे विलक्षण असे नाट्य आहे. त्याचा प्रत्यय आपल्याला त्यांच्या या तीनशे एकावन्न भाषणांतून आल्याशिवाय राहत नाही. या भाषणाचा हा ऐवज एकत्र करून संपादक मंडळीने आपल्यासमोर ठेवला आहे. ही धनसंपत्ती आहे, हे ज्ञानभांडार या खंडाद्वारे मराठी वाचकांसमोर ठेवले आहे.

या खंडाचे तीन भाग कालानुक्रमे केले आहेत. पहिल्या भागात इ. स. १९२० ते १९३६ हा काळ घेतला आहे. एकूण ९६ भाषणांचे संकलन या भागात केले

आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या बहुतेक महत्त्वाच्या भाषणांचा अंतर्भाव त्यात आहे. विशेषत: १९२७ च्या महाडच्या सत्याग्रहाच्या वेळचे भाषण, १९३० च्या गोलमेज परिषदेतील भाषण, १९३५ चे येवला येथील धर्मांतर घोषणेचे भाषण व सर्वात महत्त्वाचे १९३६ चे मुंबई येथील 'मुक्ती कौन पथे' हे भाषण. या भाषणांचा समावेश या भागात केलेला आहे. आंबेडकर चळवळीची मूलभूत भूमिका व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा नवसमाज नवनिर्मितीचे प्रारूप या भाषणातून आपल्याला पाहावयास मिळते. बाबासाहेबांचे विचार समजून घ्यावयाचे असल्यास या चार भाषणांचा अभ्यास होणे आवश्यक आहे. यातील बहुतेक भाषणे लिखित स्वरूपाची असून मूलभूत विचार मांडणारी आहेत. आंबेडकर चळवळीची भूमिका व स्वरूप या भाषणाधून स्पष्ट होते. केवळ अस्पृश्यता निर्मूलन एवढेच या चळवळीचे ध्येय कधीच नव्हते. मानवमुक्तीचा लढा म्हणून या चळवळीकडे पाहिले जाते. भेदभावाच्या पलीकडे जाणारा समाजनिर्मिती हा उद्देश या चळवळीचा होता व आहे, हे यातून स्पष्ट होते. एकसंध भारत निर्मितीसाठी करावयाच्या प्रक्रियेचा तो एक ऐतिहासिक लढा होता असे म्हणावे लागेल. १९३० ला नागपूरला केलेल्या दि ऑल इंडिया डिप्रेस्ड क्लासेस काँग्रेस परिषदेच्या भाषणातून एकसंध भारत व राजकीय सत्ताप्राप्तीचा आपला उद्देश बाबासाहेबांनी अधोरेखित केलेला आहे. यादृष्टिनेही मराठीत उपलब्ध असलेल्या या भाषणाचे विशेष महत्त्व आहे.

या लिखित भाषणाशिवाय इतरत्र दिलेली भाषणे ही प्रसंगानुरूप आहेत. त्यात विशेषत: १९३७ च्या प्रांतीय निवडणूक प्रचाराची भाषणे आहेत. या भाषणातून भारतात येऊ पाहणारी लोकशाही पद्धतीची तोंडओळख व तिचे महत्त्व विशद केलेले दिसते. स्वतंत्र मजूर पक्ष हा सर्व श्रमजीवींचे प्रतिनिधित्व करीत असून तो या लोकशाही पद्धतीत किती महत्त्वाची भूमिका पार पाडीत आहे व एका विरोधी पक्षाची भूमिकाही सत्ताधारी पक्षाइतकीच जबाबदारीची व महत्त्वाची असते, हे लोकशाही प्रशिक्षणही त्यातून देतात. निवडणूक प्रचार हा भावी लोकशाही पद्धती स्वीकार याची मनोभूमिका बनविण्यासाठी त्यांनी कार्य केल्याचे आपणास दिसून येते. याशिवाय काही भाषणे ही बौद्ध धम्माची

ओळख व महत्त्व सांगणारी अशा स्वरूपाची आहेत. धर्मांतरापूर्वीची भाषणे ही प्रस्थापित हिंदुधर्म सुधारणेच्या मर्यादा स्पष्ट करणारी व त्यातून मुक्त होण्यासाठी धर्मांतराची आवश्यकता प्रतिपादन करणारी आहेत. याचबरोबर बौद्ध धर्माची मूल्ये कोणती आहेत व त्यात समता, बंधुभाव व स्वातंत्र्य या त्रयींचा पाया कसा आहे, तो मानवमुक्तीसाठी किती आवश्यक आहे हे सांगणारे आहेत. काही भाषणे ही धर्मांतरानंतरची आहेत. यात वाराणसी, सारनाथ येथील भाषणांचा समावेश आहे. त्याचबरोबर धम्मदीक्षा या ऐतिहासिक घटनेच्या वेळी केलेले ऐतिहासिक भाषण व खाटमांडू येथे केलेले बौद्ध धर्म व मार्क्सवाद या विषयावर ऐतिहासिक भाषण केलेले आहे. धम्माचा मूलभूत विचार, त्याचे प्रयोजन, तो जीवनमार्ग व्यतित करताना पूर्वसंस्कारातून येणाऱ्या विसंगत कल्पना, रूढी यांचा धोका या साऱ्यांना तात्त्विक व व्यावहारिक पातळीवर केलेला विचार महत्त्वाचा आहे. विसाव्या शतकातील मार्क्सचे तत्त्वज्ञान व त्यातून झालेली रशियन क्रांती यामुळे कुठल्याही तत्त्वज्ञानाला त्यांच्याशी असलेले साम्य आणि वेगळेपण स्पष्ट करणे आवश्यक झाले होते. खाटमांडूच्या बौद्ध परिषदेत बाबासाहेबांनी केलेली बुद्ध व मार्क्सची तुलना यादृष्टीने महत्त्वाची आहे. या भाषणात बौद्ध धम्मात शोषणाचा विचार मार्क्सपेक्षा अधिक खोलवर जाऊन केल्याचा दावा केला आहे. एका दृष्टीने मार्क्सच्या विचारांशी साम्य सांगत बौद्ध धम्ममार्ग हा साम्यवादापेक्षा किती व्यापक आहे याची जाणीव त्यांनी करून दिली आहे. परिवर्तनाचा मार्ग धम्म असल्याची प्रचिती त्यातून येते. ही दोन्ही भाषणे खंडाच्या तिसऱ्या भागात समाविष्ट केली आहेत.

दुसऱ्या भागात दोन ऐतिहासिक भाषणे आहेत. ही भाषणे लिखित स्वरूपात उपलब्ध आहेत. त्यापैकी १९३८ चे मनमाड येथील रेल्वे कर्मचारी परिषदेतील आहे. जातीव्यवस्थेत श्रम करणारा वर्ग एकत्र आला तरी त्याचे काही प्रश्न वेगळे राहतात व त्यामुळे त्याला स्वत:चे संघटन करणे क्रमप्राप्त कसे होते याचे विवेचन करीत कर्मचारी हा राजकीय उद्दिष्टे साध्य करण्यासाठी कसा उपयोगी असतो याची जाणीव त्यांनी कर्मचारीवर्गास करून दिली आहे. त्याबरोबरच आपली लढाई ही व्यवस्था परिवर्तनाची कशी आहे, हे सांगून शेटजी-भटजी संस्कृती नष्ट करणे हे आपल्या चळवळीचे उद्दिष्ट कसे आहे

हे समजावून सांगितले आहे. १९४२ साली दलित वर्ग परिषद नागपूर येथे झाली. या परिषदेस मार्गदर्शन करताना लोकशाही जिवंत असणे किती आवश्यक आहे याचे विवेचन केले आहे.

तिसऱ्या भागात धम्मदीक्षेच्या वेळचे भाषण हे आंबेडकरी चळवळीचे सार आहे, असे म्हटले तर वावगे ठरणार नाही. अस्पृश्यतेच्या गर्तेतून बाहेर पडण्यासाठी धर्मांतर हा एकमेव मार्ग असल्याचे त्यांनी यापूर्वी अनेकदा स्पष्ट केले आहे. १९२० ते १९५६ हा प्रवास एका क्रांतीचा प्रवास म्हटला पाहिजे. 'मुक्ती कौन पथे' ची परिपूर्ती दिनांक १४ ऑक्टोबर १९५६ ला झाली आहे. यावेळी त्यांनी केलेले भाषण हे जसे भारतीयांसाठी महत्त्वाचे आहे, तसेच जगभरातील मुक्ती इच्छुकांसाठीदेखील मार्गदर्शक आहे. परंपरेतून बाहेर पडताना इतिहासाची साक्ष देत स्वाभिमानाबरोबरच नीतीचा आधार देत अनुयायांना त्यांनी पुनर्जीवित करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांचा हा प्रयत्न यशस्वी झाल्याचे आज दिसते आहे.

या सर्व भाषणांमध्ये व लेखनांमध्ये दोन सूत्रे मांडली गेली आहेत. एकतर इतिहासाची पुनर्मांडणी त्यांनी केली आहे. इतिहासाचे पुनर्लेखन व पुनर्आलेखन मांडले आहे. भारतीय इतिहास हा नाग व आर्य यांचा संघर्ष आहे. दुसऱ्या शब्दात मांडायचा झाल्यास हा संघर्ष हा दोन विचाराधारांतील आहे. बौद्ध धम्म व ब्राह्मण यांच्या संघर्षाचा हा इतिहास असल्याचे त्यांनी मांडले आहे. त्याचबरोबर जाती-वर्ण व्यवस्था नष्ट केल्याशिवाय नव्या मूल्यांवर आधारित नवसमाज निर्माण होणार नाही यासाठी समता, बंधुता, स्वातंत्र्य या मूल्यांवर आधारित समाज निर्माण केल्याशिवाय येथे मानवास मुक्तता मिळणार नाही, हे स्पष्ट केले आहे. यासाठी भारतीयांनी नवसमाज निर्मितीच्या कामाला लागले पाहिजे, हा त्यांचा आग्रह कायम आहे. भारत बौद्धमय करण्याचे त्यांचे हे स्वप्न आपल्याला येथे दिसून येते.

बाबासाहेबांचे अखेरचे भाषण हे दिनांक २५ नोव्हेंबर १९५६ रोजी महाबोधी सोसायटीने आयोजित केलेल्या स्वागत समारंभाचे आहे. बुद्धांचे पहिले प्रवचन ज्या स्थळी झाले त्या धम्मके स्तूपाच्या सान्निध्यात बाबासाहेबांचे अखेरचे

भाषण सारनाथ येथील मूलगन्ध कुटी विहाराच्या मैदानात झाले. भिक्खू धर्मरक्षिताने या घटनेचा संदर्भ भगवंताच्या पाहिल्या प्रवचनाशी जोडला आहे, हे विशेष !

संपादकाने ही सर्व भाषणे मुख्यत: बाबासाहेबांनी चालविलेल्या मुखपत्र 'जनता'तून घेतल्याचे नमूद केले आहे व त्या-त्या भाषणाचा स्त्रोतही दिला आहे. या खंडाच्या तीन भागात कालानुक्रमे ते मांडले आहेत. त्यापैकी ३४ भाषणे भाग पहिल्यात, दुसऱ्या भागात ९१, तिसऱ्या भागात ७० असे एकूण तीन भागात २१८ भाषणे 'जनता'मधून घेतली आहेत. १९३० ते १९५६ पर्यंत चालविलेले 'जनता' हे सर्वात दीर्घकाळ चाललेले आंबेडकरी पाक्षिक आहे. त्यामुळे साहजिकच आंबेडकरी चळवळीचा तो इतिहास आहे. या पाक्षिकाचा स्वतंत्र अभ्यास करण्याची गरज आहे. इतर २२ भाषणे ही बहिष्कृत भारत, १ भाषण 'मूकनायक' यातून घेतली आहेत. १९२० ते १९३० या काळातील ही मुखपत्रे असल्यामुळे या प्रारंभीच्या काळातील बाबासाहेबांचे विचार व तत्कालीन चळवळीचे चित्र सतत पाहावयास मिळते. 'जनता' व 'मूकनायक' ही दोन महत्त्वाची साधने या खंडासाठी उपयुक्त ठरली आहेत. उर्वरित समकालीन वृत्तपत्रे, नियतकालिकांतील बाबासाहेबांची भाषणे, विविध मासिके, वृत्तपत्रे, चारित्रातील लेख यांसारख्या माध्यमांतून घेतली आहेत; त्याचा तपशील येणेप्रमाणे विविधवृत्त-३, चित्रा-१, नवयुग-१, नवाकाळ-१, लोकयुद्ध-१, अरुण-१, दलित बंधू-३, गरुड-१०, ज्ञानप्रकाश-३, समता-२, निर्भीड-१, मा. फ. गांजरे-७, एच. एल. कासारे-३, बी. सी. कांबळे-२, खैरमोडे खंड-१२, कीर धनंजय-३, भिक्षू संभव-२, धर्मदूत-४, वसंत मून-२, रमेश शिंदे-१, शा. शं. रेगे-१, अस्मितादर्श-१, शंकरराव होतोले-२ व डॉ. बाबासाहेब आंबेडकर लेखन व भाषणे खंड-१३, खंड २-१, प्रबुद्ध भारत-१४ या स्त्रोतांमधून भाषणे व संदर्भ घेतले आहेत. यात काही संदर्भ एकाच भाषणाचे दोन दिले आहेत.

या भाषणाचे स्त्रोत शोधताना दोन प्रकारचे स्त्रोतांचा उपयोग संपादक मंडळाने केलेला आहे. एक बाबासाहेबांची वृत्तपत्रे ही अधिकृत स्त्रोत म्हणून मानली गेलेली आहेत. सारनाथचे महाबोधी सोसायटीचे मुखपत्र धर्मदूत,

नवयुग ही अशीच अधिकृत स्रोत आहेत. बुद्ध की मार्क्स या भाषणाच्या शीर्षकासंबंधी वाद निर्माण झाला होता. काही अभ्यासकांनी व वाचकांनीही याबद्दल लेखी, जाहीर भाषणांद्वारे विचारणा केली होती व आपले आक्षेपही नोंदविले गेले. त्यादृष्टीने शोध घेतला असता, दिनांक ३ ऑगस्ट १९५७ च्या 'प्रबुद्ध भारत'मध्ये या भाषणाचे वृत्त प्रसिद्ध झाले असून त्यात बाबासाहेबांचे 'बौद्ध धर्म व मार्क्सवाद' या विषयावर भाषण झाल्याचे नोंदविले गेले आहे. त्याचे संग्राहक म्हणून बाबासाहेबांबरोबर खाटमांडू परिषदेला गेलेले प्राचार्य म. भि. चिटणीसांचा उल्लेख आढळतो. बुद्ध व मार्क्स या उर्वरित नियोजित ग्रंथाचा उल्लेख बाबासाहेबांनी 'बुद्ध अॅन्ड हिज धम्म' या ग्रंथाच्या प्रस्तावनेत केला आहे. त्याचे स्पष्टीकरण खंड ३ च्या प्रस्तावनेत संपादक मंडळाने केले आहे. परिषदेच्या स्मरणिकेत Buddha and Marx अशा शीर्षकाखाली हे भाषण दिले आहे. 'व' (and) व (or) 'किंवा' यात खूप फरक आहे. आमच्या रेकॉर्डप्रमाणे पुराभिलेखमध्ये हे लेखन 'बुद्ध की कार्ल मार्क्स' (Buddha or Karl Marx) या नावाने उपलब्ध आहे; परंतु या शीर्षकाचे प्रकरण हे खाटमांडू भाषणाचे नसून ते स्वतंत्र आहे (खंड ३ रा संपादक मंडळाची प्रस्तावना). हा सारा विचार करून या तिसऱ्या भागातील क्रमांक ३४७ भाषणाच्या शीर्षकात दुरुस्ती करून 'बौद्ध धर्म व मार्क्सवाद' हे मूळ शीर्षक दिले आहे.

ही भाषणे जी लिखित स्वरूपाची आहेत, त्यात बाबासाहेबांचे विचार मुद्देसूद व सर्वकाळ वाचायला मिळतात. उर्वरित भाषणे ही मुख्यत्वेकरून वृत्तांकन असल्यामुळे ती थोडक्यात व अनेकदा प्रासंगिक असल्याने जशी वृत्तांकने प्रसिद्ध झाली आहेत तशीच ती छापली गेली आहेत. वृत्तपत्रांतील लेखनाचे स्वरूप बघता हे वाचकांच्या लक्षात येईल, असे वाटते.

या द्वितीय आवृत्तीसाठी मा. मुख्यमंत्री देवेंद्र फडणवीस यांनी शुभ संदेश देऊन आमचा उत्साह वाढविला आहे. त्यांचे आभार. समितीचे अध्यक्ष तथा शिक्षणमंत्री विनोद तावडे यांनी शुभ संदेश दिला व या कार्याला चालना दिली त्याबद्दल त्यांचे आभार. या कार्यासाठी तत्कालीन प्रधान सचिव डॉ. संजय चहांदे यांनी पुढाकार घेतला. वेळोवेळी समितीच्या अडचणी सोडविण्यासाठी

आदेश दिले; त्याबद्दल त्यांचे आभार. उपसचिव सिद्धार्थ खरात यांचेही आभार. प्रधान सचिव सीताराम कुंटे यांनी वेळोवेळी समितीच्या कार्यास प्रोत्साहन दिले; त्याबद्दल त्यांचे आभार. समितीच्या सर्व सदस्यांचेही आभार. या कामासाठी कार्यालयातील सुमित्रा नेवरेकर, कदम, पार्टे, शेटकर, दळवी, करंडे यांनी सहकार्य केल्याबद्दल त्यांची नोंद घेतो. प्रेसचे संचालक, प. ज. गोसावी, व्यवस्थापक, न. म. गोटे व मुद्रणालयातील कर्मचारी यांचे सहकार्याबद्दल आभार.

**प्रा. अविनाश डोळस,**

सदस्य सचिव

# अनुक्रमणिका

## खंड १८ भाग ३

## अनुक्रमणिका--चालू

## अनुक्रमणिका--चालू

## अनुक्रमणिका--चालू

## अनुक्रमणिका--चालू

## अनुक्रमणिका--चालू

# अनुक्रमणिका--चालू

## अनुक्रमणिका--चालू

# २३३

# जे लोक कोट्यवधींना अस्पृश्य नि गुन्हेगार मानतात त्यांना स्वातंत्र्य मागण्याचा हक्क कसा पोहोचतो ?

अस्पृश्यांचे एकमेव पुढारी व हिंदुस्थान सरकारच्या कार्यकारी मंडळाचे सदस्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे ता. १४ जानेवारी १९४६ रोजी सोलापूर येथे सकाळच्या मद्रास मेलने आले.

सकाळी सोलापूर नगरपालिका व जिल्हा लोकल बोर्ड या संस्थेच्या वतीने हरिभाई देवकरण हायस्कूलचे कै. रा. ब. मुळे स्मारक मंदिरात डॉ. साहेबांना मानपत्र अर्पण करण्यात आले. याप्रसंगी शहरातील प्रमुख व्यापारी, डॉक्टर्स, सरकारी अधिकारी, वकील इत्यादी निमंत्रित मंडळी उपस्थित होती.

सुरुवातीस नगरपालिकेतर्फे देण्यात येणारे मानपत्र नगराध्यक्ष रा. ब. नागप्पा अण्णा अफजूलपूरकर यांनी वाचून दाखवून ते डॉ. बाबासाहेबांना अर्पण करण्यात आले. त्यानंतर जिल्हा बोर्डाचे मानपत्र बोर्डाध्यक्ष श्री. जी. डी. साठे यांनी वाचून अर्पण केले. मानपत्रांना उत्तर देताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

मला मानपत्रे अर्पण केल्याबद्दल मी अत्यंत आभारी आहे. सोलापूर शहरास मी अपरिचित नाही व येथे मी बऱ्याच वेळा आलेलो आहे. राजकारण व समाजकारण यांचा प्रचारही केलेला आहे. खरे पाहिले तर सार्वजनिक कार्याची मुहूर्तमेढ सोलापूरातच मी रोवली. कै. डॉ. रा. ब. मुळे यांनी अस्पृश्यांसाठी बोर्डिंग उघडले व त्यांचेच कार्य त्यांचे बंधु डॉ. भालचंद्रराव ऊर्फ काकासाहेब मुळे यांनी उत्तमप्रकारे चालविले आहे, ही आनंदाची गोष्ट आहे.

हिंदुस्थान सरकारचा आतापर्यंतचा इतिहास अवलोकन केला तर कर वसूल करणे व कायदा व सुव्यवस्था पाहणे ही दोनच ध्येये त्यांच्यापुढे होती. पण अलीकडे त्यात बदल झाला आहे. देशातील दारिद्र्याला जगाच्या इतिहासात तोड नाही. ते दारिद्र्य नाहीसे करण्याचे ध्येय आम्ही ठेवले आहे, हे कोणीही कबूल करील. दिल्लीत आज पुनर्घटनेचे कार्य जोरात सुरू आहे. राहण्याची सोय, शिक्षण, उद्योगधंदे यांचे बाबतीत मध्यवर्ती सरकारची ९० टक्के शक्ती खर्च होत आहे. लोकल बोर्ड, म्युनिसिपालिट्या यांना मदत देऊन या गोष्टी अमलात आणण्याची सक्ती करण्याचे धोरण आखले जाणार आहे.

---

जनता : १९ जानेवारी १९४६.

मी अजून मत्री आहे. मध्यवर्ती सरकारमार्फत मजुरांच्या हिताकडे अधिकाधिक लक्ष देण्यात येत आहे. १९३० साली या प्रश्नाबाबत एक रॉयल कमिशन नेमले गेले होते. त्या कमिशनने अनेक सूचनाही केल्या होत्या. १९३० सालापासून ४२ सालापर्यंतचा इतिहास पाहिला तर या दृष्टीने काहीच झाले नाही. पण ४२ सालापासून म्हणजे मी मंत्रीपद स्वीकारल्यानंतर आज ४६ सालापर्यंत अवघ्या ३ वर्षांत प्रगती झालेली दिसेल. यात आत्मस्तुती नसून वस्तुस्थिती आहे. २० सालापासून आजतागायत मध्यवर्ती असेंब्लीत मजुरांचा १ प्रतिनिधी घेतला जात असे. आज ३ मजूर प्रतिनिधी नव्या असेंब्लीत असलेले तुम्हास दिसतील. कौन्सिल ऑफ स्टेट्समध्ये आतापर्यंत एकही मजूर प्रतिनिधी घेतला जात नसे. पण यापुढे १ मजूर प्रतिनिधी तेथे घेण्यात येईल.

आगामी मध्यवर्ती असेंब्लीच्या बैठकीत मजुरांच्या हिताची १० बिले येणार असून मी ती ड्राफ्ट केली आहेत. यावरून देशाचे सामाजिक व आर्थिक दारिद्र्य दूर करण्याचे प्रयत्न कसे चालू आहेत हे दिसून येईल.

देशातील सामाजिक परिस्थिती विचित्र झाली आहे. देशात ६ कोटी मानवांचा विटाळ वाटणारे लोक या देशात आहेत. उपजीविकेचे साधन म्हणून गुन्हेगारीचा धंदा करणारे २५ लाख मानव या देशात आहेत. आठ हजार वर्षांपूर्वी देशात संस्कृती निर्माण झाली, असे इतिहास सांगतो. कपडे कसे घालावे, अन्न काय खावे हे माहीत नाही, अशा स्थितीत राहाणारे लोकही कोट्यवधी आहेत. जगातील कोणत्याही देशात नाही अशी गंभीर परिस्थिती आमच्या हिंदुस्थानात आहे. ज्यांच्या नाड्यात सामर्थ्य आहे, त्यांच्यावर ही जबाबदारी आहे. देशाचे स्वातंत्र्य हवे अशा गप्पा मारणाऱ्यांच्यावर ही जबाबदारी जास्त आहे. ज्या देशात कोट्यवधी लोक अस्पृश्य नि गुन्हेगार मानले जातात त्यांना स्वातंत्र्य मागण्याचा हक्क कसा पोहोचतो ? ही जबाबदारी टाळता येणे शक्य नाही.

स्वराज्य मागणे फार सोपे आहे. मला प्रश्न विचारला जातो. डॉक्टरसाहेब, " कॉंग्रेसमध्ये तुम्ही सामील का होत नाही ? मानसन्मान, दररोज वर्तमानपत्रातून ठळक जागी नाव छापून येईल. " मला ते मान्य नाही. बडबड करण्यापेक्षा

कृतीची जरुरी असते. कुठेही मी गेलो तरी उद्वेग वाटण्यासारख्या या गोष्टी आहेत. अस्पृश्यता निवारण्याचे खरे कार्य मीच करीत आहे.

खरे म्हणजे हे कार्य स्पृश्य समाजातील पुढाऱ्यांचे आहे. इंग्रज लोकांजवळ स्वराज्य मागणाऱ्या लोकांनी आपल्या देशातील अस्पृश्यता निवारण्याचे कार्य प्रथम हाती घेतले पाहिजे. या स्वराज्य मागणाऱ्या लोकांबद्दल इंग्रज लोक अंतर्यामी काय बोलतात याची मला जाणीव आहे. अस्पृश्यता नष्ट होईल तितक्या लवकर स्वराज्य हाती येईल. त्याशिवाय स्वराज्य मिळणार नाही. हे निश्चित.



## २३४

# कर्तृत्ववान नसली तरी चालतील, पण निष्ठेची माणसे हवीत

ता. १४ जानेवारी १९४६ रोजी सोलापूर येथील प्रचंड जनसमुदायासमोर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी दणदणीत असे भाषण केले. आपल्या भाषणात डॉक्टर बाबासाहेब म्हणाले,

निवडणुकीबबात माझ्या अस्पृश्य बांधवांना दोन शब्द सांगण्याची जरुरी मला वाटत नाही. पण काही मंडळीच्या आग्रहाखातर मला बोलावे लागत आहे. माझ्या समाजावर माझा संपूर्ण विश्वास आहे. सर्व अस्पृश्य समाज शेड्यूल्ड कास्ट्स फेडरेशनच्या मागे आहे, याबद्दल मला मुळीच शंका वाटत नाही. दुसऱ्या कोणाला समजत नाही इतका अस्पृश्य समाज जाणता झाला आहे. त्याला हित-अहित कळते. आमची संघटना इतकी मजबूत आहे की, मी दिल्लीला बसून घंटा वाजवून इशारा दिला की, माझा समाज मी सांगितलेला आदेश निष्ठेने पाळतो.

मध्यप्रांतात हरिजनांच्या ६ जागा काँग्रेसला कशा मिळाल्या, असा आक्षेप घेतला जातो पण याला माझे उत्तर असे की, मैदानावर उतरले म्हणजे राज्य घेतले, असे कसे म्हणता येईल ? आमच्या अस्पृश्यांचा अभेद्य किल्ला मुंबई प्रांतात आहे. तो जर विरोधी पक्षांनी सर केला तर टोपी काढून शरण येऊ.

काँग्रेसचा प्रचार आज विमाने, रेल्वे व मोटारी यांच्या साहाय्याने जोरात सुरू आहे. मला त्यांना प्रश्न विचारावासा वाटतो.

देशातील सारी जनता आपल्यामागे आहे अशी फुशारकी नि घमेंड मारणारे हे लोक विमानाने का उडतात ? सारा देश घुसळून का काढतात ? हा धिंगाणा का चालू आहे ? मी निवडणूक प्रचारासाठी अवघ्या चारपाच ठिकाणी गेलो जनता जर काँग्रेसच्या मागे आहे तर पैसे, विमाने, मोटारी घेऊन पोतराजासारखे हिंडता का ?

---

जनता : १९ जानेवारी, २ फेब्रुवारी १९४६.

आगामी निवडणूक म्हणजे काही आटापाट्याचा खेळ नव्हे. येणारी निवडणूक हा संग्राम आहे, हे युद्ध आहे. कौरव-पांडवांप्रमाणे ही लढाई होणार आहे. कौरव-पांडवांचे युद्ध टाळावे म्हणून कृष्णाने शिष्टाई केली. पण सुईच्या अग्रावरील मातीसुद्धा पांडवांना मिळणार नाही, असे घमेंडीचे उत्तर दुर्योधनाने कृष्णाला दिले. युद्ध टाळावे म्हणून मी गांधींना पत्र लिहून तडजोडीचे प्रयत्न केले. आपला मान सन्मान खिशात ठेवून मी समाजाचे हितासाठी पुढारपणाची पर्वा न करता राऊंड टेबल परिषदेतल्या सामन्याची पुनरावृत्ती होऊ नये, वितुष्ट वाढू नये म्हणून उभयतांनी राजकीय मागण्यांची तजवीज करावी म्हणून गांधींना पत्र लिहिले. "तुमच्या आमच्यात समदृष्टिकोन नाही" असे गांधींनी उत्तर देऊन माझी समझोत्याची मागणी अमान्य केली. मी पत्र लिहिण्यापूर्वी काही महिने हेच गांधी, जिनांचे घरी जाऊन त्यांचे गळ्यात गळा घालीत होते. मी विचार केला गांधी जिनांना भेटतात तर मलाही भेटतील. गांधी-जीना यांच्यामध्ये कोणता समदृष्टिकोन होता हे राजकारण तज्ज्ञांनाच माहीत ! राज्य काही तुम्ही एकट्याने कमावले नाही. दोघांनी कमावले असे असताना दुर्योधनाने सांगितल्याप्रमाणे सुईच्या अग्रावरील मातीही देण्यास हे गांधी तयार नाहीत. कृष्णशिष्टाई संपल्यावर कृष्णाने दुर्योधनास सांगितले, तुमची बाजू तुम्ही सांभाळा. गांधींनी दुर्योधनाची भूमिका पत्करल्यावर अस्पृश्य समाजात जर काही पराक्रम, पौरुषत्व असेल तर या युद्धात शेड्यूल्ड कास्ट्स फेडरेशनचे उमेदवार निवडून देऊन 'तुमची बाजू तुम्ही सांभाळा; आमची बाजू आम्ही सांभाळतो'. असे गांधी व काँग्रेसला रोखठोक उत्तर दिले पाहिजे.

भावी राज्यघटना ठरविताना अस्पृश्यांची बाजू आपणच खंबीरपणे मांडणार आहोत. हे इलेक्शन साधे नाही. मास्तरांचा पगार, शेतसारा कमी करणे, बुंदीचे जेवण इत्यादी साध्य करण्याचे हे इलेक्शन नाही. तर इंग्रज सरकार येथून निघून गेल्यावर सत्ता कोणाचे हाती राहणार हे भावी घटनेत ठरवावयाचे आहे.

निवडणुकीची संधी साधून अनेक पोकळ जाहीरनामे निघाले आहेत. पण त्यात अर्थ नाही. जाहीरनाम्याप्रमाणे या थापेबाजांनी काहीच केले नाही तर आपण अस्पृश्य काय करणार ? कोणाकडे रडगाणे नि दाद मागणार ? हे भांडण सत्तेसाठी आहे.

तुकड्यासाठी दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याची वेळ समाजावर येऊ नये. पोटापाण्याचा प्रश्न सुटावा, सन्मानाने राहावयास मिळावे यासाठी राजकीय सत्तेची जरूरी असते आणि ती मिळविण्यासाठी आम्ही झगडत आहोत.

पाटलाने मारले तर पोलिसापासून कलेक्टरपर्यंत एकमेकांचे सोयरे असल्यामुळे बिचाऱ्या अस्पृश्यांची दाद कोणीही घेत नाही. दिवाणही त्यांच्याच जातीचा. जन्मभर आमचा समाज गुलामगिरीतच राहणार का ? जे इंग्रजी राज्यात तेच भावी राज्यात होऊ नये म्हणूनच आम्ही झगडत आहोत. जोपर्यंत हिंदुंच्या हाती राजकीय सत्ता राहील तोपर्यंत ही गुलामगिरी नष्ट होणार नाही. या निवडणुकीत आमचे दलित फेडरेशन 'दे दान सुटे गिराण' प्रमाणे मताची भीक मागत नाही. आमचे भविष्य उज्ज्वल व्हावे म्हणून आम्हास सत्ता हवी. ती मताच्या रूपाने समाजाने आम्हाला द्यावी, आमचा तो हक्क आहे.

यावेळी अस्पृश्य समाज जागृत झाला नाही तर पेशवाईतल्याप्रमाणे कंबरेला खराटा व गळ्यात थुंकण्यासाठी मडके अडकविण्याची पाळी आल्याशिवाय राहणार नाही. दलित फेडरेशनने उभा केलेला उमेदवार निमित्त मात्र आहे. उमेदवाराशी खाजगी मतभेद, हेवेदावे विसरून दिलेले मत उमेदवाराला नसून फेडरेशनला आहे ही गोष्ट प्रत्येकाने लक्षात ठेवावी. फेडरेशनचा उमेदवार म्हणजे प्रत्यक्षात मी उभा आहे, असे समजा.

कायदे कौन्सिलमध्ये मारवाडी, बामणाच्या मांडीला मांडी लावून १५-२० अस्पृश्य सन्मानाने बसू शकतील, असा दर्जा तुमच्यात मी निर्माण केला. या अभेद्य संघटनेस चुना, सिमेंट लावून ती मजबूत करण्याच्या मार्गावर मी आहे. आपला किल्ला अभेद्य राहील असे आपण वागले पाहिजे. हिंदू व मुसलमान या दोघांनी संगनमत केले आणि आपल्या किल्ल्यावर हल्ला केला तरी आमचा हा किल्ला अभेद्य राहील. त्याला धक्काही लागणार नाही अशी व्यवस्था मी केली.

कोणाच्या खाजगी दोषाकडे कोणी लक्ष देऊ नये. अस्पृश्यात भेदाभेद आहेत असा कांगावा करून आमच्यात फूट पाडण्याचा प्रयत्न विरोधक करीत आहेत पण वस्तुस्थिती तशी नाही. मुंबईच्या गेल्या प्राथमिक निवडणुकीत महार मतदार बहुसंख्य असता चांभार उमेदवार उभा करून त्याला निवडून आणला. काँग्रेसचे तिकीट असले तरी ब्राह्मण, ब्राह्मण उमेदवाराला व मराठा, मराठा उमेदवाराला मते देतो पण आमचे फेडरेशन हा भेद जाणत नाही.

मिनिस्टर करू, अमुक करू, तमुक देऊ अशी नानाप्रकारची आमिषे बाजूला सारून आमच्या फेडरेशनच्या मागे आमचा समाज आहे, हे सिद्ध झाले

आहे. आमच्या उमेदवारांविरुद्ध नाना कंड्या उठविल्या जातात, पण लक्षात ठेवा, तावून सुलाखून पारख केलेल्या उमेदवारांची मी निवड केली आहे. तत्त्वाला जागणारी ती माणसे आहेत.

मुंबई असेंब्लीत काँग्रेस मंत्रिमंडळाचा कारभार २ वर्षे ७ महिने चालू असता स्वतंत्र मजूर पक्षाचे १५ निष्ठावंत सभासद कोणाला हार गेले नाहीत. त्यांना फोडण्याचे भगीरथ प्रयत्न झाले. परंतु आमची १५ माणसे वादविवादात, शिस्तीत, राजकारणात ध्येयनिष्ठेची होती.

विद्वान, कर्तृत्ववान माणसे नसली तरी मला चालतील पण निष्ठेची माणसे हवीत, विद्येचा तुटवडा भरून काढण्यास मी खंबीर आहे. जो विकला जातो, लोभाला बळी पडतो, त्याचा काही उपयोग नाही. आपल्यावर व भावी पिढीवर येणारे संकट नाहीसे करून पुढच्या पिढीचा मार्ग सुकर करणे आपले कर्तव्य आहे. २००० वर्षे आपले पूर्वज गुलामगिरी मुकाट्याने सहन करीत आले आहेत. ती गुलामगिरी आपण सहन करणार काय ? (नाही. जनतेचे उद्‌गार) दरेक पिढीचे पुढच्या पिढीवरचे संकट नाहीसे करण्याचा प्रयत्न करणे कर्तव्य आहे.

२० वर्षे खटपट करून मुसलमानांनी जे मिळविले ते अवघ्या २ वर्षांत आम्ही मिळविले ही काय कमी महत्त्वाची गोष्ट आहे ?

मी सध्या दिल्लीला राहत आहे. माझ्या टेबलावर एक घंटी आहे. मी घंटी वाजविल्यावर जसा चटदिशी माझा जमादार माझ्यापुढे हजर होतो, त्याचप्रमाणे दिल्लीहून मी स्वीच दाबले की मुंबईला ताबडतोब प्रकाश मिळतो. माझा हा जो आत्मविश्वास आहे तो खोटा नाही, खरा आहे. वस्तुस्थितीच्या पायावर उभारलेला आहे. मुंबईचे कालचे इलेक्शन पाहा. शेड्यूल्ड कास्ट्स फेडरेशनच्या भंडारे यांना १२,८९९ मते व देवरूखकर यांना ११,३३४ इतकी मते पडली आणि काँग्रेसच्या उमेदवाराला धूळ खावी लागली. मुंबईचे इलेक्शन हिंदुस्थानच्या इतिहासात कायमचे राहील.

लोकांना असे वाटते की, मुस्लीम लीग संघटित आहे. मुस्लीम लीगचे जास्त उमेदवार निवडून आले. मला असे सांगावयाचे आहे की, फेडरेशनची शक्ती मुस्लीम लीगपेक्षाही अधिक संघटित आहे. त्याचे कारण आहे. मुस्लीम कोटाच्या आत राहतात. आम्ही कोटाच्या बाहेर राहतो. आम्ही बाहेर राहूनदेखील शत्रुला बेदम मार देऊ शकतो. अशा परिस्थितीत अस्पृश्यांना राजकारण समजत नाही म्हणणे मूर्खपणा आहे.

आज मुख्य भांडण कशात आहे ? इंग्रज सरकार या देशातून निघून गेल्यावर कोण राज्य करणार ? हिंदू ? मुसलमान ? का हिंदू आणि मुसलमान मिळून ? आपल्याला पुष्कळ आमिषे दाखविण्यात येतात पण तुम्ही सर्वांनी मुख्य भांडण समजून घेतले पाहिजे. आमचे जे भांडण आहे ते सत्तेचे भांडण आहे. आम्हाला सत्ता पाहिजे. हिंदुंचे राज्य नको आहे, भीक नको आहे. खरेखुरे स्वराज्य पाहिजे आहे. आमचा खरा लढा कॉंग्रेसशी आहे. मुसलमान जे मागतात ते कॉंग्रेस त्यांना देते. मुसलमान शेकडा पंचवीस आहेत. त्यांना शेकडा तेहतीस पूर्णांक एकद्वितीयांश जागा कबूल आहेत. आता ते ५० टक्के मागणी करतात. तेही द्यावयास सिमला परिषदेचे वेळी कॉंग्रेसवाले सिद्ध झाले आणि आमचा वाजवी हक्क असताना आम्हाला काय उत्तर ? सुईच्या अग्रावर जेवढी माती राहील तेवढीही मिळणार नाही ! (शेम-शेम-शेम) पुनरूपी पेशवाई कधीही न येऊ द्यायची असेल तर तुम्ही जागरूक राहिले पाहिजे. मी मुंबई असेंब्लीकरिता तुमच्या जिल्ह्यात जिवाप्पा ऐदाळेला उभे केले आहे. जिवाप्पा केवळ निमित्तमात्र आहे. सर्वकाही मी आहे, मला मते द्या. (प्रचंड टाळ्या).

मी जातिभेदाच्या अगदी विरुद्ध आहे. मी मांगांबरोबर-भंग्यांबरोबर जेवतो. जातिभेदाचा मी कट्टर शत्रू आहे. आपापसातील जातिभेद लवकर नाहीसे व्हावेत या मताचा मी आहे. हे जातिभेद ब्राह्मणांनी उत्पन्न केले आहेत. माझ्या फेडरेशनमध्ये जातिभेदाला कायमचीच माती दिलेली आहे. मांग, भंगी, चांभार इत्यादी सर्वांना मी समानतेने वागवतो. मी महार जातीत जन्मलो हा काही माझा दोष नाही. मुंबईत शेकडा ९० टक्के महार होते. पण मुंबईत चांभार समाजाचे देवरूखकर यांना उभे केलेले आहे. सुतार-सुताराला मत देणार, कासार-कासाराला मत देणार, असे मुळीच चालावयाचे नाही. सर्वांनी शेड्यूल्ड कास्ट्स फेडरेशनच्या उमेदवारालाच मत दिले पाहिजे. दुसरे उदाहरण, नाशिक म्युनिसिपालिटीमध्ये भंगी उभा केला. शेकडा ९० टक्के महार मतदार होते. महारांनी निवडून आणला.

खान्देशामध्ये एका मांग उमेदवारास तिकीट दिले होते. दुर्दैव बिचाऱ्याचे वाटेत त्याची मोटार बिघडली. नॉमिनेशन पेपरच्या वेळेत तो स्वत: हजर राहू शकला नाही. गेल्या दोन महिन्यांपूर्वी विलायतेस उच्च शिक्षणासाठी ३० विद्यार्थी आपले पाठविले. त्यात मांग आहेत, चांभार आहेत, ढोर आहेत व भंगीही पण आहेत. माझ्याजवळ जातिविषमतेला थारा नाही.

विजापूर-अहमदनगर-बेळगाव तीन ठिकाणी मला येणे अशक्य आहे. हिंदुस्थानातील सर्व प्रांत ओरडतात की, तुम्ही आमच्या प्रांतात अद्याप का आला नाही ? मला सांगायला अभिमान वाटतो मुंबई इलाख्यात राजकीय प्रगती अनुपम झाली आहे. विजापूर जिल्ह्यातील काही लोक येथे आल्यासारखे दिसतात. त्यांनी काळे यांना मते द्यावी व अहमदनगरच्या मतदारांनी रोहमला मते द्यावीत.

मरणाचे भय कोणाला ? एक गांगुर्डे मेला तर काय झाले ? बाकीची ३०० माणसे जखमी आहेत ती जरी मेली तरी त्यांचे काय ? माझे असे एक सहा महिने जात नाहीत की, मला "तुला गोळीने ठार मारू, खून करू" अशा प्रकारची निनावी पत्रे येत नाहीत. सगळ्यांनी निडर राहून या इलेक्शनमध्ये गुलामगिरीची बेडी तोडण्यासाठी फेडरेशनचा उमेदवार निवडला पाहिजे. हा अखिल अस्पृश्यांचा संग्राम आहे हे लक्षात ठेवा. सैन्यात जशा तऱ्हेने रणशिंग फुंकल्याबरोबर सर्व शिपाई एकदम गोळा होतात तसेच प्रत्येक स्त्री-पुरुषाने पोलिंग स्टेशनवर स्वत: जाऊन आपल्या उमेदवाराला मत दिले पाहिजे.



# माझा स्वराज्याला बिलकूल विरोध नाही पण त्या स्वराज्यात आम्हाला पुरेसा हिस्सा पाहिजे

[ दहिवडी (सातारा) ता. १५ फेब्रुवारी १९४६ ]

अध्यक्ष महाराज व बंधुभगिनींनो,

आज मी या ठिकाणी दिल्लीहून जवळजवळ १००० मैलांचा प्रवास करून आलो आहे. याचे कारण म्हणजे हल्लीचा प्रसंगही तितकाच महत्त्वाचा आहे. जिकडे तिकडे पक्षोपक्षांची निवडणुकीची धामधूम सुरू आहे. पण अलीकडे हिंदुस्थानमधील वर्तमानपत्रांमध्ये एका गोष्टीला अगदी ऊत आलेला आहे व ती गोष्ट म्हणजे गांधी व माझ्यामधील झगडा. हा झगडा २५ वर्षे म्हणजे जवळ जवळ १९२० सालापासून चालू आहे. पण हा झगडा का व कशाकरता चालला आहे याचा तुम्ही सर्वजण विचार करा. गांधींचा टिळकांशी झगडा होता. गांधींचा गोखलेंच्या बरोबरही झगडा होता. गांधींचा सर चिमणलाल सेटलवाड बरोबरसुद्धा झगडा होता पण हे झगडेमात्र आता नामशेष झालेले आहेत. पण माझा गांधींशी चाललेला झगडा मात्र अजून चालूच आहे.

मी एका दरिद्री कुटुंबात जन्मलो आहे. कष्टाने व चिकाटीने मी शिकलो. पुढे बडोदा सरकारच्या मदतीने विलायतेस जाऊन पदव्या संपादन केल्या. नंतर नोकरी धरली. दोन वर्षांनी नोकरी सोडून परत विलायतेस जाऊन बॅरिस्टर व डी. एससी. झालो व तेव्हापासून समाजकार्य व धंदा प्रामाणिकपणे करीत आलो आहे. मी बॅरिस्टरीस सुरुवात केली त्यावेळी हायकोर्टातील सर्व वकील ब्राह्मण व सर्व सॉलिसिटर्स गुजराती. त्यावेळीच गांधींकडे जाऊन काहीतरी माझ्याकरिता मला मागता आले असते व मानमरातब, केसेस व पैसाही मिळविता आला असता व गांधींना शरण जाऊन इतरांप्रमाणे माझा खाजगी वैयक्तिकवाद असता तर तोसुद्धा मी मिटविला असता. पण माझा व गांधींचा वाद न मिटता राहिलेला आहे. याचे कारण मला गांधींजवळ व्यक्तिशः काहीही मागावयाचे नाही. बुद्धीने, कर्तबगारीने व पुरुषार्थाने मी जीवन आक्रमित आहे. मी जे गांधींकडे मागत आहे ते तुमच्या वतीने जे न्याय तेच मागत आहे. माझा गांधींशी चाललेला हा झगडा आपल्या सर्व समाजाच्या वतीने असून तो सर्व समाजाच्या भवितव्यतेचा आहे.

---

गरुड : १० मार्च १९४६.

अलिकडे सगळेजण स्वराज्य मागत आहेत. पण विचार करा की, ते कोणाचे स्वराज्य आहे ? आम्ही स्पृश्यांना विचारतो की, तुमचे राज्य आमच्यावरच का ? आम्हालाही आमचे स्वराज्य व न्याय हक्क नकोत का ? हिंदुंचे स्वराज्य म्हणजे शुद्ध पेशवाई ! पेशवाई तरी स्वराज्यच होते ना ! मग त्यात आमचा कितीतरी छळ झाला. अस्पृश्य माणसाची थुंकी रस्त्यावर पडून विटाळ होऊ नये म्हणून त्याच्या गळ्यात गाडगे बांधले व त्याची पाऊले उठलेल्या धुळीच्या स्पर्शाचा विटाळ होऊ नये म्हणून पाठीशी खराटा लटकविला व ओळखण्यासाठी गळ्यात काळा दोरा बांधला. ही परिस्थिती पुन्हा येऊ नये म्हणूनच माझे भांडण आहे.

माझा स्वराज्याला बिलकूल विरोध नाही. पण त्या स्वराज्यात आम्हाला पुरेसा हिस्सा पाहिजे. अधिकाराच्या व मान्याच्या जागी आमची माणसे हक्काने आली पाहिजे. गोलमेज परिषदेमध्ये स्वतंत्र मतदारसंघासाठी मी भांडलो. स्पृश्यांनी निवडलेली माणसे आम्हाला प्रतिनिधी नकोत म्हणून मी आग्रह धरला. अखेर मी विजयी झालो व स्वतंत्र मतदारसंघ मिळविला. पण गांधींना पोटदुखी उठली. अस्पृश्यांना स्वाभिमानाचे हक्क जे मिळाले ते दृष्टपणाने हिरावून घेण्यासाठी त्यांनी आमरण अन्नसत्याग्रह केला व आपले हक्क हिरावून घेतले. त्यामुळे आपल्याला फारच कमी हक्क मिळाले. आपल्या बुरुजाला जी भेग पाडली आहे तीत संघटनेचा चुना वगैरे घालून आपण ती भरून काढली पाहिजे. आपले सरकारी अधिकारी पाहिजेत, मंत्री पाहिजेत, मध्यवर्ती सरकारातही मंत्री पाहिजेत. असे असता ७ प्रांतात कॉंग्रेस मंत्रिमंडळे झाली पण गांधींचा दृष्टिकोन बदलला नाही किंवा त्यांच्या हृदयात पालटही झाला नाही. परवा गांधींनी मद्रासचा दौरा काढला. तेथे अस्पृश्यांची व तुमची एवढी तेढ का असा एकाने प्रश्न केला. तेव्हा सरळ व स्पष्ट उत्तर न देता गांधींनी काहीतरी उडवाउडवीचे उत्तर दिले व इंग्रजांनी यांना अधिकाराची चट लावली असे उद्गार काढले. मराठे, मुसलमान, तसेच ख्रिश्चन, अँग्लो इंडियनांना नोकऱ्या देतात त्याबद्दल गांधींचे काही म्हणणे नाही फक्त अस्पृश्यांना दिल्या की त्यांच्या पोटात दुखते असा अनुभव आहे.

हे इलेक्शन अति महत्त्वाचे आहे. इंग्रज आपली सत्ता काढून घेऊन लोकांना सत्ता व घटना बनविण्याचे अधिकार देणार आहेत. त्यासाठी एक घटना समिती बनविण्यात येणार आहे. त्यासाठी आपले आमदार तेथे जाऊन घटनेचा व्याप ठरविणार आहेत. आपल्याला नोकऱ्या, शिक्षण, प्रतिनिधित्व, सत्ता, स्वतंत्र अस्तित्व, वसाहती वगैरे मागण्या निर्भीडपणे मांडणारी माणसे पाहिजेत.

स्पृश्यांच्या ओंजळीने पाणी पिणारे लोक नको आहेत. जर कॉंग्रेस तिकिटावरची माणसे कोणाचीही भाडभीड न ठेवता आमच्या मागण्या मांडतील तर मी त्यांना पाठिंबाच देईल. पण ती माणसे स्पृश्यांचे गुलाम आहेत. अस्पृश्यांच्या हिताकडे न बघता स्वार्थाकडे बघणारी आहेत. त्यांना आपण पाडले तर फारच चांगला परिणाम होईल. ज्याप्रमाणे धनी आपल्या कुत्र्याला कोठे दुसरीकडे जाऊ नये म्हणून पट्टा लावून बांधतो त्याप्रमाणे कॉंग्रेसचे तिकीट म्हणजे पितळेचा पट्टा आहे. कॉंग्रेसला जवळ उभे करू नका. कॉंग्रेसचा उमेदवार आपला शत्रू आहे. तो पराधीन आहे. आपली माणसे पराधीन होता कामा नयेत. म्हणून तुम्ही दक्ष राहा.

पराधीनतेने नुकसान कसे होते याचे एक प्रत्यक्ष घडलेले उदाहरण सांगतो. फलटणच्या काही महारांना ४ चाहूर जमीन होती. पण काही कारणानिमित्त तेथील राजा एका देवळात दररोज ५०० ब्राह्मणांना पंचपक्वान्न जेवू घालीत होता. राजवाड्यातून दररोज गाड्या भरून अन्न येत असे व महार लोक तेथील उष्ट्या अन्नावर दररोज अवलंबून राहिल्यामुळे शेती करीत नव्हते. महारांच्या जमिनीवर जंगल उगवून त्या जमिनी इतर मराठ्यांनी तशाच कब्जात घेतल्या. पुढे ६०/७० वर्षांनी राजा शहाणा झाला व त्याने ब्राह्मणांचे जेवण बंद केले. महारांचेही उष्टे बंद झाले. पुढे एक म्हातारा आपली जमीन मिळवून द्या म्हणून माझ्याकडे कागदपत्र घेऊन आला. पण १८७४ च्या आधी जमिनी गेल्यामुळे काही करता आले नाही. अशाप्रकारे खरकट्यामुळे महारांच्या जमिनी गेल्या व परावलंबी जीवनामुळे हक्क गेले. तेव्हा तुम्ही सर्वांनी झोप सोडून डोळे उघडा व जागे राहा. वर्ष दोन वर्षातच येथे मोठे परिवर्तन होणार आहे. इंग्रज सत्ता देईल ती सत्ता दुसऱ्याकडे न जाता आपणाकडेही पाहिजे. यासाठी चालू निवडणुका हा एक निर्णयाचा संग्राम आहे. कौरव-पांडवांच्या संग्रामासारखा आहे.

आपले ब्राह्मणेत्तर भिडू आता कॉंग्रेसकडे झुकत आहेत. आता कॉंग्रेस व आपली फेडरेशन यामध्येच झगडा आहे. आपण एकजूट केली, निश्चय व निर्धार केला तर जय आपलाच ! मेलो तरी हरकत नाही पण सन्मानाने जगू असा निर्धार केल्याशिवाय कायम स्वरूपाचा सामुदायिक बदल घडवून आणता येणार नाही.

वीस वर्षापूर्वीच्या परिस्थितीत व आताच्या परिस्थितीत जमीन अस्मानचे अंतर आहे. त्यावेळी शेकडा ९० लोक " तात्या तुमच्या गोठ्यातच राहतो " असे म्हणत असत. आज तसे म्हणणारा आपल्यातील एकही माणूस नाही.

ही आनंदाची गोष्ट आहे. महाराला पूर्वी कायदेमंडळाच्या इमारतीत झाडूवाल्यांचेच काम होते. पण आज माझी १५ माणसे कायदेमंडळात सभासद आहेत व इतरांच्या मांडीला मांडी लावून मानसन्मानाने ती तेथे बसत आहेत. आज ना उद्या ती मंत्रीही होतील. म्हणून हे इलेक्शन फार महत्त्वाचे आहे. ब्राह्मण किंवा ब्राह्मणेतर निवडणुकीस उभे राहतात ते मानासाठी पण तुम्हा आम्हाला कायदेमंडळात जावयाचे ते ज्या जात्याखाली आपण भरडले जातो त्या जात्याचा खुंटा आपले हाती आणण्यासाठीच ! जोर जुलूम टाळणे हे आपले तेथे जाऊन करण्याचे काम आहे. आपल्या जवळ पैसा नाही, आपण बलवान नाही, म्हणून आपल्याला राजकीय सामर्थ्य पाहिजे. आमच्या संमतीने राज्यकारभार चालला पाहिजे. तेव्हा ज्याला मत असेल त्याने त्या मताचा अमोलिक वस्तुसारखा उपयोग केला पाहिजे. मत म्हणजे ईश्वराने दिलेला " संजीवनी मंत्र " आहे. त्याचा योग्य उपयोग केला तरच आमचे संरक्षण होईल. स्वाभिमानी जीवनाचा तो एक तरणोपाय आहे, त्याची जोपासना करा. या दृष्टीनेच या इलेक्शनचा विचार करा.

आपण कायदेमंडळातही अल्पसंख्याक आहोत. १७५ मध्ये आपण १५ आहोत. या संख्येवर कार्य करणे कठीणच ! तेव्हा या १५ ची आता २०, २५ माणसे आपण निवडून आणली पाहिजेत. म्हणूनच आपण जनरलच्या जागाही लढवीत आहोत. दक्षिणभागाला मे. इनामदार यांना उभे केले आहे. आपण सर्वांनी त्यांना चारही मते दिली तरच आपल्याला यश येईल. १०,००० मते आहेत. १०,००० जणांनी तरी त्यांना मते दिली पाहिजेत. प्रत्येकाला ४ मते व ४ जागा आहेत. तरी सर्वांनी ही जबाबदारी ओळखली पाहिजे. आपल्या विरोधकाजवळ पैसा आहे. आपल्या विरोधकांनी काळ्या बाजारात मिळविलेला पैसा पापक्षालनार्थ ते कॉंग्रेसला निवडणुकीसाठी देत आहेत. पण पैशावर जर आपण राजकारण खेळू लागला तर आपणाला राजकारण सोडावे लागेल व राजकारणाचा खेळखंडोबाच होईल. आपले अस्पृश्य लोक कॉंग्रेसच्या मागे नाहीत. इतर लोक पैशास भुलून कॉंग्रेसच्या मागे लागतात. कारण कॉंग्रेसला जर लोक मानतात तर मग कॉंग्रेसचे इलेक्शन कवडीही खर्च न होता झाले पाहिजे. १९३७ साली माझ्या विरोधकाने ३५,००० रुपये खर्च केले. माझा खर्च फक्त जरुरीपुरता अवघा ९०० रुपये इतकाच होऊन जवळजवळ माझा पहिला नंबर आला याबद्दल मला धन्यता वाटते. म्हणून राजकारण कोणाला कळत असेल तर ते अस्पृश्यांना असे म्हणावे लागते. बाकीचे राजकारण स्वत:करिता करतात. समाजाचे किंवा देशाचे हित त्यांच्यापुढे नसते !

मी गेल्या २० वर्षे सतत राजकारण करीत आहे व खोलवर त्याचा अभ्यासाही करीत आहे. माझे राजकारण कधीच फसलेले नाही. मी राजकारणाच्या पाण्यात पूर्ण डुंबलो आहे. म्हणून माझे राजकारण खरे, प्रामाणिक व स्वभावजन्य आहे. इतर लोक पाण्याच्या कडेला उभे राहून नुसत्या उड्या मारून मजा पाहतात. त्यांना अनुभव नाही. आपले तसे नाही. तरी आपण सर्वांनी जागरूक राहून विरोधकांच्या कसल्याही भूलथापांना, धाकदपटशांना भीक न घालता समाजाच्या उद्धाराचे पवित्र कर्तव्य आपली चारही मते आपल्याच उमेदवारास देऊन बजावावे. मला सांगावयाचे ते सांगून मी माझे कर्तव्य केले आहे. तुम्ही सर्वजण तुमचे कर्तव्य पार पाडाल अशी मला आशा आहे.

•••

२३६

## मान्याच्या जागा काबीज करा !

भारतीय अस्पृश्य वर्गाचे नेते डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी तारीख १६ फेब्रुवारी १९४६ रोजी बेळगाव जिल्ह्यातील काही प्रमुख गावांना धावती भेट दिली. शेडबाळ येथे जमलेल्या लोकांना डॉ. बाबासाहेबांनी निवडणुकीच्या संबंधात थोडासा उपदेश केला. तद्नंतर ते ऐगळी या गावी गेले. तेथे उपस्थित असलेल्या जनसमुदायाला उद्देशून त्यांनी अस्पृश्य समाजावर पडलेली जबाबदारी किती महत्त्वाची आहे याची स्पष्ट जाणीव करून दिली. पुढे मग सोळी व अथणी या गावांना भेटी देऊन संध्याकाळी ५-३० च्या सुमारास निपाणी येथे त्यांचे आगमन झाले. त्यावेळी त्यांचे स्वागत करण्यात आले.

निपाणी हायस्कूलच्या विस्तीर्ण मैदानात डॉ. आंबेडकर भाषण व्हावयाचे असल्यामुळे, तेथे सभेपूर्वीच चिक्कार गर्दी लोटली होती. सभेच्या बंदोबस्ताचे काम समता सैनिक दलाच्या स्वयंसेवकांनी उत्तम प्रकारे सांभाळले होते. सुमारे १,००० गणवेशधारी समता सैनिक हातात काठ्या व भाले घेऊन आपापल्या नियोजित स्थळी सज्ज होते. त्यांना पाहून प्रतिस्पर्ध्यांना धडकी भरणे स्वाभाविक होते. स्वयंसेवकांच्या कडक बंदोबस्तामुळे सभेचे काम निर्विघ्नपणे पार पडले. स्वयंसेवकांनी बजावलेल्या या समाजसेवेबद्दल कोणीही त्यांना धन्यवादच देईल हे निःसंशय आहे.

सभेच्या नियोजित स्थळी डॉ. बाबासाहेबांचे आगमन होताच, त्यांच्या नावाचा प्रचंड जयघोष होऊन टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला आणि क्षणार्धात सर्वत्र शांतता पसरली. प्रथमारंभी स्वागतगीते व प्रास्ताविक भाषण झाल्यानंतर डॉ. आंबेडकरांचे व्याख्यान झाले. ते म्हणाले,

' प्रिय बंधु-भगिनींनो,

मुंबई विधिमंडळाच्या निवडणुकीसंबंधी आज अस्पृश्य वर्गाचे कर्तव्य कोणते हे सांगण्यासाठी मी येथे आलो आहे. या विधिमंडळात प्रतिस्पर्ध्याशी झगडून आम्ही १५ जागा मिळविल्या आहेत. त्या सर्व जागांवर आपण आपलेच लोक निवडून दिले पाहिजेत. तसे न झाले तर आपल्यावर पस्तावण्याची पाळी येईल याची खूणगाठ बांधा. कॉंग्रेस ही आपला हितशत्रू आहे.

---

गरुड : ३ मार्च १९४६.

काँग्रेस अस्पृश्यांकरिता काही करणार नाही. दोन वर्षे सात महिने काँग्रेसच्या हाती सत्ता असता तिने आपल्याकरता काहीच भरीव कार्य केले नाही. आज वीस वर्षे काँग्रेसचे व आमचे भांडण चालू आहे. आमची स्वातंत्र्याची व स्वावलंबनाची चळवळ हाणून पाडण्यासाठी काँग्रेसने भलेबुरे सर्व प्रयत्न केले आहेत आणि ही निवडणूक जिंकण्यासाठी, आमच्या राखीव जागेवरसुद्धा तिने आपल्या पदरचे ' हरिजन ' उभे केले आहेत.

यावेळी माझा तुम्हाला स्पष्ट इशारा आहे की, तुम्ही ही निवडणूक जिंकून राजकीय सत्तेच्या योग्य त्या मोऱ्याच्या जागा काबीज करा. यातच सबंध अस्पृश्य वर्गाचे कल्याण आहे. महार समाज हा अस्पृश्य वर्गाचा म्होरक्या आहे हे सांगण्यास मला अभिमान वाटतो. आमची संघटना काँग्रेसच्या डोळ्यात सारखी सलत आहे.

मला सांगण्यास खेद वाटतो की, महार समाजातील बॅ. माने हे आपल्या हितशत्रुंना सामील झाले आहेत. आपल्या राखीव जागेसाठी सध्या तीन उमेदवार उभे आहेत. दलित फेडरेशनचे वराळे, फेडरेशनद्रोही माने आणि साम्राणी. पण साम्राणींनी आपली उमेदवारी परत घेतली असे समजते. अर्थातच आता वराळेविरुद्ध माने असाच सामना राहिला.

माझ्या असे ऐकण्यात आले आहे की, माने हे स्वत:ला स्वतंत्र उमेदवार समजतात आणि तसा प्रचारही करतात. पण त्यात काहीच अर्थ नाही. ते काँग्रेसचे बाहुले बनले आहेत. काँग्रेसचे तिकीट त्यांना मिळाले नाही म्हणून ते स्वतंत्र आहेत असे कोणी मानू नये. जरी काँग्रेसचे कुंकू त्यांना लागले नसले तरी काँग्रेसशी त्यांचा म्होतुर लागला आहे असे म्हणण्यास कोणती हरकत आहे ? ज्याअर्थी, लठ्ठे मानेला निवडून आणण्याकरिता सर्व तऱ्हेचे प्रयत्न करतात आणि काँग्रेसही आपला अधिकृत दुसरा उमेदवार जाहीर करीत नाही त्याअर्थी, माने हेच त्यांचे उमेदवार आहेत ही गोष्ट आपोआपच सिद्ध होते.

दिवाणबहादूर....नव्हे, नव्हे ! मि. लठ्ठे हे बॅ. मानेला निवडून आणण्यासाठी मोठ-मोठ्या भडक प्रचाराच्या वल्गना करीत सुटले आहेत. मि. लठ्ठेंना या जिल्ह्यात कितीसा पाठिंबा आहे, कोण जाणे ? त्यांना स्वत:ला उमेदवारीचे तिकीट मिळविण्याच्या बाबतीत काँग्रेस-हायकमांडपर्यंत नाकधुऱ्या काढाव्या लागल्या. असे असता मि. लठ्ठेंच्या प्रचाराचा काय उपयोग होणार आहे ? त्यांची ही दमबाजी आता सर्वांना कळून चुकली आहे.

कॉंग्रेसजनांच्या पैशांवर बॅ. माने निवडणुकीच्या आखाड्यात उतरलेले आहेत. पण हा पैसा कॉंग्रेसचा नव्हे हे दाखविण्याकरिता तो महारवर्गानेच थैलीच्या रूपाने दिला असल्याचे भासविण्यात येते. दोन-दोन हजारांच्या थैल्या महारवर्ग देऊ शकेल काय ? येथे आजच्या सभेला २०-२५ हजार लोक उपस्थित आहेत. त्यांचा जर झाडा घेतला तर त्यांच्याजवळ शंभर कवड्याही निघणार नाहीत. मग हजाराची गोष्ट कशाला ? कॉंग्रेसचे हे भेदनीतीचे डावपेच आम्ही पुरतेपणी ओळखून आहोत. म्हणूनच आमचा स्पष्ट सवाल आहे की, हा पैसा तुम्ही अशा रीतीने का ओतता ? आमची संघटना फोडण्याचाच उद्देश आहे ना ?

बॅ. माने आमच्यातून फुटू नयेत म्हणून मी पुष्कळ प्रयत्न केले. त्यांचे कल्याण व्हावे म्हणून मी झटलो. त्यांच्या शिक्षणाला करता येईल तेवढी मी मदत केली. त्यांच्या विद्येचा उपयोग व्हावा म्हणून मी काळजी वाहिली पण शेवटी माने यांनी आम्हाला दगा दिला. त्यांनी जज्ज व्हावे, सुप्रसिद्ध कायदेपंडित म्हणून कीर्ती मिळवावी अशी माझी फार इच्छा होती, पण ही माझी इच्छा फलद्रूप झाली नाही. त्यांनी शिकलेली विद्या उपयोगात आणली नाही. विलायतेला जाऊन इलेक्ट्रिसिटीचा कोर्स घेऊन परत येणाऱ्या माणसाने संपादन केलेल्या ज्ञानाचा उपयोग न करता त्याने जसा वहाणाचा कारखाना काढावा तसेच मानेंचे झाले आहे. कोल्हापूरसारख्या संस्थानात त्यांना आपली चमक दाखविता आली नाही. ज्या ठिकाणी अधिकारी वर्ग अस्पृश्यांच्या उन्नतीला पोषक आहे त्याठिकाणी त्यांना स्वत:ची प्रगती साधता आली नाही त्या मानेंना आता ब्रिटिश हिंदुस्थानात काय करता येणार आहे ? मान्यांनी स्वज्ञातीचा द्रोह केला आहे.

माझ्या असे प्रत्ययास आले आहे की, तंबाखुचा व्यापार करणाऱ्या महार लोकांना ज्या सवलती मिळाल्या आहेत त्या आपणच मिळवून दिल्या असा माने यांनी प्रचार चालविला आहे. पण तो साफ खोटा आहे. ज्या सवलती मिळाल्या आहेत त्या मी मिळविल्या आहेत, मान्यांनी नव्हे ! माने दिल्लीला माझ्याकडे आले आणि ते माझ्या घरीच उतरले. आपल्याला " कोल्हापूरच्या रिजन्सी कौन्सिलात 'मिनिस्टर' करा " ही मागणी करण्याकरिताच ते माझ्याकडे आले. पण ते जमले नाही अशी वस्तुस्थिती आहे.

शेवटी तुम्हाला एवढेच सांगणे आहे की, श्री. वराळे यांनाच प्रचंड मताने निवडून द्या.

•••

२३७

# मरणाच्या तयारीनेच आम्ही समरांगणात उतरलो आहोत

मुंबईतील अस्पृश्य जनतेने केलेल्या संकल्पानुसार थैली अर्पण समारंभ आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे महत्त्वपूर्ण भाषण आयोजित केले होते. त्याकरिता खालील पत्रक काढण्यात आले होते.

आपले परमपूज्य पुढारी नेक नामदार डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना मुंबईतील अस्पृश्य समाजाकडून थैली अर्पण करणारा समारंभ रविवार ता. १७ फेब्रुवारी १९४६ रोजी सायंकाळी ५ वाजता जी.आय.पी. रेल्वे परळ वर्कशॉपसमोर साध्वी रमाबाई आंबेडकर नगर (नरेपार्क) येथे होणार आहे. या समारंभानंतर बाबासाहेब आंबेडकर यांचे महत्त्वाचे भाषण होणार आहे. या समारंभास अस्पृश्य जनतेने हजर राहावे अशी विनंती आहे.

या समारंभास हजर राहणाऱ्या लोकांनी आठ आण्याची तिकिटे विकत घेतलीच पाहिजे. तिकिटांशिवाय सभेच्या ठिकाणी प्रवेश मिळणार नाही. तरी ज्यांनी आठ आण्याची तिकिटे आतापर्यंत घेतली नसतील त्यांनी ता. १५ फेब्रुवारीच्या आत आपापल्या वार्ड कमिटीकडून किंवा पोयबावडी येथील मुंबई शेड्यूल्ड कास्ट्सच्या फेडरेशनच्या ऑफिसातून ताबडतोब विकत घ्यावीत. सभेच्या ठिकाणी तिकिटे विकली जाणार नाहीत व तिकिटाशिवाय कोणासही प्रवेश मिळणार नाही.

तिकिटविक्रीपासून जमा होणारी सर्व रक्कम आपले परमपूज्य पुढारी नेक नामदार डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना अर्पण करण्यात येईल. थैलीची रक्कम कमीतकमी पन्नास हजार रुपयांपेक्षा कमी असता कामा नये अशी मुंबईच्या जनतेची इच्छा असल्यामुळे थैलीची रक्कम पूर्ण करण्याकरिता एक रुपया, दोन रुपये किंवा पाच रुपये किंवा याहीपेक्षा जास्त पैसे घेण्याची योजना आखण्यात आली आहे. तरी अशा देणग्या दिल्यास त्यांचा साभार स्वीकार केला जाईल. देणग्या देणाऱ्या स्त्रीपुरुषांच्या नावाची यादी छापून प्रसिद्ध केली जाईल. तरी याचा फायदा घेऊ इच्छिणाऱ्या लोकांनी ताबडतोब देणगीची रक्कम वार्ड कमिटीकडे किंवा मुंबई शेड्यूल्ड कास्ट्स फेडरेशनच्या ऑफिसात १५ फेब्रुवारीच्या आत देण्याची कृपा करावी.

---

**जनता : ९ फेब्रुवारी आणि २ मार्च १९४६.**

हे पत्रक जी. एम. जाधव, अध्यक्ष व एस. बी. जाधव, जनरल सेक्रेटरी शेड्यूल्ड कास्ट्स फेडरेशन, मुंबई (शहर व उपनगर) शाखा यांनी काढले होते.

मुंबईतील ता. ३ जानेवारी १९४६ रोजी झालेल्या प्राथमिक निवडणुकीच्या दिवशी हुतात्मा चोखाजी सावळाराम गांगुर्डे यांचा काँग्रेस गुंडानी केलेला अमानुष खून आणि या हुतात्म्याच्या प्रेतयात्रेवर ता. ४ जानेवारी १९४६ रोजी पोलिसांनी केलेला क्रूर लाठीहल्ला. त्यात बळी पडलेला वीर रामचंद्र गुंडू कांबळे आणि तद्नंतर मुंबईमध्ये ठिकठिकाणी अस्पृश्यांच्या वस्तीवर करण्यात आलेले आक्रमक हल्ले वगैरे घटनांच्या बाबतीत 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर काय सांगतात ?' हे ऐकण्यासाठी मुंबईतील अस्पृश्य जनता आतुर झालेली होती. डॉ. बाबासाहेबांच्या या महत्त्वपूर्ण भाषणासाठी मुंबई (शहर व उपनगर) शेड्यूल्ड कास्ट्स फेडरेशन शाखेच्या कार्यकर्त्यांनी दोनदा सभेची तारीखही जनतेतून जाहीर केली होती. परंतु दोन्ही वेळा कामाच्या अमर्याद व्यापामुळे डॉ. बाबासाहेबांना येता येणे शक्य नव्हते म्हणूनच दोनदा सभा तहकूब झाली. तिसऱ्यांदा ता. १७ फेब्रुवारी १९४६ रोजी मात्र या गाजलेल्या सभेने मुंबई गाजविली.

अखिल भारतीय शेड्यूल कास्ट्स फेडरेशनचे तिसरे अधिवेशन ज्या ठिकाणी यशस्वीपणे पार पडले त्याच ठिकाणी साध्वी रमाबाई आंबेडकर नगरात (नरेपार्क) ही विराट सभा घेण्यात आली होती. डॉ. बाबासाहेब, सन्माननीय निमंत्रित पाहुणे मंडळी, उमेदवार, फेडरेशनच्या निरनिराळ्या वार्डांचे कमिटी सभासद आणि प्रमुख कार्यकर्ते यांच्यासाठी खास मंडप उभारण्यात आला होता.

या सभेला आगाऊ जाहीर केल्याप्रमाणे आठ आण्याचे प्रवेश तिकिट असल्यामुळे एक निमंत्रित पाहुण्यांसाठी, एक स्त्रियांसाठी व तीन पुरुषांसाठी मिळून पाच प्रवेशद्वारे ठेवण्यात आली होती. सभेची सर्व व्यवस्था समता सैनिक दलाकडे होती. प्रत्येक प्रवेशद्वाराजवळचे सैनिक आपापले कर्तव्य चोखपणे बजावीत होते. दुपारी तीन वाजल्यापासून लोक येऊ लागले होते. मुंबई बाहेरील बऱ्याच ठिकाणचे लोक बाबासाहेबांच्या या भाषणासाठी मुद्दाम आले होते. पाच वाजेपर्यंत सुमारे तीस हजार लोक नगरात दाखल झाले होते. ज्यांच्याजवळ तिकिटे नव्हती असे बरेचसे लोक बाहेर वावरत असताना दिसत होते. व्यासपीठावर मुंबई प्रांतिक विधिमंडळाच्या आगामी निवडणुकीसाठी उभे राहिलेले फेडरेशनचे अधिकृत उमेदवार गुरुवर्य दोंदे व बाबासाहेबांची अस्पृश्यवर्गीय स्नेही मंडळी. त्याचप्रमाणे डाव्या बाजूस वार्ड कमिट्यांचे सभासद, उजव्या बाजूस भगिनीवर्ग, व्यासपीठाला लागूनच समोर वर्तमानपत्रांचे वार्ताहर आणि समोर अफाट जनसमुदाय, असे एकंदरित दृश्य दिसत होते.

डॉ. बाबासाहेबाच्या आगमनापूर्वी समाजोन्नतीपर स्फूर्तिदायक अशी सुश्राव्य गाणी झाली. त्यात कु. गोदावरी, मा. रोकडे व रामचंद्र यांचा उल्लेख करणे आवश्यक आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर बरोबर साडेपाच वाजता आले. "डॉ. बाबासाहेब आले" एवढेच कळताच टाळ्यांचा कडकडाट व निरनिराळे जयघोष यांचा सारखा ध्वनी ऐकू येऊ लागला. समता सैनिक दलाची पाहणी करण्याचे आगाऊ ठरल्यामुळे आल्याबरोबर बाबासाहेब समता सैनिक दलाच्या रॅलीकडे वळले. समता सैनिक दलातील सैनिकांना 'या पाहणीची' आगाऊच समज देण्यात आलेली असल्यामुळे प्रत्येक सैनिक अगदी तयारीत होता. सभेला जोडूनच एका विस्तीर्ण जागेत सर्व सैनिक शिस्तीत उभे होते. शेड्यूल्ड कास्ट्स फेडरेशनच्या या मिलीटरीची शिस्त पाहून कोणीही तोंडात बोटेच घातली असती. डॉ. बाबासाहेबांच्या बरोबर मुंबई शेड्यूल्ड कास्ट्स फेडरेशन शाखेचे अध्यक्ष श्री. जी. एम. जाधव व मुंबईतील समता सैनिक दलाचे जी. ओ. सी. श्री. एम. एम. ससाळेकर हे होते. डॉ. बाबासाहेबांच्या आगमनाबरोबर ब्युगूल वाजविण्यात आला व बॅंडवादन करून डॉ. बाबासाहेबांना 'गार्ड ऑफ ऑनर' (सलामी) दिला गेला. तद्नंतर डॉ. बाबासाहेबांनी समता सैनिक दलाची पाहणी केली. ही पाहणी चालू असता डॉ. बाबासाहेबांच्या चेहऱ्यावर समाधानाचे तेज दिसत होते. मधून मधून ते सैनिकांबद्दल चौकशी करीत व काही माहिती विचारीत. त्यांच्या प्रश्नांना जी. ओ. सी. ससाळेकर उत्तर देत होते. अशा प्रकारे समता सैनिक दलाची पाहणी करून डॉ. बाबासाहेब व्यासपीठावर आले. पुन्हा टाळ्यांचा कडकडाट सुरू झाला. डॉ. बाबासाहेब स्थानापन्न झाल्यावर जी. ओ. सी. ससाळेकर यांनी समता सैनिक दलाची प्रत्येक सैनिकाला घ्यावी लागणारी 'शपथ-प्रतिज्ञा' वाचून दाखवली.

मुंबई व उपनगर शेड्यूल्ड कास्ट्स फेडरेशन शाखेचे अध्यक्ष श्री. जी. एम. जाधव ऊर्फ मडकेबुवा यांनी डॉ. बाबासाहेबांना पुष्पहार अर्पण केला आणि लोकांनी त्यांना टाळ्यांची प्रचंड साथ दिली. तद्नंतर नायगाव येथील 'महाराष्ट्र अम्युचुअर्स पार्टी' मधील लहान मुलांनी त्यांचे मुंबईतील लोकप्रिय 'चल चल रे दलित वीरा' हे गाणे कर्णमधुर सुरात गाऊन दाखवले.

या वेळेपावेतो बाहेर तुफान गर्दी झाली होती. डॉ. बाबासाहेबांनी सर्वांना मंडपात दाखल करण्यासंबंधी आज्ञा फर्मावली. त्याचबरोबर लोकसमुदायाचा प्रचंड प्रवाह आत येऊ लागला. त्यावेळेस नगरात एकच गर्दी झाली. त्या जनसमुदायाचा अंदाज जवळजवळ पाऊण लाखांवर होता. पुन्हा शांतता प्रस्थापिण्यास जवळजवळ पाच मिनिटे लागली. नंतर मडकेबुवा यांनी, मुंबई

प्रांतिक शेड्यूल्ड कास्ट्स फेडरेशन शाखेचे अध्यक्ष व नाशिक जिल्ह्यातील आपले अधिकृत उमेदवार श्री. भाऊराव कृष्णराव ऊर्फ दादासाहेब गायकवाड यांना बोलण्यासाठी विनंती केली. दादासाहेब गायकवाड थोड्याच वेळ बोलले पण जे काही बोलले, शत्रुंच्या वर्मी घाव घालण्यासारखे असेच होते. त्यांनी त्यांच्या भाषणात, 'उद्याच्या निवडणुकीत आपले कर्तव्य, आपल्याच उमेदवारांना प्रचंड बहुमताने निवडून देण्याची आवश्यकता, प्राथमिक निवडणुकीच्या निकालाने दिलेला अस्पृश्यांच्या अभेद्य एकजुटीचा कौल, कॉंग्रेसच्या जांघेत गोचीडाप्रमाणे राहणाऱ्या आपल्या विरोधकांची आहारीजनांची अधोगती वगैरे बाबींसंबंधी अगदी मोजक्या शब्दात सांगून, मद्रासला गेल्या आठवड्यात गांधींनी अस्पृश्यांच्या स्वाभिमानाला डिवचणारे जे अनुदार उद्‌गार काढले त्याबद्दल त्यांनी व्यवस्थित हजेरी घेतली. तद्‌नंतर थैली अर्पणाचा समारंभ झाला. श्री. मडकेबुवा यांनी बाबासाहेबांना सतरा हजार रुपयांची थैली अर्पण केली. त्यावेळेस टाळ्यांचा प्रचंड गजर झाला आणि डॉ. बाबासाहेब बोलावयास उभे राहिले तरी हा गजर सारखा चालूच होता. सगळीकडे शांतता झाल्यावर डॉ. बाबासाहेबांनी बोलावयास सुरुवात केली. ते म्हणाले,

"येत्या मार्च महिन्याच्या ११ तारखेस मुंबई असेंब्लीकरिता जी निवडणूक होणार आहे त्यावेळी तुमचे कर्तव्य काय हे सांगण्यासाठी आजची ही सभा भरविण्यात आली आहे. गेल्या दोन दिवसांत मी २०० मैलांचा प्रवास अन्नपाण्यावाचून केला असल्यामुळे मला फार थकवा आलेला आहे. म्हणून मी आपल्यापुढे थोडेच बोलणार आहे. त्याबद्दल तुम्ही वाईट वाटून घेऊ नका.

ही जी आता निवडणूक होणार आहे त्या बाबतीत तुम्ही मुळीच निराश होऊ नका. हा एक संग्राम आहे. हा आपल्या स्वातंत्र्याचा अखरेचा संग्राम आहे. कुरुक्षेत्रावर कौरव-पांडवांच्या झालेल्या संग्रामासारखाच आजचा हा संग्राम आहे.

महाभारतात सांगितले आहे की, कौरव-पांडवांची सैन्ये युद्धाकरिता समोरासमोर आली असता कृष्ण व अर्जुन यांनी लढाई कशी करावी, कोणता डाव करावा, विरुद्ध पक्षावर मारा कसा करावा असा विचार-विनिमय न करता अर्जुन आत्मा म्हणजे काय वगैरे प्रश्न श्रीकृष्णाला विचारीत होता ! प्रत्यक्ष रणांगणाच्या स्थानी असे प्रश्न विचारणे शुद्ध वेडगळपणा आहे ! हा प्रसंग घडला असेल असे वाटत नाही ! संग्राम-प्रसंगीचे म्हणून भगवद्‌गीतेतील श्रीकृष्णाने केलेल्या चर्वितचर्वणासारखे जर आज कोणी करू म्हणेल तर एखादा त्याची मूर्खातच गणना करील !

मी गेली २० वर्षे आपले ध्येय आणि त्या ध्येयसिद्धीचे मार्ग आपणास सांगत आलो आहे आणि आज माझी खात्री आहे की, त्याच आपल्या ध्येयाकरिता आपण सर्वजण पूर्ण संघटितपणे तयार झाला आहात. आज मी मागील धडा न वाचता येत्या ११ तारखेस आपले कर्तव्य काय या विषयीच मुख्यत: बोलणार आहे.

गेल्या निवडणुकीचे वेळी प्रतिपक्षीयांशी आपली हातघाई झालेली नव्हती. त्यावेळी आपण आजच्याइतके संघटीतही झालो नव्हतो. परंतु आज आपली शक्ती प्रचंड वाढली असल्यामुळे शत्रू बेभान झाला आहे. मुंबईत नुकत्याच झालेल्या आपल्या प्राथमिक निवडणुकीचे वेळी कॉंग्रेसच्या लोकांनी चोखाजी गांगुर्डे या आपल्या एका वीराची हत्या केली. हुतात्मा चोखाची गांगुर्डे यांच्या शरीरावर शत्रुंनी तीक्ष्ण हत्याराने केलेल्या वाराच्या २१ जखमा होत्या, असे मला समजले आहे. या हुतात्म्याच्या प्रचंड अंत्ययात्रेच्या वेळी पोलिसांच्या तीव्र लाठीहल्ल्यात रामचंद्र कांबळे हा आपला दुसरा वीर बळी पडला व अनेकांना गंभीर स्वरूपाच्या जखमा झाल्या. नागपूरलाही गजभिये व वासनिक हे आपले वीर बळी गेले. परवा साताऱ्यालाही आपल्या सभेवर कॉंग्रेसच्या लोकांनी दगडांचा मारा केला. पण सुदैवाने आपले कोणी जखमी न होता शत्रुचेच लोक रक्तबंबाळ झाले !

गेल्या निवडणुकीच्या वेळी कॉंग्रेस वर्दळीवर आली नाही. आपल्याशी उघड सामना करण्यास धजावली नाही व आजच कॉंग्रेस आपल्याशी का लढते आहे, हे आपण चांगले समजून घेतले पाहिजे.

कॉंग्रेसच्या लोकांचा आपल्या मानी अस्पृश्य वर्गावर जो कटाक्ष आहे तो आपण राजकरणात पडलो आहोत म्हणून किंवा आपण निवडणुकी लढवीत आहोत म्हणून नव्हे तर त्यांना आपले फेडरेशन नको आहे. शेड्यूल्ड कास्ट्स फेडरेशनचा काटा त्यांच्या डोळ्यात सलत आहे. आपल्या फेडरेशनच्या प्रचंड शक्तीमुळे कॉंग्रेसवाले बेभान झाले आहेत.

अस्पृश्य लोकांनी त्याचप्रमाणे मुसलमान लोकांनी निवडणुकीकरिता फुटकळ फुटकळ उभे राहावे, त्यांचा समाज विखुरलेला असावा, असे कॉंग्रेसला वाटते. अशा प्रकारे फुटकळ झालेल्या समाजातील लोकांना कॉंग्रेसमध्ये ओढण्याची त्या लोकांची धडपड चाललेली असते. कुत्र्यापुढे हाड टाकले म्हणजे तो जास्त भुंकत नाही. त्याचप्रमाणे फुटकळ रीतीने निवडून आलेल्यास कॉंग्रेसला सहज वश करता येते. कुणाला जोड्याचे, कुणाला गटाराचे कॉन्ट्रॅक्ट देऊन कॉंग्रेसचे मिंधे बनवता येते. उलट एखाद्या बलवान संस्थेच्या उमेदवारास कसलेही आमिष दाखविले तरी तो वश होणार नाही. म्हणून शेड्यूल्ड कास्ट्स फेडरेशन ही आपली प्रचंड संघटना कॉंग्रेसला नको आहे.

कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांच्या आजचा राजकीय दृष्टिकोन जर चांगला न्याहाळून पाहिला तर कॉंग्रेस ही एकच संस्था राहावी असे त्यांना वाटते. बाकीच्या लोकांनी निमूटपणे कॉंग्रेसमध्येच सामील व्हावे, अशी त्यांची महत्त्वाकांक्षा आहे. कॉंग्रेस हीच एक संस्था, एक नेता व एकच मार्ग असे सामर्थ्य संपादून इतर सर्व समाजावर अनिर्बंध सत्ता गाजवावी अशी कॉंग्रेसच्या लोकांची जबर धडपड चालली आहे. आपल्याला हाणून पाडण्यासाठी वाटेल त्या मार्गाचा अवलंब करीत आहेत. नुकतेच आपल्या लोकांवर जे हल्ले झाले व होत आहेत, आपल्या ज्या शूरवीरांची हत्या झाली आहे, त्याचे कारण म्हणजे कॉंग्रेसची हीच राक्षसी महत्त्वाकांक्षा !

मला तुम्हाला सांगावयाचे आहे ते हे की, विरोधी पक्षाच्या कसल्याही गुंडगिरीला तुम्ही घाबरता कामा नये. तुमच्या ध्येयप्रेमाबद्दल व ध्येयाबद्दल मी नि:शंक आहे. सर्वांनी येत्या ११ मार्चला आपल्या उमेदवारास प्रचंड मतांनी निवडून आणण्याचा शिकस्तीचा प्रयत्न केलाच पाहिजे. तुम्ही कोणाच्याही धमकावणीला भीक घालता कामा नये, डरता कामा नये.

हुतात्मा गांगुर्डे हा चांगला कार्यकर्ता होता. दुसरेही आपले वीर हुतात्मे धडाडीचे कार्यकर्ते होते. त्या सर्वांच्या कुटुंबीयांना माझे सांगणे आहे की, तुम्ही दु:ख करू नका. मरण ही आज ना उद्या पण निश्चितपणे घडून येणारी गोष्ट आहे. हुतात्मा गांगुर्डे व इतरांचे मरण हे वीरांचे मरण आहे. त्यांच्या मृत्युमुळे सर्व समाज दु:खी झाला आहे. हे वीर हुतात्मे मेले नसून अमर झाले आहेत ! त्यांचे मरण हे विलोभनीय मरण आहे.

कॉंग्रेसवाल्यांना मला हे सांगावयाचे आहे की, अशा धमक्यांनी, अत्याचारी हल्ल्यांनी किंवा त्यांच्या भीतीने आम्ही भिऊन जाणार नाही. आम्ही मरणाच्या तयारीनेच समरांगणात उतरलो आहोत. सामना करण्याची पूर्ण तयारी आहे. जे काही होणार असले ते होईल. आमच्या समाजाच्या स्वातंत्र्यासाठी सर्व प्रकारचा स्वार्थत्याग करण्याची आमची सिद्धता आहे. आम्ही अपमानास्पद रीतीने शरण जाणार नाही. आमच्या सामर्थ्याबद्दल आम्हास पूर्ण आत्मविश्वास आहे. आम्ही शत्रुला नाक मुठीत धरायला लावूच लावू. (प्रचंड टाळ्या) शेवटी विजय आमचाच आहे.

द्रोण जातीने ब्राह्मण होता. तो श्रीमंतांच्या वस्तीत राहात होता. त्याच्या मुलाचे नाव अश्वत्थामा. श्रीमंतांची मुले चांदीच्या पात्रात दूध आणून पीत असत. ते पाहून अश्वत्थामाही आपल्या आईजवळ दूध मागत असे. गरीब असल्यामुळे द्रोणाच्या घरी गाय नव्हती. मग चांदीचे भांडे कसचे ? अश्वत्थाम्याची

आई मुलाची समजूत काढण्यासाठी पाण्यात पीठ कालवून ते पांढरे पाणी मातीच्या भांड्यात त्यास पिण्यासाठी देत असे व अश्वत्थामाही ते पिठाचे दूध इतर मुलांबरोबर पिऊन समाधान मानीत असे. एके दिवशी द्रोणाने हे दृश्य पाहिले. आपला मुलगा मातीच्या भांड्यातून पिठाचे दूध इतर मुलांबरोबर पिऊन समाधान मानतो, हे पाहून द्रोणाला अत्यंत वाईट वाटले. मी जिवंत असून काय उपयोग ? आपणाला एखादी गाय कशी तरी मिळविली पाहिजे, असा द्रोण विचार करू लागला. त्याला वाटले आपला गुरुबंधू जो द्रुपद राजा त्याच्याकडे आपण गेलो व आपले गुरुबंधुचे नाते त्याला सांगितले तर त्याच्याकडून आपणास गाय नक्की मिळेल या आशेने गरीब द्रोण द्रुपद राजाच्या नगरीत गेला. राजवाड्याच्या दरवाजाजवळ जाताच द्वारपाळांनी त्याला विचारले, "कोण तू ?", द्रोण म्हणाला, "मी राजाचा गुरुबंधु आहे." 'अंगावर चिंध्या घातलेला हा राजाचा गुरुबंधू कसा असेल' असे वाटून ते द्वारपाळ मोठमोठ्याने हसून द्रोणाची टवाळी करू लागले. शेवटी एका समंजस गृहस्थाने दरबारात राजास निरोप कळविला की, आपला कोणीतरी गुरुबंधू बाहेर उभा आहे तो आपणास भेटू इच्छितो. राजाने त्याला आत आणण्यास सांगितले. द्रोण आत आला. त्याने आपल्या गुरुबंधुत्वाची ओळख करून देण्यासाठी राजाला मागील हकीकत सांगितली व एखादी गाय देण्याची विनंती केली. हा भिकारडा आपल्याशी नाते जोडून आपल्या श्रेष्ठत्वात कमीपणा आणीत आहे म्हणून द्रुपदाला फार राग आला व त्याने आपल्या सेवकांकरवी द्रोणाला भर दरबारातून बाहेर हाकलून लावले. बाहेर पडताना द्रोण मागे वळून राजास म्हणाला 'राजा, तुला गाय द्यायची नव्हती तर मला तसे सांगावयाचे होते. पण तसे न करता तू भरदरबारात अपमान केलास. या अपमानाचा बदला म्हणून माझ्या शिष्याकरवी हातपाय बांधून तुला माझ्या पायाशी शरण आणीन तरच मी नावाचा द्रोणाचार्य अशी प्रतिज्ञा करतो,' असे बोलून द्रोण बाहेर पडला.

पुढे द्रोणाने कौरव-पांडवांना धुनर्विद्या शिकविली. विद्या संपादनानंतर इतर शिष्यांप्रमाणे अर्जुनाने द्रोणाला विचारले, 'आपणास गुरुदक्षिणा काय देऊ ?' द्रोणाने हवी असलेली गुरुदक्षिणा मागितली. अर्जुनाने खरोखरीच द्रुपद राजाला बांधून त्याला द्रोणाचार्यांच्या पायावर लोळण घ्यावयास लावले.

बंधुभगिनींनो, आपण अल्पसंख्य असलो, गरीब असलो, तरी आपणाला स्वाभिमान आहे. द्रोणासारख्या प्रखर अभिमान बाळगून तुम्ही प्रचंड सामर्थ्यवान शत्रुसही दाती तृण घेऊन तुमच्या पायाशी लोळण घेण्यास भाग पाडाल, असा मला आत्मविश्वास आहे. (टाळ्या) मरणालाही पाठीमागे टाकून आपल्या समाजाच्या स्वातंत्र्यासाठी आत्मविश्वासपूर्वक लढणे हीच आपली प्रतिज्ञा (प्रचंड टाळ्या).

काँग्रेसला व हिंदुंना माझे सांगणे आहे की, दंगाधोपा करून आम्हाला निवडणुका जिंकायच्या नाहीत. सामना करायचाच म्हटले तर आम्ही काही बांगड्या भरलेल्या नाहीत ! (टाळ्या) आम्हाला सामर्थ्य नसले तरी स्वाभिमान आहे. ज्यांनी आमच्यावर हात टाकला त्यांना आम्ही शरण आणूच (प्रचंड टाळ्या).

हिंदुंना माझे एकच सांगणे आहे की, तुमचे राजकारण जसे इंग्रजांच्या सत्तेखालून स्वतंत्र होण्याचे आहे तसे आमचेही राजकारण हिंदुच्या गुलामगिरीतून स्वतंत्र होण्याचे आहे. तुम्हाला जसे इंग्रजांचे राज्य नको तसे आम्हाला हिंदुंचे राज्य नको आहे. इंग्रज गेले तर हिंदुंना स्वराज्य मिळेल. इंग्रज जाऊन त्यांच्या जागी हिंदू लोक येतील. आज मध्यवर्ती मंत्रिमंडळात काही युरोपियन आहेत. त्यांच्या जागी ब्राह्मण, कायस्थ, बनिया जाऊन बसतील. परंतु या लोकांवर आमचा तीळमात्र विश्वास नाही. गेली दोन हजार वर्षे हिंदुंनी आमची गळचेपी करून दुर्दशा केली. हजारो वर्षे हिंदुरूपी अजस्त्र अजगर आमच्या शरीराभोवती विळखा घालून बसला आहे. ज्यावेळी हा विळखा सुटेल तोच आमच्या स्वातंत्र्याचा दिवस ! आमच्या स्वातंत्र्यासाठी हिंदुंच्या सत्तेला आमचा कसून विरोध आहे. हजारो वर्षे ज्यांनी आम्हाला दडपले ते सत्ताधारी झाल्यावर त्यांना पाझर फुटेल असे कोण म्हणू शकेल ! जे लोक आमच्या स्पर्शाने सचैल स्नान करतात ते आमचा उद्धार करतील असे एखादा वेडाही कबूल करणार नाही. हिंदुंनाच जर ही सत्ता मिळाली तर तो आमचा घात आहे. म्हणून या देशाच्या राजसत्तेत आम्हास आमचा वाटा मिळालाच पाहिजे. सत्ता संपादनासाठीच आमचा लढा आहे. हिंदुंनी कितीही कारस्थाने केली तरी या देशाचे सत्ताधारी होण्याची आमची प्रतिज्ञा आम्ही पूर्ण करूच करू ! (प्रचंड टाळ्या)

सध्याचा संभाव्य दुष्काळ कसा टाळावा असा सर्वांच्या पुढे एक प्रश्न उभा आहे. हिंदुंना जर विचारले की, हा दुष्काळ कसा टळेल ? तर ते सांगतात की, राष्ट्रीय सरकार आल्याशिवाय दुष्काळ टळणार नाही. राष्ट्रीय सरकार यावयाचे म्हणजे सध्याच्या युरोपियन मंत्र्यांऐवजी हिंदू मंत्री यावयाचे. अशा प्रकारे बनलेल्या या राष्ट्रीय सरकारच्या टाळूवर काय शाळू उगवणार आहे ? म्हणे राष्ट्रीय सरकार आले की, दुष्काळ नाहीसा होईल. परंतु हा सर्व फसवाफसवीचा खेळ आहे, लपंडाव आहे. सत्ता संपादनासाठी हिंदुंच्या कारवाया चालू आहेत. आजचा प्रसंग अस्पृश्यांच्या भवितव्यतेच्या दृष्टीने फार मोलाचा आहे. हिंदू लोक आमचे हक्क हिरावू पाहतात. पण आमचा मरण्याचा हक्क कुणीही हिरावून घेऊ शकणार नाही (टाळ्या). आमचे हक्क जर मिळाले नाही तर आमच्या हक्कासाठी मरण्याचा आमचा ठाम निर्धार आहे. गांधींनी कितीही नाक मुरडले, वल्लभभाई कितीही डरकाळले व जवाहरलाल नेहरू कितीही जळफळले तरी त्याची कोणीही पर्वा करणार नाही.

आमच्या मागण्या मुसलमानांप्रमाणे अवास्तव नाहीत. आमच्या हव्यकव्याकरिता, आमच्या उन्नतीकरिता त्या मागण्या योग्य अशाच आहेत. त्या गहूभरही जास्त नाहीत. आमच्या मागण्या अवास्तव्य आहेत, अयोग्य आहेत असे जर काँग्रेसला-हिंदुंना वाटत असेल तर त्यांना माझे आव्हान आहे की, आमच्या मागण्यांचा न्यायनिवाडा करण्याकरिता एक आंतरराष्ट्रीय कोर्ट नेमा. कोर्ट जो निकाल देईल तो मान्य करायला आम्ही तयार आहोत. तुम्हीही त्या कोर्टाचा निर्णय मान्य करायला उदार असले पाहिजे.

आमच्या न्याय्य मागण्या आपखुषीने द्यावयास तुम्ही तयार नाही व लवादही जर मान्य करणार नाही तर मग जे काय होणार असेल ते होईल.

बंधुभगिनींनो, हिंदू लोकांवर आता काडीचाही विश्वास ठेवता कामा नये. काँग्रेस, मागे दिलेल्या आश्वासनाप्रमाणे, पुढेही वचनभंगच करील. हिंदू समाजात शहाणपण मुळीच नाही. जे काही आहे त्याला मी नाना फडणविसांची लफंगेगिरी समजतो. आपले न्याय्य हक्क इंग्रज लोक या देशातून जाण्यापूर्वीच आपण मिळविले पाहिजेत. या राष्ट्राच्या राजसत्तेत आपला योग्य वाटा मिळविलाच पाहिजे. हा थोरला भाऊ शत्रुपेक्षाही भयंकर शत्रू आहे. त्यांच्यावर तीळभरही विश्वास ठेवणे धोक्याचे आहे, म्हणून बापाच्या मरणाअगोदरच इस्टेटीचे वाटप झाले पाहिजे. जर थोरला भाऊ सामदामाने नच ऐकेल, आपल्या हिश्याच्या आडच येत राहील तर आपली सर्व शक्ती एकवटून आपला न्याय्य वाटा मिळविण्याची आपली प्रतिज्ञा आपण पार पाडल्याशिवाय कधीही राहणार नाही. (प्रचंड टाळ्या)

११ मार्च रोजी जी निवडणूक होणार आहे त्यासंबंधी मला सांगणे आवश्यक आहे. या भागात ई व एफ वार्डात आपले २८ हजार मतदार आहेत व हिंदुंचे एक लक्ष चौतीस हजार आहेत आणि जी व सबर्बनमध्ये ३२ हजार आपले मतदार आहेत व हिंदुंचे एक लक्ष चौदा हजार आहेत. याचा तुम्ही हिशेब केला तर आपले मतदार अल्प आहेत असे दिसेल. हा एक संग्राम आहे. महाभारतात सांगितले आहे की, कौरवांचे सैन्य ११ अक्षौहिणी होते व पांडवांचे ९ अक्षौहिणी होते. कौरवांचा जय व्हावयास पाहिजे होतो, पण अल्पसंख्याक पांडव विजयी झाले. तसे आपले मतदार जरी कमी असले तरी प्रत्येकाने त्या दिवशी जाऊन आपले मत दिले पाहिजे. हिंदुंची मते पुष्कळ आहेत. एकेक म्हणता म्हणता १,३४,००० मते काजरोळकरांना मिळाली तर तो स्वर्गाच्याही वर जाईल. तेथे काय आहे हे मला माहीत नाही (हशा) आपल्या सर्व लोकांनी त्या दिवशी मते दिली पाहिजेत. श्राद्धाच्या दिवशी जसे पूर्वी आपण एकत्र जमत होतो तसे

११ मार्चला मते देण्यास गेलेच पाहिजे. ३ जानेवारीला मुंबईतील प्राथमिक निवडणुकीत आपल्या दोन्ही उमेदवारांस ११-१२ हजार मते मिळाली व कॉंग्रेसच्या उमेदवारास २/२ हजार मिळाली. त्यांनी ही मते पुरभय्यांना महार मांगाची नावे पाठ करून द्यावयास लावली. यापासून आपण चांगलाच धडा घेतला पाहिजे. येत्या निवडणुकीत खोटेच लोक तुमची मते देऊन जातील. ही गोष्ट होता कामा नये. तेव्हा तुम्ही सकाळीच मते देण्याच्या ठिकाणी हजर राहिले पाहिजे. नाहीतर दुसरेच लोक तुमची मते देऊन जातील. आपणास गाडी घोडा काही मिळणार नाही. कॉंग्रेसचे लोक त्या दिवशी गाड्यांचा मक्ता घेतील. तुम्ही पायी जाऊन मत दिले पाहिजे. निवडणुकीच्या दिवशी कॉंग्रेसचे लोक भीती दाखवतील, धाकदपटश्या करतील. या बाबतीत समता सैनिक दलातील लोकांनी काळजी घेतली पाहिजे. हिंदुलोक तर आपल्याविरुद्ध आहेतच पण सरकारचे पोलिससुद्धा आपल्याविरुद्ध आहेत, तेव्हा आपल्या लोकांना संरक्षण देण्याची कामगिरी समता सैनिक दलावर आहे. यापूर्वी दलाने चांगली कामगिरी बजावली आहे. आपल्या लोकांना कॉंग्रेस व पोलिस यापासून त्रास होणार नाही याची खबरदारी दलाने घेतली पाहिजे.

यापूर्वी समता सैनिक दलाने अनेक प्रसंगी प्रशंसनीय कामगिरी बजावलेली आहे. या दलावर मोठीच कामगिरी आहे. कार्याच्या सुलभतेसाठी या निवडणुकीपुरती फेडरेशनचे अध्यक्ष श्री. जाधव यांच्या मार्गदर्शनाखाली दलाने आपली कामगिरी बजावली पाहिजे.

माझा असा दृढ विश्वास आहे की, आपले गडी नुसतेच विजयी होणार नाहीत तर ते प्रतिपक्षाला चारी मुंड्या चीत करून विजयी होतील. लोकशाही लोकशाही म्हणून आज कॉंग्रेसचे लोक टाहो फोडीत आहेत, त्यांना लोकशाही म्हणजे काय, हे तरी माहीत आहे काय ? असेल तर त्यांना जनाची नाही पण मनाची तरी लाज वाटायला पाहिजे होती. ज्यांना ९० टक्के मते पडली ते निवडून आले असे ते समजले असते कोणी संग्राम केला नसता. ११ तारखेला तुम्ही विरोधकाला धूळ चाराल अशी मला फार आशा आहे. तुम्ही मला १७,००० रुपयांचा चेक दिला त्याबद्दल मी आपला फार आभारी आहे. हे पैसे निवडणुकीच्या चटणीलाही पुरणारे नाहीत. आपण वर्तमानपत्रात वाचतो की, गांधींना ५ लाखांची थैली अर्पण करण्यात आली. नेहरूंना ३ लाखांची थैली अर्पण करण्यात आली. पैसे थोडे मिळाले म्हणून बिलकूल खेद वाटत नाही. आपले राजकारण हे विक्रीचे राजकारण नाही. ते दिलाचे राजकारण आहे, ते अंत:करणाचे राजकारण आहे. गेल्या वीस वर्षांत मला ५,००० रुपये

सुद्धा मिळालेले नाहीत. त्या बाबतीत मला काही वाईट वाटत नाही. आमचे लोक हिंदुंच्या खांद्याला खांदा लावून बसतात. माझ्या लोकात उन्नतीचा आत्मविश्वास जागृत झालेला आहे, याच्यातच मला आनंद वाटतो.

बंधुभगिनींनो, मी आता विशेष काही सांगू इच्छित नाही. तुमच्या ध्येयनिष्ठेबद्दल, कर्तव्यदक्षतेबद्दल मला दृढ विश्वास आहे. मी तुमच्याकडून जास्त काही मागू इच्छित नाही. मी दिल्लीला गेल्यावर एकच अपेक्षा करीत राहीन ती म्हणजे ११ तारखेच्या विजयाच्या तारेची !



# २३८

# तोंडाने राष्ट्रवादाचा उदोउदो, कृतीने जात्यंधता

'' अस्पृश्यांच्या हक्कांवर दरोडा घालून राजकीय दृष्ट्या त्यांना पुरेपूर नागविल्यानंतर शक्य तिथे वाटेल त्या मार्गाचा अवलंब करून अस्पृश्यांना खच्ची करण्याचे सत्र काँग्रेसने सुरू केल्याचे पुरावे फार मोठ्या प्रमाणात आमच्याकडे येऊ लागले आहेत.

मुंबईत उच्च शिक्षण घेऊ इच्छिणाऱ्या अस्पृश्य विद्यार्थ्यांची फारच कुचंबणा होऊ लागल्यामुळे अस्पृश्यांना खास सवलती मिळाव्या म्हणून '' पीपल्स एज्युकेशन सोसायटी '' स्थापून त्यामार्फत ' सिद्धार्थ-कॉलेज ' काढण्याचे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी ठरविले. या कॉलेजसाठी मध्यवर्ती सरकारकडून ग्रँट मिळवून मुंबई विश्वविद्यालयाची मान्यताही प्राप्त करुन घेतली. सदर कॉलेज आता जून मध्ये सुरू होणार आहे. अस्पृश्यांसाठी खास सवलती देणारे कॉलेज प्रस्थापित होऊन ते सुरूही होत आहे. हे पाहून सवर्ण हिंदुंच्या पोटात गोळा उठलेला आहे. ह्या द्वेषरुपी गोळयाची हिंदुधर्म-रुपी पोटातील ढवळाढवळ ता. २६ मार्च १९४६ रोजी मध्यवर्ती विधिमंडळात ऐकू आली.

१९३२ साली पुणे कराराचे लोढणे अस्पृश्यांच्या गळ्यात अडकविण्यापूर्वी ज्यावेळेस गांधी शेवटच्या उचक्या देत होते त्यावेळेस बनारस हिन्दू विश्वविद्यालयाचे उपकुलगुरु पंडित मदन मोहन मालवीय यांनी डॉ. बाबासाहेबांच्या चरणी सपशेल शाब्दिक लोटांगण घातले होते आणि ज्या लोकांच्या शब्दाला मान देऊन डॉ. बाबासाहेबांनी गांधींना जीवदान दिले त्यात पंडित मदन मोहन मालवीय यांचा बराच वर नंबर लागेल. याच मालवीयांचे चिरंजीव पंडित गोविंद मालवीय यांनी ' सिद्धार्थ-कॉलेज ' संबंधी कुत्सित बुद्धिने प्रश्न विचारला आणि सांगितले की या कॉलेजची कोणतीही आवश्यकता नाही. अस्पृश्यांच्या शैक्षणिक गरजा हिंदू समाज पुरवीत आहे. पंडित गोविंद मालवीय यांच्या प्रश्नाला डॉ. बाबासाहेबांनी विधिमंडळात जे उत्तर दिले आहे ते आम्ही येथे देत आहोत.---संपादक जनता ''

---

जनता : १३ आणि २० एप्रिल १९४६.

अध्यक्ष महाराज,

फायनान्स बिलावर चालू असलेल्या चर्चेत भाग घेण्याची मला संधी दिलीत याबद्दल मी आपले आभार मानतो. कारण मी ज्या गोष्टी सांगणार आहे त्या माझ्या खात्याबद्दल नाहीत. आतापर्यंत जी चर्चा झाली आहे त्यात माझ्या खात्याबद्दल विशेष अशी कोणतीच टीका केली गेलेली नाही याबद्दल मला समाधान वाटते. तरीही मी बोलण्यासाठी उभा राहिलो आहे. त्याचे कारण काल फायनान्स बिलावर बोलताना माझे मित्र पंडित गोविंद मालवीय यांनी अस्पृश्यांकरिता उघडण्यात येणाऱ्या कॉलेजच्या योजनेसंबंधीही सांगितले आहे.

कॉलेजच्या योजनेचे परिक्षण शिक्षण खात्याने करून फायनान्स डिपार्टमेंटने त्याला मान्यता दिली असल्यामुळे तत्संबंधीचा खुलासा या खात्याना करू देणे बरे झाले असते. मी त्या योजनेला केवळ चालना दिली होती. असे असताही माझे मित्र गोविंद मालवीय यांनी उपस्थित केलेल्या मुद्यांना उत्तर देण्याचे काम उपरिनिर्दिष्ट खात्याकडे न सोपविता मी माझ्याकडे घेतले आहे. त्याचे कारण एकच की, या कॉलेजच्या योजनेवर टीका करताना तिला राजकीय स्वरुप देण्याचा माझ्या मित्रांनी प्रयत्न केला आहे.

या योजनेसंबंधी बोलताना माझे मित्र सुरवातीसच म्हणाले की, ' या योजनेबद्दल मला आश्चर्य वाटते. ' आणि मी ज्यावेळेस त्यांचे सबंध भाषण वाचले त्यावेळेस मला आढळून आले की माझ्या या मित्राला आश्चर्य वाटण्याचे कारण त्यांचा असा समज झालेला दिसतो की शैक्षणिक क्षेत्रात पक्षांधतेचे भूत घुसडण्यात आले आहे. या बाबतीत माझ्या मित्राला, एका सुविख्यात म्हणीची आठवण करून द्यावीशी वाटते. ' कांचेच्या घरात राहाणाऱ्या माणसांनी इतरांच्या घरांवर दगडफेक करू नये ' पंडीतजीना ह्या म्हणीचा मतितार्थ उमजेल की नाही ते मला माहित नाही परंतु आश्चर्याची गोष्ट ही आहे की पंडीतजी राष्ट्रवादाच्या बाता तशा झोकू शकतात. जो साध्या हिंदुंच्या हातून तर पाणी पिणार नाहीच परंतु त्यांच्याशी क्षेत्रगोत्र न जुळणाऱ्या दुसऱ्या ब्राह्मणाच्या हातचेही पाणी पिण्यास धजणार नाही असा पंडीतजीसारखा माणूस राष्ट्रवादाची चर्पट पंजरी या सभागृहातील सभासदांना आणि मला ऐकवतो हे पाहून मला मोठेच नवल वाटते.

धर्मांधतेने बरबटलेल्या पावित्र्याला दुसऱ्या कुणाचाही विटाळ होऊ नये म्हणून खबरदारी वाहणाऱ्याने राष्ट्रवाद–जातीय वाद वगैरे वादांच्या नावाने कोकलत उठून दुसऱ्यावर जातीवाचकतेचा, पक्षांधतेचा-पक्षपातीपणाचा आरोप करण्यापूर्वी बराचसा विचार करायला हवा. बनारस येथील बनारस हिंदू विश्वविद्यालयाशी बऱ्याच प्रमाणात पंडितजींचा संबंध होता, अगर आहे ही गोष्ट पंडितजींनी

विसरू नये. पंडितजींना मी असे विचारतो की, बनारस हिंदू विश्वविद्यालय ही जातिवाचक संस्था नव्हे काय ? उलट मी तर असे म्हणतो की,बनारस हिंदू विश्वविद्यालय हे सर्व हिंदुधर्मियांसाठी नसून केवळ हिंदुधर्मातल्या एका विशिष्ट जातीच्या देखरेखीखालील खास त्यांच्यासाठीच चालविण्यात आलेली संस्था आहे. या विश्वविद्यालयाचे अध्यापक वर्गात ब्राह्मणेतर जवळ जवळ नाहीतच ही गोष्ट माझे मित्र नाकारू शकतील काय ?

हिंदू धर्मशास्त्राचे अध्यापकत्व कोणाही, मग त्याची त्या शास्त्रातील शैक्षणिक लायकी कितीही उच्च दर्जाची असली, तरी ब्राह्मणेतराला देण्यात येऊ नये अशा प्रकारचा अभंग ठराव १९१६ साली या विश्वविद्यालयाने केलेला नाही काय ? लांब कशाला अगदी अलिकडे एका कायस्थ मुलीला ब्रह्मज्ञानाच्या अभ्यासासाठी या विश्वविद्यालयाने परवानगी नाकारल्यामुळे उपोषण करावे लागले ही गोष्ट तरी माझे मित्र विसरले नसतील. ही सर्व उदाहरणे काय दर्शवितात. जात्यंधता–धर्मांधता–पक्षपातीपणा नव्हे का हा ? याला पंडितजीजवळ काय उत्तर आहे ?

अस्पृश्यांकरिता स्वतंत्र कॉलेज स्थापनेच्याबाबतीतील कालच्या चर्चेचा अहवाल वाचीत असता माझे दुसरे मित्र श्री. अयंगार ह्यांचे काही उद्‌गार मला आढळले. श्री. अयंगार यांच्या खुद शहरी काय घटना घडत आहेत त्या त्यांनी मुद्दाम दृष्टीआड केलेल्या आहेत असे दिसते. त्यांना मी असे सुचवू इच्छितो की, मद्रास येथील या महिन्याच्या बारा तारखेचे ' हिंदू ' वर्तमानपत्र वाचावे. त्यात त्यांना आढळेल की, सालेम येथे त्यांच्या जातभाईंनी एक मोठी सभा भरवून खास ब्राह्मणांची अशी एक मोठी संस्था स्थापावी आणि या संस्थेमार्फत ब्राह्मणांचे हितसंरक्षण, ब्राह्मणांचे कॉलेज व ब्राह्मणांसाठी उद्योगधंदे वगैरे गोष्टी करण्याचे ठरविले आहे आणि या ब्राह्मणांच्या परिषदेचा अध्यक्ष कोण तर सर सी. पी. रामस्वामी आयरसारखी विभूती.

या देशातील प्रत्येक मनुष्य तोंडाने राष्ट्रवादाचा उदोउदो करीत असतो परंतु कृतीने जात्यंधता, पक्षांधता यांच्याच आहारी गेलेला आढळतो.

ज्या समाजाला आपल्या तीव्रतर हालअपेष्टांची पहिल्यावहिल्यानेच जाणीव झालेली आहे तो अस्पृश्य समाज या हालअपेष्टातून आपली सुटका करून घेण्यासाठी उच्च शिक्षण संपादनार्थ शैक्षणिक संस्था स्थापू लागल्याबरोबर ' जनतेच्या कल्याणाचे कंकण बांधून आम्ही येथे आलो आहोत ' असे सांगत हिंडणारे सभासद ' पक्षांधता-जात्यंधता ' असे किंचाळित उठतात.

सर्व सभासदाच्या पुढे एक मी महत्त्वाचा खुलासा करु इच्छितो तो हा की, हे कॉलेज सर्वस्वी अस्पृश्यांचे आहे हे म्हणणे सर्वस्वी चुकीचे आहे. इतर सर्व कॉलेजप्रमाणे या कॉलेजात कोणालाही यायची पूर्ण मुभा आहे. इतकेच नव्हे तर या कॉलेजसाठी अध्यापकवर्गाची जी निवड करावयाची आहे तीत सर्व जातीयांचा समावेश आहे. तीत हिंदू-ब्राह्मण आहेत, ब्राह्मणेतर आहेत, पारशी आहेत, खिश्चन्स आहेत आणि मुसलमानही आहेत. सभासदांच्या नजरेला ही गोष्ट आणताना मला अत्यंत आनंद वाटतो की, ज्यावेळेस या कॉलेजला मान्यता मिळण्यासंबंधी मुंबई विश्वविद्यालयापुढे अर्ज सादर करण्यात आला त्यावेळेस यत्‌किंचितही शंका कुशंका न काढता विश्वविद्यालयाने ताबडतोब मान्यता दिली. इतकेच काय पण अशाप्रकारची योजना मुंबई विश्वविद्यालयापुढे कधीही आली नव्हती असाही निर्वाळा देण्यात आला. विशेष नमूद करण्यासारखी गोष्ट ही की, या कॉलेजची रचना, अध्यापक वर्ग आणि इतर व्यवस्था विश्वविद्यालयाला इतकी आवडली आहे की, मुंबई विश्वविद्यालयाच्या इतिहासात आजतागायत कोणत्याही कॉलेजला पहिल्याच वर्षी सर्व वर्ग चालविण्याची जी परवानगी मिळाली नव्हती ती परवानगी या कॉलेजला अगदी सुरवातीलाच देण्यात आली आहे. सांगण्याचे तात्पर्य हें की, या कॉलेजला ' निव्वळ अस्पृश्यांचे कॉलेज ' असे म्हणणे कोणत्याही अर्थी योग्य होणार नाही.

या कॉलेजमध्ये प्रवेश, शिष्यवृत्त्या व हॉस्टेलमध्ये जागा या बाबतीत अस्पृश्यांना विशेष–खास सवलती देण्यात येतील एवढेच. या कॉलेजच्या स्थापनेची आवश्यकता का भासली हे आता सांगू इच्छितो.

मुंबई प्रांतात विद्यार्थ्यांची संख्या इतकी बेसुमार वाढलेली आहे की तिची नीटशी कल्पनाही सभासदांना नसेल. पलिकडे बसलेले माझे मित्र गाडगीळ यांना माहिती आहे की गेल्याच साली फक्त एकाच वर्षात एकोणवीस नवीन कॉलेज उघडण्याची मुंबई विश्वविद्यालयाला परवानगी द्यावी लागली आहे. यावरून तुम्हाला कल्पना येईल की कॉलेजमध्ये प्रवेश मिळविणे विद्यार्थ्यांच्यासाठी किती अवजड काम होऊन बसले आहे आणि या अडचणीची जास्तीत जास्त झळ अस्पृश्य विद्यार्थ्यांना बसली आहे. कारण मॅट्रिक पास झाल्यावर अस्पृश्य विद्यार्थ्यांना कुठल्याच कॉलेजमध्ये प्रवेश मिळेनासा झाला आहे. म्हणून अस्पृश्य विद्यार्थ्यांची ही अडचण हिंदुस्थान सरकारच्या नजरेला मला आणावी लागली आणि अस्पृश्य विद्यार्थ्यांची ही अडचण दूर करणारी संस्था स्थापण्याविषयी सांगितले. म्हणून ज्या कॉलेजसंबंधी आपण बोलतो आहोत त्या ' सिद्धार्थ-कॉलेज ' च्या कल्पने-योजनेसंबंधी जे आक्षेप पुढे करण्यात आले आहेत त्यात काहीच अर्थ नाही.

माझ्या मित्रांनी या चर्चेमध्ये दुसऱ्या एक बाबीला हात घातला होता. त्यांनी ही बाब का उपस्थित केली हे कळणे कठीण आहे. ती बाब म्हणजे राजकारण. नुकत्याच झालेल्या निवडणुकीसंबंधी बोलताना माझा पुराच बोऱ्या वाजला असे त्यांनी म्हटले. असे सांगण्यात त्यांना काय साधायचे होते हे तेच जाणोत परंतु मला असे वाटते की माझ्या म्हणण्याला हिंदुस्थान सरकारने मान्यता द्यायला नको होती असे त्यांना सुचवायचे होते. ते काही असो. माझी स्थिती सुकून गेलेल्या रोपट्याप्रमाणे झाली आहे, असे म्हटले जाते. त्या विरोधकांना मला हे सांगावयाचे आहे की वसंतऋतू पूर्वीची ही स्थिती आहे. माझी चळवळ अमर आहे.

निवडणुकीच्या निकालाबाबत माझ्या मित्रांनी बोलणे काढले आणि त्यात त्यांनी हे सांगितले की अस्पृश्यांच्या सर्व राखीव जागा काँग्रेसने जिंकल्या. परंतु मला त्यांना हे विचारायचे आहे की काँग्रेसने ज्या मार्गांनी या जागा जिंकल्या आहेत ते मार्ग त्यांनी कधीतरी पडताळून पाहिले आहेत काय ? कोणकोणत्या मार्गांचा अवलंब करण्यात आला ते मी सांगतो आणि तेही भक्कम पुराव्यावर आधारभूत असलेल्या गोष्टीनिशी सांगतो.

बऱ्याच ठिकाणी मतदारांना मतदानकेंद्रावर जाऊ देण्यात आले नाही. सातारा जिल्ह्यात हे प्रामुख्याने घडले आहे. पत्री सरकार ज्या ठिकाणी अस्तित्वात होते त्या या सातारा जिल्ह्याची बहुतेक सभासदांना माहिती असेलच. ३६१ गावातील अस्पृश्य मतदारांना गावकऱ्यांनी गाव कचेरीत नेले. 'काँग्रेसला तुम्ही मते देणार की नाही?' असे दमदाटी देवून त्यांना विचारण्यात आले. ज्यावेळेस अस्पृश्य मतदारांनी काँग्रेसला मत देण्याचे साफ नाकारले त्यावेळेस त्यांना कचेरीत सक्तीने डांबून ठेवण्यात आले, आणि त्यांनी (अस्पृश्य मतदारांनी) इकडच्या इकडे हालू नये म्हणून त्यांच्यावर सक्त पहारा ठेवण्यात आला. या प्रकारची कितीतरी उदाहरणे मी देवू शकेन. हे तर काहीच नाही परंतु काँग्रेसला विरोध करण्यासाठी उभे राहिलेल्या अस्पृश्य उमेदवारांना मारहाणही करण्यात आली. लांब कशाला अगदी काल-परवा निवडणूक झालेल्या आग्रा शहरातलेच उदाहरण घ्या. निवडणुकीच्या दिवशी अस्पृश्यांची पन्नास घरे जाळण्यात आली. अस्पृश्य मतदार मते देण्यासाठी मतदान केंद्रावर गेलेले पाहून, २० जणांची घरेदारे लुटण्यात आली. नागपूरमध्ये सात जणांचे खून करण्यात आले आणि हे सर्व काँग्रेसवाल्या सवर्ण हिंदुंनी केले.. निवडणूका जिंकण्यासाठी उपयोजिलेले मार्ग हे असे आहेत. काँग्रेसने या जागा जिंकल्या किंवा ज्या राजकीय पक्षाचा मी प्रतिनिधी आहे त्या शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनने

जिंकल्या हे ठरवावयाचे असेल तर त्याला सर्वसाधारण निवडणुकीच्या निकालावरून ही गोष्ट ठरविणे निव्वळ मूर्खपणाचे ठरेल कारण सर्वसाधारण निवडणुकीत अस्पृश्यांचे प्रमाण शेकडा ५ टक्के आणि हिंदूंचे ९५ टक्के पडते. अशा परिस्थितीत कोण कुणाचा प्रतिनिधी हे कसे ठरविता येईल ? म्हणूनच निवडणुकीच्या निकालाची खरी कसोटी प्राथमिक निवडणुकीच्या निकालावरूनच घेतली पाहिजे. कारण अस्पृश्यांच्या प्राथमिक निवडणुकी स्वतंत्र मतदार संघाच्या तत्त्वावर झालेल्या आहेत. या प्राथमिक निवडणुकींचे निकाल कसे लागले ? माझ्या समोर बसलेल्यांना त्याची थोडीशी कल्पना यावी म्हणून काही ठिकाणचे निकाल मी येथे देतो.

पंजाबमध्ये तीन ठिकाणी प्राथमिक निवडणूकी झाल्या. मुंबईत देखील तीन ठिकाणी, मध्य प्रांतात चार ठिकाणी, मद्रासमध्ये दहा ठिकाणी आणि संयुक्त प्रांतात दोन ठिकाणी. येथे सभासदांनी एक गोष्ट लक्षात ठेवावी की, प्राथमिक निवडणुका झाल्याच पाहिजेत अशी सक्ती नसते. जोपर्यंत अस्पृश्यांचे पाच उमेदवार उभे राहात नाहीत तोपर्यंत प्राथमिक निवडणूक होऊ शकत नाही. निवडणुकीत मोकाट उधळण्यास मिळणारा काळ्या बाजारातला पैसा अस्पृश्यांजवळ नसल्यामुळे अस्पृश्यांना प्राथमिक निवडणूक नकोच असते.

एकंदरीत २२ ठिकाणी प्राथमिक निवडणुका झाल्या. प्रत्येकीत कॉंग्रेसने आपला उमेदवार उभा केला होता. या बावीसपैकी एकोणवीस ठिकाणी शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या उमेदवारांना सर्वात अधिक मते मिळाली. मुंबईमध्ये दोन ठिकाणी झालेल्या निवडणूकीत भायखळा विभागात शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या उमेदवाराला ११,३३४ मते पडली आणि कॉंग्रेसच्या उमेदवाराला अवघी २,०९६ पडली, मुंबई जी. व उपनगर विभागात शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या उमेदवाराला १२,८९९ आणि कॉंग्रेसच्या उमेदवाराला २,०८८ पडली. मध्य प्रांतातले मी फक्त दोनच ठिकाणचे आकडे देतो. नागपूर मतदार संघात शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या उमेदवाराला १,९३३ आणि कॉंग्रेसच्या उमेदवाराला अवघी २७० पडली. भंडारा विभागात शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनला ३,१८७ आणि कॉंग्रेस व इतर स्वतंत्र उमेदवार या सर्वांना मिळून ९७६; आग्रा विभागात शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनला २,२४८ आणि कॉंग्रेस व इतर सर्व स्वतंत्र उमेदवारांना मिळून ८४०, पंजाबमध्ये लुधियाना-फिरोझपूर विभागात शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनला १,९०० मते पडलीत कॉंग्रेसला अवघी ५०० मते मिळाली. (डॉ. बाबासाहेब बोलत असताना, यावेळेस दिवाण चमनलाल या कॉंग्रेस पक्षीय आमदाराने मध्येच उठून म्हटले की, '' डॉ. आंबेडकर निव्वळ

थापा मारताहेत ! " डॉ. बाबासाहेब रागाने लाल झाले आणि या शब्दांना त्यांनी हरकत घेतली. त्यावेळेस अध्यक्षांनी दिवाण चमनलाल यांना उद्देशून म्हटले की " ज्यावेळेस नामदार आपले म्हणणे मुद्यानिशी मांडताहेत त्यावेळेस मध्येच उठून असा गोंधळ करणे इष्ट नाही, उपस्थित करण्यात आलेल्या मुद्यांना उत्तर देताना नामदारांचे म्हणणे शांतपणे ऐकलेच पाहिजे. नामदार बोलताना ते थापा मारताहेत असे कोणत्याही आमदारांना बोलता येत नाही. " अध्यक्षांच्याकडून या कानपिचक्या मिळाल्याबरोबर दिवाण चमनलाल यांनी आपले उद्गार मागे घेतले. नंतर डॉ. बाबासाहेबांनी पुन्हा बोलावयास सुरवात केली.) मद्रास प्रांतातील फक्त एकाच ठिकाणचे मी आकडे देतो. अमलापुरम् या विभागात शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या उमेदवाराला १०,५४० आणि कॉंग्रेसच्या उमेदवाराला २,३८३ मते पडली. प्राथमिक निवडणुकींच्या निकालाचे आकडे हे असे आहेत. याच्यावरून एक गोष्ट सहज सिद्ध होते की, प्राथमिक निवडणुकीचे निकाल हीच खऱ्या प्रतिनिधित्वाची कसोटी मानण्यात आली पाहिजे.

या निवडणुकीत कॉंग्रेसने सप्रमाण सिद्ध करुन दाखविले की ही निवडणूक म्हणजे निव्वळ फसवणूक होती, त्याबरोबरच ज्यासाठी मी आजतागायत लढा देत आलो आहे की ' अस्पृश्यांना स्वतंत्र मतदार संघ मिळालाच पाहिजे ' त्या माझ्या लढ्याला या निवडणुकीने भक्कम बळकटी आणली आहे.

पंडित मालवीय यांनी दुसरी एक गोष्ट सांगितली की, अस्पृश्योध्दाराकडे हिंदू लोक बरेच लक्ष पुरवीत असून अस्पृश्यांच्या नैतिक व महत्वपूर्ण प्रगतीसाठी पाण्यासारखा पैसा खर्च करीत असतात. यावर मी इतकेच सांगतो की, बाहेरचे बाजूलाच राहू द्या पण या सभागृहाच्या चार भिंतीत ज्या काही गोष्टी घडतात त्याच्यावरूनच ठरवायचे झाले तरी कोणीही निःपक्षपाती माणूस हेच म्हणेल की मालवियांच्या उपरिनिर्दीष्ट उद्‌गारात काहीच तथ्य नाही. या सभागृहात दाखल होऊन मला थोडे दिवस झाले आहेत खरे, परंतु या सभागृहातील कामकाजाचे अहवाल अगदी नियमितपणे पण लक्षपूर्वक मी वाचीत असतो आणि जे जे वाचनीय आहे त्यापैकी मी काहीच शिल्लक ठेवले नाही. त्यात मला असे आढळून आले की, अस्पृश्यांच्यावर गावोगावी दैनंदिनी होणारे अन्याय, अत्याचार आणि जुलूम यासंबंधी या सभागृहात एकाही सभासदाने एकही प्रश्न कधीही विचारला नाही. अस्पृश्यांसाठी काही तरी केले जावे असा एकही ठराव एकाही सभासदाने मांडल्याचे आजतागायतच्या अहवालात कुठेच दिसत नाही ; नाही म्हणायला १९३३ साली समोर बसलेल्या काही सभासदांनी अस्पृश्यता घालविण्याचे धाडस केले होते खरे. मंदिर-प्रवेशाचे एक बिल मांडण्यात आले होते.

ज्यावेळेस या बिलाला व्हॉईसरॉयनी मान्यता देण्याचे नाकारले त्यावेळेस केवढा गहजब करण्यात आला होता. या बिलाला परवानगी देण्यात आली नाही तर आम्ही आत्महत्त्या करू अशी धमकीही बऱ्याच जणांनी दिली होती. परंतु ज्या वेळेस बिलाला परवानगी देण्यात आली त्या वेळेस ठाऊक आहे तुम्हाला काय झाले ?

ते बिल परत घेण्यात आले. बिचाऱ्या रंगा आय्यरची परिस्थिती अगदी केविलवाणी झाली होती कारण त्यांनीच ते बिल मांडले होते ; ज्यावेळेस त्याच्या सहकाऱ्यांनी त्याला दगा दिला त्यावेळेस तो गृहस्थ खूप चिडला. त्यांना पुष्कळ शिव्या दिल्या पण अखेर बिचारा तोंडघशी पडला. आणखी दोन प्रसंगी अस्पृश्यांच्याबद्दल प्रश्न निघाल्याचे मला ठाऊक आहे. त्यापैकी एक, १९१६ मध्ये 'अस्पृश्यांच्या तक्रारीसंबंधी एक चौकशी समिती ' नेमण्याबद्दल माणेकजी दादाभाई यांनी ठराव मांडला. त्यावेळी या चर्चेला तोंड फोडणाऱ्या श्री. गोविंद मालवीय यांच्या खुद्द वडिलांनीच या ठरावाला अगदी जोरदार विरोध केला. दुसरा प्रसंग १९२७ सालचा. अस्पृश्य जमात अल्पसंख्यांक असल्यामुळे त्यांना घटनात्मक संरक्षण देण्यात यावे असे खिस्तवासी लॉर्ड बर्कनहेड त्यावेळेस म्हणाले होते. परंतु . . . . . . .

ज्या ज्या वेळेस आम्ही स्वतः लढा पुकारुन आमचे अस्तित्व दाखवितो त्याचवेळेस फक्त पलिकडे बसलेल्यांना आमचा अगदी अमर्याद पुळका येतो. ज्या ज्या वेळी आम्ही मागणी करतो की आम्हाला : ' स्वतंत्र मतदार संघ हवा, नोकऱ्यांमध्ये ठराविक प्रमाणात राखीव जागा हव्या, शिक्षणासाठी ग्रँट हवी ' त्याचवेळेस हिंदुंना जाणीव होते की आम्ही, अस्पृश्य लोक, जिवंत आहोत, नाही तर आम्ही मेलेलोच आहोत असेच हे लोक धरुन चालतात, एरव्ही मात्र हे लोक स्वप्नात देखील आमची वास्तपूस्त करीत नाहीत. आमच्या सामाजिक आणि राजकीय हक्कांना वाटाण्याच्या अक्षता लावताना हे लोक सांगतात, ' तुम्ही हिंदूच आहात ' बंधुभाव दाखविताना जर पदरचं काही जात असेल त्यावेळेस आम्ही ' काकाच्या मामाच्या भाच्याचे पुतणे ' आणि काहीच खर्ची होत नसेल, पर्यायाने आमचा उपयोग होत असेल, तर मात्र आम्ही बंधु. अहारे बंधुत्व.

शेवटी इतकेच सांगतो आणि तेही ठासून सांगतो की, हिंदुंच्या दानधर्मावर जगण्याची आता आमची मुळीच इच्छा नाही. त्यांचा दानधर्म आम्हाला नको आहे. आम्ही या देशातले रहिवाशी आहोत. सरकारी खजिन्यावर जसा दुसऱ्या जमातीचा अधिकार आहे तसा आमचाही आहे. आम्हाला गुलामीत राहाण्यास लावणारी, आमची नीती भ्रष्ट करणारी भीक आम्हाला मुळीच नको आहे.

आम्ही आमच्या न्याय्य हक्कांसाठी झगडतो आहोत. आम्हाला ते मिळालेच पाहिजेत आणि तुम्हाला मी निक्षून बजावतो की जर आमच्या न्याय्य लढ्याला विरोध केला गेला तर रक्त सांडून आम्ही आमचे हक्क मिळवू, आमचे ध्येय हस्तगत करू.



## २३९

# आम्ही आज कदाचित लढाई हरलो असू, पण युद्ध मात्र आम्ही जिंकणारच जिंकणार

तारीख २५ जून १९४६ रोजी सध्याकाळी ४.१५ वाजता फ्रन्टियर मेलने धडाड धडाड करीत सेंट्रल स्टेशनात प्रवेश केला, त्याचवेळी हजारो लोकांनी काढलेल्या शिटांचा एकच गलका उठला. अफाट समुद्रात तुफानाने लाटांची बेफाम खळबळ व्हावी, अगदी तशाच तऱ्हेची सेंट्रल स्टेशनात स्वागतासाठी जमलेल्या ८०,००० स्त्री-पुरूष भव्य जनसमुद्रात जोराची खळबळ उडाली. बेभान झाल्यामुळे त्यांनी आपआपसात खेटाखेटी सुरू केली. सकाळी ७ वाजल्यापासून अन्न-पाण्याशिवाय अगदी निष्ठेने तिष्ठत बसलेल्या त्या अफाट जनसमुदायाला झालेल्या त्रासामुळे आलेला शीण नाहिसा होऊन त्यांचे चेहरे फुललेल्या कमळाप्रमाणे प्रसन्न झाले. त्यांची हृदये उचंबळून आली आणि त्यांच्या डोळ्यातून आंनदाश्रू पाझरू लागले. त्यांच्यात जोराचा गलबला सुरू झाला आणि त्यांनी गंभीर, प्रदीर्घ गर्जना करण्यास सुरूवात केली.

समता सैनिक दलातील ५,००० बाणेदार वीर, बरेचसे रेल्वे पोलीस व त्यांचे अधिकारी या अफाट समुदायाची व्यवस्था लावता लावता अगदी थकून, दमून गेले.

ऑल इंडिया शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे जनरल सेक्रेटरी श्री. बापूसाहेब पी. एन्. राजभोज, मुंबई प्रांतिक शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे अध्यक्ष दादासाहेब बी. के. गायकवाड व मुंबईतील जनतेचे आवडते पुढारी ॲ. आर. डी. भंडारे आणि डॉ. बाबासाहेबांचे चिरंजीव भाऊसाहेब यशवंतराव आंबेडकर यांनी सामोरे जाऊन डॉ. बाबासाहेबांना त्यांच्या खास डब्यातून खाली उतरून घेतले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर समता सैनिक दलाच्या दुतर्फा रांगेतून सलामी घेत जात असता कित्येक लोक त्यांच्या पायावर दर्शनासाठी उड्या घेत होते. मे. ॲ. भंडारे हे अगदी पुढे असल्यामुळे व दलाचे सर्वाधिकारी एम्. एम्. ससाळेकर यांनी खबरदारीने माणसांना बाजूला सारून रस्ता मोकळा केला जात होता.

काही अंतर चालून आल्यावर बाबासाहेबांच्या स्वागताप्रित्यर्थ कोवळया अर्भकांना काखेशी घेऊन वाऱ्याकावऱ्याची, पावसापाण्याची इतकेच काय परंतु

---

जनता : १३ जुलै १९४६.

स्वतःच्या व त्यांच्या तहान भुकेची पर्वा न करता अगदी तत्परतेने तिष्ठत बसलेल्या सुमारे १५,००० महिलांनी बाबासाहेबांवर आपल्या ओंजळीतील सुमनांनी अविरत अभिषेक केला. त्या प्रसंगाने सर्वांची हृदये भरून आली आणि जगातल्या कोठल्याही परमेश्वराचे ठायी नसलेली अलोट भक्ती आणि अढळ प्रेम डॉ. बाबासाहेबांवर असल्याचे अस्पृश्यांनी जगाच्या निदर्शनास आणून दिले.

डॉ. बाबासाहेबांना तसेच पुढे नेवून अगदी ऐनवेळी तयार केलेल्या उंच व्यासपिठावरील भव्य आसनावर बसविले.

हजारो पुष्पहार त्यांच्या गळयात पडत होते आणि जनसमुदायात अपूर्व उत्साहाच्या लहरी निर्माण होत होत्या. त्यातच 'आंबेडकर कौन है, दलितोंका राजा है ', ' आंबेडकर जिंदाबाद, थोडे दिनमें भिमराज ', 'शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचा विजय असो ', ' स्वतंत्र मताधिकार हासिल करो ' अशा प्रमुख जय-घोषांच्या गर्जना होत होत्या आणि सेंट्रल स्टेशनचा दिग्विभाग सारखा दुमदुमत होता.

या आवाजाचे पडसाद स्टेशनाबाहेरील राजरस्त्यावर गेल्यामुळे तेथे रेंगाळत असलेल्या हजारो अस्पृश्य लोकांची एकच धावपळ उडाली आणि पुराच्या लोंढ्याप्रमाणे असंख्य माणसांचा लोंढा सेंट्रल स्टेशनच्या आवारात घुसल्यामुळे स्टेशन व त्या लगतचा खुला भाग भरगच्च भरून गेला. स्टेशनच्या गच्च्या, पुलाचे कठडे वगैरेवर लोकांनी अगोदरच गर्दी करून सोडली होती आणि वहानांची रहदारी जेथल्या तेथे स्थगितली होती.

डॉ. बाबासाहेब जनसमुदायाला उद्देशून दोन शब्द बोलावयास उठले. प्रचंड गर्जनांचा व टाळयांचा प्रदीर्घ कडकडाट झाला. डॉ. बाबासाहेबांच्या चेहऱ्यावर दूरच्या प्रवासाचा त्रासिकपणा दिसण्याऐवजी त्यांची मुद्रा प्रसन्न दिसत होती. आनंदाची तेजोवलये त्यांच्या चेहऱ्याभोवती विलसत होती.

मुंबईच्या दलित जनतेने केलेल्या या अभूतपूर्व स्वागताबद्दल प्रारंभी मनःपूर्वक आभार मानून, डॉ. बाबासाहेब म्हणाले,

मी दिल्लीहून पराभूत होऊन आलो नाही. परिक्षेत नापास झालेल्या विद्यार्थ्यांचे सांत्वन करतात, त्याप्रमाणे माझ्या सांत्वनार्थ ही सभा नाही. माझ्या आयुष्यात मी कधी अपेशी झालो नाही. मी माझ्या दलित समाजासाठी गेल्या चार वर्षात जी कामगिरी केली, तिच्याबद्दल हे माझे स्वागत होत आहे, हे माझ्या शत्रुंनी व अस्पृश्य समाजाच्या हितशत्रुंनी ध्यानात ठेवावे. (प्रचंड टाळया)

व्हाईसरॉयने नुकत्याच घोषित केलेल्या नव्या हंगामी सरकारच्या मंत्रिमंडळात अस्पृश्य वर्गाचा प्रतिनिधी घेण्यात आला हा खरोखरच आपला विजय आहे. १९४५ साली भरलेल्या सिमला परिषदेत हिंदुस्थान सरकारात अस्पृश्यांचा एकही प्रतिनिधी घेण्यास गांधींनी नकार दिला होता. आता व्हाईसरॉयनी निवडलेले श्री. जगजीवनराम यांनाच गांधींनी त्यावेळी स्पष्टपणे सांगितले होते की,' मध्यवर्ती सरकारात अस्पृश्य प्रतिनिधीला स्थान मिळणार नाही. ' परंतु एक वर्षानंतर आता अस्पृश्य वर्गाचा हा हक्क मान्य करण्यात आला आहे. हे आमच्याच चळवळीचे फळ आहे. आम्ही आमच्या संघटित चळवळीनेच ते मिळविलेले आहे.

मध्यवर्ती सरकारात अस्पृश्य वर्गाला स्थान मिळाले हीच महत्त्वाची गोष्ट आहे. व्यक्तीला महत्त्व नाही. त्या जागेवर आमचे कुत्रे जरी जाऊन बसले तरी आमची हरकत नाही. (प्रचंड हंशा व टाळया) व्हाईसरॉयने सुचविलेला माणूस लायक असेल तर प्रश्नच नाही. कालांतराने त्याची लायकी आपोआपच सिद्ध होईल, मात्र मी पुन्हा एकदा स्पष्टपणे सांगतो की, अस्पृश्य वर्गाला राज्य कारभारात भाग घेण्याचा अधिकार मिळाला हे आपल्याच चळवळीचे फळ आहे. पण आमची मागणी एवढ्यानेच संपली नाही. आमच्या न्याय्य मागण्या मिळाल्याशिवाय आमची चळवळ थांबणार नाही. मुसलमानांच्या निम्म्याने आमची लोकसंख्या असल्यामुळे त्या प्रमाणात आम्हाला सरकारात जागा मिळाल्या पाहिजे.

१९४२ च्या चळवळीत गांधींनी ' करेंगे या मरेंगे ' अशी घोषणा केली. आमच्या लढ्याचे ब्रीदवाक्य व घोषवाक्यही तेच आहे. आमचे ध्येय साध्य होईपर्यंत आम्ही प्राणपणाने झगडू. आम्ही आज कदाचित लढाई हरलो असू, पण युद्ध मात्र आम्ही जिंकणारच जिंकणार. (प्रचंड टाळया)

मुंबई हे आपल्या चळवळीचे केंद्र आहे आणि म्हणूनच चार वर्षानंतर पुन्हा या चळवळीत दुप्पट उत्साहाने भाग घेण्यासाठी मी तुमच्यात येत आहे. माझे फक्त कार्यक्षेत्र बदलले आहे. आता तुमच्याशी माझा अधिक संबंध येणार आहे. आपली संघटना अभेद्य करा, आपसातील मतभेदांना मूठमाती द्या. या पुढे आपले दरवाजे उघडे ठेवा आणि निर्भय बनून आपला लढा जोरदार करा. स्वतःच्या कुटुंबाच्या पलिकडे नजर टाकून स्वतःच्या समाजासाठी थोडा

स्वार्थत्याग करा. अखेर यश तुमचेच आहे. असा स्फूर्तिशाली संदेश देऊन डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपले तेजस्वी भाषण टाळयांच्या प्रचंड गजरात व ' जयभीम ' च्या गगनभेदी निनादात संपविले.

शेवटी श्री. मडकेबुवांनी कार्यकर्त्यांचे, स्वयंसेवकांचे नि लोकसमुदायांचे आभार मानल्यावर लोक आनंदीत अंतःकरणाने व उल्हसित मनाने घरोघर निघून गेले. अशारितीने ही विराट स्वागत सभा अत्यंत यशस्वीपणे पार पडली.



## २४०

# या देशातील कोणतेही राजकीय पक्ष आमच्या स्वातंत्र्य लढ्याला पाठिंबा देत नाहीत . . .

पुणे येथील अहिल्याश्रमात दिनांक २१ जुलै १९४६ रोजी दुपारी ३.३० वाजता सभेचे आयोजन करण्यात आले होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर स्त्री-पुरुषांच्या प्रचंड समुदायाला संबोधित करताना म्हणाले,

भगिनींनो आणि बंधुंनो,

आज या ठिकाणी जे आपण सर्वजण जमलो आहोत त्याचे कारण येथे जो सत्याग्रह चालू आहे त्याचा आढावा घेण्यासाठी. आपल्या या सत्याग्रहाचा सर्व वृत्तान्त वर्तमान पत्रातून थोडा थोडका का होईना देण्यात आलेला आहे. परंतु आपणा सर्वांना हे दिसून येईल की या वर्तमानपत्रांनी सत्याग्रहाची जी छाननी केली आहे तिच्यात त्यांनी सत्याग्रहाबद्दल थोडी देखील आपुलकी किंवा आदर दाखविलेला नाही. त्यांच्या मते, त्यांनी लिहिले आहे की, ह्या सत्याग्रहात फक्त महारच सामील आहेत. कारण मी फक्त महारांचाच पुढारी आहे. माझ्या पाठिशी दुसरे कोणीही नाही. असा त्यांनी प्रचार केला आहे. हा प्रचार काही आजकालचा नाही. त्यांचा हा प्रचार सतत चालू आहे. त्याचा परिणाम विलायतेत देखील थोडासा झाला आहे, असे दिसून येते. काल पार्लमेन्टमध्ये कमिशनच्यावतीने एक भाषण करण्यात आले आहे. त्यात असे सांगण्यात आले आहे की मी हिंदुस्थानचा पुढारी नाही. माझ्या पाठीशी मध्यप्रांत व मुंबईतील काही लोक आहेत. परंतु हे विधान किती असत्य, लबाड व घातक आहे, हे माझ्या बंगालमधून झालेल्या निवडणुकीवरून सहज सिद्ध झाले आहे.

माझ्या मागे हिंदुस्थानातील सर्व अस्पृश्य समाज आहे, याला बंगालमधीलच निवडणुकीचा पुरावा देता येईल. कारण बंगालमध्ये काही महार नाहीत. बंगालमध्ये ' नामशूद्र ' जात आहे. मग या नामशूद्रांनी मला निवडून दिले आहे. आता माझा त्यांना सवाल आहे की, मी हिंदुस्थानातील सर्व अस्पृश्यांचा पुढारी नाही, असे जर तुम्ही म्हणता तर मी बंगालमधून कसा निवडून आलो ?

---

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे : संपा. मा. फ. गांजरे, खंड-१ पुनर्मुद्रण १९८६ पृष्ठ १६२-१६६.

अस्पृश्य समाज ही हिंदुस्थानातील एक स्वतंत्र जमात आहे, अशी ब्रिटिश लोकांनी अनेक वेळा घोषणा केली, परंतु कॅबिनेट मिशनने आपल्या योजनेत अस्पृश्य समाजाचा थोडा देखील नामनिर्देश केला नाही. अस्पृश्य समाजाला त्यांनी वगळले, त्याचवेळी मी घटना समितीमध्ये जाण्याचा निश्चय केला.

अस्पृश्य समाजाच्या कल्याणासाठी माझे घटना समितीमध्ये जाणे अत्यंत जरुरी होते. मी घटना समितीमध्ये निवडून येऊ नये म्हणून कॉंग्रेसने सर्व ठिकाणी कुलूपे लावली. महाराष्ट्रात जी काही थोडी माणसे मोठी आहेत त्यामध्ये नामांकित म्हणून माझी गणना होणार नाही, असे म्हणणारा माणूस मूर्ख असला पाहिजे. घटना समितीच्या निवडणुकीसाठी तुम्ही उभे राहा म्हणून मि. जयकर यांना कॉंग्रेसने पत्र धाडले, मि. मुन्शींना बोलावण्यात आले आणि पुष्कळांना आमंत्रणे निमंत्रणे धाडली. इतक्या सुवासिनींमध्ये मला देखील त्यांनी कुंकू लावावयास पाहिजे होते. परंतु मला कसे तरी रांडव करण्यासाठी त्यांनी आटोकाट प्रयत्न केले. म्हणून मी मुंबई सोडून बंगालमध्ये सुखाने नांदावयास गेलो. त्याठिकाणी महार नसताना देखील निवडून आलो, हे माझ्या शत्रुंनी पक्के ध्यानात ठेवावयाला पाहिजे.

या सत्याग्रहात फक्त महारच आहेत, असे म्हटले जाते ते अगदी धादांत खोटे आहे. पकडलेल्या माणसांची यादी आताच आपणाला वाचून दाखविण्यात आलेली आहे. तीवरून दिसून येईल की या सत्याग्रहात महार, मांग, चांभार, वगैरे सर्व जातीचे लोक आहेत. मुंबई प्रांतात इतर जातीपेक्षा महार जातीच्या लोकांची संख्या फार आहे. अर्थातच अस्पृश्य समाजाच्या उद्धाराच्या चळवळीत महार बहुसंख्येने भाग घेत आहेत त्याबद्दल विषाद वाटण्याचे कोणालाच कारण नाही.

कोणत्या ना कोणत्या तरी आमिषाने पुष्कळशी माणसे कॉंग्रेसमध्ये सामील झालेली आहेत. कोणाला चामड्याचा व्यापार करावयाचा आहे म्हणून चामडे मिळवावयाचे आहे, कोणाला मस्क्याचा व्यापार करावयाचा म्हणून मस्क्यासाठी पांढरा पातळ कागद मिळवावयाचा आहे. कोणाला कॉन्ट्रॅक्टस् मिळवावयाचे आहेत म्हणून कॉंग्रेसमध्ये सामील झाले आहेत, तर कोणाला नोकरी मिळवावयाची आहे. आमच्या चळवळीमध्ये मात्र स्वार्थासाठी कोणी आलेला नाही. आमच्याजवळ कोणाला देण्यासाठी नोकऱ्या नाहीत. आम्ही काही कोणाला कॉन्ट्रॅक्टस् देऊ शकत नाही किंवा मस्क्यासाठी द्यावयास आम्हाजवळ पांढरा कागद देखील नाही. (हंशा व टाळ्या) आपण सर्वजण निस्वार्थाने आपल्या स्वातंत्र्ययुद्धामध्ये भाग घेत आहोत. निस्वार्थ बुद्धीने भाग घेण्यातच आपल्या चळवळीचा विजय आहे.

आम्ही सत्याग्रह का करीत आहोत, यात फार मोठा गंभीर व न कळण्यासारखा खोल अर्थ आहे असे नाही. याचा अर्थ साध्या तिसरी पास झालेल्या मुलाला देखील कळेल. परंतु मुंबई प्रांताचे मुख्य प्रधान मि. खेर यांना मात्र याचा अर्थ कळत नाही, असे त्यांनी स्वतःच जाहीर केले आहे. पण इतके वेडात शिरण्याचे काहीच कारण नाही.

बाप मरत असता आपली इस्टेट कोणाकडे जावी याचे मृत्यूपत्र करीत असतो. इंग्रजांनी जाहीर केले आहे की हा देश आता ते सोडून जाणार आहेत. मरणार असलेल्या बापाप्रमाणे इंग्रजांनी आपले मृत्यूपत्र करून ठेवले आहे. बाप जसा आपल्या पाठीमागे आपल्या इस्टेटीचे वारस कोण हे ठरवीत असतो त्याचप्रमाणे इंग्रजांनी देखील या देशाचे वारस ठरविले आहेत. त्यांनी जाहीर केले आहे की या देशातील ब्रिटिश सत्तेचे वारस दोन, ते म्हणजे हिंदू आणि मुसलमान. अस्पृश्यांचा त्यांनी उल्लेख देखील केलेला नाही.

आम्हाला वाटत होते की, या देशातील सत्तेचे वारस ठरविताना आम्हाला देखील काही तरी वारसाहक्क मिळेल. हिंदू लोकांना आठ आणे मिळाले तर आम्हाला त्यातील निदान पावली तरी मिळेल, असा आमचा समज होता. परंतु अभिजात लबाड इंग्रजांनी अस्पृश्य समाजाला अजिबात फसविले.

सत्तेचे वारस हिंदू आणि मुसलमान झालेले आहेत. राज्यसत्तेचा हक्क हिंदुंना मिळाला आहे. या राज्यसत्तेमध्ये आमचा भाग काय, असा आमचा हिंदुंना साधा सवाल आहे. हा साधा अर्थ मि. खेरांना कळत नाही म्हणणे केवळ ढोंग आहे. परंतु वेड पांघरून पेडगावला जाण्यात काही अर्थ नाही. या देशात सुखाने नांदावयाचे असेल तर आमच्या प्रश्नाचे उत्तर हिंदुंना द्यावेच लागेल. हिंदू लोकांनी या प्रश्नाचे उत्तर अद्याप दिलेले नाही. म्हणूनच आमचे भांडण हिंदू लोकांशी जुंपले आहे. इंग्रज लोकांबरोबर झगडा करून काय फायदा आहे. मेलेल्या बापाबरोबर वारसा हक्काबद्दल झगडण्यात काय शहाणपणा आहे ?

आमचा लढा मुसलमानांशी नाही. कारण ते आम्हाला काही विरोध करीत नाहीत. मुसलमान बहुसंख्य प्रांतात आमच्या मागण्या देण्यास ते तयार आहेत.

काँग्रेसने मात्र आमच्या हक्कांबद्दल जाहीर खुलासा करावयास पाहिजे, नुसते वाऱ्यावर बोलून आता भागणार नाही. आमच्या मागण्यांसंबंधी श्वेतपत्रिका काँग्रेसने ताबडतोब जाहीर केली पाहिजे. नाहीतर पुण्यास सुरू झालेल्या सत्याग्रहाच्या ज्वाला सर्व देशभर पसरल्याशिवाय खास राहणार नाहीत. आमच्या मागण्या मिळविण्यासाठी सर्व प्रांतात आम्हाला लढा सुरू करावा लागेल.

आजचा आमचा लढा अहिंसात्मक आहे. कारण अहिंसेचे प्रभावी अस्त्र आम्ही हाती धरले आहे. गांधींची अहिंसेची एक व्याख्या आहे. माझी मात्र अहिंसेची व्याख्या गांधींहून अगदी निराळी आहे. तुकारामबुवांची अहिंसेची जी व्याख्या होती तीच माझी देखील आहे.

'' दया तिचे नाव भूतांचे पाळण । आणीक निर्दाळण कंटकांचे ॥'' अशी तुकारामाची व्याख्या होती. प्राण्यावर दया करावी पण त्याचप्रमाणे दुष्टांचे निर्दाळण देखील करावे, असा माझा देखील समज आहे. या व्याख्येप्रमाणे आम्ही अहिंसेने सत्याग्रह चालवूच चालवू पण त्याचप्रमाणे कंटकांचे देखील निर्दाळण करू.

आपल्या सत्याग्रहाचे नैतिक वजन जरी आज त्यांचेवर पडले नसले तरी काही दिवसांनी का होईना आपल्यापुढे त्यांची मान झुकविल्याशिवाय कदापिही राहाणार नाही. स्वतंत्र मतदार संघाची आपली मागणी त्यांना मान्य करावीच लागेल.

आपली स्वतंत्र मतदार संघाची मागणी काँग्रेसच्या लोकांच्या पोटात भीतीचा गोळा निर्माण करते. त्यांना वाटते की, आपणास जर स्वतंत्र मतदार संघ मिळाला तर देशाचे फार नुकसान होईल. परंतु त्यांनी असे घाबरून जाण्याचे काही कारण नाही. स्वतंत्र मतदार संघाने कोणाचेही नुकसान होणार नाही. शीख लोकांना स्वतंत्र मतदार संघ देण्यात आलेला आहे. त्यामुळे देशात काही दुफळी झालेली नाही.

१९३४ पर्यंत जिना काँग्रेसमध्ये होते. काँग्रेसमध्ये जिना असताना त्यांची काँग्रेसचे लोक एखाद्या देवासारखी पूजा करीत होते. त्यांच्या देशभक्तीचे स्मारक म्हणून काँग्रेसच्या लोकांनी मुंबईला ' जिना हॉल ' म्हणून एक इमारत बांधली आहे परंतु हेच जिना स्वतंत्र मतदार संघातूनच सतत निवडून आलेले आहेत, हे कोणीही विसरता कामा नये. जिनाच्या स्वतंत्र मतदार संघाने जर देशाचे नुकसान झाले नाही तर अस्पृश्यांना तो दिला तर देशाचे भले मोठे नुकसान होईल या म्हणण्यात काय अर्थ आहे ? मी २० वर्षे या देशाच्या राजकारणात आहे. या २० वर्षांच्या काळात देशाचे नुकसान होईल असे मी एक देखील कृत्य केलेले नाही. माझे मित्र गोखले यांना ही गोष्ट माहीत आहे. मि. गोखले मला मित्र समजतात की नाही कोण जाणे पण मी मात्र त्यांना माझा मित्र समजतो. (हंशा) ब्रिटिश लोकांना हडसून खडसून प्रश्न विचारणारा व्हाईसरॉयच्या कौन्सिलमध्ये फक्त मी एकटाच होतो. या लोकांनी खरा इंग्रज माणूस पाहिला नसेल, त्यांनी जर तो पाहिला तर त्यांची त्रेधा उडेल.

आमचे भांडण हे नेहमी तत्त्वासाठी असते. ६ कोटी अस्पृश्य समाजाच्या वतीने आमचे भांडण आहे. आम्हाला राजकीय संरक्षण पाहिजे. हे राजकीय सरंक्षण अशातऱ्हेने पाहिजे की मूर्खाच्या हातून किंवा लबाडाच्या हातून आमचे काहीही नुकसान होता कामा नये. आमच्या चळवळीमध्ये मूर्खाला किंवा लबाडाला थोडा देखील वाव नाही. लुच्च्या लफंग्याला जागा मिळणार नाही अशातऱ्हेची आम्हाला चळवळ करावयाची आहे. इतर लोकांप्रमाणेच आम्हालाही स्वातंत्र्य पाहिजे. आम्हाला कोणाचीही, परकियांची किंवा स्वकियांची गुलामगिरी पत्करावयाची नाही. आम्हाला स्वातंत्र्य पाहिजे आहे. परंतु त्याचबरोबर आम्हाला लोकशाही देखील पाहिजे आहे. राजकीय सत्ता काही ठराविक लोकांच्या हाती गेली तर आम्हाला चांगले दिवस येतीलच असे नाही, अशी आम्हाला भीती वाटते आणि ही भीती साधार आहे म्हणूनच राजकीय सत्ता सर्वसाधारण लोकांच्या हाती, खऱ्या अर्थाने शेतकरी कामकऱ्यांच्या हाती, असावयास पाहिजे, असा आमचा पक्का समज आहे.

दुसरे लोक काहीही म्हणोत आपणाला खरे स्वातंत्र्य पाहिजे आहे. या देशातील कोणत्याही जातीने, जमातीने किंवा वर्गाने आपणावर वर्चस्व गाजवता कामा नये. आपणा सर्वांना ह्या देशामध्ये उजळ माथ्याने वावरता आले पाहिजे, असे आपणास राजकीय हक्क पाहिजेत. गुलामगिरीला आपण ठोकरीने उडविले पाहिजे.

या देशातील ६ कोटी अस्पृश्यांचा लढा हा खरा स्वातंत्र्याचा लढा आहे. असे असताही या देशातील कोणीही आमच्या लढ्याला पाठिंबा तर देत नाही परंतु नुसती सहानुभूतीही कोणी दाखवित नाही. पोष्टाचा संप झाला तर त्याला सर्व लोकांचा पाठिंबा असतो. तसेच रेल्वे कामगारांचा संप असला तर त्याला देखील हजारो लोकांचा पाठिंबा मिळतो. अर्थात मी म्हणत नाही की तुम्ही त्यांना पाठिंबा देऊ नका. या देशात कम्युनिस्टस् आहेत, जहाल मतवादी आहेत, डावे आहेत, कोणी उजवे आहेत. परंतु या कोणाचाही आमच्या स्वातंत्र्य लढ्यास पाठिंबा नाही.

परंतु आपण सर्वांनी ही गोष्ट ध्यानात ठेवावयास पाहिजे की, आपणास कोणाचा पाठिंबा असो वा नसो आपणाला हा लढा जिंकलाच पाहिजे. हा लढा आपल्याच लोकबळावर आपणास जिंकावयाचा आहे. आपल्या शक्तीवर आपण भिस्त ठेवली पाहिजे. आपल्या मजबूत संघटनेवर आपणास सर्व अडचणी सहज ओलांडून जाता येतील. या सत्याग्रहाची सर्व जबाबदारी फक्त आपल्यावरच आहे. आता लढाई जुंपलेली आहे. शिर तुटो की पगडी पडो, शेवटपर्यंत लढण्याचा आपण निर्धार केला पाहिजे.

महिलांच्या बाबतीत मला दोन शब्द सांगावयाचे आहेत. स्त्रियांनी या सत्याग्रहात भाग घेतला आहे. ही एक फारच अभिमानाची गोष्ट झाली आहे. काँग्रेसच्या चळवळीमध्ये स्त्रिया भाग घेत होत्या म्हणून त्यांना त्याचा फार अभिमान वाटत होता. परंतु आजच्या परिस्थितीवरून दिसून येईल की, अस्पृश्य समाजातील स्त्रिया देखील इतर स्त्रियांपेक्षा कोणत्याही बाबतीत मागे राहिलेल्या नाहीत. आपल्या चळवळीचे लोण आज स्त्री-वर्गातही जाऊन पोहोचले आहे. आपणाला जर परिस्थिती अनुकूल असती तर याच्यापेक्षाही आपल्या जास्त महिला तुरुंगात गेल्या असत्या.

रेशनिंग सुरू असल्यामुळे आम्हाला पुष्कळ अडचणी उत्पन्न झालेल्या आहेत. त्यामुळेच सत्याग्रह आघाडीवर आम्हाला पुष्कळ माणसे आणता येत नाहीत. काँग्रेस सरकारने रेशनिंग नाहीसे करावे. माझे त्यांना आव्हान आहे की, मी कमीत कमी १ लाख तरी माणसे तुरुंगात सहज पाठवू शकेल.

मी देशविघातक असे काय केले आहे हेच मला कळत नाही. राऊंड टेबल कॉन्फरन्सच्या वेळेपासून माझ्या अगदी अलिकडच्या सरकारी नोकरीपर्यंत माझी सर्व कामगिरी काँग्रेसवाल्यांनी नीट आठवावी. इंग्रजांच्याविरूद्ध दटावून सांगणाऱ्या मंत्र्यांमध्ये मी प्रमुख होतो आणि इंग्रजांना पाहिले तर ज्यांना अजून भीती वाटते असे मंत्री कायदेमंडळात जाऊन बसले आहेत. काँग्रेसच्या तिकीटावर जी १५ अस्पृश्य माणसे या प्रांतात निवडली आहेत त्यांना माझा प्रश्न आहे की, आपल्या आयुष्यात त्यांनी या समाजासाठी किंवा देशासाठी किती तास खर्चिले आहेत ? ज्यांनी अस्पृश्यांच्या उन्नतीसाठी देह झिजविला त्यांना जागा न देता उपटसुंभांना आमदार करण्यात आले आहे. गोरगरिबांचे राज्य व्हावे, लोकशाहीचा राज्यकारभार चालवावा अशी काँग्रेसची इच्छा असेल तर २००० वर्षे ज्यांची गळचेपी झाली, त्या आज ६-७ कोटीपर्यंत असलेल्या अस्पृश्यांना त्यांचे योग्य हक्क मिळाले पाहिजेत.



# २४१
# हक्क मिळविण्यासाठी आमचा लढा चालूच राहील

पुणे, दिनांक ५ ऑगस्ट १९४६,

नवे हंगामी सरकार बनविताना काँग्रेसने अस्पृश्यांना ज्या प्रकारे वागविले आहे तो प्रकार लक्षात घेता या नव्या हंगामी स्वराज्याला वर्गीकृतांच्या फेडरेशनची मान्यता मिळणार नाही. या सरकारला वर्गीकृतांनी मान द्यावा किंवा त्यांनी या सरकारला आज्ञाधारक राहावे अशी आशा काँग्रेसला करता येणार नाही अशा आशयाचे विचार वर्गीकृतांचे पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी आज नव्या हंगामी स्वराज्य सरकारविषयी बोलताना प्रकट केले.

ते पुढे म्हणाले,

हंगामी सरकारात वर्गीकृतांचे पूर्ण उच्चाटन करण्याच्या कामी काँग्रेस व ब्रिटिश सरकार यांच्यात काही अलिखित करार झाल्यासारखा दिसतो.

पाकिस्तानच्या मागणीत काही अर्थ असू शकेल. परंतु सवर्ण हिंदुंच्या बरोबरीने मुसलमानांना प्रतिनिधित्व देण्यात काहीच अर्थ नाही. शिवाय सर्व अल्पसंख्य जमातींना मिळून चार जागा देण्यात आल्या आहेत. याचेही समर्थन करता येत नाही. वर्गीकृतांची संख्या मुसलमान समाजाच्या निम्म्याहून अधिक असताना मुसलमानांना मिळालेल्या जागांच्या निम्म्या जागा वर्गीकृतांना का मिळू नयेत ?

गेल्या वर्षी सिमल्याला ज्या वाटाघाटी झाल्या त्यात वर्गीकृतांना दोन जागा देण्याचे काँग्रेसने मान्य केले होते. या पार्श्वभूमीवर पाहता काँग्रेसने वर्गीकृतांवर अन्याय केला आहे. म्हणूनच काँग्रेसला त्यांच्याकडून राजनिष्ठेची अपेक्षा करता येणार नाही.

या सर्व अन्यायावर ताण करणारी गोष्ट म्हणजे श्री. जगजीवनराम यांची काँग्रेसने वर्गीकृतांचा प्रतिनिधी म्हणून केलेली निवड होय. काँग्रेसने केलेले अन्याय सहन करूनही ते या नव्या सरकारात जाऊ शकतात यावरूनच त्यांची खरी योग्यता कळून येते.

वर्गीकृतांनी सुरू केलेल्या सत्याग्रहाविषयी विचारण्यात आले तेव्हा डॉ. आंबेडकर म्हणाले, योग्य हक्क मिळविण्यासाठी आमचा लढा चालूच राहील. आम्ही शरण जाणार नाही.

या प्रसंगी शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे अध्यक्ष दिवाणबहादुर एन. शिवराज यांचेसुद्धा भाषण झाले.



---

गरुड : १ सप्टेंबर १९४६.

## २४२
# अनुकूल काळ व परिस्थिती निर्माण केल्यास जगातील कोणतीही शक्ती या देशाला एक होण्यापासून परावृत्त करू शकणार नाही

संविधान सभेच्या कामकाजाला ९ डिसेंबर १९४६ पासून सुरूवात झाली. संविधान सभेवर एकूण २९६ सदस्य निवडून आले होते. त्यापैकी २०७ सदस्यांनी कामकाजात भाग घेतला. ८९ सदस्य अनुपस्थित होते. किंबहुना त्यांनी कामकाजावर बहिष्कार टाकला होता हे म्हणणे संयुक्तिक होईल. या सदस्यांमध्ये बहुतांश मुस्लिम लीग आणि संस्थानिकांचे प्रतिनिधी होते.

दिनांक १३ डिसेंबर १९४६ ला संविधानाचे साध्य आणि उद्दीष्ट सांगणारा ठराव पं. जवाहरलाल नेहरु यांनी मांडला. हात वर करुन नेहमीच्या सर्वसाधारण पद्धतीने नव्हे तर सर्वांनी उभे राहून गांभीर्याने हा ठराव पारित करावा अशी अपेक्षा त्यांनी आपल्या भाषणात व्यक्त केली. श्री. पुरुषोत्तमदास टंडण यांनी ठरावाला अनुमोदन देणारे भाषण केले.

डॉ. एम. आर. जयकर यांनी पं. नेहरुंच्या ठरावाला दुरुस्ती जोडणारा ठराव मांडला. त्यांच्या मते भारताला एक स्वतंत्र, लोकशाहीवादी, सार्वभौमराज्य निर्माण करण्यासाठी, संविधानाला त्या संदर्भात आकार देण्यासाठी मुस्लिम लीग आणि भारतीय संस्थानिकांच्या प्रतिनिधींच्या सहकार्याची गरज आहे, जेणेकरुन या ठरावाला एक शक्ती प्राप्त होईल. त्यासाठी वरील दोन संघटनांचे प्रतिनिधी, जर त्यांची इच्छा असेल, सहभागी होईपर्यंत या ठरावावरील चर्चा पुढे ढकलण्यात यावी.

काही अपवाद वगळता अनेक सदस्यांनी डॉ. जयकरांच्या दुरुस्तीला कडाडून विरोध केला. कोणत्याही परिस्थितीत चर्चा स्थगित होता कामा नये अशी त्यांची भूमिका होती.

या पार्श्वभूमीवर संविधान सभेचे अध्यक्ष डॉ. राजेंद्रप्रसाद यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे नाव बोलण्यासाठी पुकारले. हा दिवस होता मंगळवार, दिनांक १७ डिसेंबर १९४६. संविधान सभेचे कामकाज सुरू झाल्याच्या ९ व्या दिवशी डॉ. आंबेडकरांचे सभेपुढे पहिले भाषण झाले. डॉ. जयकरांप्रमाणेच

डॉ. आंबेडकर सभागृहाचा रोष ओढवून घेतील आणि त्यांच्या रोषाला पात्र होतील असे अनेकांना वाटले. परंतु प्रत्यक्षात घडले ते अनपेक्षित. या प्रसंगाचे वर्णन करताना सभेचे एक सदस्य आणि प्रत्यक्षदर्शी न. वि. गाडगीळ म्हणतात, '' त्यांचे भाषण इतके मुत्सद्याला शोभणारे होते, इतके कटुतेशिवाय, इतके प्रामाणिकपणे आव्हान देणारे होते की, संपूर्ण सभागृह मतिगुंग झाल्याप्रमाणे ऐकत होते. प्रचंड उत्साहानी सर्व सदस्यांनी त्यांच्या भाषणाचे स्वागत केले. सभागृहाच्या लॉबीमध्ये त्यांचे अभिनंदन करण्यासाठी सर्वांनी त्यांना गराडा घातला.'' [१]

या प्रसंगाचे वर्णन करताना डॉ. आंबेडकरांचे एक चरित्रकार श्री. धनंजय कीर लिहितात, '' एक मोठ्या डोक्याची, खंबीर हनुवटीची, लंबवर्तुळाकार, गंभीर नि तेजस्वी चर्येची आणि उत्तम पोषाखातील भरदार व्यक्ती जयकरांच्या सूचनेला पाठिंबा देण्यास उभी राहिली. ती व्यक्ती म्हणजे डॉ. भीमराव आंबेडकर. ते काँग्रेसचे कट्टर विरोधक. त्यांनी काँग्रेसच्या मतप्रणालीची नि नेत्यांची जाहीर नि खाजगीरित्या अनेक वेळा टर उडविली होती. साहजिकच घटना समितीतील सर्व सभासदांच्या नजरा त्या वक्त्याकडे खेचल्या गेल्या. आंबेडकरांनी सर्व सभासदांवर आपली नजर एकदा फिरविली, प्रत्येक सभासदाला वाटले की जयकरांच्या ठरावाला पाठिंबा देऊन जयकरांबरोबरच आंबेडकरही आपली पत-प्रतिष्ठा घालवून बसणार. काँग्रेसचे नेते हे राष्ट्रातील कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुमशक्तीचे प्रतीक. त्यांच्याविरुद्ध बोलणे म्हणजे स्वतःच्या लौकिक जीवनाची इतिश्री करुन घेण्यासारखे होते. काँग्रेसचे सभासद आपल्या कट्टर शत्रुला पाणी पाजावयास आतूर झाले होते.

राष्ट्रातील महान नेते आपल्या अवती-भवती बसलेले आहेत याची आंबेडकरांना जाणीव होती, त्यांच्या विरोधकांनी त्यांच्याविषयी अनेक गोष्टी ऐकल्या होत्या. प्रत्यक्ष भाषण ऐकण्याचा तो पहिलाच प्रसंग होता. आंबेडकरांनी गंभीर स्वरात अन् वक्तृत्वपूर्ण भाषेत आपल्या भाषणास मोठी आत्मविश्वासाने सुरवात केली. '' [२]

ते म्हणाले,

अध्यक्ष महोदय, आपण या ठरावावर बोलण्यासाठी मला आमंत्रित केल्याबद्दल मी आपला मनःपूर्वक आभारी आहे. काही असो, आपल्या या निमंत्रणाने मी आश्चर्यचकित झालो आहे हे कबूल करावे लागेल. मी या अपेक्षेत होतो की,

---

१ Dr. Babasaheb Ambedkar Writings and Speeches Vol. 13, PP7.

२ डॉ. बाबासाहेब आंबेडकर : ले. धनंजय कीर, पृ. ४००.

माझ्याही आधी २०-२२ वक्ते भाषण करणार असल्यामुळे माझा क्रम लागलाच तर तो उद्या लागेल. आज मी कुठलीही तयारी करून न आल्यामुळे उद्या बोलणे मला अधिक आवडले असते. आजच्या प्रसंगी, मला माझे विचार पूर्णपणे व्यक्त करण्यासाठी पूर्ण तयारीनिशी बोलणे आवडले असते. शिवाय आपण माझ्याकरिता दहा मिनिटांचा अवधी निश्चित केला आहे. या मर्यादित चौकटीत आपल्या पुढील प्रस्तुत ठरावाला मी कसा न्याय देऊ शकेन हे मला कळत नाही. तरीही या संदर्भातील माझी मते शक्यतितक्या थोडक्या शब्दात मांडण्याचा मी प्रयत्न करीन.

अध्यक्ष महोदय, ज्या ठरावावर कालपासून चर्चा सुरू आहे त्याची स्पष्टपणे दोन भागात विभागणी होते, एक भाग वादग्रस्त असून दुसरा वादातीत आहे. या ठरावातील परिच्छेद ५ ते ७ शी संबंधित भाग हा वादातीत आहे. या परिच्छेदात भारताच्या भावी राज्यघटनेची उद्दिष्टे नमूद केली आहेत. मला हे नमूद करावेच लागेल की, पं. जवाहरलाल नेहरुंसारख्या नामांकित समाजवाद्याने मांडलेला हा ठराव वादातीत असला तरी मला अत्यंत निराशाजनक वाटतो. माझी त्यांच्याकडून अशी अपेक्षा होती की, ठरावातील या भागात त्यांनी जे काही मांडले त्यापेक्षा ते कितीतरी पुढे जातील. इतिहासाचा अभ्यासक या नात्याने ठरावातील हा भाग कुठल्याही परिस्थितीत त्यात समाविष्ट होणारच नाही याची मी काळजी घेतली असती. ठरावातील तो भाग वाचताना फ्रांसच्या संविधान सभेने उद्‌घोषित केलेल्या मानवी हक्कांच्या जाहीरनाम्यातील एका कलमाची आठवण होते. प्रत्यक्षात चारशे पन्नास वर्षांचा कालावधी लोटल्यानंतरही मानवी हक्कांचा जाहीरनामा व त्यातील अंतर्भूत तत्त्व आपल्या मानसिकतेचा अविभाज्य भाग झालेला आहे असे जर मी म्हटले तर ते योग्यच होईल. मी तर असे म्हणेन की, जगातील कोणत्याही सुसंस्कृत भागातील आधुनिक माणसाच्याच मानसिकतेचा तो अविभाज्य भाग झाला आहे असे नाही, तर खूप सनातनी, विचारात व सामाजिक संरचनेत खूप पुराणमतवादी असलेल्या आपल्या देशातसुद्धा या तत्त्वांची वैधता नाकारणारा कदाचितच कुणी आढळू शकेल. या ठरावात त्याची पुनरावृत्ती करणे म्हणजे शुद्ध पांडित्य दर्शविण्याचाच प्रकार होय. ही तत्त्वे आपल्या निष्कलंक दृष्टिकोनाचा अविभाज्य भाग झालेली आहेत. त्यामुळे आपल्या उद्दिष्टांचा भाग म्हणून या तत्त्वांची पुन्हा घोषणा करणे अनावश्यक ठरते. या ठरावात दुसऱ्याही काही उणीवा आहेत. मला असे दिसते की ठरावातील प्रस्तुत भागात काही हक्कांची स्पष्टपणे तरतूद असली तरी उपाययोजनेचा मात्र त्यात उल्लेख नाही. आपणा सर्वांना जाणीव आहेच की, लोकांच्या हक्कांवर गदा येत असेल तेव्हा ते परत मिळविण्याची तरतूद असल्याशिवाय ते निरर्थक ठरतात.

मला यात अशा उपाययोजनांची पूर्ण उणीव भासते. कोणत्याही माणसाचे जीवित, स्वातंत्र्य आणि मालमत्ता कायदेशीर कार्यवाहीशिवाय हिरावून घेता येणार नाही, हे सर्वसामान्य सूत्रही मला या ठरावात कुठेही आढळत नाही. मूलभूत हक्कांची तरतूद ही कायदा व नीतिमत्तेच्या मर्यादेत करण्यात आली आहेत. स्वाभाविकतः कायदा म्हणजे काय, नीतिमत्ता म्हणजे काय हे त्यावेळचे शासन ठरविल आणि जेव्हा एक राज्यकर्ते एक दृष्टिकोन स्वीकारतील तर दुसरे दुसरा दृष्टिकोन स्वीकारतील. तत्कालीन राज्यकर्त्यांवर जर हा निर्णय सोपविण्यात आला तर, अशावेळी मूलभूत अधिकारांची नेमकी स्थिती काय राहील हे सांगता येत नाही. महोदय, या ठरावात आर्थिक, सामाजिक व राजकीय न्यायाची तरतूद करण्यात आली आहे. जर या ठरावामागे वास्तवता आणि प्रामाणिकपणा असेल, ज्याबद्दल मला तिळमात्र शंका नाही, हा ठराव मांडणाऱ्यांनी राज्याला सामाजिक, आर्थिक व राजकीय न्याय ज्याद्वारे प्रत्यक्षात देता येईल अशी स्पष्ट तरतूद या ठरावात करायला हवी होती, या पार्श्वभूमीवर माझी अशी अपेक्षा होती की देशात आर्थिक व सामाजिक न्यायाच्या अंमलबजावणीसाठी शेतीच्या व उद्योगाच्या राष्ट्रीयीकरणाची तरतूद ठरावात करणे आवश्यक होते. समाजवादी अर्थव्यवस्था असल्याशिवाय भविष्यातील कोणतेही सरकार देशात सामाजिक, आर्थिक व राजकीय न्याय कसा देवू शकेल हे मला समजत नाही. म्हणून या बाबींच्या स्पष्ट उल्लेखांना व्यक्तिशः माझी हरकत नसली तरी मला हा ठराव काहीसा निराशाजनक वाटतो. प्रस्तुत ठरावावरील एवढी माझी निरिक्षणे व्यक्त केल्यानंतर हा प्रश्न मी इथेच संपवितो.

आता मी ठरावाच्या पहिल्या भागाकडे वळतो. यात पहिल्या चार परिच्छेदांचा समावेश होतो. या सभागृहात आतापर्यंत झालेल्या चर्चेवरून हा भाग वादग्रस्त झाल्याचे दिसून येते. ठरावात उपयोजिलेला ' प्रजासत्ताक ' हा शब्द वादाचा केन्द्रबिंदु असल्याचे जाणवते. ' सार्वभौमत्व लोकांमधून निर्माण होते ' ह्या परिच्छेद चार मधील विधानाभोवती हा वाद केन्द्रित झालेला आहे. मुस्लिम लीगच्या अनुपस्थितीत सभेने या ठरावावर चर्चा करणे संयुक्तिक होणार नाही, या माझे मित्र डॉ. जयकर यांनी काल उपस्थित केलेल्या मुद्यातून हा वाद निर्माण झाला आहे. महोदय, या महान देशाच्या सामाजिक, राजकीय आणि आर्थिक भविष्यकालीन संरचनेबद्दल व उज्ज्वल भवितव्याबद्दल माझ्या मनात तिळमात्रदेखील शंका नाही. आज आपण राजकीय, सामाजिक व आर्थिकदृष्ट्या विभागलेले आहोत, याची मला जाणीव आहे. आपण एक दुसऱ्यांविरुद्ध लढणाऱ्या छावण्यांचा समूह आहोत आणि मी तर यापुढेही जावून हेही मान्य करेन की, बहुशः अशाच एका छावणीचा मीही एक नेता आहे. परंतु महोदय, हे सर्व

खरे असले तरी मला पूर्ण खात्री आहे की, अनुकूल काळ व परिस्थिती निर्माण केल्यास जगातील कोणतीही शक्ती या देशाला एक होण्यापासून परावृत्त करु शकणार नाही. (प्रचंड टाळ्या) विभिन्न जाती व सप्रदाय असले तरी आपण एकसंध झाल्याशिवाय राहाणार नाही, याबद्दल माझ्या मनात कसलीही शंका नाही. (हर्षध्वनी) आज जरी मुस्लिम लीग भारताच्या फाळणीसाठी प्रयत्नशील असला तरी एकसंध भारतच त्यांच्याहीसाठी हिताचा आहे, असा विचार स्वतः मुस्लिम एक दिवस करायला लागतील हे सांगताना मला जराही संकोच वाटत नाही. (हर्षध्वनी व प्रचंड टाळ्या)

अंतीम ध्येयाबाबत, माझ्या मते आपल्यापैकी कुणीही भीती बाळगण्याचे कारण नाही. याबाबत कुणालाही शंका असू नये. आपली अडचण ही अंतीम भवितव्याबाबतची नाही. आज एकसंध नसलेल्या समाजातील लोकांनी एकत्रितपणे एकसंधत्वाकडे नेणाऱ्या मार्गाने कसा प्रवास करता येईल, याचा निर्णय घेणे ही आपली खरी अडचण आहे. आपली अडचण अंतीम ध्येयाबाबत नाही, सुरुवात कशी करावी याबाबत आहे. म्हणूनच अध्यक्ष महोदय, मी असा विचार केला असता की, स्वखुशीने आपले मित्र होण्याकरिता प्रत्येक पक्षाचे मन वळवण्यासाठी, या देशातील, जे अजूनही पूर्वग्रहाने मुख्य प्रवाहात सामील होण्यास तयार झाले नाहीत, अशा घटकांना, सामील करून घेण्यासाठी काही सवलती द्याव्या लागल्यात तर त्या देण्याचा उच्च दर्जाचा मुत्सद्दीपणा बहुसंख्यांक असलेल्या पक्षानी दाखवावा, यासाठी मी हे आवाहन करीत आहे. लोकांच्या मनात भीती निर्माण होईल अशा शब्दांना व घोषणांना आपण दूर ठेवू या. आपल्या विरोधकांचे पूर्वग्रह लक्षात घेऊन त्यांना काही सवलती देऊ या, त्यांना सोबत घेऊ या, जेणेकरून आपण ज्या मार्गावरून वाटचाल करीत आहोत त्या मार्गावर ते स्वखुशीने येऊन मिळतील. या मार्गावर जर आम्ही सर्वांनी दीर्घकाळ वाटचाल केली तर तीच आम्हाला निश्चितपणे ऐक्याकडे घेऊन जाईल. मी इथे डॉ. जयकरांच्या उपसूचनेस पाठिंबा देतो तो एवढ्यासाठीच की, आपल्या सर्वांना याची जाणीव झाली पाहिजे, आपण बरोबर असू की चूक, आपण घेत असलेली भूमिका आपल्या कायदेशीर अधिकाराशी सुसंगत असो वा नसो, १६ मे किंवा ६ डिसेंबरच्या निवेदनाशी ती जुळणारी असो किंवा नसो ते सर्व बाजूला ठेवू या. कायदेशीर बाजूपेक्षाही हा प्रश्न अधिक महत्त्वाचा आहे. हा प्रश्न कायद्याचा मुळी नाहीच. कायद्याच्या सर्व बाबी आपण दूर ठेवू या आणि असा प्रयत्न करु या की, जेणेकरुन जे लोक आज सोबत यायला तयार नाहीत ते येतील. ते येतील अशी परिस्थिती आपण निर्माण करू या. असे माझे आवाहन आहे.

या सभागृहात जी चर्चा सुरु आहे त्यात दोन प्रश्न विचारार्थ मांडण्यात आलेत. त्या प्रश्नांचा माझ्या मनावर इतका परिणाम झाला की, मी त्यांची नोंद करून ठेवली आहे. त्यापैकी एक प्रश्न माझे मित्र बिहारचे प्रधानमंत्री यांनी काल या सभागृहात केलेल्या भाषणात उपस्थित केला. त्यांच्या मते मुस्लिम लीगला संविधान सभेत सहभागी होण्यासाठी प्रस्तुत ठराव कसा प्रतिबंध करू शकतो ? आज माझे मित्र डॉ. शामाप्रसाद मुखर्जी यांनी एक दुसरा प्रश्न उपस्थित केला. तो प्रश्न म्हणजे कॅबिनेट मिशनच्या प्रस्तावाशी प्रस्तुत ठराव विसंगत आहे काय ? महोदय, हे दोनही प्रश्न अत्यंत महत्त्वाचे आहेत व त्यांची उत्तरे, नव्हे स्पष्ट उत्तरे दिली गेली पाहिजेत. मला असे ठामपणे वाटते की, प्रस्तुत ठरावातून काही निष्पन्न होण्याचा उद्देश असो वा नसो, हा थंड डोक्याने घेतलेला निर्णय असो वा नसो, ही निव्वळ आकस्मिक घटना असो किंवा नसो, पण या ठरावाचा निश्चित परिणाम मुस्लिम लीगला संविधान सभेच्या बाहेर ठेवण्यातच होणार आहे. या संदर्भात ठरावातील परिच्छेद क्रमांक ३ कडे मी आपले लक्ष वेधू इच्छितो, जो माझ्या मते अतिशय अर्थपूर्ण व महत्त्वाचा आहे. परिच्छेद क्रमांक ३ मध्ये भारताच्या भावी राज्यघटनेचा विचार अंतर्भूत आहे. प्रस्तुत ठराव मांडणाऱ्याला यात काय अभिप्रेत आहे हे मला माहीत नाही. परंतु मी हे गृहित धरतो की, प्रस्तुत ठराव संमत झाल्यावर तो संविधान सभेला परिच्छेद ३ च्या चौकटीत संविधानाच्या निर्मितीसाठी निर्देशक राहील. परिच्छेद ३ काय म्हणतो ? परिच्छेद ३ असे म्हणतो की, या देशात राज्य़संस्थेचे दोन प्रकार राहतील. एक खालच्या स्तरावर स्वायत्त प्रांत किंवा राज्ये किंवा असे इतर भाग जे अखंड भारतात सामील होऊ इच्छितात, ते असतील. हे स्वायत्त घटक पूर्ण अधिकारयुक्त राहतील. त्यांना उर्वरित अधिकार सुद्धा राहतील. घटक प्रांताच्या वरच्या स्तरावर संघराज्य राहील, त्याला काही बाबतीत कायदे करण्याचा, अंमलबजावणी करण्याचा आणि प्रशासनाचा अधिकार राहील. ठरावाचा हा भाग वाचत असताना एकत्रिकरणाच्या संकल्पनेचा संदर्भ, तसेच एका बाजूला असलेले केन्द्र सरकार व दुसऱ्या बाजूला असलेली प्रांत सरकारे यांच्यामध्ये दुवा साधणारी मधली व्यवस्था मला कुठे आढळत नाही. कॅबिनेट मिशनच्या प्रस्तावाच्या पार्श्वभूमीवर हा परिच्छेद वाचल्यावर किंवा काँग्रेसने वर्धेच्या अधिवेशनात पारित केलेल्या ठरावाच्याही पार्श्वभूमीवर, प्रांतांच्या एकत्रिकरणाच्या संकल्पनेचा संदर्भ मला कुठेही आढळत नाही. यामुळे मी फार आश्चर्यचकित झालो आहे, हे मला कबूल करावेच लागेल. व्यक्तिशः असे गट करण्याची कल्पनाच मला मान्य नाही (ऐका....ऐका). मला मजबूत केन्द्र सरकार आवडते (ऐका....ऐका).

१९३५ च्या भारत सरकार कायद्याने निर्माण केलेल्या केन्द्र सरकारपेक्षाही अधिक मजबूत केन्द्र सरकार मला हवे आहे. परन्तु महोदय, माझ्या या मतांना, सदिच्छांना सद्यःस्थितीत कुठेही स्थान असल्याचे दिसत नाही. आपण खूप दूरवर प्रवास केला आहे. या देशात १५० वर्षांच्या प्रशासकीय व्यवस्थेतून निर्माण झालेले मजबूत केन्द्र सरकार, जे माझ्या दृष्टीने अत्यंत कौतुकास्पद, आदरयुक्त व आश्रयस्थान होते, मी जर असे म्हटले की त्याला खिळखिळे करण्याची संमती काँग्रेस पक्षाने ज्या कारणांमुळे दिली ती काँग्रेसलाच माहित. या भूमिकेचा त्याग केल्यानंतर आणि आम्हाला मजबूत केन्द्र सरकार नको ही भूमिका घेतल्यानंतर घटक राज्ये आणि केन्द्र सरकार यांना जोडणारी मधली उपसंघराज्याची व्यवस्था स्वीकारल्यानंतर, परिच्छेद ३ मध्ये एकत्रिकरणाच्या योजनेचा उल्लेख का केला नाही हे मला जाणून घ्यायचे आहे. एकत्रिकरणाशी संबंधित कलमांचा अर्थ लावण्यात काँग्रेस पक्ष, मुस्लिम लीग व ब्रिटिश सरकार यांचे एकमत नाही हे मी नीट समजू शकतो. परंतु मी हा नेहमीच विचार केला–या बाबतीत माझी चूक होत आहे, हे जर कुणी मला निदर्शनास आणून दिले तर दुरुस्ती करण्यास मी तयार आहे–निदान काँग्रेस पक्षाने हे मान्य केले होते की, विविध गटांमध्ये विभागलेल्या राज्यांनी जर संघ किंवा उपसंघराज्याला मान्यता दिली तर या प्रस्तावाला काँग्रेस विरोध करणार नाही. काँग्रेसचे हेच मनोगत असावे असा मला विश्वास आहे. माझा प्रश्न हा आहे की ठराव मांडणाऱ्या व्यक्तीने त्याला आणि त्याच्या पक्षाला मान्य असलेल्या प्रांतांच्या एकत्वाचा किंवा प्रांतांच्या एकत्रिकरणाचा उल्लेख ठरावात का केला नाही ? या ठरावातून संघाच्या कल्पनेला पूर्णतः का वगळण्यात आले आहे ? मला याचे उत्तर दिसत नाही, कोणतेही असो ! म्हणून मला असे म्हणायचे आहे की, बिहारचे पंतप्रधान आणि डॉ. शामाप्रसाद मुखर्जी यांनी उपस्थित केलेले दोन प्रश्न–१६ मे च्या प्रस्तावाशी प्रस्तुत ठराव कसा विसंगत आहे किंवा या संविधान सभेत मुस्लिम लीगच्या प्रवेशाला हा ठराव कसा प्रतिबंध करतो–याचे उत्तर हा परिच्छेद ३ आहे. मुस्लिम लीग निश्चितपणे याचा फायदा घेईल आणि आपल्या सततच्या अनुपस्थितीचे समर्थन करील. महोदय, माझे मित्र डॉ. जयकर यांनी सदर ठरावावरील निर्णय पुढे ढकलण्यात यावा यासाठी काल केलेला युक्तीवाद, त्यांना न दुखवता, मी असे म्हणेन की काहीसा कायदेशीरपणाचाच होता. त्यांच्या युक्तिवादाचा आधार होता की तुम्हाला असे करण्याचा अधिकार आहे का ? संविधान सभेच्या कामकाजाशी संबंधित कॅबिनेट मिशनच्या विधानातील काही भाग त्यांनी वाचून दाखविला. त्यांच्या युक्तिवादातील मुख्य मुद्दा असा होता की, या ठरावावर निर्णय घेण्यासाठी या संविधान सभेने जी कार्यपद्धती अवलंबिली आहे ती कॅबिनेट मिशनच्या विधानातील

अंतर्भूत कार्यपद्धतीशी पूर्णतः विसंगत आहे. महोदय, मी हा मुद्दा थोड्या वेगळ्या पद्धतीने मांडू इच्छितो, तो असा की, हा ठराव सरळसरळ मंजूर करण्याचा किंवा न करण्याचा अधिकार तुम्हाला आहे किंवा नाही हे मी तुम्हाला विचारीत नाही. शक्य आहे की हा अधिकार तुम्हाला असेलही. मी विचारीत असलेला प्रश्न असा की असे करणे तुमच्यासाठी दूरदर्शीपणाचे होईल काय ? तुमच्यासाठी हे शहाणपणाचे होईल काय ? अधिकार ही एक गोष्ट आहे. शहाणपणा ही सर्वस्वी वेगळी गोष्ट आहे. या सभागृहाने याचा निर्णय घेताना विचार करावा की, हे शहाणपणाचे होईल काय ? हे मुत्सद्देगिरीचे ठरेल काय ? या घडीला असे करणे दूरदर्शीपणाचे ठरेल काय ? मी हे उत्तर देवू इच्छितो की हे दूरदर्शीपणाचे होणार नाही व शहाणपणाचे ठरणार नाही. काँग्रेस व मुस्लिम लीग यांच्यातील वाद मिटविण्यासाठी पुन्हा एकदा प्रयत्न करावा असे मी सुचवितो. हा प्रश्न एवढा जीवनमरणाचा व इतका महत्त्वाचा आहे की एका किंवा दुसऱ्या पक्षाच्या प्रतिष्ठेच्या आधारावर तो कधीही सुटणारा नाही याची मला खात्री आहे. राष्ट्राच्या भवितव्याचा विचार करताना लोकांची प्रतिष्ठा, नेत्यांची प्रतिष्ठा तसेच पक्षाची प्रतिष्ठा नगण्य असते. कोणत्याही गोष्टीपेक्षा राष्ट्राचे भवितव्य अधिक महत्त्वाचे असते. याचे कारण, या संविधान सभेने एकदिलाने काम करण्यासाठीच हे हितावह होईल असे नाही, तर मुस्लिम लीगने काही निर्णय घेण्यापूर्वी तिची प्रतिक्रिया सुद्धा संविधान सभेला कळू शकेल, एवढ्याचसाठी मी डॉ. जयकरांच्या उपसूचनेस पाठिंबा देत आहे. आपण जर उतावीळपणाने वागलो तर भविष्यात त्याचा काय परिणाम होईल याचा सुद्धा आपण विचार केला पाहिजे. या सभागृहावर ज्या काँग्रेस पक्षाचा ताबा आहे त्याच्या मनात याबाबत काय योजना आहेत हे मला माहीत नाही. याविषयी ते विचार करीत आहेत काय हे वर्तविण्याचा मला अधिकार नाही. याबाबत त्यांचेजवळ कोणते उपाय आहेत, त्यांचे कोणते डावपेच आहेत हे मला माहित नाही. परंतु निर्माण झालेल्या या प्रश्नाचा, एक त्रयस्थ म्हणून विचार करताना मला असे वाटते की, याबाबतचे भवितव्य ठरविण्याचे केवळ तीनच मार्ग आहेत. एका पक्षाने दुसऱ्या पक्षापुढे शरणागती पत्करणे हा एक मार्ग, शांततामय वाटाघाटीतून उपाय शोधून काढणे हा दुसरा मार्ग आणि तिसरा मार्ग म्हणजे उघड संघर्ष. महोदय, संविधान सभेच्या काही सदस्यांकडून मी असे ऐकत आहे की, ते संघर्ष करण्याच्या तयारीत आहेत. देशातील राजकीय पेचप्रसंग युद्धाच्या मार्गाने सोडविण्याचा विचार या देशातील कोणत्याही व्यक्तीने करावा या कल्पनेनेच मी भयभीत झालो आहे, हे मी कबूल करतो. देशातील किती लोक या कल्पनेच्या पाठिशी आहेत हे मला माहित नाही. माझ्या मते बऱ्याच लोकांचा याला पाठिंबा आहे. याचे कारण

कोणत्याही परिस्थितीत त्यांच्यातील बहुसंख्यांकांचा पाठिंबा, असे युद्ध ब्रिटिशांच्या विरुद्ध होईल असे त्यांना वाटते म्हणून आहे असे मला वाटते. परंतु महोदय, ज्या युद्धाचा याठिकाणी विचार होत आहे, जे लोकांच्या मनात आहे, ते युद्ध स्थानिक, मर्यादित आणि फक्त ब्रिटिशांपुरतेच सीमित ठेवता येईल काय ? ब्रिटिशांव्यतिरिक्त आणखी कुणाबरोबर लढावं लागणार नसेल तर अशाप्रकारच्या डावपेचांना माझा फारसा विरोध असण्याचे कारण नाही. पण हे युद्ध केवळ ब्रिटिशांच्या विरुद्ध होईल काय ? कोणताही संकोच न बाळगता या सभागृहाला मी शक्य तितक्या स्पष्ट शब्दात सांगू इच्छितो की, जर या देशात युद्ध झाले आणि या युद्धाचा संबंध आपल्यासमोर उभ्या ठाकलेल्या प्रश्नांशी असेल तर युद्ध ब्रिटिशांविरुद्धचे असणार नाही, ते युद्ध मुसलमानांच्या विरुद्ध असेल. त्यातही आणखी वाईट म्हणजे हे युद्ध ब्रिटिश आणि मुसलमान यांच्या संयुक्त आघाडी विरुद्ध असेल. होऊ घातलेले युद्ध ज्याप्रकारे होण्याची मला भीती आहे, त्यापेक्षा वेगळ्या प्रकारे होईल असे वाटत नाही. महोदय, अमेरिकेसोबत झालेल्या तडजोडप्रसंगी बर्कनी केलेल्या महत्त्वपूर्ण भाषणातील एक परिच्छेद या सभागृहाला मी वाचून दाखवू इच्छितो. सभागृहातील वातावरण निवळण्यासाठी त्याचा काही प्रमाणात उपयोग होऊ शकेल असा मला विश्वास वाटतो. आपणास माहित आहे की, अमेरिकेतील बंडखोर वसाहतींवर ताबा मिळविण्यासाठी ब्रिटिश लोक प्रयत्नशील होते. त्यांच्या इच्छेविरुद्ध त्यांना आपल्या अधिपत्त्याखाली आणण्याचा ब्रिटिशांचा प्रयत्न होता. वसाहतींना जिंकून त्यांच्यावर ताबा मिळविण्याच्या योजनेला विरोध करताना बर्क म्हणाले,

'' महोदय, मला हे सांगण्याची परवानगी द्या की, केवळ बळाचा वापर हा तात्पुरताच असतो. काही काळाकरिताच त्याच्यामुळे सत्ता गाजवता येईल. परंतु त्यामुळे पुन्हा त्यांना अधिपत्त्याखाली ठेवण्यासाठी बळाचा वापर करण्याच्या गरजेला कायमचे दूर करता येणार नाही. ज्या राष्ट्राला कायमचे अधिपत्त्याखाली ठेवावयाचे आहे त्यावर अशा पध्दतीने शासन करता येत नाही.

माझा दुसरा आक्षेप बळाच्या परिणामकारकतेच्या अनिश्चिततेबाबत आहे. बळाच्या वापरातून नेहमीच दहशत निर्माण होईल असे नाही आणि सुसज्ज सैन्य म्हणजे विजय नव्हे. जर तुम्हाला यश मिळाले नाही तर मग कोणताही मार्ग शिल्लक राहात नाही. वाटाघाटी अपयशी ठरल्यावर फक्त बळाचा वापर उरतो. परंतु बळाचा वापरही अपयशी ठरला तर वाटाघाटीच्या आशाच उरत नाहीत. दयेच्या मोबदल्यात कधी-कधी सत्ता व अधिकार मिळवता येतात, परंतु शक्तिपात व पराभूत झालेल्या हिंसेला भीक म्हणून सत्ता व अधिकार कधीही मागता येत नाही. . . . . . .

बळाच्या वापराला माझा पुढचा आक्षेप असा आहे की, प्रयत्नांची पराकाष्ठा करून तुम्ही जे मिळवाल त्याला तुम्ही हानी पोचवाल. तुम्ही जे मिळविता ते त्याच्या मूळ स्वरुपात मिळत नसते, ते अवमूल्यन झालेले, रसातळास गेलेले, उजाड झालेले आणि नाश पावलेल्या स्वरुपात असते. ''

हे बहुमोल शब्द आहेत. त्यांच्याकडे दुर्लक्ष घातक होईल.

हिंदू-मुस्लिम समस्या बळाचा वापर करून सोडविण्याची योजना जर कुणाच्या मनात असेल, दुसऱ्या शब्दात सांगायचे म्हणजे त्यासाठी युद्धाचा अवलंब करून, मुसलमानांना शरणागती पत्करायला लावून संविधानाच्या अधिपत्त्याखाली आणावयाचे असेल, त्यांच्या संमतीशिवाय तयार झालेल्या संविधानास शरण जाण्यासाठी त्यांना बाध्य करण्यात येत असेल तर या देशाला नेहमीसाठी याच प्रयत्नात गुंतून राहावे लागेल. एकदा मिळालेला विजय हा कायमस्वरुपी असणार नाही.

मी आतापर्यंत जेवढा वेळ घेतला त्यापेक्षा अधिक वेळ घेऊ इच्छित नाही आणि पुन्हा बर्कला उद्‌घृत करुन मी माझ्या भाषणाचा समारोप करीन. बर्कने असे कुठेतरी म्हटले आहे की, 'सत्ता देणे सोपे आहे, शहाणपण देणे कठीण आहे.' या सभेला प्राप्त झालेल्या सार्वभौम अधिकाराचा वापर शहाणपणाने करण्याची आपली तयारी आहे, हे आपण आपल्या आचरणाने सिद्ध करू या. देशातील सर्व घटकांना आपल्या रोबत नेण्याचा हाच एकमेव मार्ग आहे. एकतेकडे जाण्याचा याशिवाय दुसरा मार्ग नाही. याबाबत आपल्या मनात कुठलीही शंका असता कामा नये. ''[१]



---

[१] मूळ इंग्रजी भाषणाचा अनुवाद अतिथी संपादक मंडळाने केला आहे.

# २४३

# सत्य शोधण्याच्या कामात माणसाला पूर्ण स्वातंत्र्य मिळाले पाहिजे

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी, दिनांक ८ जुलै १९४५ रोजी ' पीपल्स एज्युकेशन सोसायटी'ची स्थापना केली. या संस्थेचे ध्येय व उद्देश केवळ शिक्षण देण्याचेच नाही, तर शिक्षण अशारीतीने द्यावयाचे की ज्यामुळे भारतामध्ये बौद्धिक, सामाजिक आणि नैतिक लोकशाही प्रचालन करता येईल. या संस्थेने दिनांक २० जून १९४६ रोजी मुंबई येथे सिद्धार्थ कला आणि विज्ञान महाविद्यालय सुरू केले.

' सिद्धार्थ कॉलेज ' च्या पहिल्या वर्षाच्या शेवटी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी भाषण केले.

ते आपल्या भाषणात म्हणाले,

तुमच्या प्रिन्सिपल साहेबांनी आताच तुम्हाला सांगितले की, आमचे ' सिद्धार्थ कॉलेज ' अद्यापि बाल्यावस्थेत असल्याने त्याला आपली परंपरा अद्यापि प्रस्थापित करावयाची आहे. त्यामुळे मला व्याख्यान देण्यासाठी तुम्ही दिलेल्या या संधीचा फायदा घेऊन ''आमच्या कॉलेजची परंपरा '' या विषयावरच मी आता प्रवचन करणार आहे. परंतु प्रत्यक्ष माझे प्रवचन सुरू होण्यापूर्वी मला आजकालच्या विद्यार्थ्यांना दोन शब्द सांगावयाचे आहेत. मी १९२३ पासून ते १९३७ पर्यंत मुंबईच्या ' सिडेनहॅम कॉलेजा ' त प्रोफेसर होतो व येथील ' लॉ कॉलेज ' चाही मी प्रिन्सिपाल होतो. १९३७ सालापासून माझा विद्यार्थ्यांशी असलेला संबंध तुटला आणि तेव्हापासून मी प्राध्यापकाचा पेशा बाजूस ठेवून राजकारणाचा पेशा पत्करला. राजकारणी माणसाला आपली एक प्रकारची विवक्षित स्वरूपाची मनोभूमिका बनवावी लागते व आपल्या विचारांना त्याला एक प्रकारचे विवक्षित स्वरूपाचे वळण लावावे लागते. राजकारणी पुरूषाला प्रचारकार्य करणे अत्यंत आवश्यक असते. पण त्याच्या उलट प्राध्यापकाला कधीच प्रचारकार्य करता येत नाही. प्रचारक हा कधीच शिक्षक किंवा प्राध्यापक होऊ शकत नाही. मी ज्याअर्थी आता राजकारणी प्रचारकाचा पेशा पूर्णपणे पत्करला आहे, त्याअर्थी एखाद्या विषयावर प्राध्यापक या नात्याने मी चांगले व्याख्यान देऊ शकेन काय याची मला शंका वाटते. पण मी उमेद बाळगतो की, आजचे माझे प्रवचन प्रचारकी पद्धतीचे होणार नाही.

---

नवयुग : १३ एप्रिल १९४७.

टीप.––नवयुगच्या प्रस्तुत अंकात भाषण नेमके कोणत्या तारखेला झाले याचा उल्लेख नाही, पण शैक्षणिक सत्राच्या शेवटी झाले असल्याचा उल्लेख आहे. त्यावरून प्रस्तुत भाषण फेब्रुवारी-मार्च १९४७ च्या दरम्यान झाले असावे.––संपादक.

माझी एक अशी सवय आहे. ती म्हणजे ज्या विषयावर व्याख्यान द्यायचे त्या विषयावर आधी पूर्णपणे साधकबाधक विचार करायचा ! पण आज मात्र मला हे कबूल करायला हवे की, ह्या व्याख्यानापूर्वी जेवढा वेळ व जेवढी मनाची स्वस्थता विचारासाठी मला हवी होती तेवढी मिळालेली नाही. पुष्कळ लोक माझ्या भेटीस येऊन विनाकारण माझा वेळ घेत असतात. असो, एक गोष्ट मी सुरुवातीलाच सांगतो की, आजकालच्या विद्यार्थ्यांच्यामुळे माझी पूर्णपणे निराशा झाली आहे ! माझा त्यांचा इतका निकट संबंध आला खरा पण त्यांना कशाचीही आस्था वाटत नाही. हे मला कळून चुकले आहे. आमच्या देशात पूर्वी असा एक काळ होऊन गेला की, त्यावेळी रानडे, गोखले, टिळक, सर फिरोजशाह मेहता व त्यांच्याचसारखे आणखी किती तरी आस्थेवाईक व अत्यंत कळकळीचे विद्यार्थी निर्माण झाले. त्यांच्यामध्ये आस्था होती, उमेद होती, शिस्त होती. आपल्या अंगावर एकप्रकारची जबाबदारी आहे याचीही त्यांना पूर्णपणे जाणीव होती. पण आजकालच्या विद्यार्थ्यांमध्ये ही जाणीव किंवा शिस्त मुळीच नाही. माझ्या हाताखालून किती तरी विद्यार्थी शिकून गेले असतील आजपर्यंत पण आता त्यांची माझी रस्त्यात गाठ पडली तर ते तोंड फिरवून मुकाट्याने पुढे चालू लागतात. ते मला आता ओळख देखील देत नाहीत. कित्येक कॉलेजात व्याख्यान देण्यासाठी मला निमंत्रणे येतात. पण त्यांचे निमंत्रण स्वीकारावयाचे नाही असा मी मनाशी निश्चय केला आहे. सिद्धार्थ कॉलेज हा त्याला एकच अपवाद आहे. सिद्धार्थ कॉलेजने आपली परंपरा कशी प्रस्थापित करावयाची हे मी आता तुम्हाला सांगतो.

आमच्या कॉलेजचे नाव सिद्धार्थ कॉलेज असे आहे. ते का ठेवले गेले ? मी जर एखाद्या कोट्याधीशाला शब्द टाकला असता तर मला काही लाख रुपये सहज मिळविता आले असते. तसे केल्याने मला या कॉलेजला त्या कोट्याधीशाचे नाव द्यावे लागले असते. पण मी तसा विचार केला नाही व या कॉलेजला ''सिद्धार्थ कॉलेज'' हेच नाव द्यायचे असा मी निश्चय केला. ते बुद्धाचे नाव आहे हे तुम्हाला माहीतच आहे. त्याचप्रमाणे हे आमचे सिद्धार्थ कॉलेज अद्यापि एक छोटेसे बालक आहे. त्याला अद्यापि नऊ महिने सुद्धा झाले नाहीत. ह्या कॉलेजने अद्यापि आपली परंपरा प्रस्थापित केली नसेल तर त्याचे मला मुळीच आश्चर्य वाटत नाही. पण तेवढ्यावरून आमच्या या छोट्या सिद्धार्थ कॉलेजपुढे काही ध्येयही नाही, अशी मात्र तुम्ही आपली समजूत करून घेऊ नका. ध्येयामुळेच ह्या कॉलेजला सिद्धार्थ कॉलेज असे नाव देण्यात आलेले आहे हे लक्षात ठेवा. बुद्धाच्या नावाने हे कॉलेज का प्रस्थापित करण्यात आले ?

बुद्धानीच हे ध्येय आपल्या समोर ब्रह्मजालसूत्रात सांगून ठेविले आहे. त्या सूत्रात अशी गोष्ट सांगितली आहे. हिंदुस्थानामध्ये औपनिषर्दिक तत्त्वज्ञानाचा प्रसार झालेला आहे अशी आपली समजूत आहे. या तत्त्ववेत्यांचा ब्रह्मावर विश्वास आहे. एकदा बरेचसे ब्राह्मण तत्त्वज्ञानी गौतमाला भेटायला आले. गौतमाच्या शिष्यांनी आपल्या गुरूला सांगितले, '' आपल्या भेटीची अपेक्षा करून ते ब्रह्मवादी तत्त्वज्ञानी आपल्या भेटीसाठी आलेले आहेत. यांनी एक नवीन तत्त्वज्ञान प्रस्थापित केलेले आहे आणि या तत्त्वज्ञानातील मुख्य दैवत म्हणजे ब्रह्म होय असे त्यांचे म्हणणे आहे. गुरूजी, आपणाला याविषयी काय सांगावयाचे आहे ते जाणण्याची आम्हा सार्‍यांची इच्छा आहे ''.

गौतमांनी यावर जे उत्तर दिले ते अत्यंत विचारार्ह आहे असे मला वाटते. गौतमांनी या ब्रह्मवाद्यांना प्रश्न केला, '' तुम्ही ब्रह्म पाहिले आहे काय ? '' ''नाही.'' असे उत्तर मिळाले. '' तुम्ही ब्रह्माबरोबर भाषण केले आहे काय ? '' ''नाही.'' '' तुम्ही ब्रह्माविषयी काही ऐकले तरी आहे का ? '' ''नाही.'' '' तुम्ही ब्रह्माची चव घेऊन पाहिली आहे का ? '' पुन्हा उत्तर आले ''नाही.'' '' मग तुमच्या पंचज्ञानेंद्रियांनी व पंचकर्मेंद्रियांनी ब्रह्म काय आहे हे अनुभविले नाही म्हणता तर मग ब्रह्म आहे, म्हणजे ब्रह्माचे अस्तित्व आहे हे तरी कशावरून तुम्ही म्हणता ? '' यावर त्या ब्रह्मवाद्यांना काही एक उत्तर देता आले नाही.

आता मी तुम्हाला गौतमाच्या आणखी एका व्याख्यानाविषयी सांगतो. त्याविषयी ' महापरिनिब्बानसूत्रा ' मध्ये विवेचन केलेले आढळून येते. गौतम हे आसन्नमरणावस्थेत होते. त्यावेळी त्यांचे मुख्य शिष्य हे कुशिनारा या ठिकाणी राहात होते. त्यावेळी त्यांचे मुख्य शिष्य आनंद यांनी गौतमाला विचारले, '' महाराज, आपल्याला एवढ्या लवकर निर्वाण घेता येणार नाही. अद्याप कितीतरी गोष्टी राहिलेल्या आहेत की, ज्याविषयी आपण आम्हाला काही एक निर्णय दिलेला नाही की त्याविषयी आपण आम्हाला काही मार्गदर्शन केलेले नाही ! '' बुद्धांनी यावर जे उत्तर दिले ते अत्यंत विचारणीय आहे. ते म्हणाले, '' मी तुम्हामध्ये आज चाळीस वर्षे राहिलो आहे म्हणजे आता माझ्या वयाला पूर्ण ऐंशी वर्षे झाली आहेत. मी तुमच्या संगतीत इतकी वर्षे राहिलो असल्याने अद्यापिही काही समर्पक उत्तरे माझ्याकडून तुम्हाला मिळाली नाहीत असे तुम्ही म्हणता त्याचे मला फार आश्चर्य वाटते. माझ्याकडून सारी उत्तरे मिळाली नसतील हे मला अशक्य वाटते. आमच्या आतापर्यंतच्या चाळीस वर्षाच्या संभाषणात सांगण्यासारखे अद्यापि काही बाकी राहिले असेल असे मला वाटत नाही.

या तुमच्या प्रश्नामुळे तुमच्या डोक्यात काही तरी घोटाळा झालेला आहे असे मला वाटू लागले आहे. मी आजपर्यंत तुम्हाला जे जे शिकविले त्याचा तुम्हाला पूर्णपणे बोध झाला नसावा असे मला वाटू लागले आहे. तुम्ही एक गोष्ट ध्यानात ठेवा व त्याप्रमाणे वागा म्हणजे तुमचे प्रश्न तुम्हाला स्वतःलाच आपोआप सोडवता येतील. म्हणजे केवळ एखादी गोष्ट मी तुम्हाला सांगतो म्हणूनच ती सत्य असली पाहिजे असे तुम्ही बिलकूल मानू नका. ती गोष्ट तुमच्या विचारशक्तीला, तुमच्या तर्कशक्तीला पटत असेल तरच तुम्ही ती खरी माना, नाही तर तुम्ही ती खुशाल टाकून द्या. हीच माझी शिकवण आहे.''

गौतम बुद्धांच्या या म्हणण्याचा काय अर्थ आहे बरे ? त्याचा अर्थ असा आहे की प्रत्येक मनुष्याला विचारस्वातंत्र्य आहे. पण त्या स्वातंत्र्याचा उपयोग त्याने सत्यशोधन करण्यात केला पाहिजे आणि सत्य म्हणजे तरी काय बरे ? सत्य हेच आहे की मनुष्याच्या पंचज्ञानेंद्रियांना व पंचकर्मेंद्रियांना ते सत्य पटले पाहिजे. म्हणजे ते सत्य पाहाता आले पाहिजे, ऐकता आले पाहिजे, त्याचा वास घेता आला पाहिजे, त्याचा स्वाद घेता आला पाहिजे व त्याच्या अस्तित्वाबद्दल आपल्याला साक्ष पटविता आली पाहिजे.

ही ध्येये गौतमांनी आपल्या शिष्यांपुढे ठेविली होती आणि हीच ध्येये आमचे सिद्धार्थ कॉलेज अनुसरणार आहे. (१) सत्य शोधून काढणे व (२) जो धर्म आपल्याला मानवता शिकविल त्याच धर्माचे अनुसरण करणे.

आधुनिक विचारांची प्रणाली कोणत्या दिशेने वाहते आहे ते मला माहीत आहे आणि मी तुम्हाला हेही सांगून ठेवतो की, कार्ल मार्क्सच्या तत्त्वज्ञानाशीही मी काही अपरिचित नाही. त्याचे धार्मिक विचारही मला अपरिचित नाहीत. तो म्हणतो की धर्म म्हणजे अफू आहे ! पण हे त्याचे म्हणणे मला पटण्यासारखे नाही. मला वाटते की सत्य शोधून काढणे म्हणजेच सत्यधर्म. सत्य आणि सत्ता या परस्परविरोधी गोष्टी आहेत. (Truth and authority are inconsistent), शास्त्र सुद्धा कोणत्याही गोष्टीची परिपूर्णतः (Finality) मान्य करीत नाही म्हणून सत्य सुद्धा कालपरत्वे अपूर्णच असल्याने त्याचा पुनः पुनः शोध करणेच प्राप्त असते. म्हणूनच जगामध्ये पुर्णतया पवित्र (Sacrosanct) असे काहीच नाही.

धर्म म्हणजे सत्य आहे हे आम्ही शिकले पाहिजे. नहि सत्यात्परो धर्मः ! हेच आपले ध्येय असायला पाहिजे. आपण केव्हाही इतरांना दुखविता कामा नये, हीच आमच्या धर्माची खरी शिकवण असली पाहिजे. सत्य शोधण्याच्या कामात माणसाला पूर्ण स्वातंत्र्य मिळाले पाहिजे हे आपल्या ह्या कॉलेजचे ध्येय आहे.

● ● ●

## २४४

# आर्थिक लूट थांबविण्यासाठी राष्ट्रीय समाजवादाचा अवलंब करणे हा एकच मार्ग

मुंबई, ता. १२ एप्रिल १९४७ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली श्री. विष्णुपंत वेलणकर यांचा निरनिराळया संस्थांकडून जाहीर सत्कार करण्यात आला. या प्रसंगाला उद्देशून वेलणकर म्हणाले, आज मुंबईत पाहिले तर महाराष्ट्रीय लोक म्हणजे कारकुनी करणारे तात्या व बोजा उठविणारे घाटीच आढळतात. ही दुःस्थिती घालविण्यासाठी महाराष्ट्राने पुढे आले पाहिजे. सर्व गोष्टी पैशाने होतात. महाराष्ट्राला मान नाही याचे कारण लाखालाखांचे चेक लिहिणारे लोक महाराष्ट्रात नाहीत. गांधींच्या चळवळी पैशावर आधारल्या आहेत. आपले लोक हजारोंनी फासावर गेले तरी सोन्याचा मुलामा नसला म्हणजे त्यांना तेज नाही. सर्व गोष्टी लक्ष्मीबाईच्या चमचमाटाने चालल्या आहेत. तेव्हा तरुणांनो ! लेखणीला व्यापाराची जोड द्या, पैसा मिळवा, शरीर कमवा म्हणजे राजकारणात यशस्वी व्हाल हाच माझा तुम्हाला संदेश आहे,

त्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर ह्यांनी समारोपाचे भाषण केले. ते म्हणाले,

विष्णुपंतांचा व माझा पूर्वपरिचय नाही, त्रोटक चरित्र नुकतेच वाचले त्यावरून मला दोन तीन गोष्टी बोधप्रद वाटल्या. पहिली महत्त्वाची गोष्ट, शिक्षणात विष्णुपंतांची गती नव्हती तरी ते निराश झाले नाहीत, तर त्यांनी दुसरे कार्यक्षेत्र निवडले, त्यात यश मिळविले ही होय. दुसरी गोष्ट म्हणजेच त्यांचे उद्योगधंद्यातील स्थान. पैसा नसेल तर व्यक्तीचे स्वातंत्र्य, समाजाचे स्वातंत्र्य व देशाचे स्वातंत्र्य ह्या शब्दांना काही अर्थ नाही. अमेरिका प्रबळ का ? पैशाच्या जोरावर आज इंग्लंड अमेरिकेच्या तालावर नाचताना दिसते आहे. का तर पैसा नाही. अमेरिकेजवळ तो मागावा लागतो.

श्री. विष्णुपंतांनी पैसा मिळविण्यास ब्रह्मचर्य लागते हे सांगितले ते मला पटत नाही. असे असते तर सारेच मारवाडी व गुजराती ब्रह्मचारी आहेत असे म्हणावे लागले असते ! अेका हाताने ओकासा खात त्यात दुसऱ्या हाताने ते पैसा मिळविताना आढळतात ! त्यांना ना विद्या ना कला. पण आपले व आपल्या सात पिढ्यांचे कोटकल्याण व्हावे म्हणून ते अर्थ संचय करतात.

महाराष्ट्रीय लोक लहान उद्योगधंदे करून पुढे येतील हे अशक्य आहे. मोठे उद्योगधंदे त्यांना काढता येणार नाहीत. परप्रांतीयांनी व परकीयांनी चालविलेली लूट थांबविण्यासाठी राष्ट्रीय समाजवादाचा अवलंब करणे हा एकच मार्ग राष्ट्रासमोर आहे.

---

गरुड : २० एप्रिल १९४७.

## २४५
# प्रोफेसरांनी अध्ययन, अध्यापन आणि संशोधनाच्या कामी स्वत:ला वाहून घ्यावे

मुंबई येथील सेंट् झेवियर्स कॉलेजातील पुराणवस्तुसंशोधन व पुराणेतिहास या विषयाचे विद्वान् प्रोफेसर रेव्हरंड फादर हेरास यांचे सिद्धार्थ कॉलेजात महें-जो-दारो येथील लेखवाचन या विषयावर एकदा उद्‌बोधक भाषण झाले. त्यादिवशी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी प्रोफेसरांचे संशोधनकार्य या विषयावरच विवेचन करण्यास सुरवात केली. ते म्हणाले,

फादर हेरास यांनी अत्यंत परिश्रम करून महें-जो-दारो येथे सापडलेल्या नाण्यांवरील व विटांवरील लेख कसे वाचावे याचा अपूर्व शोध केला याबद्दल कोणालाही आनंद, अभिमान व आश्चर्य वाटल्यावाचून राहाणार नाही, पण मला वाटते की, ज्याप्रमाणे फादर हेरासनी एकध्येय वृत्तीने या अत्यंत महत्त्वाच्या विषयाला स्वत:ला वाहून घेतले व अत्यंत प्रचंड असे संशोधन केले तसेच आमच्या हिंदी प्रोफेसरांनी का केले नाही असा एक माझ्या पुढे प्रश्न उभा राहातो, की आमच्या हिंदी प्रोफेसरांना तशी आवडच नाही ? किंवा त्यांच्याजवळ पुरेशी विद्वता नाही किंवा त्यांच्यापाशी पुरेशी साधनसामग्री नाही ? ह्या गोष्टींची कारणे काय असली पाहिजेत याचा आपण बारकाईने विचार करू.

मला वाटते की थोडेसे रुपये मिळवावेत व आपली सुखाने कालक्रमणा करावी यापलीकडे आमच्या प्रोफेसरांना आयुष्यात काही महत्त्वाकांक्षाच नाही. या महत्त्वाकांक्षेच्या अभावामुळे त्यांच्या हातून काहीही भरीव कार्य होत नसावे, ते मधून मधून काही पाठ्य-पुस्तकांवर टिपणे लिहितात. टिपणे लिहिण्याच्या पलिकडे काही महत्त्वाचे कार्य आहे याची माहिती त्यांना आहे की नाही कोण जाणे !

इतक्यात एक प्रोफेसर म्हणाले, ''आम्ही प्रोफेसर मंडळी हल्लीच्या युनिव्हर्सिटीमध्ये मिळणाऱ्या शिक्षणपद्धतीपासूनच निर्माण झालेलो आहोत. यासाठी आपल्याला प्रोफेसरांना दोष न देता तो युनिव्हर्सिटीच्या शिक्षणपद्धतीलाच द्यावा लागेल.''

तेव्हां डॉक्टर म्हणाले, आमच्या युनिव्हर्सिटीतील शिक्षणपद्धतीमुळे उत्तम उत्तम प्रोफेसर निर्माण होणे कठीण झाले आहे हे मला कबूल आहे. आमच्यापैकी बऱ्याचशा प्रोफेसरांना शेक्सपियरची नाटके किंवा काव्ये कॉलेजातून शिकवावी लागतात. हे विषय शिकविल्यापासून आमच्या तरुण पिढीचा किंवा हिंदुस्थानाचा काय फायदा होतो ? काहीही फायदा होत नाही

---

नवयुग : आंबेडकर विशेषांक–१३ एप्रिल १९४७.

भाषणाची तारीख दर्शविलेली नाही. त्यामुळे नवयुग अंकाच्या तारखेनुसार स्थान दिले आहे..––संपादक.

असे मला वाटते. मी सुद्धा कधी कधी झोप येत नसली म्हणजे शेक्सपियर किंवा काव्य वगैरे वाचतो. नाही, असे नाही. पण ते केवळ वेळ घालविण्यासाठी. त्या विषयावर मला विचार करता येत नाही.

आमच्या कॉलेजातून हल्लीच्या काळी अगदी साधारण प्रतीचे शिक्षण दिले जाते, अगदी बी. ए. च्या परीक्षेपर्यंत एखाद्या तात्या पंतोजीच्या पद्धतीने शिक्षण दिले जाते हे क़बूल. पण त्यातही आपल्याला सुधारणा करता येणार नाही असे नाही. आता मुंबई शहरातच आर्टस् व सायन्स हे विषय शिकविणारी सहा मोठाली कॉलेज आहेत. प्रत्येक कॉलेज हे हल्लीच्या पद्धतीनुसार युनिव्हर्सिटीशी निगडित असले तरी त्याचे अस्तित्त्व हे एखाद्या स्वतंत्र विद्यालयाप्रमाणे विभक्तच आहे ; नाही का ! त्यामुळे काय होते की, या साऱ्याही सहा कॉलेजातून, निरनिराळया प्रोफेसरांकडून तेच तेच विषय पुनः पुनः शिकविले जातात. यामुळे कामाची निरर्थक पुनरावृत्ती होते. पण समजा या पद्धतीऐवजी आपण असे केले की, एल्फिन्स्टन् कॉलेजात फक्त इतिहास व अर्थशास्त्र हेच विषय शिकविले जाण्याची सोय केली आणि ज्या प्रोफेसरांना हे विषय शिकवावयाचे असतील त्यांना एल्फिन्स्टन् कॉलेजमध्येच ते विषय शिकविण्यासाठी आपण धाडले तर एकाच विषयांचे सात आठ प्रोफेसर एकत्र येऊ शकतील आणि मग त्यांच्या कामाची आपणाला साहजिक विभागणी करावी लागेल. एक प्रोफेसर प्राचीन हिंदुस्थानावरच व्याख्याने देतील. दुसरे प्रोफेसर ' बुद्धांचा काळ व खिस्तयुगाचा आरंभ ' या विषयावर व्याख्याने देतील, तिसरे प्रोफेसर ' मुसलमानी युग ', यावर व्याख्याने देतील तर चवथे ' मराठ्यांचे युग ' व पाचवे प्रोफेसर ' इंग्रजांचे युग ' यावर व्याख्याने देतील. त्यामुळे विषयांची अतिशय उत्तम वाटणी होईल आणि एकेका प्रोफेसराला आपापल्या विषयाचे पूर्ण अध्ययन करण्यास खूपच अवसर मिळेल आणि त्यामुळे त्याला आपापल्या विषयावर संशोधनकार्य करण्याकरता तयारी करावयाला भरपूर सवड मिळेल. इतर सुधारणा या मुंबई विश्वविद्यालयात घडवून आणण्याची वाट पाहात बसण्याऐवजी आपण पहिल्याने ही अगदी साधी सुधारणा ताबडतोब घडवून आणू या ! दरेक कॉलेजने एक दोन विषयासाठीच आपल्याला वाहून घ्यावे. त्यामुळे त्या विषयाचा संपूर्ण ग्रंथसंग्रह त्या कॉलेजात होऊ शकेल व आवश्यक असलेले वस्तुसंग्रहालयही एकेच ठिकाणी ठेवण्याची व्यवस्था करण्यात येईल. सर्व कॉलेजातील प्रोफेसरांना त्यांच्या त्यांच्या विवक्षित ठरविलेल्या प्रमाणाने पगार न देता तो विश्वविद्यालयानेच सर्वांसाठी सारखाच ठेवावा. म्हणजे हल्लीप्रमाणे सरकारी कॉलेजात पगाराचे एक प्रमाण व खाजगी कॉलेजात दुसरे असा फरक होणार नाही. पगाराची तक्रार नाहिशी झाल्यावर व कामाची उत्तम वाटणी झाल्यावर शिक्षण देण्याचे कार्य व संशोधनकार्य झपाट्याने चालू होईल.

माझे तर असे मत आहे की, प्रोफेसरांनी अध्ययनाच्या आणि अध्यापनाच्या कामी स्वतःला इतके वाहून घ्यावे की आपल्या घराकडे बघायला त्यांना मुळी सवडच मिळता कामा नये. ते काम संपूर्णपणे त्यांच्या पत्नीवरच सोपविण्यात आले पाहिजे. प्रोफेसर लोकांनी भलती कामे अंगावर घेऊन आपल्या जबाबदाऱ्यांचे क्षेत्र उगाच वाढवीत जावे ही गोष्ट मला मान्य नाही. अध्यापन व अध्ययन यामध्ये संशोधनही आलेच. या तीन गोष्टींखेरीज प्रोफेसरांनी दुसरे कोणतेही काम करता कामा नये.



# २४६

# देशाला स्वातंत्र्य मिळविण्याच्या मार्गात अडचणी निर्माण करावयाच्या नाहीत, हे माझे धोरण

दिनांक १४ एप्रिल १९४७ रोजी माननीय डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या ५५ व्या वाढदिवसानिमित्त असंख्य अस्पृश्यांनी मोठ्या थाटात बाबासाहेबांचा सत्कार केला. त्याप्रसंगी डॉ. बाबासाहेब दलित वर्गाला उद्देशून म्हणाले,

अखिल भारतातील दलित जनतेला स्वतःच्या विकृत स्थितिची जाणीव झाल्यामुळे ती आता आपले जीवन परिपूर्णतेला नेण्याकरिता सुसंघटितरित्या ऊभी ठाकली असल्यामुळे तिच्या वाट्याला उज्वल भविष्यकाल खात्रीने येणार, ही परिस्थिती पाहून मला आनंदाचे भरते येते. मी त्या दिवशी व्हाईसरॉयला स्पष्ट शब्दात सांगितले, " तुम्ही मला पाचारण केले नसते तर मी तुम्हाला भेटण्यास आलोच नसतो. इंग्रजांच्या मागे धावत फिरण्याची माझी मुळीच इच्छा नाही." दलित जनतेच्या सुखसंवर्धनाची जबाबदारी एकेकाळी इंग्रजांनी स्वतःवर घेतली होती. इंग्रज आपल्या शब्दाला जागतील व आपल्यावरील जबाबदारी पार पाडण्याकरिता पुढे पाऊल टाकतील, असे मला त्यावेळी वाटले होते. पण तसे घडले नाही. इंग्रज हिंदुस्थान सोडून जात आहेत, याची मला मुळीच पर्वा नाही. परंतु आपणास ज्या सवलती घटनेत हव्या होत्या त्याची काहीच तरतूद करण्याचा प्रयत्न न करता ते जात आहेत. त्यांचे हे वागणे योग्य आहे की नाही याचा त्यांनीच निवाडा करावा. अस्पृश्यांच्या हितसंरक्षणाची काही तरी तरतूद करण्याची आवश्यकता मी त्यांना शंभर वेळा प्रतिपादन केली. इंग्रजांनी ते काम करण्याचे नाकारले तरी सहा कोटी अस्पृश्यांचा भाग्यकाल उज्वल आहे याची मला खात्री आहे असे मी म्हणालो. मजूर सरकारने जरी न्याय्य हक्क दिले नाही तरी ६ कोटी अस्पृश्य वर्ग कोणत्याही सहकार्याची वा शक्तीची पर्वा न करता जे पाहिजे आहे ते मिळविलच मिळविल, याची माझ्या मनात किंचितही शंका नाही.

जागृती व संघटना यांच्या अभावी आम्ही आतापर्यंत दुसऱ्याचे वर्चस्व सहन केले पण आता तो काळ राहिला नाही. आता आमच्यात नवशक्ती वास करीत आहे, हे हिंदुस्थानातील प्रत्येक इसम जाणून आहे व म्हणूनच कॉंग्रेस व लीग आमचे सहकार्य मिळविण्याचा आपापल्यापरीने प्रयत्न करीत आहेत. याचे एकच कारण म्हणजे आपली पोलादी संघटना. १९४८ जून मध्ये हिंदुस्थान सोडण्याच्या ब्रिटिशांच्या घोषणेमुळे आपला प्रश्न फारच बिकट होऊन बसला आहे, ही जाणीव होताच, तेव्हा काय होईल त्याची कल्पना करवत नाही. कदाचित् असेही होईल

---

अरुण : ९ जून १९४७.

की परिस्थितीमुळे इंग्रजांना येथे राहाणे भाग पडेल. इंग्रजांच्या घोषणेमुळे आपली घटनात्मक संरक्षणाची मागणी जरी मागे पडल्यासारखी दिसत असली तरी . . .

आपला प्रश्न धसाला लावून-झाडून सारे जरी नाही तरी बरेच राजकीय हक्क प्रस्थापित करण्यात आपणास यश आल्याशिवाय राहाणार नाही, ही खात्री बाळगा.

मूलभूत हक्क नियामक कमिटीत आपण बरेच यशस्वी झालो, हे सांगण्यात मला आनंद वाटतो. कमिटीला सादर केलेला मूलभूत हक्कांचा माझा मसुदा मंजूर करण्यात आला. फक्त राज्यकारभारात व नोकरीत वर्गवारी करण्याच्या प्रश्नावर थोडा वाद झाला. वर्गभेद टाळण्याखातर मी काही उपाय सुचविले, त्यातही मला यश येईल, असे वाटते. जर तसे झालेच तर कायदेमंडळात व कार्यकारी मंडळात आपणास भरपूर संरक्षण मिळेल. अल्पसंख्यांक पोटकमिटीच्या दोघा अस्पृश्यांनी सर्वसाधारण दलित जनतेला मान्य नसलेला मसुदा सादर केला आहे, हे सांगण्यास मला वाईट वाटते. एकाची संयुक्त मतदार संघाची मागणी आहे (शेम शेमच्या आरोळ्या). दुसऱ्याने तर त्याच्यावर ताण केली व संयुक्त मतदार संघात विभाजक मतदार पद्धतीची मागणी केली (पुन्हा शेम शेम). या बाबतीत पोटकमिटीत असलेल्या इतर अल्पसंख्य जमातीचे सहकार्य मला लाभेल, अशी आशा आहे. कमिटी या प्रश्नांचा निर्णय बहुमताने लावणार आहे की, त्याबाबतीत तडजोडीची बोलणी करणार आहे, याचा मला नक्की अंदाज नाही. परंतु त्यांनी बहुमताच्या जोरावर निकाल लावला तर मी माझा घटना समितीशी असलेला संबंध अजिबात तोडून टाकेन (टाळ्या). मग काय काय करावे ते आपण ठरवू. राजकीय प्रश्नात स्वकर्तव्याची दुहेरी जबाबदारी आपणास पार पाडावयाची आहे. एक स्वजनाविषयी व दुसरी देशाविषयी. हिंदुस्थान स्वतंत्र झाला पाहिजे, अशी आपली सर्वांची इच्छा आहे. त्रिमंत्री योजनेमध्ये जरी आमची उपेक्षा केली गेली तरी या देशाला स्वातंत्र्य मिळविण्याच्या मार्गात अडचणी निर्माण करायच्या नाहीत, ही जाणीव ठेवूनच मी वागत आहे. हिंदुस्थानला स्वातंत्र्य संपादन अधिक सुलभ तऱ्हेने करता आले पाहिजे, याच भावनेने व जाणिवेने मी आतापर्यंत बरीच भाषणे केली आहेत. पण त्याबरोबरच मी हेही निश्चयाने म्हणू शकतो की, राजकीय हक्कांची तरतूद करून ६ कोटी अस्पृश्य लोकांना जर संरक्षण देण्यात आले नाही व अस्पृश्यांना हव्या असलेल्या सवलतींसंबंधी तडजोड करण्याची काँग्रेसने जर तयारी दाखविली नाही तर घटना समितीतून बाहेर पडण्याच्या माझ्या भूमिकेबद्दल मला कोणी दोष देणार नाही, याची मला खात्री आहे. २९६ सभासदांच्या

घटना समितीत मी फक्त एकच एक आहे. कितीही थोर पुरुष असला व त्याच्यात असामान्य बुद्धी व वाद करण्याचे वा समर्थन करण्याचे अचाट सामर्थ्य कितीही असले तरी तो एकटा असल्यावर काय करणार, याची जाणीव तुम्ही आपल्या ध्यानात असू द्या. २११ सभासदांनी कोणत्याही गोष्टीची यथार्थता बौद्धिक वा वैचारिक कसोटी लावून ठरविण्याचे नाकारले व फक्त विरोधकाला हाणून पाडण्याचा कट रचला तर मी एकटा मनुष्य काय करणार ?

शेवटी सर्वांना सुबुद्धी आठवून या गोष्टीची जाणीव होईल व आपणास जे साध्य करावयाचे आहे, ते हस्तगत करता येईल, अशी मला आशा आहे. यासाठी आपणास फक्त संघटनेची गरज आहे. आपल्या अव्याहत प्रयत्नामुळे आपणास जे राजकीय हक्क प्राप्त होतील ते फक्त एका विवक्षित कालमर्यादे-पर्यंतच अबाधित राहातील हे तुम्ही लक्षात ठेवा. हिंदुस्थानात असा एक काळ येईल की ज्यावेळी केवळ आपलेच नव्हे तर सर्व समाजांचे राखीव हक्क नष्ट केले जातील. कारण त्यांची मुळीच आवश्यकता पडणार नाही. जेव्हा असे घडेल तेव्हा आपणास आपली संघटना, शक्ती व एकी यांच्या बळावर अवलंबून राहावे लागेल. म्हणून अभेद्य संघटना निर्माण करावयाचा दृढ निश्चय करा.

हालअपेष्टा सहन करण्यातच तुमची अभ्युन्नती आहे व म्हणूनं आपत्काळी धीर सोडू नका. त्यातूनच तुमच्यात दिव्य तेज निर्माण होईल, हा एकच एक संदेश मला द्यावासा वाटतो. काही खेड्यात आपल्या दलितांवर होत असलेल्या अन्यायामुळे व अत्याचारामुळे तुम्ही हिम्मत सोडता कांमा नये. पूर्ण संघटित होण्याच्या कृतनिश्चयाने प्रेरित होऊन नव्या दमाने, प्रफुल्लित अंतःकरणाने व नवोत्साहाने अव्याहत कार्य करण्याच्या मार्गाला आपण लागलो पाहिजे म्हणजे या देशातील कोणत्याही हालअपेष्टांची आपणास मुळीच मातब्बरी वाटणार नाही.



## २४७

# अस्पृश्य कामगारांनी कोणाच्याही थापेबाजीस बळी न पडता स्वत:चीच संघटना अधिक बळकट केली पाहिजे

मुंबईतील एच. एम. आय. डॉकयार्डमधील अस्पृश्य कामगारांमार्फत डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना १००१ रुपयांची थैली अर्पण करण्याचा समारंभ मे. एस. एस. मोकळ साहेब यांच्या अध्यक्षतेखाली मंगळवार ता. २७ मे १९४७ रोजी सायंकाळी ६ वाजता सिद्धार्थ कॉलेजमध्ये मोठ्या थाटाने साजरा झाला. सदर समारंभास भाई ए. व्ही चित्रे, मुंबई शहर शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे जनरल सेक्रेटरी श्रीयुत भातनकर वगैरे प्रमुख मंडळी हजर होती.

प्रथम अध्यक्षांनी अस्पृश्य कामगार संघाने अस्पृश्य कामगारांसाठी आजपर्यंत काय काय केले ते सविस्तर सांगितले. नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना थैली अर्पण केली.उत्तरादाखल भाषण करण्यास डॉ. बाबासाहेब आंबेडकर उभे राहिले, त्यावेळी टाळयांचा कडकडाट सुरु झाला. सभेस अडीच ते तीन हजार जनसमुदाय होता.

डॉ. आंबेडकर म्हणाले,

आज माझा भाषण करण्याचा मुळी इरादाच नाही. कारण तुम्ही केलेल्या ह्या कार्याबद्दल मला फारसे समाधान वाटत नाही, परंतु रिवाजाप्रमाणे मला तुमचे आभार मानले पाहिजेत. गोदीमध्ये तीन ते चार हजार अस्पृश्य कामगार असून, फक्त एक हजार रुपयेच समाजकार्यासाठी जमावेत ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. गोदीमधील कामगारांना मी मजूरमंत्री असतानाच पाचसहा वेळा पगारवाढ मिळालेली आहे. दारु पिणे, सिनेमा व नाटकासाठी पैशाची उधळपट्टी करणे वगैरे व्यसनासाठी तुम्हास हवा तेवढा पैसा मिळतो. पण समाजकार्यास हातभार लावतेसमयी तुम्ही आढेवेढे मात्र घेता. असो !

१९३४ साली मुसलमानांना शेकडा २५ टक्के हे प्रमाण सरकारी नोकऱ्यांमध्ये ठरवून दिले. त्यावेळी अस्पृश्यांना राखीव जागा नव्हत्या पण मी प्रांतिक आणि हिंदुस्थान सरकारशी मोठा झगडा ऊठवून अस्पृश्य वर्गास शेकडा आठपूर्णांक

---

गरुड : १५ जून १९४७.

ऐकतृतीयांश सरकारी नोकऱ्यांमध्ये प्रतिनिधीत्व मिळवून दिले. पुढे १९४२ ते १९४५ अखेरपर्यंत मी मजूरमंत्री पदावर असताना अस्पृश्य वर्गास भरमसाठ नोकऱ्या मिळवून दिल्या. मी माझ्या जागेचा राजीनामा सादर करण्याच्या आदल्या दिवशीच मला समजले की हिंदुस्थान सरकारने अस्पृश्य वर्गास लोकसंख्येच्या प्रमाणात शेकडा बारापूर्णांक दोनतृतीयांश सरकारी नोकऱ्यांमध्ये प्रमाण ठरवून दिले आहे. हे सर्व मी भांडून झगडूनच तुम्हास कायद्याने मिळवून दिले आहे. आता तुम्ही ते पदरात पाडून घ्यावयाचे आहे. त्यासाठी तुम्हास नेहमी संघटित राहिले पाहिजे. तुमची जर संघटना बळकट नसली तर सरकारने तुमच्यासाठी केलेल्या योजना कणवातच राहतील. म्हणून देशामधील परिस्थितीकडे लक्ष देऊन अस्पृश्य कामगारांनी अस्पृश्य कामगार हितवर्धक संघाची संघटना अधिक बळकट केली पाहिजे. कॉंग्रेस, कम्युनिस्ट वगैरे कोणाच्याही थापेबाजीस बळी न पडता गोदीमधील अस्पृश्य कामगार संघाच्या प्रमुख लोकांच्या मार्गदर्शनाखालीच तुमचा लढा यशस्वी करा !

डॉ. आंबेडकर साहेबांचे भाषण संपल्यानंतर श्रीयुत जी. के. भालेराव व श्री. एस. बी. शेडवईकर वगैरे पुढाऱ्यांची प्रसंगोचित भाषणे झाली व जयभीमच्या जयजयकारात सभा विसर्जन पावली.



## २४८

# मला कर्तृत्त्ववान माणसे पाहिजेत, त्यांच्या कर्तृत्त्वाबद्दल माझी खात्री झाली पाहिजे

मुंबई, तारीख २२ जून १९४७ रोजी सिद्धार्थ कॉलेजच्या पटांगणात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या अध्यक्षतेखाली श्री. दादासाहेब गायकवाड यांना थैली अर्पण करण्यात आली. त्यावेळी डॉ. बाबासाहेब म्हणाले,

मला दादासाहेब गायकवाड यांना देत असलेल्या रकमेचा आकडा पाहून संताप आला आहे. मला जर आधी हे कळतं , तर मी आलोच नसतो. ह्याच ठिकाणी जर पैसा गोळा केला तर एक हजार सहज मिळतील. ३५२ रुपये देणे ही शरमेची गोष्ट आहे. समाजाचे कृतज्ञतेस हे शोभणारे नाही. काय द्यायचे ते योग्यरितीने द्या. हा जबरदस्तीचा व्यवहार तुम्हाला कुणी सांगितला ? द्यायचे असेल तर त्या माणसाची किंमत राहिली पाहिजे.

कोकणी पंचायतीबद्दल बोलताना त्यांनी पंचायतीना चांगलेच खडसावले आणि इतःपर कुणी पंचायतीने निष्कारण पैसा ठेवला तर त्याला कोर्टात खेचिन. ही दुष्ट खोड मोडण्यासाठी असला जालीम उपाय योजलाच पाहिजे.

मला कर्तृत्ववान माणसे पाहिजेत. त्यांचे कर्तृत्ववानपणाबद्दल माझी खात्री झाली पाहिजे. ज्यांचे सेक्रेटरीवर आरोप असतील त्यांनी मला तशी खात्री पटवून द्यावी, मी त्यांना त्या जागा देईन. मला काम प्यारे आहे. इलेक्शन प्यारे नाही. मला कर्तृत्ववान लोक हवेत.

आपला कोकण प्रांत शिक्षणाचे बाबतीत मागासला आहे. तेव्हा त्याची तरतूद करण्याचा माझा विचार चालू आहे. मुंबई सरकारकडे जमिनीसाठी मागणी केली आहे. दापोलीमध्ये मुलांचे शिक्षणासाठी बोर्डींग उघडणार आहे, तरी त्यांना आपण सक्रिय मदत करावी. २० हजार रुपये या कामासाठी लागणार आहेत.



---

गरुड : २९ जून १९४७.

## २४९

# जगाच्या न्यायासनासमोर ब्रिटिशांना जाब द्यावा लागेल

मुंबई येथे ता. ७ जुलै १९४७ रोजी हिंदुस्थानातील थोर राजकीय पुढारी व घटना तज्ज्ञ डॉ. बाबासाहेब आंबेडकर नव्या स्वातंत्र्य बिलावर मत देताना म्हणाले,

दोन वसाहतीत हिंदुस्थानची विभागणी करण्यास एक वेळ काही सवलती मिळू शकतील परंतु या वसाहती व संस्थाने यांच्या दरम्यान दुफळीची बीजे पेरणे मात्र कदापि समर्थनीय ठरणार नाही. असल्या लुच्चेगिरीच्या कृत्याचा जाब ब्रिटिशांना जगाच्या न्यायालयापुढे द्यावा लागेल.

व्यावहारिकदृष्ट्या वऱ्हाड हा मध्यप्रांताचाच भाग आहे असे सुधारणा कमिश्नर श्री. मेनन यांनी परवा सांगितले. श्री. मेनन यांचा दृष्टीकोन बरोबर असेल तर वऱ्हाडच्या जनतेला खास समाधान वाटेल. परंतु हा दृष्टिकोन नव्या बिलातील दुसऱ्या कलमाच्या ७ पोट कलमाला धरून नाही. १५ ऑगस्ट रोजी संस्थानांवरील सार्वभौमत्त्व त्याचप्रमाणे सर्व करार-मदार लोप पावतील असा या कलमाचा आशय आहे. तेव्हा ज्या करारान्वये वऱ्हाड प्रांत ब्रिटिशांकडे आला तो करारही लोप पावणार आहे, म्हणजे पंधरा ऑगस्टनंतर वऱ्हाड प्रांत पुन्हा निजामकडे जाईल असा अर्थ निघतो. वऱ्हाडचा स्पष्ट उल्लेख या कलमात नाही. परंतु हे कलम सर्वसामान्य स्वरूपाचेच असल्यामुळे तसा उल्लेख आवश्यक नाही. जर ते कलम वऱ्हाडला लागू होऊ नये असा उद्देश असता तरच स्पष्ट उल्लेखाची जरूरी होती.

वऱ्हाडप्रमाणेच इतरत्र संस्थानांचे जे भाग करारान्वये ब्रिटिश मुलुखात समाविष्ट झाले आहेत त्यांनाही या कलमाखाली परत संस्थानात जावे लागेल. श्री. मेनन यांनी या कलमाचा घेतलेला अर्थ चुकीचा आहे.

निजामाशी नवा करार होईपर्यंत वऱ्हाडचे स्थान सध्या आहे तेच कायम राहील असे सरदार पटेल यांनी सांगितले तेही चुकीचे आहे. प्रदेशांच्या अदलाबदलासंबंधीचे करार व जकात, पोस्ट, वाहतूक वगैरे संबंधीचे करार यांच्यात बिलामध्ये फरक केलेला आहे. प्रदेशासंबंधीचे करार यापुढे लोप पावणार आहेत.

---

गरुड : १३ जुलै १९४७.

मी घेतलेला अर्थ खोटा असला तर मला खरोखर आनंदच होईल. परंतु कॉमन्समध्ये ॲटली या बिलावर चर्चा करतील तेव्हा त्यांना प्रत्यक्ष प्रश्न विचारुन या कलमासंबंधी स्पष्ट खुलासा करुन घेणे हिंदी व वऱ्हाडी जनतेच्या हिताचे आहे.

या कलमामुळे उद्‌भवणारे परिणाम लक्षात घेता मजूर सरकार देत आहे त्या प्रकारचे स्वातंत्र्य मिळाले म्हणून किती लोकांना आनंद होईल ते मी सांगू शकत नाही. हिंदुस्थानात आम्ही एकता निर्माण केली असा ब्रिटिशांचा नेहमी दावा असतो. कोणत्याही स्वरूपाचा विवाद न आणता त्यांनी ही एकता आमच्या हवाली केली असती तर ती त्यांना अधिक अभिमानास्पद अशी गोष्ट झाली असती.

दुर्दैवाने हिंदी जनतेच्या हाती अविभक्त हिंदुस्थान परत न देता हे ऐक्य नष्ट करण्याचे ब्रिटिश पार्लमेंटने ठरवले आहे व हिंदुस्थानात प्रथम ब्रिटिश आले तेव्हा ज्या छिन्नविछिन्न अवस्थेत हा देश होता त्याच अवस्थेत तो आपल्याला परत मिळत आहे. हिंदुस्थानची दोन वसाहत राज्यात विभागणी करण्याला काही कारणे असतील. संस्थाने व ही वसाहत राज्ये यांचेमध्ये दुही पेरण्याची लुच्चेगिरी ब्रिटिशांनी केली तर मात्र जगाच्या दरबारात त्यांना त्याचा जाब द्यावा लागेल.



## २५०

# समाजाचे विश्वासू नेते बना आणि समाजाला योग्य मार्गदर्शन करा

मुंबईच्या सिद्धार्थ कॉलेज वसतीगृहातील दलित वर्गीय विद्यार्थ्यांतर्फे ता. ४ ऑक्टोबर १९४७ रोजी सायंकाळी परमपूज्य नामदार डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना " अल्पोपहार " देण्यात आला. प्रथम प्रास्ताविक भाषण श्री. भास्करराव भोसले यांनी केले. त्यांचे भाषण थोडक्यात पण खणखणीत आणि रसभरीत झाले. यानंतर विद्यार्थी वर्गाला उद्देशून डॉ. आंबेडकरांनी उपदेशाचे चार शब्द सांगितले. ते म्हणाले,

आपल्या विद्यार्थ्यांवर फार मोठी जबाबदारी आहे. आपला राजकीय लढा संपलेला नाही. त्यासाठी शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या झेंड्याखाली सर्वांनी आपली संघटना वाढविली पाहिजे. आपले आचरण शुद्ध ठेऊन आपल्या इच्छित ध्येयासाठी जागरुक राहिले पाहिजे. आजच्या परिस्थितीत आपले मनोरथ जरी साध्य झाले नाही तरी ते आम्ही साध्य करूच करू अशा निश्चयाने वागले पाहिजे. तुमच्याकरिता मी या कॉलेजात अनेक प्रकारच्या सवलती ठेवलेल्या आहेत. त्याचा योग्य तो फायदा करून घ्या. आज आपला पक्ष राजकारणात जरी डावलला गेला असला तरी आम्ही भावी काळात आमचे ध्येय साध्य करून घेऊ आणि आपला पक्ष विजयी करू. इंग्लंडच्या मजूर पक्षाचे उदाहरण डोळ्यासमोर ठेवा. तो पक्ष फारच लहान होता आणि त्याला पदोपदी अपयशही आले होते. पण सतत चिकाटीमुळे तो पक्ष आज अधिकारारूढ झाला आहे. आपल्याला काँग्रेसमध्ये घुसलेल्या हरिजनांनी फसविले आहे. तेव्हा या सर्वांगीण परिस्थितीचा विचार करून प्राप्त परिस्थितीला टक्कर देण्यासाठी तुम्ही आपल्या समाजाचे विश्वासू नेते बना आणि समाजाला योग्य मार्गदर्शन करा असा तुम्हाला माझा आदेश आहे.

डॉ. बाबासाहेबांच्या या भाषणानंतर श्रीयुत बी. सी. कांबळे यांनी सर्वांचे आभार मानले व हा छोटासा समारंभ डॉ. आंबेडकरांचे जयघोषात संपला.



---

गरुड : १२ ऑक्टोबर १९४७.

## २५१

# अल्पसंख्यांकांची समजूत घातलीच पाहिजे त्यांच्यावर जुलमी अधिकार चालवता कामा नये

हिंदुस्थान सरकारचे कायदेमंत्री व भारतीय अस्पृश्यांचे थोर पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर नुकतेच मुंबईस येऊन गेले. त्या मुक्कामात त्यांचे सिद्धार्थ कॉलेजमध्ये दिनांक १० ऑक्टोबर १९४७ रोजी विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करणारे बहुमोल व उपदेशपर असे विद्वत्ताप्रचुर भाषण झाले. ते म्हणाले,

अध्यक्ष महाराज आणि सभागृह सदस्यहो,

ह्या महत्वाच्या प्रसंगाला साजेसे भाषण तयार करण्यासाठी मला जितका वेळ द्यावयास पाहिजे होता तितका देणे मला जवळ जवळ अशक्य झाले याबद्दल मला वाईट वाटते. कारण आजची ही वेळ आपल्या देशाच्या राजकीय जीवनातील महत्वाची आहे.

आतापर्यंत जरी आपल्यातील बहुसंख्य विद्यार्थीवर्ग राजकीय चळवळीत लक्ष घालीत असलेला दिसला तरी त्याला राजकारण म्हणजे काय, त्यासाठी कोणत्या जबाबदाऱ्या घ्याव्या लागतात आणि राजकीय घडामोडी यशस्वी करण्यासाठी कोणते मार्ग चोखाळावे लागतात याची निश्चित जाणीव नव्हती. विश्वविद्यालयीन जीवनाची आणि आयुष्यातील खऱ्याखुऱ्या प्रश्नांची व राजकारणाची मी वर म्हटल्याप्रमाणे फारकत होती आणि जेव्हा मी, आपण एका नवीन दालनात प्रवेश केला आहे असे म्हणता त्यावेळीच तुम्ही माझ्या सुचनेनुसार ह्या कॉलेजातील विद्यार्थ्यांचे पार्लमेंट स्थापन केले असून तुम्हाला त्याद्वारे पुढील गोष्टी करावयाच्या आहेत हा अर्थ माझ्या मनात अभिप्रेत असतो.

(१) तुमच्या मनाचा विकास करणे, तुमचे ध्येय विस्तृत करणे, तुमची विचार करण्याची पात्रता वाढवणे व कठीण प्रश्नांचा उलगडा करण्याची तुमची ताकद वाढवणे.

(२) अशी ही तुम्हाला लाभलेली तुमची शक्ती, पात्रता, तुमचे ध्येय, तुमची ताकद यांचा उपयोग ह्या देशातील अफाट जनतेला आज जे प्रश्न भेडसावीत आहेत त्यातून मार्ग काढण्यासाठी खर्च करणे.

---

गरुड : २६ ऑक्टोबर आणि २ नोव्हेंबर १९४७.

आणि ही गोष्ट काही सोपी नाही, निवांत अभ्यासिकेत किंवा रसायन अथवा पदार्थ विज्ञान शास्त्राच्या प्रयोग शाळेत बसून असले कठीण प्रश्न सुटत नसतात व हे काम तितकेसे सोपे नाही. त्यासाठी याहूनही काही अधिक केले पाहिजे. तुम्ही केवळ राज्यशास्त्र, इतिहास, व्यापार, आयात-निर्यात, चलन आणि जे जे विषय आपल्या लोकांच्या जीवनात महत्वाचे आहेत त्याचा अभ्यास करणार आहात असे नसून प्राप्त झालेल्या ज्ञानाच्या जोरावर तुम्ही स्वत:लाच नव्हे तर या देशाची राज्यधुरा जे राजकारणी पुरुष वाहतात त्यांनाही देशातील कठीण प्रश्न सोडविण्यात मदत करणार आहात आणि त्यांचे कुठे चुकते तेही दाखवून देणार आहात आणि एवढ्याचसाठी मी असे म्हणतो की निदान ह्या कॉलेजातील विद्यार्थी, आणि मी अशी आशा करतो की सबंध हिंदुस्थानमधील जरी नाहीत तरी ह्या इलाख्यातील इतर कॉलेजातील विद्यार्थीही आज एका नवीन दालनात प्रवेश करीत आहेत.

तुम्ही हे ' पार्लमेंट ' म्हणजे केवळ एक करमणूक आहे असे समजणार नाही असे मला वाटते. काही तरुणांच्या अति उत्साहाला योग्य स्थळ मिळणे अशक्य होते म्हणूनच या ठिकाणी येऊन तो अति उत्साह टिंगल करण्यात किंवा थट्टा मस्करीत आणि हसण्यात घालविण्याचे हे स्थळ आहे असे तुम्ही समजू नये. उलट, त्याच्या इतमामाला साजेशा गंभीरपणाने तुम्ही त्यात भाग घ्याल अशी मला आशा आहे आणि ह्या सभागृहातील सरकारचे सभासद व विरुद्ध पक्षातील नेते, केवळ दोन बाजूकडील नेतेच नव्हे तर सर्वच सभासद या सभागृहात येऊन उपस्थित प्रश्नांवर आपल्या मगदुराप्रमाणे अभ्यासपूर्ण चर्चा करतील अशीही मला आशा आहे.

यानंतर आणखी एक गोष्ट तुम्ही नीट ध्यानात धरली पाहिजे आणि ती म्हणजे ही की एकतंत्री राज्यकारभारात हुकूमशहाच्या किंवा राजाच्या इच्छेवर हुकूम कायदे होतात आणि अशा ठिकाणी वक्तृत्व अनावश्यक ठरते. पूर्ण सत्ताधारी राजाला किंवा हुकूमशहाला वक्तृत्वाकडे लक्ष देण्याचे काही कारण नसते कारण त्याची इच्छा हाच कायदा असतो. परंतु पार्लमेंटमध्ये कायदे केले जातात आणि जरी ते कायदे लोकांच्या इच्छेवरूनच केले जातात तरी ज्याच्या विरूध्द पक्षाला आपल्या बाजूला ओढून घेण्याची कला असते तोच आपल्या विरूध्द बाजूच्या मतावर विजय मिळवू शकतो. ह्या सभागृहात तुमच्या विरूध्द असणाऱ्यांना मारहाण करून तुम्ही बहुमत मिळवू शकत नाही. तसेच, अल्पसंख्य बाजू गुंड लोक आणून बहुसंख्यकांना दबवून ठेवू शकत नाही आणि बहुसंख्यही आपला जय व्हावा म्हणून अल्पसंख्यांकांना मारहाण करू शकत नाहीत. ह्या सभागृहात जर कोणाला आपले म्हणणे मान्य करवून घ्यावयाचे असेल

तर ते फक्त वक्तृत्वाच्या जोरावरच, त्याला आपल्या विरूध्द बाजूला वादविवाद करून, आवर्जून आपल्या बाजूला ओढून घ्यावे लागेल. मग तो वादविवाद काही वेळा सौम्य असेल किंवा काही वेळा तिखट असेल पण तो नेहमीच तर्कशुध्द व विचारशील असला पाहिजे. म्हणूनच पार्लमेंटसारख्या संस्थेमध्ये यश मिळवावयाची गुरूकिल्ली म्हणजे सभागृह आपल्या कह्यात आणण्याची पात्रता, यासाठीच तुम्ही महत्वपूर्ण विषयांवर चर्चा करण्यासाठी पूर्ण तयारीने सभागृहात यावयास पाहिजे आणि म्हणूनच तुम्ही सभेत भाषण करण्याची कला शिकण्यासाठी परिश्रम केले पाहिजेत. मी माझ्या अनुभवावरून सांगतो की, शिकावयाला कला काही मोठी कठीण नाही. मी स्वतः काही कोणी फार मोठा वक्ता नाही. आणि समजा एखाद्याने, हिंदी राजकारणात ज्यांनी भाग घेतला त्यांचा इतिहास लिहावयाचे मनावर घेतले तर तो माझा उल्लेख एक मोठे वक्ते अशा कसल्याही आधारावर करू शकणार नाही आणि त्या मानाचा भुकेलेलाही मी नाही. एक वेळ अशी होती की मी माझा लाजाळूपणा कसा घालवू शकेन अशी मला चिंता होती आणि त्यामुळे मी इतका निराश झालो होतो की सिडेनहॅम कॉलेज मधील प्रोफेसरची नोकरी विद्यार्थी माझी टिंगल करतील एवढ्याच कारणावरून मी सोडून देणार होतो, परंतु मी तुम्हाला आश्वासन देतो की ज्यांना माझ्यासारखी ही अशी भीती वाटत असेल त्यांनी ती भीती टाकून भाषेवर प्रभुत्व मिळवण्याच्या प्रयत्नाला लागावे ; त्यात अवघड असे काहीच नाही, असे माझे मत आहे. हे सभागृह जर व्यवस्थित चालावयाचे असेल तर एक मोठी महत्वाची अट मनात वागवली पाहिजे आणि ती अट म्हणजे अध्यक्षांनी दिलेल्या निर्णयाला पूर्ण मान देणे. अध्यक्षांच्या निर्णयावर तुम्ही कसलीही शंका काढता कामा नये. जर एखादा तसा कठीण प्रश्न उद्‌भवलाच व पूर्वी तशा प्रकारचा काही आधार नसल्यामुळे किंवा अध्यक्षांना त्यावर एकदम निर्णय देणे अशक्य झाले तर अध्यक्ष सभासदातील निरनिराळया पक्षांना त्यावर आपापली मते व्यक्त करावयास व त्याची छाननी करून अर्थ करावयास सांगतील. पण अशा प्रकारची एखाद्या निर्णयाची सर्व बाजूंनी छाननी झाल्यानंतर अध्यक्ष आपणाला योग्य असा जो निर्णय देतील तो तुम्ही वेदवाक्यासारखा मानला पाहिजे, मग तो निर्णय कितीही चुकीचा असो. १९२६ पासून १९४६ पर्यंतची काही थोडी वजा जाता सर्व वर्षे मी पार्लमेंटरी सभागृहातील कामकाजात घालविली आहेत. तेवढ्या अवधीत हर एक नमुन्यांचे अध्यक्ष मी पाहिले आहेत. त्यात चांगले होते, वाईट होते, निःपक्षपाती होते, पात्र होते, अपात्र होते, समतोल होते आणि इतरही गुणावगुण असलेले होते, परंतु आम्ही त्यांच्या निर्णयाचा मान नेहमीच राखीत असू. पार्लमेंटचे कामकाज कसे चालते यांचे ज्याला मी " प्रात्यक्षिक ज्ञान "

म्हणतो अशा प्रकारच्या शिक्षणाची संधी तुम्हाला मिळत नाही ही खेदाची गोष्ट आहे. जर तुम्हाला पॅरिस, लंडन किंवा अमेरिका या ठिकाणी जाण्याची संधी मिळून त्या त्या ठिकाणची अशी अधिवेशने पाहण्यास मिळतील तर तुम्हाला या तीन सभागृहातील मजेशीर मतभेद पहावयास मिळतील. पॅरिसचे सभागृह हा एक आश्चर्यकारक प्रकार आहे असे तुम्हास दिसून येईल. एकदा मी पॅरिसच्या कनिष्ठ सभागृहात लागोपाठ दोन किंवा तीन दिवस गेलो आणि तिथला तो प्रकार पाहिल्यानंतर क्रॉफर्ड मार्केट मध्ये आणि त्या भव्य सभागृहात मला काहीच फरक वाटला नाही. सभागृहात माणसे सारखी इकडून तिकडे जात होती व त्या ठिकाणी शिस्त अशी काहीच नव्हती. अध्यक्षाचे कुणी ऐकत नव्हते आणि बिचारे अध्यक्ष महाराज आपल्या मेजावरील असलेला एक मोठा लाकडाचा ओंडका व एक लाकडाचाच बनवलेला हातोडा, गृहात शांतता प्रस्थापित करण्यासाठी टेबलावर एकसारखा आपटत होते. पण तिकडे कुणाचेच लक्ष नव्हते. परंतु लंडनमधील कॉमन्सच्या सभागृहात मात्र अगदी याच्या उलटचा प्रकार तुम्हास दिसेल. त्या ठिकाणी असा एक नियम आहे की ज्यावेळी अध्यक्ष उभे असतात त्यावेळी कुणीही आपल्या जागी उभे असता कामा नये. प्रत्येक सदस्याने बसलेच पाहिजे. तसेच ज्यावेळी गृहात एक सदस्य उभा असतो तोपर्यंत दुसऱ्या कुणीही सदस्याने आपल्या जागी उभा असता कामा नये. त्याने बसूनच ते ऐकले पाहिजे. अध्यक्षांनी परवानगी दिल्यावाचून कॉमन्स सभागृहात कुणीही सदस्य भाषणाला सुरवात करू शकत नाही. तसेच अध्यक्षावर त्या ठिकाणी अमुकच एका व्यक्तीला भाषण करण्याची परवानगी दिली पाहिजे असे नाही. तिथे असा एक वाक्प्रचार आहे की, ''आपल्या दृष्टीक्षेपात येईल अशाच सदस्याला अध्यक्ष भाषण करण्याची परवानगी देतील.'' पण त्या वाक्प्रचारात एक प्रघात आहे आणि तो म्हणजे अध्यक्ष एखाद्या सदस्याकडे पहातील व त्याला भाषण करण्याची परवानगी देण्याऐवजी फक्त डोळे मिचकावतील अर्थातच याचे कारणही उघड आहे. अनेक वर्षाच्या सहवासामुळे अध्यक्षांना प्रत्येक सदस्याची माहिती असून त्यांना त्याचे बरेवाईट गुण अवगत असतात, फक्त अध्यक्षांना त्यांच्या कौटुंबिक इतिहासाचीच काय ती माहिती नसते. यासाठी अध्यक्ष कंटाळवाणे चऱ्हाट वळणाऱ्यांना किंवा ज्यांच्या भाषणात जीव नसतो अशा सदस्यांना भाषणाची सहसा परवानगी देत नाहीत.

जिला पार्लमेंटरी लोकशाही म्हणता येईल अशा स्वरुपाची लोकशाही आज आपल्याकडे आहे. तेव्हा त्या शब्दाचा काय अर्थ आहे ते आपण पाहू. एकतंत्री राज्यव्यवस्था आणि ही लोकशाही यामधील फरक एवढाच की एकतंत्री राज्यव्यवस्थेत कायदे करणारी सभा किंवा पार्लमेंट नसते. जनतेच्या इच्छेला

तिथे मुळीच मान नसतो. राजा किंवा हुकूमशहा हा तिथे एकमेव असतो. जनतेच्या इच्छेचे प्रतिनिधीत्व तो आपणाकडे घेतो व तो आपल्या मनाप्रमाणे राज्यकारभार हाकतो. आज कामगार हुकूमशाहीचाही एक प्रकार आपल्याकडे आहे आणि आमच्या मते ह्या दोन्हीतही विशेष असा काहीच फरक नाही. या ठिकाणी हुकूमशाहीनी कामगारांचे प्रतिनिधित्व आपणाकडे घेतले आहे एवढेच ; पण एकतंत्री हुकूमशाही किंवा राजेशाहीप्रमाणे याही व्यवस्थेत जनतेच्या इच्छेला राज्यकारभारात काहीच स्थान नाही आणि पार्लमेंटरी लोकशाही ही ह्या दोन्ही व्यवस्थेमधील सुवर्णमध्य आहे. ही एक चोखंदळ संस्था आहे. यासाठी या संस्थेत काहीच बिघाड होऊ नये म्हणून तिचे विशेष मनात नीट वागवले पाहिजे. अनेक राजनैतिक तत्त्ववेत्यांनी हिची व्याख्या निरनिराळया प्रकारे केली आहे. त्यापैकी अशी एक व्याख्या आहे की कायद्याचे राज्य म्हणजे पार्लमेंटरी लोकशाही. एकवेळ अशी होती की तिचा हा विशेषपणा मनात ठसण्याजोगा व सूचक असाच होता. जेव्हा युरोप मधून राजेशाहीचे उच्चाटन झाले आणि त्या जागीही लोकशाही कारभार आला त्यावेळी हे सत्तांतर पाहणाऱ्या पिढीला लोकशाहीचा विशेषपणा मनात ठसण्याजोगा व सूचक होता. कारण त्यापुर्वी राज्यकारभार हा व्यक्तीगत होता. एक तर, राजा आपल्या इच्छेप्रमाणे करी व दुसरे तो स्वतः केलेल्या कायद्याच्या कक्षेत येत नव्हता. त्या कायद्याहून तो श्रेष्ठ असे, कारण कायदा हा जनतेसाठी होता त्याच्यासाठी नव्हता. तेव्हा जे कायद्याचे राज्य आम्ही उपभोगतो ते एक सर्वसामान्य तत्त्व आहे आणि आता त्यांच्याशी आपला इतका परिचय झाला आहे की, त्यातील ह्या विशेषांची दखल आपण कधी घेतली नाही. तरीही त्यातील, जे कायदे करतात तेही कायद्याच्या कक्षेत येतात, हा विशेष, नित्य आणि कायम आहे.

कुणीतरी ह्या लोकशाहीची अशी व्याख्या केली आहे की, बहुसंख्यांकांचे राज्य म्हणजे लोकशाही. आता हे खरे आहे की, आपल्या कायदे मंडळातून बहुसंख्यांकांच्या वतीने सर्व प्रश्नांचा निकाल करण्यात येतो. परंतु ह्या तत्त्वाकडे तुम्ही सावधानपणेच पाहावे असे मला तुम्हास सांगावेसे वाटते. कारण हे तत्त्व मोठे घातुक तत्त्व आहे. कारण बहुसंख्यांची सत्ता हे तत्त्व जे मान्य केले गेले आहे ते केवळ सोय म्हणूनच. ह्या तत्त्वाचा फार मोठा उदो उदो करू नका. कारण त्यामुळे तुम्ही अनेक कटकटी निर्माण कराल. काही विवक्षित दृष्टिकोनातून पाहिले तर बहुसंख्यांकांची सत्ता ही अन्याय्य सत्ता आहे, आणि ह्याचा मी पाठपुरावाही करू शकेल. आता मी उदाहरण देतो. हल्ली राज्यघटना तयार करण्याच्या कार्यात आम्ही आहोत आणि त्या ठिकाणी अध्यक्ष म्हणून आहे. आम्हाला अल्पसंख्यांकांच्या मूलभूत हक्कांना संरक्षण

द्यावयाचे आहे. याचा अर्थ असा की बहुसंख्यांकांना काही गोष्टीत ढवळा ढवळ करण्याचा मुळीच अधिकार नाही. मुलभूत हक्कांचा अर्थ हाच होय. बहुसंख्यांकांच्या अधिकाराला अशाप्रकारे हे मूलभूत हक्क पायबंद घालतात. खरी गोष्ट अशी आहे की, बहुसंख्यांकांची सत्ता हे तत्त्व ही एक अनपेक्षित अशी घडलेली गोष्ट आहे.

कॉमन्स सभागृहाच्या कामकाजाचा इतिहास जर तुम्ही अभ्यासाल तर ही गोष्ट तुमच्या ध्यानी येईल की, १४१५ मध्ये कॉमन्स सभागृहात एक सूचना मांडण्यात आली. त्यावर अनुकूल आणि प्रतिकूल बाजूचे सदस्य वेगवेगळया खोलीत गेले. अध्यक्षांनी कारकुनाला यावर होय आणि नाही या खोलीतील सदस्यांची संख्या विचारली. कारकुनाने उत्तर दिले त्याप्रमाणे होय मध्ये ५० व नाही मध्ये २० सदस्य होते, अध्यक्षांनी यावर होय मधील सदस्यांना जावून सांगितले की त्यांनी नाही खोलीमधील सदस्यांची समजूत घालून त्यांना सभागृहात आणावे व तसे त्यांना आणल्यानंतरच अध्यक्षांनी सूचनेचा निकाल जाहीर केला. याचा एक विशेष अर्थ असा की अल्पसंख्यांकांनी आपली निदान मूक संमती तरी दर्शविल्याशिवाय बहुसंख्यांकांच्या वतीने अध्यक्ष सूचनेचा निकाल जाहीर करू शकत नव्हता. प्रारंभी कामकाजाची अशी पध्दती होती. पुढे काही कारणामुळे अशाप्रकारे बहुसंख्यांकांनी अल्पसंख्यांकांचा निकाल जाहीर करण्यापूर्वी अशी समजूत घातलीच पाहिजे ही प्रथा नष्ट झाली. तेव्हा पार्लमेंटरी लोकशाहीने सोयीसाठी बहुसंख्यांकांची सत्ता म्हणून ह्या तत्त्वाला जरी मान्यता दिली असली तरी त्याचा असा अर्थ करू नका की त्या तत्त्वाच्या जोरावर तुम्ही अल्पसंख्यांकांवर अन्याय करू शकाल किंवा त्यांची नाकेबंदीही करू शकाल. त्यामुळे तुम्ही ह्या सभागृहात अनेक कटकटी निर्माण कराल. यासाठी अल्पसंख्यांकांची समजूत ही तुम्ही घातलीच पाहिजे. त्यांच्यावर जुलमी अधिकार तुम्ही चालवता कामा नये.

वॉल्टर बॅगेहाट नावाचा एक राजनैतिक तत्त्ववेत्ता होऊन गेला. त्यांनी पार्लमेंटरी लोकशाहीची, वादविवाद करणारे राज्ययंत्र, अशी व्याख्या केली आहे आणि त्यात फार मोठे सत्त्य आहे असे मला वाटते. कारण लोकशाही राज्यात सर्व काही उघड असते. पडद्याआड काही केले जात नाही. तसेच, एका व्यक्तीची इच्छा म्हणूनही काही केले जात नाही. प्रत्येक विषय सभागृहात ठराव, कायदा किंवा सुचनेच्या स्वरूपात आणला जातो आणि त्यावर गृहात वादविवाद केला जातो.

आपण, मागे मोठी परंपरा असलेली '' क्लोजर '' ची पार्लमेंटरी पध्दत या ठिकाणी अंमलात आणू शकलो नाही ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे. यावेळी व्याख्यात्यांनी पार्लमेंटने आपल्या पक्षातील काही सभासदांना ४८-३६ व २४ तास

बोलावयास लावून ग्लॅडस्टन व लार्डनॉर्थब्रुक यांची कशी भंबेरी उडवली हा वृतांत निवेदन केला आणि याचमुळे " क्लोजर " ची पद्धत कशी अस्तित्वात आली हे सांगितले.

आता जरी सगळयाच कायदेमंडळातून वादविवाद संपवून प्रश्नोत्तरासाठी वेळ राखण्याचा नियम असला तरी वादविवादालाही पुरेशी वेळ ही मिळतेच. एक गोष्ट लक्षात ठेवा की पार्लमेंटमध्ये जी चर्चा चालते तिचा उपयोग केवळ निर्णय घेता यावा एवढ्या पुरताच मर्यादित नसून त्या विषयाला त्याहूनही अधिक महत्व आहे. जर कॉमन्स वादविवाद उच्च पातळीवर झाला असेल आणि जर असा झालेला वादविवाद व्यवस्थितपणे वर्तमानपत्रातून प्रसिध्द केला जाईल तर जनतेला त्यायोगे राजकीय शिक्षण मिळण्याचे एक अमोघ साधन निर्माण होईल यात काही संशय नाही आणि हाच त्याचा महत्वाचा विशेष आहे.

पार्लमेंटरी राज्यपद्धतीला स्वसत्ताक राज्यपद्धत असे मानले जाते व ते खरेही आहे. परंतु अधिक महत्त्वाची सांगावयाची गोष्ट ही की देशाला विशेष गरज असते ते सुराज्य तुम्हास कसं निर्माण करता येईल याची ? हा एक मोठा महत्त्वाचा प्रश्न आहे आणि यावर आग्रहपूर्ण एकांगीपणाने काही प्रतिपादावयाचे नाही. परंतु मी तुम्हापुढे एक दोन मते विचारार्थ म्हणून मांडणार आहे. माझ्या मते सुराज्य म्हणजे काय ? आग्रहपूर्ण एकांगीपणाचे अमुकच एक मत मांडता कामा नये. भांडवलवाल्याना भांडवलशाही राज्यपद्धती व खुल्या व्यापाऱ्याचे तत्त्व यात सुराज्य आढळेल. समाज सत्तावाद्यांना समाजवादी पद्धत सुराज्याची वाटेल आणि इतर अनेक मतांच्या अनेक माणसांना त्याच्या मनाची राज्यपद्धती सुराज्याची निदर्शक वाटेल. तेव्हा वस्तुस्थिती अशी आहे की सुराज्य म्हणजे काय यावर नाना तऱ्हेची मते असू शकतील. विविध वर्ण, वंशाचा आमचा समाज व त्यामुळे निर्माण होणारे अनेक बिकट गुंतागुंतीचे प्रश्न यांची उकल करायला एकमेव असा उपाय मिळणे कठीणच. यासाठी निरनिराळे उपाय योजिले पाहिजेत आणि ही गोष्ट तुम्ही नीट ध्यानात घेतली पाहिजे असे मला वाटते. आपल्या देशाची दुःस्थितीतून मुक्तता करण्यासाठी प्रखर अशा एकाच उपायाचा आपण स्वीकार करता कामा नये, असे उपाय अनेकविध असतील आणि त्यांचा उपयोग करण्यासाठी समाजाने तशी दक्षता घेतली पाहिजे. समाजाचा पाया भक्कम असावा आणि त्याचे ध्येय विशाल असावे. समाजाची नजर संकुचित नसावी व त्याने कुठल्याही एका तत्त्वाला श्रेष्ठ मानू नये. सामाजिक उन्नतीसाठी अनेक उपाय असतील आणि निरनिराळे लोक निरनिराळया उपायावर विश्वास ठेवीत असतील तर देशामध्ये त्या त्या प्रमाणे एकाहून अधिक पक्ष नांदणारच. माझ्या मते राजकारणात प्रामाणिकपणा असावा. मला माहीत

आहे की अनेकांच्या मते राजकारणी पुरुष अप्रामाणिक असतात. याचा अर्थ काय ? याचा अर्थ असा की ज्यांना अमुक एक तत्त्वज्ञान हाच समाज उद्धाराचा उपाय असे वाटते त्यानी, ज्यांना तसे वाटत नाही त्यांच्यापासून आपण निराळे राहावे. तडजोड करून निर्माण झालेले राज्ययंत्र हे कुचकामाचे असते आणि ही गोष्ट मी तुम्हास असंदिग्धरित्या सांगतो. कारण, राज्य म्हणजे निर्णय आणि जोपर्यंत समाजसत्तावादी ज्याला एकामनाचे व निश्चयाचे म्हणतात असे लोक की, ज्यांचे जीवन तत्त्वज्ञान एकच आहे, ह्या राज्य शकटावर येत नाहीत तोपर्यंत अशा राज्यव्यवस्थेत तुम्हाला, तुमच्या मताला योग्य असा निर्णय घेता येणार नाही व तुम्हाला कामाचा झटपट उरकही करता येणार नाही. भांडवलदार व समाजसत्तावादी यांच्या संमिश्र मंत्रिमंडळाला एखाद्या विषयावर निर्णय घ्यावयाचा असेल तर त्यांना आपल्यातील मतभेद आधी मिटवून घ्यावे लागतील आणि दुसऱ्या पक्षाची अनुमती घेण्यासाठी ह्यांना आपल्या तत्त्वाचा बळी द्यावा लागेल आणि अशारीतीने घेतलेला निर्णय, धड घोडा नव्हे धड गाढवही नव्हे अशाच नमुन्याचा असणार हे उघड आहे. म्हणून या कॉलेजमध्ये पार्लमेंटरी लोकशाहीची सुरवात करण्यापूर्वी आपणाला एकमेकाविषयीचे निश्चित ज्ञान, योग्य कल्पना व विचार आले असले पाहिजे.

आता ह्या लढाईत कोण विजयी होणार हे पाहाण्यासाठी समरांगणावर हजर राहाण्याची आम्ही कोशीस करू. कॉंग्रेस व समाजवादी या दोघाही विषयी आम्हास सारखीच आत्मीयता वाटते; कारण यात आपल्या देशाच्या अडचणीच्या प्रसंगात तुम्ही मदत करण्यास योग्य व्हावे एवढाच आमचा उद्देश आहे.



२५२

# राजकारणाच्या दोऱ्या विद्येशिवाय हाती येणार नाहीत

बुधवार ता. १४ जानेवारी १९४८ रोजी मुंबईतील 'धोबी तलाव नाईट स्कूल' मधील विद्यार्थ्यांचा वक्तृत्त्व चढाओढीचा समारंभ सिद्धार्थ कॉलेजमध्ये सायंकाळी ८ वाजता साजरा झाला. या समारंभाची दोन वैशिष्ट्ये स्पष्टपणे दिसून येत होती. पहिले वैशिष्ट्य हे की, 'अे' 'बी' सी' या अक्षरांना कसे फाटे फोडावेत हे शिकत असलेल्या विद्यार्थ्यांच्या या छोट्या समारंभास डॉ. बाबासाहेब आंबेडकर मोठ्या आत्मियतेने हजर राहिले होते. दुसरे वैशिष्ट्य विद्यार्थ्यांच्या मनोनिग्रहाचे होते. ज्या तरुणांना, दारिद्र्यामुळे बालवयातच शाळेच्या पायऱ्या हिरमुसल्या चेहऱ्यानी उतराव्या लागल्या व पोटाची गुजराण करण्यासाठी गिरणी कारखान्याच्या स्वाधीन व्हावे लागले, अशा ३५० तरुणांनी फिरुन जोम धरुन नोकरी करीत करीत या नाईट स्कूलमध्ये अध्ययन चालविलेले आहे, अशा विद्यार्थ्यांचा हा समारंभ होता. अध्यक्षस्थानी पीपल्स एज्युकेशन सोसायटीचे वाईस चेअरमन श्री. डी. जी. जाधव यांची योजना केली होती. श्री. हुदलीकर, श्री. केळशीकर व श्री. भास्करराव भोसले ह्या तिघांची निवाडा-कमिटी नेमली होती. वक्तृत्त्वाच्या चढाओढीसाठी तीन विषय ठेवण्यात आले होते. (१) अस्पृश्य तरुणांचे कर्तव्य (२) मला हिंदू धर्माबद्दल काय वाटते ? (३) सिनेमा पहाणे चांगले की वाईट ? नऊ विद्यार्थ्यांनी या चढाओढीत भाग घेतला होता. (१) कु. हाटे, (२) कुमार कांबळे, (३) कु. जाधव या अनुक्रमाने चढाओढीचा निकाल लागला.

नाईट स्कूलचे संचालक, वादविवाद मंडळाचे सेक्रेटरी व समारंभाचे अध्यक्ष यांनी समयोचित भाषणे केल्यानंतर, टाळ्यांच्या कडकडाटात डॉ. बाबासाहेबांनी आपले भाषण सुरू केले. ते म्हणाले,

प्रिय मित्रहो,

आज जो वक्तृत्त्व चढाओढीचा समारंभ झाला त्यात ज्यांनी ज्यांनी भाग घेतला त्यांच्या व माझ्या विचारात बराच फरक होईल असे मला वाटते. ज्यांनी या चढाओढीमध्ये भाग घेतला त्यांचे कार्य मोठ्या उत्सुकतेचे झाले असे त्यांचे त्यांना देखील वाटत असेल असं म्हणवत नाही. तथापि आपले वक्तृत्त्व फार

---

जनता : १७ जानेवारी १९४८.

उत्कृष्ट झाले नाही म्हणून निरुत्साही होण्याचे फारसे कारण नाही. हा तुमचा पहिलाच प्रसंग असेल. ज्यांनी कंबर कसून एवढ्या श्रोतृसमुदायापुढे बोलण्याचे धैर्य दाखविले ते कौतुकास पात्र आहेत.

वक्तृत्त्व ही एक कला आहे. ती दीर्घोद्योगाने कमवावी लागते. काही जणांना ती उपजतही येत असेल. महाराष्ट्रात नामदार गोखले पट्टीचे वक्ते होते, याबद्दल कोणीही शंका घेणार नाही. कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजात नामदार गोखले प्रोफेसर म्हणून काम करीत होते. त्यावेळी कोणातरी पाहुण्याचे व्याख्यान त्या कॉलेजमध्ये झाले. त्या पाहुण्याचे आभार मानण्याचे काम नामदार गोखल्यांकडे सोपविले होते. नामदार गोखल्यांनी आपले भाषण लिहून काढले होते. एवढेच नव्हे तर पाठही केले होते. पण त्यावेळी कोणीतरी खूण केली आणि नामदार गोखले गोंधळून गेले; नि १-२ मिनिटातच सभागृहाबाहेर पडले.

या गोष्टीमुळे त्यांना अद्दल घडून आली. मेकॉले नावाच्या ग्रंथकर्त्याची पुस्तके नामदार गोखलेंनी मुखोद्गत करण्याचा सपाटा चालविला. सर्वच्या सर्व मेकॉले त्यांना अगदी तोंडपाठ होता.

मुंबईचे सर मेथा प्रसिद्ध वक्ते म्हणून गणले जातात. ते आपली भाषणे लिहून काढून तोंडपाठ करीत असत. त्यांच्या हॉलच्या सर्व बाजूला आरशे असत. भाषण करताना, आपले आविर्भाव ते आरशात पाहात असत. एवढेच नव्हे तर आपल्या मिशा, आपले केस, आपले हातवारे कसे दिसतात हे त्या आरशाच्या हॉलमध्ये ते पाहात असत.

सध्या मिस्टर चर्चिलना हाउस ऑफ कॉमन्समध्ये इंग्रजी भाषेवर मोठे प्रभुत्त्व असलेला, असे मानतात. ते देखील हाऊस ऑफ कॉमन्समध्ये जाण्यापूर्वी आपले भाषण लिहून नेतात. चर्चिल आयत्यावेळी बोलणारा वक्ता नव्हे. प्रेक्षकांकडून उद्गारवाचक शब्द निघावेत, आपल्याला कुशाग्रणी गणण्यात यावे यासाठी तो शेलके वाक्प्रचार आपल्या शर्टच्या स्टिक् कफावर लिहून नेत असतो. कोणी विरोध केला तरच चर्चिल भाषणात रंगतो. हे मिस विकिलसनला माहीत होते. तेव्हा मजूरपक्षाने त्यांच्या भाषणाला विरोध करून त्यास रंगण्याची संधी द्यावयाची नाही असे ठरविले. त्यावेळी चर्चिलचे भाषण अगदीच निष्प्रभ ठरले.

तेव्हा तुम्ही देखील निराश होण्याचे काही कारण नाही. लोकसत्ताक राज्य असलेल्या युगात उत्कृष्ट वक्तृत्त्वाची फार आवश्यकता आहे. जो शत्रुची देखील आपल्या प्रभावी वक्तृत्त्वाने मने वळवून घेतो तोच महापुरूष होय.

ही कला अवगत होण्यासाठी अविरत श्रम केले पाहिजेत. मी देखील प्रथमतः भेदरट होतो. एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये मी जेव्हा प्रोफेसर होतो त्यावेळी

विद्यार्थ्यांपुढे भाषण करताना माझे मन द्विधा होई. उच्चवर्णीयांपुढे महाराचा पोरगा बोलताना त्याची टिंगल होईल, अशी भीती मला वाटत असे. मी वादविवाद मंडळामध्ये फारसा भाग घेतला नाही. मी चांगला बोलू शकेन असे त्यावेळी मला वाटत नसे. मी इंग्रजी भाषा चांगल्या तऱ्हेने लिहितो. निदान माझे मला तरी त्यावेळी वाटत असे.

मी फार पराकाष्ठेचे प्रयत्न याबाबतीत केले आहेत. १३-१३ वेळा मी माझे भाषण लिहून काढले आहे. यापेक्षा कोणालाही काही अधिक सांगता येणार नाही अशी जेव्हा माझ्या मनाची पक्की खात्री होईल तेव्हाच मी भाषण करीत असे.

आज थोडे जे काही मी बोलू शकतो ते पूर्वपरिश्रमाने अवगत केलेल्या ज्ञानामुळेच बोलतो, असे म्हणावे लागेल.

आज झालेल्या विद्यार्थ्यांच्या भाषणाकडे मी वक्तृत्त्वाच्या दृष्टीने पाहात नाही. भाषणाकडे माझे लक्ष दुसऱ्याच दृष्टीने होते. सर्वांच्या भावनांमध्ये मला एकच सूर दिसला. ही उल्लेखनीय गोष्ट आहे. माझ्या मनाला पटू लागले की मी २० वर्षे शेतकऱ्याप्रमाणे शेती केली, नांगरट केली, दगडधोंडे बाजूला काढले, तिच्यामध्ये अंकुर फुटला आहे. हे पाहून मला आनंद वाटतो. मी असंख्य लोकांपुढे भाषणे केली आहेत. चिक्कार लोक माझ्या भाषणात येत असत. त्यावेळी मला वाटत असे, ही माझी बुवाबाजी तर नव्हे ना? पण जी आजच्या तरूणांमध्ये जागृती दिसून आली त्यावरून त्यांना संसारात दर्जाने राहावयाचे आहे, पूर्वजांप्रमाणे कलंकित म्हणून राहावयाचे नाही, हा एकच सूर सर्वांच्या भाषणात मला दिसून आला.

शिक्षण व विद्या या गोष्टीशिवाय आपला उद्धार होणार नाही. मी माझ्या आयुष्यात अनेक कार्ये अंगिकारिली. राजकारणात माझा विशेष महत्त्वाचा काळ गेला. सध्या राजकारणाच्या दोऱ्या उच्चवर्णियांच्या हातात आहेत. त्या दोऱ्या तशाच हाती ठेवण्यासाठी उच्चवर्णियांची धडपड चाललेली आहे. उच्च प्रतीच्या मान्याच्या जागा पटकाविण्यासाठी जी विद्या पाहिजे ती अजून उच्चवर्णियांखेरीज इतरांना प्राप्त झालेली नाही. 'जिच्या हाती पाळण्याची दोरी तीच ··· ' असे काही म्हटले जाते. त्याचप्रमाणे राजकारणाच्या दोऱ्या विद्येशिवाय आपल्या हाती येणार नाहीत. राजकीय सत्ता हाती यावी म्हणून अनेकांनी प्रयत्न चालविलेले आहेत पण त्यांना यश येत नाही. ह्या तफावतीचे अधिष्ठान हेच आहे. इंजिनिअर, कलेक्टर वगैरे जागा फक्त उच्चवर्णियांनाच शिक्षणामुळे मिळतात. शंभरपैकी जवळ जवळ ९९ इंजिनिअर, ९९ कलेक्टर असे उच्चवर्णियांचे असतात. त्यामुळे त्यांच्या हाताखालील जागा ते आपल्या लोकांना देत असतात.

ह्या नाईट स्कूलचा फायदा तुम्हाला फक्त कारकून होण्यासाठी होणार नसून त्यामुळे तुम्ही मान्याच्या जागादेखील काबीज करण्यासाठी होणार आहे. रात्रीच्या शाळेचा प्रयत्न स्तुत्य आहे. या शाळेला मला जे जे सहाय्य देता येईल ते मी जरूर देईन. वार्षिक एक हजार रूपयांची ग्रँट नाईट स्कूलला देण्याचे मी निश्चित केले आहे. तसेच जे काही २००-३०० रुपये क्रमिक पुस्तकांसाठी लागतील तेही देईन; म्हणजे जे जे म्हणून मला देता येईल ते सर्व काही देईन. तुम्ही सर्वांनी याचा फायदा करून घेतला पाहिजे.

तुम्ही स्वच्छ राहिले पाहिजे. मला येथे काही झकपक कपडे घातलेले विद्यार्थी दिसले. कुठल्याशा मॅगझीनच्या अंकात जे आर्टिकल ' महार व महाराष्ट्र ' समग्र छापले आहे त्यात महारांच्या झकपक पोषाखाबद्दल लिहिले आहे. ती वस्तुस्थिती नसून स्तुती आहे. ' एक नूर आदमी व दस नूर कपडा ' अशी म्हण आहे. बाहेर पडताना तुमचा पोषाख स्वच्छ पाहिजे. कपडा पाहूनच तुमच्याबद्दल प्रथम आदर वाटला पाहिजे.

माझा बराच पैसा कपड्यावर जातो. माझे शर्ट, पँटं नि कॉलर किती आहेत याचा मला देखील अंदाज नाही. एवढे खरे की माझे कपडे डझनांनी भरतील. त्यांचा इतका कंटाळा आला आहे की वाटते एक दिवस त्या सर्वांचा लिलाव करावा.

जसे तुम्ही स्वच्छ राहिले पाहिजे तसे स्वाभिमानानेही राहिले पाहिजे. ' पाटील मी तुमच्या जोड्यातलाच आहे ' हे विचार सोडून दिले पाहिजेत. मरण बरे पण उपमर्द सहन करणार नाही, असे तुम्ही म्हटले पाहिजे.

तुम्ही भरपूर वाचन केले पाहिजे. रोज एक अर्धे पुस्तक संपविण्याचा सराव तुम्ही केला पाहिजे. आपली नवी इमारत झाली म्हणजे १०००-२००० विद्यार्थ्यांची सोय होईल, असे काही करता येईल. दिवसभर काम करून रात्री ८ ते १० पर्यंत तुम्ही शिक्षण घेता हे भूषणावह आहे. तुम्हास मी यश प्राप्ती चिंतितो.



# २५३
# धार्मिक कायदा विरुद्ध धर्मनिरपेक्ष कायदा, ह्या लढ्यात धार्मिक कायद्याचे वर्चस्व, हा देशाचा ऱ्हास

नवी दिल्ली येथे लॉ. युनियनच्या वार्षिक दिनानिमित्त ' हिंदी संस्कृतीच्या ऱ्हासाची कारणे ' या विषयावर भाषण करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

प्राचीन हिंदू समाजात ' कायदा ईश्वर प्रणीत आहे ' अशा प्रकारचे कित्येक अपसमज रूढ होते. त्यामुळे एके काळी प्रगतीच्या शिखरावर असलेले आपले राष्ट्र तसे प्रगतीशील राहू शकले नाही. धार्मिक कायदा विरुद्ध धर्मनिरपेक्ष कायदा असा लढा येथेही झाला. परंतु दुर्दैवाने धार्मिक कायदा येथे श्रेष्ठ ठरला. देशाच्या ऱ्हासाचे ते एक प्रमुख कारण ठरले.

आमच्या प्राचीन समाजानी समाजाच्या धारणेतील दोष काढून टाकण्याची केलेली टाळाटाळ हेच त्या समाजाच्या नाशाचे कारण आहे. उलट मनुसारख्या शास्त्रवेत्त्यांनी जे निर्बंध तयार केले त्यांनाच चिकटून राहाण्याची त्यांची प्रवृत्ती होती. समाजाचे दोष सुधारणे हेच कायद्याचे उद्दिष्ट असते.

संस्कृती सुधारणेचे कार्य सतत असे कधीच घडले नाही. एके काळी काही समाज व राष्ट्रे प्रगतीशील न राहिल्यामुळे त्यांचा नाश झाला, हिंदुस्थानच्या इतिहासाकडे दृष्टिक्षेप टाकल्यास ही गोष्ट सहज ध्यानात येईल.

सध्याची विधिमंडळाची पद्धती आपण युरोपियन राष्ट्रांपासून विशेषतः इंग्लंडपासून उचलली असा सर्वसामान्य माणसाचा ग्रह आहे. पण एखाद्याने ह्यादृष्टीने ' विनय पिटीका ' या प्राचीन ग्रंथाची पाने चाळली तर त्याचा हा भ्रम दूर होईल. विनय पिटीकेच्या अभ्यासकांना विधिमंडळ विषयक पद्धतीचे काही नियम माहित होते. प्रस्ताव मांडला नाही तर विधी मंडळात चर्चा होणार नाही तसेच मत नोंदणीही होणार नाही ही गोष्ट नवी आहे असा कित्येकांचा समज आहे. तो एक सर्वमान्य अपसमज आहे.

---

गरुड : १८ एप्रिल, १९४८.

भाषणाची तारीख दर्शविलेली नाही—संपादक.

बहुतेक सर्वांचा समज असा आहे की गुप्त मतदान पद्धती आपण इंग्रजांपासून उचलली. अर्थात हाही गैरसमज आहे. ' विनय पिटिकेत ' गुप्त मतदानाची विशिष्ट व्यवस्था असे. त्यांना ' सालपत्रकगृहे ' असे म्हणत. झाडाच्या सालीचा मतपत्रिका म्हणून उपयोग करीत. काही कारणांमुळे आम्ही आपली राजकीय दृष्टी गमावली ही गोष्ट मी मान्य करतो. आमच्या विधिमंडळासारखा सर्व लोकसंस्थांचा नाश झाला व आम्ही एकतंत्री राजाचे नागरीक बनलो. त्यामुळेच सुसंस्कृती परागतीकडे वळली आणि इतर समाजाप्रमाणे हिंदी समाजही वेळोवेळी मागे पडत चालला.

समाजातील दोषाचे निर्मूलन करणे हाच कायदा करण्याचा हेतू असतो. दुर्दैवाने प्राचीन समाजांनी समाजातील दोष काढून टाकण्यासाठी कायद्याचा उपयोग केला नाही. त्यामुळे त्यांचा नाश झाला.

ह्या देशात जितक्या क्रांत्या झालेल्या आहेत तितक्या पृथ्वीतलावरील कोणत्याही राष्ट्रात झालेल्या नाहीत. पोपचे वर्चस्व झुगारुन देण्यासाठी युरोपात जेव्हा झगडे झाले त्याच्या आधी कित्येक वर्षे हिंदुस्थानात धर्माधिष्ठित कायदा विरुद्ध धर्मनिरपेक्ष कायदा असा झगडा चालू होता. दुर्दैवाने हिंदुस्थानात धार्मिक कायदा श्रेष्ठ ठरला, माझ्या मते देशावर ती एक फार मोठी आपत्ती ओढवली. कायद्यात बदल करता येत नाही असा समज हिंदू समाजातील प्रतिगामी लोकांमध्ये त्याकाळी रूढ होता हेच ही आपत्ती ओढवण्याचे कारण आहे असे माझे मत आहे.



## २५४

# मी पाषाणासारखा घट्ट,मला विरघळण्याची भीती नाही तुमची स्थिती वेगळी, ढेकळासारखे विरून जाल

संयुक्त प्रांत शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे ५ वे अधिवेशन लखनौ येथे ता. २४ व २५ एप्रिल १९४८ रोजी आयोजित करण्यात आले.

गतसाली याच ठिकाणी राजकीय हक्क शाबीत करण्यासाठी तसेच माणुसकीचे समानत्व जाहीर करण्यासाठी, शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या वतीने सत्याग्रहाची मोहीम चालविली होती. २००० पेक्षा अधिक दलित स्त्री-पुरुषांनी सत्याग्रहात भाग घेतला होता. त्या सर्वांची लखनौ येथे धरपकड होऊन, त्यांना तुरुंगामध्ये गिरफ्तार करण्यात आले होते. संयुक्त प्रांताच्या अखिल अस्पृश्य जनतेचा हा फार मोठा त्याग होता. सत्याग्रहातून मुक्त झालेल्या स्त्री-पुरुषांची आतापर्यंत एकच भाविक इच्छा होती आणि ती म्हणजे दलितांना मुक्तिचा मार्ग दाखविणारे निर्भय नेते डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे दर्शन होऊन, पावन करणारा त्यांचा उपदेश ऐकण्याचे पुण्य लाभावे. या सदिच्छेचे व प्रयत्नाचे दृश्य फळ म्हणजे लखनौ येथे केलेले डॉक्टर बाबासाहेबांचे भाषण. हे भाषण अस्पृश्यांच्या चळवळीस ऐतिहासिक वळण देणारे आहे, याबद्दल संशय नाही.

श्री. गयाप्रसाद, ज. से. संयुक्त प्रांत शे. का. फेडरेशन यांच्या प्रयत्नाने तसेच (१) बाल गोविंद (२) कन्हय्यालाल सोनकर (३) चौधरी बुद्धदेव व (४) मेवालाल सोनकर यांच्या सहकार्याने अधिवेशन यशस्वी झाले. अधिवेशनास १,००,००० पेक्षा अधीक दलित समुदाय होता. ऑल इंडिया शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे ज. से. राजभोज हेही हजर होते. श्री. गोपिचंद विप्पल (प्रेसिडेंट संयुक्त प्रांत समता सैनिक दल), श्री. तिलकचंद कुरील (प्रेसिडेंट संयुक्त प्रांत शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन) हे तेथील मुख्य संघटक व आधारस्तंभ आहेत.

हे अधिवेशन वैशिष्ट्यपूर्ण होते असे म्हणावयास दोन कारणे आहेत. पहिले कारण असे की, कॉंग्रेस सरकारच्या राज्यात अजूनही अस्पृश्यांचा छळवाद थांबलेला नाही हे जगाच्या उघडकीस या परिषदेवरून आले आहे. दुसरे कारण हे की, देशाला प्रगतीकारक धोरणाकडे नेत नेत, अत्यंत हीनावस्थेत असलेल्या अस्पृश्य समाजाच्या उन्नतीसाठी ज्या गोष्टी करण्याची आवश्यकता आहे त्या करण्यासाठी दलित फेडरेशन कधीच कचरणार नाही, हे सिद्ध झाले आहे.

---

जनता : १ मे १९४८.

या अधिवेशनात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे रविवार दिनांक २५ एप्रिल १९४८ रोजी भाषण झाले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

भगिनींनो आणि बंधुंनो,

कॉँग्रेसमध्ये सामील होण्याने आपले काही हित साधेल असे मला मुळीच वाटत नाही. दिवसेंदिवस कॉँग्रेस दुर्बल होत असून समाजवादी बाहेर पडल्यामुळे ती अधिकच दुर्बल झाली आहे. अशावेळी या दोन्ही पक्षातील चुरशीचा लाभ घेऊन आपल्या पक्षाच्या स्वतंत्र अस्तित्वाने जो पक्ष आपल्या अटी मान्य करील त्याच्याशी सहकार्य करून आपल्याला सत्ता हस्तगत करता येईल. सत्ता ही सामाजिक प्रगतीची गुरुकिल्ली आहे.

कॉँग्रेसमध्ये जाऊन मागासलेल्या जमातींना सत्ता हस्तगत करणे अशक्य आहे. ती एक मोठी संस्था आहे. आपण त्यात प्रवेश करणे म्हणजे महासागरात पाण्याचा थेंब टाकण्यासारखे होणार आहे. त्या संस्थेत सामील होण्याने आपली उन्नती होणार नाही. जर कॉँग्रेस निरनिराळ्या गटात विभागली तरच आपल्याला आपला उद्धार करता येईल. कॉँग्रेसमध्ये प्रवेश करण्याने आपल्या शत्रुचे सामर्थ्य मात्र वाढेल. कॉँग्रेसची स्थिती आज आग लागलेल्या घरासारखी झाली आहे. त्यात प्रवेश करण्याने आपणच भस्मसात होऊ. येत्या दोन वर्षात कॉँग्रेसचा नाश झाला तर त्यात मला मुळीच आश्चर्य वाटणार नाही.

समाजवादी आज कॉँग्रेसमधून बाहेर पडले आहेत. त्यामुळे कॉँग्रेसचे बळ निश्चितपणे कमी होणार आहे. अशा वेळी आपण तिसरा पक्ष या नात्याने आपली स्वतंत्र संघटना केली पाहिजे. जर कॉँग्रेस किंवा समाजवादी यापैकी कोणालाही हुकमी बहुमत प्राप्त झाले नाही तर ते आपल्या मतांची भीक मागण्यासाठी येतील. अशावेळी आपला पाठिंबा देण्यासाठी आपण आपल्या अटी पुढे करून सत्तेतील समतोलपणा राखू शकतो.

सुमारे १२ वर्षापूर्वी लोथीयन समितीचा सभासद या नात्याने आपण लखनौला आलो होतो त्यावेळेपेक्षा येथील अस्पृश्यांमध्ये राजकीय जागृती अधिक झालेली आहे हे पाहून मला आनंद होतो.

गेल्या वर्षी संयुक्त प्रांतांमध्ये अस्पृश्यांनी केलेल्या सत्याग्रह चळवळीचा उल्लेख मी अभिमानाने करतो. ज्यांनी त्या चळवळीत भाग घेऊन क्लेश सहन केले त्या सर्वांचे मी अभिनंदन करतो. एकदा एखादी गोष्ट साध्य करण्याचा आपण निश्चय केला व त्या दृष्टीने प्रयत्नाला लागलो म्हणजे मार्गात कितीही अडचणी आल्या तरी ती गोष्ट आपण सहज साध्य करू शकतो ही गोष्ट यावरून आपल्या ध्यानी आलीच असेल.

मी काँग्रेस सरकारमध्ये सामील झाल्यामुळे माझ्या अनुयायांपैकी कित्येकांची परिस्थिती गोंधळल्यासारखी झाली आहे. त्यांच्या मनातील किंतू नाहिसा करण्याचा मी प्रयत्न करणार आहे.

आपल्या घोषणेप्रमाणे येथील हिंदू, मुसलमान, शीख, अस्पृश्य वगैरे सर्वांना सत्ता दान करून ब्रिटिश येथून निघून गेले नाहीत. सिमला परिषदेतही फक्त काँग्रेसचे हाती सत्ता देण्यात येणार नाही असे स्पष्टीकरण व्हाईसरॉयने केले होते. १९४६ साली शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनने प्राथमिक निवडणुकी जिंकल्या होत्या व विरोधकांना भुईसपाट केल्यामुळे फेडरेशनचे प्रातिनिधीक स्वरुप प्रस्थापित झाले होते. परंतु नंतर ब्रिटिशांनी आपले पूर्वीचे वचन न पाळता हिंदू, मुसलमान व शीख ह्यांचेच हाती सत्ता सोपविण्याचे ठरविले.

आपल्या राजकीय लढ्यातील तो अत्यंत चमत्कारिक काळ होता. सर्वत्र काळोख पसरला होता व आपल्याला आशेचा एकही किरण दिसत नव्हता. जमातीची फार मोठी जबाबदारी माझे शिरावर होती. अशा वेळी माझे मलाच कळत नव्हते. अशा परिस्थितीत कोणत्याही मार्गाने त्यांना नेण्यास मी तयार नव्हतो. परिस्थितीचे योग्य आकलन होईपर्यंत वाट पाहाण्याचे मी ठरविले.

२५ वर्षे काँग्रेस बरोबर लढा दिलात आणि अशा आणीबाणीच्या प्रसंगी मूग गिळून गप्प बसण्याचे धोरण तुम्ही का स्वीकारलेत असा प्रश्न मला विचारण्यात येतो. नेहमीच लढ्याचे तंत्र उपयोगी पडत नाही. कित्येक वेळा दुसऱ्या मार्गाचा अवलंब करणेही आवश्यक असते. ब्रिटिशांनी आपल्याला धोका दिला. आपल्यामध्येही कित्येक फितूर होतेच. एवढ्या मोठ्या प्रचंड संस्थेविरुद्ध लढत देणे त्यावेळी योग्य ठरले नसते. त्याच्यानंतर तडजोडीचा मार्ग शिल्लक उरतो. त्यादृष्टीने आपल्याला बरेच हक्क प्राप्त झाले आहेत. आपल्याला पाहिजे होते तेवढे जरी आपल्या पदरात पडले नसले तरीही आपण पुष्कळच गोष्टी साध्य करू शकलो.

आपल्याला विधिमंडळांतून व नोकऱ्यांतून राखीव जागा मिळाल्या आहेत व आपल्या बहुतेक सर्व मागण्या मान्य करण्यात आल्या आहेत. स्वतंत्र मतदार संघाची मागणी अमान्य करण्यात आली. इतर अन्य अल्पसंख्यांकांनाही ती गोष्ट साध्य करता न आल्यामुळे आपल्याला त्याबद्दल लाज वाटण्याचे काहीच कारण नाही. काँग्रेस बरोबर लढा पुकारण्याची ही वेळ नव्हे. सहकार्य आणि समझोता या मार्गानेच आपण मिळेल तेवढे हस्तगत केले पाहिजे.

मी मध्यवर्ती सरकारात गेलो असलो तरी कॉंग्रेसचा सभासद झालो नाही. तसा माझा विचारही नाही. मध्यवर्ती सरकारात येण्याबद्दल मला कॉंग्रेसकडून आमंत्रिण्यात आले व मीही कॉंग्रेस सरकारमध्ये विनाअट प्रवेश केला.

मी दगडासारखा घट्ट असल्यामुळे पाण्यात विरघळण्याची मला मुळीच भीती नाही, म्हणून मी कॉंग्रेसमध्ये सामील झालो तरी माझ्यावर काहीही परिणाम होणार नाही. परंतु, तुमची स्थिती मात्र वेगळी आहे. पाण्यात पडलेल्या ढेकळासारखे तुम्ही विरून जाल. तेथे राहाणे निरुपयोगी आहे असे मला वाटले तर मी केंव्हाही बाहेर पडेन.

परिस्थितीच अशी आहे कीं, राज्यकारभारात यावेळी आपली माणसे असणे अत्यावश्यक आहे. चांगल्या कायद्यापासून धोक्याची शक्यता नाही हे खरे आहे परंतु चांगल्या कायद्याची दुष्ट अंमलबजावणी केली जाण्याचा संभव आहे. अशावेळी अस्पृश्यांविरुद्ध वागण्याची ज्यांची परंपरा आहे अशी माणसे अधिकारावर असली तर ते आपल्या भवितव्याच्या दृष्टीने वाईट आहे.

सक्तीच्या श्रमाला कायद्याचे अधिष्ठान नाही. परंतु जमीनदार ती पद्धत अंमलात आणीत आहेत. कित्येक ठिकाणी अशा अत्याचारी लोकांचे नातेवाईक अधिकारावर असल्यामुळे अस्पृश्यांनी त्यांचेविरुद्ध केलेले अर्जही ह्या अधिकाऱ्यांकडून दडपले जातात. ह्या ठिकाणी जर अस्पृश्य अधिकारी असते तर त्यांनी आपल्या बांधवांच्या हक्कांचे खचित् रक्षण केले असते.

जर मी कॉंग्रेसमध्ये प्रवेश करण्याचे ठरविले तर तशी उघड घोषणा करीन. अस्पृश्यांच्या हिताची ती गोष्ट असेल तर तुम्हालाही तसे करण्यास मी सांगेनच पण जोपर्यंत मी तुम्हाला कॉंग्रेसमध्ये प्रवेश करण्याबद्दल प्रकट आवाहन केलेले नाही तोपर्यंत मात्र कॉंग्रेसमध्ये जाऊ नका ! असा उपदेश करून डॉक्टर साहेबांनी आपले भाषण संपविले.

## विरोधासाठी विरोध मला मान्य नाही

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या वरील भाषणावर विपर्यास करणारे वृत्त एका वृत्तपत्राने प्रकाशित केले. त्यावर डॉ. बाबासाहेबांनी आपले निवेदन दिले. ते जनतेच्या दिनांक ८ मे १९४८ च्या अंकात प्रसिद्ध झाले. ते येणेप्रमाणे––

माझ्या भाषणावर विपर्यास करणारा वृत्तांत पाहून व मंत्रिमंडळातील माझ्या सहकाऱ्यांसंबंधी मी काही अनुचित उद्‌गार काढल्याचे एका स्थानिक वृत्तपत्राने दिलेले वृत्त वाचून मला अतिशय खेद झाला.

माझे २५ एप्रिलचे ते भाषण उत्स्फूर्त होते. माझ्या भाषणातील काही मुद्दे मी खाली देतो. निरनिराळया प्रश्नांवरून माझ्या काही अनुयायांनी मजवर केलेल्या टीकांना उत्तर म्हणून हे मुद्दे मांडले.

पहिला मुद्दा असा : त्रिमंत्री शिष्टमंडळाच्या प्रयाणापासून मी मुग्धता स्वीकारावी याचे कारण काय ?

दुसरा मुद्दा असा : मी कॉंग्रेस सरकारात का सामील झालो ?

आणि तिसरा मुद्दा : भविष्यकाळी मी काय करावयाचे ठरविले आहे ?

पहिल्यास उत्तर म्हणून मी म्हणालो की अमात्य त्रयीकडे शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनने स्वतंत्र मतदार संघाची मागणी केली होती. आमची ही मागणी फेटाळून लावण्यात आली. याला दोन कारणे होती. (१) मुस्लिमांच्या व शिखांच्या मानाने आपला पक्ष कमकुवत होता. (२) आमच्यामध्येच फाटाफूट होती. बरेच पंचमस्तंभी लोक भरले होते.

अमात्य मंडळाच्या निर्णयाने दलित वर्गांना काही वेगळे राजकीय अस्तित्वच नाही, असे ठरल्यासारखे झाले. बरे, राजकीय संरक्षण नाही म्हणजे शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनने सर्वनाशच ओढवून घेतल्यासारखे आहे असेही मला वाटले. माझ्यापुढे अथांग अंधःकार पसरला. मी तेव्हापासून कोणतेही निवेदन केले नाही, मुग्धता स्वीकारली त्याचे कारण असे आहे.

दुसऱ्या मुद्याबाबत बोलावयाचे तर मी कॉंग्रेसचा विरोधक व टीकाकार होतो, हे खरे परंतु त्याचबरोबर केवळ विरोधासाठी विरोध करणे मला कधीही मान्य नव्हते. सहकार्याने जर आपला लाभ होत असेल तर सहकार्याच्याच भावनेने वागले पाहिजे. म्हणूनच मी कॉंग्रेसशी सहकार्य केले. घटनेत जे काही संरक्षण आम्हाला मिळाले ते अशा सहकार्याअभावी मिळविता आले नसते. माझ्या विधानाला पूरक अशी काही उदाहरणेही मी या अनुषंगाने दिली.

मी मंत्रिमंडळात का सामील झालो, त्याचा खुलासा करताना मी पुढील दोन कारणे विशद केली. एक, मंत्रिमंडळात येण्यासाठी मला दिलेले आमंत्रण बिनशर्त होते व दोन, बाहेर राहाण्यापेक्षा सरकारात जाऊन अस्पृश्यांच्या हितसंबंधीचे रक्षण करणे जास्त सुलभ होते.

मी माझ्या भाषणात सांगितले की पूर्वग्रहदूषित असे वाईट कायदे आपल्याविरुद्ध होतील, याची भीती दलित वर्गांनी बाळगू नये. त्यांनी भ्यावयास हवे ते वाईट कारभाराला. दलित वर्गाचे लोक या कारभारात नसल्यानेच हा कारभार दूषित

होतो. सवर्ण अधिकारी ह्या कारभारात भरले असल्याने राजवटीला दलित वर्गांविषयी सहानुभूती नाही. या सर्व गोष्टी विचारात घेऊन मी सरकारात सामील झालो.

आता तिसरा मुद्दा. काँग्रेसला मिळण्यात काही अर्थ नाही, असे मी म्हणालो. तिसरा पक्ष असणेच जास्त सुरक्षिततेचे ! सरकार झोटिंगशाही बनण्याचा धोका असतो.

सध्याच काँग्रेसमधून समाजवादी बाहेर पडून, काँग्रेस व समाजवादी असे दोन पक्ष तयार झालेत. तेव्हा काँग्रसला मिळायचे की काय हा आपणापुढे प्रश्न नाही. काँग्रेसला गिळावयाचे की समाजवाद्यांना, हा खरा प्रश्न आहे. समाजवादी पक्ष प्रबळ होण्याची शक्यता आहे. तेव्हा मी असा सल्ला दिला की या दोन्ही पक्षांचा समतोलपणा राखून त्यादृष्टीने त्यांच्यापासून फायदा उठणारी सत्ता म्हणून आपण तिसरा पक्ष स्थापावा. केवळ अनुयायांच्या स्वरूपात एखाद्या राजकीय पक्षाला जाऊन मिळण्यात स्वारस्य नाही. त्यायोगे फार तर आपण अधिकारावर चढू, पण त्याने सत्ता अथवा अधिकार मिळतीलच असे नाही.

या अनुषंगाने बोलताना मी म्हणालो की लोकसंख्येच्या प्रमाणात पाहाता, संयुक्त प्रांतात तुम्हाला २२ टक्क्यांच्या आसपास नोकऱ्यात राखीव जागा मिळणे आवश्यक असता, अवघ्या १० टक्क्यांवर तुमची बोळवण करण्यात आल्याबद्दल तुम्ही एका ठरावाने आताच पंत मंत्रिमंडळाचा निषेध केलात. तुम्हाला हव्या असलेल्या राखीव जागा पंत तुम्हाला का देत नाहीत ? कारण संयुक्त प्रांतिक विधिमंडळात आपणाला हव्या असणाऱ्या बहुमतासाठी पं. पंत तुमच्यावर अवलंबून नाहीत, हे होय. वाटाघाटी करण्यालायक वेगळी पण प्रबळ अशी संघटना स्थापूनच तुम्हाला या २२ टक्क्याची पंतांकडे मागणी करता येईल आणि आपणाला यांच्यावरच अवलंबून राहावे लागणार आहे, हे ध्यानी घेऊन पंत त्यास मान्यता देतील.

यानंतर मी मागासलेल्या जमाती व दलित वर्ग यांच्या ऐक्याच्या प्रश्नासंबंधी बोललो. हे दोनही मिळून देशाची बहुसंख्या बनते. त्यांना या देशावर राज्य करता येणार नाही का ? राजकीय सत्ता हस्तगत करण्यासाठी त्यांनी संघटित होण्याचाच काय तो अवकाश आणि आता प्रौढ मतदानाने निवडणुकी होणार असल्याने हेही कठीण नाही. काँग्रेस सरकार इथे कायमचे राहणार आहे या भावनेने जनता धैर्यशाली बनू शकत नाही असे दिसते. ही चुकीची विचारसरणी

आहे. लोकप्रिय लोकशाहीत कुठलेच सरकार कायम राहू शकत नाही. पं. नेहरू व सरदार पटेल यांच्यासारख्या उच्चतेच्या लोकांनी स्थापन केलेले सरकारसुद्धा कायम टिकू शकत नाही, हे लक्षात ठेवा.

मी काँग्रेसवर अथवा मंत्रिमंडळातील माझ्या सहकाऱ्यांवर हल्ला चढविला, हे म्हणणे सत्याचा केवढा अपलाप करणारे आहे, हे माझ्या वरील निवेदनावरून वाचकांच्या लक्षात येईलच.



२५५

# खरेच, संविधानांतर्गत काही चुकीच्या गोष्टी घडल्या तर त्यास संविधान जबाबदार नसेल; माणसाची दुष्टता जबाबदार असेल

'' संविधान सभेत दिनांक २९ ऑगस्ट १९४७ रोजी श्री सत्यनारायण सिन्हा यांनी मांडलेल्या ठरावाप्रनाणे पुढील सात सभासदांची मसुदा समिती गठित करण्यात यावी असा ठराव सभेने एकमताने मंजूर केला. सभासद पुढील प्रमाणे--

१. अल्लादी कृष्णास्वामी अय्यर

२. एन. गोपालस्वामी अयंगार

३. डॉ. बी. आर. आंबेडकर

४. श्री. के. एम. मुन्शी

५. सैयद मोहमद सादुल्ला

६. बी. एल. मित्तल

७. डी. पी. खेतान ''[1]

'' डॉ. आंबेडकरांना दि. ३० ऑगस्ट १९४७ रोजी मसुदा समितीच्या बैठकीत अध्यक्ष म्हणून एकमताने निवडण्यात आले. त्यानंतर या समितीची पहिली बैठक दिनांक २७ ऑक्टोबर १९४७ रोजी घेण्यात आली. मधल्या २ महिन्यांच्या काळात संविधान सभेचे अध्यक्ष डॉ. राजेंद्रप्रसाद यांचे एक पत्र मसुदा समितीला म्हणजे डॉ. आंबेडकरांना आले. हे पत्र बैठकीत सादर करण्यात आले. या पत्रात म्हटले होते की, संविधान सभेची बैठक डिसेंबरच्या मध्यात होणार असल्यामुळे रावांचा ड्राफ्ट सर्व सदस्यांना वितरीत करण्यात यावा. यावर डॉ. आंबेडकरांसहित सर्व सदस्यांनी मत नोंदविले की, असे करण्याची आवश्यकता नाही, कारण हा ड्राफ्ट व उपसमित्यांचे रिपोर्ट लक्षात घेऊन संविधानाचा नवा मसुदा करायचा आहे.

मधल्या काळात म्हणजे ३० ऑगस्ट १९४७ नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी कार्यालयाने तयार केलेल्या मसुद्यातील सर्व कलमांचे निरिक्षण करून स्वतःची शब्दरचना असलेली कलमे तयार केली होती. दिनांक २७ ऑक्टोबर १९४७ पासून घटना सल्लागाराच्या कार्यालयाने तयार केलेल्या मसुद्यावर कलमवार चर्चा झाली. त्यात कोणते कलम बदलावे, कोणते वाढवावे, शब्दरचना कोणत्या कलमाची बदलावी यादर भराभर निर्णय घेण्यात आले. ''[2]

---

[1] डॉ. बाबासाहेब आंबेडकर रायटिंग अँड स्पिचेस, खंड १३, पृष्ठ क्रमांक २९.

[2] फुले-आंबेडकर संशोधनातील प्रदुषणे : लेखक वसंत मून, पृ. २१.

संविधान सभेला मसुदा सादर करताना मसुदा समितीचे अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी संविधान सभेचे अध्यक्ष डॉ. राजेंद्र प्रसाद यांना मसुद्यासोबत एक पत्रही दिले होते. त्यात त्यांनी मसुदा समितीची भूमिका विशद केली होती. ते पत्र पुढीलप्रमाणे--

" नवी दिल्ली,
२१ फेब्रुवारी १९४८.

प्रति,
सन्माननीय अध्यक्ष,
भारतीय संविधान सभा,
नवी दिल्ली.

प्रिय महोदय,

**प्रस्तावना.**--संविधान सभेने २९ ऑगस्ट १९४७ रोजी पारित केलेल्या ठरावान्वये नियुक्त केलेल्या मसुदा समितीने तयार केलेला भारताचा नवीन संविधान मसुदा समितीतर्फे मी सादर करीत आहे.

समिती सभासदांच्या वतीने जरी मला स्वाक्षरी करण्याचा अधिकार बहाल करण्यात आला असला तरी समितीच्या सर्व सभांना सर्व सभासद हजर नसत, परंतु ज्या सभांमध्ये निर्णय घेण्यात आले त्या प्रत्येक सभेत आवश्यक गणसंख्या असायची आणि निर्णय एकतर एकमताने किंवा उपस्थित सभासदांच्या बहुमताने घेण्यात यायचे.

मसुदा तयार करताना मसुदा समितीने संविधान सभेने घेतलेल्या निर्णयांची किंवा संविधान सभेने नियुक्त केलेल्या समित्यांच्या निर्णयांची अंमलबजावणी करावी अशी अपेक्षा होती. होताहोईस्तो मसुदा समितीने याचे पालन करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु काही बाबी अशा होत्या की ज्यात बदल करणे गरजेचे आहे असे मसुदा समितीला वाटले. अशाप्रकारचे सर्व बदल अधोरेखित करून किंवा संबंधित भागाच्या बाजूला उल्लेख करुन दर्शविलेले आहेत. प्रत्येक बदल स्पष्ट करण्यासाठी तळटीप देण्याची काळजी सुद्धा मसुदा समितीने घेतली आहे. परंतु विषयाचे महत्त्व लक्षात घेता या महत्त्वाच्या बदलांकडे आपले आणि संविधान सभेचे लक्ष वेधणे योग्य होईल, असे मला वाटते.

२. **उद्देशपत्रिका.**--जानेवारी १९४७ ला संविधान सभेने स्वीकारलेला उद्दिष्ट ठराव उद्‌घोषित करतो की, भारत एक सार्वभौम, स्वतंत्र गणराज्य असेल,

मसुदा समितीने सार्वभौम लोकसत्ताक गणराज्य असा शब्द समूह स्वीकारलेला आहे. कारण '' सार्वभौम '' या शब्दामध्ये स्वातंत्र्य अंतर्भूत आहे. त्यामुळे '' स्वातंत्र्य '' शब्द जोडण्याने अधिक काही साध्य होईल असे वाटत नाही. भारतीय लोकसत्ताक गणराज्य आणि ब्रिटिश राष्ट्रसंघ यातील संबंधांचा प्रश्न नंतर सोडवावयाचा आहे.

उद्दिष्टाबाबतच्या ठरावात अंतर्भूत नसला तरी समितीने बंधुत्वाच्या परिच्छेदाचा उद्देश पत्रिकेत अंतर्भाव केला आहे. बंधुभावाची आणि सदिच्छेची गरज भारताला आज जेवढी आहे तेवढी पूर्वी कधीही नव्हती आणि नवीन संविधानात या विशेष ध्येयाचा उद्देश पत्रिकेत खास उल्लेख करुन त्यावर भर देण्याची गरज समितीला वाटली.

इतर बाबतीत उद्देश पत्रिकेतील हेतू आणि शक्यतो त्यातील भाषा सुद्धा उद्देश पत्रिकेत अंतर्भूत करण्याचा समितीने प्रयत्न केला आहे.

**अनुच्छेद १ :**

३. **भारताचे वर्णन.**––मसुद्याच्या अनुच्छेद १ मध्ये भारताचे वर्णन संघराज्य (Union of States) असे केले आहे. संघराज्यातील घटकांना आज जरी राज्यपालांचे प्रांत किंवा मुख्य आयुक्तांचे प्रांत किंवा भारतीय संस्थाने असे ओळखले जात असले तरी एकवाक्यता निर्माण होण्यासाठी नवीन संविधानात त्यांचा राज्ये (States) म्हणून उल्लेख करणे समितीला संयुक्तिक वाटले. निःसंशयपणे नवीन संविधानातसुद्धा काही घटकांमध्ये फरक राहीलच आणि हा फरक लक्षात येण्यासाठी, समितीने राज्यांची तीन भागात विभागणी केली आहे : पहिल्या सूचितील भाग १ मध्ये उल्लेखित, भाग २ मध्ये उल्लेखित आणि भाग ३ मध्ये उल्लेखित क्रमशः ती सध्याच्या व्यवस्थेशी जुळणारी पुढीलप्रमाणे असतील––राज्यपालांचे प्रांत, मुख्य आयुक्तांचे प्रांत आणि भारतीय संस्थाने.

असे लक्षात येईल की समितीने फेडरेशन या ऐवजी संघराज्य (Union) असा शब्दप्रयोग केला आहे. नावाने विशेष बदल होत नसला तरी समितीने ब्रिटिश नॉर्थ अमेरिका ॲक्ट १८६७ च्या उद्देश पत्रिकेतील भाषेला प्राधान्य दिले आहे आणि संविधानाप्रमाणे रचना जरी फेडरेशनची असली तरी भारताचे वर्णन संघराज्य (Union) असा करणे लाभदायक आहे असा विचार केला आहे.

**अनुच्छेद ५ आणि ६ :**

४. **नागरिकत्व.**––समितीने संघराज्याच्या नागरिकत्वाच्या प्रश्नाचा अतिशय काळजीपूर्वक आणि विस्तृत विचार केला आहे. संघराज्य निर्मितीच्या वेळी

संघराज्य नागरिकत्वाच्या प्राप्तीसाठी व्यक्तीचा भौगोलिकदृष्ट्या जन्म किंवा वंश किंवा कायमचे वास्तव्य हा आधार आवश्यक राहील असा समितीने विचार केला. भारतीय भूमिशी असा कोणताही संबंध नसणाऱ्या व्यक्तींनी भारताशी एकनिष्ठ राहण्याची शपथ घेतल्यास त्यांना नागरिकत्व प्रदान करण्याबाबत समितीला शंका आहे. कारण इतर देशांनीही अशीच तरतूद केली तर आपल्या संघराज्यात अशा अनेक व्यक्ती असू शकतील की, ज्या आपल्या संघराज्यात जन्मल्या आहेत आणि कायमचे वास्तव्य करुन आहेत पण ज्यांच्या निष्ठा परदेशाशी असतील. अलिकडच्या महिन्यात मोठ्या संख्येने भारतात स्थलांतरित झालेल्या लोकांच्या गरजांबाबत समितीने विचार केला आहे आणि त्यांच्या वास्तव्य आणि पर्यायाने नागरिकत्वाच्या प्राप्तीसाठी विशेष सुलभ पद्धतीचा अवलंब केला आहे. त्यांना हे करावयाचे आहे की (ते किंवा त्यांच्या आई-वडिलांपैकी एक किंवा त्यांचे आजोबा, आजीपैकी एक भारतात किंवा पाकिस्तानात जन्माला आलेत असे गृहित धरून).

(अ) भारतातील जिल्हा दंडाधिकाऱ्यापुढे भारतात वास्तव्य करण्याची इच्छा जाहीर करणे, आणि

(ब) जाहीर करण्यापूर्वी कमीत कमी एक महिन्यासाठी भारतात वास्तव्य असणे.

**अनुच्छेद ७ ते २७ :**

५. **मूलभूत अधिकार.**—–मूलभूत अधिकार आणि त्यावरील मर्यादा शक्य होईल तेवढ्या सुस्पष्टपणे मांडण्याचा समितीने प्रयत्न केला आहे. कारण न्यायालयांना त्यावर आपले निकाल द्यावे लागणार आहेत.

**अनुच्छेद ५९ :**

६. **संघराज्याच्या राष्ट्रपतीचे अधिकार.**—–भारतीय राज्य व इतर घटकांचे राज्यकर्ते यांच्या प्रति कोणताही पूर्वग्रह न ठेवता सुनावण्यात आलेल्या मृत्यूदंडाची शिक्षा स्थगित करणे, माफ करणे किंवा कमी करणे या विषयीचा अधिकार राष्ट्रपतीला असणे उचित होईल असा समितीने विचार केला आहे.

**अनुच्छेद २७८ :**

काही विशिष्ट परिस्थितीत संविधानातील काही विशिष्ट तरतूदी स्थगित करून राज्यपालांना जाहीरनामा जारी करण्याचा अधिकार नवीन संविधानाने

दिला आहे. केवळ दोन आठवड्यांच्या अवधीसाठी तो हे करू शकतो आणि त्यासंबंधीचा अहवाल त्याने राष्ट्रपतीला सादर करणे आवश्यक आहे. हा अहवाल प्राप्त झाल्यानंतर राष्ट्रपती तो जाहीरनामा रद्द करू शकतात किंवा स्वतःचा नवीन जाहीरनामा जारी करू शकतात, परिणामतः राज्य कार्यकारीणीच्या ऐवजी केंद्रीय कार्यकारीणीचा अंमल सुरू होईल आणि राज्यविधिमंडळाऐवजी केंद्रीय विधिमंडळाचा अंमल सुरू होईल. जाहीरनाम्यात नमूद केलेल्या कालावधीसाठी राज्याच्या अधिकारात असलेल्या प्रदेशावर केंद्राचा अंमल सुरू होईल. १९३५ च्या कायद्यातील '' अनुच्छेद ९३ शासनपद्धती '' (Section 93 regime) च्या ऐवजी ही तरतूद करण्यात आली आहे.

**अनुच्छेद ६० :**

७. **सामायिक सूचीतील विषयांबाबत कार्यकारी अधिकार.**––वर्तमान संविधानाप्रमाणे भारत शासन कायदा १९३५ मधील ७ व्या सूचीतील भाग १ आणि २ नुसार सामायिक सूचीतील विषयांच्या कार्यान्वयाचे अधिकार प्रांताकडे आहेत आणि काही बाबतीत त्यांचा अंमल कशा पद्धतीने करावा हे सांगण्याचा अधिकार केंद्राकडे आहे. मसुदा संविधानात समितीने यात किंचितसा बदल केला आहे आणि '' या संविधानात नमूद केलेल्या स्पष्ट तरतूदी किंवा संसदेने पारित केलेला कोणताही कायदा '' वगळून कार्यकारी अधिकार प्रांतांना (ज्याचा उल्लेख राज्य असा होता) देण्यात आला आहे. या वगळण्याच्या तरतूदीचा परिणाम असा होईल की विशिष्ट बाबतीत कार्यकारी अधिकार केंद्रीय सरकारला द्यावेत की, आवश्यकता पडल्यास राज्य सरकारांनी हे अधिकार कसे वापरावे ह्याबद्दलच्या सूचना देण्याचा अधिकार केंद्रीय सरकारला द्यावा हे ठरविण्याचे स्वातंत्र्य, नव्या संविधानांतर्गत, केंद्रीय संसदेला राहील. ही तरतूद करताना समितीने असे तत्त्व लक्षात ठेवले आहे की, कार्यकारी प्रदत्त अधिकारांची व कायदेविषयक अधिकारांची व्याप्ती समान असावी.

**अनुच्छेद ६७ :**

८. **राज्यसभेचे गठन.**––संविधान सभेने घेतलेल्या निर्णयानुसार राज्यसभेतील महत्तम २५० सदस्य संख्येपैकी २५ सभासद यादीतून किंवा मतदार संघातून विशिष्ट उद्दिष्टांनुसार निवडलेले असतील. ज्या देशाच्या (आयर्लंड) पद्धतीतून यादीपद्धती स्वीकारली त्या देशात ती अयशस्वी ठरली असल्यामुळे समितीने असा विचार केला की, विशेष ज्ञानप्राप्त किंवा साहित्य,

कला, विज्ञान इत्यादी क्षेत्रातील अनुभवी व्यक्तिंमधून १५ व्यक्तिंची सभासद म्हणून नियुक्ती राष्ट्रपतीने करावी. श्रम, व्यापार किंवा उद्योग या विशेष क्षेत्रांच्या विशेष प्रतिनिधीत्वासाठी विचार करण्याची गरज नाही कारण प्रौढ मतदान पद्धतीमुळे त्यांना केंद्रीय संसदेत पुरेशा प्रमाणात प्रतिनिधीत्व हमखास मिळेल ही वास्तविकता आहे असे समितीला वाटते.

**अनुच्छेद ६३ आणि १५१ :**

९. **केंद्रीय संसद आणि राज्यविधिमंडळांची कालमर्यादा.**---संसदीय पद्धतीच्या विशेषतः प्रौढ मतदानाच्या आधारावर निर्मित नवीन संविधानाच्या सुरवातीला चार वर्षांपेक्षा अधिक कालावधी असावा असे समितीला वाटते. नवीन मंत्र्यांना प्रशासनातील तपशिलाची ओळख करून घेण्यासाठी काही कालावधी लागतो आणि त्यांच्या कार्यकाळाचे शेवटचे वर्ष येऊ घातलेल्या सार्वत्रिक निवडणुकीच्या तयारीमध्ये जाते. नियोजनबद्ध प्रशासनासाठी चार वर्षांच्या काळात त्यांना पुरेसा वेळ मिळू शकणार नाही.

**अनुच्छेद १०७ आणि २०० :**

१०. **सर्वोच्च न्यायालय आणि उच्च न्यायालये.**---इंग्लंड आणि अमेरिकेत असलेल्या प्रचलित प्रथेप्रमाणे काही विशिष्ट परिस्थितीत विशिष्ट प्रकरणे हाताळण्याकरिता सर्वोच्च न्यायालय आणि उच्च न्यायालय यातील निवृत्त न्यायाधिशांना पाचारण करण्यात यावे असे समितीने सुचविले आहे.

**अनुच्छेद १३१ :**

११. **राज्यपालांच्या निवडीची प्रक्रिया.**---समितीच्या काही सभासदांना असे वाटते की निर्वाचित राज्यपाल आणि विधिमंडळाला जबाबदार असलेला मुख्यमंत्री यांचे सहअस्तित्व संघर्ष निर्माण करू शकेल. त्यामुळे समितीने राज्यपालांच्या नियुक्तीची पर्यायी प्रक्रिया सुचविली आहे : विधिमंडळानी चार व्यक्तींच्या नावाची एक यादी सुचवावी (ते त्या राज्याचे रहिवासी असलेच पाहिजेत असे नाही.) आणि संघराज्याच्या राष्ट्रपतीने त्या चार पैकी एकाची राज्यपालपदी नियुक्ती करावी.

**अनुच्छेद १३८ :**

१२. उपराज्यपाल.---उपराज्यपालांच्या प्रावधानाची गरज आहे असे समितीला वाटत नाही कारण राज्यपाल कार्यरत असेपर्यंत उपराज्यपालाला करण्यासारखे काहीही असणार नाही. केंद्रातील परिस्थिती मात्र वेगळी आहे.

कारण उपराष्ट्रपती हा राज्यसभेचा पदसिद्ध अध्यक्ष आहे. परंतु बऱ्याचशा राज्यांमध्ये वरिष्ठ सभागृह असणार नाही आणि उपराष्ट्रपतीप्रमाणे उपराज्यपालांना काम सोपविणे शक्य होणार नाही. मसुद्यात अशी तरतूद आहे की, अनपेक्षित परिस्थिती निर्माण झाल्यास विधिमंडळाला (किंवा राष्ट्रपतीला) राज्यपालांनी करावयाच्या कामांचा निर्णय घेण्याचा अधिकार देण्यात आला आहे.

## अनुच्छेद २१२ ते २१४ :

१३. **केंद्रशासित क्षेत्रे.**––संविधान सभेने पारित केलेल्या ठरावानुसार आपण अध्यक्ष या नात्याने दिल्ली, अजमेर-मारवाड, कूर्ग, पंथ-पिपलोडा आणि अंदमान व निकोबार बेटे या केंद्रशासित प्रदेशांसाठी संविधानात्मक बदल सुचविण्याच्या उद्देशाने सात सदस्यांची एक समिती नियुक्त केली होती. त्या समितीने आपला अहवाल २१ ऑक्टोबर १९४८ रोजी सादर केला. थोडक्यात समितीच्या शिफारसी पुढीलप्रमाणे होत्या––

(१) दिल्ली, अजमेर-मारवाड आणि कूर्ग या प्रांतांसाठी राष्ट्रपतीने नायब राज्यपालाची नियुक्ती करावी.

(२) या प्रत्येक प्रांताचा कारभार विधिमंडळाला जबाबदार असलेल्या मंत्रिमंडळाकडे राहील.

(३) या प्रत्येक प्रांतात निवडलेले विधिमंडळ राहील. पंथ-पिपलोडा बाबत समितीने असे सुचविले की, ते अजमेर-मारवाडशी जोडण्यात यावे आणि अंदमान व निकोबार बेटांबाबत समितीने सुचविले की, सद्यःस्थितीप्रमाणे भारत सरकारने आवश्यक ते बदल करून त्याचा कारभार पाहावा. दुसऱ्या शब्दात, ही बेटे मुख्य आयुक्तांचा प्रांत म्हणून अस्तित्वात राहातील. या समितीतील अजमेर-मारवाडचे आणि कूर्गचे प्रतिनिधीत्व करणाऱ्या सभासदांनी समितीच्या अहवालाला आपले स्वतःचे मतपत्र जोडले, ज्यात त्यांनी असे म्हटले की, लहान भूप्रदेश, भौगोलिक स्थान आणि या प्रदेशातील संसाधनांची कमतरता यातून निर्माण होणाऱ्या विशेष समस्यांमुळे नजिकच्या भविष्यात ते लगतच्या प्रदेशांनी जोडले जाण्याची शक्यता नाही. त्यामुळे त्यांनी आग्रह केला की, संबंधित लोकांच्या इच्छेची पडताळणी केल्यानंतर हे शक्य होण्यासाठी संविधानात विशेष तरतूद करण्यात यावी.

दिल्लीच्या संबंधाने समितीला असे वाटते की, दिल्ली ही भारताची राजधानी असल्यामुळे ती स्थानिक प्रशासनाअंतर्गत ठेवणे उचित होणार नाही. अमेरिकेत सरकारचे स्थान कुठे असावे ह्या विषयी वैधानिक

अधिकाराचा वापर केवळ काँग्रेसच करते अशीच स्थिती ऑस्ट्रेलियात सुद्धा आहे. म्हणून मसुदा समिती या निष्कर्षाला पोहचली की, अस्थायी समितीने सुचविल्यापेक्षा अधिक व्यापक योजना असावयास हवी. त्यानुसार मसुदा समितीने सुचविले आहे की, भारत सरकारच्या वतीने त्या केंद्रशासित क्षेत्रांचा कारभार एक तर मुख्य आयुक्त किंवा नायब राज्यपाल किंवा शेजारील राज्याचा राज्यपाल किंवा शासक यांच्यामार्फत व्हावा. एका विशिष्ट क्षेत्रासाठी काय केले जावे हे राष्ट्रपतीने आदेश काढून ठरवावयाचे आहे. अर्थातच याबाबत, इतर बाबींप्रमाणे, राष्ट्रपती प्रभारी मंत्र्यांच्या सल्ल्याप्रमाणे वागतील. त्यांना सल्ला दिल्यास ते दिल्लीसाठी नायब राज्यपाल नियुक्त करतील, त्यांना असाच सल्ला दिल्यास ते मद्रासच्या राज्यपालांमार्फत कूर्गचा किंवा कूर्गच्या लोकांची इच्छा जाणून म्हैसूरच्या शासकाच्या द्वारा कारभार पाहातील. अध्यादेशाच्या माध्यमातून ते स्थानिक विधिमंडळ किंवा सल्लागार मंडळ यांची नियुक्ती करु शकतील. त्यांचे स्वरुप, अधिकार आणि कार्य अध्यादेशात निर्देशित केल्याप्रमाणे राहातील. मसुदा समितीला संबंधित प्रदेशांच्या विभिन्न गरजांशी जुळणारी ही लवचिक योजना वाटते.

समितीने अशीही तरतूद केली आहे की, भारतीय संस्थानांचे (Indian States) जशी ओरिसात आहेत व ज्यांनी आपली संपूर्ण सत्ता, कार्यक्षेत्र आणि अधिकार केंद्र सरकारकडे सोपविली आहेत, त्यांचे प्रशासन ते केंद्रशासित क्षेत्रे समजून, मुख्य आयुक्त, नायब राज्यपाल किंवा शेजारील राज्याचा राज्यपाल अथवा शासक यांच्यामार्फत प्रत्येक क्षेत्राच्या गरजेनुसार करण्यात येईल.

## अनुच्छेद २१६ ते २३२ :

१४. **वैधानिक अधिकारांची विभागणी.**---केंद्रीय अधिकार समितीने शिफारस केल्याप्रमाणे आणि संविधान सभेने स्वीकारल्याप्रमाणे वैधानिक सूचितील बहुतेक भागात बदल केला नाही, परंतु मसुदा समितीने बदल केलेल्या तीन बाबींकडे मी आपले लक्ष वेधू इच्छितो.

(अ) समितीने असे सुचविले आहे की, जेव्हा सर्वसाधारणपणे राज्यसूचीत समाविष्ट असलेल्या विषयाला राष्ट्रीय महत्त्व प्राप्त होते तेव्हा त्याबाबत केंद्रीय संसद कायदा करु शकते. राज्याच्या अधिकारावर अनावश्यक अतिक्रमण होणार नाही यादृष्टीने यासाठी मसुद्यात अशी तरतूद करण्यात आली आहे की,

राज्यसभेत जिथे राज्यांचे घटक म्हणून प्रतिनिधीत्व असते तिथे, २/३ बहुमताने या संदर्भात ठराव पारित झाल्यास केंद्राला तसे करता येईल.

(ब) शेतजमिनीव्यतिरिक्त इतर संपत्तीवरील वारसा हक्काचाच नव्हे तर वारसाहक्काशी संबंधित सर्व विषयांचा सामायिक सूचित अंतर्भाव करणे योग्य होईल असा समितीने विचार केला आहे. त्याचप्रमाणे ज्या बाबी विविध प्रकारच्या वैयक्तिक कायद्यांनी सध्या ठरतात त्या सर्व बाबींचा अंतर्भाव समितीने समवर्ती सूचित केला आहे. यामुळे यासंबंधी भारतात एक समान कायदा निर्माण करणे सोईचे होईल.

(क) केंद्राच्या उपयोगासाठी भूमी संपादनाचा कायदा केंद्र सूचित आणि राज्याच्या उपयोगासाठी भूमी संपादनाचा कायदा राज्य सूचित अंतर्भूत केला आहे. समितीने असे सुचविले आहे की, ज्या तत्त्वावर संपादित केलेल्या भूमीची भरपाई निश्चित केली जाईल अशा सर्व प्रकरणांचा समावेश समवर्ती सूचित राहील की जेणेकरुन याबाबत एकवाक्यता निर्माण होऊ शकेल.

याशिवाय सध्याची वैचित्र्यपूर्ण परिस्थिती पाहता जिथे आवश्यक वस्तुंच्या पुरवठ्यावर केंद्राच्या नियंत्रणाची गरज आहे, त्याबाबत समितीने असे सुचविले आहे की संविधानाची अंमलबजावणी सुरु झाल्यापासून पाच वर्षांच्या ठराविक कालावधीसाठी आवश्यक वस्तुंचे उत्पादन, पुरवठा व वितरणाच्या, त्याचप्रमाणे विस्थापित लोकांच्या मदत आणि पुनर्वसनासाठी आवश्यक वस्तुंचा व्यापार व वाणिज्य समवर्ती सूचीतील विषयांप्रमाणेच राहील. हे धोरण स्वीकारताना समितीने भारत कायदा १९४६ च्या (केंद्रीय सरकार आणि विधिमंडळ) कायद्यातील तरतुदींचे अनुसरण केले आहे.

### अनुच्छेद २४७ ते २६९ :

१५. **वित्तीय तरतूदी.**—व्यापक दृष्टीने विचार करता केंद्र आणि राज्ये यातील महसूलाच्या वितरणाशी संबंधित बाबींशिवाय, तज्ञ वित्त समितीने केलेल्या सर्व शिफारशी मसुदा समितीने मसुद्यात अंतर्भूत केल्या आहेत. या क्षेत्रात सध्या अस्तित्वात असलेले अस्थिर वातावरण पाहता मसुदा समितीने असा विचार केला आहे की, येत्या पाच वर्षांच्या काळाकरिता महसुलाच्या वितरण क्षेत्रात जैसे थे स्थिती कायम ठेवणेच योग्य होईल. शेवटच्या वर्षी वित्त आयोग परिस्थितीचा आढावा घेवू शकेल.

### अनुच्छेद २८१ ते २८३ :

१६. **सेवा.**—सेवांशी संबंधित सखोल तपशीलवार तरतुदी संविधानात अंतर्भूत करण्याचे समितीने टाळले आहे. संवैधानिक तरतुदी करण्यापेक्षा सुयोग्य विधिमंडळांनी कायदे करुन त्याचे नियमन करावे असा समितीने

विचार केला. समिती या मताची आहे की इतर देशांप्रमाणे या देशातील भावी विधिमंडळे सेवाक्षेत्राला निःपक्षपातीपणे हाताळतील.

**अनुच्छेद २८९ ते २९१ :**

१७. **निवडणूक, मतदान हक्क इत्यादि.**—मतदार संघांची क्षेत्रे आखून देण्यासहित मतदानविषयक तपशील संविधानात अंतर्भूत करण्याची गरज समितीला वाटली नाही. सहाय्यक कायदे मंडळावर हे काम करण्याचे सोपविले आहे.

**अनुच्छेद ३०४ :**

१८. **संविधान दुरुस्ती.**—समितीने काही निर्धारित बाबींच्यासंदर्भात राज्य विधिमंडळाकरिता सीमित संवैधानिक अधिकारांच्या तरतुदींचा समावेश केला आहे.

**अनुच्छेद २९२, २९४ आणि ३०५ :**

१९. **अल्पसंख्यांकांना संरक्षण.**—विधिमंडळातील जागांमध्ये आणि लोकसेवांमधील जागांमध्ये राखीव जागा असण्याबाबत सल्लागार समिती आणि संविधान सभेने घेतलेल्या निर्णयांना मसुद्यात अंतर्भूत केले आहे. या तरतुदी भारतीय संस्थानांना लागू होत नसल्या तरी भारताचे व्यापक हित पाहता भारतीय संस्थानांनी तेथील अल्पसंख्यांकांसाठी अशाच स्वरूपाच्या तरतुदी स्वीकाराव्या. मसुदा समितीने या बाबीच्या महत्त्वाकडे आपले लक्ष वेधावे असे मला निक्षून सांगितले आहे.

**परिशिष्ट १ ले :**

२०. **भाषावार प्रांत.**—पहिल्या परिशिष्टाचा भाग १ आणि त्याच्या तळटीपेकडे मी आपले खास लक्ष वेधू इच्छितो. संविधान अंतिमतः स्वीकारण्यापूर्वी जर आंध्र किंवा दुसऱ्या कोणत्याही भाषिक प्रांताचा या परिशिष्टात उल्लेख करावयाचा असेल तर भारत सरकार कायदा १९३५ च्या अनुच्छेद २९० अंतर्गत अशासाठी राज्यपालांचे प्रांत अशी स्वतंत्रपणे योजना करण्यासाठी लवकरात लवकर पाऊले उचलावी लागतील. अर्थातच नवीन संविधानात नवीन राज्यांच्या निर्मितीच्या तरतुदी आहेत. परंतु हे नवीन संविधानाच्या अंमलबजावणी नंतरच घडून येणार आहे.

**परिशिष्टे ५ व ६ :**

२१. **अनुसूचित जमाती, अनुसूचित क्षेत्रे आणि जमाती क्षेत्रे.**—या विषयाशी संबंधित उपसमित्यांनी केलेल्या शिफारसी समितीने परिशिष्टांमध्ये समाविष्ट केल्या आहेत.

२२. श्री. अल्लादी कृष्णास्वामी अय्यर यांनी काही मुद्यांबाबत (कोणताही तात्त्विक प्रश्न निर्माण होऊ न देता) एक स्वतंत्र तयार केलेले टिपण त्यांच्या विनंतीनुसार मसुद्यात जोडले आहे.

२३. हे अवघड कार्य पार पाडीत असताना समितीला संवैधानिक सल्लागार श्री. बी. एन. राव, उपसचिव आणि मसुद्याचा आराखडा तयार करणारे श्री. एस. एन. मुखर्जी आणि संविधान समिती सचिवालयाचा कर्मचारी वर्ग यांनी केलेल्या सहकार्याच्या प्रति समितीची कृतज्ञता नमूद न करता हे मसुदा संविधान मी आपणास सादर करु शकत नाही.

आपला विश्वासू ,

**बी. आर. आंबेडकर** '' [१]

संविधानाचा मसुदा दिनांक २६ फेब्रुवारी १९४८ ला भारत सरकारच्या गॅझेट मध्ये लोकांच्या माहितीसाठी व लोकांची मते जाणून घेण्यासाठी प्रकाशित करण्यात आला. लोकांपुढे तो जवळपास आठ महिने होता. त्यानंतर ४ नोव्हेंबर १९४८ ला डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी तो संविधान सभेला सादर केला. याप्रसंगी त्यांनी केलेल्या भाषणाला संविधान सभेच्या आणि देशाच्याही इतिहासात अनन्यसाधारण महत्त्व आहे. या भाषणाचा परिणाम म्हणूनच संविधान सभेच्या बहुतेक सदस्यांनी डॉ. आंबेडकरांची एक व्यासंगी, घटनेचा सखोल अभ्यासक आणि अधिकारवाणीने संविधानावर भाष्य करणारा, संविधान निर्मितीची क्षमता असणारा संविधानकार अशी प्रशंसा केली. काही निवडक सदस्यांच्या या संदर्भातील भावना व्यक्त करणाऱ्या भाषणातील काही भाग पुढील प्रमाणे---

'' **टी. टी. कृष्णम्माचारी**---सभागृहाला जाणीव असेल की, तुम्ही नियुक्त केलेल्या सात सदस्यांपैकी एकाने राजीनामा दिला व त्याचे जागी दुसरा नेमण्यात आला. एक सदस्य मरण पावले व ती जागा भरण्यातच आली नाही. एक सदस्य दूर अमेरिकेत होते व त्यांचीही जागा कोणी भरली नाही व दुसरा एक जण संस्थानाच्या कारभारात गुंतलेला होता व तेवढ्यापुरती तीही जागा रिकामी होती. एक किंवा दोन सदस्य दिल्लीपासून बरेच दूर राहत व प्रकृती अस्वास्थ्यामुळे हजर राहू शकले नाहीत. तेव्हा हे संविधान तयार करण्याचे ओझे अंतिमतः डॉ. आंबेडकरांवर पडले व त्यांनी हे जबाबदारीचे काम यशस्वीरीत्या पार पाडले. हे त्यांचे कार्य निःसंशय प्रशंसनीय आहे व याबद्दल आपण सर्व त्यांचे ऋणी आहोत.

---

[१] डॉ. बाबासाहेब आंबेडकर रायटिंग अँड स्पिचेस, खंड १३, पृष्ठ ९५ ते १०४.

**काझी सय्यद करिमुद्दीन**––संविधानाचा मसुदा विचारार्थ ठेवण्याच्या प्रस्तावावर डॉ. आंबेडकरांनी केलेल्या प्रास्ताविक भाषणाबद्दल मी त्यांचे अभिनंदन करतो. त्यांचे भाषण लक्षणीय होते आणि मला खात्री आहे की, पुढील पिढ्यांपर्यंत एक महान घटनाकार म्हणून त्यांची निश्चितपणे नोंद होईल.

**डॉ. पी. एस. देशमुख**––माझे सन्माननीय मित्र डॉ. आंबेडकरांचे भाषण उत्कृष्ट दर्जाचे होते. सादर करण्यात आलेल्या मसुद्यावरील ते परिणामकारक भाष्य होते. सर्वांना विदितच आहे, ते एक नामांकित वकील आहेत आणि मला वाटतं त्यांच्यावरील जबाबदारी त्यांनी समर्थपणे पार पाडली. जर त्यांना पूर्ण मोकळीक मिळाली असती तर या संविधानाला त्यांना वेगळा आकार देता आला असता.

**डॉ. जोसेफ अल्बन डिसूझा**––सुरवातीपासून शेवटपर्यंत तज्ञांना शोभेल असे तुलनात्मकदृष्ट्या श्रेष्ठ, स्वीकारण्यायोग्य, कार्यक्षम स्वरूपाचे संस्मरणीय दस्तावेज डॉ. आंबेडकर आणि त्यांच्या मसुदा समितीने सादर केले आहे ''.[१]

दिनांक ४ नोव्हेंबर १९४८ रोजी संविधानाचा मसुदा संविधान सभेला सादर करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

'' अध्यक्ष महोदय,

मसुदा समितीने संमत केलेला संविधानाचा मसुदा मी विचारार्थ या सभागृहास सादर करीत आहे.

ही मसुदा समिती, संविधान सभेत २९ ऑगस्ट, १९४७ रोजी पारित प्रस्तावानुसार नियुक्त करण्यात आली होती. संविधान सभेने नेमलेल्या केन्द्रीय अधिकार समिती, केन्द्रीय संविधान समिती, प्रांतीय संविधान समिती आणि मूलभूत अधिकार, अल्पसंख्यांक व आदिवासी क्षेत्रे इत्यादिंच्या सल्लागार समितींच्या अहवालावर संविधान सभेने घेतलेल्या निर्णयांच्या अनुषंगाने संविधान निर्मितीची जबाबदारी मसुदा समितीवर सोपविण्यात आली होती. संविधान सभेने असाही निर्देश दिला होता की काही विशिष्ट बाबतीत भारत सरकार कायदा १९३५ च्या तरतुदींचा अवलंब करण्यात यावा. संविधान सभेने दिलेल्या निर्देशांपैकी मसुदा समिती कोणत्या बाबींचा विचार करणार नाही व कोणत्या बाबींमध्ये बदल करून पर्याय सुचविले आहेत याचा उल्लेख मी माझ्या २१ फेब्रुवारी १९४८ च्या पत्रात केला आहे. एवढा अपवाद वगळता संविधान सभेने दिलेल्या निर्देशांचे मसुदा समितीने प्रामाणिकपणे पालन केल्याचे आढळून येईल असा मला विश्वास आहे.

---

[१] डॉ. बाबासाहेब आंबेडकर रायटिंग अँड स्पिचेस, खंड १३ मधील पृष्ठ क्रमांक ७२, ७३, ७४, ७५ आणि ७७ वरील मूळ इंग्रजी उताऱ्याचे मराठी भाषांतर अतिथी संपादक मंडळाने केले आहे.

मसुदा समितीने निर्माण केलेला हा संविधानाचा मसुदा एक असाधारण दस्तावेज आहे. यात ३१५ अनुच्छेद आणि ८ परिशिष्टे अंतर्भूत आहेत. संविधानाचा हा मसुदा इतर कोणत्याही देशाच्या संविधानाच्या तुलनेत अधिक विस्तृत झाला आहे हे मान्यच केले पाहिजे. ज्यांनी याचे वाचन केले नाही त्यांना या मसुद्याची ठळक आणि विशेष वैशिष्ट्ये कळू शकणार नाहीत.

संविधानाचा हा मसुदा आठ महिनेपर्यंत लोकांसमोर उपलब्ध होता. एवढा प्रदीर्घ कालावधी मित्र, टीकाकार व विरोधक यांना यातील तरतुदींवर त्यांची प्रतिक्रिया व्यक्त करण्यासाठी पुरेसा होता. यातील काही प्रतिक्रिया अनुच्छेदांचा अर्थ न कळल्यामुळे किंवा चुकीचा अर्थ लावल्यामुळे व्यक्त करण्यात आल्यात असे मी निश्चितपणे म्हणू शकतो. काहीही असो, आक्षेप घेण्यात येत आहेत तेव्हा त्यांना उत्तर दिलेच पाहिजे.

या दोन्ही कारणास्तव हा मसुदा विचारार्थ प्रस्तुत करताना संविधानाच्या ठळक वैशिष्ट्यांकडे मी आपले लक्ष वेधू इच्छितो. सोबतच घेण्यात आलेल्या आक्षेपांनाही उत्तर देऊ इच्छितो. त्यापूर्वी संविधान सभेने नेमलेल्या तीन समित्यांचे अहवाल मी सभागृहास सादर करू इच्छितो.--(१) मुख्य आयुक्तांच्या प्रांतांसंबंधी अहवाल (२) केन्द्र आणि राज्यांच्या अर्थसंबंधविषयक तज्ज्ञ समितीचा अहवाल व (३) आदिवासी क्षेत्रांसंबंधी सल्लागार समितीचा अहवाल, जो मसुदा समितीला विचारार्थ बराच उशिरा मिळाला तरी त्याच्या प्रती सभागृहातील सर्व सदस्यांना वितरित करण्यात आल्या आहेत. हा अहवाल आणि त्यातील शिफारसींचा मसुदा समितीने विचार केला असला तरी या सभागृहापुढे औपचारिकदृष्ट्या ठेवणे उचित होईल.

आता मुख्य विषयाकडे वळू या. संविधान विषयक कायद्याचा विद्यार्थी, संविधान हाती पडल्यावर दोन प्रश्न निश्चितपणे विचारील. पहिला, संविधानाला शासनाचा कोणता प्रकार अभिप्रेत आहे व दुसरा प्रश्न म्हणजे संविधानाचे स्वरूप कोणते आहे ? हे दोन प्रश्न इतके महत्त्वपूर्ण आहेत की, प्रत्येक संविधानाला त्यांचा विचार करावाच लागतो. या दोन प्रश्नांपैकी मी पहिला प्रश्न आधी विचारात घेतो.

संविधानाच्या मसुद्यात भारतीय संघ राज्याच्या सर्वोच्चपदी कार्यकारी अधिकाऱ्याची तरतूद आहे ज्याला संघाचा राष्ट्रपती म्हटले जाईल. या कार्यकारी अधिकाऱ्याचा हुद्दा आपल्याला अमेरिकेच्या अध्यक्षपदाची आठवण करुन देतो. परंतु नावाच्या सादृष्याव्यतिरिक्त अमेरिकेतील शासनपद्धती आणि मसुदा समितीने पुरस्कृत केलेली शासनपद्धती यात कोणतेही साम्य नाही. अमेरिकेतील शासनपद्धतीला अध्यक्षीय शासनपद्धती म्हणतात. संविधानाच्या मसुद्यात संसदीय प्रणाली पुरस्कृत केली आहे. या दोन्हीमध्ये मूलभूत फरक आहे.

अमेरिकेच्या अध्यक्षीय प्रणालीत अध्यक्ष हा कार्यकारी मंडळाचा प्रमुख असतो. सर्व प्रशासन त्याच्या स्वाधीन असते. संविधान मसुद्याअंतर्गत राष्ट्रपतींचे स्थान हे इंग्लंडच्या संविधानातील राजाच्या स्थानाप्रमाणे आहे. तो राज्याचा प्रमुख आहे, परंतु कार्यकारी मंडळाचा नाही. तो राष्ट्राचे प्रतिनिधीत्व करतो परंतु राष्ट्राचे प्रशासन करीत नाही. तो राष्ट्राचे प्रतीक आहे. प्रशासनातील त्याचे स्थान प्रतिकात्मक शिक्क्याचे असून राष्ट्राचे निर्णय त्याच्या सही-शिक्क्यानिशी घोषित करण्यात येतात. अमेरिकेच्या संविधानानुसार अध्यक्षाच्या अधिकारात विविध विभागाचे सचिव कार्यरत असतात. त्याचप्रमाणे भारतीय संघराज्याच्या राष्ट्रपतीच्या अधिकारात विविध प्रशासकीय विभागांचे मंत्री कार्यरत राहतील. इथे पुन्हा या दोन्हीमध्ये मूलभूत फरक आहे. कोणत्याही सचिवाने दिलेला सल्ला मान्य करण्याचे बंधन अमेरिकेच्या राष्ट्राध्यक्षावर नाही. भारतीय संघराज्याच्या राष्ट्रपतीला मात्र त्याच्या मंत्र्यांनी दिलेला सल्ला मान्य करणे साधारणतः बंधनकारक आहे. ते त्यांनी दिलेल्या सल्ल्याच्या विरोधात, तसेच त्यांच्या सल्ल्याशिवाय काहीही करू शकत नाही. अमेरिकेचे अध्यक्ष कोणत्याही सचिवाला कोणत्याही वेळी पदमुक्त करू शकतात. भारतीय संघराज्याच्या राष्ट्रपतीला मात्र संसदेत जोपर्यंत मंत्र्यांच्या पाठीशी बहुमत आहे तोपर्यंत त्याला तसे करण्याचा अधिकार नाही.

अमेरिकेतील अध्यक्षीय शासनपद्धती ही कार्यकारी मंडळ आणि कायदे मंडळ यांच्या विभाजनावर आधारित आहे, जेणेकरून अध्यक्ष आणि त्यांचे सचिव हे काँग्रेसचे सदस्य नसतात. मसुदा संविधानाला ही तत्त्वप्रणाली मान्य नाही. भारतीय संघराज्याचे मंत्री हे संसदेचे सभासद असतील, केवळ संसदेचे सभासदच मंत्री होऊ शकतील. संसदेच्या अन्य सभासदांप्रमाणेच मंत्र्यांनाही अधिकार असतात, जसे, ते संसदेत बसू शकतात, चर्चेमध्ये सहभागी होऊ शकतात आणि तिच्या कामकाजात मतदान करू शकतात. अर्थात दोन्ही शासनपद्धती या लोकशाहीप्रधान आहेत आणि दोन्हीतून एकीची निवड करणे हे इतके सोपे नाही. लोकशाहीसत्तात्मक कार्यकारी मंडळाला दोन अटींची पूर्तता करावी लागते. एक--कार्यकारी मंडळ स्थिर असायला हवे आणि दोन--कार्यकारी मंडळ उत्तरदायी असले पाहिजे. दुर्दैवाने या दोन्हींची समप्रमाणात हमी देणारी पद्धती आतापर्यंत तरी अस्तित्वात येवू शकली नाही. अधिक स्थैर्य आणि कमी जबाबदारी अंतर्भूत असणारी पद्धत तुम्हाला मिळू शकेल किंवा अधिक जबाबदारी व कमी स्थैर्य असणारी पद्धत मिळू शकेल. अमेरिका व स्वित्झरलँडमधील शासनपद्धतीत स्थैर्य अधिक पण जबाबदारी कमी आहे. दुसरीकडे ब्रिटिश शासनपद्धती अधिक जबाबदार असून त्यात स्थैर्य मात्र कमी आहे. याचे कारण स्पष्ट आहे. अमेरिकेचे

कार्यकारी मंडळ हे असांसदीय आहे. याचा अर्थ, स्वतःच्या अस्तित्वाकरिता ते काँग्रेसमधील बहुमतावर अवलंबून नाही. याउलट इंग्लंडमध्ये संसदीय कार्यकारी मंडळ आहे, याचा अर्थ त्याचे अस्तित्व संसदेतील बहुमतावर अवलंबून आहे. असांसदीय कार्यकारी मंडळ असल्याने अमेरिकेतील काँग्रेस त्या कार्यकारी मंडळाला बरखास्त करू शकत नाही. सांसदीय शासनाला मात्र सभागृहातील बहुसंख्य सभासदांचा विश्वास गमावल्याक्षणी राजीनामा द्यावाच लागतो. जबाबदारीच्या दृष्टिकोनातून पाहता असांसदीय कार्यकारी मंडळ हे संसदेशी संबंधित नसल्याने ते विधिमंडळाला कमी जबाबदार असते. याउलट संसदीय कार्यकारी मंडळ हे संसदेतील बहुमतावर अधिक अवलंबून असल्याने ते अधिक जबाबदार असते. सांसदीय पद्धती ही असांसदीय पद्धतीपेक्षा अधिक जबाबदार असते एवढाच या दोन्हीत फरक आहे असे नसून त्यांच्या जबाबदारीचे मूल्यमापन करण्याचा काळ आणि यंत्रणा याबाबतीतही त्या भिन्न आहेत. असांसदीय शासनपद्धतीत, जी अमेरिकेत अस्तित्वात आहे, कार्यकारी मंडळाच्या जबाबदारीचे मूल्यमापन कालबद्ध असते. ते दोन वर्षातून एकदा होते. ते मतदारांकडून केले जाते. संसदीय शासनपद्धती असलेल्या इंग्लंडमध्ये कार्यकारी मंडळाच्या जबाबदारीचे मूल्यमापन दैनंदिन व कालबद्ध अशा दोन्हीप्रकारे होते. प्रश्न, ठराव, अविश्वास प्रस्ताव, स्थगन प्रस्ताव आणि भाषणांवरील चर्चा या माध्यमातून सभागृहातील सदस्य दैनंदिन मूल्यमापन करतात. कालबद्ध मूल्यमापन दर पाच वर्षांनी किंवा त्यापूर्वीही होणाऱ्या निवडणुकीच्या वेळी मतदारांकडून होते. असे म्हटले जाते की, अमेरिकेत अस्तित्वात नसलेले जबाबदारीचे दैनंदिन मूल्यमापन कालबद्ध मूल्यमापनापेक्षा अधिक परिणामकारक असून भारतासारख्या देशाला त्याची अधिक गरज आहे. कार्यकारी मंडळाचा विचार करताना संसदीय पद्धतीची शिफारस करून मसुदा संविधानाने स्थिरतेपेक्षा जबाबदारीच्या तत्त्वाला प्राधान्य दिले आहे.

मी आतापर्यंत मसुदा संविधानातील शासनाच्या प्रकाराचे विवरण केले आहे. आता मी संविधानाचा प्रकार या दुसऱ्या प्रश्नाकडे वळतो.

इतिहासात संविधानाचे दोन प्रमुख प्रकार आढळतात. एक संघीय (Unitary) आणि दुसरा संयुक्त संघीय (Federal). संविधानाची दोन अंगभूत वैशिष्ट्ये आहेत. (१) केन्द्रस्थानी सर्वाधिकार असणे आणि (२) सहाय्यक सार्वभौम सत्तांचा अभाव. याउलट संयुक्त संविधानात : (१) केन्द्रीय सत्तेसोबतच सहाय्यक सत्ता अस्तित्वात असणे आणि (२) यातील प्रत्येक सत्ता नेमून दिलेल्या क्षेत्रात सार्वभौम असणे या बाबी अंतर्भूत आहेत. दुसऱ्या शब्दात संयुक्त संविधान म्हणजे दोन सत्ता केन्द्रे अस्तित्वात

असणे होय. दुहेरी सत्ता केन्द्र अस्तित्वात असण्यापर्यंत मसुदा संविधान हे संयुक्त संविधानासारखे आहे. प्रस्तावित संविधानातील दुहेरी सत्ता केन्द्रात केन्द्रस्थानी एक संघराज्य असेल आणि त्याच्या परिघात घटक राज्ये असतील. संविधानाने त्यांच्यासाठी निर्धारित केलेल्या क्षेत्रात त्यांना बहाल केलेल्या सार्वभौम अधिकारांचा उपयोग करण्यासाठी ती स्वतंत्र असतील. अमेरिकेतसुद्धा दुहेरी सत्ता केन्द्रे आहेत, त्यापैकी एकाला संयुक्त सरकार व दुसऱ्याला राज्य सरकारे म्हणतात, जी प्रस्तावित संविधानातील संघराज्य व घटकराज्ये यांच्याशी साधर्म्य राखणारी आहेत. अमेरिकेच्या संविधानात संयुक्त सरकार हे केवळ राज्यांचा संघ नाही, तसेच घटकराज्ये ही संयुक्त सरकारचे प्रशासकीय घटक किंवा अभिकर्ते नाहीत. अशाच प्रकारे मसुदा संविधानात निर्देशित केल्याप्रमाणे भारतीय संविधान हे राज्यांचा संघ नाही. तसेच घटक राज्ये ही केन्द्र सरकारचे प्रशासकीय घटक किंवा अभिकर्त्या संस्था नाहीत. याठिकाणी भारत आणि अमेरिकेच्या संविधानातील समानता संपुष्टात येते. दोन्ही संविधानातील या समानतेपेक्षा, दोन्हींना एक दुसऱ्यापासून वेगळे करणारे भेद अधिक मूलभूत आणि नजरेत भरण्यासारखे आहेत.

अमेरिकन संघराज्य व भारतीय संघराज्य यात दोन प्रमुख भेद आहेत. अमेरिकेतील दुहेरी सत्ताकेन्द्राची प्रणाली ही दुहेरी नागरिकत्वाशी निगडित आहे. अमेरिकेत एक देशाचे नागरिकत्व आहे. परंतु त्याचवेळी तिथे घटक राज्याचेही नागरिकत्व आहे. अमेरिकेच्या संविधानात झालेल्या १४ व्या घटना दुरूस्तीमुळे दुहेरी नागरिकत्वाचा ताठरपणा बराच शिथील करण्यात आला आहे. यामुळे, अमेरिकेच्या नागरिकाचे हक्क, विशेषाधिकार आणि स्वातंत्र्य काढून घेण्यावर राज्यांना प्रतिबंध करण्यात आला आहे. त्याचवेळी विलियम अँडरसन यांनी निदर्शनास आणल्याप्रमाणे, मतदानाचा अधिकार आणि सरकारी सेवेमधील संधी इत्यादी राजकीय बाबतीत राज्ये स्वतःच्या नागरिकांच्या बाजूने पक्षपात करू शकतात आणि करतात. हा पक्षपात अनेक बाबतीत टोकालाही जातो. राज्यात किंवा स्थानिक स्वराज्य संस्थेमध्ये नोकरी मिळण्यासाठी बहुतांश ठिकाणी तो त्याच राज्याचा रहिवासी किंवा नागरिक असावा लागतो. कायदा, औषधी आदि क्षेत्रात, सार्वजनिक व्यवसायाला आवश्यक असणारा परवाना मिळविण्यासाठी राज्याचा रहिवासी किंवा नागरिक असणे याची बरेचदा गरज असते. ज्या मद्यविक्री आणि कर्जरोखे सारख्या व्यवसायात शासकीय कायदे कठोरपणे पालन करण्याची गरज असते, तिथेही वर उल्लेखिलेल्या अटींची पूर्तता करावी लागते.

स्वतःच्या नागरिकांच्या विशेष लाभासाठी प्रत्येक घटक राज्याला त्यांच्या कार्यक्षेत्रात काही विशेष अधिकार बहाल करण्यात आले आहेत. उदा. शिकार आणि मच्छिमारी त्या अर्थाने राज्याच्या अधिकारात असतात. शिकार आणि मच्छिमारी करिता आवश्यक असलेला परवाना मिळविण्यासाठी राज्याचा रहिवासी नसलेल्या व्यक्तिकडून राज्याचा रहिवासी असलेल्या व्यक्तिपेक्षा अधिक शुल्क आकारण्याचा प्रघात आहे. राज्यातील महाविद्यालये व विद्यापिठीय प्रवेशासाठी राज्याचा रहिवासी नसलेल्यांकडून अधिक शुल्क आकारण्यात येते. आणि आणीबाणीचा प्रसंग सोडल्यास इस्पितळे आणि अनाथालयात राज्यातील लोकांनाच प्रवेश देण्यात येतो.

थोडक्यात, असे अनेक अधिकार आहेत की जे राज्य सरकार केवळ आपल्या नागरिकांना आणि रहिवाश्यांनाच देते, रहिवासी नसलेल्यांना ते कायदेशीररित्या नाकारले जातात, अथवा रहिवाश्यांपेक्षा रहिवासी नसलेल्यांवर अधिक कठीण अटी लावून ते बहाल करण्यात येतात. स्वतःच्या राज्यातील नागरिकांना मिळालेल्या या सवलतींमुळे राज्याच्या नागरिकत्वाला एक विशेष दर्जा प्राप्त होतो. या सर्वांचा साकल्याने विचार करता राज्याचा नागरिक असणाऱ्या आणि नसणाऱ्याच्या अधिकारात बराच फरक दिसून येतो. तात्कालिक आणि अल्पकालीन वास्तव्यास असणाऱ्यांना प्रत्येक ठिकाणी काही विशेष अडचणींना तोंड द्यावेच लागते.

प्रस्तावित भारतीय संविधानात दुहेरी राज्यपद्धती सोबत नागरिकत्व एक आहे. संपूर्ण भारताचे फक्त एकच नागरिकत्व आहे. ते भारतीय नागरिकत्व आहे. राज्याचे नागरिकत्व नाही. कोणत्याही राज्याचा रहिवाशी असला तरी प्रत्येक भारतीयाला नागरिकत्वाचे समान अधिकार आहेत. प्रस्तावित भारतीय संविधानातील दुहेरी राज्यपद्धती ही अमेरिकेतील दुहेरी राज्यपद्धतीपेक्षा आणखी एका अन्य बाबतीत वेगळी आहे. अमेरिकेत केन्द्राचा आणि घटकराज्यांचा संविधानातील संबंध सैल आहे. अमेरिकेतील केन्द्र आणि राज्य सरकारांच्या संबंधांचे वर्णन करताना ब्राईस (Bryce) म्हणतो,

'' केन्द्र किंवा राष्ट्रीय सरकार आणि राज्य सरकारे यांची तुलना एकाच भूमीवरील मोठी इमारत व लहान इमारतींचा समूह यांच्याशी करता येईल, परंतु त्या परस्पराहून मूलतः भिन्न आहेत. ''

अमेरिकेतील राज्य सरकारे आणि केन्द्र सरकार परस्परांपासून भिन्न आहेत, पण किती भिन्न आहेत ? या भिन्नत्वाची काही अंशी कल्पना पुढील वस्तुस्थितीवरून स्पष्ट होते.

(१) शासनाचे प्रजासत्ताक स्वरूप कायम ठेवून अमेरिकेतील प्रत्येक राज्याला स्वतःचे संविधान निर्माण करण्याची मुभा आहे.

(२) राष्ट्रीय सरकारवर अवलंबून न राहाता राज्यातील लोकांनी स्वतःच्या संविधानात बदल घडवून आणण्याचा अधिकार नेहमीसाठी स्वतःकडे ठेवला आहे.

ब्राईसच्याच शब्दात पुन्हा सांगावयाचे झाल्यास,

''अमेरिकेतील राज्याच्या राष्ट्रसंघाचे हे स्वरूप राज्यांच्या स्वतःच्या संविधानातील तरतूदींच्या बळावर आहे आणि राज्यसत्ता, विधीमंडळ, कार्यकारी मंडळ आणि न्यायमंडळ ही राज्यसंविधानाची निर्मिती असून त्याच्या आधीन आहेत.''

प्रस्तावित भारतीय संविधानात मात्र अशी तरतूद नाही. भारतातील कोणत्याही राज्याला (कोणत्याही परिस्थितीत भाग--१ मधील ) स्वतःचे संविधान निर्माण करता येणार नाही. केन्द्र आणि राज्यांचे संविधान एकच असून यामधून कोणालाही बाहेर पडता येणार नाही व या चौकटीतच राहून त्यांना कार्य करावे लागेल.

आतापर्यंत मी आपले लक्ष अमेरिकेतील संघराज्य आणि प्रस्तावित भारतीय संघराज्य यातील फरकाकडे वेधले. प्रस्तावित भारतीय संघराज्याची आणखीही काही प्रमुख्य वैशिष्ट्ये आहेत की ज्यामुळे केवळ अमेरिकन संघराज्याच्याच नव्हे तर इतरही संघराज्यांपेक्षा तिचे वेगळेपण दिसून येते. अमेरिकेसहीत सर्व संघराज्यपद्धती ह्या संघराज्यपद्धतीच्या ठरीव साच्यामध्ये बद्ध आहेत. कोणत्याही परिस्थितीत ते स्वतःचा आकार आणि प्रकार बदलवू शकत नाही. ती कधीही एकसंध स्वरूप धारण करू शकत नाही. परंतु, मसुदा संविधान काळाच्या आणि परिस्थितीच्या गरजेनुसार केन्द्रीभूत तसेच संघराज्य ही दोन्ही रूपे धारण करू शकते. सामान्यस्थितीत ती संघराज्यपद्धतीने काम करील परंतु युद्धजन्य परिस्थितीत ती केन्द्रीभूत पद्धतीने कार्य करील, अशी तिची रचना करण्यात आली आहे. अनुच्छेद २७५ मधील प्रावधानानुसार राष्ट्रपतींना बहाल करण्यात आलेल्या अधिकारात त्यांनी घोषणापत्र जाहीर केले की, संपूर्ण चित्रच पालटून जाईल आणि राज्याचे केन्द्रीभूत राज्यात परिवर्तन होईल. या घोषणेनुसार केन्द्र सरकारला वाटले तर पुढील अधिकार प्राप्त करून घेता येतातः—(१) राज्यसूचीतील विषयासहित कोणत्याही विषयावर कायदा करण्याचा अधिकार, (२) राज्यांच्या

अखत्यारीतील विषयांबाबत प्राप्त कार्यकारी सत्तेचा उपयोग राज्यांनी कसा करावा याबद्दल मार्गदर्शन करण्याचा अधिकार, (३) कोणत्याही अधिकाऱ्याकडे कोणत्याही उद्दीष्टानुसार सत्ता सोपविण्याचा अधिकार, आणि (४) संविधानातील आर्थिक तरतुदीं स्थगित करण्याचा अधिकार, कोणत्याही संघराज्याला अशाप्रकारे केन्द्रीभूत राज्यात परिवर्तन करण्याचा अधिकार नाही. प्रस्तावित मसुदा संविधानातील संघराज्यात आणि आपल्याला ज्ञात असलेल्या इतर सर्व संघराज्यात भेदाचा हा एक महत्त्वाचा मुद्दा आहे.

प्रस्तावित भारतीय संघराज्यात आणि इतर संघराज्यात एवढाच फरक आहे असे नाही. संघपद्धतीत शासन जर परिणामकारक नसेल तर ते कमकुवत समजले जाते. दोन प्रकारच्या दुर्बलतांचे संघराज्यपद्धतीला दुष्परिणाम भोगावे लागतात अशी टीका केली जाते. एक आहे ताठरता आणि दुसरा कायदेशीरपणा. संघराज्यपद्धतीचे (Federal System) हे अंगभूत दोष आहेत याबद्दल दुमत होऊ शकत नाही. संघराज्याचे संविधान हे अनिवार्यपणे लिखित स्वरूपात असते आणि लिखित संविधान हे निःसंदिग्धपणे ताठर असते. संघराज्याचे संविधान म्हणजे संविधानातील कायद्यान्वयेच केन्द्र आणि राज्य सरकारांमध्ये सार्वभौमत्वाची विभागणी होय, याचे दोन अपरिहार्य परिणाम होतात.--(१) राज्यांना दिलेल्या क्षेत्रात केन्द्राने कोणत्याही प्रकारे हस्तक्षेप करणे अगर याऊलट झाले तर ते संविधानाचे उल्लंघन ठरते आणि (२) असे उल्लंघन हे न्यायकक्षेतील ठरून न्यायपालिकेकडूनच त्याचा निवाडा होऊ शकतो. संघराज्याचे हे स्वरूप असल्याने संघराज्य संविधान या कायदेशीरपणाच्या आरोपातून सुटू शकत नाही. संघराज्य संविधानाचे हे दोष अमेरिकेच्या संविधानात उघडपणे दिसून आले आहेत.

नंतरच्या काळात संघराज्यपद्धतीचा स्वीकार केलेल्या देशांनी ताठरता आणि कायदेशीरपणा या अंगभूत दोषातून निर्माण होत असलेले दुष्परिणाम कमी करण्याचा प्रयत्न केला आहे. यासंदर्भात ऑस्ट्रेलियाचे उदाहरण ठळकपणे देता येईल. ऑस्ट्रेलियाच्या संविधानाने संघराज्यातील ताठरता कमी करण्यासाठी खालील उपायांचा अवलंब केला आहे.

(१) राष्ट्रसंघाच्या संसदेला समवर्ती सूचीतील विषयांसंबंधी कायदे करण्याचे अधिकार देऊन अनन्यसाधारण विषयाबाबत कायदा करण्याचे अधिकार कमी केले.

(२) संविधानातील अल्पकाळासाठी कार्यान्वित होणाऱ्या काही अनुच्छेदांची अंमलबजावणी ' संसदेने ठरविलेल्या कालावधीकरिता राहील ' अशी तरतूद केली.

हे उघड आहे की ऑस्ट्रेलियाच्या संविधानाअंतर्गत ऑस्ट्रेलियन संसद अशा अनेक गोष्टी करू शकते की ज्या अमेरिकन काँग्रेसच्या अधिकार क्षेत्रात येत नाहीत आणि त्या करण्यासाठी अमेरिकेच्या शासनाला सर्वोच्च न्यायालयाकडे धाव घ्यावी लागते. असा अधिकार देण्याची तात्त्विकता शोधण्यासाठी सर्वोच्च न्यायालयाच्या क्षमता, कौशल्य आणि इच्छेवर अवलंबून र हावे लागते.

ताठरता आणि कायदेशीरपणाची तीव्रता कमी करण्यासाठी मसुदा संविधानाने ऑस्ट्रेलियन योजनेचा खुद्द ऑस्ट्रेलियाने जेवढा उपयोग केला नाही त्यापेक्षा कितीतरी जास्त प्रमाणात पाठपुरावा केला आहे. ऑस्ट्रेलियाच्या संविधानाप्रमाणेच कायदा करण्याच्या समवर्ती अधिकारांबद्दलची प्रदीर्घ सूची समाविष्ट आहे. ऑस्ट्रेलियन संविधानात समवर्ती विषय ३९ आहेत. मसुदा संविधानात ते ३७ आहेत. आस्ट्रेलियाच्या संविधानाप्रमाणेच मसुदा संविधानात अशी ६ कलमे आहेत, ज्यांचे प्रावधान तात्पुरत्या काळासाठी असून परिस्थितीच्या अनुषंगाने संसद ती केव्हाही बदलवू शकते. संसदेला [illegible] विषयांबाबत कायदे करण्याचे अनन्यसाधारण अधिकार देऊन मसुदा संविधानाने ऑस्ट्रेलियन संविधानाच्याही कितीतरी पुढे मजल मारली आहे. ऑस्ट्रेलियाच्या संसदेला कायदे करण्याचे विशेष अधिकार फक्त तीन विषयांबाबत आहेत तर मसुदा संविधानाने भारतीय संसदेला अशा प्रकारच्या ९१ विषयांबाबत कायदे करण्याचा विशेष अधिकार दिला आहे. अशाप्रकारे स्वभावतःच ताठर समजल्या जाणाऱ्या संघराज्यपद्धतीला (Federalism) मसुदा संविधानाने शक्य तितकी जास्त लवचिकता प्राप्त करून दिली आहे.

मसुदा संविधानाने ऑस्ट्रेलियन संविधानाचे अनुसरण केले आहे किंवा ते फार मोठ्या प्रमाणात केले आहे असे म्हणून भागणार नाही. हे लक्षात घेतले पाहिजे की संघराज्यपद्धतीतील ताठरता व कायदेशीरपणावर मात करण्यासाठी नवीन उपायांची भर टाकली आहे जी वैशिष्ट्यपूर्ण असून अन्यत्र कुठेही आढळत नाही.

यातील पहिले म्हणजे सर्वसामान्य परिस्थितीत केवळ प्रांतांशी संबंधित असलेल्या विषयांबाबतही संसदेला कायदा करण्याचा अधिकार देण्यात आला आहे. या बाबतीत अनुच्छेद २२६, २२७ आणि २२९ कडे मी निर्देश करु इच्छितो. अनुच्छेद २२६ नुसार राज्यसूचीतील एखादा विषय जरी राज्याशी संबंधित असला तरी देशाच्या दृष्टीने महत्त्वाचा ठरत असेल तर वरिष्ठ सभागृहात

२/३ बहुमताने पारित केल्यानंतर केन्द्र सरकारला त्या संदर्भात कायदा करता येईल. राष्ट्रीय आणीबाणीच्या प्रसंगी संसदेला अशाच प्रकारचा अधिकार अनुच्छेद २२७ अन्वये देण्यात आला आहे. प्रांतांनी संमती दिल्यास संसदेला अशा अधिकारांचा उपयोग करण्याचे प्रावधान अनुच्छेद २२९ मध्ये करण्यात आले आहे. शेवटच्या तरतूदीचा समावेश ऑस्ट्रेलियाच्या संविधानात असला तरी सुरुवातीच्या दोन मात्र मसुदा संविधानाची खास वैशिष्ट्ये आहेत.

ताठरपणा आणि कायदेशीरपणा कमी करण्यासाठी स्वीकारलेला दुसरा उपाय म्हणजे संविधानात दुरुस्तीसाठी केलेली तरतूद होय. संविधानात दुरुस्ती करण्यासाठी केलेल्या संविधानातील अनुच्छेदांची दोन भागात विभागणी होते. पहिल्या भागात (अ) केन्द्र आणि राज्यांमध्ये कायदे करण्याच्या अधिकारांची विभागणी, (ब) संसदेमध्ये राज्यांना दिलेले प्रतिनिधीत्व आणि (क) न्यायालयांचे अधिकार, यांच्याशी संबंधित अनुच्छेद आहेत. इतर सर्व अनुच्छेदांचा समावेश दुसऱ्या भागात केला आहे. दुसऱ्या भागातील अनुच्छेदांनी संविधानाचा बराच भाग व्यापलेला असून संसदेला दोन प्रकारच्या बहुमताने त्यात दुरुस्ती करता येईल : प्रत्येक सभागृहाच्या उपस्थित असलेल्या आणि मतदानात भाग घेतलेल्या सभासदांच्या २/३ बहुमताने, आणि प्रत्येक सभागृहातील एकूण सदस्य संख्येच्या बहुमताने. या अनुच्छेदातील दुरुस्तीसाठी राज्यांच्या अनुसंमतीची आवश्यकता नाही. केवळ पहिल्या भागातील कलमांच्या दुरुस्तीसाठी मात्र अधिकची सुरक्षा म्हणून राज्यांच्या अनुसंमतीच्या अटीची तरतूद केली आहे.

त्यामुळे कोणीही बिनदिक्कतपणे असे म्हणू शकेल की, कायदेशीरपणा व ताठरपणा या दोषांचा भारतीय संघराज्यावर कोणताही परिणाम होणार नाही. त्याचे ठळक वैशिष्ट्य म्हणजे ते लवचिक संघराज्य आहे.

इतर संघराज्यांच्या तुलनेत प्रस्तावित भारतीय संघराज्याचे आणखी एक ठळक वैशिष्ट्य आहे. संघराज्य हे स्वतंत्र कायदेमंडळ, कार्यकारी मंडळ आणि न्यायिक अधिकार ह्या बाबतच्या विभाजित अधिकारांवर आधारित असल्यामुळे, प्रत्येक सत्ताकेन्द्रात कायदा, प्रशासन आणि न्यायिक संरक्षण यात अपरिहार्यपणे भिन्नता निर्माण होते. विशिष्ट मर्यादेपर्यंत अशा भिन्नतेचा अनुचित परिणाम होत नाही. स्थानिक गरजा आणि परिस्थिती लक्षात घेता शासनाला कायदे करण्यासाठी याचे स्वागतही करता येवू शकेल. परंतु हीच भिन्नता विशिष्ट मर्यादेनंतर गोंधळाची परिस्थिती निर्माण करण्यास कारणीभूत ठरु शकते आणि अनेक संघराज्यांमध्ये अशा प्रकारची गोंधळाची परिस्थिती तिने निर्माण केली

आहे. संघराज्यात जर वीस राज्ये असतील तर विवाह, घटस्फोट, वारसा हक्काचा कायदा, कौटुंबिक संबंध, करार, नुकसान भरपाईचा कायदा, गुन्हेगारी, वजन-मापे, हुंड्या आणि धनादेश, अधिकोषण आणि वाणिज्य, न्यायप्राप्तीची प्रक्रिया, प्रशासनाचा दर्जा आणि पद्धती याबाबत एखाद्याला वीस प्रकारच्या वेगवेगळ्या कायद्यांची कल्पना करावी लागेल. अशाप्रकारची परिस्थिती केवळ राज्यालाच कमकुवत करते असे नाही तर एका राज्यातून दुसऱ्या राज्यात जाणाऱ्या नागरिकालाही ती असह्य होते. कारण एका राज्यात कायदेशीर असणारी बाब दुसऱ्या राज्यात बेकायदेशीर असल्याचे त्याच्या निदर्शनास येते. भारताचे संघराज्य स्वरूप कायम ठेवण्याचे उपाय आणि मार्ग मसुदा संविधानाने सुचविले आहेत. परंतु त्याच वेळेस देशाचे ऐक्य अबाधित ठेवण्यासाठी आवश्यक असणाऱ्या मूलभूत विषयांमध्ये एकवाक्यता सुद्धा निर्माण केली आहे. मसुदा संविधानाने यासाठी तीन उपायांचा अवलंब केला आहे :

(१) एकच न्यायपद्धती,

(२) मूलभूत दिवाणी आणि फौजदारी कायद्यात एकवाक्यता, आणि

(३) महत्त्वाच्या पदांवरील नियुक्तीसाठी समान अखिल भारतीय नागरी सेवा.

मी म्हटल्याप्रमाणे दुहेरी न्यायपद्धती, दुहेरी विधी संहिता आणि दुहेरी नागरी सेवा या बाबी संघराज्याच्या अंगभूत दुहेरी राजकीय व्यवस्थेची तार्किक परिणती आहे. अमेरिकेमध्ये संघराज्य न्यायव्यवस्था आणि राज्य न्यायव्यवस्था एक दुसऱ्यापासून भिन्न आणि स्वतंत्र आहेत. भारतीय संघराज्यात जरी राज्यव्यवस्था दुहेरी असली तरी न्यायपद्धती मात्र मुळीच दुहेरी नाही. उच्च न्यायालय आणि सर्वोच्च न्यायालय एकाच न्याययंत्रणेची अभिन्न अंगे आहेत. आणि घटनात्मक कायदा, दिवाणी कायदा किंवा फौजदारी कायदा यातून निर्माण होणाऱ्या सर्व खटल्यांच्या निरसनासाठी अधिकार क्षेत्र म्हणून उच्च न्यायालय आणि सर्वोच्च न्यायालयाची एकसंध न्यायव्यवस्था निर्माण करण्यात आली आहे. या कार्यपद्धतीतील सर्व प्रकारच्या उपाययोजनांमधील भिन्नता टाळण्यासाठी ही व्यवस्था करण्यात आली आहे. जवळपास अशाचप्रकारची व्यवस्था असलेला कॅनडा हा एकमेव देश आहे. ऑस्ट्रेलियातही सर्वसाधारणपणे अशीच व्यवस्था आहे.

नागरी आणि सामुदायिक जीवनाचा आधार असलेल्या कायद्यांमधील भिन्नता दूर करण्यासाठी काळजी घेण्यात आली आहे. दिवाणी आणि फौजदारी कायद्याच्या महत्त्वाच्या संहिता जसे नागरी आचार संहिता, दंड

संहिता, फौजदारी आचार संहिता, साक्षीचा कायदा, संपत्ती हस्तांतरण कायदा, विवाह कायदा, घटस्फोट आणि वारसा हक्क यांचा अंतर्भाव समवर्ती सूचित केलेला आहे की जेणेकरून संघराज्य पद्धतीला दुर्बल होऊ न देता आवश्यक एकवाक्यतेचे नेहमीसाठी जतन करता येईल.

मी सांगितल्याप्रमाणे संघराज्य (Federal) पद्धतीतील अंगभूत दुहेरी व्यवस्थेसोबतच सर्व संघराज्यामध्ये दुहेरी नागरी सेवाही पाठोपाठ निर्माण होते. सर्व संघराज्यांमध्ये एक केन्द्रीय नागरी सेवा आणि दुसरी राज्य नागरी सेवा असते, भारतीय संघराज्यात जरी दुहेरी व्यवस्थेसोबत दुहेरी नागरी सेवा असली तरी त्याला एक अपवाद आहे. हे उघड आहे की प्रत्येक देशाच्या प्रशासकीय संरचनेत प्रशासनाचा दर्जा टिकवून ठेवण्यासाठी काही मोक्याची पदे असतात. प्रशासनाच्या मोठ्या आणि गुंतागुंतीच्या व्यवस्थेत अशी पदे शोधून काढणे सोपे नसते. परंतु यात शंका नाही की, नागरी सेवेतील या जागांवर नियुक्त अधिकाऱ्यांच्या क्षमतेवर प्रशासनाचा दर्जा अवलंबून असतो. सुदैवाने आपल्याला, संपूर्ण देशासाठी समान असलेल्या प्रशासकीय पद्धतीचा वारसा लाभला आहे आणि अशी मोक्याची पदे कोणती आहेत याची आपल्याला जाणीव आहे. स्वतःची नागरी सेवा निर्माण करण्यापासून राज्यांना वंचित न ठेवता अखिल भारतीय स्तरावर भारतीय नागरी सेवेच्या मार्फत समान पात्रता आणि समान वेतनाच्या निकषावर निवड झालेल्या उमेदवारांचीच नियुक्ती संपूर्ण संघराज्यातील मोक्याच्या पदांवर करण्याचे प्रावधान संविधानात केले आहे.

प्रस्तावित संघराज्याची ही ठळक वैशिष्ट्ये आहेत. आता मी याबाबत टीकाकारांची काय मते आहेत त्याकडे वळतो.

असे म्हटल्या जात आहे की, मसुदा संविधानात नवीन काहीही नाही. त्यातील अर्धा भाग भारत सरकार कायदा १९३५ मधून घेतला आहे व उरलेला अर्धा भाग इतर देशांच्या संविधानातून उचललेला आहे. मसुदा समितीची स्वतःची निर्मिती फारच कमी आहे.

असा प्रश्न विचारला जावू शकतो की, जगाच्या इतिहासात आजच्या घडीला निर्माण करण्यात आलेल्या संविधानात काही नवीन असू शकते का ? पहिले लिखित संविधान निर्माण होऊन १०० वर्षांपेक्षा अधिक काळ लोटला आहे. अनेक देशांनी याचे अनुकरण करुन स्वतःचे लिखित संविधान निर्माण केले आहे. संविधानाची व्याप्ती काय असावी याचा निर्णय फार पूर्वीच केला गेला आहे. तसेच संविधानाची मूलभूत तत्त्वे काय असावीत याबद्दल जागतिक

स्तरावर मान्यता निर्माण झाली आहे. या पार्श्वभूमीवर प्रमुख प्रावधानांच्या बाबतीत सर्व संविधानांमध्ये सारखेपणा दिसून येणारच. आज निर्माण होत असलेल्या संविधानात नवीन जर काही करावयाचे असेल तर ते एवढेच की, जुन्या संविधानातील दोष दूर करण्यासाठी बदल सुचविणे आणि देशाच्या गरजेनुसार आवश्यक बाबींची भर टाकणे हे होय. याची मला खात्री आहे की, इतर संविधानांची आंधळेपणे नक्कल करण्याचा आरोप संविधानाच्या अपुऱ्या अभ्यासावर आधारित आहे. मसुदा संविधानात नवीन काय आहे हे मी लक्षात आणून दिले आहे. ज्यांनी संविधानाचा अभ्यास केला आहे आणि याबाबत निःपक्षपातीपणे विचार करण्याची ज्यांची तयारी आहे ते मान्य करतील की, मसुदा समिती आपले कर्तव्य बजावित असताना अंध आणि गुलामी अनुकरणाच्या आरोपाची दोषी नाही.

भारत सरकार कायदा १९३५ मधील बराचसा भाग मसुदा संविधानात आहे या आरोपाबद्दल मी खंत व्यक्त करणार नाही. चांगल्या गोष्टी स्वीकारण्यात खजिल होण्यासारखे काही नाही. तो उसनवारीचा भाग नाही. संविधानाच्या मूलभूत संकल्पनांवर कुणाचाही बौद्धिक संपदा अधिकार नसतो. मला जर कशाचे वाईट वाटत असेल तर हे की, भारत सरकार कायदा १९३५ मधून घेतलेल्या तरतुदींचा बराचसा भाग हा बहुशः प्रशासनाच्या तपशिलाशी संबंधित आहे. हे मला मान्य आहे की, प्रशासनाच्या तपशिलास संविधानात स्थान असू नये. संविधानात तो भाग टाळण्याचा मसुदा समितीने मार्ग शोधावा अशी माझी इच्छा आहे. परंतु त्याचा अंतर्भाव करण्याच्या गरजेचे समर्थन पुढील विधानावरुन करता येते. ग्रिसचा इतिहासकार ग्रोट याने म्हटले आहे की :

" केवळ विशिष्ट वर्गातील बहुसंख्य लोकांनीच नव्हे तर सर्वांनी घटनात्मक नैतिकतेचे पालन करणे ही स्वतंत्र आणि शांततामय शासनासाठी अनिवार्य अट आहे. स्वतःचे वर्चस्व स्थापन करण्याचे पुरेसे सामर्थ्य नसलेला कोणताही बलदंड आणि दुराग्रही अल्पसंख्यांकांचा वर्ग, स्वतंत्र संस्थांना कामकाज करणे अशक्यप्राय करुन सोडतो. "

ग्रोटच्या मते, घटनात्मक नैतिकता म्हणजे, " संवैधानिक तत्त्वांबद्दल सर्वोच्चप्रतिचा आदरभाव ठेवून, कायद्याच्या निश्चित चौकटीत राहून काम करणाऱ्या शासनांच्या आदेशाचे पालन करताना, स्वतःची मते आणि कृती मुक्तपणे व्यक्त केली पाहिजे आणि जनतेशी संबंधित घेतलेल्या निर्णयांच्या अनुषंगाने सत्ताधाऱ्यांवर संयमित टीका केली पाहिजे. हे करीत असताना विविध पक्षांच्या चढाओढीतील कटुता स्वाभाविक असली तरी संवैधानिक तत्त्वाबद्दलचा आदर आपल्याइतकाच विरोधकांच्याही मनात आहे असा विश्वास देशातील प्रत्येक नागरिकाच्या मनात रुजणे होय. " (ऐका . . . . . ऐका)

लोकसत्ताक संविधानाच्या शांततामय अंमलबजावणीसाठी घटनात्मक नैतिकतेच्या प्रसाराची गरज प्रत्येकजणच मान्य करतो, परंतु त्याच्याशी परस्परनिगडित असलेल्या दोन बाबींना मात्र दुर्दैवाने सर्वसाधारणपणे मान्य केले जात नाही. त्यातील पहिली म्हणजे प्रशासकीय स्वरूपाचा संविधानाच्या स्वरूपाशी निकट संबंध असतो. प्रशासनाचे स्वरूप हे संविधानाच्या स्वरूपाशी घनिष्टतया सुसंगत असले पाहिजे आणि दुसरी बाब अशी की, संविधानाच्या स्वरूपात बदल न करता केवळ प्रशासकीय यंत्रणेत बदल करुन त्याद्वारे संविधानाच्या हेतूला निष्प्रभ आणि विरोध करुन संविधानाच्या अंमलबजावणीत अडथळे आणणे हे पूर्णतः शक्य आहे. इतिहासकार ग्रोटनी म्हटल्याप्रमाणे, ज्याठिकाणी लोकांमध्ये घटनात्मक नीतिमत्ता रुजलेली आहे, त्याठिकाणी प्रशासकीय तपशिलांना संविधानातून वगळून ते कायदेमंडळावर सोपविण्याची जोखीम स्वीकारता येते. प्रश्न असा आहे की, अशी घटनात्मक नैतिकता लोकांच्या अंगी बाणली आहे असे आपण गृहित धरु शकतो काय ? घटनात्मक नैतिकता ही नैसर्गिक भावना नाही. तिची जोपासना करावी लागते. अजूनही आपल्या लोकांमध्ये ती निर्माण झाली नाही आपण हे समजले पाहिजे. भारतातील लोकशाही ही भारताच्या मातीवरील केवळ वरचे आवरण आहे. ही माती मूलतः अलोकतांत्रिक आहे.

अशा परिस्थितीत प्रशासकीय यंत्रणा निर्माण करण्याच्या सुचनांसाठी कायदेमंडळावर विश्वास ठेवणे शहाणपणाचे ठरणार नाही. संविधानात त्यांचा समावेश करण्यामागील ही भूमिका आहे.

मसुदा संविधानावर करण्यात येत असलेला दुसरा आरोप असा की, यातील कोणत्याही भागात प्राचीन भारतीय राज्यव्यवस्थेचे प्रतिबिंब कुठेच दिसत नाही. असे म्हटले जाते की, भारतीय संविधानाची निर्मिती प्राचीन हिंदू राज्यव्यवस्थेला अनुसरुन असावयास हवी होती. पाश्चात्य सिद्धांतांचा समावेश न करता नवीन संविधानाची ग्राम पंचायती आणि जिल्हा पंचायतीच्या प्रारुपावर उभारणी आणि निर्मिती व्हावयाला हवी होती. इतर काहीजण असे आहेत की, ज्यांनी पराकोटीची टोकाची भूमिका घेतली आहे. त्यांना कोणतीही केन्द्रीय किंवा प्रांतिक सरकारे नकोत. त्यांना भारतात केवळ जास्तीत जास्त ग्राम सरकारे हवी आहेत. भारतीय विद्वानांचे ग्रामीण समाजातील लोकांप्रती असलेले प्रेम करुणाजनक नसले तरी अमर्याद आहे. (हंशा !) असे घडण्याचे प्रमुख कारण म्हणजे मेटकाफने केलेली त्यांची (ग्राम पंचायत व जिल्हा पंचायत) स्तुति होय. त्याने त्यांचा लहान लहान प्रजासत्ताके म्हणून उल्लेख केला, ज्यात त्यांना हवी असलेली प्रत्येक वस्तू त्यांच्यामधूनच उपलब्ध होईल. तसेच त्यांचा इतर बाह्य जगाशी कोणत्याही प्रकारचा संबंध राहाणार नाही.

ह्या ग्रामसमुदायाचे अस्तित्व एका विभक्त राज्याचे स्वरुप धारण करीत असून मेटकाफच्या मते, आजवर घडून आलेल्या सर्व प्रकारच्या क्रांत्या आणि बदलांच्या प्रभावापासून भारतीय जनतेचे जतन करण्याच्या कामी इतर कोणत्याही गोष्टीपेक्षा या ग्राम व्यवस्थेने अधिक योगदान दिले आहे. तसेच त्यांना मुक्त आणि स्वतंत्र जीवनाचा मोठ्या प्रमाणात उपभोग घेण्यासाठी ही व्यवस्था उपयुक्त ठरली आहे. जिथे दुसरे काहीच टिकून राहात नाही तिथे ग्रामसमुदाय टिकून आहेत, यात काहीच शंका नाही. परंतु जे ग्रामसमुदायाचा अभिमान बाळगतात ते देशाच्या एकूण व्यवहारात आणि देशाचे भवितव्य घडविण्यात ग्रामसमुदायाचा किती नगण्य वाटा आहे आणि तो तसा का आहे याचा विचार करीत नाहीत. देशाचे भवितव्य घडविण्याबाबत त्यांच्या भूमिकेचे वर्णन स्वतः मेटकाफने केले आहे, तो म्हणतो, '' एकामागून एक राजेशाही कोसळतात, एकापाठोपाठ एक क्रांत्या घडत जातात ; हिंदू, पठाण, मोगल, मराठा, शिख आणि इंग्रज हे सर्व एकापाठोपाठ एक राज्यकर्ते झालेत, परंतु ग्रामसमुदाय मात्र जसाच्या तसाच राहतो. संकटप्रसंगी त्यातील काहीजण शस्त्र धारण करतात आणि स्वतःला सुरक्षित करतात. शत्रुसैन्य देशातून संचार करत जाते, ग्रामसमुदाय आपल्या थोड्याश्या गुराढोरांना आपल्या चार भींतींमध्ये एकत्र करुन शत्रुसैन्याला आव्हान न देता बिनधास्तपणे जावू देतात. ''

ग्रामसमुदायांनी देशाच्या इतिहासात अशाप्रकारची भूमिका पार पाडली आहे, हे माहित असताना कुणाला त्यांच्याबद्दल अभिमान का वाटावा ? सर्व प्रकारच्या संकटांमधून ते आजवर जिवंत राहिले ही वास्तवता असूही शकेल, परंतु केवळ जिवंत राहण्याला अर्थ नाही. ते कोणत्या प्रतीचे जीवन जगले हा महत्त्वाचा प्रश्न आहे. निश्चितपणे निम्नस्तरावर व स्वार्थ्याच्या पातळीवर. या ग्रामराज्यामुळेच भारताचा नाश झाला असे मी मानतो. प्रांतवाद व जातीयवादाचा निषेध करणारे खेड्यांचा पुरस्कार करण्यासाठी पुढे आलेले आहेत याचे मला आश्चर्य वाटते. खेडे काय आहे ? केवळ स्थानिकतेचे डबके, अज्ञानाची गुहा, संकुचित मनोवृत्ती आणि जातीयवाद ? मसुदा संविधानाने खेड्याला नाकारले आणि व्यक्तिला तिचे घटक मानले याचा मला आनंद होतो.

अल्पसंख्यांकांसाठी केलेल्या सवलतींच्या तरतुदीमुळेही मसुदा संविधानावर टीका करण्यात येत आहे. यासाठी मसुदा समिती जबाबदार नाही. संविधान सभेने घेतलेल्या निर्णयांची ती अंमलबजावणी करते. माझ्या दृष्टीने, अल्पसंख्यांकांना सवलती देण्याचा संविधान सभेने घेतलेला निर्णय जो इथे कृतीत आणला आहे तो शहाणपणाचा आहे याबद्दल माझ्या मनात संदेह नाही. या देशात अल्पसंख्य आणि बहुसंख्य या दोघांनीही चुकीचा मार्ग अनुसरला आहे. अल्पसंख्यांकांचे अस्तित्व नाकारणे ही बहुसंख्यांकांची चूक आहे. अल्पसंख्यांकांनी स्वतःचे अल्पसंख्यत्व गोंजारणे व त्याला चिरस्थायी

स्वरूप देण्याचा प्रयत्न करणे हे सुद्धा तेवढेच चुकीचे आहे. दुहेरी हेतू साध्य होईल असा उपाय शोधणे आवश्यक आहे. सुरूवात म्हणून त्यात अल्पसंख्यांकांचे अस्तित्व मान्य करायलाच हवे. असाही प्रयत्न व्हावा की ज्यामुळे बहुसंख्यांक आणि अल्पसंख्यांक एक ना एक दिवस एकजीव होणे शक्य होईल. संविधान सभेने सुचविलेल्या उपायांचे स्वागत झाले पाहिजे कारण या उपायांमुळे हा दुहेरी हेतू साध्य होतो. धर्मांधतेची भावना वाढीस लावून अल्पसंख्यांकांच्या सवलतींना विरोध करणाऱ्यांना मी दोन गोष्टी सांगू इच्छितो. एक अशी की, अल्पसंख्यांक स्फोटक शक्ती असते. जर तिचा स्फोट झाला तर त्यात संपूर्ण राज्यव्यवस्था उध्वस्त होऊ शकते. युरोपचा इतिहास अशा प्रकारच्या भरपूर आणि भयानक वास्तववादी घटनांचा प्रत्यक्ष साक्षीदार आहे. दुसरी गोष्ट अशी की, भारतातील अल्पसंख्यांकांनी स्वतःचे अस्तित्व बहुसंख्यांकांच्या हाती सोपविण्याचे मान्य केले आहे. आयर्लंडची फाळणी टाळण्यासाठी झालेल्या वाटाघाटींच्या इतिहासात, रेडमंड कार्सनला म्हणाला होता की, '' प्रोटेस्टंट अल्पसंख्यांकांसाठी तुम्हाला हव्या असलेल्या कोणत्याही सवलतींची मागणी करा परंतु आयर्लंड एकसंध राहू द्या '' तेव्हा कार्सननी दिलेले उत्तर असे होते की, '' चुलीत टाका तुमच्या सवलती ! तुम्ही आमच्यावर राज्य करावे हेच आम्हाला मान्य नाही. '' भारतातील कोणत्याही अल्पसंख्यांक समाजाने अशी भूमिका घेतलेली नाही. ही बहुसंख्यांकता मूलतः राजकीय नसून जातीयवादी आहे. अशा जातीयवादी बहुसंख्यांकांचे राज्य अल्पसंख्यांकांनी निष्ठेने स्वीकारले आहे. म्हणून अल्पसंख्यांकांच्या प्रति भेदभाव न करणे हे आपले कर्तव्य आहे याची जाणीव बहुसंख्यांकांनी ठेवावी. अल्पसंख्यांकत्व टिकून राहणे किंवा एकजीव होणे हे बहुसंख्यांकांच्या वागणुकीवरच अवलंबून राहाणार आहे. अल्पसंख्यांकांच्या विरोधात भेदभाव करण्याची सवय बहुसंख्यांक ज्या क्षणी सोडतील त्या क्षणी अल्पसंख्यांक अस्तित्वात राहाण्याचे कारण उरणार नाही व ते एकजीव होतील.

मसुदा संविधानातील मूलभूत हक्कांशी संबंधित भागावर सर्वाधिक टीका झाली आहे. असे म्हटल्या जाते की, मूलभूत अधिकारांची व्याख्या करणाऱ्या कलम १३ ची बऱ्याच अपवादांनी चाळणी करण्यात आली असून ह्या अपवादांनी मूलभूत अधिकारांना गिळंकृत केले आहे. एक प्रकारची फसवणूक असे म्हणून त्या कलमांचा धिक्कार करण्यात आला आहे. टीकाकारांच्या मते, मूलभूत अधिकार निरपेक्ष सुद्धा असणे आवश्यक आहे, अन्यथा ते मूलभूत अधिकार राहू शकत नाही. टीकाकार आपल्या युक्तीवादाच्या समर्थनार्थ अमेरिकन संविधानाचा आणि त्या संविधानातील पहिल्या दहा दुरुस्त्यांमधील समाविष्ट हक्क विधेयकांचा आधार घेतात. असे म्हटले जाते की, अमेरिकेच्या हक्क विधेयकात मूलभूत अधिकार वास्तव आहेत कारण ते कोणत्याही मर्यादा आणि अपवादांनी नियंत्रित नाहीत.

मूलभूत अधिकारांवरील संपूर्ण टीका ही गैरसमजुतीवर आधारलेली आहे हे सांगताना मला खेद वाटतो. पहिली गोष्ट, मूलभूत अधिकारांना, मूलभूत नसलेल्या अधिकारांपासून वेगळे करण्यासाठी शोधलेल्या आधारावर करण्यात आलेली टीका भक्कम पायावर आधारित नाही. मूलभूत अधिकार हे अनिर्बंध असतात व मूलभूत नसलेले अधिकार अनिर्बंध नसतात असे म्हणता येत नाही. या दोहोतील वास्तविक फरक असा आहे की, मूलभूत नसलेल्या अधिकारांची निर्मिती पक्षांमधील कराराद्वारा होते तर मूलभूत अधिकार ही कायद्याची देण आहे. मूलभूत अधिकार ही राज्याची देण असली तरी राज्याला त्यावर मर्यादा घालता येणार नाही असे म्हणता येत नाही.

दुसरी गोष्ट म्हणजे अमेरिकेत मूलभूत अधिकार अनिर्बंध आहेत असे म्हणणे चूक आहे. अमेरिकेचे संविधान व मसुदा संविधानातील या विषयीचा फरक हा आकाराविषयी आहे, मूळ हेतूविषयी नाही. अमेरिकेतील मूलभूत अधिकार अनिर्बंध नाहीत हे वादातीत आहे. मसुदा संविधानात अंतर्भुत असलेल्या मूलभूत अधिकारांच्या अपवादांच्या समर्थनार्थ, अमेरिकेतील सर्वोच्च न्यायालयाच्या किमान एका निवाड्याचा तरी उल्लेख करता येईल. मसुदा संविधानातील अनुच्छेद १३ मध्ये अंतर्भुत असलेल्या भाषण स्वातंत्र्याच्या अधिकारावरील निर्बंधाच्या समर्थनार्थ सर्वोच्च न्यायालयाच्या अशा एका निवाड्याचा उल्लेख करणे पुरेसे होईल. अपेक्षित बदल घडवून आणण्यासाठी हिंसात्मक मार्गाचा अवलंब करणाऱ्यांना शिक्षा करण्याच्या उद्देशाने न्यूयार्क फौजदारी अराजकता कायद्याच्या (Newyork Criminal Anarchy Law) संविधानात्मकतेविषयीच्या गिटलॉ विरूद्ध न्यूयार्क (Gitlow × Newyork) या खटल्यात सर्वोच्च न्यायालयाने असे म्हटले आहे की,

'' संविधानाने बहाल केलेले भाषणाचे आणि मुद्रणाचे स्वातंत्र्य हे जबाबदारीशिवाय बोलण्याचे आणि प्रकाशित करण्याचे अनिर्बंध स्वातंत्र्य बहाल करीत नाही. एखाद्याने कशाची निवड करावी किंवा एखाद्याला कोणत्याही प्रकारे बोलण्याचा अनिर्बंध आणि बेलगाम परवाना मिळाला आहे असे नाही आणि या भाषण स्वातंत्र्याचा दुरूपयोग करणाऱ्यांना शिक्षा होणार नाही असेही नाही. फार प्राचीन काळापासून हे मूलभूत तत्त्व प्रस्थापित झाले आहे. ''

यामुळे अमेरिकेत मूलभूत अधिकार अनिर्बंध आहेत आणि मसुदा संविधानात मात्र ते नाहीत असे म्हणणे चुकीचे आहे.

मूलभूत अधिकारांना मर्यादा घालावयाची असल्यास, अमेरिकेच्या संविधानात असल्याप्रमाणे, त्या मर्यादांची तरतूद संविधानातच करण्यात यावी आणि

ज्याठिकाणी असे करण्यात आले नाही, तिथे सर्व संबंधित बाबींचा विचार करून निर्णय घेण्याचे न्यायपालिकेवर सोपविण्यात यावे असे ठरवता येईल. मला सांगायला वाईट वाटते की, अमेरिकेचे संविधान जाणून घेण्याबाबतची ही चूक नसली तरी तिचा संपूर्णतः चुकीचा अर्थ लावण्यात येत आहे. अमेरिकन संविधान असे काही करीत नाही. एकत्र येण्याचा अधिकार हा अपवाद सोडल्यास, अमेरिकेतील नागरिकांना हमी दिलेल्या मूलभूत अधिकारांवर अमेरिकेचे संविधान स्वतः कोणत्याही प्रकारच्या मर्यादा घालीत नाही. अमेरिकेच्या संविधानाने मूलभूत अधिकारांवर मर्यादा घालण्याचा अधिकार न्यायपालिकेवर सोपविला आहे हेही म्हणणे बरोबर नाही. मर्यादा घालण्याचा अधिकार विधीमंडळाचा आहे. टीकाकारांनी गृहित धरल्यापेक्षा वास्तविक परिस्थिती वेगळी आहे. अमेरिकेमध्ये संविधानाने अंतर्भूत केलेले मूलभूत अधिकार अनिर्बंध होते यात शंका नाही. असे असले तरी विधीमंडळाच्या हे लगेच लक्षात आले की, मूलभूत अधिकारांवर मर्यादा घालून त्यांना नियंत्रित करणे नितांत गरजेचे आहे. सर्वोच्च न्यायालयापुढे अशाप्रकारे या मर्यादांच्या संविधानात्मकतेचा प्रश्न ज्यावेळी निर्माण झाला तेव्हा असा युक्तिवाद करण्यात आला की, अमेरिकेच्या विधिमंडळाला अशाप्रकारच्या मर्यादा घालण्याचा संविधानाने कोणताही अधिकार दिलेला नाही, तेव्हा सर्वोच्च न्यायालयाने पोलिस अधिकारांचा सिद्धांत समोर आणला आणि मूलभूत अधिकारांच्या अनिर्बंधतेचे समर्थन करणाऱ्यांना विरोध करण्यासाठी असा युक्तिवाद केला की, प्रत्येक राज्याला पोलिस अधिकार अंगभूत असल्यामुळे तो त्याला आहे असे संविधानात स्वतंत्रपणे नमूद करण्याची गरज नाही. यापूर्वी उल्लेखिलेल्या खटल्यात सर्वोच्च न्यायालयाच्या निवाड्यातील शब्द मी उद्‌घृत करतो. ते असे,

" लोककल्याणाला बाधा पोहोचविण्याच्या उद्देशाने या स्वातंत्र्याचा दुरूपयोग करणाऱ्यांना, सार्वजनिक नीतिमत्ता भ्रष्ट करू इच्छिणाऱ्यांना, गुन्हेगारीला प्रवृत्त करणाऱ्यांना किंवा सार्वजनिक शांतता भंग करु पाहणाऱ्यांना स्वतःच्या पोलिस अधिकारांचा उपयोग करून शिक्षा करण्याचा राज्याला अधिकार आहे, याबद्दल वाद असू नये. . . . . . . "

मसुदा संविधानाने केले ते असे की, मूलभूत अधिकार अनिर्बंध आहेत अशी रचना करण्याऐवजी आणि पोलिस अधिकार सिद्धांताच्या सहाय्याने संसदेच्या मदतीसाठी सर्वोच्च न्यायालयावर अवलंबून न ठेवता मूलभूत अधिकारांवर निर्बंध घालण्याचा अधिकार संविधानाने प्रत्यक्ष राज्याला दिलेला आहे. त्यामुळे परिणामतः खरे तर काहीही फरक पडत नाही. एक प्रत्यक्षपणे जे करतो ते दुसरा अप्रत्यक्षपणे करतो. दोन्ही ठिकाणी मूलभूत अधिकार अनिर्बंध नाहीत.

मसुदा संविधानात मूलभूत अधिकारांच्या पाठोपाठ '' मार्गदर्शक तत्त्वांची '' तरतूद केली आहे. सांसदीय लोकशाहीसाठी निर्मिलेल्या संविधानात ती नाविन्यपूर्ण बाब आहे. सांसदीय लोकशाहीसाठी निर्मिलेल्या संविधानात अशा तत्त्वांची तरतूद दुसऱ्या केवळ एकाच संविधानात करण्यात आली आहे ते म्हणजे आयरिश स्वतंत्र राज्याचें संविधान. या मार्गदर्शक तत्त्वांवर सुद्धा टीका करण्यात आली आहे. असे म्हटल्या जाते की, या निव्वळ पवित्र घोषणा आहेत. त्यांच्यात बंधनकारकतेचे सामर्थ्य नाही. अर्थातच ही टीका अनावश्यक आहे. अनेक शब्दांच्या माध्यमातून संविधानच तसे म्हणत आहे.

जर असे म्हटल्या जात असेल की मार्गदर्शक तत्त्वांच्या पाठिशी कायद्याचे पाठबळ नाही तर मी हे मान्य करायला तयार आहे. परंतु त्यांच्या पाठिशी कोणत्याही प्रकारचे बंधनकारक सामर्थ्य नाही हे मान्य करण्यास मात्र मी तयार नाही. त्यांच्या पाठिशी बंधनकारक कायदा नसल्यामुळे ते निरर्थक आहेत हे सुद्धा मी मान्य करायला तयार नाही.

वसाहती आणि भारताच्या गव्हर्नर जनरल आणि गव्हर्नरला प्राप्त झालेल्या अनुदेशांच्या संलेखाप्रमाणे (Instrument of Instructions) मार्गदर्शक तत्त्वांचे स्वरूप आहे. मसुदा संविधानाने राष्ट्रपती आणि राज्यपालांना असे संलेख देण्याचे प्रस्तावित केले आहे. अनुदेशाच्या संलेखाची तरतूद संविधानाच्या ४ थ्या अनुसूचीमध्ये केली आहे. मार्गदर्शक तत्त्वे दुसरे काही नसून अनुदेशाच्या संलेखाचे दुसरे नाव आहे. फरक एवढाच की अनुदेश हे विधीमंडळ आणि कार्यकारी मंडळाला दिलेले आहेत. माझ्या मताप्रमाणे, अशा बाबीचे स्वागत व्हायला हवे. शांतता, सुव्यवस्था आणि चांगले सरकार यासाठी सामान्यतः सत्ता सोपविलेली असते, परंतु सत्तेच्या उचित उपयोगासाठी सत्तेसोबतच तिला अनुदेश देण्याचीही गरज आहे.

मसुद्यात प्रस्तावित असलेला संविधानातील अशा अनुदेशांचा समावेश, दुसऱ्याही कारणासाठी न्यायसंगत ठरतो. निर्माण करण्यात आलेल्या मसुदा संविधानात देशाला आवश्यक अशा सरकारच्या यंत्रणेची केवळ तरतूद केली आहे. विशिष्ट राजकीय पक्षाला सत्तारूढ करण्यासाठी काही देशांमध्ये अस्तित्वात असलेल्या योजनेसारखी ही योजना नाही. संकल्पित व्यवस्थेने लोकशाहीच्या चांचण्यांमध्ये यशस्वी होण्यासाठी सत्तेवर कुणी असावे हा निर्णय सर्वस्वी जनतेवर सोपविला आहे आणि तो तसा असावाच. पण सत्तेवर कुणीही येवो, तो सत्तेचा वाटेल तसा वापर करण्यासाठी स्वतंत्र असणार नाही. सत्तेचा वापर करताना त्याला अनुदेशांच्या संलेखाचा, (Instrument of Instructions) ज्याचे दुसरे नाव मार्गदर्शक तत्त्वे असे आहे, आदर करावाच

लागेल. तो त्यांच्याकडे दुर्लक्ष करू शकणार नाही. त्यांच्या उल्लंघनासाठी त्याला न्यायालयात जाब द्यावा लागणार नाही. परंतु निवडणुकीच्या वेळी त्याला मतदारांसमोर याचे निश्चितच उत्तर द्यावे लागेल. सत्ता प्राप्तीसाठी विविध शक्तींकडून ज्यावेळी प्रयत्न होतील त्यावेळी मार्गदर्शक तत्त्वे किती मौल्यवान आहेत याची जाणीव होईल.

अनुदेशांच्या पाठिशी अंमलबजावणीच्या बंधनकारकतेची तरतूद नसल्यामुळे संविधानात त्यांचा अंतर्भाव होण्याला विरोध करण्याचा युक्तिवाद योग्य नाही. संविधानात त्यांना नेमके कुठे स्थान द्यावे याबाबत मतभेद होऊ शकेल. ज्या तरतुदींच्या पाठिशी अंमलबजावणीची बंधनात्मकता नाही त्यांचा समावेश बंधनात्मकता असलेल्या तरतुदींच्या सोबत करणे हे काहीसे चमत्कारिक वाटेल हे मला मान्य आहे. माझ्या मते, त्यांचे योग्य स्थान, अनुसूची III (अ) आणि IV, ज्यात राष्ट्रपती आणि राज्यपालांना दिलेल्या अनुदेशांच्या संलेखात असायला हवे, कारण मी म्हटल्याप्रमाणे, कार्यकारी मंडळ आणि विधीमंडळांनी स्वतःच्या अधिकारांचा उपयोग कसा करावा यासाठीच खरे तर अनुदेशांच्या संलेखांची योजना आहे. पण ती केवळ व्यवस्थेची बाब आहे.

काही टीकाकांराच्या मते, केन्द्र सरकार फारच बलशाली झाले आहे. काहींच्या मते ते अधिक सामर्थ्यवान असावे. मसुदा संविधानाने सुवर्णमध्य साधला आहे. केन्द्राला शक्ती प्रदान करण्यासाठी तुम्ही कितीही विरोध केला, तरी केन्द्राला शक्तीशाली होण्यापासून तुम्ही परावृत्त करू शकत नाही. आधुनिक जगाची परिस्थिती अशी आहे की, सत्तेचे केन्द्रीकरण अनिवार्य आहे. एखाद्याने अमेरिकेतील केन्द्र सरकारच्याच वाढीचा विचार केला, तर असे दिसेल की संविधानाने मर्यादित अधिकार दिल्यानंतरही, आजवरच्या वाटचालीत त्याच्या मूळ स्वरूपात बरीच वाढ झाली आहे आणि केन्द्र सरकारच्या अधिक शक्तीशाली होण्यामुळे तेथील राज्यसरकारांच्या अधिकारांना ग्रहण लागले आहे असे दिसेल. हा आजच्या परिस्थितीचा परिणाम आहे. याच परिस्थितीचा भारत सरकारवरही निश्चितपणे परिणाम होणार आहे आणि कितीही प्रयत्न केला तरी त्याला शक्तिशाली होण्यापासून कुणी रोखू शकणार नाही. दुसरीकडे, ते अधिकच शक्तिशाली होण्याच्या प्रवृत्तीला आपण विरोध केला पाहिजे. जेवढे पचवता येईल त्यापेक्षा त्याने अधिक खावू नये. त्याची शक्ती त्याच्या वजनाशी अनुरूप असावी. स्वतःच्या वजनानेच कोसळून पडेल इतके तिला शक्तिशाली बनविणे चुकीचे ठरेल.

मसुदा संविधानावर अशी टीका करण्यात येत आहे की, केन्द्र आणि प्रांतांच्या संवैधानिक संबंधासाठी एका प्रकारची तरतूद आणि केन्द्र व संस्थाने यांच्यातील

संवैधानिक संबंधासाठी वेगळ्या प्रकारची तरतूद करण्यात आली आहे. संरक्षण, परराष्ट्रीय धोरण व दळणवळण यांच्याशी संबंधित बाबींशिवाय केन्द्रीय सूचीत समाविष्ट असलेल्या सर्व बाबींना स्वीकारण्याचे भारतीय संस्थानांवर बंधन राहणार नाही. समवर्ती सूचीतील विषय स्वीकारण्याचे त्यांच्यावर बंधन नाही. मसुदा संविधानात समाविष्ट असे राज्य सूचीतील विषय स्वीकारण्याचे त्यांच्यावर बंधन नाही. स्वतःच्या घटना परिषदा निर्माण करून स्वतःची संविधाने निर्माण करण्याचे त्यांना स्वातंत्र्य देण्यात आले आहे. अर्थातच हे सर्व फारच दुर्दैवी आहे आणि माझी धारणा आहे की ते केवळ असमर्थनीय आहे. हा भेदभाव देशाच्या कार्यक्षमतेलासुद्धा धोकादायक सिद्ध होऊ शकतो. हा भेदभाव जोपर्यंत कायम राहील, तोपर्यंत केन्द्रीय सत्ता अखिल भारतीय स्तरावरील विषयांबाबत स्वतःची परिणामकारकता गमावून बसेल. कारण सर्व विषयांच्या बाबतीत आणि सर्व ठिकाणी जर सत्तेचा उपयोग करता येत नसेल तर ती सत्ताच नव्हे. युद्धाची परिस्थिती निर्माण झाल्यास आणि काही क्षेत्रात अत्यंत आवश्यक असणाऱ्या अधिकारांच्या वापरावर मर्यादा येत असल्यास संपूर्ण देशाचे जीवन पूर्णतः संकटात येऊ शकते. अधिक गंभीर बाब अशी की मसुदा संविधानात भारतीय संस्थानांना स्वतःचे सैन्य उभारण्याची मुभा दिली आहे. मला वाटते की ही तरतूद अतिशय धोकादायक आणि मागे नेणारी असून, भारताचे विघटन करण्यास आणि केन्द्र शासनाला उलथून पाडण्यासाठी कारणीभूत ठरू शकेल. मसुदा समितीच्या मानसिकतेचा चुकीचा अर्थ जर मी लावत नसेल तर याबाबत ती मुळीच समाधानी नव्हती. तिची मुळातून अशी इच्छा होती की, प्रांत आणि भारतीय संस्थाने यांच्या केन्द्राशी असणाऱ्या संवैधानिक संबंधांचा एकच आधार असावा. दुर्दैवाने, त्यांना याबाबत काहीही सुधारणा घडवून आणता आली नाही. संविधान सभेच्या निर्णयाला ती बांधलेली होती आणि दुसरीकडे संविधान सभा ही वाटाघाटींसाठी नेमलेल्या दोन समित्यांमध्ये झालेल्या कराराशी बांधलेली होती.

परंतु जर्मनीत जे घडले त्यावरून आपण धैर्य प्राप्त करू शकतो. १८७० मध्ये बिस्मार्कने स्थापन केलेले जर्मन साम्राज्य २५ घटकांचे संमिश्र राज्य होते. या २५ घटकांपैकी २२ राजेशाही राज्ये होती आणि ३ प्रजासत्ताक नगर राज्ये होती. आपणा सर्वांना माहित आहे की काळाच्या ओघात त्यांच्यातील हे वेगळेपण नष्ट झाले आणि एका संविधानाखाली एका भूमीवर राहणारे एकसंध लोक असे स्वरूप जर्मनीला प्राप्त झाले. जर्मनीपेक्षाही भारतीय संस्थानांच्या विलिनीकरणाची प्रक्रिया ही अधिक जलद राहील. १५ ऑगस्ट, १९४७ रोजी

इथे ६०० भारतीय संस्थाने अस्तित्वात होती. भारतीय संस्थानांच्या भारतीय प्रांतांसोबत आज झालेल्या एकत्रिकरणामुळे किंवा आपआपसातील विलिनीकरणामुळे किंवा केन्द्राने त्यांना केन्द्रशासित प्रदेशाचा दर्जा दिल्यामुळे, आता टिकून राहू शकणारी अशी केवळ २० ते ३० संस्थानेच राहिली आहेत. ही अतिशय वेगवान प्रक्रिया आणि प्रगती होती. शिल्लक राहिलेल्या संस्थानांना मी आवाहन करतो की भारतीय प्रांतांप्रमाणेच त्यांनी भूमिका घ्यावी आणि भारतीय प्रांतांच्या व्यवस्थेप्रमाणेच भारतीय संघराज्याचे पूर्ण घटक व्हावे. यामुळे भारतीय संघराज्याला आवश्यक असणारी शक्ती ते प्रदान करतील. स्वतःच्या संविधान सभा निर्माण करणे आणि स्वतःची स्वतंत्र संविधाने निर्माण करणे या त्रासापासून ते स्वतःला वाचवतील आणि त्यांच्यासाठी जे मौल्यवान आहे त्यापैकी काहीही गमावण्याचा प्रसंग त्यांच्यावर येणार नाही. मी आशा करतो की, माझे आवाहन व्यर्थ जाणार नाही आणि संविधान पारित होण्यापूर्वी राज्ये आणि भारतीय संस्थांने यांच्यातील भेद आपण नष्ट करू शकू.

काही टीकाकारांनी मसुदा संविधानातील अनुच्छेद १ मध्ये भारताचे वर्णन युनियन ऑफ स्टेट्स् म्हणून करण्यावर आक्षेप घेतला आहे. असे म्हटल्या जाते की, फेडरेशन ऑफ स्टेट्स् अशी शब्दरचना असायला हवी. हे खरे आहे की, केन्द्रीभूत राज्य (Unitory States) असलेल्या दक्षिण आफ्रिकेचे वर्णन संघ (Union) असे केले जाते. परंतु फेडरेशन असलेल्या कॅनडाचेही वर्णन संघ (Union) म्हणूनच केले जाते. संविधान फेडरल असले तरी भारताचे वर्णन संघ (Union) केल्याने शब्दरचनेच्या उपयोगाला कोणतीही हानी पोहोचत नाही. परंतु महत्त्वाचे आहे ते हे की, संघ (Union) या शब्दाचा उपयोग जाणीवपूर्वक करण्यात आला आहे. कॅनडाच्या संविधानात ' संघ ' (Union) या शब्दाचा उपयोग का करण्यांत आला हे मला माहित नाही. परंतु मसुदा समितीने तो का उपयोगात आणला ते मी आपल्याला सांगू शकतो. मसुदा समिती हे स्पष्ट करू इच्छित होती की, भारत जरी फेडरेशन होणार असला तरी, राज्यांच्या आपसातील कराराची परिणती म्हणून हे फेडरेशन अस्तित्वात आलेले नाही आणि फेडरेशन हा कराराचा परिणाम नसल्याने कोणत्याही राज्याला त्यातून बाहेर पडण्याचा अधिकार राहणार नाही. फेडरेशन हे युनियन आहे कारण ते अविध्वंसनीय आहे. प्रशासनाच्या सोयीसाठी देशाची आणि लोकांची विविध राज्यांमध्ये विभागणी करण्यात येत असली तरी देश पूर्णतः एकसंध आहे, एकाच स्त्रोतातून निर्माण झालेल्या एका सार्वभौम राज्याच्या अधिपत्याखाली राहाणारे हे लोक

एकच आहेत. अमेरिकन फेडरेशन हे अविध्वंसनीय असून कोणत्याही राज्याला त्यातून बाहेर पडण्याचा अधिकार नाही हे सिद्ध करण्यासाठी अमेरिकन लोकांना गृहयुद्ध करावे लागले. मसुदा समितीने हा विचार केला की, तर्क किंवा वादावर ही बाब सोपविण्यापेक्षा सुरूवातीलाच त्याची स्पष्टपणे नोंद करावी.

संविधान दुरूस्तीशी संबंधित प्रावधानांवर मसुदा संविधानाच्या टीकाकारांनी कठोर टीका केली आहे. असे म्हटले गेले आहे की, मसुद्यात अंतर्भूत तरतुदींमुळे दुरूस्ती करणे कठीण होणार आहे. असे सुचविण्यात आले आहे की, निदान काही वर्षे साध्या बहुमताने संविधानात दुरूस्ती करता आली पाहिजे. हा युक्तिवाद चतुराईयुक्त व कावेबाज आहे. असेही म्हटले गेले आहे की, ही संविधान सभा प्रौढ मतदान पद्धतीने निवडलेली नाही. उलट भविष्यातील संसद ही प्रौढ मतदान पद्धतीने निवडली जाणार आहे आणि तरी सुद्धा संविधान सभेला साध्या बहुमताने संविधान मंजूर करण्याचा अधिकार देण्यात आला आहे. दुसरीकडे भविष्यातील संसदेला मात्र हा अधिकार नाकारण्यात आला आहे. मसुदा संविधानातील ही विसंगती आहे असे खुलेआम सांगितले जात आहे. या आरोपाचे मला खंडन केलेच पाहिजे कारण त्याला काहीच आधार नाही. मसुदा संविधानातील संविधान दुरूस्तीच्या संदर्भातील तरतुदी किती साध्या आहेत हे पाहाण्यासाठी एखाद्याने अमेरिका आणि ऑस्ट्रेलियाच्या संविधानातील दुरूस्ती करण्याच्या तरतुदींचा अभ्यास करावा. त्यांच्याशी तुलना करता मसुदा संविधानातील तरतुदी सर्वात साध्या असल्याचे दिसून येईल. परंपरागत संकेत किंवा सार्वमत यासारख्या गुंतागुंतीच्या आणि कठीण कार्यपद्धतीला मसुदा संविधानाने टाळले आहे. दुरूस्तीचे अधिकार केन्द्रीय आणि प्रांतिक विधीमंडळांवर सोपविले आहेत. काही विशिष्ट विषयांच्या, जे फारच कमी आहेत, दुरूस्तीसाठी राज्य विधिमंडळांच्या मंजुरीची गरज राहील. संविधानातील इतर सर्व अनुच्छेदांमध्ये दुरूस्ती करण्याचा अधिकार संसदेला देण्यात आला आहे. बंधन एवढेच आहे की, सभागृहात उपस्थित असणाऱ्या आणि मतदान करणाऱ्या सभासदांच्या $\frac{२}{३}$ पेक्षा कमी असणार नाही इतक्या बहुमताने आणि प्रत्येक सभागृहातील एकूण सदस्यसंख्येच्या बहुमताने ती दुरूस्ती व्हायला हवी. संविधान दुरूस्तीच्या अधिक सोप्या पद्धतीची कल्पना करणे कठीण आहे.

दुरूस्तीसंबंधीच्या प्रावधानांवर करण्यात येत असलेल्या विसंगतीचा आरोप, संविधान सभा आणि संविधानानुसार निवडून येणाऱ्या भविष्यकालीन संसद यांच्या बाबतच्या चुकीच्या समजुतीवर आधारलेला आहे. संविधान निर्माण करताना संविधान सभेचा पक्षीय दृष्टिकोन नाही. एक उत्कृष्ट आणि कार्यकारी संविधान निर्माण करण्यापलिकडे तिचा अन्य कोणताही स्वार्थी हेतू नाही. संविधानातील अनुच्छेदांचा विचार करतेवेळी विशिष्ट मापदंडांचा उपयोग करण्याची तिची दृष्टी नव्हती. भविष्यातील संसदेने जर संविधान सभेचे रूप धारण केले तर तिचे सभासद पक्षीय दृष्टिकोन स्वीकारतील आणि पक्षीय कार्यक्रम अंमलात आणण्याच्या उद्देशाने जे अनुच्छेद अडथळे वाटतात त्यात ते दुरुस्त्या करतील. संसदेपुढे स्वार्थी हेतू असू शकतो, संविधान सभेसमोर मात्र असा कोणताही हेतू नाही. संदिधान सभा आणि भावी संसद यात हाच फरक आहे. यावरून हे स्पष्ट होते की, संविधान सभा जरी सीमित मतदान पद्धतीने निवडून आली असली तरी साध्या बहुमताने संविधान पारित करण्यासाठी ती विश्वासपात्र आहे. आणि संसद जरी प्रौढ मतदान पद्धतीने निवडून आली असेल तरी दुरूस्तीसाठी तसाच अधिकार देण्यास ती विश्वासपात्र ठरत नाही.

मसुदा समितीने तयार केलेल्या मसुदा संविधानावर करण्यात आलेल्या सर्व आक्षेपांना मी यथोचित उत्तर दिले आहे, असा मला विश्वास वाटतो. गेले आठ महिने संविधान लोकांपुढे विचारार्थ होते. या दरम्यान संविधानावर करण्यात आलेल्या दखल घेण्यायोग्य महत्त्वाच्या प्रतिक्रिया आणि आक्षेपांपैकी काही सुटले आहे असे मला वाटत नाही. मसुदा समितीने तयार केलेल्या संविधानाचा स्वीकार करायचा किंवा ते मंजूर करण्यापूर्वी त्यात काही बदल करायचा हे संविधान सभेने ठरवावयाचे आहे.

परंतु मी हे सांगू इच्छितो, भारतातील काही प्रांतीक विधिमंडळांनी संविधान मसुद्यावर चर्चा केली आहे. बॉम्बे, सी. पी., प. बंगाल, बिहार, मद्रास व पूर्व पंजाब इथे चर्चा झाली. हे खरे आहे की, काही प्रांतिक विधिमंडळात संविधानातील आर्थिक तरतूदीबाबत आणि मद्रासमध्ये अनुच्छेद २२६ बाबत गंभीर आक्षेप घेण्यात आलेले होते. परंतु हा अपवाद सोडल्यास, कोणत्याही प्रांतिक विधिमंडळात संविधानातील अनुच्छेदांवर कोणताही गंभीर आक्षेप घेण्यात आला नाही. कोणतेही संविधान परिपूर्ण असत नाही आणि मसुदा संविधान अधिक चांगले करण्याच्या उद्देशाने मसुदा समिती स्वतःच काही दुरूस्त्या सुचविणार आहे. परंतु प्रांतिक विधिमंडळांमध्ये झालेल्या चर्चा मला असे म्हणण्याचे धैर्य देतात की, मसुदा समितीने निर्माण केलेले संविधान

सुरूवात म्हणून ह्या देशासाठी निश्चितपणे चांगले आहे. माझ्या मते ते व्यवहार्य आहे, लवचिक आहे आणि देशाला शांतता आणि युद्धजन्य या दोन्ही परिस्थितीत एकसंध ठेवण्यासाठी पुरेसे समर्थ आहे. मी असे म्हणू शकतो की, खरेच नवीन संविधानाअंतर्गत जर काही चुकीच्या गोष्टी घडल्या, तर आपले संविधान वाईट आहे हे त्याचे कारण असणार नाही. आपल्याला असे म्हणावे लागेल की माणूस दुष्ट होता. महोदय, मी संविधान सादर करतो.''[1]



[1] मूळ इंग्रजी भाषणाचा अनुवाद अतिथी संपादक मंडळाने केला आहे.

## २५६

# ज्यांना काम करण्याची आवड आहे त्यांना संधी द्या आपापसात भांडणे नकोत

दि. २२ डिसेंबर १९४८ रोजी मुंबईमधील आर. एम. भट हायस्कूलमध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकर व सौ. माईसाहेब आंबेडकर यांना चहापान देण्याचा कार्यक्रम मुंबई प्रदेश शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या वतीने घेण्यात आला. सदर प्रसंगी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण झाले. ते म्हणाले,

सभाधिपती, बंधुंनो आणि भगिनींनो,

मला वाटतं, मला नक्की आठवत नाही, १९४६ मध्ये जे इलेक्शन झाले तेव्हा येथेच आपली एक सभा भरली होती. त्यावेळी मी हजर होतो. आज मी येथे तुमच्यापुढे हजर असल्याने त्यावेळच्या सभेची सहजगत्या आठवण होते. १९४६ च्या इलेक्शनमध्ये आपण आणि आपल्या पक्षाने अपयशाचा बराच मोठा वाटा उचलला होता असे म्हटले पाहिजे. आपण इलेक्शनमध्ये हरलो म्हणून ख़न्ती वाटण्याचे काही कारण नाही. पराभवाबद्दल मला विशेष दु:ख कधी होत नाही. क्रिकेटच्या सामन्यामध्ये कधी एका संघाचा पराभव होतो. कधी दुसऱ्या संघाचा पराभव होतो. अपयशी ठरणारा संघ पुढे यश मिळवू शकतो. तद्वत यश मिळविणारा संघ अपयशीही ठरण्याचा संभव असतो. इलेक्शनमधील यशापयशाचे असेच आहे. तेव्हा गेल्या इलेक्शनमध्ये काँग्रेसने आपला केवळ पराभवच केला असता तर त्याबद्दल विशेष काही मानण्यासारखे नव्हते. परंतु त्या प्रसंगी काँग्रेसच्या लोकांनी आपल्यावर जो जोर जुलूम व अत्याचार केला; तसा अत्याचार हिंदुस्थानात इतरत्र क्वचितच झाला असेल. नायगावच्या १७ नंबरच्या चाळीतील लोकांवर केवढा प्रसंग ओढवला होता. बाया-माणसांना बाहेर पडणे देखील अत्यंत कठीण होते, मुष्कीलीचे होते. नायगावात मसाला कुटण्याचे एक दुकान आहे. या ठिकाणी काम करणाऱ्या एका अस्पृश्य बाईला स्पृश्य गुंडांनी पळवून नेली, तिच्यावर बलात्कार केला आणि तिचे वस्त्र फेडून घेऊन तिला नग्नावस्थेत सोडून दिले. असा हा अमानुष अत्याचार होता.

---

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे : मा. फ. गांजरे, खंड ७, पृष्ठ २६-२८.

हिंदुंच्या विरुद्ध झगडण्यात शहाणपणा आहे काय? अशी शंका पुष्कळांना त्यावेळी आली होती. तुमच्यापैकी पुष्कळांना तर वाटत होते. दरेकाला मोठी विवंचना पडली होती. डॉ. आंबेडकरांना पाठिंबा देणे कितपत योग्य आहे, असे म्हणण्यापर्यंत अनेकांची मजल गेली होती. तुमच्यापैकी बरेचजण हताश झाले होते. मी सुद्धा विवंचनेत पडलो होतो. माझे पण धैर्य खचल्यासारखे झाले होते. पण आपली आजची मनोभूमिका व धैर्य यांची तुलना त्यावेळच्या मनोभूमिकेशी व धैर्याशी केली तर काय दिसून येते ? १९४६ च्या अत्यंत बिकट प्रसंगातून आपण निभावून निघालो ही काही लहान सहान गोष्ट नव्हे. आता आपणास धैर्य आलेले आहे. ' तुम्ही काय करणार ' ? असे विचारल्यास तुमच्यापैकी प्रत्येकजण खात्रीने म्हणेल, '' आम्ही आपला पक्ष सोडणार नाही. '' , (टाळया) एवढे धैर्य आपल्यात आलेले आहे.

मला पुष्कळ लोक विचारतात तुम्ही भाषणे का करीत नाही ? संदेश का देत नाही ? मी भाषणे करीत नाही व संदेश देत नाही याचा अर्थ असा नव्हे की, मला तुमच्याबद्दल काही काळजी वाटत नाही. कळकळ नाही, अगर तुमचे भले व्हावे असे मी इच्छित नाही. प्रसंग ओळखून काम करणे भाग आहे. शत्रु कोण ? मित्र कोण ? अशा प्रसंगी काय केले पाहिजे ? या व अशा सर्व गोष्टींची चाचपणी करणे भाग आहे. अशा परिस्थितीत स्तब्ध बसून विचार करणे याशिवाय गत्यंतर नव्हे.

गेल्या इलेक्शनमध्ये आपला पराभव झाला पण लगेच एक वर्षाने झालेल्या म्युनिसीपल निवडणुकीत आपणास जय मिळाला आहे. आपण ८, १० जागा मिळवू शकलो. आपल्या उमेदवारांनी मिळविलेली मते इतकी प्रचंड होती की, तेवढी मते होण्यासाठी कॉंग्रेसच्या तीन-तीन चार-चार उमेदवारांच्या मतांची बेरीज करावयास हवी. तेव्हा आपण कोणास भिण्याचे कारण नाही. आपले संख्याबल मोठे आहे. आपण संघटित झालो, आपली मते आपण विकली नाहीत, आपल्या मताचा दुरुपयोग केला नाही, जर ती योग्य कारणालाच वापरलीत तर आपणाला कोणाचेच डर बाळगण्याचे कारण नाही.

येत्या निवडणुकीमध्ये काय करावयाचे याचा विचार आज करण्याचे काही प्रयोजन नाही. निवडणुकीच्यावेळी कोणते पक्ष उभे राहातात हे पाहिले पाहिजे. आपण अल्पसंख्यांक आहोत. कोणा न कोणा पक्षाशी सहकार्य केल्याशिवाय आपले भागणार नाही. कोणाशी सहकार्य करावयाचे ते दरेक पक्षाचा कार्यक्रम पाहून ठरवावे लागेल. संगनमत करावयाचे जरी झाले तरी आपला पक्ष मोडून सामील होता कामा नये. आपला पक्ष कायम ठेऊनच इतर पक्षांशी संगनमत करण्याचे धोरण आपण ठेवले पाहिजे.

जशी ब्राह्मणेतर पक्षाची गत झाली तशी आपली गत होऊ नये म्हणून हा इषारा देणे अवश्य आहे. होती ती संघटना मोडून ब्राह्मणेतर पक्ष काँग्रेसमध्ये गेला. आता काँग्रेस सोडून बाहेर आले. बाहेर येऊन पुनः स्वतंत्र संघटन करू लागले. दुसऱ्याच्या घरात शिरावयाचे, आतून बाहेर पडावयाचे आणि पुनः मोडलेले घर बांधावयाचे अशा नागमोडी धोरणाचा अवलंब आपण करता कामा नये.

मी असे ऐकतो की, आपल्या फेडरेशनच्या पदाधिकाऱ्यांच्या निवडणुका होणार आहेत. ठीक आहे. इलेक्शनचे मला कधीच वावडे नाही. एकाच माणसाने सतत, त्याच जागेवर रहाणं बरं नाही. इलेक्शन करा, पण गुण्यागोविंदाने करा. भेदभाव वाढवू नका. ज्यांना काम करण्याची आवड आहे त्यांना अवश्य संधी द्यावी या मताचा मी आहे. मात्र आपापसात भांडणे नकोत. भांडणे होणार असतील तर इलेक्शन नको असे मला वाटते.

दुसरी गोष्ट मी अशी ऐकतो की, म्युनिसीपालिटीमधील आपले कॉर्पोरेटर्स काही कामे करीत नाही. मला असंही कुणीतरी सांगितले की आपल्या पक्षाचा नेमलेला ( पार्टी ) म्होरक्या हाही काम करीत नाही. म्होरक्या जर काम करीत नसेल तर त्याचे तुम्ही ऐका असे मी कधीच सांगणार नाही, तुम्ही स्वतंत्र आहात. जो काम करीत नाही असे तुम्हास वाटते त्यास झुगारून देण्याची तुम्हास मुभा आहे. तुम्ही कोणाची तरी गुलामगिरी पत्करावी असे मी कधीच सांगणार नाही.

मी असेही ऐकतो की आपल्या कॉर्पोरेटर्सनी कोणकोणती कामे करावीत हे सांगण्यासाठी एक ॲडव्हायझरी बोर्ड नेमण्यात आले आहे. ती कल्पना मला मुळीच पसंत नाही. सल्ला देणारे लोक काही मोठे विद्वान आहेत किंवा अनुभवी आहेत असे म्हणता येणार नाही. उगाच वाद वाढेल.

यावर उपाय म्हणून फेडरेशनच्या कार्यकर्त्यांची मिटींग आपल्या कॉर्पोरेटर्सनी दरेक पंधरवाड्यात अगर महिन्यास घ्यावी आणि कॉर्पोरेटर्सनी आपल्या कामाचा रिपोर्ट द्यावा. कॉर्पोरेशनमध्ये काय काम केले, तिच्या मिटींगांना हजर होतो की नाही, हजर होतो तर झोपलो होतो की ऐकत होतो वगैरे गोष्टींचा रिपोर्ट कॉर्पोरेटर्सनी फेडरेशनच्या मिटींगमध्ये द्यावा आणि फेडरेशनच्या कार्यकर्त्यांनी ' हा ठराव मांडावा तो ठराव मांडावा ' असे सांगावे.

आता मी जास्त बोलत नाही. इलेक्शन लवकरच येईल. पुढल्या वर्षात देशभर इलेक्शन्स होतील त्याची सिद्धता करा. एवढेच सांगून मी आपली रजा घेतो.

● ● ●

२५७

# दुसऱ्याच्या हवेलीत शिरणे मोठा मूर्खपणा आपली झोपडी शाबूत राखा

मनमाड (नाशिक) येथे रविवार, ता. १६ जानेवारी १९४९ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर व सौ. सविताबाई आंबेडकर यांचे स्वागतार्थ प्रचंड जाहीर सभा झाली.

जरी सभेची तारीख एकाकी निश्चित करण्यात आली व पुष्कळांना ऊशीरा कळली असली तरी औरंगाबाद, अहमदनगर, नाशिक व मुंबई येथून हजारो लोक सभेस हजर राहिले होते. शनिवार दुपारपासून प्रत्येक आगगाडी चिक्कार भरून येत होती. स्टेशनवर व धर्मशाळेच्या आवारामध्ये तर अफाट अस्पृश्य जनसमुदाय जमा झाला होता. त्यामुळे या मेळाव्याला एका मोठ्या यात्रेचे स्वरुप प्राप्त झाले होते. प्रत्येक आगगाडी स्टेशनमध्ये येताच " जयभीम " च्या घोषणेने वातावरण दुमदुमून जात असे. प्रत्येकजण एकमेकांना " जयभीम " ची सलामी देऊन स्वागत करीत होता. डॉ. बाबासाहेबांचे फोटो छातीवर लावून, प्रत्येक स्त्री-पुरुष विजयी सैनिकाच्या आवेशाने सबंध मनमाडभर संचार करीत होता.

रविवारी बरोबर ११ वाजता पंजाबमेल स्टेशनमध्ये येताच 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर की जय', ' बोलो बोलो जयभीम ', ' शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचा विजय असो ', ' तरूण पार्टी झिंदाबाद, थोडे दिनमे भीमराज ' वगैरे घोषणांनी सर्व मनमाड हादरून गेले होते. डॉ. बाबासाहेबांचे दर्शन मिळावे म्हणून सलूनच्या डब्याच्या दोन्ही बाजूला स्त्री-पुरुषांच्या झुंडी गोळा होऊ लागल्या. इतकी बेफाम गर्दी झाली की, शेवटी बाबासाहेबांना बाहेर येणे अशक्य झाले. शेवटी सर्वांना दर्शन मिळावे म्हणून थोडा वेळ सलूनच्या दोन्ही बाजूच्या खिडक्या उघडून हजारो अस्पृश्य जनतेला त्यांचे दर्शन मिळण्याची व्यवस्था करण्यात आली. नुसत्या दर्शनासाठी भुकेलेले हजारो स्त्री-पुरुष अतृप्त नेत्रांनी जेथून मिळेल तेथून दर्शन घेऊन अक्षरशः आपल्या डोळ्यांची पारणी फेडून घेत होते. अस्पृश्यांचे आपल्या नेत्यावरील हे अलोट प्रेम पाहून स्पृश्यवर्गीय तर थक्कच झाले. एकाने तर मला

जनता : २२ जानेवारी १९४९.

बोलूनही दाखविले की, अखिल हिंदमध्ये आपल्या नेत्यावरील अलोट प्रेम असलेला अस्पृश्य समाज व त्यांचा नेता डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची बरोबरी करणारा दुसरा कोणीच नाही. हिंदचे इतर सर्व पुढारी डॉ. बाबासाहेबांचा या बाबतीत खात्रीने मनातून हेवा करीत असतील.

सभेचा मंडप रंगीबेरंगी पताकांनी सुशोभित केला होता. ''सौ. सवितादेवी द्वार'' ''मातोश्री रमाबाई द्वार'' अशी दोन प्रवेशद्वारे उभारण्यात आली होती. मंडपाच्या दर्शनभागी मध्यावर गौतम बुद्धाची प्रतिमा होती. ''बुद्धम् शरणं गच्छामि'' वगैरे म्हणी असलेल्या पताका लावलेल्या होत्या.

सुरवातीला मुंबई प्रांताध्यक्ष श्री. भाऊराव गायकवाड यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकर व सौ. सवितादेवी आंबेडकर यांचे स्वागत करण्याकरिता व मुंबई इमारत फंडासाठी थैली अर्पण करण्याकरिता सभा बोलविण्यात आली आहे असे सांगितले. नंतर निरनिराळ्या संस्थांतर्फे बाबासाहेबांना, सौ. सवितादेवींना हार अर्पण करण्याचा समारंभ झाला.

सौ. गिताबाई गायकवाड, मुंबई प्रांतिक द. फेडरेशनच्या सेक्रेटरी कु. शांताबाई दाणी आणि अखिल भारतीय दलित फेडरेशनचे जनरल सेक्रेटरी बापूसाहेब राजभोज यांची सुरवातीला भाषणे झाली. नंतर डॉ. बाबासाहेबांनी अर्धा तास सुश्राव्य व आश्वासन देणारे भाषण केले. ते म्हणाले,

माझे मित्र भाऊराव गायकवाड यांनी त्यांच्या नेहमीच्या प्रवृत्तीप्रमाणे मला विचारले की, एखादी सभा जर ठरविली तर त्याला माझी काही हरकत आहे का ? मी सभेस होकार दिला.

मुंबई इमारत फंडासाठी मला चार हजारांची थैली अर्पण करण्यात येईल, असे मला सांगण्यात आले. मला चार हजारांचे आमिष दाखविण्यात आले. (प्रचंड हंशा) त्यामुळेच ही सभा घेण्यात आली. परंतु त्या थैलीचे काय झाले याचा खुलासा आधीच्या वक्त्यांनी आपल्या भाषणात केला नाही. रक्कम जमली व ती चोरीला गेली असेही सांगितले नाही. (प्रचंड हंशा) सभेच्या शेवटी तरी याचा खुलासा होईल, अशी मला दाट आशा आहे.

अलिकडे मी बरेच दिवस राजकारणाबाबत बोलत नाही. कारण मी हल्ली राजकीय बंधनात आहे.

अस्पृश्य समाज इतर कोणत्याही समाजापेक्षा अधिक राजकारण–ज्ञानी समाज आहे याबद्दल मला बिलकूल शंका नाही. (टाळयांचा कडकडाट) कोणत्याही समाजाची उन्नती त्या समाजाच्या शिक्षणाच्या प्रगतीवर अवलंबून असते. आपले राजकारण यशस्वी करण्याकरिता आपल्या समाजास मोठ्या अधिकाराच्या जागा, म्हणजे मी म्हणतो त्याप्रमाणे मान्याच्या जागा काबीज केल्या पाहिजेत.

जरी आपल्याला राखीव जागा मिळाल्या नसल्या तरी भिण्याचे कारण नाही. आपण सात कोटी लोक आहोत. आपण जर संघटित राहिलो तरच आपला पक्ष बलवान होईल. एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. आपला जो राजकीय संघ-शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन त्यालाच आपण चिकटून राहिले पाहिजे. (टाळयांचा कडकडाट, जयघोष) आपण जरी अल्पसंख्य असलो तरी स्वतःच्या मनगटाच्या जोरावर संघर्ष करु. आपणास भिण्याचे कारण नाही. (प्रचंड टाळया)

दुसरी गोष्ट अशी की, आपल्याला कधी दुसऱ्या पक्षाशी संगनमतही करावे लागेल. जो पक्ष आपले कल्याण करील तोच आपल्याला जास्त जवळचा. ज्यांचा कार्यक्रम जास्तीतजास्त आमच्या कार्यक्रमाशी जुळेल त्या पक्षाशी आम्हाला संगनमत करायला काही हरकत नाही. मग ती काँग्रेस असो, समाजवादी असो, अगर बहुजन समाजवादी असो.

वैयक्तिक कार्य करणे यासारखा मूर्खपणा नाही. मला तुम्हाला एक महत्त्वाची गोष्ट सांगावयाची आहे. संघ फोडून तुटकपणाने दोघाचौघांनी दुसऱ्या संघात सामील होणे म्हणजे आत्मनाश करणे होय. तुम्हाला माहीत आहे की आपण कळपाने राहिले पाहिजे.

आपले घर मोडून दुसऱ्याच्या हवेलीत शिरणे म्हणजे मोठा मूर्खपणा आहे. आपली झोपडी शाबूत राखा. तसे न झाल्यास ब्राह्मणेतर पक्षाप्रमाणे आपली स्थिती झाल्याशिवाय राहाणार नाही. ब्राह्मणेतर पक्षाची काय दुर्दशा झाली ? १९३२ सालपर्यंत आम्ही संगनमताने काम करीत होतो. त्यावेळी काही ब्राह्मणेतर पुढाऱ्यांना वाटले की काँग्रेसबाहेर राहून उपयोग नाही. आत शिरून आतून पोखरून काँग्रेसचा किल्ला फोडता येईल. बाहेरून किल्ला फोडता येणार नाही. ह्या समजुतीने ते काँग्रेसमध्ये शिरले. मी त्यांना पुष्कळदा बजावून सांगितले. परंतु

त्यांनी माझे ऐकले नाही. आपण आत शिरलो ती भयंकर चूक झाली असे आज ब्राह्मणेतर पक्षाच्या लोकांना वाटत आहे. आज ब्राह्मणेतर पक्ष नामशेष झाला आहे. ते आपली राहुटी कितपत बांधू शकतील याबद्दल मला शंका आहे.

आम्ही झोपडी मोडून समझौता करावयाचा हे मला बिलकूल पसंत नाही. झोपडी मोडून आम्ही काहीही करणार नाही.

मी देशघातकी गोष्टी करतो, असा आरोप पूर्वी माझ्यावर केला जात असे. पण त्या आरोपाचा फोलपणा सर्वांच्या नजरेस आता आला आहे. आमचा पक्ष देशाच्याविरुद्ध कधीच नव्हता. आम्ही देशाचा द्रोह केला नाही. ते एक कुभांड रचले होते. आमचा पक्ष शर्यतीत उतरला तर आमच्यापेक्षा कोणीच वरचढ होऊ शकणार नाही. आम्ही नेहमीच आघाडीला राहू. (टाळया)

आपणच खरा समाजवाद प्रस्थापित करू शकू. शेतकरी, कामकरी राज्य आपणच स्थापणार. कारण आपल्यात श्रीमंत व मध्यमवर्ग नाहीतच. आपण सर्वच कामगार. आपण सर्वच गरीब. आम्हीच लोकशाही निर्माण करू. इतकेच काय कम्युनिस्टांचा कम्युनिझम राजकारणात आमच्या मागेच आहे. आमचा पक्ष तात्त्विक सिद्धीत मागे पडेल, असे कधीच संभवत नाही. पुष्कळ पक्ष निघाले. त्या सर्वांना आमचा हेवा वाटतो. काँग्रेस पक्ष वगळल्यास हिंदमध्ये शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनसारखा दुसरा पक्ष नाही. सर्वांचे डोळे आमच्या पक्षाकडे लागून राहिले आहेत. आपला पक्ष हा गुळाच्या ढेपेप्रमाणे असून इतर पक्ष हे मुंगळयाप्रमाणे आहेत. आमच्या पक्षाच्या सहकार्यासाठी हे इतर आमच्या पक्षाला मुंगळयासारखे चिकटायला पाहातात. त्यांच्याविषयी आपण अत्यंत जागरूक असले पाहिजे.

आपल्या लोकांची नीतीमत्ता सोज्वळ असावी. अस्पृश्यांचे भवितव्य अतिशय उज्ज्वल आहे. याविषयी खात्री बाळगा. काँग्रेस म्हणते की परकीय सत्तेला हाकलून देऊन आम्ही क्रांती केली. त्याबद्दल त्यांना धन्यवाद, परंतु ही अर्धवट क्रांती होय. खरी लोकशाही निर्माण करावयाची असल्यास आज हजारो वर्षे डोक्यावर नाचत असलेला वरचा वर्ग खाली व समाजातील खालचा वर्ग वर गेल्याशिवाय खरी क्रांती होणार नाही. (टाळया) क्रांतीचे चक्र अर्धेच फिरले. आसासह चाक पूर्ण फिरल्याशिवाय खरी क्रांतीच होऊ शकत नाही. ते चक्र आम्हीच फिरवू. (टाळया)

सध्या मी राजबंधनात आहे. १९५० साली अगर तत्पूर्वी ते बंधन तुटेल किंवा संपेल. निवडणुका जवळच आल्या आहेत. त्यावेळी मी आपणाजवळ संपूर्ण व सगळ्या गोष्टी सांगेन. मी आपल्या समाजासाठी सरकारी नोकऱ्यांमध्ये राखीव जागांची तरतूद करून ठेवली आहे. परंतु त्या राखीव जागांसाठी लायक उमेदवार मिळत नाहीत. जे राजकीय हक्क मिळविले आहेत त्यांची अंमलबजावणी खरोखर होत नाही. कारण तेथे अधिकारी वरच्या वर्गाचे असतात.. म्हणून त्या मा-याच्या जागा आपण काबीज केल्या पाहिजेत.

राजकारणाइतकेच महत्त्व शिक्षण संस्थेला आहे. एखाद्या समाजाची उन्नती त्या समाजातील बुद्धिमान, होतकरू व उत्साही तरुणांच्या हाती असते. ह्या दिशेने गेली काही वर्षे मी राजकारणाकडे थोडेसे दुर्लक्ष करून शिक्षण संस्थांकडे जास्त लक्ष पुरवीत आहे. मुंबईमध्ये सिद्धार्थ कॉलेज सुरू केले आहे. सिद्धार्थ कॉलेजमध्ये सध्या २,४०० विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. त्यापैकी १६० विद्यार्थी आपले आहेत. त्यांचेसाठी मी दरवर्षी २१,००० रुपये खर्च करीत असतो. माझे सर्व लक्ष या गोष्टीकडे वेधले आहे. औरंगाबादला जाऊन तेथे कॉलेज काढण्याबद्दल विचार करीत आहे. हे सगळे '' नामदेवाचे लग्न पांडुरंगाने केले '' त्याप्रमाणे आहे.

घटना समितीने जो भावी राज्यघटनेचा मसुदा तयार केला आहे त्यात अस्पृश्यांच्या हक्कांची तरतूद करून ठेवली आहे. नवीन घटनेच्या ९ व्या कलमान्वये अस्पृश्यतेचा नायनाट करण्यात आला आहे. कोणत्याही प्रकारचा जातीभेद, उच्च-नीच भावना रद्द केली आहे. न्हाव्याने तुमचे केस कापले पाहिजे ; धोब्याने तुमचे कपडे धुतले पाहिजे ; देवळे, खाणावळी व उपहारगृहात आपणास उच्चवर्णीयांप्रमाणे वागविले पाहिजे. इतरांनी आपणास समानतेने वागविले पाहिजे. हा कायदा जो मोडील त्यास शिक्षा करण्यासंबंधी कायदा करण्याचे अधिकार मध्यवर्ती कायदेमंडळाकडे सोपविले आहेत. ह्याच गोष्टीची आपण किती वर्षेपावेतो मागणी करीत आहोत.

आपण तीन प्रकारचे राजकीय हक्क मागत असू : एक, आमचे प्रतिनिधी कायदेमंडळात असावेत, दोन, लोकसंख्येच्या मानाने सरकारी नोकऱ्या राखून ठेवल्या पाहिजेत, तीन, स्वतंत्र मतदार संघ मिळावेत. फक्त एकच गोष्ट प्राप्त

झाली नाही. ती म्हणजे निवडणुकीत आपणास स्वतंत्र मतदार संघ मिळाले नाहीत. परंतु यामुळे आपला भाग्योदय थांबणार आहे, असे मी मानणार नाही. जे मिळेल ते पदरात पाडून घ्यावे आणि अधिका करिता मागणी करावी, अशी आपली वृत्ती असावी. अशी एक म्हण तुम्हाला माहीत आहे की '' नेसेन तर जरीची साडी नाही तर उघडीच बसेन '' या म्हणीप्रमाणे वृत्ती असणे चांगले नाही. त्याच्यात काय पुरुषार्थ आहे ?



## २५८

# परावलंबी वृत्ती टाकून एकजुटीने आणि प्रभावी संघटनेने राहा

डॉ. बाबासाहेब आंबेडकर व सौ. माईसाहेब सवितादेवी आंबेडकर यांचा सत्कार समारंभ मनमाड मुक्कामी अत्यंत थाटाने साजरा झाल्यानंतर त्यांनी पूर्वनियोजित हैद्राबाद संस्थानातील दौऱ्यास ता. १६ जानेवारी १९४९ च्या मध्यरात्रीस सुरुवात केली. मनमाड स्टेशन रात्रौ दीड वाजता त्यांनी सोडले व दौऱ्याचे पहिले ठिकाण औरंगाबाद येथे ता. १७ जानेवारी १९४९ च्या पहाटेस ते पोहचले. रस्त्यात ज्या ज्या ठिकाणी गाडी थांबली त्या त्या सर्व स्टेशनवर त्यांचे हार्दिक सत्कार समारंभ सोज्वळतेने साजरे झाले.

प्रत्येक स्टेशनवर दलित जनता अफाट समुदायाने जमली होती. गॅसच्या बत्त्या व रंगीबेरंगी कागदी पताका यांच्या सुंदर सजावटीने जवळ जवळ सारी स्टेशने सजविली होती.

औरंगाबाद स्टेशन जनतेच्या अभूतपूर्व गर्दीने जणू फुलूनच निघाले होते. सर्व मतांचे, सर्व पक्षांचे लोक डॉक्टरसाहेबांच्या स्वागतासाठी हजर होते.

शेकडो हारतुरे डॉ. बाबासाहेबांना व सौ. सविताबाई आंबेडकरांना अर्पण करण्यात आले, त्यावेळी क्षणोक्षणी '' भीम भगवान की जय '' चा जयघोष होत होता.

### जुनी आठवण

औरंगाबादचे सिव्हील ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर श्री. राजवाडे, डी. एस. पी. श्री. अष्टेकर व इतर पोलीस अधिकारीही आपल्या जाम्यानिम्यासह हजर होते. शिरस्त्याप्रमाणे पोलिसांचा '' गार्ड ऑफ ऑनर '' (मानाची सलामी) घेऊन डॉ. बाबासाहेब आंबेडकर सर्व मित्रमंडळीसह श्री. अष्टेकरांच्या मोटारीतून औरंगाबादेस स्थापल्या जाणाऱ्या सिध्दार्थ कॉलेजच्या जागेची पाहाणी करण्यासाठी गेले. मुक्रर केलेली जागा पाहिल्यानंतर औरंगाबाद शहरातील ऐतिहासिक प्रेक्षणीय स्थळेही त्यांनी पाहिली. त्यापैकी '' पाणचक्की '' बघत असताना डॉ. बाबासाहेबांना १०-११ वर्षापूर्वीची एक जुनी आठवण झाली. ते अगदी मनमोकळेपणाने हसले व लागलीच श्री. भाऊराव गायकवाड यांना हाक मारून

---

जनता : ५ फेब्रुवारी, १९४९.

१०-११ वर्षांपूर्वी ह्याच औरंगाबादेतील मुसलमानांनी दौलताबादेचा किल्ला बघत असताना '' तुम्ही हलक्या जातीचे आहात '' अशी निर्भत्सना केली होती, तिची आठवण करून दिली. पुनः एकदा हास्य करून डॉक्टरसाहेब म्हणाले, '' तेच मुसलमान मला माझ्या पायातील जोड्यासह आज थेट त्यांच्या देवांच्याजवळही नेण्यास तयार आहेत.'' पाणचक्कीच्या शेजारी जी मशीद आहे तेथे ठेवलेले अडीचशे तीनशे वर्षांपूर्वीचे कुणातरी एका साईबाबांचे (फकिराचे) कपडे अगदी जसेच्या तसेच व नीटनेटक्या स्थितीत असलेले पाहून व त्यावरील त्या काळाची वीणकर बघून पूर्वीच्या कलावैभवाचे बाबासाहेबांनी कौतुक केले. नंतर तेथेच थोडीशी विश्रांती घेऊन ते थोडे थंडगार पाणी प्याले. त्यावेळी एका मुसलमान फोटोग्राफरने त्यांचे पुष्कळसे फोटो घेतले. विश्रांतीनंतर बाबासाहेब परत औरंगाबादच्या स्टेट गेस्ट हाऊस येथे दुपारच्या जेवणास परतले.

## हैद्राबादेस प्रयाण

त्याच दिवशी संध्याकाळच्या गाडीने ते हैद्राबादेस निघाले. औरंगाबादेस येताना वाटेत जसा सत्कार झाला अगदी तसाच सत्कार औरंगाबाद ते सिकंदराबाद पर्यंतही झाला. डॉ. बाबासाहेब आंबेडकर हैद्राबादेस येत आहेत असे हैद्राबाद दलित फेडरेशनच्या कार्यकर्त्यांनी ४-६ दिवस आगाऊ दलित जनतेस कळविले होते. तेव्हापासून बाबासाहेबांच्या आगमनाची मार्गप्रतिक्षा सर्व अस्पृश्य जनता ठिकठिकाणच्या स्टेशनवर करीत बसली होती. नांदेड स्टेशनवर ता. १८ जानेवारी १९४९ च्या पहाटेस गाडी पोहोचली. त्यावेळी बाबासाहेब झोपलेले होते. त्यांना जागे करून त्रास देऊ नये म्हणून हैद्राबाद संस्थान दलित फेडरेशनचे चिटणीस श्री. मनोहर यांनी सर्व लोकास विनंती करून, परत येतेवेळेस बाबासाहेबांच्या दर्शनाचा अलभ्य लाभ आम्ही तुम्हास करवून देऊ असे आश्वासन दिले. ता. २०-१-४९ रोजी औरंगाबादेस परत येताना गाडी त्याच नांदेड स्टेशनवर पुनः रात्रीच्यावेळी आली. तेथे अस्पृश्य जनता ता. १८-१-४९ पासून २१-१-४९ पर्यंत स्टेशन सोडून मुळी घरी गेलीच नाही. सर्व काळ तेथे तळ ठोकून सर्वजण बसले होते. अक्षरशः उपाशीपोटी, थंडीवाऱ्यात, अगदी उघड्यावर हे सर्व लोक बाबासाहेबांच्या नुसत्या दर्शनासाठी चार दिवस थांबले होते.

ता. २१ जानेवारी १९४९ रोजी पहाटेसच गाडी औरंगाबाद स्टेशनच्या आवारात शिरली. पुन्हा जयघोष व हारतुरे आले. गार्ड ऑफ ऑनर झाला.

हैद्राबादेहून श्री. प्रधान, सिव्हील ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर हैद्राबाद, श्री. राजवाडे, सि. ॲ. ऑ. औरंगाबाद, श्री. अष्टेकर, डी. एस. पी. यांचेसह डॉ. बाबासाहेब औरंगाबाद स्टेट गेस्ट हाऊसमध्ये गेले. तेथे एक पार्टी झाली.

त्या पार्टीमध्ये स्टेट कॉंग्रेस कार्यकर्त्यांनी बाबासाहेबांना हारतुरे अर्पण करून, '' आम्ही अस्पृश्य जनतेच्या सेवेसाठी काय करावे ? '' असा प्रश्न विचारला. त्यावर बाबासाहेबांनी या सर्व मंडळींना एकच उत्तर दिले : '' तुम्ही सर्वजण आज संध्याकाळी सभेच्या ठिकाणी यावे म्हणजे सर्व आमजनतेसमोर सभामंडपी मी तुम्हाला अस्पृश्योद्धाराचा मार्ग सांगेन व दाखवीन. ''

सायंकाळी ५-३० वाजता त्यांनी मराठा विद्यालयास भेट दिली. याचप्रमाणे ठिकठिकाणच्या संस्थांना भेटी देऊन डॉ. बाबासाहेब सभास्थानी वेळेवर उपस्थित झाले.

## एक लाखाची विराट सभा

सभामंडपाची सजावट शब्दांनी सजविता येणार नाही, इतकी सजविली होती. या सभेस एकूण १८ लाऊडस्पिकर्स लावण्यात आले होते. यावरून जनसमुदाय किती प्रचंड होता, याची कल्पना ज्यांनी सभा, परिषदा पाहिल्या असतील त्यांना होईल. लाखाचेवर लोक जमले होते.

प्रथमतः श्री. बी. एस. मोरे, औरंगाबाद स्टेट दलित फेडरेशनचे चिटणीस, यांनी सुरवातीचे प्रास्ताविक भाषण करून हैद्राबाद संस्थानात अस्पृश्य जनतेवर झालेल्या घोर अत्याचाराचे कथन करून नंतर अखिल भारतीय दलित फेडरेशनचे सरचिटणीस श्री. पां. ना. राजभोज यांनी आपल्या नेहमीच्या रोखठोक सवयीप्रमाणे फेडरेशनचे धोरणाविषयी व संघटनेविषयी माहिती सांगितली. नंतर श्री. गायकवाड यांनी ५-१० मिनिटांच्या भाषणात तमाम लोकसमुदायास आपल्या महान नेत्याचे भाषण अत्यंत शांत चित्ताने, कसलाही आवाज न करता ऐकण्याची विनंती केली.

मातंग समाजातील प्रमुख कार्यकर्त्यांनी मातंग ज्ञातीला फेडरेशनमध्ये सामील व्हा व उत्कर्ष साधून घ्या असा आदेश स्वबांधवांना दिला. ''आम्हा सर्व पतित जनतेचे खरे उद्धारक बाबासाहेब आंबेडकर हे एकटेच आहेत.'' असे श्री. मोरे यांनी सांगितले.

नंतर डॉ. बाबासाहेबांचे भाषण झाले. ते म्हणाले,

जोपर्यंत तुम्ही तुमच्या मजबूत संघटनेच्या बळावर आपली ताकद इतर जगाला-समाजाला दाखविणार नाही तोपर्यंत तुमच्यावर हे असले जाच नेहमी चालूच राहाणार. या जुलूमाबाबत तुम्हाला वेदातील एक गोष्ट मला सांगाविशी वाटते. एकदा देवाकडे मेंढराने आपली फिर्याद नेली की '' देवा, तूबा सर्व पृथ्वी निर्माण केलीस, पशु-पक्षी, झाडे-झुडपे, मनुष्यप्राणी इत्यादी अवघे चराचर

तू निर्माण केलेस. म्हणून तू आमचा पिता व आम्ही तुझी लेकरे. पर्यायाने आम्ही सर्व भावंडे झालो. तूच निर्माण केलेल्या वाघ-सिंहानी डोळयादेखत आम्हा मेंढराला अगदी सहज, कसलीही पर्वा व चाड न टेवता गट्टगीळ करावे काय ? देवाने उत्तर दिले : '' हे बघ. तू म्हणतोस तशी वस्तुस्थिती आहे खरी. पण त्याचबरोबर हेही खरे आहे की तुझं बाह्य स्वरूपच इतकं नेभळट दिसते की, जरी मी तुझा निर्माता असलो तरीसुध्दा यावेळी तुझी ही दुबळी चर्या पाहून तुला खाऊन टाकावे, असे मला वाटत आहे. तर तुझी ही सदोदित खाली असलेली मान जरा ताठ करून ऐटीत राहा. तरतरीत दिसण्याचा प्रयत्न कर, रूबाबदार राहा, चाल करून आलेल्याचा प्रतिकार करण्याचा न्यायबुध्दी प्रयत्न कर. दुसऱ्यावर विसंबू नकोस, ठोशास ठोसा या न्यायाने वाग. मग पाहू बरे ; कोण तुला त्रास देतो ? कोण तुला खातो ते ? '' या कथेप्रमाणे तुम्ही आपली परावलंबी वृत्ती टाकून एकजुटीने अत्यंत प्रभावी अशा संघटनेने राहा.

'' मी कॉंग्रेसमध्ये गेलो '' असे म्हणून तुम्हाला थापेबाजी मारून काही कॉंग्रेसवाले फसवतील. तरी त्यांच्या थापेबाजीला भुलू नका. मी कॉंग्रेसमध्ये गेलो नव्हतो व जात नाही. जर कदाचित प्रसंग आला तर मला मिळालेल्या या सर्व मानापानाला लाथ मारून मी माझे इच्छित ध्येय पुरे करीन.

माझा स्पृश्य वर्गीयांकडून व मोठमोठ्या अधिकाऱ्यांकडून हा जो गौरव केला जातो, सध्या यांना जी माझी भीती वाटते, या सर्व गोष्टीची मुख्य गोम जर कशात असेल तर या सर्व लोकांना माझ्या पाठिशी अत्यंत प्रभावी व राजकारण धुरंधर शक्ती आहे, याची पूर्ण खात्री पटलेली आहे आणि म्हणूनच मी म्हणतो की हा गौरव, हा मानपान माझा नसून तुम्हा पीडलेल्या, रंजलेल्यांचा आहे ; मी निमित्तमात्र आहे. तुम्हावर झालेल्या, होत असलेल्या अन्यायाबद्दलची गाऱ्हाणी मी मांडीन व त्यातून काय काय मिळवावयाचे ते मिळविण्याचा प्रयत्न जरूर करीन. फक्त तुम्ही आपली संस्था एक राखून संघटित राहा.



## २५९

# केवळ राजकीय प्रगतीने जीवनातील प्रश्न सुटत नाहीत !

दलितांचे एकमेव पुढारी ने. ना. डॉक्टर भीमराव उर्फ बाबासाहेब आंबेडकर, भारत सरकारचे कायदा मंत्री व कॉस्टिट्यूशन मेकींग बॉडीचे अध्यक्ष, यांनी औरगाबाद येथील मराठा विद्यालयास ता. २१ जानेवारी १९४९ ला सांयकाळी ५-३० वाजता भेट दिली.

मराठा समाज या संस्थेच्या चालकांनी डॉक्टरसाहेबांच्या मानमरातबाला साजेशी सजावट व तयारी केली होती.

सुरवातीस हायस्कुलच्या स्वयंसेवकांनी सलामी दिली. नंतर श्री. माणिकराव मोताळे यांनी स्वागतपर पद्ये गाईली.

तद्नंतर संस्थेचे सभासद, कार्यकारी मंडळ, श्री. खुशालराव मोताळे वकील ह्यांनी डॉक्टरसाहेबांच्या गुणगौरवपर भाषण करून, त्यांना पुष्पहार अर्पण केला. त्याचबरोबर श्री. राजभोज, ऑल इंडिया शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे जनरल सेक्रेटरी व श्री. गायकवाड, श्री. सुबय्या इत्यादी दलितांच्या पुढाऱ्यांना पुष्पहार अर्पण करण्यात आले.

संस्थेचे चिटणीस श्री. पंडितराव गव्हाणे B. A., LL. B. वकील यांनी त्यानंतर मानपत्र वाचून दाखवले व नंतर टाळयांच्या प्रचंड आवाजात ते डॉक्टरसाहेबास अर्पण केले. मानपत्राच्या उत्तरादाखल डॉक्टरसाहेब म्हणाले,

शेतकरी, कामकरी समाजाच्या शिक्षणाच्या प्रगतीकरिता, मराठा हायस्कुलसारख्या संस्थांची अत्यंत गरज आहे. अशा प्रकारची संस्था औरंगाबादेत निघाल्याबद्दल मला समाधान वाटते.

दलितांचे स्थान हिंदू धर्माचे धर्मग्रंथ व उपनिषदे यामुळे पिढ्यानपिढ्या वरिष्ठ वर्गाची सेवा करणे हेच राहिले आहे.

चातुर्वर्ण्य पद्धतीमुळे दलित वर्गावर घोर अन्याय झाले आहेत. ही परिस्थिती बदललीच पाहिजे. दलित समाजाला मानाचे स्थान कायद्याने मिळणे आवश्यक आहे व ते मिळण्याकरिता दलित वर्गात स्वाभिमान उत्पन्न करणारे शिक्षण त्यांना मिळणे अवश्य आहे.

---

दलित बंधू : १० फेब्रुवारी, १९४९.

दलित वर्गाने स्वतः विचार करण्यास शिकले पाहिजे. दलित वर्गाची प्रगती त्याना शासन यंत्रात मान्याच्या जागा (Key Posts) मिळाल्याशिवाय होणार नाही. आतापर्यंत त्या जागा वरिष्ठ वर्गाच्या हातात आहेत.

३० जानेवारीनंतर महाराष्ट्रात झालेले अत्याचार हा वरिष्ठ वर्गाने मान्याच्या जागा आपल्या हाती ठेवून इतर समाजांची पिळवणूक केली ह्याचा परिणाम आहे.

केवळ राजकीय प्रगतीने जीवनातील सर्व प्रश्न सुटत नाहीत. जीवनाच्या प्रगतीकरिता ज्या अनेक गोष्टींची गरज आहे ; त्यापैकी राजकीय स्वातंत्र्य ही एक होय.

शिक्षण हीच खऱ्या अर्थाने जीवनाच्या प्रगतीकरिता महत्त्वाची बाब होय. गेल्या २५ वर्षापासून मी राजकारणात काम करीत आहे ; पण माझ्या इतक्या दिवसांच्या अनुभवावरून मला असे वाटते की, शिक्षण हीच जीवनातील सर्वात महत्त्वाची बाब आहे.

गेल्या २–४ वर्षापासून माझे मन दलितजनांच्या शिक्षणाकडे वळले आहे. म्हणूनच मी मुंबईला सिद्धार्थ कॉलेजाची स्थापना केली आहे.

परिस्थिती अनुकूल झाली तर, मराठवाड्यातील दलितजनांच्या प्रगतीकरिता औरंगाबादेत सिद्धार्थ कॉलेजची शाखा काढण्याचा मानस आहे.



## २६०

# हिंदू आचारधर्मातील पडायला आलेल्या भागांची दुरूस्ती करण्यापलिकडे हिंदू कोड बिलात दुसरे काहीही नाही

हिंदू पार्लमेंटपुढे नव्या हिंदू कोड बिलाचे कायद्यात रुपांतर होण्यासाठी बिल मांडताना हिंदचे कायदेमंत्री डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

तुम्हाला हिंदू आचार, हिंदू संस्कृती आणि हिंदू समाज ही कायम टिकवायची असतील तर जेथे दुरुस्ती अथवा सुधारणा करणे अगत्याचे असेल तेथे तशी दुरुस्ती अगर सुधारणा करण्यास काकू करू नका. हिंदूआचारधर्मातले जे भाग अगदी पडायला झाले आहेत त्यांची दुरुस्ती करण्यापलीकडे या बिलात दुसरे काहीही नाही.

विवाहाच्या बाबतीत जुन्या मताचे लोक व नव्या मताचे लोक या दोघांचेही समाधान करण्याचा प्रयत्न केलेला आहे. जुन्या मतांच्या लोकांना त्यांच्या धर्मानुसार त्यांच्या समाजातीलच वधु-वरांची लग्ने लावण्याची परवानगी दिलेली आहे. तर नव्या मतांच्या लोकांनी त्यांच्या सद्सद्विवेक बुद्धिला स्मरावे आणि मगच वाटल्यास त्यांच्या समाजाबाहेरील वधु-वरांशी विवाह करावेत, अशी त्यांना मोकळीक दिलेली आहे.

हिंदू समाजाचा ९० टक्के भाग असलेल्या 'शूद्र' लोकात घटस्फोटाची चाल रूढच आहे. फक्त १० टक्के हिंदुत घटस्फोटाची चाल नाही. तेव्हा या १० टक्के लोकांचा कायदा तुम्ही ९० टक्के लोकांवर लादणार काय, असा माझा तुम्हाला सवाल आहे ? (टाळ्या)

शास्त्रे घटस्फोटाचा अधिकार देत आली आहेत, असेच तुम्हाला आढळून येईल. वैवाहिक संबंध सुखाचे होण्यासाठी शास्त्रांनी केलेले नियम मोडून पायाखाली तुडवून भलत्याच रूढी त्यांच्याही वर चढल्या आहेत.

जगातील ज्या इतर लोकात घटस्फोट रूढ आहे त्यांचा अनुभव आपण घटस्फोटाचा अधिकार देण्याला पोषक असाच आहे.

---

जनता : २६ फेब्रुवारी १९४९.

भाषणाची तारीख दर्शविलेली नाही.

प्रत्येक बिल लोकमतासाठी प्रसृत करावे अथवा त्यास प्रसिद्धी द्यावी ही गोष्ट सरकारवर अगर या गृहावर बंधनकारक नाही. दुसरे असे की, या बिलाचा अंमल प्रांतापुरताच राहावा अशी बुद्धिपुरःसर व्यवस्था करण्यात आली आहे. प्रांतापुरतेच बोलावयाचे झाले तर तीन वेळा हे बिल लोकमत अजमावण्यासाठी प्रसृत केले होते. चौथ्यांदा पुन्हा एकदा सदर बिल लोकमतापुढे ठेवल्याने काही कार्यभाग होईल, असे मला वाटत नाही. सदर कोड ज्यावेळी संस्थानांसही लागू करण्यात येईल त्यावेळी मी हे खात्रीने सांगतो की, संस्थानातील लोकमताचा विचार केला जाईल.

सिलेक्ट कमिटीने वैवाहिक हक्कासंबंधी तसेच कायदेशीर घटस्फोटासंबंधी दोन नवे परिच्छेद मूळ बिलास जोडले आहेत..

धर्मांतर केल्यामुळे ज्यावेळी वडील तो दत्तकविधी करण्यास कायदेशीरदृष्ट्या नालायक ठरतो त्यावेळी आपले मूल दत्तक देण्याचा अधिकार मातेकडे राहिलाच पाहिजे, असे सिलेक्ट कमिटीचे म्हणणे आहे. त्याचप्रमाणे एखाद्या हिंदू विधवेने धर्मांतर केले तर आपले मूल दत्तक देण्याचा तिचाही अधिकार काढून घेण्यात यावा, अशी व्यवस्था बिलात केली आहे.

दत्तक विधीचे जे भिन्न प्रकार आहेत त्याबद्दलही थोडा फरक सुचविला आहे. सिलेक्ट कमिटीने असा निर्णय घेतला आहे की, कोडमध्ये नमूद केलेल्या दत्तक-प्रकाराव्यतिरिक्त कोणासही दत्तक-विधी करता येणार नाही.

सिलेक्ट कमिटीने यासंबंधी दोन फेरबदल सुचविले आहेत. हिंदू वडिलास आपल्या मुलाचा नैसर्गिक पालक होण्याचा जो अधिकार आहे तो जर वडिलाने संन्यास घेतला अथवा धर्मांतर केले तर काढून घेण्यात आला आहे. हिंदुंचे संघटिकरण करण्याचा हेतू बिलाचे मुळाशी असल्याने अशाप्रकारची अट लादणे आवश्यक होते.

कन्येच्या हक्कात सिलेक्ट कमिटीने महत्त्वाचा फेरबदल केला आहे. मूळ बिलात असे प्रतिपादन करण्यात आले होते की, कन्येस पुत्राच्या निमपट हिस्सा मिळेल. परंतु न्याय्य पद्धतीने वाटणी व्हावी म्हणून तसेच स्त्रियाही वारसांच्या अनुक्रमात राहाव्यात म्हणून मुलीचा हिस्सा मुलाच्या हिश्याशी समसमान राहावा अशी व्यवस्था सिलेक्ट कमिटीने केली आहे.

आजपर्यंत रूढ असलेल्या कायद्याविरूद्ध सध्याचे कोड आहे, असे काही आक्षेप घेण्यात येत आहे. त्याबद्दल सभागृहाला मी मोकळ्या मनाने सांगू इच्छितो

की, जर तुम्हास हे कोड मान्य करूनही यावर रूढीची जळमट वाढू द्यावयाची असतील तर हे कोड पास करण्यात काही हशील नाही. कारण कायद्याला देखील पोखरून काढण्याची शक्ती रूढीपाशी असल्याने सदर कोड निर्जीव होऊन पडेल.

मिताक्षर कायद्याप्रमाणे असणारी हिंदुंची संयुक्त कुटुंब पद्धती या कोडान्वये नष्ट करण्यात आली आहे काय, अशी शंका काही जणांनी प्रदर्शित केली आहे. संयुक्त कुटुंबामधील लोकांचे हिस्से स्वतंत्रपणे ज्यांच्या त्यांच्या नावे राहतील, अशी व्यवस्था सदर कोडमध्ये करण्यात आली आहे. ही मोठी क्रांतिकारक गोष्ट आहे अशातला काही भाग नाही. तुम्हा सर्वांना माहीत आहे की, चालू जमान्यात स्वतंत्रपणे राहाण्याची प्रत्येकाची इच्छा आहे. तेव्हा जरी या कोडामध्ये संयुक्त कुटुंबाचा संयुक्त अधिकार काढून घेण्यात आला असला तरी संयुक्त कुटुंब व्यवस्था टिकविण्यात आलेली आहे. म्हणजे ज्या ठिकाणी सध्या मिताक्षर कायदा आहे त्या ठिकाणी दायभाग कायदा येईल, एवढीच व्यवस्था सदर कोडान्वये केलेली आहे.

स्त्रीला मिळणाऱ्या इस्टेटीचा प्रश्न अत्यंत गुंतागुतीचा आहे. याबाबतीत (१) स्त्री धन व (२) विधवेची इस्टेट, असे दोन भाग पडतात. जी इस्टेट पुरुषाकडील वारसा हक्कामुळे स्त्रीला मिळालेली असते तिला ' विधवेची इस्टेट ' म्हणतात. या बाबत सिलेक्ट कमिटीचा निर्णय असा आहे की, ज्याअर्थी इतर बाबतीत स्त्री आपल्या मालमत्तेची विल्हेवाट लावण्याइतकी समर्थ व चतुर असते त्याअर्थी ' विधवेच्या इस्टेटी ' खाली मिळालेल्या मालमत्तेची विल्हेवाट लावण्यासही ती समर्थ व चतुर आहे, असे समजले पाहिजे आणि म्हणूनच या कोडमध्ये असे नमूद करण्यात आले आहे की, स्त्रीला मिळणाऱ्या मालमत्तेवर तिचा संपूर्ण (अनियंत्रित) मालकी हक्क आहे.

● ● ●

## २६१

# आपला भविष्यकाळ उज्ज्वल आहे

अखिल भारतीय दलित फेडरेशनच्या वर्किंग कमिटीची बैठक ता. १९-२० नोव्हेंबर १९४९ रोजी दिल्ली येथे भरण्याचे निश्चित झाले आहे. अध्यक्षस्थानी श्री. एन. शिवराज (बी. ए. बी. एल.) राहातील. खास निमंत्रणावरुन या वर्किंग कमिटीच्या बैठकीस डॉ. बाबासाहेब आंबेडकर हजर राहाणार आहेत.

वर्किंग कमिटीपुढील कार्यक्रम पत्रिका खालीलप्रमाणे नमूद केली आहे.

(१) दलित फेडरेशनच्या देशभर कार्याचा आढावा घेणे;

(२) अ. भा. दलित फेडरेशनचे पुढील धोरण व कार्यक्रम ठरविणे;

(३) अ. भा. दलित फेडरेशनच्या आगामी खुल्या अधिवेशनाचे ठिकाण व तारीख निश्चित करणे ;

(४) समता सैनिक वगैरे दलावरील बंदीचा विचार करणे वगैरे.

ज्या कोणास वर्किंग कमिटीकडे सूचना पाठवावयाच्या असतील त्यांनी, श्री. पी. एन. राजभोज, जनरल सेक्रेटरी, अखिल भारतीय दलित फेडरेशन यांच्या नावे, १, हार्डिज एव्हिन्यू, न्यू दिल्ली या पत्त्यावर पाठवाव्यात असेही त्यांनी काढलेल्या या सर्क्युलरमध्ये नमूद केले आहे. जवळ जवळ ३ वर्षांनी वर्किंग कमिटीची बैठक भरत असल्यामुळे तिच्या निर्णयाकडे व आदेशाकडे अखिल अस्पृश्य जनता कुतुहलाने पहात आहे.

### ठिकठिकाणच्या प्रांताध्यक्षांसाठी

श्री. राजभोज यांनी दुसरे एक पत्रक, फेडरेशनच्या निरनिराळया प्रांताध्यक्षांना उद्देशून काढले असून, त्यांचेकडून अद्यापही फेडरेशनच्या कार्याचे अहवाल आलेले नाहीत याबद्दल त्यांनी खेद प्रदर्शित केला आहे. निरनिराळया प्रांतांमध्ये किती जिल्हा शाखा आहेत, किती तालुका शाखा आहेत, किती गाव शाखा आहेत त्याचप्रमाणे फेडरेशनचे सभासद किती झाले, पैसे किती जमले व संघटनेचे कार्य कितपत झाले याबद्दलचा रिपोर्ट त्यांनी दरेक प्रांताध्यक्षांकडून

---

जनता : १२, १९ आणि २६ नोव्हेंबर १९४९.

शक्य तो त्वरित मागविला आहे. त्यांना सदर रिपोर्ट वर्किंग कमिटीपुढे सादर करावयाचा आहे.

वर्किंग कमिटीची हालचाल मोठी सूचक वाटते. विशेषतः तिचा समय महत्त्वपूर्ण आहे. सुमारे ३ वर्षानंतर १९, २० नोव्हेंबरलाच वर्किंग कमिटी बोलाविली आहे, ही गोष्ट नमूद करण्यासारखी आहे. आता लवकरच घटना समितीचे काम संपेल आणि घटना जाहीर होताच, नवीन पार्लमेंट जन्मास येईल. नव्या पार्लमेंटातील अस्पृश्यांच्या हक्कांची जाणीव भारतवासियांना सदर वर्किंग कमिटी करून देईल. अस्पृश्य समाजाचे हक्क रक्षिण्यात व त्याजबद्दल डोळयात तेल घालून हालचाल टेहळण्यात वर्किंग कमिटी कर्तव्यतत्पर असल्याचा हा पुरावा आहे.

काँग्रेस अगर इतर पक्षांशी दलित फेडरेशनचे संबंध कसे असावेत याबद्दल अफवा पसरून जो नाहक गोंधळ उडाला आहे तो दूर करण्याच्या दृष्टीने वर्किंग कमिटीचे ठराव उपयुक्त ठरतील यात शंका नाही.

अ. भा. द. फेडरेशनची वर्किंग कमिटी म्हणजे अस्पृश्य समाजाचे सर्वश्रेष्ठ न्यायालय आहे. त्या न्यायालयाकडूनच अस्पृश्य समाजास खरा न्याय मिळेल आणि असा न्याय मिळवावयाचा असेल तर, वर्किंग कमिटीच्या आदेशाप्रमाणे वागण्यास व तनमनधन खर्चून दलित फेडरेशनची संघटना मजबूत करण्यास दरेक अस्पृश्य बांधवाने सज्ज झाले पाहिजे.

ठरल्याप्रमाणे ता. १९-२० नोव्हेंबर १९४९ रोजी, अ.भा. दलित फेडरेशनच्या वर्किंग कमिटीची बैठक श्री. डी. एल. पाटील (मध्य प्रांत) यांचे अध्यक्षतेखाली दिल्ली येथे भरली होती. सदर बैठकीचे कामकाज गुप्तपणे करण्यात आले. वर्किंग कमिटीच्या बैठकीत चालू राजकीय परिस्थितीचा खल सूक्ष्म-रितीने करण्यात आला आणि दलित फेडरेशनने पूर्वीचेच धोरण कायम ठेवावे असा निर्णय घेण्यात आला. तथापि दलित फेडरेशन असहकाराची भूमिका घेणार नाही असेही विषद करण्यात आले. जो पक्ष अस्पृश्यांकरता खास कार्यक्रम आपल्या पक्षात ठेवू शकेल आणि राजसत्तेचा समान हिस्सा देऊ शकेल, त्याच्याशी सहकार्य करण्याचा विचार दलित फेडरेशन करील, असेही जाहीर करण्यात आले. •

## उपस्थितांची नावे

खास निमंत्रणावरून, भारत सरकारचे कायदे मंत्री, ना. डॉ. बाबासाहेब आंबेडकर वर्किंग कमिटीच्या बैठकीस हजर होते. निरनिराळ्या प्रांतातील वर्किंग कमिटीचे बहुतेक सर्व सभासद हजर होते. खालीलप्रमाणे प्रांतवार सदस्य बैठकीत दिसत होते.

### पंजाब

(१) श्री. शेठ किसनदास
(२) श्री. बालमुकूंद

### मध्य प्रांत

(१) आर. व्ही. कवाडे
(२) श्री. डी. एल. पाटील
(३) श्री. एस. ए. खंडारे

### मुंबई

(१) दादासाहेब गायकवाड
(२) कु. शांताबाई दाणी
(३) श्री. आर. आर. भोळे
(४) श्री. बी. एच. वराळे

### संयुक्त प्रांत

(१) श्री. तिलकचंद कुरील
(२) श्री. गोपिचंद पीपल
(३) श्री. परसरामजी

### बिहार

(१) श्री. गणेशरामजी

### मध्य भारत

(१) डॉ. विवेकानंद
(२) श्री. नितनवरे

पार्लमेंटच्या अधिवेशनात कसे बोलता येईल, असा आक्षेप कोणीही उपस्थित करील. ही गोष्ट लक्षात ठेवून सदर अडचणीतून बाहेर पडण्याचा मार्ग मी शोधून काढला. तुमच्या पार्लमेंटने एक ठराव संमत करावा आणि त्या ठरावान्वये मला बोलण्यास सांगावे, असा माझा मार्ग होता. त्याप्रमाणे ठराव पास करून घेण्याचे चेअरमनांनी कबूल केले याबद्दल मला आनंद वाटतो आणि म्हणून आता मी तुमच्या पार्लमेंटपुढे भाषण करीत आहे.

तुम्हास माहीत आहे की, मी भारतीय पार्लमेंटमध्ये मांडलेल्या हिंदू कोड बिलावर सध्या वादविवादाचे मोठे रण माजले आहे. या बिलाचे संपूर्ण विवेचन करावयाचे म्हटल्यास कमीत कमी दोन तास तरी लागतील. तेवढा वेळ तुम्हालाही नाही आणि मला देखील नाही. तरी परंतु तुम्हा विद्यार्थ्यांचा वर्ग हा जागृत व डोळस वर्ग असल्याने जेवढ्या थोड्या वेळात हिंदू कोड बिलावर माझे विचार मांडता येतील तेवढ्या वेळात ते माडण्याचा मी प्रयत्न करीन.

या बिलाच्या कलमांची तपशीलवार अशी माहिती तुमच्या सारख्या विद्यार्थ्यांना नसेल. कारण, तुम्ही तुमच्या नित्याच्या अभ्यासक्रमात आणि परीक्षेत गुरफटलेले असता. तरीपण हे बिल आजच्या व भावी पिढीच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचे असल्याने व त्यामुळे आपल्या देशाचे कोणकोणते फायदे होणार आहेत हे नागरिक या नात्याने माहीत होणे जरूर असल्याने सदर बिलासंबंधीचे काही विशेष मी सांगणार आहे.

हिंदू कोड बिलामागे मुख्यतः दोन उद्दिष्टे आहेत. हिंदू कायदा सर्व देशभर सुसूत्र करणे हे पहिले उद्दिष्ट आहे. यालाच इंग्रजी भाषेत ' कोडीफिकेशन ' म्हणतात आणि हिंदू कायद्याच्या काही शाखांची सुधारणा घडविणे हे दुसरे उद्दिष्ट आहे. या दुसऱ्या उद्दिष्टावरच सर्व वादविवाद केंद्रित झाला आहे.

पहिल्या उद्दिष्टापुरतेच बोलावयाचे झाल्यास त्याबद्दल कोणाचा वाद नाही आणि असणेही शक्य नाही. हिंदू कायद्याच्या सुसूत्रीकरणावर जवळ जवळ सर्वांचे एकमत आहे. कारण कोणताही कायदा घेतला तर त्यास ज्या काही मूलभूत कसोट्यांची पूर्तता करावी लागते त्या कसोट्या हिंदू कायद्यास आणणे जरूर आहे.

कोणताही कायदा तीन मूलभूत कसोट्यास उतरावा लागतो. या कसोट्या अशा :--

(एक) कायदा ' निश्चित ' असावा लागतो. त्याच्या कोणत्याही कलमाबद्दल अगर तरतुदीबद्दल शंका, संदिग्धता राहाता कामा नये. त्याचा अर्थ सुस्पष्ट, स्वच्छ असला पाहिजे. कायद्यावरची ही पहिली कसोटी आहे.

(दोन) कायदा हा सर्व ठिकाणी सारखा असावा लागतो. प्रादेशिक फेरफारांनी तो जखडलेला असता कामा नये. मुंबईस खून झाला तर आरोपीस जी शिक्षा मिळाली तीच शिक्षा त्रिचनापल्लीस झालेल्या खुनाबद्दल तेथील आरोपीस मिळाली पाहिजे. कायद्याची ही दुसरी कसोटी आहे.

(तीन) कायदा सर्व जनतेला आंश्रय घेता येईल असा माफक व सुबोध असला पाहिजे. आपले हक्क काय आहेत हे दरेक नागरिकास समजले पाहिजे. हरघडी त्याने वकिलावरच विसंबले पाहिजे असा कायदा असू नये. कायद्याची ही तिसरी कसोटी आहे.

या कसोट्यांवर आजपर्यंत हिंदू कायदा वाचून पाहिला तर काय दिसते ? वरील कसोट्यांपैकी एकाही कसोटीस हिंदू कायदा उतरत नाही. जगातील भोंगळ कायद्याचे उदाहरण द्यावयाचे झाल्यास हिंदू कायद्याचेच द्यावे लागेल. हिंदू कायद्याइतका अनिश्चित, एकसुत्रीपणाचा अभाव असलेला आणि महाग कायदा जगात सापडणार नाही. या बाबतीत आणखी विवेचन करण्याचे कारण नाही. हिंदू कायद्याचे सुसूत्रीकरण केले पाहिजे ही गोष्ट सर्वांना मान्य आहे.

आता, हिंदू कोड बिलामागील दुसऱ्या म्हणजे सुधारणा करण्याच्या उद्दिष्टाकडे वळू. वर सांगितल्याप्रमाणे या बाबतीतच विरोधकांनी आकांडतांडव चालविले आहेत. हिंदू कायद्यामध्ये सदर बिलान्वये कोणती सुधारणा सुचविली आहे हे पाहिल्यास विरोधकांचे म्हणणे रास्त आहे की गैर हे दिसून येईल.

हिंदू कोड बिलान्वये एकंदरीत पाच प्रकारच्या सुधारणा सुचविल्या आहेत. त्यापैकी दरेक प्रकारच्या सुधारणेची थोडी माहिती घेणे अवश्य आहे.

पहिली सुधारणा विवाह, दत्तक आदीविषयी जो जातीचा संबंध येई त्यासंबंधीची आहे. जुन्या व चालू हिंदू कायद्याप्रमाणे विवाह व दत्तक हा ज्या त्या जातीतच घडत असे व आजही घडतो. जर दुसऱ्या जातीतील व्यक्तिशी विवाह झाला, अगर दुसऱ्या जातीचा दत्तक घेण्यात आला तर तो विवाह व दत्तक हिंदू कायद्याप्रमाणे रद्द समजण्यात येत असे. अशा तऱ्हेने, हिंदू समाज व कायदा हे दोन्ही जातीवरच अधिष्ठित झालेले आहेत. ज्यास जात नाही असा हिंदूच नाही. ही गोष्ट हिंदू कोड बिलात अमान्य करण्यात आली आहे. हिंदू कोड बिलान्वये जातीचे उच्चाटन व्हावयाचे आहे. नव्या कायद्याने जातीची बंधने नाहिशी होणार असून कोणत्याही जातीत विवाह व दत्तक होऊ शकेल.

दुसरी सुधारणा एकपत्नित्व पाळण्यासंबधी आहे. प्रचलित व पुरातन हिंदू कायद्याप्रमाणे हिंदूस हव्या तितक्या स्त्रियाशी विवाह करता येतो. अनेक पत्नित्वासबंधी मुसलमानी कायद्यावर टीका करण्यात येते. परंतु हिंदू कायद्यात व मुसलमानी कायद्यात या बाबतीत बराच फरक आहे. तो हा की जो पुरुष चारही स्त्रियांना इन्साफ देऊ शकेल म्हणजेच त्याचे वैवाहिक जीवन सुखाने सांभाळू शकेल, त्यासच ४ स्त्रियांशी विवाह करता येईल, अशी अट हिंदू कायद्यात नाही.

हिंदू कायद्याप्रमाणे एका पुरूषाला अनेक स्त्रियांशी लग्न करण्याचे केवळ तात्त्विक स्वातंत्र्य आहे असे नव्हे. त्याची प्रत्यक्षात अनेक उदाहरणे आहेत. बंगालमध्ये कुलीन विवाह पद्धती म्हणून एक पद्धत आहे. त्या पद्धतीप्रमाणे एका माणसाने ५०० स्त्रियांशी लग्ने केली तरी चालतात. असेच एका बंगाल्याने ५०० बायका केल्या होत्या. पंढरपूरच्या यात्रेच्या वेळी एखादा पंड्या जसा यात्रेला येणाऱ्या यात्रेकरूंची नावे-गावे एका रजिस्टरात नोंदतो त्याप्रमाणे या बगाली माणसाने आपल्या बायकांची नावे, वय व पत्ता एका रजिस्टरात नोंदून ठेवली होती. त्याच्या बायका ठिकठिकाणी गावोगावी असत. ' नवरा-बायको ' म्हणून त्याचा संबंध नसे आणि तसे त्याचेवर बंधनही नव्हते त्यामुळे तो बंगाली नवरा दर गावी जाऊन आपली बायको धुंडाळी आणि वर दक्षिणाही घेई. ही आमची बहुपत्नित्वाची चाल इतकी भयंकर दयाशून्य आहे. हिंदू-कोड-बिलाचे रूपांतर कायद्यात झाल्यावर ही पद्धती बंद करण्यात येणार आहे. नवीन कायद्याप्रमाणे एका हिंदूस फक्त एक बायको करता येईल.

तिसरी सुधारणा घटस्फोटासंबंधी आहे. सध्याच्या कायद्याप्रमाणे बायको ही नवऱ्याची अर्धांगी समजली जाते. एकदा लग्न केले की तिला कोणत्याही कारणास्तव विभक्त होता येत नाही की काडीमोड घेता येत नाही. हिंदू कायद्याप्रमाणे विवाहाच्या गाठी न सुटणाऱ्या मानल्या जातात. खरे म्हणजे, ज्या स्त्रीचे नवऱ्याशी अगर ज्या नवऱ्याचे स्त्रीशी पटत नाही त्यांना एकत्रित ठेवण्याची सक्ती करणे केव्हाही रास्त नाही. तेव्हा काही ठराविक अटींवर नवरा-बायकोस काडीमोड मिळण्याची सवलत हिंदू कोड बिलात ठेवण्यात आली आहे.

चवथ्या सुधारणे अन्वये हिंदू कायद्यातील ' कोपारसिनरी ' पद्धती नष्ट करण्यात आली आहे. पूर्वजाकडून जी इस्टेट चालत येते त्यावरील वंशजाच्या हक्कासंबंधी सध्या दोन पद्धती रूढ आहेत. एक मिताक्षरा व दुसरी दायभाग. मिताक्षरा ही बंगालखेरीज सर्व प्रांतात चालू असून त्या पद्धतीनुसार

बापाच्या मृत्यूनंतर त्याच्या सर्व मुलाना जन्मसिद्ध हवक म्हणून वाडवडिलांची सपत्ती मिळू शकते. ती विकावयाची असल्यास त्या मुलांच्या समतीची जरूरी असते. त्या पद्धतीला प्रतिबंधदाय असेही म्हणतात. दायभाग ही पद्धती बंगाल प्रांत व आजूबाजूचा काही भाग या ठिकाणी आहे. या पद्धतीमध्ये मुलांना अशाप्रकारचा कोणताही वारसा हक्क नसून बापाच्या मृत्यूनंतरच मुलाचा वडिलार्जित संपत्तीवर अधिकार येतो. याशिवाय तिसरीही एक पद्धत आहे ती म्हणजे वारसा हक्काचा कायदा (THE LAW OF SUCCESSION). परंतु तो हिंदुंना लागू नाही. तेव्हा, नव्या बिलात मिताक्षरा पद्धत रद्द करण्यात आली असून ' दायभाग ' ही पद्धत सर्वत्र रूढ करण्यात येणार आहे. यामुळे सर्वत्र सुसंबद्धता येईल आणि इस्टेटीचा योग-विनियोग करण्यास बाप मोकळा राहील. त्यामुळे संपन्नता वाढण्यास व आर्थिक उत्पन्न वाढण्यास मदत होईल.

पाचवी व शेवटची सुधारणा स्त्रियाना इस्टेटीत मिळणाऱ्या हक्कासंबंधी आहे. आज स्त्रियांना संपत्तीत संपूर्ण मालकी गाजविता येत नाही. तिला बक्षीस म्हणून लग्नाच्या वेळी जी रक्कम किंवा दागिने मिळतात तेच तिचे धन म्हणून समजले जाते. मुलीच्या हक्कासंबंधीचा भेदाभेद काढून टाकण्यात येणार आहे. बापाच्या मिळकतीत मुलाप्रमाणे मुलींनाही यापुढे योग्य तो वाटा मिळत जाईल. म्हणजे मुलगा-मुलगी असा भेद हा कायदा जाणणार नाही. स्त्रीला समान वाटा मिळेल. आतापर्यंत ही योजना नव्हती. १९३७ पूर्वी तर विधवांनासुद्धा आपल्या पतीच्या मिळकतीवर हक्क सागता येत नव्हता. १९३७ साली त्यासाठी एक नवा कायदा करण्यात आला. परंतु या कायद्यात मर्यादित मालकी व मुलींचा समान वारसा हक्क मान्य करण्यात आला नव्हता. या नव्या हिंदू कायद्यान्वये हे दोन दोष काढून टाकण्यात आले आहेत.

या सर्व विवेचनाकडे पाहिले की, एक गोष्ट तुमच्या सर्वांच्या लक्षात येईल, ती ही की सुधारणा कशी करावी अगर कोणत्या प्रकारची करावी याबद्दल मतभेद असणे शक्य आहे. परंतु सुधारणा नको असे मुळीच म्हणता यावयाचे नाही.

या सुधारणेकडे पाहाण्याचे तीन दृष्टिकोन संभवतात. त्या दृष्टीवरच तुमचा विरोध कशा प्रकारचा आहे हे कळून येईल. एक म्हणजे बुद्धिवादी दृष्टिकोनातून या सुधारणांकडे पाहाता येईल. दुसरे म्हणजे तौलनिक अभ्यास करून या सुधारणांकडे पाहाता येईल आणि तिसरा दृष्टिकोन सनातन्यांचा येईल. पहिल्या दोन प्रकारचे जे लोक आहेत त्यांचा विरोध असण्यापेक्षा कोणत्या पद्धतीने हे संहतीकरण घडवून आणावे याच्याबाबत मतभेद होतील. परंतु यात अंतर्भूत असणाऱ्या मूलभूत तत्त्वांना त्याचा विरोध असणार नाही.

सनातन्याचा दृष्टिकोन जीवनात स्वीकारणे शक्य आहे काय ? आज, जीवनातील सर्व गोष्टीवर राज्यघटनेचे प्रभुत्व पडत आहे. तिला सार्वभौमत्व आहे. मी हे जाहीर करू इच्छितो की, मनूचा अधिकार आता संपला आहे.

आपल्या देशात सनातनी वृत्तीचा प्रभाव जास्त आहे. म्हणून अशा बहुसंख्य समाजाला बरोबर घेऊन जावयाचे असल्यामुळे त्याचीही विचारसरणी मी समजावून घेऊ इच्छितो. परंतु तसे करीत असताना माझ्या मनांत एक प्रश्न येतो की, या नव्या हिंदू कोड बिलात ज्या सुधारणा आहेत त्यांना आपल्या जुन्या धर्मशास्त्राचा आधार नाहीच काय ? मी काही संस्कृत तज्ज्ञ नाही. हिंदू कायद्याचा पंडितही नाही. परंतु थोडासा मी हिंदू धर्मशास्त्राचा अभ्यास केला आहे. त्यावरून मला आपल्याला कोणत्या ना कोणत्या शास्त्रातील काही आधार देता येतील.

(१) सध्याचा हिंदू कायदा जात मानतो. ही जात आईप्रमाणे मानली जाते. कारण हा कायदा ' मातृसावर्ण्य ' मानतो. हा मातृसवर्णाचा नियम विश्वव्यापी आहे का ? आदिकाळापासून हा नियम चालत आला आहे का ? की मातृसवर्णाचा नियम नवीन आहे ? नवीन असला तर जुना नियम काय होता ? हे प्रश्न आपण पाहिले पाहिजे.

आज जातीचा प्रश्न येतो तसा प्राचीन काळीही येत होता. जन्मलेल्या मुलाची जात बापाच्या जातीवरून ठरवावयाची की आईच्या ? याबद्दल मनुस्मृतीत अवांतर वर्णाची एक पद्धती सांगितलेली आहे. बाप ब्राह्मण असला व आई क्षत्रिय असली तर मुलाची जात ब्राह्मण मानावी पण बाप ब्राह्मण आहे व आई वैश्य असेल तर मुलाची जात वैश्य मानावी असा एक संकेत या स्मृतीत सांगितला आहे. पण मनुस्मृतीच्या अगोदरच्या ग्रंथात बापाची जी जात असेल तीच जात राहील, असे सांगणारी उदाहरणे आढळतात. राजवाडे यांच्या राधामाधवविलासचंपूत अशी एक जंत्रीच दिली आहे. क्षत्रिय जातीचा शंतनू व शूद्र जातीची गंगा यांच्यापासून झालेल्या भीष्माला क्षत्रीय मानण्यात येते. कृष्णद्वैपायन हा पराशराचा मुलगा. पराशर हा ब्राह्मण व मत्स्यगंधा ही कृष्णद्वैपायनाची आई जातीने कोळी आहे. पण कृष्णद्वैपायन ब्राह्मण समजण्यात येतो. विश्वामित्र हा क्षत्रिय व मेनका ही अप्सरा त्यांच्यापासून जन्मलेली शकुंतला क्षत्रिय आहे. तर जरत्कारू हा ब्राह्मण व जरत्कारी या नागिणीपासून जन्मलेला आस्त हा ब्राह्मण आहे. बापाची जी जात तीच मुलाला लावण्यात येत असे व आज तीच पद्धत अंगिकारली तर जुन्या रूढीचा भंग कोठे होतो, असा माझा सवाल आहे.

( ' जनते' चे मधले पान उपलब्ध होऊ शकले नाही–संपादक )

करावा व दुसरी अट पहिल्या पत्नीच्या निर्वाहासाठी अगोदर भरपूर रक्कम देण्याची तयारी असल्यास, ही अट सर्वांत कठीण आहे.

तेव्हा या अटीचा अर्थ एकच आहे की कौटिल्याला एकपत्निक पद्धती हवी होती.

नव्या हिंदू कायद्यात ज्या घटस्फोटाच्या अटी आहेत त्याला पराशर स्मृतिचा आधार देण्यासारखा आहे. पराशर स्मृतीत स्त्रीला दुसरा विवाह करावयाचा असेल तर नवरा हा नपुंसक असावा लागतो किंवा तो बेपत्ता किंवा तो मृत झाला असेल तरीही द्वितीय विवाह करता येतो. यावरून एक गोष्ट सिद्ध होते की, पुरुषाला स्त्रीपासून विभक्त होण्याचा अधिकार पहिल्या अटीत मान्य करण्यात आला आहे. आम्ही या हिंदू कोड बिलात घटस्फोट घेण्याच्या अटी आणखी वाढवून त्याची व्याप्ती विस्तृत केली आहे. म्हणजे घटस्फोटाच्या मुद्यावर पराशर स्मृतीसारखा दुसरा अधिकारपूर्ण आधार नाही, असे म्हणावयास हरकत नाही.

स्त्रियांच्या वारसा हक्कासंबंधी प्रख्यात स्मृतिकार बृहस्पति याचा आधार देता येईल. त्याने असे म्हटले आहे की, विधवेच्या संपत्तीवर कोणालाही वारसा हक्क सांगता येणार नाही. त्याला कारण सांगताना तो म्हणतो की, स्त्री ही पुरुषाची अर्धांगी असल्यामुळे निधनानंतर तो अर्धांगीच्या रूपाने जगतो. म्हणून अर्धांगीच्या धनावर कोणाचाही अधिकार चालू शकणार नाही. मला वाटते हे त्याचे विधान अत्यंत सामर्थ्यवान व पटणारे आहे.

मिताक्षरी वारसा हक्काच्या पद्धतीला मनूचाही विरोध होता हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. तुम्हाला मी हे सांगितले तर आश्चर्य वाटेल की मनुसुद्धा एकत्र कुटुंबपध्दतीचा विरोधक होता. कुटुंबाच्या मालमत्तेला त्याचा विरोध होता. पूर्वी यज्ञ हे सर्वश्रेष्ठ कर्म समजले जात असे. यज्ञ जितके जास्त तितका धर्माचा प्रचार जास्त असा आर्यांचा समज होता. स्त्रियांना वेदाभ्यासाचा अधिकार नसल्यामुळे त्यांना यज्ञ करता येत नसे. त्यामुळे त्यांचा संपत्तीवरती अधिकार नसे. पूर्वी यज्ञ व संपत्ती यांचा संबंध निकटचा होता. तेव्हा मनूचा युक्तिवाद पुढीलप्रमाणे आहे. तो म्हणतो :– " धर्माचा प्रसार जास्त व्हावयाचा

असेल तर यज्ञ जास्त हवेत.'' हा नियम लागू करावयाचा असेल तर एकत्र कुटुबपद्धतीमुळे यज्ञांची संख्या कमी होणार नाही काय ? तेव्हा या धर्मदृष्टीनेच एकत्र कुटुबपद्धती ही धर्मविरोधी नाही काय ? आणि मिताक्षरी वारसा पद्धतीचा आधार तर एकत्र कुटुबपद्धती आहे. मला सनातन्यांना असे विचारावयाचे आहे की तुमचा मनू हा एकत्र कुटुंबाला विरोध करीत होता हे तुम्ही मानाल काय ?

यानंतर दत्तक पद्धतीचा प्रश्न पाहू. हिंदू दत्तक पद्धतीचा उगम कशात आहे हे सुद्धा पाहिले पाहिजे. मनूच्या म्हणण्याप्रमाणे हिंदू माणसाला फेडाव्या लागणाऱ्या चार ऋणांपैकी पितृऋण फेडण्यासाठी एकच पुत्र पुरे. एकापेक्षा जास्त पुत्र असणे हे वैषयिक अभिलाषेचे चिन्ह आहे. म्हणून मनू इतर पुत्रांचा संपत्तीवरील हक्कही मान्य करावयास तयार नाही. तेव्हा यावरूनही असे म्हणता येईल की मिताक्षर ही वारसाहक्काची पद्धत मनूच्या नंतरची आहे. मनूने या इतर पुत्रांचा हक्क अमान्य केल्यामुळे एक पेचप्रसंग उत्पन्न झाला आणि त्यातूनच दत्तक पद्धती आली. आपस्तंभ-सूत्रात तर पुत्राच्या विक्रयाला किंवा दानाला खंबीर विरोध केला आहे. तेव्हा दत्तकविधान हे तरी शास्त्रसंमत आहे काय, असे मला सनातन्यांना विचारावयाचे आहे. परंतु पुढे समाजाची निकड लक्षात घेऊन वशिष्ठस्मृतीत बदल करण्यात आला. त्याने म्हटले की, हे आपस्तंभ स्मृतीचे बंधन फक्त जेष्ठ पुत्राच्या बाबत आहे. बाकीच्या पुत्रांना दत्तक जाता येईल. तेव्हा अशारीतीने दत्तक पद्धती आली.

तेव्हा या सर्व गोष्टींचा आधारपूर्वक विचार केल्यावर आपण असे ठामपणे म्हणू शकतो की, आजचा रूढ हिंदू कायदा हाच शास्त्रसंमत नाही. हिंदू धर्मशास्त्राशी त्याचा मुळीच संबंध नाही. मूळच्या शास्त्रापेक्षा त्यात खूप बदल झालेला आहे. सनातनी लोक शास्त्रांचा नीट अभ्यास करीत नाहीत, असेच मला म्हणावयाचे आहे. उलट मी तर असे म्हणतो की, आमच्या नव्या सुधारणांनाच कोणत्या ना कोणत्या शास्त्राचे आधार आहेत.

म्हणून माझे असे स्पष्ट मत आहे की, नवे हिंदू कोड बिल हे क्रांतीकारक किंवा जहाल नाही. मी किनाऱ्यालगत बोट हाकणारा मनुष्य आहे. पॅसिफिकमध्ये प्रवास करावयास जाणाऱ्या एकाकी धाडशी प्रवाशाप्रमाणे मी नाही. तसेच जहाल

बिल तयार करावयाचे असते तर यापेक्षा वेगळे झाले असते. सध्याचे हे बिल म्हणजे उत्कृष्ट मध्यम मार्ग आहे. मला सर्वांना घेऊन बरोबर जावयाचे आहे. म्हणून या गोष्टीचा सर्वांनी विचार करावा.

आम्हाला दुसराही एक प्रश्न विचारला जातो की आम्ही हिंदुना त्रास देण्यासाठी हे बिल करीत आहोत. हिंदू शास्त्रात चुका आहेत, दोष आहेत पण ते तसेच राहू द्या. तुम्ही हस्तक्षेप कशाला करता ? हिदू दुबळे आहेत, अहिंसावादी आहेत म्हणून आम्ही त्यांना त्रास देतो असे त्यांचे म्हणणे आहे. मुसलमानाच्या धर्मात ढवळाढवळ केली तर ते हिंसात्मक कृत्ये करतील, सरकारविरूद्ध प्रक्षोभ उत्पन्न करतील म्हणून आम्ही त्यांच्या कायद्यात हस्तक्षेप करण्यास भीत आहोत, असा त्यांचा आरोप आहे. हिंदू भुसभुशीत आहेत म्हणून आम्ही त्यांच्या कायद्याचे संहितीकरण करतो आहोत, हे सपशेल खोटे समज आहेत.

आमचे तर असे स्पष्ट मत आहे की, धर्माचा व भौतिक अधिकारांच्या हक्काचा काही संबंध असू नये. सर्व देशासाठी एक सिव्हिल कोड असावे, असे आम्हालाही वाटते. तशाप्रकारची तरतूद आपल्या राज्यघटनेत आहे व तसे त्यात दिग्दर्शन आहे.

परंतु हे सिव्हिल कोड कसे होणार ? ते स्वर्गातून अवतरेल की परदेशातून आयात करता येईल ? कायदा हा उत्क्रांत व्हावा लागतो. वस्तुस्थितीतून तो बाहेर येतो. म्हणून हिंदू कोड ही नव्या सिव्हिल कोडची पहिली पायरी आहे. त्यासाठी आज हिंदुंच्या कायद्याचे संहितीकरण हवे आहे. त्यातून आपणाला ' महत्तम साधारण विभाजक ' काढता येईल. मग आपण मुसलमान इत्यादी अल्पसंख्यांकांकडे जाऊन त्यांना या नव्या सुधारणेची दिशा दाखवू शकू. परंतु माझ्या हातात काही मुद्दे असल्याखेरीज नवे सिव्हील कोड बिल तयार करणे शक्य आहे काय ? या गोष्टीचा विरोधकांनी विचार करावा. हिंदुंचा पक्षपात करावा असा यात उद्देश नाही. यात फक्त आपल्या सिव्हिल कोडाला अवश्य ती भूमिका तयार करण्याचा उद्देश आहे.

या बिलात एकान्तिकता नाही. सनातनी मतांना विरोध नाही. फक्त नव्या मतांना, नव्या आचारविचारांना मान्यता दिलेली आहे. ज्यांना नवी मते, नवे आचार मान्य नसतील त्यांनी ते पाळावेत असा या बिलाचा आग्रह नाही.

एखाद्या सनातनी गृहस्थाला आपल्या मिळकतीतील भाग आपल्या मुलींना द्यावयाचा नसेल तर त्याने आपल्या मृत्यूपत्रात तसा स्पष्ट उल्लेख करावा अगर आपली मुलगी हिंदू नाही, असे म्हणावे. ही हिंदू-स्मृती त्याला पूर्ण स्वातंत्र्य देत आहे. तुम्ही अशा रीतीने नव्या सुधारणांपासून मुक्तही होऊ शकता. तेव्हा सनातनी वृत्तीचा त्यात नाश आहे, हे थोतांड आहे. हा उत्कृष्ट सुवर्णमध्य आहे. अशा रीतीने सनातन्यांनी आपला मार्ग फार तर आपणच चोखाळावा. पण इतरांकडे त्याच मार्गासाठी आग्रह करू नये.



# २६४

# परकियांच्या गुलामगिरीचा प्रसंग पुन्हा आला तर तो आत्मनाश ठरेल

लवकरच डॉ. बाबासाहेब आंबेडकर मुंबईस येणार आहेत. जानेवारीच्या पहिल्या अगर दुसऱ्या आठवड्यात बहुधा ते येतील. त्यावेळी, घटनेची महान कामगिरी यशस्वीरित्या बजावल्याच्या गौरवार्थ त्यांचे मुंबईस बादशाही थाटाचे स्वागत करण्याचे मुंबई शहर दलित फेडरेशनने निश्चित केले आहे. स्वागताच्या जंगी तयारीसाठी मुंबई शहर दलित फेडरेशनच्या मध्यवर्ती कार्यकारी मंडळाची तातडीची बैठक ता. १ जानेवारी १९५० रोजी बोलाविण्यात आली होती.

## प्रसंगानुसार स्वागत

काँग्रेस पुढाऱ्यांचे अगर मंत्र्यांचे हरघडी स्वागत होते; तसे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे नाही आणि तसले स्वागत खुद्द डॉ. बाबासाहेबांना आवडत नाही. त्यांचे स्वागत प्रसंगास उचित आणि भव्य असते. स्वतंत्र भारताची घटना तयार करण्याचे महान कार्य यशस्वीरित्या त्यांनी पार पाडल्यामुळे कोणा अस्पृश्य बांधवाची छाती अभिमानाने पुढे येणार नाही ? आणि म्हणूनच, मुंबईतील त्यांच्या येत्या आगमनप्रसंगी त्यांचे भव्य स्वागत मुंबई येथे होणार आहे.

## स्वागत अभूतपूर्व होणार

२५ जून १९४६ ला त्यांचे असेच जाहीर स्वागत, बॉंबे सेंट्रल स्टेशनवर करण्यात आले होते. परंतु त्यापेक्षा येथे स्वागत भव्य होईल, नव्हे अभूतपूर्व ठरेल यात शंका नाही. सुमारे १,५०,००० समुदाय स्वागतासाठी जमेल असा विश्वास मुंबई शाखेच्या दलित फेडरेशनला वाटत आहे.

स्वागताची नक्की तारीख, वेळ व स्थळ स्वतंत्र हँडबिलद्वारे जाहीर करण्यात येईल.

## स्वयंसेवक पथक

स्वागताच्या बंदोबस्तासाठी स्वयंसेवक दल उभारण्यात येईल. पांढरा हाफ शर्ट व पांढरी पँट असा गणवेश स्वयंसेवकाचा राहील. त्याचप्रमाणे, त्यांना खास बॅजेसही देण्यात येतील. दरेक वॉर्डामधून २५-३० स्वयंसेवक घेण्यात येतील.

---

जनता : ३१ डिसेंबर १९४९ आणि ७ व १४ जानेवारी १९५०.

## व्यक्तिनी व संस्थांनी नावे नोंदवावी

ज्या कोणा व्यक्तिना अगर संस्थाना, डॉ. बाबासाहेब आंबेडकराना हार अर्पण करावयाचे असतील त्यानी प्रथमतः आपली नावे मुंबई दलित फेडरेशनच्या ऑफिसमध्ये नोदविली पाहिजेत. आयत्यावेळी गोंधळ टाळण्याच्या दृष्टीने अशी पद्धती अवलंबिली पाहिजे. स्वागतासाठी भव्य मंडप उभारण्यात येईल. त्यात लाऊडस्पीकरची व्यवस्था ठेवण्यात येणार आहे. असे पत्रक मुंबई दलित फेडरेशनच्या जनरल सेक्रेटरीने काढले.

भारत सरकारचे कायदेमंत्री ना. डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे आपल्या पत्नी सौ. सवितादेवी याच्या समवेत ता. २ जानेवारी १९५० रोजी सोमवारी संध्याकाळी ६-३० वाजता विमानमार्गे दिल्लीहून मुंबईस आले. डॉ. बाबासाहेब व सौ. माईसाहेब सांताक्रूझ विमानतळावर उतरले तेव्हा आनंदी दिसत होते. त्यांच्या स्वागतासाठी मुंबई शहर व उपनगर दलित फेडरेशनचे कार्यकर्ते हजर होते. याशिवाय इतर अस्पृश्य बंधु भगिनींचीही अलोट गर्दी सांताक्रूझ विमानतळावर त्यांचे दर्शनार्थ लोटली होती.

## मनोहर दृश्य व हारतुरे

डॉक्टरसाहेबांनी येतेवेळी गॅबर्डिनचा सूट परिधान केला होता आणि सौ. माईसाहेबांनीही तशाच प्रकारच्या रंगाचे जरीचे पातळ पेहरले होते. ज्यावेळी, डॉक्टरसाहेब व माईसाहेब विमानातून उतरले व त्यांना नेण्यासाठी वाट पाहणाऱ्या ट्यूरिंगकडे आले तेव्हा,'आंबेडकर झिंदाबाद; थोडे दिनमें भिमराज' अशा घोषणा स्वागतास जमलेल्या अस्पृश्य बंधु भगिनींनी दिल्या. नंतर डॉक्टर बाबासाहेब यांना हार अर्पण करण्यात आले आणि त्यांची मोटार निघून गेली.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा मुंबईतील मुक्काम ता. १३ जानेवारी १९५० पर्यंत राहील असे समजते.

डॉ. बाबासाहेबांच्या येत्या आगमनप्रसंगी मुंबईमध्ये त्यांचे प्रचंड जाहीर स्वागत करण्यात येणार आहे. हे गेल्या 'जनते' च्या अंकात प्रसिद्ध झाले आहे. त्यासंबंधी, दलित फेडरेशन मुंबई शहर व उपनगर शाखेच्या स्वागत समितीने खालील पत्रक प्रसिद्धीसाठी दिले आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर व सौ. डॉ. माईसाहेब आंबेडकर हे उभयता सोमवार ता. २-१-१९५० रोजी सायंकाळी ६.३० वाजता मुंबईस आले आहेत हे वृत्त कळविण्यात आम्हास अत्यानंद होत आहे. डॉ. बाबासाहेबांच्या आगमनास आपण नेहमीच उत्सुक असतो. त्यातून भारतीय घटनेची महान कामगिरी

बजावून ते प्रथमतः मुंबईस येत असल्याकारणाने आपला उत्साह द्विगुणित झाला असल्यास नवल नाही. तेव्हा, अशा प्रसंगी डॉ. बाबासाहेबांचे जाहीर प्रचंड स्वागत व्हावे अशी तुम्हा सर्वांची उत्कट इच्छा असणे अगदी स्वाभाविक आहे. ही गोष्ट जाणूनच, दलित फेडरेशन-मुंबई शहर व उपनगर शाखेने ता. १-१-१९५० रोजी तातडीची बैठक बोलावून खालील ठराव सम्मत केला.–

" भारतीय घटना बनविण्यात, प्रशंसनीय यश संपादून डॉ. बाबासाहेब आंबेडकर, भारतीय अस्पृश्य चळवळीच्या माहेरघरी आपल्या मुंबईला पहिल्यांदाच येत आहेत. तेव्हा त्यांचे जाहीर स्वागत करण्यात येऊन त्यांच्या कर्तबगारीबद्दल अस्पृश्य जनतेस वाटणाऱ्या अपरिमित आनंदाचे 'प्रतीक' म्हणून भारतीय घटनेची प्रत त्या आकाराच्या सुवर्ण वेष्टनामधून त्यांना अर्पण करण्यात यावी."

वरील ठरावानुसार ता. २ जानेवारी १९५० रोजी स्वागत समितीने डॉ. बाबासाहेबांची भेट घेतली. डॉ. बाबासाहेब व सौ. माईसाहेब यांनी कृपावंत होऊन जाहीर स्वागत-समारंभास हजर राहाण्याचे अभिवचन दिले आहे.

सदर सत्कार-समारंभासंबंधी खालील गोष्टी जनतेच्या माहितीसाठी जाहीर करण्यात येत आहेत.

(१) स्वागत समारंभाची जागा, तारीख व वेळ या संबंधीचा तपशील डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या सोयीप्रमाणे लवकरच पत्रक नं. २ मधून व 'जनता' साप्ताहिकातून जाहीर करण्यात येईल.

(२) सुवर्ण प्रतिकासाठी, दलित फेडरेशन, मुंबई शहर व उपनगर शाखेच्या सर्व वॉर्डस्‌मधील जुन्या सभासदांनी व ज्यांची नावे जाहीर करण्यात आली आहेत अशा नव्या सभासदांनीही प्रत्येकी ३ रुपये तारीख ५ जानेवारी १९५० च्या आत दिले पाहिजेत.

शिवाय, मुंबईतील दरेक अस्पृश्य बंधु-भगिनींनी कमीत कमी चार आणे तरी द्यावेत अशी आमची आग्रहाची विनंती आहे.

स्वागत समितीतर्फे चार आणे किंमतीची तिकीटे छापण्यात आली आहेत. या तिकिटांवर अनुक्रमे नंबर व दलित फेडरेशन मुंबई शहर आणि उपनगर शाखेच्या जनरल सेक्रेटरींच्या सहीचा शिक्का राहील. तिकिटे घेतल्याशिवाय कोणीही पैसे देऊ नयेत. वरील प्रकारची तिकिटे ज्यांचेकडे असतील ते निधी गोळा

करणारे अधिकृत लोक आहेत असे समजावयास हरकत नाही. चार आण्यापेक्षा कोणी अधिक रक्कम दिल्यास तिचा साभार स्वीकार केला जाईल. मात्र त्या रकमेच्या प्रमाणात पावत्या जरूर घ्याव्यात.

(३) स्वयंसेवक पथक व डॉक्टरसाहेबांना अर्पण करावयाचे हारतुरे यासंबंधीची माहिती फेडरेशनच्या मध्यवर्ती ऑफिसमध्ये मिळेल.

जाहीर झाल्याप्रमाणे बुधवार, ता. ११ जानेवारी १९५० रोजी, दलितांचे सर्वश्रेष्ठ नेते डॉ. बाबासाहेब आंबेडकर व सौ. डॉ. माईसाहेब आंबेडकर यांचा जाहीर सत्कार मुंबई शहर उपनगर दलित फेडरेशनच्या विद्यमाने मुंबईतील नरेपार्क मैदानावर साजरा करण्यात आला. या प्रसंगी दोन लाखाच्या वर, दलित बंधु-भगिनींचा समुदाय हजर होता. यामध्ये भगिनीवर्गाची उपस्थिती अफाट होती. आपल्या भक्तिभावाची खूण म्हणून दलित बांधवांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना घटनेच्या प्रतीच्या आकाराचा सुवर्ण करंडक व २,००० रुपये जाहीरपणे अर्पण केले आणि त्यांचेवरील आपली निष्ठा अढळ आहे हे सर्व जगास पटवून दिले.

## खरोखरीच अभूतपूर्व समारंभ

सदर सत्कार समारंभाच्या तयारीसाठी जो अगदी तोकडा वेळ मिळाला त्याकडे पाहाता हा समारंभ अक्षरशः अभूतपूर्वच म्हटला पाहिजे. ता. ११ रोजी असलेल्या समारंभाची माहिती आदल्या दिवशी म्हणजे ता. १० रोजी दलित बांधवांना देण्यात आली. तेव्हापासून, मुंबई दलित फेडरेशनच्या कार्यकर्त्यांची एकच धमाल उडाली होती. रातोरात, हँडबिल वाटून, थाळया पिटून आणि मोटारमधून मोहल्ल्या मोहल्ल्यात प्रत्यक्ष जाऊन डॉ. बाबासाहेबांच्या सत्कार समारंभाची माहिती देण्यात आली आणि एवढ्या अत्यंत अल्प अवधीत नाही म्हटले तरी २,०० ००० समुदाय जमला, ही गोष्ट अभूतपूर्व नव्हे असे कोण म्हणेल? एवढा विराट समुदाय कोणत्याही पुढाऱ्याच्या सत्कारास गेल्या ५० वर्षात मुंबईत जमला असेल, असे मुळीच वाटत नाही.

## एकंदर व्यवस्था शिस्तबद्ध

सुमारे ४ वर्षाच्या कालांतराने दलित फेडरेशनचा नीलवर्णी ध्वज नरेपार्कच्या भव्य मैदानावर डौलाने फडकत होता. नरेपार्कच्या चोहोबाजूने एखाद्या महायात्रेप्रमाणे दलित जनतेची नुसती रीघ लागली होती. त्यांच्या व्यवस्थेसाठी व शिस्तीसाठी स्वयंसेवक रस्त्याच्या दुतर्फी व मैदानाच्या सभोवार बंदोबस्ताने

उभे होते. समारंभाकरता लहानसा पण टुमदार मंडप उभारण्यात आला होता. त्याचप्रमाणे लाऊडस्पीकरची व्यवस्थाही करण्यात आली होती. सामान्य पाहुणे मंडळीकरता सुमारे ५०० खुर्च्या ठेवण्यात आल्या होत्या. स्त्रियांकरता खास जागा ठेवली होती. एकूण समारंभाची व्यवस्था चोख ठेवण्यात आली होती.

## डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे आगमन

सायंकाळी ६.३० वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे आगमन झाले तेव्हा, 'आंबेडकर झिंदाबाद' च्या गगनभेदी घोषणा जनसमुदायाने केल्या. नरेपार्कचे गच्च भरून गेलेले मैदान या घोषणेमुळे हादरून गेले. डॉ. बाबासाहेब व्यासपीठावर येताच फोटोग्राफरची एक पलटणच उभी राहिली आणि त्यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या निरनिराळया 'पोजेस' चे फोटो घेण्याचा एकच सपाटा चालविला. कोणी खाली बसून, कोणी गुडघे टेकून तर कोणी तीर कमटयाच्या पवित्र्यात उभे राहून व फ्लॅश लाईट टाकून डॉक्टरसाहेबांचे फोटो घेत असल्याचे ते दृश्य खरोखरीच मनोहर होते.

## जनरल सेक्रेटरींचे भाषण

मुंबई शहर व उपनगर दलित फेडरेशनचे जनरल सेक्रेटरी श्री. जे. जी. भातनकर यांच्या छोट्या भाषणाने समारंभास सुरवात झाली. ते म्हणाले,

''डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे आम्ही सर्व दलित बंधु-भगिनींना दर्शन व्हावे अशी आमची फार दिवसापासूनची इच्छा होती. परंतु डॉक्टरसाहेबांच्या मागे जी निकडीची कामे आहेत त्यामुळे तसा योग घडवून आणता आला नाही. त्यांनी केलेली घटनेची कामगिरी अभिमानास्पद असल्याने त्यांच्या स्वागताच्या निमित्ताने त्यांचे दर्शन होत आहे आणि त्याबद्दल आम्ही त्यांचे सदैव ऋणी आहोत.''

नंतर समारंभाचे अध्यक्ष श्री. डी. पी. गंब्रे यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना प्रथम हार अर्पण करून नंतर सुवर्णाचा करंडक व २,००० रुपये अर्पण केले. यावेळी अर्पण-प्रसंगीची छायाचित्रे घेण्यासाठी, पुन्हा एकदा फोटोग्राफर धावले. करंडक अर्पणाचा समारंभ झाल्यावर, डॉ. बाबासाहेब, सौ. माईसाहेब यांना अनेक संस्थांकडून व व्यक्तिंकडून पुष्पहार अर्पण करण्यात आले. व्यासपीठावर हारतुऱ्यांचा एक मोठा ढीगच साचला होता.

शेवटी, टाळयांच्या प्रचंड कडकडाटात डॉ. बाबासाहेब आंबेडकर भाषण करावयास उभे राहिले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

प्रिय भगिनींनो आणि बंधुनो,

आजच्या समारंभाला हजर राहाण्याची माझी काही तयारी नव्हती. कारण मुंबईत आल्या दिवसापासून जी कामे उरकावयाची होती ती महत्वाची होती आणि त्यामुळे या कार्यामध्ये आजच्या कार्यक्रमाला स्थान देण्याकरता अवसर मिळाला नव्हता. परतु आज या ठिकाणी एवढी मंडळी जमलेली आहेत ती पाहून आणि मला देण्यासाठी आपण जो करंडक तयार केला आहे तो पाहून मला असे वाटू लागले आहे की मी आज या ठिकाणी उपस्थित झालो नसतो तर एवढ्या मोठ्या प्रचंड जनसमुदायाची मोठी निराशा झाली असती. इतकेच नव्हे तर आपण खर्च केलेला पैसा व्यर्थ गेल्यासारखे झाले असते. त्यामुळे आज आपल्याला तर आनंद झालाच असेल आणि एका प्रकारे माझ्या दृष्टीनेही ही गोष्ट समाधानकारक व आनंदकारक आणि समायोचित अशीच झाली आहे, असे मला वाटते (टाळ्या).

आज आपण सर्व मंडळींनी या ठिकाणी सभा घडवून आणली आणि मला हा करंडक दिला हे सर्व करण्याची विशेष आवश्यकता नव्हती. माझ्या अध्यक्षतेखाली व नेतृत्वाखाली बरेच दिवस सभा झालेली नाही ! आणि मलाही आपल्याला दोन शब्द सांगण्याची जरूरी पडली नाही. म्हणून काही लोक असे म्हणत असत की मी दिल्लीला राहात असल्यामुळे इतर प्रांतात, या प्रांतातही व एकंदर राजकीय क्षेत्रात माझ्या पायाखालची वाळू घसरत चाललेली आहे. असे म्हणणारे व मानणारे लोक आज येथे हजर असतील तर माझ्या पायाखालची वाळू घसरलेली नसून अधिकच घट्ट झाली असल्याचे त्यांना दिसून येईल. (प्रचंड टाळ्या) एखाद्या राजकीय पक्षाने बोलावलेली एवढी मोठी सभा दुसऱ्या कोणत्याही राजकीय पुढाऱ्याच्या अध्यक्षतेखाली भरू शकत असेल, असे मला वाटत नाही. सिनेमा पाहण्यास जसे काही लोक जातात त्याचप्रमाणे काही एक दोन लोकप्रिय पुढाऱ्यांना बघण्यासाठी अर्थातच गर्दी जमत असेल. परतु आपल्या राजकीय पक्षाच्या नेतृत्वाखाली आजही अशा प्रचंड सभा भरतात. त्यावरून आपल्या संघटनेची विघटना झालेली नाही, असे मला वाटते आणि म्हणून माझ्या अभिनंदनासाठी येथे जमलेल्या सर्व स्त्री-पुरुषांचे व सभा चालकांचे मी मनःपूर्वक आभार मानतो. (टाळ्यांचा पुन्हा कडकडाट).

आपल्या राष्ट्राची घटना तयार करण्याची कामगिरी माझ्या शिरावर आली हा एक अन्योन्य प्रकार होय. भारताची घटना तयार करण्यासाठी घटनासमिती भरली त्यावेळी माझी दशा काय होती हे आपल्याला माहीत

असेलच. १९४६-४७ साली झालेल्या निवडणुकीत शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचा पराजय झालेला होता. अर्थात या पराभवाबद्दल लाज वाटण्याचे काहीच कारण नाही. कारण निवडणुकीच्या वेळी सारे हिंदुस्थान राष्ट्र एका बाजूला होते व आपला पक्ष दुसऱ्या बाजूला होता. एका बाजूला प्रबल अशी राजकीय संघटना होती व दुसऱ्या बाजूला अल्पसंख्य अस्पृश्यांना या संघटनेशी सामना द्यावयाचा होता. अर्थात पराजय होणे हेच आपले भवितव्य होते.

परंतु पराजय झाल्यानंतर थांबून चालणार नव्हते. आपल्या लोकांना कोठून तरी घटनासमितीत शिरकाव करून घ्यावयाचा होता. अस्पृश्यांचे राजकीय हक्क घटनासमितीसमोर मांडण्याची संधी आपल्या प्रतिनिधींना सापडावयास पाहिजे होती. हा अत्यंत मोठा बिकट प्रसंग होता. काँग्रेस व शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन यांच्यात करडा विरोध असल्यामुळे या पक्षाचा प्रवेश घटनासमितीत होऊ देता कामा नये असा काँग्रेसने निश्चय केला होता ! (शेम, शेम) काय वाटेल ते करून मला घटनासमितीत जाणे काँग्रेस पक्षाने अशक्य केले होते. अखेरीस बंगाल प्रांतातून आत जाण्याचा मार्ग मी शोधून काढला आणि तेथे गेलो. अस्पृश्य वर्गाचे हक्क तेथे मांडता यावेत, त्यांना हिंदुंच्या राज्यात काही सवलती प्राप्त व्हाव्यात, एवढा माझा मर्यादित उद्देश होता.

राष्ट्राची घटना आपण तयार करावी, अशी माझी महत्त्वाकांक्षा नव्हती आणि जेथे मला समितीचे सभासद होणेही दुरापास्त होते तेथे काही मला अधिकार गाजविता येईल, काही उत्तम कामगिरी करता येईल अशी कल्पना करणेही शक्य नव्हते. कोणाही माणसाला आत येऊ देऊ पण डॉ. आंबेडकरांना आत घेणार नाही, असे ठरविण्यात आले होते. घटनासमितीचे दरवाजे मला बंद होतेच, परंतु त्याबरोबर खिडक्याही बंद करून घेण्यात आल्या होत्या. आजूबाजूची भोकेही बुजवण्यात आली होती. परंतु आपल्या सौभाग्यामुळे व परमेश्वराच्या कृपेमुळे मला आत पाऊल टाकता आले व विधिघटना अशी की ज्याला आत येऊ न देण्याचा निश्चय केला होता त्याच्याच शिरावर ही मोठी जबाबदारी टाकण्यात आली. ('हियर हियर' च्या गर्जना) झाली ही गोष्ट अत्यंत सुदैवाची झाली. कारण अशा प्रकारची महान कामगिरी करण्याची संधी मनुष्यमात्राला क्वचितच प्राप्त होते. ही गोष्ट मला भूषणास्पद आहे, तशीच आपल्यालाही ती भूषणास्पद आहे. (टाळयांचा कडकडाट).

तसे पाहिले तर मी यात विशेष असे काही केले नाही. परंतु या कार्यामुळे एक गोष्ट मात्र सबंध हिंदू जनतेला पूर्णपणे पटली आहे. गेली २० वर्षेपर्यंत माझ्यावर नाना प्रकारचे आरोप करण्यात येत होते. मी व माझा पक्ष अराष्ट्रीय आहे, इंग्रजांचा साथीदार आहे, मुसलमानांचा बगलबच्चा आहे अशा प्रकारचे धादांत खोटे आरोप माझ्यावर करण्यात येत होते. त्या लोकांची आता आम्ही तसे काही करीत नाही ही खात्री पटली, ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट झाली. २० वर्षे आमच्या पक्षास जो कलंक लागला होता तो आता साफ धुतला गेला आहे आणि शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन हा एक सुसंघटित मजबूत राजकीय रूप धारण करणारा, पण राष्ट्रद्रोही कृत्यात कधीही सामील न होणारा पक्ष आहे, ही सर्वांची पूर्ण खात्री झाली.

आजच्या राजकारणात मी आता विशेष जाऊ इच्छित नाही. परंतु काही गोष्टी अवश्य सांगाव्याशा वाटतात.

पूर्वी आपले राजकारण शत्रुत्वाच्या पायावर चाललेले होते. काँग्रेसवाले आपल्याला व आपण काँग्रेसवाल्यांना शत्रुप्रमाणे मानत होतो. माझ्या दृष्टीने, पूर्वीचे अस्पृश्य वर्गाचे सर्व पुढारी थोडाशा संकुचित दृष्टिकोनाने पाहात होते व तसेच वागत होते. मीही या दोषाला थोडाबहुत पात्र होतोच. आमचे काय होईल, हिंदुंच्या हाती राजसत्ता आली तर काय होईल, असे आम्हाला वाटत होते. पण हा राजकारणाचा रोख आता बदललाच पाहिजे.

आता आपण एक गोष्ट पक्की ध्यानात ठेवली पाहिजे की आपण आपल्या लोकांचे, आपल्या समाजाचे हित पाहात होतो ते तर पुढे चालू ठेवलेच पाहिजे ; परंतु त्याचबरोबर आपल्या देशाला मिळालेले स्वातंत्र्य कसे राखून ठेवता येईल त्याचाही विचार केला पाहिजे. या देशाला पूर्वी स्वातंत्र्य मिळाल्यानंतरही पारतंत्र्यात पिचत पडावे लागले आहे. अगोदर मुसलमानांनी व नंतर इंग्रजांनी आपले स्वातंत्र्य आपल्यापासून हिरावून घेतले होते. स्वातंत्र्याची वरच्या वर्गाला जितकी जरूरी आहे तितकीच खालच्या वर्गालाही आहे. इंग्रजांच्या गुलामगिरीतून आपण मुक्त झालो आहोत. पण आता पुन्हा परकियांच्या गुलामगिरीत पडण्याचा प्रसंग आपल्यावर आला तर ती गोष्ट अत्यंत दुर्दैवाची ठरेल. म्हणून या देशाच्या स्वातंत्र्याचे संरक्षण करणे हेही प्रत्येकाने आपले परम कर्तव्य मानले पाहिजे.

या देशात इंग्रज लोक राज्य करीत होते त्यावेळी कोणाला काय हक्क द्यावयाचे, कोणत्या पक्षाला केव्हा अधिकार द्यावयाचा हे त्यांच्या हातात होते. त्यावेळी आपण इतर पक्षांशी फटकून वागलो. पण आता इंग्रज नाहीसे झाले आहेत. तेव्हा आपण इतर पक्षांशी सहानुभूतीने वागण्याचे धोरण ठेवले पाहिजे व त्यांच्याबरोबर तहनामा-वाटाघाटी वगैरे प्रकारांनी संबंध राखले पाहिजे. आपण अल्पसंख्य आहोत आणि राज्यघटनेत आपल्याला काही जागा मिळाल्या, काही नोकऱ्या मिळाल्या तरी आपण अल्पसंख्यांकच राहाणार आहोत. तेव्हा सनदशीर मार्गांनी आपणास जर उन्नती करून घ्यावयाची असेल तर कुणा ना कुणा पक्षाशी, अथवा वर्गाशी संगनमत करूनच आपणाला वागले पाहिजे. अर्थात पूर्वीचे शत्रुत्व व वैर आता विसरले पाहिजे. आपला शत्रू कोण, मित्र कोण हे ओळखले पाहिजे आणि आपली शक्ती वाढविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. पूर्वीसारखा एकलकोंडेपणा आता उपयोगी पडण्यासारखा नाही.

कोणत्याही पक्षाशी सहमत होताना, मग तो पक्ष कॉंग्रेस असो, सोशालिस्ट असो अथवा शेतकरी कामगार पक्ष असो आपण आपली संघटना मोडता कामा नये. व्यक्तिगतदृष्ट्या माणसाला किंमत नसते. आज मला कॉंग्रेस गटात व राजकारणात जो मान आहे त्याचे एकमेव कारण म्हणजे माझ्या मागे शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनची संघटना आहे, हेच होय. ज्या दिवशी या संस्थेचा आधार नाहिसा होईल त्या दिवशी राजकारणात मला किंमत उरणार नाही. म्हणून देशरक्षणाची भावना मनात बाळगून भावी राजकारणातील शत्रुमित्रांचे नाते ओळखून, स्वत्व राखून आपण सावधतेने शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या नेतृत्वाखाली पावले टाकली पाहिजेत.

देशातील राजकीय पक्षांचे भवितव्य काय आहे हे आज कोणीच सांगू शकत नाही. निवडणुका होईपर्यंत राजकारणाला काय स्वरूप येईल हे निश्चित सांगता येत नाही. निवडणुकी या पैशाच्या जोरावर लढविल्या जातात. आतापर्यंत शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनने जे राजकारण केले त्यात पैशाचा संबंध आला नव्हता. या पक्षातील लोक मुळातच दरिद्री असल्याने मोठा निधी जमण्याची आशाही नव्हती. परंतु आता या पक्षातील व आपल्या जमातीतील प्रत्येक स्त्री-पुरुषाने कमीत कमी चार आणे देऊन एक निवडणूक निधी उभारला पाहिजे. दलित फेडरेशनने निधी जमविण्याची चळवळ आता हाती घेतली पाहिजे. ऑल इंडिया दलित फेडरेशनच्या वर्किंग कमिटीत तसा ठरावही पास झाला आहे. तेव्हा स्वयंसेवकांनी त्यासाठी घराघरातून फिरले पाहिजे. बंधु-भगिनींनो, आपण माझा गौरव केलात त्याबद्दल पुन्हा एकवार आपले आभार मानून रजा घेतो.

● ● ●

## २६५

# प्रामाणिकपणा, कर्तव्याची जाणीव व राष्ट्रीय हिताची दृष्टी ही महाराष्ट्राची परंपरा

दिल्लीतील सर्व महाराष्ट्रीय संस्थामार्फत ता. २७ जानेवारी १९५० च्या दुपारी १.०० वाजल्यापासून बृहन् महाराष्ट्र भवनामध्ये लोकराज्य दिन मोठ्या थाटाने साजरा करण्यात आला. शहरातील निरनिराळे कार्यक्रम यांची गर्दी लक्षात घेऊन अगदी आटोपशीर व सुटसुटीत असा हा कार्यक्रम आखण्यात आला होता. ठरल्याप्रमाणे बरोबर दीड वाजता श्री. दिगंबरपंत पलुसकर यांच्या गाण्याचा कार्यक्रम सुरू झाला. नंतर बिस्मिल्ला पार्टीचे सनईवादन झाले.

### घटनेची कर्तबगारी महाराष्ट्रीयाची

यानंतर नियोजित अध्यक्ष ना. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षपदाची सूचना ना. काकासाहेब गाडगीळ यांनी केली. ही सूचना करताना ना. गाडगीळ म्हणाले ''गेल्या कित्येक वर्षापासून हिंदुस्थानची जनता ज्या एका अत्यंत महत्त्वाच्या दिवसाची वाट पाहात होती तो दिवस काल उगवला व पारतंत्र्याचे आणि राजशाहीचे सर्व पाश तोडून हिंदुस्थानच्या लोकराज्यावर शिक्कामोर्तब झाले. अशा या राज्यघटनेचे प्रमुख कर्ते आज आपल्यामध्ये हजर आहेत. इतक्या महत्त्वाची कामगिरी आपल्यापैकीच एका महाराष्ट्रीयाने अत्यंत चोखपणे पार पाडावी याबद्दल आपल्या सर्वांना अभिमान वाटणे साहजिक आहे. या प्रसंगाने दिल्लीतील सर्व महाराष्ट्रीयांतर्फे मी त्यांचे स्वागत करतो.'' ना. गाडगीळ यांनी नंतर नामदार व सौ. आंबेडकर यांना पुष्पहार अर्पण केले.

### समारंभाची आवड नाही

नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे छोटेसे भाषण झाले. ते म्हणाले,

दिल्लीतील महाराष्ट्रीय संस्थांमार्फत मला बरेच वेळा निरनिराळया प्रसंगी हजर राहून बोलण्याविषयी विनंती करण्यात आली होती. परंतु गेल्या तीन वर्षात मी घटनासमितीच्या कामात मग्न असल्याने त्या आमंत्रणाचा स्वीकार करू शकलो नाही. अर्थात मी महाराष्ट्रीय समारंभास हजर राहिलो नाही त्याप्रमाणेच दुसऱ्या कोणत्याच कार्यक्रमांना गेलो नाही. लोकांनी असा गैरसमज करून

---

जनता : ४ फेब्रुवारी १९५०.

घेऊ नये की माझा आज येथे गौरव होणार आहे म्हणून मी आलो आहे. एक तर माझा स्वभाव थोडा एकलकोंडा आहे व अशा समारंभांची मला आवड नाही. साधारणपणे पुस्तक वाचन व माझे काम यापलिकडे माझे मन दुसऱ्या कशात रमत नसल्यामुळेही मी फारसा कोणत्याच कार्यक्रमात भाग घेत नाही. आज आपणा सर्वांनी मला याठिकाणी बोलावून माझे अभिनंदन केले याबद्दल मी आभारी आहे.

घटनासमितीवरील माझी कामगिरी फार मोठी आहे, असे मी मानावयास तयार नाही. कारण ही घटना बनविताना बऱ्याच देशांमधील निरनिराळया घटनांचा अभ्यास करून त्यामधील आपल्या देशास रुचतील व पचतील अशी कलमे निवडून ती एकत्रित करणे एवढेच आमचे कार्य होते. त्याप्रमाणे आम्ही ते केले. सर्वात महत्त्वाची गोष्ट आम्ही जी करू शकलो ती म्हणजे अखिल भारताची राजभाषा आम्ही एक निश्चित करून टाकली. त्याचप्रमाणे एक लिपी करू शकलो असतो तर तीही फार महत्त्वाची गोष्ट झाली असती. परंतु ती गोष्ट गडबडीमध्ये होऊ शकली नाही. आपल्या देशात शेकडो भाषा बोलल्या जातात. अशी अफाट देशाची राजभाषा आपण एक कायम करू शकलो, ही खरोखरच महत्त्वाची गोष्ट आहे. निरनिराळया प्रांतीय भाषा त्या त्या प्रांतात रूढ राहतील असे अद्यापही म्हणतात ; परंतु राजभाषा एक ठरल्यानंतर हिंदच्या प्रत्येक नागरिकास ती भाषा बोलणे प्राप्त होईलच व त्यायोगे आपोआप संघटना होईल. राष्ट्र बलिष्ठ करणे असल्यास अशा संघटनांची आवश्यकता किती आहे हे मी निराळे सांगावयास पाहिजे असे नाही.

महाराष्ट्रीयांविषयी बोलणे झाल्यास सध्या आपल्यामध्ये अशी एक वृत्ती निर्माण होऊ पाहत आहे की प्रत्येक क्षेत्रात आपले पाय मागे आहेत. मी ही गोष्ट कबूल करणार नाही व माझी आपणा सर्वांना अशी विनंती आहे की आपणही अशी समजूत करून घेऊ नका. गणसंख्येचा विचार केला तर महाराष्ट्रीयन हे अल्पसंख्यांक आहेत. असे असूनसुद्धा मध्यवर्ती सरकारमध्ये आम्ही दोन महाराष्ट्रीय मंत्री आहोत. रिझर्व्ह बँकेच्या गव्हर्नरशिपचा मानही आपल्यापैकीच एका गृहस्थास मिळाला. त्याचप्रमाणे राजकारण, विद्वता, स्वार्थत्याग वगैरे सर्व गुणात आपला प्रांत मागे आहे, असे समजण्याचे मुळीच कारण नाही. मी तर असे म्हणेन की दुसऱ्या कोठल्याही प्रांतातील प्रजाजनांपेक्षा महाराष्ट्रीय माणूस हा आपल्या कर्तव्याची जास्त चाड राखतो. तो जास्त प्रामाणिक आहे व राष्ट्राकरिता जास्तीत जास्त त्याग करण्याची त्याची तयारी आहे.

महाराष्ट्राची उज्ज्वल अशी परंपरा आहे व ती राखण्यात विद्याव्यासंग ठेवणे आवश्यक आहे. हा वर्ग अत्यंत अभिमानीही आहे. अभिमानी असणे वाईट नाही. परंतु फाजील अभिमानी असणे बरे नसते व खरा अभिमान पूर्ण विद्येनेच येतो. माझे तुम्हा सर्वांना असे सांगणे आहे की महाराष्ट्राची परंपरा राखावयाची असल्यास आपला विद्याव्यासंग सोडता कामा नये व ज्या गुणांमुळे आपण आपली परंपरा टिकवू शकू त्यांचे संगोपन व पालन केले पाहिजे. ते गुण म्हणजे प्रामाणिकपणा, कर्तव्याची जाणीव व ती पार पाडताना राष्ट्रीय हिताची दृष्टी, हे होत. एक गोष्ट आपल्यामध्ये कमी आहे व ती म्हणजे उत्तम वक्तृत्व ! प्रत्येक तरुणाने ही कला उत्तमपणे आत्मसात न केल्यास यापुढील प्रजातंत्र राज्यपद्धतीत त्यांचा टिकाव लागणार नाही. आपण मला येथे बोलावून माझा जो सन्मान केलात त्याबद्दल मी आपला फार आभारी आहे.





बौद्ध धर्माचा प्रारंभ पक्क्या पायावर झालेला आहे. हा धर्म मानव धर्म आहे. या धर्माशिवाय मानवाच्या कल्याणाचा दुसरा कोणताही उपयुक्त धर्म नाही.

-- डॉ. बाबासाहेब आंबेडकर

# २६६
# बौद्ध धर्मामुळेच भारत देश महान

दोन मे १९५० हा दिवस, भारतीय इतिहासात आणि विशेषतः अस्पृश्य जनतेच्या चळवळीत सुवर्ण अक्षराने कोरला जाईल. या दिवशी दिल्ली येथे भगवान बुद्धाची २४९४ वी जयंती डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली अस्पृश्य समाजाने जाहीरपणे साजरी केली.

सुमारे २२ वर्षापूर्वी अस्पृश्य समाजाने महाड येथे मनुस्मृतिचे जाहीर दहन केले होते आणि गुलामगिरीत डांबणाऱ्या हिंदू धर्मात अस्पृश्य समाजाने राहू नये असा निश्चय जाहीर केला होता. त्या पार्श्वभूमीवर दिल्लीतील बौद्ध जयंतीस विशेष महत्त्व प्राप्त होते यात शंका नाही.

या बौद्ध जयंतीस जवळ जवळ २०,००० अस्पृश्य बंधु-भगिनींचा समुदाय हजर होता. निरनिराळया राष्ट्राचे परराष्ट्रीय वकील सदर समारंभास प्रामुख्याने दिसत होते. शिवाय बौद्धधर्मीय भिक्कुंचाही समुदाय खूपच होता.

याप्रसंगी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी केलेले भाषण अत्यंत श्रवणीय आणि स्फोटक होते. त्यांच्या भाषणामुळे वृत्तपत्र सृष्टीत केवढी खळबळ उडाली हे सर्वांना माहीत आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे ते खळबळजनक समग्र भाषण खालीलप्रमाणे आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

सभ्यगृहस्थहो, भगिनींनो आणि बंधुंनो,

याप्रसंगी मी हिंदी भाषेत बोलण्याचे ठरविले आहे. त्याबद्दल येथे हजर असलेल्या सन्माननीय पाहुण्यांची मी प्रथमतःच माफी मागतो. इंग्रजी भाषेत बोलण्याची माझी फार इच्छा होती. इंग्रजी भाषेत मी बोललो असतो तर माझ्या विदेशी मित्रांना माझे विचार ऐकता आले असते, परंतु इंग्रजी भाषा येथील बहुसंख्य श्रोतृवर्गास समजणार नाही. तेव्हा इंग्रजीमध्ये मी भाषण करणे म्हणजे श्रोतृ-वर्गावर अन्याय करण्यासारखेच आहे म्हणूनच मी हिंदीत बोलत आहे.

---

जनता : १३ मे १९५०.

वरचेवर जाहीर सभात जावे आणि या ना त्या विषयावर माहिती देत प्रवचने झोडावीत अशी काही मला सवय नाही. मी दिल्लीला आल्यापासून फारच थोड्या सभांना हजर राहिलो आहे. जनतेचा वेळ विनाकारण घेऊ नये, असे मला वाटते आणि जर लोकांचा वेळ घेतलाच तर जनतेची नीती सुधारेल व त्यांना साहाय्यभूत होईल असे काही तरी सांगण्यासारखे आपल्याजवळ पाहिजे.

काही दिवसांपूर्वी काही तरुणांनी माझा वाढदिवस साजरा करण्याची इच्छा दाखविली आणि त्या समारंभास मी हजर राहावे असे सांगितले. परंतु त्या गोष्टीस मी कबूली दिली नाही. त्यामुळे मी गैरहजर राहिल्याने पुष्कळांची निराशा झाली असेल. मात्र त्यामुळे मला वाईट वाटले नाही. कारण माझ्यासारख्या सामान्य व्यक्तीचा वाढदिवस साजरा करून कोणता फायदा मिळणार ? तुमच्यापेक्षा माझ्यामध्ये विशेष असे काय आहे ? माझ्यापेक्षा तुमच्यामध्ये कमी माणुसकी आहे काय ? मला तसे मुळीच वाटत नाही. काही माणसांना आपले वाढदिवस साजरे झालेले आवडत असतील, माझा वाढदिवस साजरा झालेला मला आवडत नाही. म्हणून मी त्या तरुणांना भगवान बुद्धाचा वाढदिवस साजरा करण्यास सांगितले आणि म्हणूनच माझी सर्व कामे बाजूला सारून मी आलो आहे.

आपल्या देशातील लोक देवपूजा करतात आणि त्यांना रामजयंती, कृष्णजयंती साजरी करण्यात मोठा आनंद वाटतो. राम, कृष्ण जयंतीस मी हजारो माणसे पाहतो; परंतु भगवान बुद्धाच्या जयंतीला जेमतेम १०० लोक देखील जमलेले मला कधी दिसले नाहीत. बुद्ध मंदिरामध्ये मी दरवर्षी जातो तेव्हा हा फरक मला दिसून येतो. रामाची अगर कृष्णाची जयंती लोक का साजरी करतात ? त्यांना वाटते की राम व कृष्ण हे देव आहेत. मी धर्मशास्त्राचा मोठा पंडित नाही, तथापि जे काही धार्मिक वाङ्मय मी अभ्यासिले आहे त्यावरून हे सांगू इच्छितो की, देव पदास चढणारी व्यक्ती ही पवित्र विचारांची असावी लागते. अशा व्यक्तीने दुसऱ्याचा द्वेष करू नये, स्वार्थी हेतू बाळगू नयेत आणि वैरत्व कोणाशीही ठेवू नये. त्याजपासून कोणाचेही नुकसान होऊ नये.

या कसोटीवर राम व कृष्ण खरोखरीच देव आहेत काय ? प्रथम रामाची छाननी करू. राम खरोखरच देव होता काय ? दोन तीन कारणास्तव रामाला देव मानता यावयाचे नाही.

ज्या वेळी राम, सीता, लक्ष्मण यांचेसह जंगलात (वनवासात) राहात होता, त्यावेळी त्याने रावणाची बहीण शूर्पणखा हिचे नाक कापले. देव माणूस असे कृत्य करील काय ? हे पहिले कारण आहे. वाली आणि सुग्रीव यांच्या कारभारात रामाने नाहक ढवळाढवळ केली. एवढेच नव्हे तर वालीने आपले राज्य व पत्नी सुग्रीवाच्या हवाली करावी अशी सक्ती केली. या गोष्टी का देव माणूस करतो ? हे दुसरे कारण आहे. कोणी एका धोब्याने सीतेच्या चारित्र्याबद्दल वाईट उद्‌गार काढले म्हणून रामाने तिचा त्याग केला. ऐन मध्यान्हीचे वेळी सीतेस जंगलात सोडावे असा हुकूम लक्ष्मणाला सोडणारा राम देव माणूस होता काय ? रामाने सीतेच्या बऱ्यावाईटपणाची चौकशी १० वर्ष केली नाही, त्यामुळे त्याजकडे न जाता तिला धरणी मातेची आराधना करून आत्महत्त्या करावी लागली. ज्या रामाला लोक देव मानतात, त्याचे चरित्र असे होते.

आता कृष्णाकडे वळू. महाभारताच्या लढाईत कृष्ण ही प्रमुख व्यक्ती होती आणि त्यावेळी कृष्णाने आपला लांडा कारभार केला नसता तर कदाचित कौरव पांडव या बंधु-बंधुमधील युद्ध उद्‌भवलेही नसते. कृष्णाने दोन्ही पक्षांना एकमेकांविरूद्ध चिथाविले आणि त्यांच्या युद्धाचे रणकुंड पेटविले. एखाद्या व्यक्तिकडे अमुक गोष्टी मागण्यासाठी जा, असे कृष्ण एकास सांगत असे, तर आलेल्या माणसाचे म्हणणे ऐकू नका असे दुसऱ्यास बनवीत असे.

या गोष्टी का देव माणसाच्या व पवित्र व्यक्तीच्या हातून घडतात ? मग कृष्णाला आपण देवाचे स्थान कसे देणार ? हे मी काही खोटे सांगत नाही. महाभारतांत व इतर धर्मग्रंथातच कृष्णाच्या आगलावेपणाबद्दल पुरावा आहे. तुझी आई तुला नग्नावस्थेत पाहील तर तू वज्रदेही बनशील असे कोणीतरी दुर्योधनास सांगितले होते. ही गोष्ट जेव्हा कृष्णास कळली तेव्हा कृष्ण गांधारीच्या घरी गेला. ज्यावेळी दुर्योधन घरी निघाला त्यावेळी कृष्णाने दुर्योधनास त्याच्या नग्न स्थितिसंबंधी काही विचारले आणि शरीर झाकण्यास सांगितले. गांधारीस दुर्योधनाच्या शरीराचा जेवढा भाग पाहावयास मिळाला तेवढा भाग वज्रदेही बनला. हे गुपित कृष्णास माहित असल्याने त्याने ते सर्वांना सांगितले आणि त्या गुपितावर घाला घालून भीमाने दुर्योधनाचा वध केला.

दुर्योधनाच्या मरणाचे गुपित कृष्णास माहित होते. अर्जुनाचे मरण टाळण्यासाठी कृष्णाने दुष्ट योजना केली. द्रोणाचार्यांचा मुलगा अश्वत्थामा हा जेव्हा रणक्षेत्रावर लढत होता तेव्हा कृष्णाने द्रोणाचार्यास विपर्यस्त माहिती दिली आणि धर्मराजास '' नरो वा कुंजरो '' असे विधान करावयास भाग पाडले. कृष्णाच्या फसव्या कृत्यामुळे शिशुपाल एवढा संतापला की कृष्णाला भर दरबारात त्याने शिव्या दिल्या. शिशुपालाच्या या निर्भय वृत्तीमुळे देवादिकांना देखील आनंद झाला आणि कृष्णाची खरडपट्टी केली म्हणून त्याजवर पुष्पवृष्टी जाहीरपणे करण्यात आली. कृष्ण हा देव नव्हता. एवढेच नव्हे तर सामान्य माणसा-पेक्षा तो हीन होता, हे सिद्ध करण्यासाठी अशी किती तरी उदाहरणे देता येतील.

म्हणून आपण बुद्ध जयंती साजरी करीत आहोत आणि तुम्हास मी सांगू इच्छितो की जरी सध्या हिंदू धर्माइतका बौद्ध धर्माचा प्रसार भारतात नसला तरी स्वातंत्र्य प्राप्तीपासून जनतेची मते बौद्ध धर्माकडे अधिक झुकत आहेत. तुम्ही घटकाभर विचार करा, जवळ जवळ २,५०० वर्षांनी बुद्ध जयंती येथे साजरी केली जात आहे. बौद्ध धर्माकडे आजपावेतो दुर्लक्ष केले तरी बुद्ध जयंती साजरी होते, ही गोष्ट असामान्य नव्हे असे कोण म्हणेल ? स्वातंत्र्यप्राप्तीनंतर ' आपले ' म्हणता येईल, अशा तत्त्वज्ञानाची आपल्याला आवश्यकता आहे. हिंदू संस्कृतीत आपण पुष्कळ शोधून पाहिले पण त्यात विशेष काहीच सापडत नाही. फक्त बौद्ध धर्मामधूनच खऱ्या ज्ञानाचे किरण दिसतात आणि बौद्ध धर्मामुळेच भारत देश महान असल्याचे आपण जगाला सांगू शकतो.

आपल्या राष्ट्रध्वजावर बुद्धाचे चक्र आहे. आपली राजमुद्रा बौद्ध तत्त्वज्ञानावर अधिष्ठित आहे. शिवाय, नवीन भारतीय घटनेप्रमाणे आपल्या राष्ट्राध्यक्षास जेव्हा अभिषेक करण्यात आला तेव्हा बुद्धाची मूर्तीच सर्वात श्रेष्ठ मानण्यात आली.

हिंदू धर्म इतर धर्माहून कसा श्रेष्ठ आहे, याचे उत्तर हिंदू लोक देऊ शकतील काय ? अस्पृश्यांचे जीवन बरबाद करण्याची ताकद हिंदू धर्मात आहे, म्हणून हिंदू धर्म श्रेष्ठ म्हणावयाचा काय ? एखादा अस्पृश्य ब्राह्मणापेक्षा अधिक गुणसंपन्न असला तरी तो ब्राह्मणासमान होऊ शकत नाही, अशी शिकवण हिंदू धर्म देतो म्हणून तो श्रेष्ठ म्हणायचा काय ? एखाद्या अस्पृश्याने पवित्र उद्‌गार काढले तर त्याची जीभ छाटली जावी, हे रास्त आहे काय ? अस्पृश्य मनुष्य गुरू होऊ शकत नाही म्हणून हिंदू धर्म श्रेष्ठ आहे काय ? तप्त शिसे अस्पृश्यांच्या कानात ओतावयास सांगणारा '' हिंदू धर्म '' ''धर्म '' या संज्ञेस पात्र आहे काय ?

या प्रश्नांची उत्तरे तुम्ही दिलीच पाहिजेत. कोणता धर्म चांगला व कोणता धर्म वाईट हे आतापर्यंत तुम्ही ओळखलेच असेल. ज्यांना विचार, शिक्षण व स्वातंत्र्य लाभले नाही ते हिंदू संस्कृतीस कशी मान्यता देतील. शूद्रांना ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांची फक्त चाकरी करण्यास सांगितले होते.

आश्चर्याची गोष्ट अशी की हे ब्राह्मण कधीच राज्यकर्ते बनले नाहीत. राज्य करणारे लोक नरकात जातात अशी ब्राह्मणांची समजूत होती. ब्राह्मण लोकांना नरकाची मोठी भीती वाटते, म्हणून क्षत्रियांना राज्य करण्याची ब्राह्मणांनी मुभा दिली. तेव्हा या सौद्यात शूद्र आणि अस्पृश्य कसे भागीदार ठरतील ? आपण अस्पृश्य म्हणून हिंदू धर्मात राहावयाचे की धर्म बदलावयाचा या संबंधी विचार करण्याची वेळ आता आली आहे. मला व्यक्तिशः हिंदुंचा मग्रूरपणा व विषमता मुळीच मान्य नाही. बौद्ध धर्म व हिंदू धर्म यात केवढा तरी फरक आहे. बौद्ध धर्म जातीविरहित एकजिनशी समाजरचनेचा पुरस्कार करतो तर हिंदू धर्म जातीवरच मुख्य अधिष्ठान ठेवतो. हिंदुंच्या हरेक जातीमध्ये चिरेबंदी भिंत घालून विभागणी करण्यात आली आहे.

दरेक व्यक्तिमात्रास, समाजास व सरकारास धर्माची आवश्यकता आहे. हे कोणीही नाकारू शकणार नाही. खऱ्या धर्माशिवाय कोणाचीही प्रगती होणार नाही. तेव्हा कोणता धर्म श्रेयस्कर हे तुम्ही ठरविले पाहिजे. बौद्धवाद व ब्राह्मणवाद यामधील फरक व भेद नीट लक्षात ठेवण्यास मी तुम्हास सांगत आहे. यापैकी एकाची तुम्हास निवड करावयाची आहे. बुद्ध हा मानव होता. बुद्धाची तत्त्वे जातीय वर्गाविरुद्ध होती. बुद्धाने सामान्य जनतेत वास्तव्य केले आणि मानवी दृष्टिकोनातून जनतेची दुःखे दूर करण्याचा प्रयत्न केला. तेव्हा आजपासून कोणता धर्म तुम्हास उपकारक आहे, हे तुम्हास ठरवावयाचे आहे आणि ते स्वातंत्र्य तुम्हास निर्विवादपणे आहे.



# २६७

# बुद्धधर्मीय देशांनी धर्माच्या वाढीसाठी त्याग करावा

'सिलोन बुद्धिस्ट कॉंग्रेस' ने सिलोनची जुनी राजधानी कॅण्डी येथे 'जागतिक बुद्ध परिषद' दिनांक २५ मे १९५० पासून आयोजित केली होती. ती ६ जून पर्यंत चालणार होती. त्यात आशिया व युरोपीय राष्ट्रांचे प्रतिनिधी प्रामुख्याने उपस्थित राहणार होते. सदर परिषदेत बुद्ध धर्माच्या शिकवणुकीनुसार जगात शांतता स्थापनेचा विचार करण्यात येणार होता. मुख्य प्रधान डी. एस. सेनानायके प्रतिनिधींचे कोलंबो रेसकोर्सवर स्वागत करणार होते. या परिषदेत भारत सरकारचे कायदे मंत्री डॉ. बाबासाहेब आंबेडकर प्रामुख्याने भाग घेणार होते.

त्यानुसार दिनांक २३ मे १९५० रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हैद्राबाद मार्गे मद्रासला आले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या स्वागतासाठी हजर असलेल्या अधिकारी, कार्यकर्ते, चाहते यात प्रामुख्याने कामराज नाडर यांचा समावेश होता. ''बुद्ध धर्माबद्दल आस्था असल्यामुळे व मला परिषदेचे आमंत्रण असल्यामुळे मी तिकडे जात आहे.'' असे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी पत्रकारांना सांगितले. त्यानंतर ते कोलंबोकडे रवाना झाले.

आजपासून ६ वर्षांनी बुद्ध युगास २,५०० वर्षे पुरी होणार असून त्यावेळी जगात बुद्धधर्माची जोरात लाट पसरलेली असेल असा आशावाद जागतिक बुद्ध भ्रातृसंघाची स्थापना करण्याचा ठराव मांडताना सी. बी. नुगावाला या सिलोनी बुद्धप्रमुखाने कॅण्डी (सिलोन) येथे भरलेल्या परिषदेत व्यक्त केला. या ठरावास इंग्लंडच्या कु. कॉन्स्टन्स लाऊन्सबरी, ब्रह्मदेशचे यू चान चन, बंगालचे डॉ. अरविंद बरुआ, जपानचे रिरी नाकायमा, इटालीचे लोकनायक व थायलंडचे सुखित निमहेंद्र यांनी पाठिंबा दिला.

दि. २६ मे १९५० रोजी येथील 'टेम्पल ऑफ दि ट्रुथ' नावाच्या मंदीरात २७ देशांचे बुद्धधर्मीय प्रतिनिधी जमले असून त्यांच्यामध्ये बुद्ध धर्माच्या पुनरुज्जीवनाविषयी चर्चा झाली. भारताचे कायदेमंत्री डॉ. बी. आर. आंबेडकर हे या प्रसंगी उपस्थित

---

दलित बंधु : २८ मे १९५०.

असले तरी ते या परिषदेचे अधिकृत प्रतिनिधी नाहीत म्हणून अधिकृत चर्चेचे वेळी त्यांनी भाग घेतला नाही. जागतिक मैत्रीसंबंधीचा ठराव परिषदेने मंजूर केल्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण झाले.

ते म्हणाले,

मी जरी या भ्रातृसंघाचा सभासद झालो नसलो तरी माझ्या भेटीचा उद्देश फार खोल आहे. साऱ्या बुद्ध देशांनी केवळ भ्रातृसंघ न स्थापता बुद्धधर्माच्या प्रचारार्थ त्याग करण्याची तयारी ठेवली पाहिजे. बुद्ध धर्माचे समारंभ भारतातील लोकांना पाहावयास मिळावे व बुद्ध धर्माचा बाह्योपचारच केवळ पाळला जातो की खरा बुद्ध धर्म आचरला जातो हे भारतीयांना समजावे अशी माझी इच्छा आहे. बुद्ध धर्म जागृत आहे की तो केवळ परंपरागत आहे हे पाहाण्याचाही आपला हेतू आहे.

त्यांनी आपल्या भाषणात केवळ जागतिक मित्रत्वासंबंधीच्या ठरावाबद्दल असमाधान व्यक्त केले. बुद्धधर्मीय देशांनी त्या धर्माच्या वाढीचे कंकण बांधून त्यासाठी त्याग केला पाहिजे, अशातऱ्हेची घोषणा या परिषदेत व्हायला हवी होती; असा अभिप्राय त्यांनी व्यक्त केला.

डॉ. आंबेडकर म्हणाले की,

(१) ''बुद्ध धर्माचे आचार नि उपचार भारतामध्ये पाहावयास मिळत नाहीत, ते पाहाण्याची संधी साधावी;

(२) तसेच, मूळ तत्त्वांशी विसंगत अशा श्रद्धांनी बुद्धधर्मी लोक कितपत ग्रासले आहेत व मूळ शुद्ध स्वरूपात तो धर्म कितपत राहिला आहे हे पहावे;

(३) आणि जग सिलोनला बुद्धधर्मी म्हणते म्हणून सिलोन बुद्धधर्मानुयायी आहे की तो धर्म आजही जिवंत स्वरूपात येथे नांदत आहे याचा शोध घ्यावा;

ह्या त्रिविध उद्देशांनी मी या परिषदेला आलो. मित्रत्वाच्या ठरावाप्रमाणे मी अधिकृत मित्र नसलो तरी येथे येण्यात माझा हेतू अधिक गंभीर स्वरूपाचा आहे.''



# २६८

# बौद्ध धर्मातील अनेक तत्त्वे हिंदू धर्माने आत्मसात केली

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी वाय. एम. बी. ए. कोलंबोद्वारा आयोजित 'विश्व बौद्ध भ्रातृत्व सम्मेलनात' दि. ६ जून १९५० रोजी भाषण केले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

बंधु आणि भगिनींनो,

एखाद्या विषयाच्या परंपरेचे यथायोग्य ज्ञान झाल्यानंतरच त्याबद्दल यथार्थ ज्ञान होत असते. म्हणून ज्या परिस्थितीने बौद्ध धर्माला जन्म दिला ती आपण समजून घेतली तरच आपणाला बौद्ध धर्माचे वास्तविक महत्त्व कळू शकेल. भारताचा धर्म नेहमीसाठी हिंदू धर्म होता, हे मत मला मान्य नाही. हिंदू धर्म तर सर्वात शेवटी विचारांची उत्क्रांती होत असताना उदयास आला. वैदिक धर्माच्या प्रचारानंतर भारतात तीन वेळा धार्मिक परिवर्तन घडून आले आहे. वैदिक धर्माचे रुपांतर ब्राह्मण धर्मामध्ये झाले आणि ब्राह्मण धर्माचे रुपांतर हिंदू धर्मामध्ये झाले. बौद्ध धर्माचा समाजाचे विविध वर्णामध्ये विभाजन होण्यास विरोध होता. या चातुर्वर्ण्याची सुरुवात ब्राह्मण धर्माने केली होती. फ्रान्सकरिता फ्रान्सची राज्यक्रांती जेवढी महत्त्वाची आहे तितकाच मानव जातीसाठी बौद्ध धर्माचा उदयही महत्त्वाचा आहे.

वैदिक शिकवणीनुसार आचरण करणे सोपे आहे. वैदिक लोक मुख्यत: यज्ञपूजक होते. वैदिक आर्यांची जवळजवळ तेहत्तीस कोटी आराध्य दैवते होती, असे सांगण्यात येते. ते आपल्या या देवतांना संतुष्ट करण्यासाठी यज्ञ करीत असत. या देवतांच्या पूजेसाठी गोळा करण्यात येणारी सामग्री अत्यंत श्रेष्ठ दर्जाची असणे आवश्यक होते. कृषि युगातील त्या आर्यांना गो-धन हे सर्वश्रेष्ठ धन वाटत होते. म्हणून ते आपल्या देवतांची पूजा गाईचा यज्ञात बळी देऊनच करीत असत. यामुळे वैदिक धर्म हा हिंसेला प्रोत्साहन देणारा

---

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे : संपादक–मा. फ. गांजरे, खंड-२. पुनर्मुद्रण १०-४-१९८६, पृ. १७४-१७९.

ठरला होता. यज्ञामध्ये असंख्य पशुंचा बळी देण्यात येत होता आणि जे पशु यज्ञात बळी देण्यात येत असत त्यांना स्वर्गप्राप्ती होते अशी याजकांची श्रद्धा होती. ''वैदिक हिंसा, हिंसा न भवति '' अर्थात वैदिक यज्ञात झालेली हिंसा, हिंसा नव्हे.

यज्ञामध्ये सर्रास प्राणीहत्येचा प्रचार होत असल्यामुळे ज्या ज्या प्राण्यांचे मांस खाण्यास योग्य होते अशा बकऱ्या, मेंढ्या, गाई यासारख्या प्राण्यांचा बहुधा यज्ञात बळी देण्यात येत असे. यज्ञाचा प्रचार वाढल्यामुळे पुरोहिताचे महत्त्व वाढले आणि ब्राह्मणवादाचा उदय झाला. या ब्राह्मणवादाने समाजाचे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र अशा चार वर्णांमध्ये विभाजन केले. चार वर्णांची स्थापना करून समाजात विषमता निर्माण करणे ब्राह्मणवादाचा मुख्य हेतू होता. कारण त्याशिवाय ब्राह्मणांचे प्रभुत्त्व स्थापन करणे संभवनीय नव्हते. आपल्या श्रेष्टत्वाच्या प्रस्थापनेसाठी ब्राह्मणांनी काही मंत्रांची रचना केली आणि त्या मंत्रांद्वारे ते ब्राह्मणांची उत्पत्ती ब्रह्माच्या मुखातून, क्षत्रियांची बाहूतून, वैश्यांची मांड्यातून व शूद्रांची उत्पत्ती ब्रह्माच्या पायातून झाली, असा प्रचार करू लागले. यामुळे ब्राह्मण सर्व वर्णाचे गुरू व सर्वश्रेष्ठ आहेत, असे त्यांचे सांगणे होते. परंतु भगवान बुद्धानी याचे खंडन केले. ते म्हणतात, जशी सर्व माणसे उत्पन्न होतात तसेच ब्राह्मण होतात. ब्राह्मणांच्या स्त्रिया ऋतुमती होतात, गर्भवती होतात, नऊ मासपर्यंत गर्भपोषण करतात, प्रसूत होतात, मुलाला स्तनपान करतात, असेच सर्वत्र दिसून येते. अशा स्थितीत ब्राह्मण ब्रह्माच्या मुखातून निघाले व शूद्र त्याच्या पायापासून निघाले, असे ते म्हणू तरी कसे शकतात ? जन्माने कोणीही शूद्र वा ब्राह्मण होत नाही. तर माणूस करणीमुळे ब्राह्मण किंवा शूद्र ठरतो.

यापुढे भगवंत म्हणाले '' जटा, दाढी, गोत्र किंवा जन्मामुळे कोणीही ब्राह्मण होत नाही. जो सत्यानुसार व धर्मानुसार आचरण करतो, जो काया-वाचा-मनाने कोणतेही पाप करीत नाही, जो काम-क्रोधरहित आहे ; जो व्रती, शीलवान, अनुत्सुक, दान्त आणि जितेन्द्रिय आहे ; जो तृष्णारहित व संशयरहित आहे ; जो राग-द्वेष मदविहीन आहे ; जो शोकरहित, निर्मल व शुद्ध आहे ; ज्याने भवचक्रात लोटण्यास कारणीभूत होणाऱ्या मोहाचा त्याग केला आहे, ज्याने रती व अरतीचा त्याग केलेला असून त्यामुळे जो शांतचित्त आहे ; जो गंभीर, प्रज्ञावंत, मेधावी, मार्ग-अमार्गाचा ज्ञाता आहे आणि जो सर्वोत्तम अशा निर्वाणाचा अधिकारी आहे, त्यालाच मी ब्राह्मण म्हणू शकतो. ''

तुम्हीही विचार करा की जो धर्म मानव जातीच्या कल्याणासाठी साह्यकारी होऊ शकतो, ज्यात मानवाच्या मुक्तीचे द्वार खुले आहे, आणि ज्यात मानवामानवात भेदभाव नसून समता आहे तो धर्म, धर्म या संज्ञेला पात्र ठरू शकतो. ज्या धर्माचे मूलतत्त्व मानवामानवात भेद निर्माण करणे हेच आहे तो धर्म ' सद्धम्म ' म्हणण्याच्या लायकीचा नाही. ब्राह्मण धर्माने मानव समाजात भेदाच्या दऱ्या निर्माण केल्या. त्याने स्त्रियांच्या व शूद्रांच्या बाबतीत अत्यंत घृणास्पद व्यवहार करण्याची शिकवण दिली. भगवान बुद्धाच्या धर्माचा प्रधान हेतू मानवी-समता हा आहे. आपल्या बुद्धीच्या कसोटीवर घासून प्रत्येक गोष्टीचा स्वीकार करण्याचे किंवा अस्वीकार करण्याचे स्वातंत्र्य या धर्मात आहे. हिंसेचा उच्छेद आणि अहिंसेचे प्रस्थापन हे त्याचे एक प्रमुख अंग आहे. कोणत्याही प्राण्याची एखाद्या देवतेच्या नावावर हिंसा करणे किंवा त्याचा बळी देणे आणि पुन्हा निर्लज्जपणे असे प्रतिपादन करणे की 'त्याला स्वर्ग मिळाला,' असे बौद्ध धर्माने सांगितले नाही.

बौद्ध धर्माचा भारतातील प्रादुर्भाव व फ्रान्समधील राज्यक्रांती या दोनही युगांतकारी महत्त्वपूर्ण घटना आहेत, असे मला म्हणावयाचे आहे. बौद्ध धर्माच्या उदयापूर्वी एखादा शूद्र राजा होऊ शकेल ही कल्पनाही करता येण्यासारखी नव्हती. परंतु भारतीय इतिहासाच्या तज्ज्ञांना हे माहीत आहे की बौद्धधर्माच्या प्रादुर्भावानंतर शूद्रांनाही सिंहासनावर बसण्याची संधी प्राप्त झाली आणि देशात सामाजिक समतेची स्थिती निर्माण झाली. गणतंत्रीय राज्यपद्धती ही बौद्ध काळाचीच देणगी आहे. भगवान बुद्धाच्या परिनिर्वाणानंतर इ. पू. २७४ पर्यंत बौद्धधर्माची स्थिती कशी होती हे जाणून घेण्याची पर्याप्त साधने उपलब्ध नाहीत. तथापि अशोकाच्या काळात बौद्धधर्माचा प्रसार विजेच्या गतीने झाला. अशोक आणि चंद्रगुप्तासारखे बलाढ्य सम्राट बौद्ध काळातच झाले आहेत व यांनीच भारताबाहेरील राज्यांशी मैत्रीचे संबंध स्थापित केले होते. बौद्ध काळात भारतामध्ये स्थापत्यकला, चित्रकला, मूर्तीकला इत्यादी नानाप्रकारच्या कलांचा विकास झाला. बौद्ध काळात साहित्य आणि तत्त्वज्ञानाची इतकी भरभराट झाली होती की अनेक देशातील विद्यार्थी येथील नालंदा व तक्षशिला विश्वविद्यालयात शिक्षण घेण्यासाठी दाखल झाले. त्यापूर्वी कधीही असा गौरव भारताला प्राप्त झाला नव्हता.

प्रश्न असा निर्माण होतो की, जो धर्म इतका श्रेष्ठ होता व ज्याचा प्रसार इतका झाला होता त्याचा भारतातून लोप कसा झाला ? या प्रश्नांची उत्तरे अनेक असली तरी त्याबद्दल मी सम्राट अशोकाला जबाबदार समजतो. अशोक

वाजवीपेक्षा जास्त सहनशील होता. यामुळे मी त्याला दोष देत आहे. सम्राट अशोकाने आपल्या कारकीर्दीत बौद्धधर्माशिवाय अशा अनेक धर्मांना प्रचाराची मुभा देऊन ठेवली होती की जे बौद्ध धर्माचे कट्टर दुष्मन होते. यामुळे बौद्ध धर्माच्या विरूद्ध असणाऱ्या अधर्मांना आपली शक्ती वाढविण्याची पुरेपूर संधी प्राप्त झाली व हाच बौद्ध धर्माला पहिला आघात होय, असे मला वाटते.

बौद्ध ग्रंथांवरून दिसून येते की, भगवान बुद्धाच्या श्रमण शिष्यांमध्ये जवळ जवळ शेकडा ६० ब्राह्मण होते. ब्राह्मण लोक भगवान बुद्धाशी वादविवाद करण्यासाठी त्यांच्याकडे येत असत व वादविवादात निरुत्तर झाल्यामुळे प्रभावित होऊन सहर्ष त्यांच्या धर्माची दीक्षा घेऊन भगवान बुद्धाबद्दल श्रद्धा बाळगीत असत. या श्रमण शिष्यांमुळे भगवान बुद्धाचा व त्यांच्या धर्माचा प्रभाव दिवसेंदिवस वाढत होता. परंतु बौद्ध धर्मात जातीभेद नसल्यामुळे क्रमशः जेव्हा खालच्या जातीतील लोक बुद्धाला शरणागत होऊन सिद्ध भिक्षु बनू लागले व धनिकांद्वारा व राजांद्वारा त्यांची पूजा व सत्कार होऊ लागला तेव्हा ही गोष्ट ब्राह्मणांना सहन झाली नाही व ते बौद्ध धर्माचा उच्छेद करण्याच्या मार्गाला लागले.

भारतात प्राचीन काळापासून ज्याप्रमाणे ग्राम-देवता, प्रदेश-देवता, वन-देवी, नद-नदी-देवी इत्यादी देवता होत्या व त्यांची पूजा होत होती, त्याप्रमाणेच कुलदेवताही होत्या. राजेलोक व धनिकांच्या कुलदेवतांची पूजा बहुधा ब्राह्मणांद्वारा होत असे. त्यामुळे राजमहालामध्ये कुलदेवतेच्या पूजेसाठी जाणारे ब्राह्मण राणीच्या मध्यस्थीने राज्य शासनावर आपला प्रभाव चालवीत असत. या प्रभावाचा उपयोग करून त्यांच्या निरंतर वर्चस्वाला बाधक होणाऱ्या बौद्ध धर्माची पाळेगुळे खणून काढण्याचा ते प्रयत्न करीत. सम्राट अशोकाच्या काळात या कुलदेवतापूजेची निंदा करण्यात आली. अशोक म्हणतो : '' मी बौद्ध धर्माच्या मार्गाचे अनुसरण करीत असल्यामुळे मला दुसऱ्या कोणत्याही देवी देवतांची पूजा करण्याची गरज नाही. '' आणि त्याने आपल्या प्रशासनाधिकाऱ्यांना आदेश देऊन कुलदेवतांच्या मूर्ती काढून टाकल्या. हा ब्राह्मणांवर फार मोठा प्रहार होता. कारण यामुळे त्यांच्या उपजिविकेला व धूर्त प्रचाराला फार मोठा धक्का बसला आणि ते त्याचा बदला घेण्यास सिद्ध झाले. ब्राह्मण पुरोहितांची पूर्वी अशी धारणा होती की सर्व राजेलोक मेल्यानंतर नरकात जातात. कारण राज्य शासन चालविताना त्यांना पुष्कळशी पापकृत्ये करावी लागतात. यामुळे तशी संधी प्राप्त झाली तरीही ब्राह्मण लोक राज्यभार आपल्या शिरावर घेण्यास तयार नव्हते. मात्र राजसिंहासनावर बसण्यास ते तयार नसले तरी मंत्री किंवा पुरोहित म्हणून राजाला सल्ला देण्याचे कार्य करीत असत. त्याचप्रमाणे कायदे

कानून तयार करीत होते. परंतु कुलदेवतेची पूजा बंद झाल्यामुळे त्यांची जेव्हा खूप मोठी हानी झाली तेव्हा राज्य शासन न चालविण्याच्या आपल्या सिद्धांताचा त्याग करून ते राज्यावर व सिंहासनावर ताबा मिळविण्याच्या प्रयत्नाला लागले. अशातऱ्हेच्या अगणित घटना भारतीय वाङ्‌मयात सापडतात. काही ठिकाणी असेही आढळून येते की जेथे स्वतःच्या बळावर राज्य करणे अशक्य होते, तेथे त्यांना धार्जिणे असलेल्या क्षत्रियांना हाताशी धरून किंवा त्यांना समोर करून म्हणजे त्याला आपल्या हातातील बाहुले बनवून राज्यकारभार ते करीत असत. अशाप्रकारे पुन्हा ब्राह्मणवादाने जोर पकडल्यामुळे बौद्ध धर्मावर आघात झाला आणि भारतातून त्याचा लोप होण्यास तो कारणीभूत ठरला.

ब्राह्मणी शासनाधिकाराची एक फार मोठी घटना मौर्य साम्राज्याचे परिवर्तन घडून येण्यामध्ये दिसून येते. भारतीय इतिहासकारांनी या महान घटनेला महत्त्व दिले नाही, ही फार दुःखाची गोष्ट आहे. वस्तुतः ही भारतीय इतिहासातील सर्वात मोठी घटना आहे. अंतिम मौर्य सम्राट महाराज बृहद्रथाचा सेनापती पुष्यमित्र नावाचा एक ब्राह्मण होता. याचा गुरू पतंजली हा होय. पतंजलीने योगविद्या बौद्धांपासूनच मिळविली होती ; परंतु नंतर हा बौद्धांचा शत्रु बनला. याच्या सल्ल्यानुसार सेनापती शृङ्गवंशीय पुष्यमित्राने बृहद्रथाला ठार मारले व मौर्यवंशाच्या बदलीत आपल्या शृङ्गवंशाच्या नावाने ब्राह्मणी राज्य चालविले.

या ब्राह्मणी राज्याने बौद्ध धर्माला अपरिमित नुकसान पोहोचविले. ब्राह्मणी धर्माच्या पुनर्स्थापनेसाठी करण्यात आलेल्या कृत्यातील हे सर्वात दारुण कृत्य असून बौद्ध धर्माचा भारतातून लोप होण्यास कारणीभूत ठरलेली ही फार मोठी ऐतिहासिक घटना होय.

भारतातून बौद्ध धर्माचा लोप होण्यास विदेशी आक्रमणेही कारणीभूत ठरली, असे मानण्यात येते. परंतु युनानी लोकांच्या आक्रमणांमुळे बौद्ध धर्माला झळ पोहोचली नाही. याउलट त्यांनी बौद्ध धर्माच्या प्रचारासाठी द्रव्य सहाय्य केल्याचेही पुरावे इतिहासात आढळतात. गुप्तकाळात भारतावर हूणांची आक्रमणे झाली परंतु गुप्त राजांकडून पराभूत झाल्यामुळे ते भारतातच स्थायिक झाले. यांच्याकडूनही बौद्ध धर्माला झळ पोहोचली नाही. याउलट पेशावर येथील शक राजा कनिष्क याने बौद्ध धर्माची दीक्षा घेतली होती. त्याने तक्षशिला येथे एक विशाल बौद्ध विश्वविद्यालय उघडले होते आणि बौद्धांची चौथी धर्म-संगीती (धर्मसभा) भरविली होती. या धर्मसंगीतीतच महायान मार्गाचा

उदय झाला व बौद्ध साहित्य सुधारित संस्कृतमध्ये लिहिल्या जाऊ लागले. विदेशी आक्रमकांपैकी मुसलमानांद्वारा बौद्ध धर्माला अधिक झळ पोहोचली. मुसलमान लोक प्रतिमा व मूर्तीचे विरोधी होते. त्यांनी बुद्धाच्या मूर्तींची फोडतोड केली व भिक्षूंना ठार मारले. त्यांनी नालंदाच्या विशाल बौद्ध विश्वविद्यालयाला सैनिकी किल्ला समजून व चीवरधारी भिक्षुंना सैनिक समजून त्यांचा संहार केला. जे भिक्षु त्या भीषण रक्तपातातून वाचले ते नेपाळ, तिबेट, चीन इत्यादि देशात पळून गेले.

नालंदा येथील विशाल ग्रंथालयात ताडपत्र व भोजपत्रावर लिहिलेले सुमारे दोन लाख ग्रंथ होते ; व त्यात हजारो वर्षांचे ज्ञान साठविलेले होते. त्यांना बख्तियार खिलजीने आग लावून दिली आणि तेथे शिकत असलेल्या सहा हजार विद्यार्थ्यांपैकी काहींना ठार मारले व काहींना जबरदस्तीने मुसलमान करून सोडले. मुसलमानी आक्रमक जेथे जेथे गेले तेथे तेथे त्यांनी बौद्धांना ठार तरी मारले किंवा मुसलमान तरी बनविले आणि बौद्ध मूर्तींची फोडतोड केली, ग्रंथालये जाळली व विहार नष्ट केले. माझे काही हिंदू मित्र मला विचारतात की मुसलमान आक्रमकांनी हिंदू मूर्ती व हिंदू मंदिरांचीही नासधूस केली आहे ना ? यावर माझे उत्तर असे की, जितकी बौद्ध धर्माची नासधूस त्यांनी केली तितकी हिंदू धर्माची केली नाही. याचे कारण असे की, बहुधा सर्वच ब्राह्मण गृहस्थ होते आणि ते आपल्या परिवारासह आपल्या घरीच राहात असल्यामुळे त्यांना ओळखण्याची वेगळी अशी खूण नव्हती. परंतु बौद्ध भिक्षु मात्र कुटुंबविरहित, चीवरधारी आणि विहारात राहात असत आणि त्यांना सहज ओळखता येत होते. त्यामुळे हिंदुंची प्रसिद्ध मंदिरे जरी मुसलमानांनी फोडली असली तरी त्यांच्या धर्मगुरुंना व पुरोहितांना हानी पोहोचली नाही.

कोणताही धर्म जिवंत राहण्यासाठी त्यातील धर्मगुरु व पुरोहित कायम राहणे आवश्यक असते. बौद्ध धर्माचा लोप होण्याचे विशेष कारण म्हणजे बौद्धभिक्षुंचा अभाव निर्माण झाला होता. . बौद्ध भिक्षुंची कोणतीही जात नव्हती. कोणीही व्यक्ती बौद्ध धर्माला शरण जाऊन उपासक, श्रामनेर, भिक्षु किंवा स्थविर-महास्थविर होऊ शकत होता. भिक्षु लोक समाजापासून दूर विहारात राहात असत. ब्राह्मणवादामध्ये ही बाब नव्हती. तेथे केवळ ब्राह्मणांच्या घरी जन्म होण्यामुळेच नवीन ब्राह्मण्य निर्माण होत असे. या कारणामुळे हिंदुंची विशेष हानी झाली नाही. नंतरच्या काळात मागासवर्गीय लोकांना भिक्षु बनवून बौद्धांची परंपरा कायम राखण्याचा प्रयत्न करण्यात आला

परंतु चांगल्याप्रकारे शिक्षित नसल्यामुळे हे भिक्षु ब्राह्मणांच्या युक्तिवादाला उत्तर देऊ शकले नाहीत व त्यामुळे त्यांची हार झाली.

दरम्यानच्या काळात शैव योग्यांनी शैव धर्माचा व ब्राह्मणांनी वैष्णव धर्माचा प्रचार केला. वैष्णव आणि शैवामध्ये जोरदार संघर्ष झाला. शेवटी ब्राह्मणांनी शैवांना ' रुद्र ' बनवून आपणामध्ये सामील करून घेतले व शैव आणि वैष्णव यांचे ऐक्य झाले. सध्याच्या काळात हिंदू धर्म पुष्कळच परिवर्तित झाला आहे. पूर्वी तो हिंसेची शिकवण देत होता परंतु आता तो अहिंसेची शिकवण देतो. बौद्ध धर्मातील अनेक तत्त्वे हिंदू धर्माने आत्मसात केली. प्रतिमा, चैत्य, विहार आणि भिक्षु इत्यादी दृष्टीने आज भारताला बौद्ध धर्म नसला तरी तात्त्विक रूपाने अजूनही तो भारतभर पसरलेला आहे.



# २६९

# बौद्ध धर्म ब्राह्मणी धर्माला आव्हान

सध्या अखिल मानव जातीपुढे 'नैतिक मूल्यांचा प्रश्न' हा अत्यंत निकडीचा झाला आहे, सांस्कृतिक संघर्ष, युद्धाची भाषा आणि धार्मिक ऱ्हास यांच्या विषमय वलयामध्ये अखिल मानव जात सापडली आहे. वैचारिक अराजकतेला तर सीमाच उरलेली नाही.

अशा अत्यंत, आणीबाणीच्या काळात, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी, बौद्ध धर्माचे विवेचन करताना कोलंबो येथे जी धर्मवाणी उच्चारली तिजपासून सर्व देशातील आणि विशेषतः भारतातील जनतेस खरा प्रकाश दिसेल आणि खऱ्या नैतिक मूल्याचे महत्त्वमापन केले जाईल असे मानण्यास हरकत नाही.

भारतातील बौद्ध धर्माचा उदय व अस्त या विषयावर कोलंबो येथील यंग मेन्स बुद्धिस्ट असोशिएनच्या विद्यार्थ्यांपुढे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे अत्यंत विचारप्रवर्तक व क्रांतिकारक असे दिनांक ६ जून १९५० रोजी भाषण झाले त्यावेळी ते म्हणाले,

भारतात बौद्ध धर्माचा ऱ्हास झाला असून तो जवळजवळ नष्ट झाला आहे असे म्हटले तरी मला ही गोष्ट मुळीच मान्य नाही. ऐहिक दृष्ट्या बौद्ध धर्माचा प्रसार वा चिन्हे भारतात दिसून येत नसतील आणि ती गोष्ट घटकाभर मी मान्यही करीन तथापि, आध्यात्मिक शक्ती म्हणून बौद्ध धर्म भारतात अद्यापिही ज्वलंत प्रभावाने अस्तित्वात आहे, ही गोष्ट कोणासही नाकबूल करता येणार नाही मात्र खेदाची गोष्ट अशी की, बौद्ध धर्माचा उदय कसा झाला आणि अस्त कसा झाला या प्रश्नाचा विचार अद्याप व्हावा तेवढा झालेला नाही. बौद्ध धर्माचे महत्त्व लक्षात घेता, सदर विषयाचा अभ्यास वास्तव दृष्टीने व खोलवर व्हावयास पाहिजे, अशा अभ्यासाचे महत्त्व भारतात आज तरी अधिक आहे, या विषयावर अधिकृतपणे माहिती देणारे ग्रंथ अगर इतर वाङ्मय उपलब्ध नाही हीही एक अडचणीची गोष्ट आहे.

---

जनता : १० जून १९५०.

बौद्ध धर्माचे पुनरुज्जीवन करण्यात यावे असे ज्यांना ज्यांना वाटते, त्यांच्यापुढे असा प्रश्न उभा राहतो की, बौद्ध धर्मात जर काही चिरंतन मूल्ये होती तर या धर्माचा ऱ्हास कसा झाला? या संबंधीची माहिती मिळविण्याचा माझा प्रयत्न चालू आहे. आतापर्यंत मी जमविलेल्या माहितीप्रमाणे, बौद्ध धर्माच्या उदय-अस्ताबद्दल जी अनुमाने मी बसविली आहेत ती जवळ जवळ बरोबर आहेत असेच मला वाटते.

भारतात प्रथमपासून हिंदू धर्म होता असा बहुतेकांचा समज आहे. परंतु इतिहासाच्या आधारावर या घटनेची छाननी केली तर हा समज टिकाव धरु शकत नाही. हिंदू धर्म भारतात प्रथमपासून मुळीच नव्हता. हिंदू धर्माची आज-मितीची स्थिती पाहता, तो अगदी अलिकडे निर्माण झाला आहे असेच दिसून येते. हिंदू धर्माची उभारणी स्थित्यंतरातून झालेली आहे. प्रथमतः भारतात वैदिक धर्म होता. त्यानंतर ब्राह्मणी धर्म आला आणि आता शेवटी हिंदू धर्म निर्माण झाला. अशातऱ्हेचे बदल क्रमशः घडलेले आहेत.

ब्राह्मणी धर्माच्या काळातच बौद्ध धर्माचा उदय झाला आणि ती अवस्था स्वाभाविक होती. ब्राह्मणी धर्माचा आत्मा विषमतेचा होता; तर बौद्ध धर्माचा आत्मा समतेचा होता. अर्थात, या दोन भिन्न विचार प्रणालीच्या धर्मात संघर्ष होणे अपरिहार्यच आहे. बौद्ध धर्म हा ब्राह्मणी धर्माला आव्हानासारखा होता; कारण बौद्ध धर्माचा चातुर्वर्ण्य पद्धतीस विरोध होता. फ्रेंच राज्यक्रांतीने समता प्रस्थापनेचे जे कार्य केले तेच क्रांतीकार्य बौद्ध धर्माच्या उदयामुळे घडले आहे. अशातऱ्हेने बौद्ध धर्माचा उदय कोणत्या परिस्थितीत झाला हे समजावून घेतल्यास त्याचे महत्त्व कळेल.

शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानामुळे आणि युक्तिवादामुळे बौद्ध धर्म निष्प्रभ ठरला असे अनेक लोक म्हणताना आढळतात. माझ्या मते ही गोष्ट चुकीची आहे. कारण शंकराचार्यांच्या निधनानंतर देखील अनेक वर्षे बौद्ध धर्म भारतात उत्कर्षाने वावरत होता. मला तर असे वाटते की, शंकराचार्य व त्यांचे गुरू हे दोघेही बौद्धधर्मीयच होते.

वैष्णव धर्म व शैव धर्म यांच्या भडक प्रचारामुळे बौद्ध धर्म हळू हळू नाहिसा झाला. बौद्ध धर्माचीच नक्कल या धर्मांनी केली होती. नकलेने बौद्ध धर्मास नाहीसा करण्याची ही क्लृप्ति और होती. यातच मुसलमानी स्वाऱ्याची भर पडली. अल्लाउद्दीन खिलजीने बिहारवर स्वारी केली तेव्हा त्याने

सुमारे ५,००० ते ६,००० बौद्ध भिक्कुंना सर्रास कापून काढले. त्यामुळे धाक निर्माण झाल्याने उरलेले बौद्ध भिक्कु चीन, नेपाळ व तिबेट या देशात दिसेल त्या मार्गाने पळून गेले. त्यानंतर बौद्ध धर्माचे पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न झाला. परंतु तो यशस्वी होऊ शकला नाही. कारण दरम्यानच्या काळात हिंदू धर्माचा फैलाव होऊन ९० टक्के लोकांनी हिंदू धर्माची दीक्षा घेतलीही होती.

हिंदू धर्म आचरण्यास सोपा आहे म्हणून तो राहिला आणि बौद्ध धर्म आचरण्यास कठीण असल्याने तो अस्तास गेला हे त्याचे सरळ व साधे उत्तर आहे. याशिवाय भारतातील राजकीय वातावरण जसे हिंदू धर्माला अनुकूल होते तसे बौद्ध धर्माला नव्हते हीही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे.



# २७०

# अस्पृश्यांना बौद्ध धर्माशिवाय दुसरा कोणताही अभ्युदयाचा मार्ग नाही

दिनांक ६ जून १९५० रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे दुसरे एक भाषण कोलंबो येथील टाऊन हॉलमध्ये झाले. टाऊन हॉलमधील समारंभ अखिल सिलोन दलित फेडरेशनच्या विद्यमाने घडविण्यात आला होता. सिलोनमधील दलित वर्गीयांचा प्रचंड समाज समारंभास हजर होता. या प्रसंगी करण्यात आलेल्या सत्कारास उत्तर देताना आपल्या ज्ञातिबांधवास उद्देशून डॉक्टरसाहेब म्हणाले,

सिलोन देश हा बौद्ध धर्मीयांचा देश आहे. अस्पृश्यांच्या मुक्तिचा मार्ग बौद्ध धर्माच्या स्वीकारातच आहे, अशी माझी खात्री झाली असल्याने एक तऱ्हेने तुम्ही सुदैवी देशात आहात असे मला वाटते. मला सिलोनमधील बौद्ध धर्मीय जनतेस सांगावेसे वाटते की, दलित वर्गीय बंधुंना त्यांनी दिलजमाईने बौद्ध धर्मात समाविष्ट करून घ्यावे आणि मानीव पुत्राप्रमाणे त्यांच्या हितसंबंधाचे संरक्षण करावे.

सिलोनपुरते बोलावयाचे झाल्यास, हा देश बौद्धधर्मीय असल्याने मी असेच म्हणेन की, 'अस्पृश्यांची संघटना' म्हणून तुम्ही वेगळेपणाने संघटित होण्याचे कारण नाही. भारतात दलित फेडरेशन आहे म्हणून त्याचे अनुकरण करण्याची तुम्हास आवश्यकता नाही. बौद्ध धर्मीय देशात तुम्ही स्वतःस अस्पृश्य मानण्याची आवश्यकता नाही. तुम्ही स्वतःस 'अस्पृश्य' मानावे काय व त्याप्रमाणे ओळखिले जावे की काय, या प्रश्नाचा विचार करण्याची आज परिस्थिती निर्माण झाली आहे. आम्हास राजकीय हक्क प्राप्त व्हावेत, कायदेमंडळात जागा मिळाव्यात आणि समाजाने समतेने वागवावे म्हणून भारतात आम्ही एक प्रदीर्घ राजकीय युद्ध खेळीत आहोत. तथापि आम्ही अद्यापि यशस्वी झालो नाही. या गोष्टीचा अर्थ असा की, राजकीय संग्रामातून आम्हास मुक्ती मिळालेली नाही.

---

जनता : १० जून १९५०.

गेली ३५ वर्षे मी राजकीय लढाई चालविली आहे. या लढाईत मोठमोठ्या व उच्च हिंदुंच्या तरवारीबरोबर तरवार मला भिडवावी लागली. याच काळात, जगातील सर्व धर्मांचा मी अभ्यासही केला आणि आता शेवटी एका अपरिहार्य निर्णयास मी येऊन पोहोचलो आहे. तो निर्णय हाच की, बौद्ध धर्माशिवाय अस्पृश्यांना दुसरा कोणताही मुक्तिचा मार्ग नाही. फक्त बौद्ध धर्मातच अस्पृश्यतेच्या निवारणाचा चिरकालीन उपाय आहे. जर तुम्हास, समतेचे तत्त्व हवे असेल आणि आर्थिक दास्यातून मुक्तता करावयाची असेल तर बौद्धवादाशिवाय कोठेच दुसरा आश्रय नाही.

सिलोनचे मान्यवर नागरिक बनण्याची संधी तुम्हास कायद्याने मिळालेली आहे. या कायद्यातील काही कलमांविरुद्ध तक्रार करण्यास पुष्कळ जागा आहे, हे खरे आहे. परंतु मला खात्री आहे की, भारत सरकार व सिलोन सरकार यांच्या सलोख्याने व स्नेहभावाने अन्यायी तरतुदींचे निराकरण करता येईल.



## २७१

# घटनात्मक नीतीचे काटेकोर पालन करा

भारताचे कायदेमंत्री डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे बौद्ध धर्मियांची परिषद आटोपून कोलंबोहून मुंबईस परत येत असता, ता. १० जून १९५० रोजी, त्यांचे त्रिवेंद्रम येथील लेजिस्लेटिव्ह चेंबरमध्ये भाषण झाले. चेंबरच्या प्रशस्त हॉलमध्ये सरकारी अधिकारी, सामाजिक कार्यकर्ते व अस्पृश्य बांधव यांची खूपच गर्दी होती. घटना व घटनात्मक नीती यावर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी विचार प्रवर्तक व समयोचित असे भाषण केले. ते म्हणाले,

प्रत्यक्ष घटनेपेक्षा घटनेप्रमाणे वागण्याची नीती जनतेत असणे या गोष्टीला फार महत्त्व आहे. देशात पार्लमेंटरी लोकशाहीची पद्धत यशस्वी व्हावयाची असेल तर सरकार व जनता या उभयतांनी घटनेतील काही संकेत आणि नीती यांचे पालन करणे अवश्य आहे. हे संकेत व नीती पुढीलप्रमाणे आहे :–

सरकार बनविण्याच्या पद्धतीविषयी आदर, कायद्याचे पालन, स्वतंत्र विचार करण्याची सवय व बहुसंख्यांकांच्या नियमाचे पालन.

त्याचप्रमाणे सरकारनेही पुढील गोष्टी पाळल्या पाहिजेत :–

देशातील बहुसंख्य लोकांचा आपल्यावरील विश्वास उडाला आहे, असे दिसून आल्यास घटनात्मक नीतीस अनुसरून सरकारने आपल्या अधिकारपदाचा त्याग केला पाहिजे. अल्पसंख्यांकांबद्दल आदर बाळगला पाहिजे व शेवटची गोष्ट म्हणजे राज्यशासन निःपक्षपाताने चालविले पाहिजे.

आपल्या समाजातील निरनिराळ्या लोकांची राहाणी व विचार करण्याची पात्रता या गोष्टी विचारात न घेता केवळ तात्त्विक बाजू विचारात घेऊन घटना बनविणे या गोष्टीमुळे जगातील अनेक घटना अयशस्वी ठरतात. अधिकारावर असलेल्या लोकांनी हे ध्यानात ठेवावे की, घटना करण्याचा व राज्यकारभार करण्याचा अधिकार त्यांना जो मिळालेला असतो तो काही अटींवर लोकांनीच दिलेला असतो. सरकारने चांगला राज्यकारभार करावा याच अटीवर लोकांनी त्यांना वरील अधिकार दिले असतात. त्यांना जर ही अट पुरी करता येत नसेल तर सरकारने आपली अधिकारसूत्रे खाली ठेवली पाहिजेत.

---

जनता : १७ जून १९५०.

## अल्पसंख्यांकांबद्दल आदर

अल्पसंख्यांकांबद्दल सरकारने आदर बाळगला पाहिजे. अल्पसंख्यांकांना आपली मते मांडण्याची योग्य संधी असावी. याच पायावर पार्लमेंटरी लोकशाहीची उभारणी झालेली आहे.

त्याचप्रमाणे नि:पक्षपाती राज्यकारभार चालणे अवश्य आहे. ब्रिटिश जनता कोणत्याही राजकीय पक्षाच्या लायकीचे मोजमापन त्याच्या गुणावरून करते. म्हणून एखादा पक्ष अधिकारावर आला तर त्याचे समाधान केले पाहिजे, त्याला खूष ठेवले पाहिजे, अशा वशिलेबाजीचा तेथे प्रश्नच उपस्थित होत नाही. भारतात मात्र अधिकारावर असलेला पक्ष काही लोकांना विशेष सवलती देतो असे अनेक उदाहरणांवरून दिसून आले आहे.

जुन्या घातुक प्रवृत्तीवर मात करून क्षुद्रवृत्ती आणि जातीयता यांना थारा न देता राष्ट्रात हुकूमशाही निर्माण होणार नाही व कोणत्याही प्रकारचा छळ राष्ट्रात चालणार नाही अशी खबरदारी घेऊनच लोकांनी वागावे. लोक या मार्गे लागतील अशी मला आशा आहे.



# २७२

# संघटनेनेच राजकीय शक्ती प्राप्त होणार आहे

दिनांक २१ जुलै १९५० शुक्रवार रोजी भारत सरकारचे कायदेमंत्री डॉ. बाबासाहेब आंबेडकर मनमाड मार्गाने औरंगाबाद येथे दुपारी दीड वाजता स्पेशल सलूनने आले. रोटेगाव-लासूर येथे डॉ. बाबासाहेबांचे असंख्य जनसमुदायाने मोठ्या आदराने व भक्तिभावाने स्वागत केले. स्टेशनवर पोलिसांनी सलामी (Guard of Honour) दिली.

## जनसमुदायाचे अभिवादन

दिनांक २२ जुलै १९५० शनिवार रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे २,००१ रुपयांच्या थैली कार्यक्रमास हजर राहाणार ही वार्ता सर्व शहरात विद्युतवेगाने पसरली. दहा वाजल्यापासून हजारो पुरुष-स्त्रिया शहरातून व बाहेरून सभेच्या ठिकाणी येताना दिसत होते. बाबांचे दर्शन होणार व बाबांचे भाषणही ऐकावयास मिळणार म्हणून कित्येक स्त्रियांना लहान मुलांची आठवण राहिली नाही. साडे पाच वाजता मोटार येताच असंख्य ललनांनी दुरूनच बाबांना भक्तिभावाने ओवाळले तसेच पुष्पांचाही वर्षाव केला. शिस्त राखण्याच्या कामी मुनाजी लळिंगकर व हं.शु. निकम, चाळिसगाव यांनी औरंगाबादच्या कार्यकर्त्यांना चांगली मदत केली.

## श्री. कन्नडकर मोरे यांचे निवेदन

अखिल हैदराबाद स्टेट शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन, औरंगाबादच्या विद्यमाने श्री. बी. एस. मोरे कन्नडकर यांनी आपल्या प्रास्ताविक भाषणात स्टेटमधील परिस्थिती त्रोटक शब्दात निवेदन करून दलित जनतेत स्वातंत्र्य, प्रेम व स्वाभिमान निर्माण करून दलित अस्पृश्यात माणुसकी निर्माण केल्याचे श्रेय सर्वस्वी डॉ. बाबासाहेबांनाच आहे असे सांगितले. किसान मजूर व अस्पृश्यांचा उद्धार डॉ. बाबासाहेबांशिवाय दुसऱ्याकडून होणार नाही याची परिपूर्ण कल्पना

---

जनता : ५ ऑगस्ट १९५०.

सर्वांना झाली आहे, असेही ते म्हणाले. शेवटी २,००१ रुपयांची थैली डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना सादर अर्पिण्यात आली. नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर टाळयांच्या प्रचंड कडकडाटात बोलावयास उठले, ते म्हणाले,

माझे मित्रहो आणि बंधु , भगिनींनो,

आज या ठिकाणी आपण एकत्र होऊन जी थैली अर्पण केली आहे याबद्दल मी आपला आभारी आहे. थैली अर्पण करण्याचे काही कारण नव्हते. आमिष व लोभाने मी कधी सेवा केली नाही. तुमची अल्प-स्वल्प सेवा करीत राहाणे हे माझे आद्य कर्तव्य आहे. मला थोडा फार थैल्यांचा पैका मिळाला तो मी स्वतःकरता वापरलेला नाही. गांधीस काही कोट रुपयांच्या थैल्या दिल्या गेल्या. टिळकास नऊ लाख रुपयाच्या थैल्या दिल्या गेल्या, तसे आपले मुळीच नाही.

माझ्यापासूनं तुमची निस्वार्थबुद्धीने सेवा व्हावी हीच माझी महत्त्वाकांक्षा आहे. माझे मित्र श्री. बी. एस. मोरे यांनी ज्या गोष्टी प्रास्ताविक भाषणात सांगितल्या त्या अंगावरती शहारे आणणाऱ्या आहेत. पूर्वीची परिस्थिती व आताच्या परिस्थितीत जमीन अस्मानचा फरक आहे. दौलताबादचा किल्ला बघावयास आलो असताना माझे सवंगडी पाणी पिण्यासाठी हौदावर गेले व पाणी पिऊ लागले. त्यावेळी १५-२० वर्षाच्या मुसलमान पोराने आम्हावर शिव्यांचा वर्षाव केला. त्याच काळात आम्ही औरंगाबादला आलो, असे पाहिल्यानंतर त्यावेळी येथील लोकांनी भजन करून रात्र घालविली. अन्याय सहन करीत राहाणे हा त्यावेळी तुमचा विषय होता. स्वागताध्यक्षाच्या प्रास्ताविक भाषणावरून असेच वाटते की, निजामशाहीची सावली अजून शिल्लक आहे. आगामी राजकारणात तुम्हास मोठा भाग सापडणार आहे. स्टेटमधील आपली लोकसंख्या २५ टक्के आहे. राज्यकारभारात आपण राज्यातील कारभारी होणार आहोत. लोकसत्ताक-प्रजासत्ताक राज्यातील मंत्रिमंडळात आपला एखादा प्रतिनिधी येईल. पूर्वीचा काळ गेला. येणारा काळ उज्ज्वल आहे. आपणास राजकीय शक्ती प्राप्त होणार आहे. ती संघटनेने होणार आहे. तुम्हाला जास्त पुढारी नको. जो पुढारी असेल त्याचा हुकूम ऐका.

पाणी मैदानावर पडले तर ते पसरून जाईल. डोहात पडले तर तेथे पाण्याचा संचय होईल. तद्वतच तुम्ही आपसात एकजूट ठेऊन शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्याच झेंड्याखाली या. माणुसकीचे हक्क तुम्हास आहेत.

ते कोणी हिरावून घेतले तर त्या सरकारच्याविरूद्ध दाद मागण्यासाठी राष्ट्राचे जे सुप्रीम कोर्ट आहे तिकडे जाता येते. तेव्हा घाबरण्याचे कारण नाही. एकीने वागा, हेच आज तुम्हास सांगावयाचे आहे.

२,००१ रुपयांची थैली बाबासाहेबांनी श्री. सुबय्यासाहेब यांना आगामी निवडणुकीसाठी खर्च करण्याकरिता दिली व शेवटी जयघोषात सभा संपली.



## २७३

# वकिलीच्या व्यवसायात नीतीमत्ता राखली पाहिजे

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे औरंगाबाद येथे ता. २१ जुलै १९५० रोजी दुपारी येऊन दाखल झाले. स्टेशनवर त्यांच्या स्वागताकरिता तालुकेदार श्री. गोविंदराव देशपांडे, पोलीस सुपरिंटेंडेंट श्री. हरिश्चंद्र, इतर अधिकारी, स्थानिक पुढारी, वकील व शे. का. फेडरेशनचे हजारो लोक उपस्थित होते.

## गार्ड ऑफ ऑनर

हार अर्पण करण्यात आल्यावर डॉ. बाबासाहेब आंबेडकर खाली उतरले व स्थानिक पोलीस दलाची सलामी स्वीकारून गार्ड ऑफ ऑनरची पाहाणी केली. त्यानंतर त्यांना अनेक घोषणांच्या निनादात शे.का.फे. च्या लोकांनी हार अर्पण केले.

यानंतर डॉ. आंबेडकर हे प्रिन्सिपाल चिटणीस व श्री. चित्रे यांच्यासह पीपल्स एज्युकेशन सोसायटीच्या इमारतीकडे रवाना झाले व पाहाणी करून सलूनमध्ये परत आले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी कॉलेजच्या समारंभाला उपस्थित राहून कॉलेजच्या नवीन इमारत बांधण्याच्या जागेची पाहाणी केली. इमारतीची कोनशिला बसविण्याचा समारंभ डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या हस्ते होणार आहे.

## कोर्टाला भेट

ता. २३ रोजी त्यांनी नवीन कॉलेजची जागा पाहिल्यावर येथील सेशन्स कोर्टाला भेट दिली. सेशन्स कोर्टाचे जज्ज श्री. चंद्रकांत गोडसे यांनी त्यांचे स्वागत करून त्यांनी कोर्ट व बार असोसिएशन फिरून दाखविले.

यानंतर डॉ. साहेबासंबंधी बोलताना डॉ. आंबेडकर हे आधुनिक मनू आहेत, असे उद्‌गार गोडसे जज्जनी काढले. यानंतर डॉक्टरसाहेबांनी मुनसिफ कोर्टातील उर्दूमधून चालणारे कामकाज ऐकले. या कामकाजाला उद्देशून डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

उर्दूमधील कामकाज मला कळले नाही तरी ते समाधानकारक असले पाहिजे असे माझे मत बनले आहे.

---

जनता : २९ जुलै १९५०.

कोर्टातील भाषा कोणती राहावी याच्या विचाराने माझे मन व्यग्र होते. काही लोक म्हणतात कोर्टाची भाषा हिंदी राहावी ; तर काहींच्या मते ती इंग्रजी राहावी. स्थानिक भाषातून कायद्यातील शब्द व्यक्त करता येत नाहीत, असा अनुभव आहे. उदाहरणार्थ इक्विटीला योग्य असा शब्द नाही. याकरिता स्थानिक भाषा कोर्ट भाषा होणे सर्वांनाच फायदेशीर होणार नाही. त्यामुळे राज्यकारभारात कितीतरी अडचणी उद्‌भवतील. अर्थात राष्ट्रीय भाषा कार्यक्षम झाल्यावर तिला तिचे योग्य स्थान मिळेलच.

मला वकिलीचा धंदा फार आवडतो. पण या धंद्याविषयी लोकात आदर नाही. भारतात वकिलावर कित्येक आरोप केले जातात. मध्यवर्ती सरकारातून मुक्तता झाल्यावर मी वकिलीलाच वाहून घेणार आहे. आज या देशात लायक असे वकील थोडेच आहेत आणि लायक वकील नसतील तर खात्याची अधोगती होईल. आज या धंद्याला अवनत कळा आली आहे. याचे एक कारण म्हणजे या धंद्यात काम करणारे लोक निवृत्त होऊन तरुण वकिलांना संधी देत नाहीत. अर्थात धंद्याची प्रतिष्ठा राहावी म्हणून तरुण वकिलांना संधी दिली जाणे अवश्य आहे.

यानंतर या धंद्यात काही झाले तरी नीतीमत्ता राखली पाहिजे असे सांगून, त्यांनी कायदे पंडितांनी स्वातंत्र्य, हेबीअस कॉर्पस व इतर कामकाजाचे महत्त्व ओळखून राष्ट्राची सेवा करावी अशी सूचना केली.



## २७४

# विद्यार्थ्यांनो, शूर व धैर्यशील व्हा !

आज दिनांक २३ जुलै १९५० रोजी औरंगाबाद येथील पीपल्स एज्युकेशन सोसायटीच्या कॉलेजच्या समारंभास डॉ. बाबासाहेब आंबेडकर उपस्थित होते. समारंभाकरिता नागरिक व विद्यार्थी उपस्थित होते.

कॉलेजचे प्रिन्सिपाल डॉ. चिटणीस यांनी डॉ. आंबेडकरांचे स्वागत करून त्यांना हार घातल्यावर डॉ. आंबेडकरांचे भाषण झाले. आपल्या भाषणात कॉलेज आपली उच्च परंपरा राखील असे आश्वासन देऊन विद्यार्थ्यांना शूर व धैर्यशील व्हा असा उपदेश केला.



जनता : २९ जुलै १९५०.

# २७५
# भारतीय घटनेच्या मार्गदर्शक तत्त्वावर आधारित सर्वांसाठी मुलकी कोड हवा

डॉ. बाबासाहेब आंबेडकर दिनांक १ डिसेंबर १९५० रोजी श्री. दास यांच्या प्रश्नाला उत्तर देताना म्हणाले,

लोकसभेत ठेवण्यासाठी मुस्लिम कोड बिल तयार करण्याचा सरकारचा विचार चालू नाही. सर्वांना लागू होईल, असे भारतीय घटनेच्या मार्गदर्शक तत्त्वावर (डायरेक्टिव प्रिन्सिपल्स) आधारलेले मुलकी कोड तयार करावे अशी माझी फार फार इच्छा आहे. पण मला तेवढा वेळच मिळत नाही.

• • •

---

जनता : २ डिसेंबर १९५०.

# २७६

# बौद्ध धर्म हा पुन्हा या देशाचा धर्म होईल

वरळी, मुंबई येथील बुद्धदूत सोसायटीच्या विद्यमाने भरविण्यात आलेल्या मेळयास मध्यवर्ती सरकारचे कायदेमंत्री डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी रविवार तारीख १४ जानेवारी १९५१ रोजी सायंकाळी ६ वाजता भेट दिली.

दर्शनोच्छुक समाज संध्याकाळी ४ वाजल्यापासून सभामंडपात व भोवताली सापडेल त्या जागेवर गर्दी करून उभा होता. अखेरिस बरोबर ६ वाजता बाबासाहेब सभामंडपात आले आणि '' बाबासाहेबांच्या जयजयकाराने '' भोवतालचा विभाग गरजला. पुष्पमालिकांनी स्वागत केल्यानंतर प्रो. भागवत जमलेल्या ६ हजार जनसमुदायास उद्देशून म्हणाले, '' बुद्धाबद्दल आणि त्यांनी जगास दिलेल्या अद्वितीय धर्माबद्दल एकंदर जनतेस माहिती व्हावी या हेतूने हा बुद्धमेळा भरविण्यात आला आहे. चार महिन्याच्या अगोदर हा विहार अपुरा बांधलेला होता व लवकरच हे बांधकाम सुरू करता येईलं की नाही याबद्दल आमचा आम्हाला भरवसाही नव्हता ! पण बाबासाहेबांनी ४ महिन्यांपूर्वीच विहारास भेट दिली आणि काय आश्चर्य ! इतके दिवस पडून असलेले बांधकाम सुरू झाले. आणि आता ते पूर्ण होण्याच्या मार्गावर आहे. हा फक्त बाबासाहेबांच्या आशिर्वादाचा प्रभाव आहे. काही काही माणसाचा प्रभावही असा असतो. त्यांनी हातात माती घेतली तर तिचे सोने होते, जी काही कामे बाबासाहेबांनी हातात घेतली ती सर्व कामे सर्वांगसुंदर वठली आहेत. उदाहरणार्थ सिद्धार्थ कॉलेज इत्यादी.'' गौतम बुद्धाबद्दल बाबासाहेब एक पुस्तक लिहित असल्याचेही त्यांनी सांगितले.

बरोबर ६.१० ला बाबासाहेब भाषण करायला उठल्याबरोबर टाळ्यांचा अतिप्रचंड कडकडाट झाला व पुनश्च जयघोषाने वातावरण बराच वेळ दुमदुमून गेले, बाबासाहेब म्हणाले,

प्रिय भगिनींनो आणि बंधुजनहो,

मी या ठिकाणी उपस्थित झालो आहे तो तुमच्यापुढे व्याख्यान देण्याकरिता नव्हे. मला वाटले हा मेळा संपलासुद्धा असेल, पण काल माझे मित्र प्रो. भागवत मला भेटले व त्यांनी सांगितले की मेळा पुष्कळ दिवस चालणार आहे. मला इथे येण्याइतका वेळ नव्हता; पण लोकांच्या आग्रहामुळे मला नाही म्हणता आले नाही आणि मी हजर झालो. अशा समारंभाला हजर राहाण्याचे परिणाम काय

---

जनता : २० जानेवारी १९५१.

होतात हे मला चांगल्या तऱ्हेने माहीत आहे. मी आपणापुढे बोलण्यासाठी कसलीही पूर्व तयारी करून आलो नाही.

शतकानुशतके धर्माचा दिवस मानायचा झाला तर तो कोणता मानावा ? तर असे वाटेल की शिवरात्र मानावी. राम जयन्ती वा कृष्ण जयन्ती मानावी. हिंदू धर्माच्या संस्कृतीने नियोजित केलेल्या दिवसाशिवाय दुसरा दिवस आमच्या मनात येत नाही. बुद्धाचा दिवस मानावा ही भावना कोणाच्याही मनात येत नाही ! आश्चर्य आहे ! असे का व्हावे, याचे कारण समजत नाही.

बुद्ध या देशात ८० वर्षे जगला. या देशात त्याने आपल्या आयुष्याची ४५ वर्षे प्रचारात घालविली. आज जशी शंकराचार्याला मोटार आहे तशी त्याच्या जवळ मोटार नव्हती. साधा गाडीघोडाही नव्हता. वाहतुकीचे एकही साधन त्याला उपलब्ध नव्हते. तरीपण देश कल्याणाकरिता तो जम्मूपासून कन्याकुमारीपर्यंत अक्षरशः पायी फिरला. १२०० वर्षापर्यंत बुद्धधर्म या देशात चालू होता. ज्याने भिक्षा मागून आपले जीवन जगविले, अनंत हाल सोसले, त्याचे नावही या देशात निघत नाही.

केव्हा केव्हा खोट्याचा जय होतो, खऱ्याचा जय होत नाही. तसाच काहीसा हा प्रकार आहे. पण सर्वांनी ध्यानात ठेवावे की सत्याचाही केव्हातरी जय होईलच. आणि आज ती वेळ आली आहे. १२०० वर्षांचा धर्म पुनरपि या देशाचा धर्म होईल, अशी माझी खात्री आहे. (प्रचंड टाळ्या)

हिंदू धर्म एका नाल्यासारखा आहे. दोन नाल्यांचा मिळून संगम होतो व त्याचा तिसरा नाला बनतो. तसा हिंदू धर्म त्या नाल्यासारखा झाला आहे. एका नाल्यातले पाणी स्वच्छ असते व दुसऱ्यातील घाणेरडे असते. या दोहोंचा संगम घाणेरडा, तसेच हिंदू धर्माच्या नाल्यात दोन तऱ्हेचे पाणी वाहून आले आहे. स्वच्छ असा बौद्ध धर्माचा नाला आणि ब्राह्मणी धर्माचा गलिच्छ नाला. या दोहोंच्या संगमामुळे हिंदू धर्माचा नाला घाणेरडा झाला आहे. त्यातील घाणेरडे आणि स्वच्छ पाणी निराळे केले पाहिजे. तरच घाण साफ करता येईल.

येथील भिक्षुमित्राने सांगितले की, पुष्कळ लोकांना दीक्षा घ्यावीशी वाटते पण त्यांना मी सांगितले की बौद्ध होणे सोपे नाही. म्हणून मी आणि माझे लोक मिळून आम्ही काही नियम करणार आहोत. ते नियम जे लोक पाळतील त्यांनाच दीक्षा दिली पाहिजे. बुद्ध धर्माची दीक्षा घेतल्यावर तुम्हाला हिंदू धर्मातील मते आणि दैवते बुद्ध धर्मात आणता येणार नाहीत. घरात खंडोबा व बाहेर बुद्ध हे चालणार नाही.

शिवाय ज्या हिंदुलोकांना बौद्ध दीक्षा घ्यावयाची असेल त्यांनी हिंदू धर्माच्या दुष्कृत्यांचा त्याग केला पाहिजे. जातीला मानणारे लोक बौद्ध होतात व बौद्ध धर्माचा ब्राह्मणी धर्म बनवतात व बौद्ध धर्माचे मुळच नाहीसे करतात. सर्व वाईट चाली बरोबर घेऊन तुम्हाला बौद्ध धर्मात येता येणार नाही.

ज्यांना सवड असेल त्यांनी येथे यावे व बौद्ध धर्म शिकावा व त्यानंतर त्याचा स्वीकार करावासा वाटला तर करावा. नाही तर बारा भाईची खिचडी करून चालायचे नाही. फक्त बुद्ध धर्मच पाळा इतर काही नाही.

हल्ली धर्माला ग्लानी आली आहे. पण मी म्हणतो की धर्माची सर्वांनाच आवश्यकता आहे. माझ्या मते एक गोष्ट निश्चित आहे. धर्माशिवाय समाज जगणार नाही आणि तो धर्म बौद्ध धर्मच पाहिजे. समता, प्रेम, बंधुभाव या सर्व गोष्टी जगाच्या उद्धाराकरिता आवश्यक असतील तर त्या बुद्ध धर्मातच सापडतील. मी आज २० वर्षे प्रत्येक धर्माचा अभ्यास केला आहे. सर्व धर्माचा अभ्यास केल्यावर जगाला बौद्ध धर्मच स्वीकारायला पाहिजे, असे माझे मत झाले आहे.

विचार करा ! हा देश एका काळी सुसंस्कृत झाला होता म्हणून सांगतात. मग ५ कोटी अस्पृश्य त्यात कसे निपजले ? जवळ जवळ ५/७ कोटी लोकांना चोऱ्यामाऱ्या करण्याव्यतिरिक्त दुसरा जीवनमार्ग नसावा, हे कसे झाले ? अस्पृश्यता सांगणारा जगात एकही धर्म नाही. त्या काळच्या व आजच्या सुसंस्कृत पुढाऱ्यांनी प्रयत्न का केला नाही. चोऱ्यामाऱ्या करून जगणारी जात ज्या संस्कृतीत पैदा होते तिला सुसंस्कृती म्हणता येईल काय ? असल्या जमातींना सुधारण्याचा लोकांनी प्रयत्न केला नाही त्याअर्थी तीत काही तरी वैगुण्य निश्चित आहे. या हिंदू धर्मात ५ कोटी अस्पृश्य आणि ५-१० कोटी लोक चोऱ्यामाऱ्या करणारे का आहेत ? कारण या धर्मात दोष आहेत.

हे नवीन कार्य पारखून बघा, त्याचा अभ्यास करा; त्यात सामील व्हा ! या सुमंगल कार्यात आपण सामील झालात म्हणून मी तुमचे अभिनंदन करतो.



## २७७
# अस्पृश्य समाजावर होणाऱ्या जुलूमांना दलित प्रतिनिधींनी वाचा फोडली पाहिजे

भारत सरकारचे कायदेमंत्री आणि दलित वर्गाचे पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी रविवार दिनांक १५ एप्रिल १९५१ रोजी संध्याकाळी दिल्ली येथे म्युटिनी रोडवरील आंबेडकर भवनाच्या पायाचा दगड बसविला. या कार्यक्रमाचे दळणवळण मंत्री श्री. रफी अहमद किडवाई अध्यक्ष होते.

या प्रसंगी बोलताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

ब्रिटिश राजवटीत दलित वर्गाला जेवढे संरक्षण होते तेवढे स्वतंत्र भारताच्या राष्ट्रीय सरकारच्या कारकीर्दीत नाही, असे मला दुःखाने म्हणावे लागत आहे. ब्रिटिश राजवटीत नोकऱ्यात दलित वर्गाला बारा टक्के प्रतिनिधीत्व देण्याच्या ठरावाची पूर्ण अंमलबजावणी होत होती; पण आता त्या ठरावाला कागदाच्या साध्या कपट्याएवढी किंमत उरली आहे.

लोक म्हणतात आपल्याला स्वातंत्र्य मिळाले पण दलित वर्गाला स्वातंत्र्य मिळाल्याचे मानायला मी तयार नाही.

पंजाबमध्ये आमच्या लोकांवर वाईटात वाईट जुलूम होत आहे. अशा जुलूमाने गांजलेले चाळीस लोक दिल्लीला आले आणि त्यांनी राजघाटावर प्राणांतिक उपास आरंभला. दिल्लीच्या वर्तमानपत्रांनी या बातमीवर संपूर्ण बहिष्कार टाकला. या लोकांनी सुमारे तीस दिवस उपास केला; पण आपल्याकडे कोणाचेच लक्ष जात नसल्याचे पाहून त्यांना परत फिरावे लागले. माझी खात्री आहे की, जी वर्तमानपत्रे यावेळी मूग गिळून बसली होती त्यांनीच दिल्लीमध्ये एखाद्या म्हाताऱ्या बाईने जर उपास केला असता तर ती बातमी मोठमोठे मथळे देऊन प्रसिद्ध केली असती. वर्तमानपत्रे अस्पृश्यांची दखल घेत नाहीत.

पंजाबमध्ये शिखांनी आणि इतरांनी अस्पृश्य स्त्रियांना पळविल्याच्या बातम्या आहेत. दलित वर्गाच्या लोकांवर अनेक प्रकारचे जुलूम करण्यात येत आहेत. ग्रामीण भागात त्यांना ' शामलात ' जमिनी विधी करू देण्यात येत नाहीत, लाकडे तोडू देण्यात येत नाही.

---

जनता : २१ एप्रिल १९५१.

दलित वर्गाचे प्रतिनिधीत्व करण्याची ज्यांच्याकडून अपेक्षा करावी असे दहा सभासद पंजाबच्या विधिमंडळात आहेत. लोकसभेत गेली दोन वर्षे माझ्यासमोर असे तीस सभासद बसत असतात. त्यांच्यापैकी कोणालाही मी दलित वर्गाच्या कल्याणाबद्दल किंवा त्या वर्गावर होणाऱ्या जुलूमाविरूद्ध एकही प्रश्न विचारताना पाहिलेले नाही. लोकसभेत सध्या अंदाजपत्रकावर चर्चा चालू आहे. अन्न, चलनवाढ, कापडाची आणि साखरेची टंचाई याबद्दल सरकारवर टीका करण्याची संधी कोणी दवडत नाही. पण पंजाबमध्ये अस्पृश्य समाजावर जो जुलूम होत आहे त्याबाबतीत काय करीत आहा ? असा प्रश्न कोणीही विचारलेला नाही.

असे हजार जरी सभासद लोकसभेत असले तरी दलित वर्गाचा काय फायदा होणार आहे ? हे मुके लोक काय करू शकणार आहेत ? मी एक मंत्री असल्यामुळे माझ्या तोंडाला कुलूप लागले आहे. मी सरकारात नव्हतो तेव्हा जुलूमाविरुद्ध-जबरदस्तीविरुद्ध आवाज उठवीत असे. त्यावेळी मी कोणताही अन्याय सरकारच्या नजरेस आणू शकत असे. आता माझ्या तोंडाला कुलूप बसले आहे आणि ज्या सभासदांकडून दलित वर्गाचे मन बोलून दाखविण्याची अपेक्षा करावी ते सुद्धा गप्प बसतात.

देशाच्या निरनिराळया भागातून दलित वर्गाचे हजारो लोक दिल्लीला मदत मिळविण्यासाठी येतात आणि यासाठी आंबेडकर भवनात व्यवस्था करण्यात येणार आहे. हे भवन सवर्ण हिंदुंकडून एक कपर्दिकही न घेता दलित वर्गाने स्वतःच्याच हिंमतीवर उभारावयास पाहिजे.

गांधीजींनी अस्पृश्योद्धाराची चळवळ हाती घेतल्यापासून सवर्ण हिंदुंच्या दृष्टिकोनात फरक पडला आहे हे मला मान्य आहे. पण पं. शर्मा यांच्यासारख्या मित्राची सहानुभूती जरी मौल्यवान असली तरी आपल्याला आपल्या ताकतीवरच अवलंबून राहिले पाहिजे. भुकेलेल्या माणसाला भाकरी हवी असते, नुसती सहानुभूती नको असते. आपण जर एकजुटीने उभे राहिलो तर आपल्या हितचिंतकांच्या मदतीने आणि सहकार्याने आपण आपली परिस्थिती सुधारू शकू.

पूर्वी मध्यवर्ती सरकारच्या कचेरीत एकही दलित वर्गातील माणूस नव्हता. अस्पृश्याला पट्टेवाला सुद्धा होता येत नसे. त्यानंतर आपल्या प्रयत्नांना यश येऊन नोकऱ्यांमध्ये दलित वर्गासाठी प्रमाण ठरविण्यात आले. त्यांच्या शिक्षणासाठी सालीना तीन लाख रुपये मंजूर करण्यात आले.

भवनाला आपले नाव देण्याच्या कल्पनेबद्दल डॉ. आंबेडकरांनी नापसंती व्यक्त केली. नाव बदलले तर आपल्याला फार आनंद होईल असेही त्यांनी आपल्या भाषणात सांगितले.



## २७८

# बुद्धाने वर्णाश्रम धर्म नाकारला

दिल्ली शेड्यूल्ड कास्ट्स् वेलफेअर असोसिएशन आणि भारतीय महाबोधी सोसायटी यांच्या विद्यमाने नवी दिल्ली येथे दिनांक १९, २० व २१ मे १९५१ रोजी ' बुद्ध जयंती ' मोठ्या स्वरूपात साजरी झाली.

शनिवार दिनांक १९ रोजी दिल्लीत फार मोठी मिरवणूक निघाली होती. रिडींग रोड वरील बुद्धमंदिराजवळून मिरवणूक निघून आयर्विन रोड, कॅनॉट सर्कल, पुंचकिन रोड वगैरे रस्त्याने जाऊन दिल्ली शेड्यूल्ड कास्ट्स् वेलफेअर असोसिएशनच्या आंबेडकर भवनाजवळील मैदानात विसर्जन पावली.

रविवार तारीख २० ला एक टोलेजंग सभा झाली. या सभेचे अध्यक्षस्थान फ्रान्सचे भारतातील वकिलांच्याकडे होते. या सभेत फिनलँडचे भारतातील प्रतिनिधी ने. ना. ह्यागो वॉलव्हन, बर्माचे कौन्सल जनरल ने. ना. टिन मॉंग गी; सिलोनचे हायकमिश्नर ने. ना. कुमारस्वामी, नागपूरचे प्रो. कुलकर्णी उपस्थित होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

अध्यक्ष महाराज, बंधु आणि भगिनींनो,

आपल्याला इथे आल्यास दोन तीन तास झाले असतील आणि साहजिकच आपल्याला घरी जाण्याची ओढ लागली असेल, हे जाणून मी अधिक वेळ घेणार नाही. तशात माझ्याआधी पाच सहा वक्त्यांनी भगवान गौतम बुद्धाच्या चरित्रावर बरेचसे सांगितले आहे. मला जे काही सांगावयाचे आहे ते सर्व आजच सांगितले पाहिजे असे नाही. कारण आजच्यानंतर पुन्हा आपण भेटणार नाही, असे काही नाही. आपण पुनःपुनः भेटणार आहोतच. तरीही मी काहीतरी सांगावे असा बहुतेकांचा आग्रह असल्यामुळे थोडेसे का होईना पण बोलले हे पाहिजेच.

माझी अशी इच्छा आहे की, भारतातील साऱ्या अस्पृश्यांनी बुद्धाची शिकवण आत्मसात करून त्याप्रमाणे आचरण ठेवायला पाहिजे. गेल्या वर्षी बुद्ध जयंतीकरता आपण इथे गोळा झालो होतो. त्यावेळी इतका मोठा जमाव नव्हता; पण आजचा हा अफाट जनसमुदाय पाहून एक वर्षात लोकांमध्ये एवढी गोडी निर्माण झाली याबद्दल मला समाधान वाटते. शिवाय अस्पृश्यांच्या बातम्यांना विशेष जागा न देणाऱ्या वर्तमानपत्रात कालच्या टोलेजंग मिरवणुकीबद्दलची बातमीही मला वाचायला मिळाली. आपण केलेली प्रगती ही प्रशंसनीय आहे.

---

जनता : २६ मे १९५१.

बुद्ध जयंती साजरी करणे ही काही फार मोठी बाब नाही. कारण थोरामोठ्यांच्या कर्तबगारीबद्दल आदर बाळगणे योग्यच असते. परंतु आपण बुद्ध जयंती साजरी करतो ती एवढ्याचसाठी की, भारतातील सामाजिक अध:पतन नाहिसे व्हावे. म्हणून बुद्धाच्या शिकवणुकीचा अंगीकार करण्यास लोकांना सांगण्यापूर्वी बौद्ध धर्म आणि हिंदू धर्म यातील फरक नीट समजावून सांगायला हवा. चातुर्वर्ण्य, मूर्तिपूजा व आध्यात्मिक तत्त्वे या स्वरूपात सामाजिक भेदभावावर हिंदू धर्म आधारलेला आहे. लोकांच्या सामाजिक अध:पातास व राष्ट्राच्या ऱ्हासास कारणीभूत झालेल्या ब्राह्मणशाहीत व सध्याच्या हिंदू धर्मात मला तरी काहीच फरक दिसत नाही. हिंदू धर्मात शांती, एकी नाही आणि याचे कारण चातुर्वर्ण्यावर आधारभूत झालेली हिंदू धर्माची इमारत, ही गोष्ट आज बहुतेक हिंदू मान्य करीत आहेत. परंतु ही चातुर्वर्ण्याची चौकट मोडायची कशी, हिंदू धर्मात शांती आणि एकीची प्रस्थापना करायची कशी, हा मार्ग कुणीच जाणत नाही. योग्य-अयोग्याचा विचार करून अयोग्याचा त्याग न करण्यास कारण एकच की, या अयोग्यामुळे-चातुर्वर्ण्यामुळे हिंदुंचा दर्शनी फायदा होतो.

मला सर्व हिंदुंना हेच सांगायचे आहे की, त्यांनी ही वर्णाश्रमपद्धती झुगारून जुन्या कोत्या समजुती समूळ उडवून टाकल्या पाहिजेत. पण हे व्हावं कसं ? कारण ते वेदाची आज्ञा प्रमाण मानतात आणि वेदात ही वर्णाश्रम पद्धती उचलून धरण्यात आली आहे. धर्म सुधारला पाहिजे, अशी नुसती भाषा बोलून भागायचं नाही. त्याकरिता आचार-विचारातील आमूलाग्र फरक प्रत्यक्षात उतरला पाहिजे. त्याशिवाय सुधारणेची आशाच करावयाला नको.

बुद्ध धर्माचा द्वेष करणाऱ्या ब्राह्मणांना मला असे विचारायचे आहे की, बुद्धाला सुरवातीला जे भिक्खू शिष्य मिळाले ते कोण होते ? यातील शेकडा नव्वद टक्के ब्राह्मण होते. काही हिंदुंचे म्हणणे असे की, बुद्ध धर्माचा स्वीकार करावयाचा असलां तर करावा पण असे करताना ब्राह्मणशाहीला शिव्या का ? याचे उत्तर सोपे आहे. वर्णाश्रमावर आधारभूत असलेल्या ब्राह्मणशाहीवर, हिंदू धर्मावर प्रहार केला नाही, त्याचे खरे स्वरूप उघड केले नाही तर बुद्ध धर्माच्या प्रसारात, प्रगतीच्या मार्गात ती एक मोठी धोंड होऊन बसेल. स्वच्छ पाणी आणि घाण पाणी या दोन प्रवाहांना एकत्र वाहू दिले तर स्वच्छ पाणी घाण होऊन जाईल. तद्वत बौद्ध धर्माच्या शुद्ध तत्त्वाच्या बरोबरच हिंदू धर्माचे घाण पाणी वाहू देता कामा नये.

बुद्ध धर्माप्रमाणे हिंदू धर्मातही अहिंसेवर भर देण्यात आला आहे ही गोष्ट खरी, परंतु वर्णाश्रम पद्धती हा हिंदू धर्माचा पाया बनविला गेल्यामुळे ती एकच बाब

हिंदू धर्माचा धिक्कार करण्यास पुरेशी आहे. हिंदू धर्मात आज जिकडेतिकडे ढोंग माजून राहिले आहे. ब्राह्मण लोक देवळात राहतात. कारण तेथे त्यांना ऐषआरामी जीवन व्यतीत करायला मिळते म्हणून, देवाची भक्ती करायला नव्हे. गेल्या वर्षी सिलोनवरून परत येताना मी मद्रासला गेलो होतो. त्यावेळी तिथल्या बऱ्याचशा हिंदुंनी मला देवळे पाहाण्याची विनंती केली. मला आश्चर्य वाटले; मी गेलो. मी देवळे हिंडून पाहिली. तिथे हे ब्राह्मण लोक मूर्तिपूजा करायचे आणि धूप कापूर जाळायचे. या पलिकडे दुसरा कसलाच उद्योग करीत नाहीत असे कळले. हा त्यांचा एक महत्त्वाचा उद्योग झाला ! दुसरा उद्योग मला कळला तो हा की त्यांना फार ' भोजन ' खावं लागतं. सकाळचे भोजन, दुपारचे भोजन, संध्याकाळचे भोजन ! या भोजनाचा मात्र फार मोठा उद्योग ते लोक करतात. मी त्यांना विचारले की त्यांचे हे सगळे चालते कसे ? त्यावर मला उत्तर मिळाले की मद्रास सरकारकडून त्यांना दीड लाख रुपयांची वार्षिक ग्रँट मिळते. काही देवळातून सोन्याचांदीच्या मूर्ती आढळल्या. काहींच्या किंमती तर कोटी रुपयांनीच करता येतील. एकीकडे देशात अन्नान्नदशा, लोक पैशाला महाग झाले आहेत आणि दुसरीकडे अन्नाची लयलूट आणि पैशाची खैरात ! आणि हे सर्व हिंदू धर्माच्या या अध्वर्युकरिता ! का नाही हे लोक हिंदू धर्माचा उदोउदो करतील !

धर्म शुद्ध तत्त्वावर आधारित असला पाहिजे. बुद्धाचा वर्णाश्रम पद्धतीवर कधीच विश्वास नव्हता. ' आपण सर्व सारखेच आहोत ' ही गोष्ट आपण कधीच विसरता कामा नये. माणसा-माणसात कसलाच भेदभाव नाही. जन्माने उच्चनीच कोणीच असू शकत नाही. उच्चनीचता करणीने प्राप्त होते. या गोष्टी बुद्धाने सांगितल्या आहेत. जर लोक पुन्हा बौद्ध धर्माचा अंगीकार करतील तर हा देश पुन्हा वैभवाप्रत गेल्यावाचून राहाणार नाही. एरव्ही दुसऱ्या कोणत्याही मार्गाने जातीभेद जाणे शक्य नाही. परंतु खरोखरच कोणाला जाती मोडायच्या असतील तर त्यांनी बौद्ध धर्माचा स्वीकार करावा ; हाच एक उपाय आहे.

परंतु आपण कसलीही घाई न करता हळूहळू आपले साध्य साधू. जुनी माणसे ज्यांच्या हाडीमासी हिंदू धर्म भिनून राहिला अशांना हिंदू धर्म ताबडतोब सोडा, असे आपण म्हटले तर त्यांना ते जमणार नाही आणि मीही त्यांना तसे काही सांगणार नाही, परंतु तरुणांच्याबद्दल मात्र मला दांडगा आत्मविश्वास आहे. योग्य त्या मार्गाने जाऊन आपला, समाजाचा व राष्ट्राचा उत्कर्ष ते खचित साधतील.

● ● ●

# २७९

# आमच्या सर्व सामाजिक दुखण्यांवर उच्च शिक्षण हेच औषध

पीपल्स एज्युकेशन सोसायटीद्वारा संचालित औरंगाबाद येथील मिलींद महाविद्यालयाच्या इमारतीची कोनशिला भारताचे प्रथम राष्ट्रपती डॉ. राजेन्द्रप्रसाद यांच्या हस्ते १ सप्टेंबर १९५१ रोजी बसविण्यात आली. याप्रसंगी डॉ. राजेन्द्रप्रसाद यांनी, डॉ. आंबेडकर अस्पृश्य आणि गोरगरिब समाजात करीत असलेल्या शिक्षण प्रसार प्रचार कार्याबद्दल गौरवोद्गार काढून कौतुक केले. पीपल्स एज्युकेशन सोसायटीच्या ध्येय आणि उद्दीष्टांची त्यांनी प्रशंसा केली. राष्ट्रपतींनी प्रत्यक्ष कोनशिला बसवण्यापूर्वी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी भाषण केले. ते म्हणाले,

अध्यक्ष महाराज,

ज्या कॉलेजची कोनशिला बसविण्याची मी तुम्हाला विनंती करीत आहे ते हे कॉलेज १९ जून १९५० रोजी अस्तित्वात आले आहे. हे कॉलेज सुरू करून त्याचा एकंदर कारभार पाहाणाऱ्यांबद्दल आणि कॉलेज का सुरू करण्यात आले याबद्दल आजच्या प्रसंगी दोन शब्द सांगितले तर ते अनाठायी होणार नाही, असे मला वाटते. ' पीपल्स एज्युकेशन सोसायटी, मुंबई ' या संस्थेने हे कॉलेज चालविले असून या संस्थेचे अध्यक्षपद माझ्याकडे आहे. ही सोसायटी १९४५ मध्ये स्थापन करण्यात आली. साधारणपणे देशभर आणि मुख्यत्वे मागासलेल्या वर्गात उच्च शिक्षणाचा प्रसार करणे हे या संस्थेचे ध्येय व उद्दिष्ट आहे. याच ध्येयानुसार मुंबईत १९४६ साली ' सिद्धार्थ ' या नावाचे एक कॉलेज उघडण्यात आले; आणि मला सांगायला आनंद वाटतो की, अवघ्या चार वर्षांच्या अवधीत विद्यार्थ्यांची संख्या, देशी विदेशी खेळ आणि शैक्षणिक दर्जा या सर्वच बाबतीत सिद्धार्थ कॉलेजने मुंबई राज्यात महत्त्वाचे स्थान पटकावले आहे. या कॉलेजमध्ये ८०० विद्यार्थी आहेत. दुसरीकडे विद्यार्थ्यांची एवढी मोठी संख्या क्वचितच आढळेल. आंतर कॉलेज खेळांच्या सामन्यात असा एकही प्रकार सापडणार नाही की, ज्यात सिद्धार्थ कॉलेजने विजय मिळविला नाही. मुंबई विश्वविद्यापीठाच्या नामांकित शिष्यवृत्त्या किंवा बक्षिसेही कॉलेजने हातून जाऊ दिलेली नाहीत. सिद्धार्थ कॉलेजच्या या उज्ज्वल परंपरेबद्दल पीपल्स एज्युकेशन सोसायटीला साहजिकच अभिमान वाटतो.

---

जनता : १५ आणि २२ सप्टेंबर १९५१.

मुंबईत चालविलेल्या या कॉलेजच्या या चार वर्षांच्या अनुभवाने उत्तेजित झाल्यामुळेच आपल्या कार्याचा पसारा इतर ठिकाणी आपण वाढवू शकू असे पीपल्स एज्युकेशन सोसायटीच्या गव्हर्नींग बॉडीला वाटले.

हे कॉलेज उघडण्यासाठी हैद्राबाद संस्थानाचीच का निवड करण्यात आली, असे कदाचित विचारण्यात येईल. याचे कारण अगदी साधे आहे. शिक्षणाच्या बाबतीत हैद्राबाद संस्थान बरेच मागासलेले आहे आणि उच्च शिक्षणाच्या बाबतीत तर अगदीच मागासलेले आहे. हैद्राबाद संस्थानचे क्षेत्रफळ चौऱ्यांशी हजार चौरस मैल असून एक कोटी साठ लक्ष लोकसंख्या आहे. मार्च १९४९ मध्ये संस्थानात एकूण १७ कॉलेजेस होती. कॉलेजचे शिक्षण घेणाऱ्यांची संख्या ७,६१५ होती. या आकड्यांची मुंबई राज्यातील स्थितीशी तुलना करू या. मुंबई राज्याचा विस्तार एक लक्ष पंधरा हजार पाचशे सत्तर चौरस मैल आहे आणि लोकसंख्या ३.२३ कोटी आहे. ३१ मार्च १९५० रोजी त्यातील कॉलेजेसची संख्या ९० आणि त्यात शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या एकूण ५०,३५६ होती.

हैद्राबाद संस्थान उच्च शिक्षणाच्या बाबतीत किती मागे आहे हे या आकड्यांवरून दिसून येईल. हे असे का ? याच्या खोलात मी जाऊ इच्छित नाही. मला वाटलेच तर याबाबतीत हैद्राबाद सरकारला मी स्वतंत्र मसुदा विचारार्थ सादर करीन. सद्यःस्थितीत आमच्या कार्याच्या विस्तारासाठी हैद्राबाद संस्थानच योग्य आहे असे आम्हाला वाटले.

हैद्राबाद संस्थानचा शैक्षणिक मागासलेपणा वगळला तरी खोलवर पाहिल्यास दुसरी एक खेदकारक घटना दिसून येते. ती म्हणजे शैक्षणिक सवलतीची असमाधानकारक व असमर्थनीय विभागणी ! जे काही थोडे बहुत उच्च शिक्षण हैद्राबाद संस्थानात दिसते ते फक्त हैद्राबाद शहरातच आहे. एकंदर सतरा कॉलेजेसपैकी फक्त इंटरपर्यंत शिक्षण देणारी तीन कॉलेजेस सोडली तर बाकीची सगळी कॉलेजेस संस्थानची राजधानी असलेल्या हैद्राबाद शहरातच आहेत आणि इंटरपर्यंत असलेल्या या तीन कॉलेजेसपैकी ऐंशी लक्ष लोकवस्तीच्या तेलंगणा भागासाठी वरंगळ येथे एक आहे. पंचेचाळीस लक्ष लोकवस्ती असलेल्या मराठी भागासाठी औरंगाबादेत दुसरे आणि पस्तीस लक्ष लोकवस्ती असलेल्या भागासाठी कर्नाटक येथे तिसरे आहे.

ही उणीव भरून काढण्यासाठी सोसायटीने हैद्राबाद संस्थानची निवड केली. औरंगाबादऐवजी संस्थानच्या तेलंगण किंवा कर्नाटक भागात सोसायटीला हे कॉलेज काढता आले असते असे कदाचित् म्हटले जाईल. जातीय किंवा भाषिक भावनांशी आमच्या सोसायटीला काही कर्तव्य नाही. सोसायटीचा मुख्य

उद्देश जेथे जेथे संधी मिळेल तेथे तेथे शैक्षणिक सेवा करणे हा आहे. मुंबईचे सिद्धार्थ कॉलेज चालविण्यात जसे यश मिळाले तशाच प्रकारचे यश या नवीन प्रयत्नातही मिळविण्याची सोसायटीची पहिल्यापासूनच इच्छा होती. मुंबईच्या निष्णात अध्यापकांपैकी काहींना इकडे आणण्यास सोसायटी उत्सुक होती पण असे आढळून आले की, केवळ मराठी बोलणारे प्राध्यापकच स्वेच्छेने येथे येण्यास तयार झाले आणि ह्याच कारणास्तव सोसायटीने औरंगाबादला कॉलेज सुरू केले.

कॉलेजने केलेल्या प्रगतीवरून सोसायटीने औरंगाबादची केलेली निवड योग्य आहे असे म्हणावयास हरकत नाही. कॉलेजच्या प्रगतीची माहिती देण्यापूर्वी सोसायटीच्या गव्हर्नींग बॉडीच्या धोरणाची कल्पना येण्यासाठी कॉलेजच्या काही विशिष्ट गोष्टी मला सांगाव्याशा वाटतात.

नमूद करण्यासारखी गोष्ट म्हणजे या कॉलेजमध्ये मुलांच्या बरोबरच मुलीही शिक्षण घेत आहेत. सामाजिक मागासलेपणा आणि सहशिक्षणाचा गंधही नसलेल्या या भागात मुलांच्या बरोबरीने मुलींनाही शिक्षण देऊन कॉलेज एक नवीनच पायंडा घालीत आहे. या कॉलेजमध्ये सर्व जातीच्या व धर्माच्या मुली शिक्षण घेत आहेत. मुलींना शिक्षणाला उत्तेजन मिळावे व मोठ्या संख्येने त्यांनी कॉलेजमध्ये यावे म्हणून शहरापासून कॉलेजपर्यंत येण्याकरिता कॉलेजने एक बसही ठेवली आहे. या कॉलेजचे द्वार सर्व धर्मियांना मोकळे आहे. येथे कोठल्याच प्रकारची जातीयता नाही. कॉलेजच्या प्राध्यापक वर्गात सर्व धर्मांचे आणि जातींचे प्राध्यापक आहेत. विद्यार्थ्यांत विद्या, विनय आणि शील बनविणे हे कॉलेजचे ध्येय आहे.

अस्पृश्य आणि मागासलेल्या विद्यार्थ्यांच्या शिक्षणाकडे हे कॉलेज खास लक्ष पुरवते. ज्याची चिन्हे आताच आपण पाहात आहोत असा खालचा वर्ग व वरचा वर्ग यांच्यातील संभाव्य संघर्ष टाळावयाचा असेल तर सर्व कॉलेजांनी हेच करायला पाहिजे. अस्पृश्य विद्यार्थ्यांची संख्या हळूहळू वाढत आहे आणि सध्या कॉलेजमध्ये सव्वीस अस्पृश्य विद्यार्थी असून त्यात विद्यार्थीनीही आहेत.

या कॉलेजच्या एका वर्षातील प्रगतीवरून अशा प्रकारच्या कॉलेजची या भागात असलेली उणीव भरून निघाली आहे, हे सिद्ध होते. १९ जून १९५० रोजी कॉलेज सुरू झाले त्यावेळी फक्त १४० विद्यार्थी होते. आज विद्यार्थ्यांची संख्या ३३२ असून जागेच्या अभावी पहिल्या वर्षाच्या वर्गाकरिता प्रवेश बंद करणे भाग पडले.

हे कॉलेज सर्व साधनांनी युक्त करण्याकरिता सोसायटीच्या गव्हर्नींग बॉडीने कोणतीही संधी दवडली नाही. कॉलेजने १ लक्ष २६ हजार रुपये खर्च करून लेबोरेटरी, सर्व प्रकारची उपकरणे व साधने यांनी सुसज्ज केली आहे आणि तज्ज्ञ डेमॉन्स्ट्रेटरच्या देखरेखीखाली सायन्सच्या प्रत्येक विद्यार्थ्याला स्वतः प्रयोग करण्यास संधी मिळते.

जरी एक वर्ष झाले असले तरी कॉलेजला एक सुन्दर लायब्ररी आहे. तीत कॉलेजला लागणारी सर्व प्रकारची पुस्तके आहेत. सोसायटीने या लायब्ररीकरिता चाळीस हजार रुपये खर्च केले असून एक वर्षाच्या आतच चार हजार पुस्तकांचा संग्रह केला; वाङ्मयीन आणि चौसष्ठ विषयावरील मासिके येथे येत असतात. कॉलेज विद्यार्थी आणि संशोधन करणारे विद्यार्थी या दोघांनाही उपयुक्त होईल अशी ही लायब्ररी व्हावी अशी सोसायटीची इच्छा आहे.

विद्यार्थ्यांचा शारीरिक विकास होण्यासाठी खेळ आणि व्यायाम याकडे खास लक्ष पुरविले जाते. मुलांच्या शास्त्रीय आणि बौद्धिक विकासाकडेही लक्ष दिले जाते. विद्यार्थ्यांत शास्त्रीय विषयांची आवड निर्माण करण्यासाठी तांत्रिक, औद्योगिक आणि संशोधन स्थळांच्या सफरी करण्यात येतात. वादविवाद, वाङ्मय आणि सायन्स अशी मंडळे स्थापन करण्यात आली आहेत आणि या सर्वांचा फायदा पुष्कळ विद्यार्थी घेत आहेत.

केवळ विद्यार्थ्यांनाच नव्हे तर सर्वसाधारण जनतेलाही कॉलेजने शिक्षण देण्याचा प्रयत्न केला आहे. या दिशेने ' अन्नधान्य आणि जनता ' या युनेस्कोने सुचविलेल्या विषयावर व्याख्यानमाला ठेवण्यात आली होती. ही व्याख्यानमाला फारच लोकप्रिय झाली आणि वर्तमानपत्रांनी तिचे स्वागत केले. कॉलेज आणि जनता यांच्यातील हा परस्परसंबंध असाच टिकविण्याचा कॉलेज प्रयत्न करील.

प्राथमिक अवस्थेत असलेले हे कॉलेज कोणत्याही बाबतीत मागे नाही. किंबहुना कॉलेजच्या प्रत्येक बाबतीत जिवंतपणा असून ते मोठ्या जोमाने वाढत आहे.

लोकांच्या डोळयात भरण्यासारखे कॉलेजने जे काही मिळविलेले असेल त्याचे सर्व श्रेय केवळ कॉलेजलाच जावे असे मी म्हणत नाही. तर त्याचे इतरही वाटेकरी आहेत आणि याकरता सोसायटी सर्वांची ऋणी आहे, हे मी जाहीर करतो. या यशाच्या वाटेकऱ्यात जे माझे मित्र आहेत त्यात हैद्राबादचे माजी शिक्षण मंत्री श्री. राजा धोंडी राज बहादुर हे आहेत. त्यांच्या मदती-शिवाय कॉलेज सुरू करणेच शक्य झाले नसते. तद्नंतर हल्लीचे मुख्य प्रधान श्री. एम. के. वेलोदी, अर्थमंत्री श्री. सी. व्ही. एस. राव, महसूल मंत्री श्री. शेषाद्री, शिक्षण मंत्री श्री. रामकृष्ण राव, त्याचप्रमाणे माझे सहकारी मित्र श्री. गोपालस्वामी अय्यंगार, मिनिस्टर फॉर स्टेट, उस्मानिया युनिव्हर्सिटीचे व्हाईस चॅन्सेलर नवाब अल्लीयावर जंगबहादूर, हैद्राबाद शेड्यूल्ड कास्ट ट्रस्ट फंडाचे सेक्रेटरी श्री. आबासे, औरंगाबादचे त्यावेळचे कलेक्टर श्री. राजवाडे, लँड ॲक्विझिशन ऑफिसर श्री. अष्टपुत्रे, हैद्राबाद स्टेट काँग्रेसचे अध्यक्ष श्री. बिंदू, पी. डब्ल्यु. डी. मंत्री श्री. नबाबजंग यावरजंग, पी. डब्ल्यु. डी. चे आर्किटेक्ट दवे या सर्वांचे

मी अंतःकरणपूर्वक आभार मानतो. आभार मानताना कॉलेजचे प्रिन्सिपाल आणि त्यांचा इतर सहकारी वर्ग यांना मी विसरू शकत नाही. कारण त्यांनी आपली घरेदारे मुंबईत सोडून औरंगाबादला येण्याचा अपूर्व स्वार्थत्याग केलेला आहे.

सध्या कॉलेजमध्ये बी. ए. आणि इंटर सायन्सपर्यंत शिक्षण दिले जाते. परंतु पुढील वर्षी सायन्स डिग्रीपर्यंतचे वर्ग उघडून हे संपूर्ण कॉलेज करण्याचे ठरविले आहे.

सध्या कॉलेज भाड्याच्या बंगल्यात आहे. हे बंगले कॅन्टोनमेंट विभागात असल्यामुळे दोन महिन्यांची नोटीस देऊन खाली करण्यास मिलिटरी केव्हाही सांगू शकेल. ही परिस्थिती अत्यंत नाजूक आहे. या परिस्थितीमुळे कॉलेजच्या कायम अस्तित्वाबद्दल संशय निर्माण होऊ शकतो. कॉलेजच्या गरजेच्या मानाने सध्याची जागा अगदीच अपुरी पडते. तसेच विद्यार्थ्यांकडून होस्टेलची मागणी करण्यात येत आहे. कारण स्थानिक विद्यार्थ्यांपेक्षा बाहेरून येणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या अधिक आहे आणि शहरात इतरत्र राहण्याची पुरेशी सोय नाही. या सर्व कारणांमुळे कॉलेजला स्वतःची इमारत बांधणे अत्यंत जरुरी आहे आणि त्या दृष्टीने सोसायटीने इमारत बांधायला सुरवात केली आहे. या इमारतीत बाराशे विद्यार्थ्यांची सोय होईल एवढे वर्ग, एक सभागृह आणि होस्टेल हे असेल. यासाठी सोसायटीने शहरापासून अडीच मैलाच्या अंतरावर एकशे पंचावन्न एकर जागा खरेदी केली आहे. या जागेच्या भोवतालचे दृश्य रमणीय असून लगतच जीत, पोहण्याची आणि बोटींगची व्यवस्था आहे अशी औरंगाबादेतील सुप्रसिद्ध पाणचक्कीही आहे.

अशा तऱ्हेने हे कॉलेज हैद्राबाद संस्थान आणि औरंगाबाद शहर या दोहोंना ललामभूत करण्याचा सोसायटीचा मानस आहे. तरी पण कॉलेजला अशी स्थिती प्राप्त होईल की नाही याबद्दल सोसायटीला चिंता वाटते. कॉलेजच्या या पहिल्याच वर्षाच्या आयुष्यात सोसायटीला १ लाख ७ हजार रुपयांची तूट आली. विद्यार्थ्यांची संख्या थोडीशी वाढल्यामुळे या वर्षी ही थोडीशी कमी येईल. तरी पण अशी काही भीतीदायक कारणे आहेत की ज्यामुळे तोटा हा अनिश्चितकाळ येत जाईल आणि कॉलेज चालवण्याचे सोसायटीचे प्रयत्न कदाचित् निष्फळ ठरतील. ती कारणे एवढी गंभीर आहेत आणि अगदीच थोड्या लोकांना त्याची कल्पना असल्यामुळे ती जाहीरपणे प्रकट करावीत असे मला वाटते.

पहिले कारण म्हणजे उस्मानिया युनिव्हर्सिटीच्या इंटरपर्यंतच्या कॉलेजचे अस्तित्त्व. पीपल्स एज्युकेशन सोसायटीने औरंगाबादला आपले कॉलेज

उघडण्यापूर्वीपासूनच उस्मानिया युनिव्हर्सिटीचे हे कॉलेज येथे अस्तित्त्वात आहे, हे खरेच आहे. पण दोन्ही कॉलेजे सुरळीत चालण्याएवढी विद्यार्थ्यांची संख्या या ठिकाणी नसल्यामुळे ते कॉलेज सोसायटीच्या कॉलेजशी प्रतिस्पर्ध्याप्रमाणे वागत आहे. संस्थानात अशी अनेक शहरे आहेत की, ज्या ठिकाणी इमारतीची सोय आहे, पण कॉलेज नाही. संस्थानी प्रजेच्या आणि आपल्या स्वतःच्या फायद्याच्या दृष्टीने, अशाच एखाद्या शहरात आपले कॉलेज नेणे उस्मानिया युनिव्हर्सिटीला सहज सोपे होईल. उस्मानिया युनिव्हर्सिटी आपले कॉलेज औरंगाबादहून संस्थानातील दुसऱ्या एखाद्या शहरी नेईल असे सोसायटीला सांगण्यात आले होते. हे करण्याऐवजी औरंगाबादेतच कॉलेज ठेवण्याचा उस्मानिया युनिव्हर्सिटीचा प्रयत्न चालू आहे. युनिव्हर्सिटीच्या सर्व विद्यार्थ्यांची सोसायटीचे कॉलेज आपल्यात सोय करू शकेल, यासाठी कॉलेजमध्ये जरूर ती तरतूद आहे. या उलट उस्मानिया युनिव्हर्सिटीच्या कॉलेजच्या जागेच्या बाबतीत एवढी कठीण स्थिती आहे की ते आपल्या प्रयोगशाळा (लेबोरेटरी) कालेअरक (औरंगाबादेतील निजाम सरकारचा जुना राजवाडा) या इमारतीत हलवीत आहे. असे समजते की या कामासाठी १०,००० रुपये मंजूर करण्यात आले आहेत. पण कॉलेजला योग्य अशा सरकारी इमारती असलेल्या मराठवाडा भागातील मोमिनाबाद शहरीच कॉलेज आणि लेबोरेटरीज नेणे योग्य होणार नाही का ? असे केल्यास दुसऱ्या एका जिल्ह्याला उच्च शिक्षणाची संधी मिळेल आणि सोसायटीचे कॉलेजही निरर्थक चढाओढीतून मुक्त होईल.

दुसरी अडचण फी संबंधीची आहे. उस्मानिया युनिव्हर्सिटीला आपल्या अधिकारात कॉलेजची प्रवेश फी ठरविण्याचा हक्क आहे. उस्मानिया युनिव्हर्सिटीत वर्षाची ६० रुपये म्हणजे अगदी कमीत कमी समजली जाणारी फी ठरलेली आहे. पीपल्स एज्युकेशन सोसायटीच्या कॉलेजला वर्षाची १२० रुपये फी घेण्याची उस्मानिया युनिव्हर्सिटीकडून परवानगी देण्यात आली आहे, हे खरे आहे. तरी सुद्धा लगतच्याच नाशिक आणि खानदेश या मुंबई युनिव्हर्सिटीच्या जिल्ह्यातील कॉलेजात घेण्यात येणाऱ्या फीशी तुलना केल्यास ही फी फारच कमी आहे. फी च्या या कमी प्रमाणाला संस्थानातील प्रजेच्या आर्थिक स्थितीशी काही कर्तव्य नाही. त्याचा आर्थिक दर्जा कोणत्याही तऱ्हेने जवळच्या संस्थानातील प्रजेच्या आर्थिक दर्जाहून कमी नाही.

उत्पन्नाचा एक मार्ग म्हणून युनिव्हर्सिटी फीकडे पाहात नसल्याने युनिव्हर्सिटीला एवढी कमी फी ठेवणे परवडते. पूर्वीच्या कराराप्रमाणे (चार्टर) हैद्राबाद सरकार युनिव्हर्सिटीचे सर्व प्रकारचे उत्पन्न म्हणजे सरकारी महसूल समजे. युनिव्हर्सिटी केवळ वसूल करणारी एजंट. तिला उत्पन्नाशी काही कर्तव्य नव्हते. युनिव्हर्सिटीची प्राप्ती म्हणजे सरकारकडून मिळणारी वार्षिक ग्रँट.

तिसऱ्या कारणाचा संबंध प्राध्यापकांच्या पगाराच्या प्रमाणाशी येतो. उस्मानिया युनिव्हर्सिटीला आपल्या अधिकारात खाजगी कॉलेजमधील प्राध्यापक वर्गाचे पगाराचे प्रमाण ठरवून देण्याचा हक्क आहे. औरंगाबादमधील उस्मानिया युनिव्हर्सिटीच्या कॉलेजातील प्राध्यापक वर्गाच्या पगाराचे प्रमाण खालीलप्रमाणे आहे,—

| हुद्दा | पगार रुपये |
| --- | --- |
| प्रिन्सिपाल | १,२००-१,७०० |
| प्रोफेसर | ८००-१,५०० |
| लेक्चरर | ३००-८०० |
| रीडर | ३५०-८०० |

औरंगाबादमधील पीपल्स एज्युकेशन सोसायटीच्या कॉलेजसाठी युनिव्हर्सिटीने ठरवून दिलेले पगाराचे प्रमाण खालीलप्रमाणे आहे,—

| हुद्दा | पगार रुपये |
| --- | --- |
| प्रिन्सिपाल | ५००-७०० |
| लेक्चरर | २५०-४०० |
| ज्युनियर लेक्चरर | १८०-३२५ |

उस्मानिया युनिव्हर्सिटीच्या कॉलेजांमधील प्राध्यापकांच्या पगाराचे प्रमाण निःसंशय फारच जास्त आहे. उस्मानिया युनिव्हर्सिटीने सोसायटीच्या कॉलेजसाठी ठरवून दिलेले पगाराचे प्रमाण हे सोसायटीने स्वतःच्या कॉलेजसाठी ठरविलेल्या प्रमाणापेक्षा काहीसे कमी आहे, हे खरे आहे पण शेजारच्या नाशिक आणि खानदेश जिल्ह्यातील कॉलेजच्या फी तील फरक आणि तेथील पगाराचे प्रमाण याच्याशी तुलना केल्यास हे प्रमाण अतिशय जास्त आहे आणि ते कॉलेजच्या आर्थिक स्थितीवर जड ओझेच होऊन बसते.

चौथे कारण सरकारी ग्रँट संबंधीचे. हैद्राबाद संस्थानातील कॉलेज शिक्षण म्हणजे उस्मानिया युनिव्हर्सिटीची मक्तेदारीच होऊन बसली आहे. उच्च शिक्षणाबाबतच्या सर्व प्रकारच्या जबाबदारीपासून आपण स्वतः वेगळे राहून हैद्राबाद सरकारने ती कामगिरी उस्मानिया युनिव्हर्सिटीकडे सोपविली आहे. सरकारची जबाबदारी म्हणजे संस्थानातील कॉलेज शिक्षणासाठी उस्मानिया युनिव्हर्सिटीला फक्त वार्षिक ग्रँट देणे ही होय. याच रकमेतून आपल्या कॉलेजला ग्रँट मिळेल अशी पीपल्स एज्युकेशन सोसायटीची अपेक्षा होती.

पण घटक कॉलेजचा योगक्षेम चालविणे एवढीच आपली जबाबदारी असून संलग्न, युनिव्हर्सिटीला जोडलेल्या कॉलेजचा ग्रँटवर काहीच हक्क नाही, असा उस्मानिया युनिव्हर्सिटीचा युक्तिवाद आहे. याच कारणास्तव सोसायटीचे कॉलेज हे युनिव्हर्सिटीला जोडण्यात आलेले असल्यामुळे त्याला उस्मानिया युनिव्हर्सिटीकडून मदत, ग्रँट नाकारण्यात आली. उलट सरकारचे म्हणणे असे आहे की जेवढी ग्रँट देण्यास आपण बांधलेले आहोत तेवढी ग्रँट आपण उस्मानिया युनिव्हर्सिटीला दिली आहे. म्हणून सोसायटीच्या कॉलेजच्या ग्रँटची जबाबदारी आपल्यावर नाही आणि आपण अधिक काही करू शकत नाही. याचा परिणाम असा झाला आहे की सर्व प्रकारच्या वार्षिक तुटीचा बोजा सोसायटीला सहन करणे भाग पडत आहे.

ही कारणे परिणामी घातक असून कॉलेजपुढे मोठी कठीण समस्या निर्माण झाली आहे. सर्व बाजूंनी कॉलेज अशा अडचणीत सापडले असून त्या दूर करण्यास ते असमर्थ आहे. कॉलेजला वार्षिक ग्रँट नाकारण्यात आल्यामुळे, फी च्या अल्प प्रमाणामुळे आणि प्रतिस्पर्धी कॉलेजमुळे आर्थिक स्थितीवर प्रतिकूल परिणाम होत आहे. पगाराच्या असमर्थ नि भारी प्रमाणामुळे (Scale) खर्चाची बाजू वाजवीपेक्षा जड झाली आहे.

कॉलेजचे भवितव्य पूर्णपणे या अडचणीच्या निरसनावर अवलंबून आहे आणि उस्मानिया युनिव्हर्सिटी व संस्थानी सरकार यांच्या जोड प्रयत्नांनी त्या दूर केल्या जाऊन कॉलेजचे भवितव्य सुरक्षित आणि निर्भय केले जाईल अशी मला उमेद आहे. सोसायटीला काही खास सवलत (Favour) नको. जे काही पाहिजे आहे ते कार्यासाठी चांगले आणि मोकळे क्षेत्र !

मला अधिकृत अशी काही माहिती नाही, पण मी असे ऐकतो की आमच्या सोसायटीच्या कॉलेजला काही वार्षिक ग्रँट देण्याचे हैद्राबाद सरकारने ठरविले आहे. ही मोठी अभिनंदनीय बातमी आहे आणि ती खरी असेल तर मदतीबद्दल संस्थानी मंत्र्याचा मी फार आभारी आहे. उपकुलगुरुंनी कॉलेजच्या मार्गातील इतर अडचणी दूर करणे एवढेच आता बाकी राहते. मी त्यांना विनंती करतो की उस्मानिया युनिव्हर्सिटीचे कॉलेज औरंगाबादेहून दुसऱ्या एखाद्या ठिकाणी हलविण्यात यावे आणि मुंबई राज्यातील लगतच्या जिल्ह्यातील कॉलेज-फी च्या प्रमाणात आम्हाला फी वाढ करण्याची परवानगी मिळावी. माझ्या विनंतीचा ते विचार करतील अशी मला आशा आहे.

सोसायटीने मोठी धोंड शिरावर घेऊन हे कॉलेज सुरू केलेले आहे. ती धोंड किती आहे याची फारच थोड्यांना कल्पना आहे. हैद्राबाद संस्थानातील

उन्नतीसाठी निजाम सरकारने उभारलेल्या एक कोटी रुपयांच्या ' शेड्यूल्ड कास्ट्स् ट्रस्ट फंडातून '१२ लाख रुपये कर्ज घेऊन सोसायटीने हे कॉलेज सुरू केलेले आहे. आम्हाला कर्ज बिनव्याजी दिल्याबद्दल फंडाच्या बोर्डाचा मी आभारी आहे. उपकार मानण्यासारखीच ही गोष्ट असली तरी वार्षिक ५०,००० (पन्नास हजार) रुपयांच्या हप्त्यांनी हे कर्ज फेडावयाचे आहे. ही गोष्ट सोसायटीला दृष्टीआड करता येणार नाही. ही परतफेड १९५६ पासून सुरू होणार आहे. या १२ लाख रुपये कर्जातून इमारत आणि इतर सामान-सुमान यावर खर्च करावयाचा होता. आतापर्यंत उपकरणे आणि फर्निचर यावर तीन लाख रुपये खर्च झालेले आहेत. हे वजा जाता साधारणपणे नऊ लाख रुपये सोसायटीच्या हातात राहातात. कॉलेजच्या इमारतीसाठी २० लाख रुपये लागतील असा अंदाज आहे. म्हणजे सोसायटीच्या बजेटात साधारणपणे ११ लाख रुपयांची तूट येते. सोसायटीची स्वतःची अशी काही तरतूद नाही. ही तूट भरून काढण्यासाठी सोसायटीला लोकांच्या देणगीवर अवलंबून राहावे लागते. सोसायटीने अंगीकारलेले कार्य पूर्णपणे बिनराजकीय स्वरूपाचे आहे. ते सर्वस्वी शैक्षणिक आणि सांस्कृतिक आहे. ज्याला इच्छा आणि शक्ती आहे अशा कुठल्याही राजकीय पक्षाच्या माणसाला या कार्यासाठी मदत करता येणे शक्य आहे. हैद्राबाद संस्थानातील मराठवाडा आणि औरंगाबादेतील जनतेला तसेच हैद्राबाद संस्थानाबाहेरील जनतेला उदार हाताने देणगी देऊन या शैक्षणिक कार्याला उत्तेजन देण्याची सोसायटीच्या वतीने मी विनंती करतो. मला आशा आहे की पुष्कळ लोक माझ्या विनंतीला मान देतील. आपले ध्येय साध्य करण्यासाठी सोसायटी किती अडचणीतून जात आहे हे यावरून दिसून येईल. सोसायटीवर दुहेरी ओझ्याचा भार आहे. इमारत पूरी करण्यासाठी ११ लाख रुपयांची आणि तद्नंतर कर्ज फेडण्यासाठी वर्षाला ५० हजार रुपयांची तरतूद करावयाची आहे. तरीसुद्धा इमारत बांधणीस अनुकूल परिस्थिती येऊन पैसे मिळेपर्यंत सोसायटी थांबणार नाही. इमारतीचे काम सोसायटीला ताबडतोब सुरू करावयाचे आहे. मला आशा आहे की हा सोसायटीच्या कार्याविषयीच्या तळमळीचा आणि निश्चयाचा दाखला समजण्यात येईल. लोक जेव्हा प्रत्यक्ष काम सुरू असलेले पाहातील तेव्हा देणग्या मिळत जातील; असा सोसायटीला आत्मविश्वास वाटतो. विद्यार्थ्यांच्या दृष्टीने कॉलेजची इमारत भव्य आणि शोभिवंत अशीच होणार आहे. शिल्पकलेच्या दृष्टीने तर औरंगाबाद शहराचा ती अलंकार ठरणार आहे.

हिंदू समाजाच्या अगदी खालच्या थरातून आल्यामुळे शिक्षणाचे किती महत्त्व आहे हे मी जाणतो. खालच्या समाजाची उन्नती करण्याचा प्रश्न आर्थिक असल्याचे मानण्यात येते. पण ही मोठी चूक आहे. हिंदुस्थानातील दलित

समाजाची उन्नती करणे म्हणजे त्यांच्या अन्न, वस्त्र व निवाऱ्याची सोय करून पूर्वीप्रमाणेच त्यांना उच्च वर्गाची सेवा करावयास लावणे नव्हे. खालच्या वर्गाची ज्याच्यामुळे प्रगती खुंटून त्यांना दुसऱ्याचे गुलाम व्हावे लागते तो न्यूनगंड त्यांच्यातून नाहीसा करणे, चालू समाजपद्धतीमुळे जे त्यांचे जीवन निर्दयपणे लुबाडण्यात आले आहे त्याचे त्यांच्या स्वतःच्या आणि राष्ट्राच्या दृष्टीने काय महत्त्व आहे याची त्यांना जाणीव करुन देणे हाच खालच्या वर्गाचा प्रश्न आहे. उच्च शिक्षणाच्या प्रसाराखेरीज कशानेच हे साध्य होणार नाही. आमच्या सर्व सामाजिक दुखण्यावर, माझ्या मताप्रमाणे, हेच औषध आहे.

अध्यक्ष महाराज, शिक्षण प्रसाराच्या कार्यासाठी काहीतरी करावे हे माझे लहानपणापासूनचे स्वप्न आहे. माझे स्वप्न मी सत्यसृष्टीत आणू शकलो याचा मला आनंद होत आहे. त्यापेक्षा कॉलेजच्या इमारतीची कोनशिला बसविण्यास आपण येथे आलात याचा मला अधिक आनंद होत आहे. कॉलेज इमारतीची कोनशिला बसविण्यास आणि आम्हाला आशीर्वाद देण्यास, विद्या व संस्कृतीच्या दृष्टीने आपल्यापेक्षा योग्य कोणी व्यक्ती नाही. मी जे म्हणतो ती खुशामत नाही. मी म्हणतो त्यावर विश्वास असू द्या. अध्यक्ष महाराज, आता मी आपणाला कोनशिला बसविण्याची विनंती करतो.



## २८०

# मी नदीच्या प्रवाहालाच वळविणाऱ्या भक्कम खडकासारखा आहे

मोहल्ला रामदासपुरा (बुटान मंडी) जालंदर येथे दिनांक २७ ऑक्टोबर १९५१ रोजी पहिल्या सार्वत्रिक निवडणुकीच्यावेळी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाले. ते म्हणाले,

बंधु आणि भगिनींनो,

यापूर्वीही अशा प्रकारच्या कार्यक्रमांची आखणी करून त्या कार्यक्रमात मी सहभागी व्हावे अशी अपेक्षा तुम्ही अनेकदा केली आहे. परंतु मुख्यतः मध्यवर्ती सरकारच्या मंत्रीपदाच्या जबरदस्त जबाबदारीमुळे व माझ्या ढासळत्या प्रकृतीस्वास्थ्यामुळे मी आपल्या कार्यक्रमात यापूर्वी सहभागी होऊ शकलो नाही. याबद्दल सुरूवातीसच मी आपली क्षमा मागतो. मला असे सांगण्यात आले की माझे भाषण ऐकण्यासाठी यापूर्वी आपण अनेकदा येथे गोळा झालात परंतु निराश होऊन तुम्हास परत जावे लागले आहे. म्हणून तुम्हाला हा जो त्रास झाला व निराश व्हावे लागले त्याबद्दल मी तुमची क्षमा मागू इच्छितो.

तुम्हाला माहीतच आहे की मागील चार वर्षे मी केंद्रीय सरकारात एक मंत्री होतो आणि भूतकाळातील कोणत्याही विधी मंत्र्याला जेवढा कामाचा बोजा वहन करावा लागला नसेल किंवा भविष्यातील कोणत्याही विधी मंत्र्याला वहन करावा लागणार नाही इतका कामाचा बोजा मला वहन करावा लागत होता. मी दौरा काढू शकलो नाही याचे हे एक कारण आहे. दुसरी गोष्ट म्हणजे माझे प्रकृतिस्वास्थ्य ठीक नाही; आतासुद्धा माझी प्रकृती पूर्णतः ताळयावर आलेली नाही. माझ्या तब्येतीनेही माझ्या दौऱ्यात अडथळा निर्माण केला. तिसरी आणि शेवटची बाब म्हणजे या देशाच्या सर्व भागांमध्ये अस्पृश्य लोक आहेत. प्रत्येक तहसील, जिल्हा आणि प्रांतात जर मी दौरा काढण्याचे ठरविले तर चार किंवा पाच वर्षातही हा दौऱ्याचा कार्यक्रम संपविणे मला शक्य होणार नाही. मी तुमच्या गावाला भेट देऊन तुमच्याशी हार्दिक संवाद करावा असा तुमचा माझ्यावरील प्रेमापोटी आग्रह असतो. यामागील माझ्यासंबंधी असलेली तुमची प्रेमभावना मी जाणतो. परंतु सर्व ठिकाणी जाणे मला असंभव आहे. तुमच्यापैकी प्रत्येकाने स्वयंनिर्भर होऊन स्वतःच्या पायावर उभे राहावे आणि अशातऱ्हेने स्वतंत्र सामाजिक जीवन जगावे अशी माझी अपेक्षा आहे.

---

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे : संपा. मा. फ. गांजरे, खंड ७, पृ.४८–५६.

माझ्या वयाची ६० वर्षे मी पूर्ण केली आहेत. मी जर सरकारी नोकरीत असतो तर सेवानिवृत्त होण्याची सक्ती माझ्यावर करण्यात आली असती, पण हा नियम राजकारणी लोकांना लागू होत नाही. तसे असते तर बरे झाले असते. आजकाल असे दिसून येते की ज्यांना उदरनिर्वाहाची साधने नाहीत व बुद्धिमत्ता नाही असे ५५ वर्षे वयावरील लोक राजकारणी बनून आपला उदरनिर्वाह चालवीत आहेत.

मी राजकारणात असण्याचे कारण असे की राजकारणाच्या आखाड्यात उतरुन मला आता ३० वर्षांच्या वर काळ लोटला आहे. इतक्या लांब काळपर्यंत राजकारणात सतत वावरत असलेला एकही माणूस सध्या भारतात नाही. फावल्यावेळी राजकारण करणे हा एक सामान्य नियम आहे. या तीस वर्षांपैकी आठ वर्षे मी केन्द्रीय सरकारचा सभासद म्हणून घालविली आहेत. या क्षेत्रात सुद्धा कोणीही माझ्या पुढे गेलेला नाही. माझी इच्छा असती तर आणखी काही काळ मी सरकारचा सभासद म्हणून राहू शकलो असतो.

परंतु जेव्हापासून मला जीवनाचा अर्थ समजू लागला तेव्हापासून म्हणजे माझ्या लहानपणापासूनच मी सतत एका तत्त्वाचे अनुसरण केले. ते तत्त्व म्हणजे माझ्या अस्पृश्य बांधवांची सेवा करणे हे होय. मी कोठेही असो किंवा कोणत्याही पदावर असो परंतु नेहमीच माझ्या बांधवांच्या भल्याकरिता मी चिंतन करीत असतो व कार्य करीत असतो. दुसऱ्या कोणत्याही प्रश्नाला मी कधीही इतके महत्त्व दिलेले नाही. अस्पृश्यांच्या हिताचे संरक्षण मी केलेच पाहिजे हेच माझ्या भूतकाळातील जीवनाचे ध्येय होते आणि भविष्यातही हेच माझे ध्येय राहील. किफायतशीर अशा भल्या मोठ्या पगाराच्या अनेक नोकऱ्या मला देऊ करण्यात आल्या होत्या परंतु माझ्या लोकांची सेवा करणे हे माझ्या जीवनाचे ध्येय असल्यामुळे त्या नोकऱ्या मी नाकारल्या.

परदेशातून अर्थशास्त्राची उच्च पदवी धारण करून येणारा केवळ अस्पृश्यातीलच नव्हे तर संपूर्ण भारतातून मी पहिला माणूस होतो. मी मुंबईत उतरल्यावर ताबडतोब मुंबई सरकारने मला राजनैतिक अर्थशास्त्राच्या प्राध्यापकाची जागा देऊ केली. मी ती नोकरी स्वीकारली असती तर आज मला फार मोठा पगार मिळाला असता. परंतु मी ती नोकरी नाकारली कारण मला माहीत होते की तुम्ही एखादी सरकारी नोकरी पत्करल्यावर स्वभावतःच तुमच्या लोकांची सेवा करण्याच्या इच्छेवर बंधने येऊन पडतात. माझा उदरनिर्वाह होऊन मी स्वतंत्रही असावे म्हणून कायद्याच्या शिक्षणासाठी एक किंवा दोन वर्षानंतर मी पुन्हा इंग्लंडला गेलो. आपल्या उदरनिर्वाहासाठी दुसऱ्या कोणावरही जो अवलंबून नसतो तोच माणूस खऱ्या अर्थाने स्वतंत्र असतो.

बार-अॅट-लॉ ची पदवी प्राप्त करून इंग्लंडमधून परत आल्यावर पुन्हा एकदा मला डिस्ट्रिक्ट जज्जाच्या जागेचे, तीन वर्षाच्या आत हायकोर्ट जज्जाच्या जागेवर पदोन्नती करण्याचे आश्वासन देऊन नेमणूक करण्याचे प्रलोभन दाखवण्यात आले. त्याकाळी माझे मासिक उत्पन्न १०० रु. सुद्धा नव्हते. अत्यंत गरीब लोकांसाठी मुद्दाम बांधलेल्या मुंबईतील एका चाळीतील एका खोलीत त्यावेळी मी राहात होतो. परंतु ही जज्जाची जागा जरी फार मोठ्या पगाराची होती आणि जन्मभर मला पैशाची ददात भासणार नव्हती तरीसुद्धा ती जागा मी नाकारली कारण ती जागा जर मी स्वीकारली असती तर स्वभावतःच माझ्या आयुष्याचे ध्येय गाठण्यात म्हणजे माझ्या लोकांची उन्नती करून त्यांची स्थिती सुधारण्याच्या माझ्या अंगीकृत कार्यात अडचण निर्माण झाली असती.

१९४२ साली पुन्हा एकदा अशाच एका प्रसंगाशी मला सामना करावा लागला. आर्थिकदृष्ट्या संपन्न करू शकणारी आणि दहा वर्षे नोकरी झाल्यावर पुढील आयुष्य मी सुखासमाधानात घालवू शकलो असतो अशी हायकोर्ट जज्जाची जागा मला देऊ करण्यात आली. व्हाईसरॉयच्या कौन्सिलमध्येसुद्धा जागा देण्याचे मला आश्वासन देण्यात आले. माझे जीवनध्येय डोळ्यापुढे ठेवून मी दुसरी जागा स्वीकारली. प्रत्येकाने आपल्या लोकांची सेवा करण्यात आपले आयुष्य वेचले पाहिजे व सेवेतच मरण पत्करले पाहिजे.

केन्द्रीय सरकारात १९४७ साली मी सामील झालो. मी काँग्रेसला मिळालो अशी टीका माझ्या काही टीकाकारांनी माझ्यावर केली. माझ्या टीकाकारांनी केलेल्या निंदेला मी लखनौच्या भाषणात उत्तर दिले आहे. त्या भाषणात माझ्या देशबांधवांना मी सांगितले की पाण्याच्या प्रवाहाबरोबर वाहून जाणाऱ्या मातीच्या ढेकळाप्रमाणे मी भुसभुशीत नसून मी पाण्यात न विरघळता नदीच्या प्रवाहालाच वळविणाऱ्या एखाद्या भक्कम खडकासारखा आहे. मी कोठेही असलो किंवा कोणाच्याही संगतीत मी राहिलो तरी माझे स्वतःचे वैशिष्ट्य मी कधीही गमावणार नाही. एखाद्या चांगल्या कामासाठी जर कोणी माझ्या सहकार्यासाठी विचारणा केली तर मी आनंदाने सहकार्य करीन. मागील चार वर्षेपर्यंत काँग्रेस सरकारशी मी माझ्या सर्व सामर्थ्यानिशी प्रामाणिकपणे माझ्या मातृभूमीची सेवा करण्यात सहकार्य केले. परंतु या संपूर्ण काळाच्या दरम्यान काँग्रेस संघटनेत मी विरून जाण्यापासून स्वतःस अलिप्त राखले आहे. जे लोक आपल्या शब्दाशी व कर्तृत्वाशी प्रामाणिक राहून अस्पृश्यांच्या कार्यात मदत करू इच्छितात त्यांच्याशी मी आनंदाने सहकार्य करून त्यांना मदत करीन. जे केवळ गोडबोले व गोड गोड थापा मारणारे आहेत परंतु ज्यांचा अंतस्थ हेतू आणि कृती आमच्या लोकांच्या हिताच्या विरोधी असते त्यांना मी कदापिही मदत करणार नाही.

आता, येत्या सार्वजनिक निवडणुकीसंबंधी सांगायचे म्हणजे, ही निवडणूक शेड्यूल्ड कास्ट्स्च्या लोकांनी त्यांच्या जीवन-मरणाचा लढा आहे असे समजून येत्या काळात जोमाने कार्य करावे. आपले उमेदवार निवडून आणण्यासाठी आपली सर्व शक्ती पणाला लावावी. मनुष्यमात्राला या जगात शक्तीचा पुरवठा संपत्ती आणि लोकसंख्या बळातून होत असतो. आपण अल्पसंख्य आहोत आणि आपण धनवानही नाही. प्रत्येक खेड्यात आपली संख्या एकूण लोकसंख्येच्या शेकडा ५ पेक्षा अधिक नाही. ९५ टक्के लोकांच्या संघशक्तीच्या आणि त्यांच्या संपत्तीच्या तुलनेत आपण हतबल अऽहोत. पोलीस मुख्यतः उच्चवर्णीय लोकांपैकीच असल्यामुळे आपल्या खऱ्याखुऱ्या तक्रारींचीही दाद घेत नाहीत; उलट तक्रार केल्याबद्दल धारेवर धरण्यात येते. दारिद्र्यामुळे अधिकारी वर्गास आपल्या बाजूस वळवून घेण्यासही आपण असमर्थ ठरतो. परंतु आपणाला एक शक्ती प्राप्त होऊ शकते ती म्हणजे राजकीय शक्ती ! ही शक्ती आपण मिळविलीच पाहिजे. या शक्तीने सुसज्ज होऊन आपण आपल्या लोकांचे हितसंरक्षण करू शकतो.

या देशाने जे स्वातंत्र्य प्राप्त केले त्या स्वातंत्र्याने तुम्हाला या राज्यशक्तीची हमी दिलेली आहे काय ? आपल्या देशाच्या स्वातंत्र्याच्या आम्ही कधीच विरोधी नव्हतो. परंतु आम्हाला एका प्रश्नाचे सरळ उत्तर हवे होते. स्वतंत्र भारतामध्ये आमची अवस्था कशी राहील? हा प्रश्न मी गांधीजीसमोर आणि अन्य पुढाऱ्यांसमोर ठेवला. त्यांच्या ' स्वराज्या ' मध्ये आमची अवस्था कशी राहील हे आम्हाला जाणून घ्यावयाचे होते. आमच्यावरील जाचणूकीचा अंत होईल काय ? आमच्या मुलांच्या शिक्षणाची सोय होईल काय ? आमचे लोक भारताचे स्वतंत्र नागरिक म्हणून जीवन जगण्यास समर्थ होतील काय ? अत्याचार आणि पिळवणूक थांबेल काय ? आमच्या स्त्रियांची अब्रू सुरक्षित राहील काय ? गांधीजी किंवा कोणत्याही अन्य नेत्याने या प्रश्नांची उत्तरे समाधानकारकपणे किंवा आढेवेढे न घेता सरळसोटपणे दिली नाहीत.

गोलमेज परिषदेत पहिल्या प्रथम हा प्रश्न मी समोर ठेवला आणि मुसलमान, खिश्चन, शीख व इतर अल्पसंख्यांकांप्रमाणे अस्पृश्यांसाठी स्वतंत्र मतदार संघाची मागणी केली. अस्पृश्यांसाठी स्वतंत्र मतदार संघ असावा या न्याय्य मागणीला गोलमेज परिषदेत माझ्या देशवासियांकडून मला समर्थन प्राप्त होऊ शकले नाही. तथापि माझ्या लोकांसाठी मी राजकीय हक्क मिळविले. त्यानंतर काय घडले हे या देशातील प्रत्येकाला माहीत आहे. एवढे सांगितले म्हणजे पुरे की आधुनिक भारताच्या इतिहासात प्रथमतःच आम्ही जे हक्क प्राप्त केले ते राजकीय

हक्क नागवण्यासाठी गांधीजींनी प्राणांतिक उपोषण आरंभिले. अस्पृश्यांच्या मनात ज्या राजकीय आकांक्षा निर्माण होऊ लागल्या होत्या त्यांना भिऊन गांधीजी अस्पृश्यांच्या विरुद्ध होते. आपल्या परोपकारी धन्यांच्या म्हणजे सवर्ण हिंदुंच्या दयेवर अस्पृश्यांनी अवलंबून राहावे असे त्यांना हवे होते. गांधीजींच्या शब्दावर विश्वास ठेवून आणि हिंदू पुढाऱ्यांच्या आश्वासनावर विसंबून गांधीजींचा जीव वाचविण्यासाठी आम्ही आपल्या हक्कांचा बळी दिला. याचा परिणाम आता तुमच्यासमोर असून प्रत्यक्ष दिसतच आहे. विश्वासघाताची आणि कपटीपणाची ती एक दु:खद कथा आहे. सर्व प्रकारच्या भल्याबुऱ्या मार्गाचा अवलंब करून काँग्रेसने अस्पृश्यांना त्यांच्या न्याय हक्कांपासून नागविले आहे. ज्यांना अस्पृश्य समाजामध्ये मानाचे स्थान नाही असे लोक केवळ सवर्ण हिंदुंच्या पाठिंब्यामुळे कायदे मंडळावर निवडल्या जात आहेत. तथाकथित हरिजन हे काँग्रेसचे हस्तक आहेत. या हरिजन उमेदवारांना तिकीट देताना काँग्रेस त्यांना कोणता निकष लावते हे मला काही समजत नाही. साधारणत: कोणत्याही उमेदवाराला निवडणुकीसाठी तिकीट देताना त्याने देशाच्या स्वातंत्र्य लढ्यात कारावास भोगला आहे काय, असे काँग्रेस विचारते. परंतु आश्चर्याची गोष्ट अशी की हरिजनांना तिकिटे देताना हा निकष काँग्रेस लावीत नाही. राखीव जागेवर हरिजन उभे करून अस्पृश्यांनी मिळविलेले हक्क काँग्रेस सहजपणे धुळीस मिळवीत आहे.

काँग्रेसच्या तिकिटावर पुष्कळसे अस्पृश्य कायदे मंडळात निवडून गेलेले आहेत. या हरिजन आमदारांना मी विचारू इच्छितो की मागील चार वर्षामध्ये त्यांनी त्यांच्या लोकांसाठी काय केले आहे. पार्लमेन्टमध्ये आणि घटनासमितीत ३० हरिजन होते. अस्पृश्यांचे प्रतिनिधी म्हणून नियुक्त केलेल्या या ३० सभासदांपैकी एकाने तरी भारताच्या राज्यघटनेवरील चर्चेत कधी भाग घेतला काय ? या हरिजन सभासदांपैकी कोणीतरी एखादा प्रश्न विचारला, एखादा ठराव मांडला किंवा एखादे बिल मांडले काय ? या हरिजनांच्या चूप बसण्यावरून पार्लमेन्टच्या कामकाजाचा विदेशी समालोचक बरोबर हाच निष्कर्ष काढू शकतो की भारतात अस्पृश्यांचा कोणत्याही प्रकारे छळ होत नाही, त्यांची कोणत्याही प्रकारची तक्रार नाही. प्रामाणिकपणे बोलावयाचे तर सत्य याच्या विरुद्ध आहे. आमच्या दु:खाबद्दल निर्भयपणे कायदेमंडळात आवाज उठवतील असे प्रतिनिधी आम्हाला हवेत. परंतु काँग्रेसने नेमलेले हे अस्पृश्यांचे प्रतिनिधी आज्ञाधारकपणे त्यांच्या धन्याचे गुणगान तरी करतात किंवा अस्पृश्यांचे हक्क, मूलभूत गरजा नाकारल्याच्या, अस्पृश्यांचा उपमर्द व अवमानाच्या, पिळवणुकीच्या व अत्याचाराच्या घटना सर्व भारतभर प्रत्यही घडत असल्याच्या भयानक कथा ऐकू येत असल्या तरी आपली तोंडे बंद करून बसतात.

अस्पृश्य लोकांच्या प्रश्नात पं. नेहरूंनी कधीही थोडीसुद्धा आस्था दाखविली नाही. गेली वीस वर्षे ते राजकारणाच्या आघाडीवर आहेत. त्यांनी दोन हजारापेक्षाही जास्त सभातून भाषणे दिली असावीत. अस्पृश्य लोकांवर जे अत्याचार होतात त्यांचा त्यांनी कधीतरी उल्लेख केला आहे काय ? माझ्या स्मरणानुसार कधीही नाही. त्यांना मुसलमानांचे वेड लागले आहे. त्या आजाराने ते दुःखी आहेत. मुसलमानांवर अन्याय झाला किंवा अन्याय झाल्याची कल्पना त्यांना आली तरी ते विचलित होतात. भारतातील मुसलमानांचे संरक्षण करण्यासाठी ते आटोकाट प्रयत्न करतील. मुसलमानांना संरक्षण देण्याच्या मी विरुद्ध नाही. माझे असे मत आहे की मुसलमानांनी पाकिस्तानात जावे. लोकसंख्येच्या अदलाबदलीचा योग्य मार्ग सापडू शकत नसेल तर भारतातील मुसलमानांचे संरक्षण करणे हे आपले कर्तव्यच आहे. परंतु मुसलमान अल्पसंख्य असले तरी अस्पृश्यांशी तुलना करता ते त्यांच्या संरक्षणासाठी अधिक उत्तम स्थितीत आहेत. अस्पृश्य, आदिवासी, गुन्हेगार जमाती, हे नावही किळसवाणे आहे. मागासजाती किंवा ख्रिश्चन लोक यासारख्या अन्य अल्पसंख्य लोकांनाही संरक्षण देण्याचा किंवा त्यांच्या उत्थानासाठी काहीतरी भरीव करण्याचा विचार नेहरुंनी कधीतरी केला आहे काय ? जर कॉंग्रेसच्या लोकांना अस्पृश्यांबद्दल प्रेम किंवा सहानुभूती नाही तर कॉंग्रेसच्या लोकांवर अस्पृश्यांचा विश्वास कसा बसू शकतो.

कॉंग्रेसने अस्पृश्यांसाठी खूप काही केले असे जगाला सांगताना पं. नेहरू कधी थकत नाहीत. ते म्हणतात ते कसे खोटे आहे हे दर्शविण्यासाठी मी फक्त एकच उदाहरण देतो.

विभाजनानंतर पाकिस्तान सरकारने अस्पृश्यांना पाकिस्तानातून भारतात येण्यावर बंदी घालणारे एक फर्मान काढले. कितीही हिंदुंनी पाकिस्तान सोडले तरी पाक सरकारने त्यांची पर्वा केली नाही; परंतु अस्पृश्यांनी पाकिस्तान सोडले तर मैला वाहण्याचे, सडका झाडण्याचे, मेलेली जनावरे उचलण्याचे तिरस्करणीय जातीचे घाणेरडे धंदे कोण करणार होते ? मी पं. नेहरुंना विनंती केली की या लोकांच्या स्थलांतर करण्यावर बंदी घालणारा हा आदेश काढून घेण्यासंबंधी काहीतरी कारवाई करा. परंतु त्यांनी काहीही केले नाही. या समस्येसंबंधी ते झोपी गेले आणि पाकिस्तानशी ज्या काही चर्चा वेळोवेळी झाल्या त्यावेळी त्यांनी या प्रश्नाचा प्रासंगिक उल्लेखही केला नाही. एकाकीपणे जेवढे मला करता येणे शक्य होते तेवढे मी केले आहे. महार बटालियनच्या शूर शिपायांनी गंभीर धोका पत्करून मला मदत केली आणि पाकिस्तानातून अनेक अस्पृश्य लोकांना आणले.

अशा स्थितीत आम्ही काँग्रेस पुढाऱ्यांच्या आश्वासनावर विश्वास कसा ठेवावा. अस्पृश्य लोकासंबंधीचा काँग्रेसचा हेतू प्रांजळ असेल तर ते सर्वसाधारण जागेवर अस्पृश्य उमेदवार उभा करून आपला प्रांजळपणा सिद्ध का करीत नाहीत ?

काँग्रेसशी लढा देणे शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनला कठीण जाईल असे आम्हास सांगण्यात येते. ही शुद्ध लोणकढी आहे. या निवडणुकीत आम्ही यशस्वीपणे बाहेर पडू याबद्दल मला मुळीच शंका नाही. काळ बदललेला आहे. मागच्या निवडणुकीच्या वेळी प्रत्येकजण आमच्या विरुद्ध होता आणि काँग्रेसनेच स्वातंत्र्य मिळवून देशाला स्वतंत्र केले, अशा प्रकारच्या काँग्रेसच्या प्रचारामुळे काँग्रेसवर विश्वास ठेवून प्रत्येकजण तिच्या सोबत होता. आज काय स्थिती आहे ? पंजाब काँग्रेसकडे नुसती नजर फेका ! पंजाबमध्ये खरोखरच काँग्रेस अस्तित्वात आहे काय ? पंजाबातील काँग्रेस आधीच मेलेली दिसते. तिचे दोन आधारस्तंभ डॉ. गोपीचंद भार्गव आणि श्री. भीमसेन सच्चर हे श्रेष्ठतेसाठी परस्पराशी लढत आहेत. उमेदवार निश्चित करण्याची तारीख अगदी हाताशी येऊन ठेपली असली तरीही येत्या निवडणुकीसाठी उमेदवारांची यादी अजून काँग्रेसने संमत केलेली नाही. जे लोक ' आम्ही एका आईची लेकरे आहोत ' असे घराच्या गच्चीवरून जाहीर करीत होते तेच लोक आता कडव्या शत्रुप्रमाणे एकमेकाशी लढत आहेत. भार्गव गट आणि सच्चर गट या दोहोंमध्ये हार्दिक एकी होणे पूर्णतः असंभव आहे.

पंजाबचा मुख्यमंत्री कोण होणार हाच एकमेव प्रश्न या पुढाऱ्यांसमोर आहे. या सभ्य गृहस्थांना लोकांच्या गाऱ्हाण्यांशी काहीएक कर्तव्य नाही. पंजाबातील लढा हा कोणत्याही तत्त्वासाठी नाही तर तो लढा सत्तेसाठी आहे. हीच स्थिती बिहार आणि अन्य अनेक राज्यात आहे. लाचलुचपत, भ्रष्टाचार आणि भाई-भतिजा वादाबद्दल अनेक काँग्रेस उमेदवारांच्या विरूद्ध अनेक तक्रारी काँग्रेसच्या ऑफिसात प्रत्यही येत आहेत. १९४७ मध्ये काँग्रेस तिच्या कीर्तीच्या कळसावर होती. आता, केवळ चार वर्षाच्या काळानंतर, ती अगदी खालच्या पातळीपर्यंत घसरली आहे. जगातील राजकीय पक्षांच्या इतिहासातील हे असे अद्वितीय उदाहरण होय. ' काँग्रेसवाला ' आणि ' सज्जन ' हे परस्परविरूद्ध अर्थाचे ठळक वेगवेगळे आणि परस्पराशी कधी संबंधित नसणारे दोन शब्द होत.

अशा स्थितीत ' आपण ही लढाई हरू ' अशी भीती बाळगावयास नको. काँग्रेस-आपला पुर्वापार शत्रु-तिच्या जुन्या शक्तीपासून वंचित झाली आहे.

स्वाभिमान आणि ऐक्य या बळावर फेडरेशन यशस्वी होईल हे निश्चित. फक्त आपण जिद्दीने व खुणगाठ बांधून प्रयत्न केले पाहिजेत. मी तुम्हा सर्व बंधु-भगिनींना असे आवाहन करतो की मतदानाच्या दिवशी तुम्ही सर्व कामे बाजुला सारून तुमच्या मतदानाच्या हक्काची अंमलबजावणी करा.

काँग्रेसने आमच्यात फूट पाडू नये म्हणून शेड्यूल्ड कास्ट्स्च्या लोकांनी पहारा दिला पाहिजे. काँग्रेसच्या बोलघेवड्या प्रचाराच्या आणि काँग्रेसवाल्यांच्या वाचाळ बोलण्याच्या त्यांनी आहारी जाऊ नये. त्याचप्रमाणे तुम्ही '' ठेविले अनंते तैसेचि राहावे '' अशाप्रकारची समाधानी वृत्तीही ठेवू नये. तुम्ही सतत सतर्क राहिले पाहिजे. आपणाला राखीव जागा केवळ दहा वर्षासाठी आहेत याची आपण सतत आठवण ठेवावयास हवी. अस्पृश्यतेचा पूर्णतः नायनाट होईपर्यंत या राखीव जागा चालू राहाव्यात अशी माझी इच्छा होती. सरदार पटेलांनी या माझ्या ठरावाला संसदेत आणि संसदेच्या बाहेर मोठ्या आवेशाने विरोध केला. सरदार पटेलांचे एक सोडाच परंतु अस्पृश्यांचे प्रतिनिधी म्हणून काँग्रेसने नेमलेल्या घटनासमितीतील ३० हरिजनांना सुद्धा माझ्या ठरावाला पाठिंबा देण्याची हिंमत झाली नाही. सरदार पटेलांच्या पावलावर पाऊल ठेवून चालण्यापेक्षा हे काँग्रेसचे हस्तक दुसरे काय करू शकणार ! निवडणुकीचे तिकिट खुंट्याला बांधून होतेच आणि या संधिसाधू व सत्तापिपासू लोकांकडून दुसरी कोणतीही अपेक्षा कोणी करू शकत नाही. या राखीव जागा फक्त दहा वर्षेपर्यंतच राहाणार आहेत. या दहा वर्षाच्या काळानंतर आपण काय करणार आहोत. आपणाजवळ मजबूत संघटन नसेल तर देशाच्या राजकारणात आपणाला कोणतेही स्थान असू शकत नाही. 'अछूत' लोक जर एकसंध अशा एका जातीत संघटित झाले तर आपण राजकारणात काही स्थान प्राप्त करू शकतो. आपले मजबूत व एकसंध संघटन करण्यासाठी आपण दहा वर्षेपर्यंत थांबू नये. ही संघटना आतापासूनच बांधली पाहिजे; ही संघटना आजच आपण बांधली पाहिजे.होय, उद्याही नव्हे, परवाही नव्हे तर आजच ! जर या दहा वर्षांच्या अवधीत आपण आपली संघटना दृढ आणि मजबूत पायावर उभी करून कार्यरत केली नाही तर या दहा वर्षानंतर 'मनुस्मृती-राज' स्वीकारण्याचे दुर्दैव आपल्या नशिबी येईल. वस्तुतः अशी संघटना आधीच आपणाजवळ आहे. आपली फेडरेशन हीच आपली संघटना होय. आपणाला फक्त ती मजबूत करावयाची आहे. झाड आधीच लावण्यात आलेले आहे. आपणाला फक्त त्याला पाणी घालून त्याची जोपासना करावयाची आहे. निवडणूक आयुक्ताकडून आपली फेडरेशन ही अखिल भारतीय स्वरुपाची संघटना असल्याचे मान्य करण्यात आले आहे. आपणाला नवीन घर बांधावयाचे नाही; घर पूर्वीचेच आहे.

आपणास जे काही करावयाचे आहे ते इतकेच की ते सुव्यवस्थित स्थितीत सांभाळावयाचे आहे. आतापासूनच आपण त्यासाठी जोमदार प्रयत्न केले नाही आणि जर समाधान मानून राहिलो तर अशी वेळ येऊन ठेपण्याची शक्यता आहे की बेघर होउन आपणास इकडे तिकडे भटकावे लागेल आणि सर्व प्रकारचा अपमान, अन्याय, अत्याचार सहन करावा लागेल व वेदकाळापासून ज्याची आपण शिकार झालो होतो अशाप्रकारचे पंगुत्व आपणास येईल.

आता तुम्हास सर्वांना माहित आहेच की शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे येत्या निवडणुकीत हत्ती हे चिन्ह आहे. हत्ती हे चिन्ह मी निवडले कारण भारतातील प्रत्येकालाच ते माहीत आहे. निरक्षर लोकही ते सहजपणे ओळखू शकतात. याशिवाय हत्ती हा शहाणपणा, शक्ती आणि धैर्यासाठी प्रसिद्ध आहे. आपले लोक हत्तीप्रमाणे आहेत. त्याला पायावर उभे राहाण्यास वेळ लागतो परंतु एकदा तो आपल्या पायावर उभा झाला म्हणजे तुम्ही त्याला सहजगत्या गुडघे टेकावयास लावू शकत नाही.

आता निवडणूक समझोत्याविषयी सांगावयाचे म्हणजे शेड्यूल्ड कास्ट्स्चे लोक अल्पसंख्यांक आहेत. आपणाला स्वतंत्र मतदारसंघही प्राप्त झालेले नाहीत. म्हणून निवडणुकीपुरता आपणाला अन्य पक्षांशी मैत्री-करार करणे आवश्यक आहे. शेड्यूल्ड कास्ट्स्साठी राखीव असलेल्या मतदार संघात आपणाला प्रत्येकाला दोन मते आहेत. ज्या पक्षाशी आपण मैत्री करू त्या पक्षाला आपण एक मत देऊ शकतो. एक मत शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या उमेदवाराला जाईल. निवडणुकीसाठी कोणत्या पक्षाशी समझोता करावा हे अजून ठरलेले नाही. लवकरच ते ठरविण्यात येईल. एकदा ते ठरल्यानंतर ज्या पक्षाशी आपण मैत्री-करार करू त्या पक्षाला आपले एक मत देणे हे शेड्यूल्ड कास्ट्स्च्या प्रत्येक मतदाराचे कर्तव्य आहे.

भाषण संपविण्यापूर्वी पंजाबातील प्रत्येक मतदाराला मी अशी विनंती करतो की त्याने फेडरेशनच्या उमेदवाराला मत द्यावे आणि आपल्या उन्नतीचा मार्ग मोकळा करावा.



# २८१

# आमचे सच्चे प्रतिनिधी विधानसभा आणि संसदेत असले तरच ते आपल्या हितासाठी लढा देतील

दिनांक २८ ऑक्टोबर १९५१ रोजी लुधियाना येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण झाले, ते आपल्या भाषणात म्हणाले,

प्रिय बंधु आणि भगिनींनो,

माझ्या लोकांशी बोलण्यासाठी लुधियानाला येण्याची ही माझी पहिलीच वेळ आहे. यापूर्वी बरेचदा या ठिकाणी येण्यासंबंधी योजना मी आखली होती परंतु अनिवार्य परिस्थितीमुळे मला तसे करता आले नाही. आपण सर्वजण येथे एकत्र जमला आहात हा किती मंगलदायक प्रसंग आहे.

तुम्हाला माहितच आहे की दोन किंवा तीन महिन्यानंतर निवडणुका घेतल्या जाणार असून त्यात अनेक पक्ष भाग घेणार आहेत. शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनही या निवडणुकीत आपले उमेदवार उभे करणार आहे. विधानसभेसाठी व मध्यवर्ती संसदेसाठी शेड्यूल्ड कास्ट्स्साठी ठेवलेल्या सर्व राखीव जागा आणि जेथे आमचे मतदार पुरेशा संख्येत आहेत अशा काही सर्वसामान्य जागी आम्ही निवडणूक लढविणार आहोत. आमचे उमेदवार विजयी होतील अशी मला आशा आहे. आमच्या उमेदवारांचे यश मुख्यतः आमच्या मतदारांवरच अवलंबून असते. आपल्या सर्व मतदारांनी आपल्या उमेदवारासच मते दिली तर ते यशस्वी होतील अशी माझी खात्री आहे. म्हणून शेड्यूल्ड कास्ट्स् आणि अन्य मागासवर्गीय लोकांची जी शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन ही एकमेव संघटना आहे, त्या संघटनेने उभ्या केलेल्या उमेदवारांनाच सर्व शेड्यूल्ड कास्ट्स्च्या लोकांनी आपली मते द्यावीत अशी मी विनंती करतो.

भारतावरील ब्रिटिश सत्तेच्या काळात ब्रिटिशांनी आम्हाला कसे फसविले हे मी तुम्हास सांगतो. ते भारतापासून शेकडो मैल दूर राहात असले तरी भारतात त्यांचे राज्य स्थापण्यात यशस्वी झाले. प्रथमतः ईस्ट इंडिया कंपनी भारतात आली तेव्हा तिचा हेतू केवळ व्यापार करण्याचा होता. क्रमाक्रमाने येथे आपले राज्य स्थापावे याबद्दल इंग्रज लोक कार्योत्सुक झाले. हा त्यांचा हेतू साध्य

---

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे : संपा. मा. फ. गांजरे, खंड ७, पृ. ५७–६५.

करण्यास ते समर्थ कसे बनले ? भारतात त्यांचे स्वतःचे सैन्य नव्हते. इंग्रजाच्या स्वतःच्या सैन्याशिवाय ते भारतातील सर्व राजामहाराजांना जिंकण्यास समर्थ कसे ठरले यांचे स्पष्टीकरण कोणीही करू शकला नाही. मी आता या प्रश्नाचे उत्तर देणार आहे. ज्यांना त्यांचेच देशवासीलोक ' अस्पृश्य ' म्हणून संबोधित होते अशा शेड्यूल्ड कास्ट्स्च्या लोकांच्या मदतीने ब्रिटिश लोक भारताचे राज्यकर्ते बनले. हे अस्पृश्य लोक निरक्षर होते आणि सवर्ण हिंदुंनी त्यांना दिलेली वागणूक मानहानीकारक होती. त्यांना चरितार्थाचे कोणतेही साधन नव्हते आणि त्यांना नेहमी सवर्ण हिंदुंच्या दयेवर अवलंबून राहावे लागत असे. जे काही घडले ते योग्य होते हे तुमच्या मनावर बिंबवावे असा माझा हेतू नाही. परंतु दुसऱ्या एका मुद्यावर मला जोर द्यावयाचा आहे. मला हे दाखवून द्यावयाचे आहे की ज्या लोकांना भारतात राज्य स्थापण्यासाठी मदत केली त्यांनीसुद्धा आमच्या लोकांना अशा निकृष्टपणे वागविले. ह्या ब्रिटिशांसाठी आमच्या लोकांनी लढाईत आपले प्राण गमावले; परंतु त्यांना मोबदल्यात काय मिळाले ? लाभ कुणाला झाला ? ब्रिटिशांना शेड्यूल्ड कास्ट्स्च्या लोकांनी मदत केलेली असताही त्यापासून ब्राह्मण आणि अन्य सवर्ण हिंदुंनी पूर्ण लाभ उपटले. ब्रिटिशांनी त्यांच्याच मुलांना शिकविले आणि सर्वप्रकारची आर्थिक मदत त्यांनाच दिली व आमच्या लोकांकडे मुळीच लक्ष देण्यात आले नाही. याचा परिणाम असा झाला की, गरीब बिचाऱ्या शेड्यूल्ड कास्ट्स्च्या लोकांच्या जीवावर सवर्ण हिंदू संपन्न झाले आणि अस्पृश्य लोक जसेच्या तसेच राहिले. आजपर्यंत शेड्यूल्ड कास्ट्स्चे कुटुंब सुसंपन्न का नाहीत, त्यांची मुले शिक्षित का नाहीत आणि ते मागासलेले का आहेत याचे हेच कारण होय. परिणामतः सैन्यातील, पोलीस दलातील आणि प्रशासकीय खात्यातील महत्त्वाची पदे सध्या सवर्ण हिंदुंच्याच हातात आहेत. ब्रिटिश लोकांनी आमच्या उन्नतीसाठी काहीतरी करावयास पाहिजे होते परंतु त्यांनी आमच्यासाठी काहीही केले नाही. १८५८ मध्ये बंड झाले. त्या बंडाची कारणे काय होती ? कारण आमच्या लोकांसाठी काहीतरी करण्यास ब्रिटिश लोक चुकले; सैन्यातील आमच्या लोकांना त्यांच्याविरुद्ध बंड करणे भाग पडले. जेव्हा हे बंड आटोक्यात आले आणि असे दिसून आले की सैन्यातील आमच्या लोकांनी ब्रिटिशांच्या विरुद्ध बंड पुकारले होते तेव्हा त्यांनी त्यापुढे आमच्या लोकांची सैन्यामध्ये भरती करणे बंद केले. त्यांच्याऐवजी हिंदू आणि राजपूतांची सैन्यात भरती करण्यात आली. अशाप्रकारे आपल्या लोकांचे उत्पन्नाचे मुख्य साधन नष्ट झाले. १९४७ साली जेव्हा इंग्रजांनी भारत सोडला तेव्हा इंग्रज लोक भारतात येण्यापूर्वी अस्पृश्य ज्या स्थितीत होते त्याच शोचनीय स्थितीत होते. राज्यसत्तेचे हस्तांतरण करतेवेळी इंग्रजांनी सर्व सत्ता सवर्ण हिंदुंच्या हाती सोपविली.

आपणाला काहीसुद्धा मिळाले नाही. ज्यांना न्यायाबद्दल जरासुद्धा आस्था नाही अशा आमच्या देशवासी हिंदुंच्या दयेवर आम्हाला सोडून देण्यात आले. यावरून गरीब बिचाऱ्या शेड्यूल्ड कास्ट्स्च्या लोकांना अन्य लोक कशी वागणूक देतात हे तुम्ही समजू शकता. आजपर्यंत आपण मागासलेले का राहिलो याचे हे कारण आहे. आता, मी तुमच्यासमोर एक प्रश्न ठेवू इच्छितो. अजूनही तुम्हाला तसेच मागासलेले राहून सवर्ण हिंदुंच्या हाताखाली गुलाम होऊन राहावयाचे आहे काय ? जेव्हा आर्य भारतात आले तेव्हा वर्णव्यवस्था कार्यरत झाली. लोकांना त्यांच्या जन्मावरून सामाजिक दर्जा देण्यात आला. काहींना ब्राह्मण म्हणण्यात आले, काहींना क्षत्रिय, काहींना वैश्य, काहींना शूद्र आणि इतरांना 'अस्पृश्य.' या श्रेणीनुसार अस्पृश्य सर्वांच्या खालचे आणि समाजापासून पूर्णतः वेगळे होते. सवर्ण हिंदू आणि अस्पृश्य यांच्यातील संबंध पाय आणि जोडा अशाप्रकारचा आहे. आपण जेव्हा घरात शिरतो तेव्हा जोडा घराबाहेरच ठेवतो. त्याचप्रमाणे 'अछूत' लोकांना समाजाच्या बाहेर ठेवण्यात आले आणि त्यांना कसल्याही प्रकारचे अधिकार देण्यात आले नाही. सवर्ण हिंदुंकडून आम्हाला देण्यात आलेली अपमानकारक वागणूक आम्ही शेकडो वर्षे सहन केली आणि अजूनही सामाजिक, आर्थिक आणि राजकीयदृष्ट्या होत असलेला जुलूम आम्ही सोशीतच आहोत.

अनेक वर्षे झगडल्यानंतर आपण काही राजकीय हक्क प्राप्त केलेले आहेत आणि त्यांचा समावेश खुद्द भारतीय राज्य घटनेतच करण्यात आला आहे. वीस वर्षाइतक्या लांब काळापर्यंत मी महात्मा गांधींच्या विरुद्ध लढा दिला. आपणाला कोणतेही वेगळे अधिकार देण्याच्या कल्पनेच्या ते विरुद्ध होते. त्यांचा युक्तिवाद असा होता की, जर अस्पृश्यांना वेगळे हक्क देण्यात आले तर ते हिंदू जीवन पद्धतीत येण्याला कधीही पात्र ठरणार नाहीत. याशिवाय ते नेहमीसाठी हिंदुंपासून तुटक राहातील. गोलमेज परिषदेतही आमच्या स्वतंत्र मतदारसंघाच्या मागणीला महात्मा गांधींनी विरोध केला. इतक्या मोठ्या काळपर्यंत झगडून आपण थोडेसे राजकीय हक्क मिळविलेले आहेत. आता शेड्यूल्ड कास्ट्स्साठी राखीव असलेल्या जागेवरून आपण आपले प्रतिनिधी विधानसभा आणि संसदेत पाठवू शकतो.

हे आपले हक्क हिसकावून घेण्यासाठी बरेच पक्ष कार्यरत झालेले आहेत. आपल्या लोकांसाठी राखीव असलेल्या जागेवरून आपले अनुचर निवडून आणण्यासाठी आपली मते त्यांना मिळावीत यासाठी हे पक्ष कार्यरत आहेत. त्यांचा हेतू तुम्ही चांगल्यारीतीने समजू शकता. शेड्यूल्ड कास्ट्स्चे

लोक जेथे आहेत आणि जसे आहेत तसेच त्यांनी राहावे, त्यांनी राजसत्ता प्राप्त करू नये म्हणजे आज आपले लोक करीत असलेल्या तिरस्करणीय धंद्याची आबाळ होणार नाही असे त्यांना वाटते. म्हणून येत्या निवडणुकीत तुमच्या मताबद्दल तुम्ही सतर्क राहिले पाहिजे. आमच्या मतांच्या बळावर केवळ आपले खरे प्रतिनिधीच निवडल्या गेले पाहिजेत, दुसरे नाही, याची तुम्ही काळजी घ्यावी. असे झाले तरच तुमचे जे हक्क राज्यघटनेत समाविष्ट झाले आहेत ते सुरक्षित राहतील.

जर आपले खरे प्रतिनिधी विधानसभा आणि संसदेत निवडल्या गेले नाहीत तर आपण स्वातंत्र्याचा उपभोग घेऊ शकणार नाही. आपल्या लोकांकरिता स्वातंत्र्य हे एक नाटक ठरेल. हे स्वातंत्र्य हिंदू लोकांचे स्वातंत्र्य होईल, आपल्यासाठी नव्हे. परंतु जर आपले सच्चे प्रतिनिधी विधानसभा आणि संसदेत असले तर ते आपल्या हितासाठी लढा देतील आणि आपली दु:खे दूर करतील. फक्त तेव्हाच आपल्या मुलांना योग्य असे शिक्षण मिळेल; फक्त तेव्हाच आपले दारिद्र्य दूर होऊ शकेल आणि फक्त तेव्हाच जीवनाच्या सर्व क्षेत्रात आपणाला बरोबरीचा वाटा मिळेल. भारतीय राज्यघटनेमध्ये जरी शेड्यूल्ड कास्ट्स्च्या लोकांना खास हक्क देण्यात आलेले आहेत तरीसुद्धा अन्य पक्ष विशेषत: काँग्रेस त्यामध्ये विनाकारण ढवळाढवळ करीत आहे. शेड्यूल्ड कास्ट्स्साठी राखीव असलेल्या जागांवर निवडणुकीसाठी ते आपले अनुचर उभे करीत आहेत. काँग्रेसच्या तिकिटावर निवडून आलेल्या लोकांना त्यांच्या धन्याच्या इच्छेनुसार वागावे लागते त्यामुळे ते आमच्या हितांचे संरक्षण कसे करु शकतील ? आमच्यासाठी ते काय करु शकतील ?

अस्पृश्य लोकांसाठी राखीव असलेल्या जागेवरुन काँग्रेसच्या तिकिटावर संसदेमध्ये निवडून गेलेल्या सभासदासंबंधीची माहिती मी तुम्हास सांगू इच्छितो. त्यांची संख्या जवळजवळ ३० होती आणि मागील चार वर्षांपासून ते संसदेत होते. या ३० सभासदांपैकी एकानेही अस्पृश्यांच्या गाऱ्हाण्याबद्दल एकही प्रश्न संसदेत कधी विचारला नांही. जर कोणी एखादा प्रश्न संसदेत उपस्थित केला असेल तर सभाध्यक्षांनी त्याला परवानगी दिली नाही आणि तो विषय तेथेच संपला. जर एखादेवेळी सभाध्यक्षांनी उदार होऊन एखादा प्रश्न सभेच्या कामकाजात समाविष्ट करण्याची परवानगी दिलीच तर काँग्रेसचा मुख्य प्रतोद त्या संबंधित सभासदाकडे जाऊन तो प्रश्न छापण्याच्या अगोदरच परत घेण्यास सांगत असे. एखादे वेळी चुकून जर असा प्रश्न छापण्यात आलाच तर त्याचे जेव्हा उत्तर देण्याची वेळ येई तेव्हा प्रश्न विचारणाऱ्या त्या सभासदाने गैरहजर राहावे असे त्या सभासदाला मुख्य प्रतोद सांगत असे आणि ज्याने प्रश्न

विचारला तोच सभासद हजर नसल्यामुळे त्या प्रश्नावर चर्चा होत नसे. गेला एक महिना अंदाजपत्रकावर संसदेत चर्चा चालू आहे. यावेळी कोणीही सभासद या अंदाजपत्रकावरील चर्चेत भाग घेऊन अशाप्रकारची तरतूद त्याच्या समाजासाठी किंवा पक्षासाठी करण्यात यावी असे मत मांडू शकतो. तो निदर्शनास आणू शकतो की, इतकी मोठी रक्कम अमुक तमुक अनावश्यक योजनेवर खर्च होत आहे आणि अमुक तमुक महत्त्वाच्या योजनांकडे दुर्लक्ष होत आहे. एकाही हरिजन सभासदाला एखादा 'कटमोशन' मांडताना मी या चार वर्षाच्या काळात पाहिलेले नाही. हे सर्व काँग्रेसच्या दंड्यामुळे घडते. सभासदांना जर काही ठराव मांडावयाचा असेल तर तो ठराव प्रत्यक्ष मांडण्यापूर्वी बरेच आधी त्याला मुख्य प्रतोदाची परवानगी हासिल करावी लागते. या चार वर्षात या सभासदांनी कधीही बिल मांडले नाही. अस्पृश्य, भारतीय ख्रिश्चन आणि अँग्लो इंडियन इत्यादी लोकांसाठी राज्यघटनेद्वारा जे अधिकार दिलेले आहेत ते जर काँग्रेसच्या द्वाराने त्यांच्या शत्रुंनी काबीज केले तर त्या अधिकाराचा फायदा काय ?

जर तुम्ही काँग्रेसला मते दिलीत तर तुम्हाला नेहमीसाठी दुःख भोगावे लागेल हा मुद्दा मी स्पष्ट करू इच्छितो. काँग्रेसच्या तिकिटावर निवडून गेलेले आपले प्रतिनिधी विधानसभा आणि संसदेत तोंड मिटून बसतील. शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन हीच आपली एकमेव संघटना असल्यामुळे तिच्या तिकिटावर निवडून गेलेले आपले सच्चे प्रतिनिधीच आपल्या हितांचे संरक्षण करू शकतात. काँग्रेसमध्ये राहून आपली दुःखे दूर करण्याचा काही संभव असता तर ती संघटना मी अव्हेरली नसती. मला माहीत आहे की काँग्रेसजवळ रग्गड पैसा आहे आणि त्याद्वारे ती मते विकत घेण्याचे प्रयत्न करील. परंतु तुम्ही याबाबत सतर्क राहिले पाहिजे. मला जर हवे असते तर काँग्रेस सरकारात मी नेहमीसाठीच राहू शकलो असतो आणि निश्चितच मला तेथे एखादी चांगली जागा मिळाली असती. परंतु जर माझा हेतू स्वार्थी असता आणि माझ्या समाजासंबंधी मला काही आस्था नसती तरच मी तसे करू शकलो असतो. मला एखाद्या लायसन्सची अगर परमिटची आवश्यकता असती तरच मी तिथे राहिलो असतो. लायसन्स आणि परमिट मिळविणारा माणूस समाजहिताचा बळी देऊनच तसे करू शकतो. काँग्रेस सरकारात मी असतानाच्या काळात आलेला हा माझा अनुभव आहे.

इंग्रजांनी मनात आणले असते तर ते त्यांच्या येथील वास्तव्याच्या काळात आपल्या समाजाच्या उन्नतीसाठी काही काम करू शकत होते. परंतु त्यांनीही आम्हाला फसविले. तो काळ आता निघून गेला आणि दुसरे अवस्थांतर आता अस्तित्वात आले आहे. इंग्रज आम्हाला सोडून गेले. दुसरे लोक आता राज्य-सत्तेवर आले. यावेळी तरी आपण सतर्क राहिलो नाही आणि डोळे मिटून बसलो

तर आपला सर्वनाश होईल. आजपर्यंत जो जुलूम तुम्ही सोशीत आहात तो तुमच्या भावी पिढ्यांना सोसावा लागू नये अशी तुमची इच्छा असेल तर तुम्हाला आताच त्यासाठी काहीतरी केले पाहिजे. जेव्हा तुम्ही झाड लावता तेव्हा काही काळानंतर तुम्हाला फळे प्राप्त होतात. मी तुमच्या मनावर हे बिंबवू इच्छितो की, विधानसभा आणि संसदेतील राखीव जागा फक्त दहा वर्षासाठी आहेत. भारतात अस्पृश्यता प्रचलित असेपर्यंत त्या राहाव्यात असे मला वाटत असले तरी काँग्रेसच्या तिकिटावर जे आपले लोक संसदेचे सभासद झाले त्यांनीच मला विरोध केला. अशा स्थितीत उच्चवर्णीय लोकांबद्दल बोलावयासच नको. काहीच नसण्यापेक्षा थोडे जरी मिळत असेल तर बरे असा विचार करून दहा वर्षेपर्यंत राखीव जागा असाव्यात याला मी संमती दिली आणि आमच्या लोकांसाठी थोडे फार मिळविले. या राखीव जागा फक्त येत्या दोन निवडणुकीपुरत्याच आहेत आणि त्या काळापर्यंतच काँग्रेससारखे हितसंबंधी पक्ष तुमच्याकडे येतील व मते मागतील. अशातऱ्हेने हा १० वर्षाचा कालावधी निघून जाईल आणि या काळात वाढ करा अशी मागणी करण्यासाठी तुमचा कोणीही माणूस तेव्हा संसदेत असणार नाही. तेव्हा तुम्ही काय करणार आहात असे मी तुम्हास विचारु इच्छितो. तेव्हा हे काँग्रेसवाले तुमच्याकडे येऊन त्यांच्या तिकिटावर निवडणुकीसाठी उभे राहाण्याची विनंती करतील काय ? निश्चितच नाही. ते इतके मूर्ख नाहीत. तुम्हा लोकांना ते मूर्ख बनवू इच्छितात. आज जे लोक काँग्रेसचे तिकिट मिळविण्याच्या प्रयत्नात असलेले दिसतात, त्यांच्या तोंडावरही तेव्हा हे काँग्रेसवाले थुंकणार नाहीत. म्हणून तुम्ही सर्वांनी या समस्येवर विचार करावा आणि नंतरच तुम्ही कोणत्या उमेदवाराला मत द्यावे ते ठरवा.

कोणत्याही पक्षाजवळ सत्ता तरी असली पाहिजे किंवा पैसा तरी असला पाहिजे. आपल्या समाजाजवळ पैसाही नाही आणि सत्ताही नाही. आपण या उच्चवर्णीय हिंदुंच्या दयेवर खेड्यांमधून थोड्या थोड्या संख्येने राहात आहोत. बनिया आणि मारवाडी इत्यादी लोकही सत्ताधिष्ठित नाहीत. परंतु त्यांच्याजवळ पैसा आहे. पैशाच्या जोरावर ते वाटेल ते विकत घेऊ शकतात. म्हणून तुमच्या स्वतःसाठी काहीतरी करण्याची ही एक सुसंधी आहे. तुम्ही जर संघटित झालात तर तुमच्या हितसंबंधांचे रक्षण करण्यासाठी तुम्ही तुमचे प्रतिनिधी विधानसभा आणि संसदेत पाठवू शकता; नाहीतर तुमचा नाश होईल. म्हणून या गोंधळातून तुमच्या समाजाला बाहेर काढण्यासाठी शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या ध्वजाखाली तुम्ही संघटित झाले पाहिजे. आपले सच्चे प्रतिनिधी निवडण्याकरिता प्रत्येक अस्पृश्याने फेडरेशनला मदत करावी. पुष्कळ पक्ष तुमच्याकडे येऊन मताची मागणी करतील परंतु त्यांचे ऐकून चुकीच्या मार्गाने जाऊ नका.

काही दिवसांपूर्वी पंडित नेहरू येथे आले होते. असे सांगण्यात आले की दोन किंवा तीन लाख लोक त्यांचे भाषण ऐकण्यासाठी येथे जमले होते. किती लोक तेथे होते हे काही मला माहीत नाही. काल जेव्हा मी जालंदरला भेट दिली तेव्हा दोन लक्षांपेक्षाही जास्त लोक तेथे जमले होते परंतु हिंदू आणि काँग्रेसी वर्तमानपत्रांनी तेथे अंदाजे फक्त ३५ हजार लोक जमल्याचे लिहिले आहे. मला तुम्हास सांगावयाचे आहे ते हे की, जर काँग्रेसची एखादी परिषद असली तर श्रोते अगदी थोडे असले तरीसुद्धा ते प्रसिद्ध करतील की या परिषदेला फार मोठा जनसमूह जमला होता. पाच असले तर पन्नास, पन्नासाला ते पाचशे म्हणतील, पाचशेला ते पाच हजार म्हणतील आणि पाच हजाराला ते पाच लाख जमले म्हणून लिहितील. या वर्तमानपत्रांनी अशाप्रकारे खोटी माहिती दिल्याबद्दल आणि खोटी टीका केल्याबद्दल मला काहीच नवल वाटत नाही. ही वर्तमानपत्रे पुष्कळ वर्षापासून माझ्यावर टीका करीत आली आहेत. तरीसुद्धा माझी शारीरिक आणि मानसिक प्रगती होतच आहे. फार मोठ्या जनसमूहासमोर भाषण देण्याची मला आवड नाही. मला जे हवे आहे ते इतकेच की, या हिंदू लोकांकडून होणाऱ्या अत्याचारांना तोंड देण्याकरिता आमच्या लोकांनी संघटित व्हावे, माझे विचार त्यांनी ऐकावे एवढीच माझी इच्छा आहे. मग ते फार मोठया संख्येने जमोत की लहान संख्येने, ही गोष्ट महत्त्वाची नाही.

प्रत्येक राजकीय पक्षाने आपला जाहीरनामा प्रसिद्ध केला आहे. प्रत्येक पक्षाने तो निवडून आल्यास हे करू आणि ते करू अशी आश्वासने दिली आहेत. शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशननेही आपला जाहीरनामा प्रसिद्ध केला आहे. सर्वांच्या आधी काँग्रेसने आपला जाडजूड जाहीरनामा प्रसिद्ध केला. परंतु जेव्हा त्यांना समजून आले की सर्वसाधारण लोकांना तो आकलन होणार नाही तेव्हा त्यांनी त्यात बदल केला आणि त्याला लहान रूप देण्यात आले. दिवसेंदिवस त्यांचा जाहीरनामा लहान लहान होत जाईल आणि एक दिवस असा येईल की, काँग्रेसचा जाहीरनामा राहाणार नाही असे मला वाटते. जाहीरनाम्यात काय असावे आणि काय नसावे हे मी तुम्हास सांगू इच्छितो. माझे सर्व राजकीय पक्षांना आव्हान आहे की, त्यांनी सर्वात उत्तम जाहीरनामा कोणता हे निवडण्यासाठी एक कमिटी बनवावी. मला मुळीसुद्धा शंका नाही की आमचा जाहीरनामाच सर्वश्रेष्ठ ठरेल. सर्व पक्षांनी आपापल्या जाहीरनाम्यात जनतेला नाना प्रकारची आश्वासने दिलेली आहेत. आश्वासने देणे फार सोपे आहे परंतु ती प्रत्यक्षात उतरविणे अत्यंत कठीण आहे. एका गोष्टीचे तुम्ही आश्वासन देत असाल तर तुम्ही शंभर गोष्टीचेही आश्वासन देऊ शकता. जाहीरनामा हा केवळ आश्वासनांची जंत्री असू नये. देशाला ज्या

समस्यांशी तोंड द्यावे लागते त्यांचा जाहीरनाम्यात विचार असला पाहिजे आणि त्या समस्या कशा सोडवाव्या हेही असले पाहिजे. काँग्रेसच्या जाहीरनाम्यात अशा प्रकारचे काहीतरी आहे काय ? काँग्रेसच्या जाहीरनाम्यात फक्त एकाच गोष्टीवर भर देण्यात आला आहे, ती गोष्ट म्हणजे मुस्लिम समस्या. कोणीतरी या मुद्यावर सहमत होऊ शकतो काय ? भारत अभंग असताना आणि जेव्हा पाकिस्तान नव्हते तेव्हा अर्थात मुस्लिम समस्या होती. परंतु तेव्हासुद्धा देशासमोर असलेली ही एकमेव समस्या नव्हती, मुस्लिमांनी फार मोठ्या संख्येत पाकिस्तानात स्थलांतर केले असून फक्त हिंदू, शिख आणि अन्य अल्पसंख्य लोक भारतात आहेत. भारत आता मुस्लिम-समस्येला तोंड देत आहे असे तुम्हास वाटते काय ? मुसलमानांपेक्षा जे दसपट गरीब आणि मागासलेले आहेत अशा दलित लोकांसाठी काहीही करावयास नको हे तुम्हास मान्य आहे काय ? अनुसूचित जाती, आदिवासी आणि गुन्हेगार जमाती यांच्याकडे सरकारने सर्वात जास्त लक्ष द्यावयास पाहिजे परंतु काँग्रेसवाले सांगतात की लोकांनी जातीयवादी होऊ नये आणि मागास जातीकरिता काही खास तरतुदीची मागणी करू नये. भारतातील दुसरी समस्या दारिद्र्याची आहे. भारतातील लोक अत्यंत दरिद्री आहेत. ते इतके दरिद्री आहेत की ९० टक्के लोकांना खावयास योग्य अन्नही मिळत नाही, त्यांना कपडे मिळत नाहीत, त्यांना निवारा नाही. कोट्यावधी रुपयांचे अन्नधान्य दरवर्षी परदेशातून आयात केले जाते. आम्हाला जर अन्नधान्यही परदेशातून आयात करावे लागते आणि त्याच्या खरेदीवर व आयातीवर एवढी मोठी रक्कम खर्च करावी लागते तर आमचा निभाव कसा लागेल? परंतु या सर्व गोष्टींकरिता काँग्रेसवाल्यांच्या मनात काहीच स्थान नाही. त्यांच्यासमोर एकच प्रश्न आहे आणि तो म्हणजे मुस्लिम समस्या !

मला तुम्हास सांगावयाचे आहे की, येत्या निवडणुकीत आम्ही शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे उमेदवार उभे करीत आहोत. शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन हा सर्व मागासवर्गीय लोकांचा प्रातिनिधीक पक्ष आहे. प्रत्येक मागासवर्गीयाला त्यात प्रतिनिधीत्व देण्यात येईल. त्याची कोणीही भीती बाळगू नये. चांभार आणि भंगी हे सर्व समसमान आहेत. आपण एका जमातीचे एक लोक आहोत. आपण आपसात भांडू नये. मी सर्व पुरुष आणि स्त्रियांना विनंती करू इच्छितो की मतदानाच्या दिवशी सर्व कामे बाजूला सारून मतदान केन्द्रावर जाऊन मतदान करावे. आधीच आपली मते पुरेसी नाहीत आणि त्या दिवशी जर त्यांनी मतदान केले नाही तर ते आपल्या भल्याचे होणार नाही. आपण प्रतिनिधीत्वाशिवाय राहू. मतदानाचा दिवस अनुसूचित जातीच्या लोकांसाठी जीवन-मरणाचा दिवस आहे.

येत्या निवडणुकीत भाग घेणाऱ्या प्रत्येक राजकीय पक्षाला एक पक्षचिन्ह देण्यात आले आहे. आपल्या फेडरेशनचे चिन्ह ' हत्ती ' आहे. आपल्या लोकांच्या मनात कोणताही गोंधळ निर्माण होऊ नये म्हणून मी हे चिन्ह निवडले आहे. काही पक्षांनी बैल, घोडा आणि गाढव अशी चिन्हे निवडली आहेत ठळकपणासाठी मी ' हत्ती ' निवडला आहे.

आपल्या निवडीच्या एकाच उमेदवाराला आपल्याजवळील सर्व मतपत्रिका या निवडणुकीत देता येणार नाहीत. कारण यावेळी ' एकत्रित ' (Cumulative) मतदान पद्धती नाही. आता ' विभाजित ' (Distributive) मतदान पद्धती आहे. म्हणून निरनिराळ्या उमेदवाराला आपल्याजवळील मतपत्रिका द्यावयाच्या आहेत; एक सर्वसाधारण जागेवरील उमेदवाराला आणि दुसरी राखीव जागेवरील उमेदवाराला. राखीव जागेवरून निवडणूक लढविणाऱ्या आपल्या उमेदवाराला आपण आपल्या जवळील दोन्ही मते देवू शकत नाही. त्याला आपण एकच मत देवू शकतो व सर्वसाधारण जागेवर उभ्या असलेल्या दुसऱ्या कोणालातरी दुसरे मत द्यावे लागणार आहे. म्हणून जो पक्ष आपले दुसरे मत आमच्या उमेदवारास व आपले दुसरे मत आपण त्यांना देऊ अशा दुसऱ्या पक्षाशी आपण समझोता केला पाहिजे. आपली हातमिळवणी कोणत्या पक्षाशी करावी हे आपण अजून ठरविलेले नाही. पुष्कळ पक्ष आमचेकडे मैत्रीसाठी आले परंतु अंतिम स्वरूपाचे अजून काही ठरविलेले नाही, बोलणी चालू आहेत. एखाद्या पक्षाशी हातमिळवणी करण्यापूर्वी आपणाला खूप विचार केला पाहिजे. परंतु कोणत्यातरी पक्षाशी आपणाला मैत्री केलीच पाहिजे.

शेवटी मला हेच सांगायचे आहे की पंजाब, उत्तर प्रदेश आणि अन्य दूरदूरच्या प्रदेशातून हजारो लोक दिल्लीला माझ्याकडे आपली गाऱ्हाणी सांगण्याकरिता येत असतात. काहींचे गाऱ्हाणे असते की जमीनदाराने त्यांना मारपीट केली आणि जेव्हा त्यांनी संबंधित अधिकाऱ्याकडे दाद मागितली तेव्हा त्याच्याविरुद्ध निर्णय देण्यात आला, कारण अधिकाराच्या जागेवर असलेले लोक सवर्ण हिंदू होते. अशा प्रकारच्या इतक्या तक्रारी आहेत की रिकाम्या हाताने त्यांचा परामर्श घेणे असंभव आहे. पुष्कळ लोक निराश होऊन आपल्या गावी परत जातात. म्हणून दिल्लीत एक इमारत उभारण्याचे मी ठरविले आहे. तेथे आपला एक वकील राहील. तो आपल्या लोकांच्या तक्रारींकडे लक्ष देऊन त्या त्या प्रकरणात सल्ला देईल. आपण यापूर्वीच या कामासाठी दिल्लीत एक जमिनीचा तुकडा खरेदी केला आहे; त्या जागेवर इमारत उभारावयाची आहे. तेथेच आपल्या फेडरेशनचे कार्यालय राहील. बाहेरून येणाऱ्या

लोकांचे तेथे स्वागत होईल आणि त्यांच्या तक्रारी ऐकून घेतल्या जातील. या बिल्डिंगच्या बांधकामासाठी अत्यंत आवश्यक असूनही पुरेसा पैसा नाही म्हणून तुम्हा सर्वांना माझी विनंती आहे की तुम्ही तुमच्या शक्तीनुसार वर्गणी द्यावी. अशाप्रकारे आपला हेतू आपण साध्य करू शकू. दिल्लीचे बाबा तुलादास हे इमारत निधी गोळा करण्यासाठी पंजाबचा दौरा करतील. या उदात्त कार्यासाठी तुम्ही सर्वांनी उदारपणे मदत करावी अशी पुन्हा एकदा मी विनंती करतो.



# २८२

# देशाच्या आपत्तीच्या प्रसंगी आम्ही आघाडीवर राहू

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी पंजाबात ऑक्टोबर महिन्याचे अखेरीस धावता दौरा काढला तेव्हा पतियाळात त्यांचे दिनांक २९ ऑक्टोबर १९५१ रोजी जंगी स्वागत झाले. त्यावेळी श्री. बापूसाहेब राजभोज शिवाय शेठ किसनदास, श्री. सुलेख, श्री. मिहानसिंग हे पंजाब मधील दलित फेडरेशनचे प्रमुख पुढारी हजर होते. बाबासाहेब आपल्या भाषणात म्हणाले,

भगिनींनो आणि बंधुंनो,

माझी तब्येत ठीक नाही हे श्री. राजभोज यांनी आपणास सांगितलेच आहे. मी थोडक्यात माझ्या पक्षाची भूमिका स्पष्ट करतो आणि कोणत्या गोष्टींना या राजकारणाच्या आखाड्यात उतरले असताना कसे तोंड दिले पाहिजे ते सांगतो.

अस्पृश्यांवर अत्याचार करण्याच्या व त्यांच्या महत्त्वाकांक्षेला खो घालण्याच्या प्रथेस काँग्रेस व सवर्ण हिंदुंनी वेळीच आळा घातला नाही तर आम्हास त्यांचा बिमोड करण्यासाठी वेगळाच मार्ग अवलंबिणे भाग पडेल . काँग्रेसने आपले धोरण वेळीच बदलले पाहिजे. अस्पृश्यांना पोषक असेच ते असले पाहिजे.

ही निवडणुकीची वेळ आहे. यातच देशातील सारे पक्ष आणि त्यांचे कार्यकर्ते गुंतले आहेत. निवडणूक ही महत्त्वाची गोष्ट आहे यात शंका नाही. निदान आम्हाला तरी येती निवडणूक ही अत्यंत महत्त्वाची म्हणजे जीवन मरणाची बाब वाटते. यासाठी या प्रश्नाचा संपूर्ण खल होणे व त्यावर योग्य तो तोडगा काढणे अत्यंत आवश्यक आहे.

काँग्रेस हा मोठ्यात मोठा राजकीय पक्ष आहे. हा पक्ष आज साठ वर्षे टिकून आहे. शिवाय आज तो अधिकारारूढ झालेला आहे. चार वर्षे या पक्षाने राज्योपभोग घेतला आहे. लोकांना या पक्षाकडून दिमाखाने असे सांगण्यात येते की काँग्रेस शिवाय लोकांचे व देशाचे कुणी भले करू शकणार नाही, त्यासाठी काँग्रेसलाच मतदान केले पाहिजे. काँग्रेसला अधिकार योग परत हवा आहे. यासाठी गरीब लोकांना पिळून खाणाऱ्या काँग्रेसला या लोकांनी निवडून दिले पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे. काँग्रेसकडे भाडोत्री प्रचारक पुष्कळ आहेत व या पक्षाकडे चिक्कार पैसा असल्यामुळे ते पोसले जातात. त्यामुळे काँग्रेस लोकांवर वजन आणू शकते.

---

जनता : ३ नोव्हेंबर १९५१.

यासाठी काँग्रेसमध्ये खरा प्रकार काय आहे याचा शोध लावला पाहिजे. एकतर्फी प्रचारामुळे कुणाची दिशाभूल होता कामा नये. अन्न-धान्य व कपड्याचा प्रश्न काँग्रेस सोडवू शकली नाही हे आपणा सर्वांस माहित आहे. उलट ती एक बिकट बाब होऊन बसली आहे.

निर्वासितांचे प्रश्न सुद्धा अधिकारारूढ असलेली काँग्रेस सोडवू शकली नाही. मग ही काँग्रेस परत अधिकारारूढ झाली तर हे निकडीचे प्रश्न कसे सोडवील ? आपली नालायकी तर चार वर्षाच्या राज्यकारभारात सिद्ध करून दाखविली आहे. थोडक्या वेळात एवढे महत्त्वाचे प्रश्न सोडविणे अशक्य होते अशी सबब काँग्रेस सांगेल. तरी पण काँग्रेसच्या मध्यवर्ती व प्रांतिक सरकारांवर हुकूमत गाजविणाऱ्या काँग्रेस हायकमांडने निदान देशाला वशिलेबाजी, लाचलुचपत, नैतिक ऱ्हास या तीन महान रोगांपासून मुक्त केले पाहिजे होते. काँग्रेसच्या मनात असते तर ती या गोष्टीचा नायनाट करू शकली असती. पण ह्या विषाचा अंमल काँग्रेस राजकारणात इतका भिनला आहे की त्याचे निर्मूलन होणे शक्य नाही, शिवाय लहानांपासून थोरांपर्यंत सारे एकाच माळेचे मणी बनले आहेत.

काँग्रेस मंत्रिमंडळाकडून आपले काही कामकाज करून घ्यावयाचे असेल तर लाच ही लावलीच पाहिजे नाहीतर अशांचा अर्ज फेटाळला गेला म्हणून समजा. हे आरोप मी करीत नाही. खुद्द काँग्रेसच्या गोटातून केले जातात व वशिलेबाजी, लाचलुचपत आणि काळाबाजारातील काही भाग काँग्रेस मंत्रिमंडळ घेते असे उघड बोलले जाते.

मद्रासचे प्रमुख मंत्री श्री. टी. प्रकाशन यांना काँग्रेसमधील असल्याच अंतर्गत भानगडीमुळे राजीनामा देणे भाग पडले. राजीनामा दिल्यावर त्यांनी काँग्रेस हायकमांडपुढे मद्रासमधील सहकारी मंत्र्यांवर गंभीर आरोप ठेवले. त्यात स्पष्ट म्हटले होते की, काही मंत्र्यांनी नियंत्रणांचा फायदा घेऊन स्वतःची झोळी भरली. शिवाय सरकारी पैशाचा स्वतःच्या खाजगी कामाकरता उपयोग केला गेला. काहींनी आपल्या नातेवाईकांना सरकारी कामे दिली. उत्तर प्रदेशात सुद्धा असाच प्रकार झाला. एककाळ प्रांतिक काँग्रेसचे अध्यक्ष श्री. त्रिलोकसिंग व आता यु. पी. असेंब्लीमधील विरुद्ध गटाचे पुढारी यांनी पण काँग्रेस मंत्र्याविरुद्ध असेच आरोप केले होते. पंजाबमध्ये दोन माजी प्रमुख मंत्री एकमेकांवर वशिलेबाजीचा, अनितीचा उघड आरोप करीत आहेत.

वास्तविक काँग्रेस हायकमांडने एक चौकशी कमिशन नेमून या आरोपांची कसून चौकशी केली पाहिजे व गुन्हेगारांना शासन केले पाहिजे. अशी चौकशी केल्याशिवाय चांगले सरकार अस्तित्वात आहे असे म्हणता येत नाही कारण खुद्द

मंत्र्यांवर असे गंभीर आरोप आहेत. याबाबतीत अशाच एका ब्रिटिश मंत्र्याच्या बाबतीत घडलेल्या घटनेचा उल्लेख करणे जरुर आहे. एका मंत्र्यावर लाचलुचपतीचा आरोप होता. मजूर प्रमुख मंत्री मि. ॲटली यांनी लगेच चौकशी कमिशन नेमले. चौकशीअंती असे दिसून आले की, एका व्यापाऱ्याने त्या मंत्र्याला नाताळात एक व्हीस्कीची बाटली व काही कापड दिले होते. दोघांचा उद्देश देवघेवीचा नव्हता. बाब क्षुल्लक होती पण ॲटलींनी त्यास मंत्रिपदाचा राजीनामा देण्यास भाग पाडले.

पण आपल्या देशात काय परिस्थिती आहे पहा ! वेगवेगळया प्रांतांतील जवळ जवळ पंचवीस मंत्र्यांवर गंभीर आरोप केले गेले आहेत पण काँग्रेस हायकमांडने याकडे बुद्धिपुरःसर दुर्लक्ष केले आहे. एवढेच नव्हेतर यांच्यावरील आरोपांची चौकशी न होता ते मंत्री बिनबोभाट आपला अनागोंदी कारभार करीत आहेत व अशांच्या हाती आपल्या देशाचे भवितव्य आहे ! सांगा, अशा मंत्र्यांबद्दल आणि काँग्रेसबद्दल विश्वास कसा बरे निर्माण होईल ? सांगा, स्वाभिमानी व नीतीमान पुरुष अशा चोरांबरोबर सहमत कसे होतील की जे उघड लोकांना लुबाडीत आहेत. मी तर स्पष्ट सांगतो की काँग्रेस सरकार हे आचारभ्रष्ट (Corrupt) सरकार आहे. ते चोरांचे सरकार आहे.

पंडित नेहरू हे अशा बदमाश मंत्र्यांच्या कारभाराकडे लक्ष घालतील अशी लोकांची अपेक्षा होती पण त्यांनी आपल्या अनुयायांची मोठी निराशा केली. उलट दिल्लीमध्ये काँग्रेसचे अधिवेशन भरले तेव्हा त्यात इतर देशात लाचलुचपतीचे प्रकार फार मोठ्या प्रमाणात होतात, असे त्यांनी सांगितले, त्यामुळे जे मुरब्बी प्रतिष्ठित चोर आहेत त्यांना फावते व जे पक्के चोर होण्याची टंगळ मंगळ करतात, त्यांनाही धीर येतो, जे अशी लाचलुचपत घेऊन गबर होत आहेत, असे मंत्री पंडित जवाहरलाल नेहरू आपले नेते आहेत म्हणून खूष असतील कारण अशा गुन्ह्यांबद्दल शिक्षा न करता त्यांना माफ करणे किंवा त्याकडे दुर्लक्ष करणे पंडितजी आपला धर्म समजतात. ज्यांना असल्या गोष्टी करण्याची शरम वाटत नाही ते देशाचे कधी हित करतील काय ?

जे यापुढे काँग्रेसला मते देतील ते अशा गोष्टी चालू राहाव्यात म्हणूनच मते देतील, पण भारतीयांना चांगले कोणते व वाईट कोणते हे ओळखण्याची पात्रता आली आहे.

काँग्रेसचे लोक इतरांना आपापले पक्ष सोडा आणि काँग्रेसला मिळा असा आदेश देतात कारण काँग्रेसच देशाचे भले करणार आहे. मी तुम्हाला विचारतो की, मांजर आणि उंदीर एकत्र राहू शकतील का ? साप आणि मुंगूस यांची मैत्री जुळेल का ? एक दुसऱ्याचा सत्यानाशच करील. अशी कित्येक उदाहरणे प्राणिमात्रात आढळतात. माणसामाणसात सुद्धा हाच प्रकार आहे. देशात

अशी काही माणसे व विशिष्ट गट आहेत की ज्यांचे कार्य परस्पर विरोधी आहे. शेतकऱ्यांना पिळणारे बनिया आणि शेतकरी हे शांततेने एकत्र नांदतील का ? तशीच स्थिती ब्राह्मण व अस्पृश्यांची आहे. ब्राह्मण वर्ग अस्पृश्यांना नेहमीच डांबून ठेवणार. तो त्यांना कधीच वर येऊ देणार नाही.

अस्पृश्यांना साधे माणुसकीचे जीवन ब्राह्मणवर्ग जगू देत नाही. मग असा पक्ष की, ज्यात अत्याचार करणारे व अत्याचार ज्यांचेवर होतो ते, तसेच लोकांना पिळून खाणारे व जे लोक अशा खाईत पडतात ते या परस्पर विरूद्ध लोकांचा एक पक्ष कसा होऊ शकेल ? ज्या पक्षात अत्याचारी व स्वार्थी लोकांचे प्रतिष्ठित स्थान आहे अशा पक्षाकडून गरीब व अत्याचाराने पिडलेल्या लोकांचे कल्याण काय होणार, कपाळ !

म्हणून अशा अत्याचारापासून गांजलेल्या लोकांची एक प्रचंड विरोधी संघटना असणे ही एक महत्त्वाची बाब आहे. नाहीतर लोकांच्या सुखाच्या साऱ्या आशांचे हे अधिक निर्मूलन करतील. कॉंग्रेसच्या सापळ्यात, त्यांच्या गोड हुलकावणीने पडू नका. स्वतःच्या पायावर धोंडा घालून घेतल्याचा तुम्हाला पश्चाताप होईल. अशा पक्षात सामील होणे म्हणजे परंपरेने चालत आलेल्या अत्याचारांना आपण होऊन बळी देणे होय.

अशाने देशाला मिळालेले स्वातंत्र्य फक्त सवर्णीय हिंदूच उपभोगतील. जर स्वातंत्र्याचा उपयोग आपणास हवा असेल, जर आपणास आपली भरीव संघटना करावयाची असेल तर दलित फेडरेशन मजबूत करणे हा एकच मार्ग आहे.

कॉंग्रेसच्या हरिजन मंत्र्यांनी आजच्या सभेला हजर राहू नका असा लोकात जातीने प्रचार केला होता. जर आमच्या फेडरेशनने अस्पृश्यांच्या हितासाठी लढा दिला नसता तर आज हे हरिजन मंत्री कुठे असते ? यांना मंत्री कुणी केले ? मी केले असे स्पष्ट सांगतो. फेडरेशनने मंत्री केले असे ठासून सांगतो. फेडरेशनने लढा दिला नसता तर आज या हरिजन मंत्र्यांना लाजिरवाण्या जिण्याने जगावे लागले असते. या हरिजन मंत्र्यांनी कधी अत्याचार झालेल्या आपल्या आई बहिणींच्या डोळयांतील कारुण्यपूर्ण अश्रू पुसले आहेत का ? त्यांच्या गरजांकडे कधी आस्थापूर्वक लक्ष पुरविले आहे काय ? त्यांना माणुसकीचे जीवन जगता यावे म्हणून धडपड केली आहे का ? या कॉंग्रेसधार्जिण्या मंत्र्यांनी फक्त स्वतःचा स्वार्थ साधला, म्हणून राज्यकारभार हाकण्यात आम्हाला आमचीच माणसे हवीत की, जी आपल्या बांधवांवर झालेल्या अत्याचाराचा जाब विचारून त्यांच्या जीवनात सौख्य आणतील व आपले हक्क प्राणाचे बलिदान करून सुद्धा मिळवतील अशाच माणसांना निवडून देणे रास्त आहे. अशा माणसांना लोकसभेत व प्रांतिक राज्यातील असेंब्लीत निवडून दिले पाहिजे की जे स्वतःची बुद्धी गहाण ठेवून वागणार नाहीत. अस्पृश्यांच्या

दुःखांना जे वाचा फोडतील अशीच माणसे अशा लोकसभेत योग्य कामे करू शकतील. पेप्सु मधील आताचे अस्पृश्य मंत्री व सभासद हे काँग्रेसचे गुलाम आहेत. ते कुत्र्याप्रमाणे आपल्या धन्याचे पाय चाटीत आहेत ! हे आपल्या बांधवांसाठी काय करणार, कपाळ !

मी काँग्रेसला मिळावे म्हणून माझ्यावर वजन टाकण्यात येत होते. पण जो पक्ष माझ्या अस्पृश्य बांधवांचे कधीच भले करू शकणार नाही त्या पक्षात शिरून मी त्यांचा मिंधा होऊ ? ते कधीच शक्य नाही म्हणून मी मंत्रिपदाचा राजीनामा दिला. मला कुणी राजीनामा देण्यास सांगितले नाही किंवा काही भानगडीमुळे तो मी दिला नाही. वशिलेबाजी, लाचलुचपतीच्या फंदात मी कधीच पडलो नाही. अशा पक्षाच्या सरकारात आपणाला प्रामाणिकपणे जनतेची सेवा करता येणार नाही हे जेव्हा मला पुरेपूर कळून चुकले तेव्हा राजीनामा देण्याचा मी मार्ग पत्करला, ते योग्य झाले.

अजूनही आम्हाला वाटते की आमच्या सवर्णीय हिंदुंनी आमच्या उद्धारासाठी आपल्या अधिकाराचा उपयोग करावा, आम्ही आणखी दहा वर्षे वाट पाहू आणि मग जर आम्हाला कळून चुकलं की यात काही शहाणपणा नाही तर आमच्या हक्कासाठी जे काही अन्य मार्ग आम्हाला पत्करावेसे वाटतील ते जरुर पत्करू.

देशाच्या आपत्तीच्या प्रसंगी आम्ही आघाडीवर राहू. वास्तविक देशासाठी आम्ही खपतो, सवर्ण हिंदू नाहीत. ते देशाच्या व लोकांच्या नावावर स्वतः मलिदा खात आहेत, हा तर नेहमीचा अनुभव आहे. जेव्हा सैन्य भरतीचा प्रश्न निघतो तेव्हा अस्पृश्य प्रथम पुढाकार घेतो व नावे नोंदवितो. सवर्ण हिंदू लोक फक्त अशा कँपच्या आसपास दुकाने मांडून बसतात. काँन्ट्रॅक्ट मिळवतात व देशाला आणि लोकांना लूटतात.

गेली दोन तपे मी अस्पृश्यांच्या हक्कांसाठी सारखा लढा देत आलो आहे. यात माझा स्वार्थ नाही. मी गांधी समोर एक साधा प्रश्न टाकला होता.

" देशाच्या स्वातंत्र्याविरूद्ध आम्ही नाही, पण अशा स्वतंत्र भारतात अस्पृश्यांचे स्थान कोणते ? " पण या प्रश्नाचे उत्तर गांधी किंवा इतर कुणीही समाधानकारक-रित्या देऊ शकले नाही. हाच नेमका प्रश्न मी सवर्ण हिंदुंना विचारीत आहे.

आजचे स्वराज्य हे त्यांचे स्वराज्य आहे. आम्ही अजून गुलामच आहोत. सवर्ण हिंदुंच्या अत्याचारांचे हे फळ आहे. हा आमचा गुन्हा नाही. जर आम्हाला माणसात यावयाचे असेल तर आम्हाला आमच्याच पायावर उभे राहिले पाहिजे, हे अस्पृश्य बंधुंनी पक्के ध्यानात ठेवावे.

सवर्ण हिंदुंना आम्ही मिळविलेल्या आमच्या राजकीय हक्कांची अंमलबजावणी करू देण्यास अडथळा करू नका म्हणून सुचवतो. पण काँग्रेस आमच्या जमातीतील निमकहराम माणसांना वाव देते व भेद करायला सांगते. हे निवडणुकीचे तिकीट पदरात पाडू पहाणारे स्वार्थी व ढोंगी लोक आहेत. प्रथम ते कॉंग्रेसकडे जातात. तेथून कंबरेत लाथ बसली की फेडरेशनकडे निवडणुकीच्या तिकीटांची भीक मागायला येतात ! अशामुळे काँग्रेसला आम्ही मिळविलेल्या हक्कांची पायमल्ली करावयाची आहे. म्हणून आताच सावध राहिले पाहिजे व दमदार लढा दिला पाहिजे. निवडणुकीत आमचेच उमेदवार आम्ही निवडून दिले पाहिजेत. यात आम्ही अपयशी ठरलो तर आमचा सत्यानाश झाला असे समजा.

अस्पृश्यांसाठी ज्या राखीव जागा आहेत, त्या फक्त दहा वर्षांसाठी आम्ही मिळवू शकलो. जर एवढ्या काळात आम्ही आमची प्रचंड संघटना करू शकलो नाही तर आमचा घात ठरलेलाच म्हणून समजा. आज वेगवेगळया पक्षातील सवर्णीय हिंदू तुम्हाला निवडणुकीच्या तिकीटांचे आमिष दाखवून आपला पक्ष मजबूत करीत आहेत.

पण या दहा वर्षांच्या काळानंतर ते तुमच्याकडे ढुंकून पण पाहणार नाहीत, याची सावधगिरी आता बाळगली पाहिजे व उद्यासाठी आज आपल्या इमारतीचा पाया मजबूत घातला पाहिजे. तुमचाच प्रतिनिधी तुमच्या हक्कांसाठी लोकसभेत झगडू शकेल व तो प्राण गेला तरी मागे हटणार नाही.

आपण अल्पसंख्यांक आहोत ही पण गोष्ट ध्यानात असू द्या. आपली मतदानाची संख्या पण कमी आहे. प्रत्येकाने मतदान करणे ही गोष्ट महत्त्वाची आहे. मतदानाचा हक्क, निवडणुकीच्या दिवशी साऱ्या स्त्री-पुरुषांनी, आपले कितीही महत्त्वाचे काम असले तरी ते बाजूस सोडून बजावले पाहिजे.

जर आम्ही आमच्या तत्त्वाशी सहमत असणाऱ्या पक्षाशी हातमिळवणी केली तर निवडणुकीत आम्हास दुप्पट यश मिळेल. पण अजून अशा कोणत्या पक्षाला सहाय्य करायचे ते निश्चित झालेले नाही. पण जेव्हा असे निश्चित झाले की, त्या पक्षाच्या उमेदवारांनाही मतदान देणे आपणा साऱ्यांचे कर्तव्य ठरेल.

यंदा बरेचसे यश आपल्या पदरात पडेल असे खात्रीने वाटते. काँग्रेसची मजबुती आता ढासळली आहे. पंजाबमध्ये दोन काँग्रेस गटात लाथाळी सुरू आहे. त्यांच्यात ऐक्य होणे अशक्य आहे. आम्ही काँग्रेसला डरता कामा नये.

म्हणून मी तुम्हाला विनंती करतो की, देशात फेडरेशनने उभ्या केलेल्या मतदारांनाच आपली मते द्या. जर आम्ही या लढ्यात यशस्वी झालो तर अनेक भरीव सुधारणा घडवून आणू व आमच्या हक्काआड येणाऱ्या गोष्टींना मूठमाती देऊ.

● ● ●

## २८३

# योजना कोणी केली ते न पाहाता ती कशी आहे ते पाहा

भुसावळ येथे दिनांक १५ नोव्हेंबर १९५१ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाले. आपल्या भाषणात ते म्हणाले,

भगिनींनो आणि बंधुंनो,

पूर्वी जेव्हा दारूबंदी नव्हती, सरकारी दारू दुकाने होती तेव्हा बेकायदा दारू करण्याचे काम फारच कमी होते. कोणत्याही परराष्ट्रापेक्षा आमच्या देशात दारूचे व्यसन फार आहे. आज दारूबंदी झाल्यानंतर मात्र घरोघरी दारूची निर्मिती सुरू झाली आहे. घरीच दारू तयार होत असल्याने स्त्रियात, मुलातही दारूचे व्यसन सुरु झाले आहे. नीतीचा अध:पात फार जोरात सुरू आहे.

हे दारूचे व्यसन बंद करण्यासाठी म्हणून अत्यंत अल्पसंख्य अशा व्यसनाधीन दारूबाजांना व्यसनमुक्त करण्याचे यशस्वी प्रयत्न करण्यासाठी म्हणून सरकारने शिक्षण फार कठीण करून ठेवले आहे. केवळ प्राथमिक शिक्षण मिळून आज मागासलेला समाज पुढे येणे शक्य नाही. त्यांना उच्च शिक्षण दिले पाहिजे. हे जोपर्यंत होत नाही तोपर्यंत वरच्या वर्गाच्या हातातच राज्यकारभार राहील आणि असे जोपर्यंत चालू आहे तोपर्यंत मिळालेल्या स्वराज्याचा आम्हा अस्पृश्यांना, मागासलेल्या वर्गातील लोकांना काय फायदा ?

ह्या दारूबंदीसाठी म्हणून मुंबई सरकारने १९४६ साली ९ कोटी रुपये बुडविले. एवढेच नव्हे तर दारूबंदी कायदा जारी करण्यासाठी म्हणून पोलीस वगैरेसाठी गरीब नागरिकांचे ३-४ कोटी रुपये आणखी खर्च होत आहे. मला येथे जमलेल्या लोकांना एक प्रश्न विचारावासा वाटतो की समाजात अत्यंत अल्पसंख्य असलेल्या अशा दारूबाजांना दारूच्या व्यसनापासून मुक्त करणे, नव्हे मुक्त करण्याचा भ्रम निर्माण करणे हे जास्त महत्त्वाचे की समाजातील बहुसंख्य अशा भूकग्रस्त लोकास, ज्यांना अन्न मिळत नाही त्यांना जगविणे, ज्यांना कपडा नाही त्यांना निदान अंगभर वस्त्र मिळवून देणे, ज्यांना राहावयास घर नाही त्यांना आसरा मिळवून देणे अधिक महत्त्वाचे ? ह्या प्रश्नाचे आपणच उत्तर द्या.

---

जनता : १ डिसेंबर १९५१.

ह्या योजनेतून दोन गोष्टी मात्र पार पडणार आहेत. पहिली म्हणजे नियोजन कमिशनचे अध्यक्ष पंडित नेहरू हे प्रधानमंत्री या नात्याने एक सर्वाधिकारी बनणार आहेत. माझा स्वत:चा अनुभव आपणास सांगतो. प्रत्येक खात्यातील कामकाजावर आणि प्रत्येक खात्याच्या मंत्र्यावर पंडित नेहरू आपला ताबा ठेवू पाहतात. ते कोणालाही स्वतंत्रपणे काम करू देणार नाहीत. दुसरी गोष्ट म्हणजे या योजनेमुळे लाचलुचपतीत अधिकच भर पडणार आहे. प्रत्येक स्त्री-पुरुषांचा, ज्यांचे सरकारी अधिकाऱ्यांशी काम असते अशा सर्वांचा असा अनुभव आहे की लाच दिल्याखेरीज सरकारी अधिकाऱ्यांकडून काही काम होत नाही. ह्या पंचवार्षिक योजनेप्रमाणे एक लाख रुपयांहून अधिक भांडवल असणारा उद्योगधंदा सुरू करण्यास सरकारी अधिकाऱ्याची परवानगी लागणार आहे. ह्यामुळे लाचलुचपतीचे क्षेत्र हजारोपटीने वाढणार आहे. एकंदरीत पाहिले तर ह्या योजनेत आशा करण्यासारखे काही नाही.

जेव्हा आपल्या कार्याविषयी समाधानकारक असे काहीही एखाद्यास सांगता येत नाही. तेव्हा तो दुसऱ्याबद्दल गैरसमज निर्माण करण्यासाठी, दुसऱ्याची निंदा करण्यासाठी सर्व शक्य ते प्रयत्न करतो. काकासाहेबांचे शेवटी तसेच झाले. दलित फेडरेशन आणि समाजवादी यांचा जो निवडणूक करार झाला आहे त्यावर गरळ ओकण्याचा त्यांनी अखेर प्रयत्न केला. दलित फेडरेशन ही जातीय संस्था आहे आणि आपण कधीही कोणत्याही जातीय संस्थेशी सहकार्य करणार नाही असे म्हणणाऱ्या समाजवाद्यांनी ह्या जातीय संस्थेशी सहकार्य का केले, असा प्रश्न त्यांनी विचारला आहे. काही पक्ष जातीय आहेत; काही नाही असा कॉँग्रेसवाल्यांचा दावा आहे. दलित फेडरेशन ही जातीय संस्था आहे, असा प्रचार १९२० पासून कॉँग्रेसकडून चालू आहे. फक्त कॉँग्रेस तेवढी जातीय नाही, असा कॉँग्रेसचा दावा आहे. कॉँग्रेस पुढाऱ्यास माझा असा सवाल आहे की कॉँग्रेस पुढाऱ्यांनी जातीभेद बाजूस टाकला आहे का ? सहभोजन, सहविवाह कॉँग्रेस पुढाऱ्यांनी कृतीत आणला आहे का ? काकासाहेबांनी आपल्या कन्येच्या विवाहासाठी उच्चकुलीन सरदार पुत्रच निवडला ना ? अधिकाराच्या जागांवर नेमताना आपापल्या जातीकडेच पाहण्याची प्रवृत्ती कॉँग्रेस पुढाऱ्यात फारच प्रकर्षाने दिसते. आम्हा अस्पृश्य जमातीत हजारो जाती आहेत पण जातीभेद मोडण्याचा आम्ही जसा प्रयत्न केला आणि करीत आहोत तसा कॉँग्रेस पुढाऱ्यांनी केला आहे का ? केवळ जातभाईची भरती करणे हेच आज आपणास दिसते. मला कॉँग्रेसचा विरोध का, तर मी जातीचा महार आहे म्हणून.

नदीचा उगम आणि ऋषीचे मूळ कोणी पाहात नाही. त्याचप्रमाणे आमच्या दलित फेडरेशनच्या कार्यक्रमाकडे, योजनेकडे पाहा. ही योजना कोणी केली ते न पाहाता ती योजना कशी आहे ते पाहा; इतर योजनांशी कसाला लावा आणि मग बोला, उगाच निंदा का करता ?

काँग्रेसला आम्ही समाजवाद्यांशी संगनमत केले ह्याचे वाईट वाटते. त्यांना वाटते की सर्वांनी काँग्रेसचा पदर धरावा. समाजवाद्यांशी आम्ही संगनमत केले ह्यामुळे काय अनर्थ निर्माण झाला ते कळत नाही. काँग्रेसबाहेरील सर्व पक्षांची एकजूट करण्याचा माझा विचार होता; परंतु निवडणुकीस आता फारसा अवधी नसल्याने ते शक्य झालेले नाही. परंतु निवडणुकीनंतर मी त्या बाबतीत पुन्हा प्रयत्न करून पाहणार आहे. दोन पक्षातील योजनात आणि कार्यक्रमात जर फारशी विसंगती नसेल तर निवडणुकीच्या बाबतीत संगनमत केल्यास त्यात वाईट काय ? ह्याच भूमिकेवरून आम्ही हे संगनमत केले आहे. पूर्व आणि पश्चिमाभिमुख अशा दोन पक्षात सांगड करणे हे अप्रामाणिकपणाचे आहे परंतु एकाच दिशेने दोन माणसे जात असली तर त्यांनी काही मार्गापर्यंत एकत्र गेल्यास त्यात अप्रामाणिकपणा कसा होईल ? त्यात पाप काय आहे ? आज तरी ही एकी निवडणुकीपुरती आहे.



# २८४

# फेडरेशनचा जाहीरनामा सर्वोत्कृष्ट असल्याचा जगातील राष्ट्रांचा अभिप्राय

ता. १५ नोव्हेंबर १९५१ गुरुवारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर दिल्लीहून मुंबईस जात असताना मध्येच खानदेशात भुसावळ, चाळीसगाव या ठिकाणी त्यांनी प्रचार सभा घेतल्या.

कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्या हस्ते चाळीसगाव तालुक्यातर्फे दलित समाजाने बाबासाहेब यांना २,००१ रुपयांची थैली अर्पण केली. त्यानंतर टाळयांच्या कडकडाटात आणि भीमभगवानच्या जयघोषात बाबासाहेबांनी भाषणास सुरुवात केली. बाबासाहेबांच्या भाषणाचा जोर विशेषतः निवडणुकीवर आला. ते म्हणाले,

देशातील निरनिराळया राजकीय पक्षांनी आपापले निवडणूक जाहीरनामे प्रसिद्ध केले. त्यात शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनने प्रसिद्ध केलेला जाहीरनामा सर्वोत्कृष्ट असल्याचा अभिप्राय जगातील सर्वच राष्ट्रांनी दिलेला आहे. काँग्रेसच्या जाहीरनाम्यात आश्वासनापेक्षा अधिक काही नाही. मागे दिलेली आश्वासने काँग्रेस पूर्ण करू शकली नाही त्यामुळे काँग्रेसचा जाहीरनामा फोल ठरला. काँग्रेसच्या पुढाऱ्यांमध्ये आपसात वैर होते आणि आहे. मी काँग्रेसच्या राज्यकारभारात ४ वर्षे होतो. एवढ्या अवधीत मला काँग्रेस पुढाऱ्यात एकी दिसली नाही. पंडित जवाहरलाल नेहरू व टंडणबाबू तसेच पंडित जवाहरलाल नेहरू व कै. वल्लभभाई पटेल यांच्यामधील एकमेकातला वैरभाव जाहीर आहे तेव्हा यावरून आपल्याला काय करता येईल की काँग्रेस ही वरकरणी जरी बरी दिसत असली तरी ती तशी नसून वांझोटी आहे. तिच्यात ऐक्य नाही; तरी अशा काँग्रेसला मते देण्यात काय अर्थ ? तेव्हा याचा विचार प्रत्येक स्पृश्य-अस्पृश्य बांधवांनी करावयास पाहिजे. काँग्रेस आता पैलतीराला जावू शकणार नाही.

शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनने समाजवादी पक्षाशी हातमिळवणी केली असून शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन व समाजवादी पक्ष यांनाच निवडून द्यावे. शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनतर्फे चाळीसगाव-भडगाव भागातून जनरल सीटवर श्री. टी. टी. पवार यांना उभे केले आहे. त्यांनाच आपण मते देऊन निवडून आणावे.

● ● ●

---

जनता : १ डिसेंबर १९५१.

# २८५

# सत्तेवर येणाऱ्या कोणाही पक्षाला, जनतेच्या सर्वांगीण हितासाठी जोतीबा फुल्यांचे धोरण आणि लोकशाहीवादी तत्त्वज्ञान घेऊनच पुढे जावे लागेल

जनता, दिनांक १७ नोव्हेंबर १९५१ मध्ये जाहीर केल्यानुसार डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा मनमाड व नाशिक येथील सभेचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला. त्यानुसार त्यांच्या नाशिक येथील सभेच्या कार्यक्रमाला दिनांक १७ नोव्हेंबर १९५१ रोजी संध्याकाळी ६ वाजता सुरूवात झाली. त्याप्रसंगी ते आपल्या भाषणात म्हणाले,

भगिनींनो आणि बंधुजनहो,

माझे मित्र श्री. भाऊराव गायकवाड ह्यांनी मी आपणास दोन शब्द सांगावे अशी मला विनंती केली. निवडणुकीचा हा माझा दौरा असल्याने मी आपणास निवडणुकीसंबंधानेच काहीतरी सांगणार. ह्या भागातर्फे उभे असलेल्या फेडरेशनच्या आणि समाजवादी पक्षाच्या उमेदवारांनाच आपण निवडून द्यावे हीच माझी आपणास विनंती आहे.

ह्या निवडणुकीत कॉंग्रेसचा पराभव करणे अगदीच अशक्य आहे असे नाही. कॉंग्रेसबाबत जनतेत किती असंतोष पसरलेला आहे हे सर्वांना माहीत आहेच. स्वतंत्र विचाराचे नागरिक कॉंग्रेसला परवडत नाहीत, कॉंग्रेसला केवळ बंदे लोक पाहिजेत. ज्यांना ते पटत नाही ते कॉंग्रेसमधून बाहेर पडतात. आज देशात जे अनेक पक्ष आहेत त्यात जनतेला अत्यंत अप्रिय झालेला असा कॉंग्रेससारखा दुसरा कोणताही पक्ष नाही.

तरीही ह्या निवडणुकीत कॉंग्रेस कदाचित यशस्वी होईल अशी भीती मला वाटते आणि त्याचे कारण एकच आणि ते म्हणजे आज कॉंग्रेसविरोधी गटात एकवाक्यता नाही. अनेक पक्ष आहेत आणि त्या प्रत्येक पक्षाने आपापले उमेदवार उभे केले आहेत. हे उमेदवार आपापसात झगडतील आणि त्यायोगे कॉंग्रेसविरोधी शक्तीचे बळ कमी होईल आणि त्यामुळेच कॉंग्रेसचा जय होईल.

---

जनता : ८ आणि १५ डिसेंबर १९५१.

काँग्रेसविरोधी सर्व पक्षांची एकजूट करून एका मतदार संघातून काँग्रेसविरोधी एकच उमेदवार उभा राहावा अशी माझी इच्छा होती. परंतु निवडणुकीस फारच कमी अवधी राहिला असल्याने माझे त्याबाबतीत प्रयत्न यशस्वी होऊ शकले नाहीत. तथापि ज्या पक्षात जास्त प्रमाणावर एकवाक्यता आहे अशा पक्षांची निवडणुकीपुरती एकजूट आणावी ह्या हेतूनेच फेडरेशनने समाजवादी पक्षाशी निवडणूक करार केला आहे. आपणास माहीत आहेच की आपणास पंढरपूरास जावयाचे असेल तर अनेक मार्ग आहेत ; सर्वांना एकाच मार्गाने जाणे शक्य नसते. काहींचा असा विश्वास असतो की अमुक मार्गाने गेलो तरच आपणास वैकुंठ प्राप्त होईल. अजून आपणास राजकारणाचा मिळावा तसा अनुभव मिळालेला नाही. जेव्हा तो अनुभव येईल तेव्हा सर्व पक्ष एकत्रित येऊन मार्गाची विचक्षणा करतील आणि त्यातूनच आपणास काँग्रेसविरोधी पक्षांची एकजूट दृष्टीस पडेल. आज मात्र प्रत्येकास आपला मार्ग खरा असे वाटत आहे अशा परिस्थितीत मार्गाकडे जास्त लक्ष न देता कोणत्या दिशेने जावयाचे आहे ते पाहून त्या दिशेने जाणाऱ्या इतरांशी हातात हात घालून रस्ता काढला तर त्यात कोणाची दिशाभूल केल्यासारखेही होणार नाही अगर कोणावर अप्रामाणिकपणाचा आरोपही लादता येणार नाही.

ह्या दृष्टीनेच फेडरेशन आणि समाजवादी पक्ष ह्यांनी हा निवडणूक करार केलेला आहे. आम्हा दोघांमध्ये काही बाबतीत मतभिन्नता आहे. पण आम्हा दोघांचीही दिशा मात्र एकच आहे. वरिष्ठ वर्गांचे दडपणातून जनतेस खरे स्वातंत्र्य मिळवून देणे ह्याबाबत आमच्यात एकमत आहे. तेव्हा सर्वच बाबतीत एकमत नसले तरी उभयतांनी एकदिलाने, संघटितपणे ह्या लढाईस तोंड देणे शक्य आहे असे आम्हा दोघासही पटल्यानेच आम्ही ही निवडणूक संयुक्तपणे लढवीत आहोत.

मला असा प्रश्न विचारण्यात आला की, महाराष्ट्रातील शेतकरी कामगार पक्षाशी तुम्ही करार का केला नाही ? मी अजूनपर्यंत ह्याबाबत जाहीरपणे कोठे बोललो नव्हतो, आज मी ह्या प्रश्नाचे उत्तर देणार आहे. पूर्वी ब्राह्मणेतर पक्ष अस्तित्वात होता. आपल्या प्रांतातच नव्हे तर मध्यप्रांत, वऱ्हाड, मद्रास येथेही असा पक्ष अस्तित्वात होता. म. जोतीबा फुले ह्यांनी ह्या पक्षाची मुहूर्तमेढ रोविली, म्हणून ह्या पक्षाचे अनुयायी आपणास जोतीबा फुले यांचे अनुयायी म्हणवू

लागले. पण ह्या पक्षातील लोक केवळ नाममात्र अनुयायी राहिले ; जोतीबांचा कार्यक्रम, त्यांचे धोरण ह्यास या पक्षातील लोकांनी तिलांजली दिली. स्वतःचे स्वतंत्र अस्तित्व आपल्याच हातांनी जमिनीत गाडून हे लोक काँग्रेसमध्येही सामील झाले. हा ब्राह्मणेतर पक्ष काही काळाने नामशेष झाला.

जोतीबांचा अनुयायी म्हणवून घेण्यात मला ह्यापूर्वीही कधी लाज वाटली नाही आणि आजही वाटत नाही. आत्मविश्वासाने मी आज असे म्हणू शकतो की मीच तेवढा खरा आज जोतीबांना एकनिष्ठ राहिलो आहे आणि मला अशी खात्री आहे की ह्या देशात जनतेचे सर्वांगीण हित करणारा असा कोणताही पक्ष पुढे आला, त्याने कोणतेही नाव धारण केले तरी त्याला जोतीबांचे धोरण, त्यांचे तत्त्वज्ञान आणि त्यांचे कार्यक्रम घेऊनच पुढे यावे लागेल. तोच एक खराखुरा लोकशाहीचा मार्ग आहे. समाजातील ८० टक्के लोकास विद्याप्राप्ती करू न देणे आणि त्यांना सामाजिक, आर्थिक व राजकीय गुलामगिरीत जखडून ठेवणे हे दिसत असता स्वराज्य, स्वराज्य म्हणून ओरडण्यात काय फायदा ? स्वराज्याचा फायदा सर्वांना मिळाला पाहिजे. मागासलेल्या वर्गांच्या सर्वांगीण उन्नतीचा कार्यक्रम घेऊन पुढे आल्याशिवाय कोणताही पक्ष आज जनतेचे नेतृत्व घेऊ शकत नाही हे सूर्यप्रकाशाएवढे स्पष्ट आहे. समाजवादी पक्षानेही ह्या गोष्टीचा विचार करणे आवश्यक आहे, असे मला वाटते.

आजचा शेतकरी कामगार पक्ष हा ब्राह्मणेतर पक्षाची आवृत्ती म्हणून पुढे आला आहे. परंतु ब्राह्मणेतर पक्ष म्हणवून घेण्यास त्या पक्षास लाज का वाटते ते मला कळत नाही. ह्या पक्षाच्या पुढाऱ्यांशी जुने आणि फार घनिष्ठ संबंध आहेत आणि असे असतानाही ह्या पक्षाशी फेडरेशनने सहकार्य का केले नाही, ह्या प्रश्नाचे उत्तर मला आज द्यावयाचे आहे.

ह्या पक्षाबाबतची एक गोष्ट जगजाहीर आहे की हा पक्ष एकेकाळी कम्युनिस्ट पक्ष बनावयास पाहत होता. नाशिक जिल्ह्यातच दाभाडी येथे ह्या पक्षाची बैठक भरून ह्या पक्षाने एक प्रबंध मान्य केला. त्या प्रबंधास '' दाभाडी प्रबंध '' म्हणण्यात येते. हा प्रबंध पूर्णपणे कम्युनिस्ट तत्त्वज्ञानावर आधारलेला असा आहे. कम्युनिझमला आज ह्या देशात जागा देण्यास मी तयार नाही. कदाचित पंडित नेहरूंच्या आंतरराष्ट्रीय राजकारणातील घोडचुकांमुळे कम्युनिझम हा येईलही ; आणि चीन व रशिया ह्यांच्या नियंत्रणाखाली हा देश जाऊन ह्या देशाचे स्वातंत्र्य लयास जाईल.

आजच येथील 'गावकरी'त मी एक महान संकटकारक अशी बातमी वाचली. नेपाळमध्ये कम्युनिस्ट सेना शिरकाव करून घेण्यासाठी ज्या संधीची वाट पाहात होत्या तशी संधी नेपाळमधील अंतर्गत परिस्थितीमुळे त्यांना मिळत आहे अशी ती बातमी आहे. आज भारताच्या सरहद्दीवर कम्युनिस्ट सेना सज्ज होऊन येऊन ठेपली आहे. ही सेना आपल्या देशात केव्हा घुसेल ह्याचा नेम नाही. ही भीती आज दिसत आहे. एवढेच नव्हे तर एक वर्षापूर्वी मी ही धोक्याची सूचना पंडित नेहरूंना दिली होती. त्यावेळेस माझे कोणी ऐकले नाही; आज दुर्दैवाने माझी भीती खरी ठरू पाहत आहे.

आपणास आपल्या देशाचे स्वातंत्र्य टिकविले पाहिजे. स्वातंत्र्य टिकवून आपणास आपला देश समृद्ध राखावयाचा आहे. कम्युनिझमला ह्या देशात थारा दिला तर आपले स्वातंत्र्य रसातळास जाईल. आपला देश रशियाचा अंकित होऊन राहील. पूर्व युरोपातील राष्ट्रांचा अनुभव आपणास हेच सांगत आहे. आज आपल्या देशापुढे जे मोठे मोठे महत्त्वाचे प्रश्न आहेत ते आपले स्वातंत्र्य गमावून आपण सोडवू शकणार नाही. देशाच्या स्वातंत्र्याची राखरांगोळी कम्युनिझममुळे होणार हे आपण दृष्टीआड करू शकत नाही.

कम्युनिझमखेरीज दुसरे मार्ग आहेत आणि ह्या दुसऱ्या मार्गाने जाऊन आपण आपल्या देशाचे स्वातंत्र्यही टिकवू आणि पददलित, पिडीत अशा जनतेस सुखी-समृद्ध बनवू असा मला विश्वास आहे. हा लोकशाहीचा मार्ग अपुरा आणि अयशस्वी ठरला तरच आम्ही कम्युनिझमचा विचार करू.

आज कम्युनिझमशी सोयरिक करणाऱ्या, कम्युनिझमच्या मार्गावर पावले टाकणाऱ्यांना आणि त्यांच्या अनुयायांना मला हे विचारावयाचे आहे की ह्या देशात कम्युनिस्ट राजवट आली तर काय होईल ह्याचा त्यांनी विचार केला आहे काय ? शेतकरी कामगार पक्षामागे सारा मराठा समाज आहे असे आपणास सांगण्यात येते आणि म्हणूनच मला हे विचारावेसे वाटते. कम्युनिझम म्हणजे प्रथम सर्व संपत्ती सरकारच्या मालकीची करणे होय. सारे उद्योगधंदेच नव्हे तर सारी शेती, जमीन, घरे सर्व काही सरकारच्या मालकीची होतील आणि हे सर्व हुकूमशाही राजवटीखाली पार पाडण्यात येईल. शेतकरी कामगार पक्षाच्या मागे असलेल्या मराठा समाजास हे पसंत आहे का ? त्यांची जमीन, त्यांची शेती, त्यांचे मळे, त्यांची घरेदारे सरकारच्या मालकीची झालेली त्यांना चालतील का हा माझा प्रश्न आहे.

लोकशाही राजवटीत हे होणे शक्य नाही, म्हणून हुकूमशाहीची प्रस्थापना येथे करण्यात येईल. विधीमंडळे नेस्तनाबूत करून लोकशाही राज्यपद्धतीला मूठमाती देऊन कम्युनिस्ट राजवट हे घडवून आणील. '' दाभाडी प्रबंध '' हे आमचे ब्रीद आहे असे बेंबीच्या देठापासून ओरडणाऱ्यांना आता तो प्रबंध म्हशीच्या गळ्यातील लोढण्यासारखा झाला आहे. शेतकरी कामगार पक्षाच्या पुढाऱ्यांना हे लोढणे काढणे आता जड झाले आहे. आता ते लोढणे फेकून देणे म्हणजे राजकीय अप्रामाणिकपणा असे त्यांना वाटते. परंतु आज ना उद्या ह्या पक्षास हे लोढणे दूर फेकलेच पाहिजे. जोतीबांचे अनुयायी म्हणविणाऱ्यांना कम्युनिझमची वाटचाल योग्य नाही हे लवकरच समजून येईल अशी आपण आशा करू या.



# २८६

# एकांगी राजकारण कधीही यशस्वी होऊ शकत नाही

महा. मुंबई दलित फेडरेशनच्या जनरल सेक्रेटरीने खालील पत्रक काढले होते.

'' महा. मुंबई दलित फेडरशन डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना २५,००० रुपयांचा निवडणूक निधी अर्पण करणार !

दलित बंधु भगिनींनो, सढळ हाताने डॉ. बाबासाहेब आंबेडकर निवडणूक निधीस हातभार लावा ! आजच्या १० तारखेच्या पगारातील आपला हिस्सा तुमच्या वार्ड कमिटीत जमा करा !! अगर द. फे. च्या परळ येथील ऑफिसात आणून भरा नि शासनकर्ती जमात बना !!!

आगामी निवडणूक ही आपल्या जीवन मरणाच्या प्रश्नावर आधारलेली आहे. हिंदुस्थान स्वतंत्र होवून ५ वर्षे झाली पण दलित जनतेच्या जीवनात, त्यांच्या राहाणीत, त्यांच्या दुःखात कसल्याही तऱ्हेचा फरक झालेला नाही. उलट या स्वातंत्र्याच्या काळात दलित जनतेचे अनन्वीत हाल झाले. स्पृश्य गुंडांनी खेडोपाडी धुमाकूळ घातला. खेड्यापाड्यातून अस्पृश्य वस्त्यांवर दिवसा ढवळया हल्ले केले. घरांना आगी लावण्यात आल्या. पिण्याच्या पाण्यात विष्टा, घाण टाकण्यात आली. सरकारी दरबारी कोणी दाद घेईना. एवढेच नव्हे तर काही ठिकाणी आमच्या पुढाऱ्यांचे व कार्यकर्त्यांचे सपशेल मुडदे पाडण्यात आले.

या साऱ्या जोर जुलूमांचा, अन्यायाचा व दुःखाचा आवाज या देशातील कोठल्याही कायदे मंडळात उठला नाही हे लक्षात घ्या! नि या कराल काळाच्या दाढेतून आपली सुटका करून घ्यायची असेल, उद्याच्या निवडणुकीत तुमच्या हाडामासाची, रात्रंदिवस तुमच्या हाकेस '' ओं '' देणारी, तुमच्या खांद्यास खांदा देवून लढणारी ; आपली जीवाभावाची माणसे निवडून द्यायला नको काय ? व ती निवडून आणावयाची झाल्यास त्यास द्रव्यबळ ही व्यवहारी जोड आपण द्यायला पाहिजे. म्हणून निवडणूक निधीत सढळ हाताने भर घाला.

---

जनता : १० आणि २४ नोव्हेंबर १९५१.

आपल्या साऱ्यांचे पंचप्राण डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे मुंबईतूनच लोकसभेच्या जागेसाठी उभे आहेत. त्यांना या निवडणुकीत निवडून न येऊ देण्याचा काँग्रेसने चंग बांधला आहे. तरी आपण आपल्या जवळचे तन मन नि धन स्वार्थत्यागपूर्वक अर्पण करून आपले जे शीर (डॉ. बाबासाहेब आंबेडकर) ते येत्या निवडणुकीत सलामत ठेवले पाहिजे. हे ओळखून आपल्यातील कार्यकर्त्यांनी, स्त्री-पुरुषांनी व आबालवृद्धांनी या कामी पराकाष्ठेचे प्रयत्न केले पाहिजेत. मुंबईतील जनता आतापर्यंतचा लौकिक कायम राखील नि त्वरित कामाला लागेल, ही आम्हास पुरेपूर आशा आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे हिमाचल प्रदेश व पंजाब प्रांतांचा दौरा आटोपून दिल्लीस आलेले आहेत. ते पायाने अधू तर झालेले आहेतच पण या दौऱ्यातील श्रमाने त्यांना नेत्र विकाराचा थोडासा त्रास झाला आहे. तरी ते मुंबई व मध्य प्रांतांच्या दौऱ्यावर तसेच निघणार होते परंतु फेडरेशनच्या हायकमांडच्या विनंती-नुसार थोडासा आराम घेऊन ते साधारणतः २० ते २५ नोव्हेंबरपर्यंत मुंबईस येणार आहेत. एवढ्या अल्पावधित आपण रात्रंदिवस खपून आपल्या निधीचा संकल्प पुरा केला पाहिजे.

निवडणूक निधीचा पुरुषांकरिता दोन रुपये व स्त्रीयांसाठी एक रुपया अशा तऱ्हेची तिकीटे छापली असून ठिकठिकाणच्या वार्ड कमिट्यांकडे रवाना करण्यात आलेली आहेत.

प्रतिष्ठित नागरिक, बाबासाहेबांचे चहाते व धन्देवाईक अशा सद्‌गृहस्थांची बसण्याची खास सोय करण्यात येणार आहे. मात्र त्यांनी उदार अंतःकरणाने निवडणूक निधीस सहाय्य करावे.

तसेच महा. मुंबईतील निरनिराळ्या शिक्षण संस्था, व्यायाम मंडळ, कला पथक वगैरे ज्या काही संस्था आहेत त्यांनी या निवडणूक निधीत आपल्या शक्तीनुसार भर घालावी अशी विनंती आहे.

कोणत्याही व्यक्तीस अगर संस्थेस डॉ. साहेबांना परस्पर हारतुरे अगर निधीचा हिस्सा देता येणार नाही.

तिकीटा व्यतिरिक्त कोणासही सभा मंडपात प्रवेश मिळणार नाही. या कामी समता सैनिक दलास खास अधिकार देण्यात आले आहेत.

सभेची तारीख, वेळ व जागा लवकरच जाहीर केली जाईल.''

त्यानुसार मुंबई येथील परळच्या सेंट झेवियर मैदानावर तारीख २२ नोव्हेंबर १९५१ रोजी कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. त्याला जत्रेचे स्वरूप आले होते. हजारो अस्पृश्य स्त्री-पुरुषांचा लोंढा

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण ऐकण्यासाठी दुपारी तीन वाजल्यापासून लोटत होता. ही सभा निवडणुकीच्या मदतीसाठी तिकीट लावून भरविण्यात आली होती. डॉ. बाबासाहेब आबेडकर सौ. माईसाहेब समवेत बरोबर साडेसहा वाजता मैदानावर हजर झाले तेव्हा समता सैनिक दलाने सलामी दिली. हजारो लोक शेवटी तिकीटाशिवाय आत घुसले.

श्री. आर. व्ही. खरात, उपाध्यक्ष, मुंबई दलित फेडरेशन, यांनी प्रास्ताविक भाषण केले व डॉ. बाबासाहेबांच्या नेतृत्वाखाली फेडरेशनचा झेंडा उंचच उंच राहील म्हणून सांगितले. श्री. भातनकर यांनी डॉ. बाबासाहेबांना निवडणुकीसाठी जमलेली रकमेची थैली फेडरेशनतर्फे अर्पण केली. सौ. माईसाहेबांच्या हस्ते समता सैनिक दलाच्या खेळात यश मिळविलेल्या सभासदांना कप व मेडल्स देण्यात आली.

सभास्थानी प्रि. दोंदे, श्री. चित्रे, श्री. भाऊराव गायकवाड, कु. शांतादेवी दाणी, श्री. बोराळे, दलित फेडरेशनच्या वार्ड कमिटीचे अध्यक्ष व इतर कार्यकर्ते हजर होते. जवळ जवळ तीस हजारांच्या स्त्री-पुरूषांच्या समुदायाने मैदान फुलले होते. मैदानाबाहेरपण शेकडो लोक होते. अनेक वृत्तपत्रांचे प्रतिनिधी खास बाबासाहेबांचे स्फुर्तिदायक भाषण ऐकण्यास हजर होते. ते आपल्या भाषणात म्हणाले,

भगिनींनो आणि बंधुंनो,

आज ही सभा एकाप्रकारे एकांगी आहे, असे म्हणायला हरकत नाही. ही सभा फक्त अस्पृश्यांची आहे. ही सभा एकांगी असल्याकारणाने मी एकांगी भाषण करणार आहे. सर्वसाधारण इलेक्शन मिटींगमध्ये जिथे मोठा समुदाय असतो तिथे एकांगी भाषण करणे अनुचित असते.

गेली चार वर्षे मी कॉंग्रेस सरकारात एक मंत्री म्हणून होतो. आज मी राजीनामा देऊन बाहेर पडलो. अशा स्थितीमध्ये मला जे काही लोक भेटतात त्यांचेकडून मला दोन प्रश्न विचारण्यात येतात. एक, तुम्ही याचे अगोदर बाहेर का पडला नाहीत ? मी लवकर बाहेर आलो असतो तर कॉंग्रेस विरोधी संघटित योजना अंमलात आणता आली असती. जे काही कॉंग्रेस विरोधी गट व उपगट आहेत त्यात संघटितपणा आणता आला असता. दोन, दुसऱ्या लोकांचे म्हणणे असे की, चार वर्षाच्या कारकीर्दीत कॉंग्रेसशी संधी का करता आली नाही. घनिष्ठ संबंध का जुळला नाही.

यासंबंधाने मी खुलासा करू इच्छितो. माझ्या चार वर्षाच्या कारकीर्दीत मला कॉंग्रेसच्या लोकांचे अस्पृश्य किंवा मागासलेल्या लोकांच्या उन्नतीसंबंधी काय अंतरंग आहे, किती प्रेम आहे, किती तळमळ आहे ; त्यांची उदात्त तत्त्वांबद्दल किती निष्ठा आहे हे अगदी जवळून पाहता आले. जे लोक अस्पृश्यांचा उद्धार

करू म्हणत होते व आजही म्हणतात आणि पुढेही म्हणतील त्यांच्यामध्ये अस्पृश्यांबद्दल प्रेमाचा उमाळा किती आहे हे बघण्याची मला चांगली संधी मिळाली आणि एक ठाम कळून चुकले की, जे काही काँग्रेसचे संचालक आहेत, जे काँग्रेसचे राजकारण फिरवू शकतात त्यांचेकडे केवळ शब्दांपलिकडे काहीही नाही. त्याबद्दल काही उदाहरणे मी देऊ शकतो.

देशाची घटना बनविताना माझे अंग प्रमुख होते. पुष्कळसे लोक सांगतात की, या घटनेचा आराखडा जे काही कारकून होते त्यांनी तयार केला आणि मी फक्त सही केली ! (हंशा) माझ्याबरोबर ड्रॅफ्टींग कमिटीत जे सभासद होते ते किती दिवस हजर होते व किती दिवस बेपत्ता होते ते मी तुम्हाला सांगू शकतो. शेवटी मी व माझी प्रमुख सेक्रेटरी राहिलो. काहिंच्या कुठे नेमणुका झाल्या ! जेव्हा मला माझे आत्मचरित्र लिहिण्यास सवड होईल तेव्हा या गंमती विस्ताराने लिहीन. जेव्हा मी कॉन्स्टीटयुअंट असेंब्लीमध्ये शेवटचे भाषण केले तेव्हा ही माहिती गोळा केली व त्यात हजेरी घेणार होतो परंतु आपल्या सहकाऱ्यांवर आरोप करणे असभ्यपणाचे होईल म्हणून भाषणातून तो उतारा मी गाळला.

आमच्या घटना समितीत अस्पृश्यांचे वतीने दोन महत्त्वाचे मुद्दे होते--

(एक) राजकीय संरक्षण ; म्हणजे अस्पृश्यांना राखीव जागा असाव्यात, व

(दोन) सरकारी नोकरीची कायद्याने तरतूद हे दोन्ही प्रश्न वादग्रस्त ठरले.

ओढाताण करून कशीबशी राखीव जागांसाठी दहा वर्षापुरती मुदत मिळविली. यामुळे काही लोकांच्या पोटात पाप उत्पन्न झाले व दिलेली सवलत परत घेण्याची चळवळ काँग्रेसवाल्यांनी सुरू केली. त्यामुळे मात्र मुसलमान व ख्रिश्चनांच्या राखीव जागा गेल्या. पण इदीला दोन बोकडे कापले व तिसरा बोकड विकत घेतल्याचे भयंकर भूत आमच्या डोळयांसमोर नाचू लागले. या दहा वर्षात फार तर तीन निवडणूका होतील. पुढे काय ?

मी काँग्रेसच्या लोकांना विचारतो की, तुम्ही असे आश्वासन देऊ शकता काय की अस्पृश्यतेचे निर्मूलन या दहा वर्षात होईल ? पूर्वाश्रमीचा भेदाभेद नाहिसा होऊन सारे एका समाजाचे अवयव होतील ? जर दहा वर्षात आमची उन्नती करण्याची तुमच्यात ताकद नाही, आमच्याविरूद्ध होणारे अनाचार थोपविण्याची शक्ती नाही तर त्यांना मी विचारतो की, ही राखीव जागांची सवलत दहा वर्षात काढून का घेता ? तशी सवलत निदान दहा वर्षासाठी काँग्रेस सरकारने दिली नसती तर पितांबर नेसविलेल्या बाईचे वस्त्रहरण ऐन सभेत केल्याने जगात नाचक्की होईल या भीतीनेच एवढी तरी मुदत काँग्रेस सरकारने दिली.

नोकरीच्या सवलतीपूर्वी मुदतीची मर्यादा नव्हती पण मुन्शींच्या पोटात दुखू लागले ! अस्पृश्यता जाईपर्यंत असलेली सवलत ठेऊ नये म्हणून कॉंग्रेसच्या काही सभासदांनी प्रेसिडेंटना अर्ज पाठवून दिला व या कलमाचा फेरविचार व्हावा म्हणून सुचविण्यात आले. या कलमाचा व कॉंग्रेस पार्टीचा काय संबंध तेच कळेना ! कॉंग्रेस पार्टीत या प्रश्नावर खडाजंगी झाली. अखेर मी राजीनाम्याचा घाट घातला तेव्हा ते कलम तसेच राहिले.

यात आणखी एका गोष्टीची सोय मी करून ठेवली आहे. घटनेच्या एका कलमानुसार अस्पृश्य व इतर अल्पसंख्यांक लोकांना संरक्षणार्थ एक सरकारी अधिकारी नेमला जावा व त्याने या जमातीवर होणाऱ्या अत्याचारांचा अहवाल संग्रहित करून तो पार्लमेन्टात सादर करावा.

मला वाटत होते की या जागेवर एका अस्पृश्याची नेमणूक होईल. कारण तुकोबा म्हणतात त्याप्रमाणे ' कळवळ्याची याती आणि लाभाविन प्रीती '. पगारी आणि भाडोत्री माणूस नेमून काय होणार आहे ? यासाठी अस्पृश्य नेमण्यात यावा. आज अस्पृश्यात असे अधिकारी मिळणे दुरापास्त नाही. मला नेमलेल्या अधिकाऱ्याविरूद्ध काही म्हणायचे नाही. तरीपण एक शंका येते व ती ही की, अस्पृश्यांच्या खऱ्या जीवनाचा सत्य अहवाल असले कॉंग्रेस सरकार त्या अधिकाऱ्याला प्रसिद्ध करू देईल की नाही याची! कोण कसे छळतात हे प्रसिद्धीस यावयाचे नाही.

कॉंग्रेस सरकारने अस्पृश्यांना सवलत देऊन पाहावयाचे होते. पण ही गोष्ट कॉंग्रेस कशी करील ? अस्पृश्यांच्या दु:खाचा उमाळा तीस कसा येईल ?

यापूर्वी म्हणजे ब्रिटिश राजवटीत मी एक्झिक्युटिव कौन्सिलर होतो व मजूर मंत्री होतो. मला अनेक प्रमुख खात्याचा अनुभव होता. माझा अनुभव दोन्ही राजवटीचा आहे. म्हणून मी राजवटीची तुलना करू शकतो. ही पुराणातील वांगी नाहीत. हा वांगेभात मी खाल्ला आहे. ( प्रचंड हंशा ) कॉंग्रेस राजवटीत अस्पृश्यांची प्रचंड अवहेलना झाली आहे. राजीनामा देताना काढलेल्या पत्रकात मी विस्तृतपणे खुलासा केला आहे, एवढेच नव्हे तर मंत्री असतानासुद्धा दिल्लीच्या एका सभेत कॉंग्रेस सरकारवर हा उघड आरोप केला होता.

अस्पृश्यांना राजकीय सवलतीचा उपभोग कॉंग्रेस सरकारने घेऊ दिला नव्हता, हा तो प्रमुख आरोप होता. माझ्या या विधानाला उत्तर देण्यास पंतप्रधान नेहरू यांना आजतागायत अवधी सापडला नाही ! माझ्या राजीनाम्याच्या पत्रात हे आरोप उघड केले असतानासुद्धा एकमेकाचा पत्रव्यवहार पार्लमेन्टपुढे वाचण्यापलीकडे अधिक बोलण्याचे पंडित नेहरूंना धैर्य झाले नाही. त्यांना उत्तर द्यायला भरपूर अवकाश होता. पुढे आठ दिवसांनी कॉंग्रेस अधिवेशन झाले.

त्यांना अनेकदा बोलण्याची संधी मिळाली असतानाही मी केलेल्या विधानांना समर्पक उत्तर देण्याची संधी पंडित नेहरूंनी घेतलेली नाही. उलट माझे प्रश्न टाळले. कारण मी जे म्हटले त्यात सर्व सत्य भरले आहे.

ब्रिटिश सरकारने पण अस्पृश्यांसाठी काही खास केले नव्हते. मुसलमान, ख्रिश्चन व अँग्लो-इंडियन लोकांवरच कृपादृष्टी होती. मी १९४२ साली जेव्हा हिंदुस्थान सरकारचा कौन्सिलर झालो तेव्हा त्यांना पहिला प्रश्न विचारला की हा सापत्न भाव का ? त्यांनी म्हणजे ब्रिटिशांनी विशेष वितंडवाद न घालता आपली जबाबदारी कबूल केली. पण काँग्रेस सरकारला सांगून समजले नाही ! त्यावेळी इतर जमातीप्रमाणे तीन लाख रुपये अस्पृश्यांच्या शिक्षणासाठी ब्रिटिश सरकारने मंजूर केले.

पुढे मी काँग्रेस सरकारचा मंत्री झाल्यावर ही रक्कम वाढविण्यात आली व त्यात आणखी इतर वन्य जमातींचा समावेश करण्यात आला. अस्पृश्यांची खरी उन्नती कारकुनीत नाही. खरी उन्नती व्हावयाची असेल तर उच्च प्रकारचे शिक्षण मिळाले पाहिजे. साधे शिक्षण घेऊन कारकून होऊन काय उपयोग ! कारकून मनुष्य आयुष्यात काय करू शकतो. तो समाजाची घटना करू शकत नाही. उच्च शिक्षण घेऊन तज्ज्ञ झालेलाच समाजात आमूलाग्र आणि पोषक बदल करू शकतो. यासाठी ' मान्याच्या जागा ' अस्पृश्यांनी पटकावल्या पाहिजेत व त्यांना त्या मिळाल्या पाहिजेत. तीन लाख रुपये अशा विद्यार्थ्यांना पाश्चात्य देशात पाठविण्यासाठी उपयोगात आणले जात होते. २०-३० अस्पृश्यांची मुले मी कौन्सिलर असताना याचा फायदा घेऊ शकली. पण पुढे उच्च शिक्षणासाठी १९४६ सालापासून अस्पृश्य पाठविणे बंद झाले ! अशा रीतीने काँग्रेस राजवटीत अस्पृश्यांचा उच्च शिक्षणाचा अंकूर मोडून टाकण्यात आला.

दिल्ली सेक्रेटरीएटमध्ये अस्पृश्य शिपाई पण नव्हते ! एक दोन कारकून होते. त्यांना शिपाई पाणी पण देत नसत ! मी काही अस्पृश्य शिपायांची सोय करताच त्यांना तेथील जमादार रात्रपाळ्या देऊन हैराण करू लागला ! मी तिथे गेल्यावर २४ किंवा २५ टक्के नोकरीच्या जागा राखून ठेवल्या. लढाईतील ' बेवीन बॉयज ' योजनेप्रमाणे काही शिकावू लोक इंग्लडला पाठविण्यात येत. त्यात एकही अस्पृश्य तरूण नसे ! माझे अगोदर इतर समाजाच्या ५०० तरूणांची वर्णी लागली होती. शेवटी बारा पूर्णांक एक द्वितीयांश टक्के अस्पृश्य तरूणांचा शिरकाव झाला व अस्पृश्यांची अदमासे शंभर मुले तो लाभ घेऊ शकली. त्यावेळी तीन अस्पृश्य एक्झिक्यूटिव्ह इन्जिनीयर्स लागले पण पुढे म्हणजे काँग्रेसच्या राजवटीत एका तरी अस्पृश्याला वरची जागा मिळाली असेल तर हराम ! (शेम-शेम)

काँग्रेस सरकारने अस्पृश्यांसाठी वरीलप्रमाणे काही केले नाही, हे विधान दिल्लीच्या एका सभेत करताच होम मेंबर श्री. राजगोपालाचारी यांनी ते सारे खोटे आहे, असे पार्लमेंटमध्ये उत्तर दिले. पण त्यांचेच मन त्यांना खाऊ लागले व त्यांनी अस्पृश्यांच्या नोकरीच्या बाबतीत माहिती मिळविण्यासाठी एक सर्क्युलर काढले. त्यात त्यांना सगळीकडे शून्यच उत्तर आले असावे ! काँग्रेस अस्पृश्यांचे काय भले करते व करू शकते त्याचा हा भला भक्कम पुरावा नाही काय ?

फाळणी झाल्यानंतर हिंदू-मुसलमानांचा प्रवाह चालला होता. तेव्हा पाकीस्तानने वरच्या वर्गाच्या हिंदुंना जाऊ दिले पण अस्पृश्यांवर कोंडवाड्यात गुरांना ठेवतात त्याप्रमाणे अत्याचार होऊ लागले. काँग्रेस सरकारने अस्पृश्यांना हिंदुस्तानात आणण्याचे बाबतीत काडीचीही मदत केली नाही. त्यावेळी महाराच्या पलटणी पाकिस्तानमध्ये होत्या. श्री. भाऊराव गायकवाड व श्री. रमेशचन्द्र जाधव यांना पाठवून या महार पलटणींच्या सहकार्याने एक एक अस्पृश्य स्त्री-पुरूषांना आम्ही हिंदुस्थानात जवळ जवळ ओढून आणले. या बाबतीत माझ्या मनामध्ये खंत उत्पन्न होते, एवढेच नव्हे तर काँग्रेसबद्दल घृणा उत्पन्न होते. ज्या अस्पृश्यांना येता आले नाही त्यांना मुसलमान व्हावे लागले. मला विचारावयाचे आहे की हा काँग्रेसच्या औदार्याचा पुरावा आहे काय ? पूर्व पंजाबमधून गेलेल्या निर्वासितांना हिन्दुस्थानात व शीख हिंदुंना निदान काही प्रमाणात जमिनी देण्यात आल्या, पण अस्पृश्य निर्वासितांना काय मिळाले ? फत्तर ? काही निर्वासितांनी राजघाटासमोर अन्न सत्याग्रह केला पण त्याला वर्तमानपत्रांनी किंवा काँग्रेसच्या लोकांनी महत्त्व दिले नाही. हे सारे वर्णन करण्यास महाभारताचे ग्रंथ होतील !

काँग्रेसच्या लोकांना कबूल करावे लागले की, चार वर्षात मंत्री असताना मी बेइमानी केली नाही. आजारी असूनही माझ्या रक्ताचा बिंदू न बिंदू सरकारसाठी खर्च केला. (प्रचंड टाळया) त्यांच्या अंतस्थ यादवीत मी भाग घेतला नाही किंवा अढी बाळगूनही वागलो नाही. चार वर्षाच्या अनुभवाने मात्र मी विचार करू लागलो की, या पार्टीत राहून अगर मंत्री राहून एक साधा सवालही टाकता आला नाही. आता आपला स्वतंत्र मार्ग स्वीकारावा म्हणून मी राजीनामा दिला. (जय भीम ! टाळया).

इतक्या वर्षाच्या अनुभवाने एक विचार मात्र ठाम झाला व तो हा की, ज्याचा उद्धार त्यानीच करावा. लावीण पक्षीण आणि तिची पिले ही तुम्ही शाळेत वाचलेली गोष्ट इथे लागू पडते. ज्याला आपले शेत कापायचे असेल त्याने स्वतःच कापण्याचा निश्चय करावा आणि कामास लागावे. (प्रचंड टाळया.)

आपणाला माणुसकी मिळवून घ्यावयाची असेल तर आपला लढा आपण केला पाहिजे. म्हणून मी काँग्रेसचे राजकारण सोडून फेडरेशनचा लढा लढवीत आहे. (प्रचंड टाळ्या).

आजच्या राजकारणात कोणत्यातरी एका पक्षाबरोबर संधी केली पाहिजे. शंभरात अस्पृश्य नऊ किंवा दहा आहेत. असे असता तह करणे भाग आहे. खेळीमेळीचे राजकारण यशस्वी होऊ शकते. एकांगी राजकारण यशस्वी होऊ शकत नाही. सोशॅलिस्टांच्या उमेदवारांना अशी खात्री वाटली पाहिजे की, आपले लोक या तडजोडीला मान्यता देऊन त्याप्रमाणे या निवडणुकीत वागतील. निश्चयाप्रमाणे वागणे यातच आमची इज्जत आहे.

मी पार्लमेन्टसाठी उभा आहे. ३० वर्षे राजकारण करीत आहे. राजकारण खुर्चीवर बसून सिगरेट पिण्याचे नाही. ते काही साधे काम नाही. माझे आता पुष्कळ झाले, पण समाजाची परिस्थिती मला गप्प बसू देत नाही. समाजाला चार पाऊले नेऊन पुढे सोडावे अशी माझी इच्छा आहे.

तरूण माणसे आता राजकारण लढवायला उतावीळ झाली आहेत! त्यांना राजकारणातला अनुभव हवा व तो आपल्यातील लोकात आहे की नाही याची शंका येते. आता त्यांची उमेदवारी जास्त दिवस नको! लवकरच त्यांना संधी मिळेल.

कोणत्याही राजकीय संस्थेला सहकारी असे एक दलही असले पाहिजे. जेव्हा अस्पृश्यांच्या याच विभागात सभा होत तेव्हा त्या भरविल्या न जाण्याची इतर लोक कोशिश करीत, दगडफेक करीत. सभातून गोंधळ उडवून दिला जात असे. त्यासाठी समता सैनिक दल उभारले गेले, पण पुढे या सैनिक दलात बिघाड झाला. विनयशीलपणा राहिला नाही. मी दिल्लीला गेल्यावर ही गोष्ट घडली. आज या दलाचे पुनरूज्जीवन होत आहे ही आनंदाची गोष्ट आहे. त्यांनी आता दर एक चाळीत जाऊन एक मोठी कामगिरी बजावली पाहिजे. आज एवढा अफाट समुदाय जमला आहे. वर्तमानपत्रवाले नक्की किती आकडा सांगतील कोण जाणे ! केवळ अशा सभांना संख्येने हजर राहून आपला कार्यभाग व्हायचा नाही तर प्रत्येकाने आपला मतदानाचा हक्क बजावला पाहिजे. मुंबईत कार्याचा खरा दिवस ३ जानेवारी आहे.

अस्पृश्य समाजाप्रमाणे इतर मागासलेले समाज आहेत. त्यांच्या जीवनाकडे आपुलकीने फेडरेशन पाहीलच. मजुरांच्या अडचणीप्रमाणे आमच्याही अडचणी आहेत. पण केवळ जाती विरहित योजना आम्हाला आखता येत नाही. कारण काही गोष्टी अशा आहेत की, त्या अस्पृश्यांच्या खास अडचणी आहेत व त्या दलित फेडरेशनच सोडवू शकेल. यासाठी दलित फेडरेशनचे हात मजबूत ठेवा.

• • •

# २८७

# हिंदू कोड बिल संमत व्हायलाच हवे

दिनांक २४ नोव्हेंबर १९५१, शनिवार रोजी सायंकाळी समाजवादी पक्ष आणि शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन यांच्या विद्यमाने दादर, मुंबई येथील महिलांच्या सभेत '' हिंदू कोड बिल '' या विषयावर सभा आयोजित होती. या कार्यक्रमाला डॉ. बाबासाहेब आंबेडकर उपस्थित होते. अध्यक्षस्थानी डॉ. सौ. काशीबाई अवसरे होत्या. डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

'' खुद्द पंडित नेहरूंनी एक वेळ मला हिंदू कोड बिल लोकसभेतून गाळण्याची विनंती केली होती. काँग्रेस हा राजकीय पक्ष आहे की धर्मशाळा आहे ? अन्यथा, एकाच संस्थेत नेहरू व अनंगशयनम् अय्यंगार नि पंडित गोविंद मालवीय ही मंडळी एकत्र कशी राहू शकतात ? '' कोड बिलाने हिंदू स्त्रियांचा किती फायदा होणार आहे हे विषद करून आंबेडकर म्हणाले, '' नेहरू बिलाचे बाजूने असोत वा विरोधी असोत, हे बिल संमत करून घेतल्याखेरीज मी स्वस्थ बसणार नाही. बिल गेल्या ४ वर्षात केव्हाच पास झाले असते, पण नेहरूंनी ते मारून टाकले. ''

● ● ●

---

डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड १० वा, पृ. १३१.

## २८८

# लोकशाहीत विरोधी पक्षाची फार आवश्यकता असते

'रविवार तारीख २५ नोव्हेंबर १९५१ रोजी संध्याकाळी ४ वाजता शिवाजी पार्क, मुंबई येथे शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन आणि समाजवादी पक्षाच्या वतीने निवडणूक प्रचाराची जंगी सभा होणार आहे. सभेत प. पू. डॉ. बाबासाहेब आंबेडकर व साथी अशोक मेहता यांची भाषणे होतील. तत्पूर्वी भायखळ्यापासून प्रचंड मिरवणूक निघेल. तीत सर्वांनी सामील व्हावे.' असे पत्रक ज. ग. भातनकर, जनरल सेक्रेटरी, मुंबई दलित फेडरेशन शाखा, यांच्या नावाने जनतेच्या २४ नोव्हेंबर १९५१ च्या अंकात प्रसिद्ध झाले होते. सभेत किमान दोन लाख जनसमुदाय हजर असावा.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

पंडित नेहरूंनी परवाच्या भाषणात माझ्या टीकेला उत्तर देण्याचा प्रयत्न केला, तेव्हा मी त्यासंबंधी बोलणे अप्रस्तुत होणार नाही. मी काँग्रेसवर ज्या प्रकारची टीका करतो तीच टीका मी माझ्या राजीनाम्याच्या पत्रात केली आहे. नेहरूंनी गेल्या कित्येक दिवसात माझ्या टीकेला उत्तर देण्याचा प्रयत्न केला नाही. लोकसभेतसुद्धा मी निघून गेल्यानंतर सायंकाळी ६ वाजता त्यांनी त्यांचा व माझा केवळ पत्रव्यवहार वाचून दाखविला. माझ्या आरोपांचे निरसन केले नाही. ठिकठिकाणी आपल्या दौऱ्यातसुद्धा त्यांनी त्यासंबंधी खुलासा केला नाही. बरे परवाच्या भाषणात तरी त्यांनी काय सांगितले ?

माझे काँग्रेसवर मुख्यतः दोन आरोप आहेत. एक असा की काँग्रेस सरकारने हरिजनांच्या उन्नतीसाठी काही कार्य केले नाही. पंडित नेहरूंनी सांगितले की, माझे म्हणणे खोटे आहे. पण हा मताचा प्रश्न नाही. वास्तविकतेचा आहे. पंडित नेहरूच केवळ सत्यवक्ते आहेत आणि दुसरे नाहीत असे जग मानीत नाही. निदान मी तरी तसे मानीत नाही. माझे म्हणणे नेहरूंना फक्त एकाच तऱ्हेने खोडून काढता आले असते आणि ते म्हणजे त्यांनी आपल्या सरकारने हरिजनांसाठी काय केले आहे याची समग्र वस्तुस्थिती निदर्शक माहिती

---

जनता : १ आणि ८ डिसेंबर १९५१.

देणारे प्रत्रक काढायला पाहिजे होते. निदान त्यांच्या सरकारी दप्तरात तर ही माहिती असेल की नाही ? मुंबईला येण्यापूर्वी व जाहीर सभेत माझ्या आरोपाला उत्तर देण्यापूर्वी आपल्या खात्याकडून त्यांनी ही माहिती का आणली नाही ? माझी पत्रके व वेळोवेळी पाठविलेली पत्रे पंडित नेहरूंजवळ असतीलच. निदान माझ्याजवळ त्यांच्या प्रती आहेतच. तेव्हा त्यातील आरोपांना मुद्देसूद उत्तर द्या असे माझे नेहरूंना सांगणे आहे.

त्यांच्या परराष्ट्र धोरणावर माझा दुसरा आरोप आहे. मंत्रीमंडळात असताना मी त्यासंबंधी काहीही बोललो नाही असे नेहरूंचे म्हणणे आहे. पहिली गोष्ट अशी की, मी १५ ऑगस्ट १९४७ पासून ते २६ जानेवारी १९५० पर्यंत घटनेच्या कामात व्यग्र होतो. तेव्हा परराष्ट्र धोरणावर मला नेहरूंशी बोलायला वेळच मिळाला नाही. दुसरे असे की, समजा त्यावेळी मी नेहरूंशी बोललो नाही म्हणून माझे म्हणणे चूक कसे ठरते ? समजा त्यावेळी त्याची वाच्यता न करण्यात माझी व्यक्तिगत चूक झाली पण तेवढीच सबब पुढे करून तुम्ही माझ्या मुद्यांना बगल कशी देता ? मी त्याच वेळी ते बोललो का नाही, म्हणजे राजीनामा देऊन निघून का गेलो नाही असेच जर पंडित नेहरूंना सुचवायचे असेल तर मी त्यांना एवढे सांगतो की, मंत्र्यांना असे मोठमोठे निर्णय तारतम्याने घ्यावे लागतात. प्रत्येक मुद्यावर मतभेद झाल्याबरोबर राजीनामे देण्याची साथ सुरू झाली तर मोठा अनवस्था प्रसंग ओढवेल.

मतभेद असतानाही मी मंत्रीमंडळात राहिलो याचे मुख्य कारण राष्ट्राची घटना तयार करण्याचे महान कार्य माझ्या शिरावर होते. मी ते सर्वात अधिक महत्त्वाचे समजत होतो. ते पार पाडण्यात माझ्या कर्तव्यबुद्धिचाच भाग होता. त्या कामावर मी लाथ मारून बाहेर जावे असे म्हणणाऱ्या माणसाला वेड्यातच काढले पाहिजे.

म्हणूनच मी म्हणतो की, अशा प्रकारची हास्यास्पद विधाने न करता काश्मीर प्रश्न किंवा भारताचे परराष्ट्रीय धोरण यावरील माझी विधाने कसोटीला लावून पहा व त्यांना उत्तरे देण्याचा प्रयत्न करा.

नेहरू म्हणजे कॉंग्रेस हा भ्रम आहे. नेहरू स्वप्नाळू व भोळे आहेत. कॉंग्रेसवाले नेहरूंच्या पाठिशी नाहीत याची अनेक उदाहरणे देता येतील. कॉंग्रेसच्या अध्यक्षीय निवडणुकीसाठी टंडण विरूद्ध कृपलानी असा झालेला सामना,

खरा पटेल विरूद्ध नेहरू असा होता. प्रथम नेहरूंनी श्री. शंकरराव देवांना हळद लावून बाशिंग बांधून तयार केले. पण या नवऱ्या मुलाला कोणतीही नवरी मिळणार नाही हे पाहून कृपलानींना उभे केले. अखेर कृपलानीही पडले. पर्यायाने हा नेहरूंचाच पराभव होता. सरदार पटेलांच्या मृत्यूनंतर नेहरू हेच काँग्रेसचे एकमेव पुढारी म्हणून राहिले.

तरीसुद्धा नेहरूंच्या मागे काँग्रेस आली नाही. बंगलोर काँग्रेसमध्ये नेहरूंच्या हाती सर्व सूत्रे सोपविण्याची सूचना त्यांच्याच एका दिल्लीच्या मित्राने आणली पण तिला दुजोरा द्यायलाही कुणी मिळाले नाही. नेहरूंनी राजीनाम्याची धमकी दिल्यानंतरही टंडणजीनी राजीनामा देण्याचे काही कारण नाही, असे काँग्रेस कार्यकारिणीने सांगितले. याचा अर्थ असा की, नेहरू काँग्रेसमधून गेले तरी हरकत नाही इतकी काँग्रेसवाल्यांची तयारी होती. पण निवडणुका दिसू लागल्याबरोबर अकस्मात हे चित्र बदलले. एखाद्या मशहूर सिनेमा नटीच्या भूमिकेमुळे चित्रपटाला भाव येतो. मग त्यात इतर काही नसले तरी चालते. काँग्रेसवाल्यांना निवडणुका जिंकण्यासाठी टंडण ही काही विशेष योग्य नटी वाटली नाही. म्हणून माझा नेहरूंना असा सवाल आहे की, काँग्रेसवाले आज तुमच्या पाठिशी आहेत ते तुमच्यावरील प्रेमामुळे की तुमचा निवडणुका जिंकण्यासाठी वापर करून घेण्यासाठी? मी जर नेहरूंच्या जागी असतो तर माझ्या मनात हा प्रश्न निर्माण झाला असता. चार वर्षे मी काँग्रेसवाल्यांच्या सान्निध्यात होतो. त्यांच्या कानाकोपऱ्यात काय चालते, कोण लोक नेहरूंविषयी काय काय बोलतात हे मी नेहरूंपेक्षाही अधिक जाणतो.

काँग्रेस हाच देशातील एकमेव सुसंघटित पक्ष आहे, त्याशिवाय दुसरा कोणताही पक्ष स्थिर सरकार स्थापू शकणार नाही असे सांगणाऱ्यांना मी विचारतो की, काँग्रेसमध्ये जी बजबजपुरी माजली आहे ती सोडली तरीही काँग्रेस वरिष्ठात तरी मतैक्य आहे काय? मला वाटते निवडणुका संपल्यावर तर हे वाद अधिक उफाळून वर येतील. खुद्द राजेंद्रप्रसाद व पंडित नेहरू यांच्यात धुसफूस सुरू असावी असा माझा तर्क आहे. त्यांचे परस्पर आलिंगनाचे फोटो म्हणजे नागरी संस्कृतीतील खोटी औपचारिकता आहे. हिंदू कोडाच्या प्रश्नावर त्यांचे मतभेद दिसलेच. तसेच मागे राष्ट्राध्यक्ष कुणी व्हावे हे ठरविण्याच्या वेळी नेहरूंनी राजाजींना व पटेलांनी राजेंद्रप्रसादांना पाठिंबा दिला होता हेही माहीत आहे. निवडणुकानंतर पुन्हा यावर झुंज होईलच.

काँग्रेसमध्ये किती घाण माजली आहे हे मोठेमोठे काँग्रेस नेतेच काँग्रेसबद्दल काय म्हणतात, त्यावरून पहा. खुद्द टंडणजींनी काँग्रेसचे तिकीट घेण्यास साफ नकार दिला. बाबू संपूर्णानंद यांनी तेच केले. संपूर्णानंद म्हणाले की, काँग्रेसचे राजकारण म्हणजे गटाराचे राजकारण झाले आहे.

पंडित नेहरूंच्या मताविषयी मला अंदाज लागलेला नाही. ते कम्युनिस्ट,सोशालिस्ट, भांडवलदार धार्जिणे यापैकी काय आहेत, या प्रश्नाचे निश्चित उत्तर मी देऊ शकणार नाही. परंतु ते सर्वसामान्यपणे प्रगतीवादी आहेत असे मी मानतो. म्हणूनच त्यांचे सहकारी श्री. किडवाई जेव्हा काँग्रेसबाहेर पडले तेव्हा मी त्यांना म्हटले होते की, तुम्ही जर पंडित नेहरूंना घेऊन बाहेर पडणार असाल व सोशालिस्टांसारख्या प्रगतीशील पक्षांशी सहकार्य करणार असाल तर मी सुद्धा तुम्हाला येऊन मिळेन. पण ते चिखलात फसले आहेत त्याला कोण काय करणार? किडवाईत थोडासुद्धा राजनीतीचा अंश दिसला नाही.

लोकशाहीत कोणत्याही पक्षाच्या हाती अनियंत्रित सत्ता असू नये. त्यासाठी विरोधी पक्षाची फार आवश्यकता असते. इंग्लंड, अमेरिकेत किंवा फ्रांसमध्ये असे दोन किंवा तीन पक्ष असल्यामुळे लोकशाही यशस्वी झाली आहे. त्यासाठीच आम्ही सोशालिस्ट व शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन मिळून एक मजबूत विरोधी आघाडी उभारायचे ठरविले आहे. आमच्यात काही मतभेदाचे मुद्दे असले तरी साम्य पुष्कळ आहे आणि विशेष म्हणजे आम्हाला अशारितीने देशहित साधायचे आहे. देशात आमचे सरकार आम्ही स्थापू शकलो नाही, तरी सत्तारूढ पक्षाला लगाम घालू शकेल असा प्रबळ विरोधी पक्ष उभारू शकू.

भाषावार प्रांतरचनेबाबत सुद्धा आम्हाला झगडा करावा लागेल. कारण मुंबई शहर महाराष्ट्रापासून अलग करण्याचे डाव खेळले जात आहेत. नेहरूंचे मतही याबाबत महाराष्ट्राला प्रतिकूल आहे. हैदराबादचे विलीनीकरण करण्यास नेहरूंचा विरोध आहे. तेव्हा ही एक मोठी भानगडच होणार आहे.



# २८९

# सचोटी बाजूला ठेवून मी कृतज्ञ राहिलो तर तो मानवी व्यक्तिमत्त्वाचा वध आहे असे मी समजेन

''निवडणूक प्रचाराचे एक उत्कृष्ट भाषण बाबासाहेबांनी सोमवार दिनांक २६ नोव्हेंबर १९५१ ला संध्याकाळी सर कॉवसजी जहांगीर हॉलमध्ये भरविण्यात आलेल्या जाहीर सभेत केले. या सभेचे अध्यक्ष बॅ. पुरुषोत्तम त्रिकमदास हे होते. यावेळी बाबासाहेब डोळे व गुडघे यांच्या आजाराने हैराण झालेले होते. डोळ्यांवर घड्या ठेवून डोळे दोन दिवस झाकून ठेवलेले होते. सभेत ते आले ते डोळ्यांवर घड्या घालून व वर काळा चष्मा लावून, दोन तीन माणसांच्या खांद्यावर हातांनी स्वतःचा भार टाकून. त्यांनी भाषण बसून करावे असा आग्रह सर्व समाजवादी व फेडरेशनच्या कार्यकर्त्यांनी केला, पण बाबासाहेबांनी उभे राहूनच भाषण केले. ते भाषणाला उभे राहिले, तेव्हा सभेत टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला. हॉलच्या बाहेर हजारो प्रेक्षक उभे राहिलेले होते तेही त्यात सामील झाले. औषधाच्या गोळया घेऊन बाबासाहेबांनी भाषणाला सुरुवात केली. राज्यकारभार निर्मळपणे चालवणे कसे जरूर आहे व असा कारभार, काँग्रेस पक्षीय सरकार चालविण्यास असमर्थ आहे. म्हणून जनतेने दुसऱ्या पक्षाचे सरकार सत्तेवर आणावे हे मुद्दे संयुक्तिक व सप्रमाण मांडून बाबासाहेबांनी प्रेक्षकांना दीड तास मंत्रमुग्ध करून सोडले. त्यांचे भाषण ऐकण्यास सर्व थरातील लोक, कायदे पंडित, श्रीमंत व्यापारी, समाजवादी, साम्यवादी व इतर नागरिक उपस्थित होते. अस्पृश्य अनुयायांची उपस्थिती तर विचारायलाच नको, एवढी असंख्य होती. भाषण संपले तेव्हा श्रोते बाबासाहेबांच्या भाषणाची प्रशंसा करीतच हॉलच्या बाहेर पडले.'' [१]

''डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

भगिनींनो आणि बंधुजनहो,

स. का. पाटील हे आपल्या मित्रांजवळ खाजगी रितीने असे सांगत आहेत की माझ्या सुचनेमुळे आंबेडकरांना पहिल्या मंत्रीमंडळात स्थान मिळाले आणि आता ते कृतघ्न होऊन काँग्रेसवर व मंत्रीमंडळावर टीका करीत आहेत. ही माहिती

---

[१] डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड १० वा पृ. २२६-२७.

खरी आहे काय ? असा प्रश्न सभेतील एका श्रोत्याने प्रारंभी मला विचारला होता. मला काँग्रेसच्या मंत्रिमंडळात स्थान कसे मिळाले ही माझ्या आयुष्यातील अत्यंत आश्चर्याची गोष्ट आहे. मला घटनासभेची सर्व दारे, खिडक्या आणि भेगासुद्धा बंद करण्यात आल्या होत्या, आम्ही इतर कोणालाही घटना सभेत घेऊ पण आंबेडकरांना येऊ देणार नाही अशी काँग्रेसवाल्यांची प्रतिज्ञा होती, पण मी बंगाल विधिमंडळातून प्रचंड मतांनी घटना सभेत निवडून गेलो. सिंहाच्या गुहेत सापडल्यासारखी माझी स्थिती होती. मी कोणाशीही बोलत नव्हतो, मी फक्त एकदा भाषण केले.

असे सहा महिने गेले. पुढे एक दिवस घटनासभेचे कामकाज संपल्यावर अकस्मात मला नेहरूंनी खोलीत बोलावून विचारले की तुम्ही मंत्रीमंडळात याल का? मी सारासार विचार करून व सहकाऱ्यांच्या सल्ल्याने सहकार्याची संधी आली आहे असे समजून ते मंत्रीपद स्वीकारले. पुढे सरदार पटेल व राजाजी दोघेही म्हणू लागले की आमच्या सुचनेमुळे तुम्हाला मंत्रीमंडळात घेतले, आता त्यांच्या स्पर्धेत स. का. पाटील सामील आहेत असे दिसते. याच्यावरून मी एकच निष्कर्ष काढतो की मी काहीतरी चांगले काम केले असावे, म्हणून ही श्रेय घेण्याची स्पर्धा चालू आहे.

आता मी कृतघ्न झालो आहे असे लोक म्हणतात. पण मी ओ-कॉनल या आयरिश देशभक्ताच्या शब्दात त्यांना उत्तर देऊ इच्छितो, ते असे, " No man can be grateful at the cost of his honour, no woman can be grateful at the cost of her chastity, and no nation can be grateful at the cost of its liberty." माझी सचोटी बाजूला ठेवून मी कृतज्ञ राहिलो तर तो मानवी व्यक्तिमत्त्वाचाच वध आहे असे मी समजेन. मला माझा प्रामाणिकपणा अधिक महत्त्वाचा वाटतो.

कोणतेही सरकार आज जनहित किती साधते याच्यावर त्याचे श्रेष्ठत्त्व अवलंबून आहे. अन्नवस्त्रादी प्रश्न तर महत्त्वाचे आहेतच, पण त्याहूनही महत्त्वाची गोष्ट म्हणजे राज्यकारभार किती शुद्धतेने केला जातो ही आहे. आपल्या देशात गेली चार वर्षे अन्नाचे दुर्भिक्ष, कापडाचे दुर्भिक्ष इत्यादि संकटे तर सतत येतच आहेत, पण सगळ्यात महत्त्वाचा दोष कोणता असेल तर तो म्हणजे अशुद्ध व लाचबाजीने भरलेले राज्यशासन. राज्यशासन शुद्ध राखण्यास तर काही बाहेरची मदत लागत नाही. फक्त शुद्ध राखण्याची इच्छा पाहिजे. राज्यशासन आज शुद्ध राखण्यात मोठी अडचण काँग्रेसपुढे कोणती असेल तर ती म्हणजे काँग्रेसलाच ती शुद्धता ठेवण्याची इच्छा नाही.

भारतातील उत्तर प्रदेश, बिहार, बंगाल इत्यादि प्रांतात जनतेने नव्हे तर कॉँग्रेसवाल्यांनीच कॉँग्रेस मंत्र्यांविरूद्ध अनेक आक्षेप घेतले आहेत. दुर्दैवाची गोष्ट अशी आहे की त्यापैकी कोणत्याही प्रांतात या भयंकर आरोपाची न्यायालयीन तर राहोच, पण पक्षीय चौकशीही झाली नाही. १९१०-११ च्या सुमारास लॉर्ड ॲक्विथ हे इंग्लंडचे पंतप्रधान असताना लॉर्ड रीडिंग व लॉईड जॉर्ज यांचा एका केबल-कंत्राटात हात आहे अशी अफवा उठली होती. पण त्यांनी लगेच एक चौकशी समिती नेमली, ते निर्दोष निघाले. तरीसुद्धा ॲक्विथने त्या दोघांनाही राजीनामे देण्यास भाग पाडले, कारण त्यांना वाटत होते की आपल्या सहकाऱ्यांपेक्षा देशहित मोठे आहे. अशाच प्रकारचे दुसरे एक उदाहरण गेल्या वर्षी ॲटलींच्या कारकीर्दीत झाले होते. लॉर्ड लिस्टोवेल हे व्यापारमंत्री होते. एका व्यापारी मित्राकडून ब्रँडीची बाटली व सुटाचे कापड घेतल्याचा आरोप त्यांच्यावर होता. वस्तुतः चौकशीनंतर त्यात काही तथ्य नाही, ती मित्र म्हणून भेट दिली होती असे आढळले. पण तरीही ॲटलींनी त्यांना मंत्रीमंडळातून काढून टाकले.

ही इंग्लंडमधील राज्यकारभार शुद्ध ठेवण्याची असलेली कळकळ पहा आणि कॉँग्रेसची कळकळ पहा. मंत्र्यांविरुद्ध किती गंभीर आरोप होते पण त्याचे काय झाले !

मी आणखी काही उदाहरण देतो. मी प्रतिनिधीत्वाचे बिल तयार करीत असताना सरकारी कंत्राटे असणाऱ्यांना पार्लमेन्टचे दरवाजे बंद असावेत म्हणून तरतूद केली होती. पण ती केल्यावर कॉँग्रेस पार्लमेंटरी पक्षात वादळ उठले. शेवटी मला तो भाग गाळावा लागला ! दुसरे उदाहरण मी त्याच बिलात प्रत्येक उमेदवाराच्या निवडणूक खर्चावर जे नियंत्रण घातले होते त्याबद्दलचे आहे. या प्रश्नावरही खूप रण माजले. ३ दिवस त्यांच्यात चर्चा चालू होती. पार्लमेंटमधील कॉँग्रेस सभासद नेहरुंकडे धावले व त्यांना म्हणाले '' तुम्ही कॉँग्रेसला शत्रुस्थानी मानणाऱ्या या माणसाला हे महत्त्वाचे बिल तयार करावयास का सांगितले ? त्यांना कॉँग्रेसचा नाश करावयाचा आहे. '' मी त्या बिलात अशी तरतूद केली होती की कोणत्याही उमेदवारासाठी होणारा निवडणूक खर्च त्याच्या नावावर मांडला जावा. याचा परिणाम असा झाला असता की

निवडणूक निधीचे पैसे वारेमाप कोणत्याही उमेदवारावर पक्षाच्या नावाने उधळता आले नसते. पण मला हेही कलम शेवटी गाळावे लागले. मी त्यासाठी खूप झुंज दिली, पण शेवटी हरलो.

मला सांगा की ही प्रवृत्ती लोकशाहीच्या पावित्र्याशी सुसंगत आहे काय? प्रत्येक देशातील निवडणूक कायद्यात अशा प्रकारचे कलम आहे. कोणताही लोकशाही निष्ठ पक्ष हे सहन करणार नाही. कारण कोणताही कायदा कितीही चांगला असला तरी तो व्यवहारात कशा पद्धतीने येतो याला राज्यकारभारात महत्त्व आहे.

हे झाले राज्यशासनातील दोष. मला मी दिल्लीहून इकडे येताना असे कळले की या भागात काही ठिकाणी स्थानिक काँग्रेस नेते न्यायाधीशांवर दडपण आणून आपल्या मनासारखे निर्णय लाऊन घेण्याचा प्रयत्न करतात. आपल्या राज्यघटनेत कायदा हा सर्वांना समान लेखील असे म्हटले आहे. अशा प्रकारचा हस्तक्षेप झाला तर या देशाचे काय होईल हे मी सांगू शकत नाही.

मला वाटते काँग्रेसने या देशात विरोधी पक्षांना चिरडून टाकण्याची भाषा बोलण्यापेक्षा ते वाढावेत म्हणून उत्तेजन द्यावयाला हवे. ज्या देशात पार्लमेन्टरी लोकशाही आहे तेथे अनेक पक्ष नाहीत काय ? मग तुम्हाला येथे भीती का वाटते ? अशी दडपशाही करणारी काँग्रेस विस्तवाशी खेळ खेळत आहे. तीच गोष्ट पैसेवाल्यांची. हे धनिक एखाद्या पक्षाला निवडणूक निधीला पैसे देऊन स्वतःचे वर्चस्व लादू पाहात आहेत. त्यांनी हे लक्षात ठेवावे की, हेही घातक ठरेल. तसेच सरकारी अधिकारी सत्तारूढ पक्षांपुढे नमून वर्तन करतील तर स्वतंत्र व शुद्ध निःपक्षपातीपणे निवडणुका होणार नाही, त्यांनी स्वकर्तव्य निष्ठेने व निष्पक्षपणे केले पाहिजे.

कोणतेही सरकार बिनचूक कारभार करीत नाही. प्रत्येकाकडून प्रमाद हे घडतातच. पण ते दाखविण्यासाठी जनतेला सरकारच्या चुकांची माहिती होण्यासाठी विरोधी पक्षाची आवश्यकता असते. इंग्लंड, कॅनडा या देशात विरोधी पक्षाला अधिकृत मान्यता असते, त्याच्या नेत्यांना सरकारी पगार मिळतो.

शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन व समाजवादी यांच्या निवडणूक सहकार्याबद्दल लोकांना वैषम्य का वाटते याविषयी मला आश्चर्य वाटते. मी जातीने अस्पृश्य आहे. तसे मी राजकारणातही अस्पृश्य राहावे अशी या लोकांची इच्छा आहे काय ? कदाचित मी काँग्रेसमध्ये गेलो नाही म्हणून त्यांना वैषम्य वाटत असावे.

या देशातील राज्यकारभार शुद्ध ठेवण्याचा प्रयत्नही ज्या काँग्रेसने केला नाही त्या काँग्रेसला पुन्हा निवडून द्यावयाचे की नाही हे तुम्हीच ठरवा !'' [१]



[१] जनता : १ डिसेंबर १९५१.

# २९०

# राजकीय हक्कांची जाणीव झाल्यानेच बलाढ्य संस्थांशी लढा देता येईल

मुंबईच्या शिवडी लेबर कँप महिला मंडळातर्फे ता. १९ डिसेंबर १९५१ रोजी रात्रौ ७ वाजता जुन्या सिद्धार्थ कॉलेज येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या निवासस्थानी त्यांना ५०१ रुपयांची थैली सौ. माईसाहेबांचे हस्ते अर्पण करण्यात आली. त्या प्रसंगी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी उपस्थित महिलांना उद्देशून भाषण केले. ते म्हणाले,

भगिनींनो, आजच्या प्रसंगी आपण दिलेल्या देणगीबद्दल मी आपल्या सर्वांचा फार ऋणी आहे. सध्या आपणास पैशाची फारच जरूर आहे. म्हणून कोणतीही देणगी मग ती लहान असो अगर मोठी असो फारच महत्त्वाची आहे. परंतु एवढ्यानेच आपली कामगिरी संपत नाही. ३ तारखेस आपणास मोठी कामगिरी बजावयाची आहे व ती देणगी या देणगीपेक्षा कित्येक पटींनी बहुमोलाची आहे.

येथे जमलेल्या बहुतेक स्त्रिया मोलमजुरी करणाऱ्या आहेत. तरीपण इतर समाजातील सुशिक्षित स्त्रियांपेक्षा त्यांना राजकारणाविषयी जास्त आवड आहे असें आजच्या प्रसंगावरून सिद्ध होत आहे.

इतर समाजाच्या मानाने आपली लोकसंख्या फारच थोडी आहे. तरीपण कॉंग्रेस सारख्या बलाढ्य संस्थेशी आपले उमेदवार लढा देऊ शकतात. याचे कारण आपल्या समाजात झालेली आपल्या राजकीय हक्कांची जाणीव. इतर समाजातील शेकडा २५ लोक मतदान करतात तर आपल्यापैकी शेकडा ९० मतदार मतदान करतील व म्हणूनच आपल्या उमेदवारास इतर बलाढ्य पक्षांशी टक्कर देणे शक्य होते.

जानेवारी ३ तारखेस मात्र आपण आपली कामगिरी अगदी व्यवस्थितपणे पार पाडून आपल्या उमेदवारास निवडून द्याल अशी आशा आहे.



---

जनता : २२ डिसेंबर १९५१.

# २९१
# अल्पसंख्य जमातींचे मूलभूत हक्क शाबीत राहिले पाहिजे

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी शुक्रवार ता. २१ डिसेंबर १९५१ रोजी मुंबईतील महमद अली रोडवर बेग महमद बाग येथे मुसलमान बंधुंच्या प्रचंड प्रचार सभेत भाषण केले. ते म्हणाले,

माझ्याकडे साथी हॅरीस आणि इतर काही मुसलमान बंधु आले आणि म्हणाले की आपण मुसलमान बंधुंना चार उपदेशाच्या गोष्टी सांगा. ते काँग्रेसकडे झुकले आहेत. काँग्रेसने आपणावर उपकार केले, असे त्यांना वाटत आहे.

मला या गोष्टीचे आश्चर्य वाटले; नव्हे तर चीड आली आणि म्हणूनच देशातील खरी परिस्थिती मुसलमान बंधुंना सांगावी म्हणून येथे मी आलो आहे.

काँग्रेसने मुसलमानांसाठी काय केले आहे? तुम्हाला वाटेल की १९४७ च्या दंगलीमध्ये काँग्रेसने तुमचे प्राण वाचविले. पण ही तुमची समजूत साफ चुकीची आहे. उलट ह्या काँग्रेसवाल्यांनी तुम्हाला आश्रय न देता गुंडांना प्रोत्साहन देऊनच ही दंगल वाढविली आणि तुम्हाला भयभीत केले. ते इतके की काँग्रेसशिवाय दुसरा कोणी या देशात तुमचा आता वाली राहिला नाही!

यावरून तुम्ही जी कृतज्ञता काँग्रेसला दाखवित आहात तिला काँग्रेसची पात्रता आहे काय ? पंडित नेहरूंबद्दल तुम्ही भलतीच अपेक्षा करून गोडवे गात आहात. या पंडितजींचे धोरण धरसोडीचे आहे. त्यामुळे तुम्ही अखेर पस्तावाल. लोकशाहीच्या राज्यात नेहरू घराण्याची प्रधानकी परंपरा आपणास सुरू ठेवायची नाही. एवढेच नव्हे तर आपणासारख्या अंधश्रद्धाळू लोकांचा फायदा घेऊन ती टिकविण्याचा प्रयत्न कुणी केला तरी जागृत समाज अशी परंपरा चालू देणार नाही.

काँग्रेस ही पुढच्या निवडणुकीत हमखास निवडून येत नाही. ती आता शेवटचा श्वास घेत आहे. आपल्या देशातील इतर जमाती जशा राजकीय हक्कांसाठी जागृत झाल्या आहेत तसेच तुम्हीपण पूर्वीचा जोम कायम ठेवून राजकीय हक्क मिळविण्यासाठी झगडले पाहिजे.

---

जनता : २२ डिसेंबर १९५१.

घटना तयार करताना काँग्रेसने अल्पसंख्यांकांच्या राजकीय भवितव्याचा विचार करण्यासाठी नेमलेल्या समितीची सभा ज्या दिवशी होती त्याच्या आदल्या दिवशी मी काँग्रेसचे प्यादे मौलाना आझाद यांना भेटलो व त्यांना अल्पसंख्यांकांच्या सर्व प्रश्नांची व भवितव्याची इत्थंभूत कल्पना करून दिली. पण हे मौलाना दुसऱ्या दिवशी सभेत हजर न राहाता निघून गेले. मुसलमान बंधु तद्वत इतर अल्पसंख्यांकांचा प्रश्न माझ्याशिवाय तिथे कुणी मांडू शकला नाही आणि मी आपल्यावतीने एकटाच असल्यामुळे पंडित नेहरूंनी मुसलमानांना राखीव जागा देण्याच्या सूचनेला काँग्रेसच्या वतीने विरोध केला व त्यामुळे आपण राजकीय हक्कांना मुकलात.

सर्वधर्मीय समानतेचे सरकार आहे, असे जे काँग्रेस म्हणते ती एक निव्वळ त्यांची थाप आहे. कारण आपल्या घटनेमध्ये अशी तरतूद मी करून ठेवली आहे की कोणत्याही जातीवर, धर्मावर व रूढीवर कुणाचेही वर्चस्व असता कामा नये व त्यांचे मूलभूत हक्क शाबीत राहिले पाहिजेत. असे असता काँग्रेसने मुसलमानांची संख्या लखनौ सारख्या ठिकाणी जास्त असतानाही आणि तेथे पन्नास मुसलमान उमेदवार सहज निवडून येणे शक्य असतानाही फक्त दहा बारा मुसलमान उमेदवारच उभे केले हे ध्यानात ठेवा.

यावरून या निवडणुकीत कोणाला मत द्यावयाचे ते ठरवा. मी तर म्हणतो की आपण सोशालिस्ट व दलित फेडरेशनला साहाय्य करावे व देशाचे भवितव्य सुधारावे.



## २९२

# निवडणुका निःपक्षपाती होण्याची गरज

रविवार दिनांक २३ डिसेंबर १९५१ रोजी समाजवादी पक्ष व शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन यांच्या वतीने मुंबई येथील चौपाटीवर सभा आयोजित करण्यात आली. या सभेत पाच लाखापेक्षा जास्त स्त्री-पुरूषांचा विराट समुदाय हजर होता. या सभेस उद्देशून डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

निवडणूक विषयीचा कायदा पास झाल्यावर शुद्ध, स्वतंत्र व पद्धतशीर निवडणुका होण्यासाठी वर्ष दोन वर्षाचा अवधी हवा होता.

निवडणुकाबाबतचा कायदा मंजूर झाल्यावर एकदोन वर्षात निवडणुका केल्या असत्या तर काँग्रेसखेरीज इतर पक्षांना एक प्रबळ काँग्रेसविरोधी पक्ष संघटित करण्यास अवसर मिळाला असता.

१९४६ पासून काँग्रेसपाशी अनियंत्रित सत्ता असतानाही काँग्रेस सरकार लोकांचे कोणत्याही प्रकारचे कल्याण का करू शकले नाही या माझ्या सवालाचे नेहरूंनी उत्तर द्यावे. येत्या ५ वर्षात काँग्रेस काय करणार याचेही उत्तर त्यांनी द्यावे. नेहरूंच्या भाषणात याचे उत्तर मिळत नाही, त्यात नुसता शिवराळपणा असतो, विधायक दृष्टी नसते!

तुरुंगात जाऊन अगर लढा करून काँग्रेसने स्वातंत्र्य मिळवले हा भ्रमाचा भोपळा आहे. सुभाषचंद्र बोस हेच स्वातंत्र्य मिळविण्यास मुख्यतः कारणीभूत झाले. हिंदी सैन्याच्या निष्ठेवर ब्रिटिश सरकार आधारले होते. बोस यांनी त्या निष्ठेला पराकाष्ठेचा धक्का देऊन सैन्यात असंतोष फैलावला आणि आझाद हिंद सेना स्थापिली, हे पाहून ब्रिटिशांनी काढता पाय घेतला.

काँग्रेसची १९४२ ची चळवळ अयशस्वी ठरली. १९४२ ची चळवळ मी कधी सुरु केलीच नव्हती असे गांधी म्हणाले होते याचा काँग्रेसवाल्यांना विसर पडला आहे. ही चळवळ फसली याचा एक पुरावा म्हणजे त्यानंतर गांधींनी वॅव्हेलची मुलाखत मागितली असता वॅव्हेलने त्यांना स्पष्ट नकार दिला. १९२१ पासून कोणत्याही व्हाइसरॉयने गांधींचा असा अपमान केला नसावा.

समाजवादी-शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन या समझोत्यावरील वृत्तपत्रांची टीका मी बारकाईने वाचली पण त्यात काही तथ्य सापडले नाही. या दोन पक्षांच्या जाहीरनाम्यात एकही दोष दाखवण्याची कोणाचीही छाती झाली नाही. काँग्रेसला

---

जनता : २९ डिसेंबर १९५१.

यश मिळू नये म्हणून समाजवादी व शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन यांनी एकमेकांना सहाय्य करण्याचे ठरविले आहे. अर्थात काही प्रश्नाबाबत आमचे मतभेद आहेत. स्वतंत्र उमेदवार माझ्याकडे आले असते तर मी त्यांना पुरस्कृत उमेदवार म्हणून पाठिंबा दिला असता. पण आता कोणीही स्वतंत्र उमेदवारांना मते देऊ नयेत.

समाजवादी-शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन येत्या फेब्रुवारीत मुंबई कार्पोरेशन काबीज करून मुंबई एक नवे शहर बनवतील असा विश्वास श्री. अशोक मेहता यांनी प्रथम बोलताना व्यक्त केला. नेहरू ही समाजवाद्यांच्या मार्गातील एक धोंड असल्याचे मत त्यांनी प्रगट केले. श्री. पुरुषोतम त्रिकमदास व कृष्णा हाथीसिंग यांचीही भाषणे झाली.

• • •

# २९३

# सरकारने आर्थिक बोजा सहन करून धान्याच्या किंमती माफक ठेवाव्या

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हैदराबाद येथे दिनांक ११ मे १९५२ रोजी येथील एका कार्यक्रमात म्हणाले,

भावी योजनांना धक्का लागू नये म्हणून केंद्राने घटकराज्यांना धान्यासाठी दिली जाणारी आर्थिक मदत बंद केली असे सांगण्यात येते. पण सध्याची पिढी तग धरू शकेल इतकी तरी किमान तरतूद सरकारने करावयास हवी. भावी पिढ्यांसाठी सध्याच्या पिढीने आत्मनाश ओढवून घ्यावा हे म्हणणे शहाणपणाचे खास नव्हे.

आर्थिक मदत बंद करून केंद्र सरकारने मोठी चूक केली आहे. केंद्राने किंवा राज्यसरकारांनी आर्थिक बोजा सहन करून धान्याच्या किंमती जनतेस परवडतील अशा ठेवल्या पाहिजेत.

केंद्राने घटकराज्यांना लागणाऱ्या आवश्यक गोष्टीसाठी मदत करण्याची पद्धत जगातील सर्व राष्ट्रात आहे. भारत सरकारच्या अन्नविषयक धोरणात सुसूत्रता नसल्याने घटकराज्य सरकारांना केंद्राने धान्याबाबत मदत दिलीच पाहिजे.

तत्त्वतः मी सत्याग्रहाविरुद्ध आहे. परंतु समाजवादी पक्षाला सत्याग्रह करण्यासाठी बाध्य करण्यात आले. सरकार आपल्या हेकेखोर वृत्तीने लोकांना घटनाबाह्य पद्धतीचा अवलंब करण्यास भाग पाडते.



---

जनता : १७ मे १९५२.

# २९४

# . . . . अधिकारारूढ पक्षाशी माझे मतभेद असले तरी देशाची नाचक्की कधीही करणार नाही

''भारताची राज्यघटना तयार करण्यात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी जी महत्त्वाची कामगिरी केली; त्याबद्दल त्यांना सन्माननीय पदवी देऊन त्यांचा सत्कार करण्याची योजना अमेरिकेतील कोलंबो युनिव्हर्सिटीने १९५० साली आखली. युनिव्हर्सिटीने तसे त्यांना कळविले. ज्या युनिव्हर्सिटीतून आपण एम्. ए., पीएच. डी. या पदव्या १९१५ व १९१७ सालात घेतल्या ती युनिव्हर्सिटी आपल्या कर्तृत्त्वाने प्रभावित होऊन आपला सन्मान करण्यासाठी आपणाला आणखी एक उच्च पदवी, डॉक्टर ऑफ लॉज (LL.D.), देऊन आपला सन्मान करीत आहे हे पाहून बाबासाहेबांना फार फार आनंद झाला. आपल्या आयुष्यातील मनात बाळगलेल्या सर्व महत्त्वाकांक्षा आपण जिवापाड परिश्रम करून सफल केल्या, याचे त्यांना समाधान वाटले. परंतु यावेळी, भारताच्या मंत्रीमंडळापुढे मोठ मोठे प्रश्‍न उपस्थित झालेले होते आणि ते घटनात्मक पद्धतीने हाताळून सोडविणे इष्ट होते. या महत्त्वाच्या कामाला बाजूला सारुन कोलंबिया युनिर्व्हसिटीची पदवी घेण्याकरता न्यूयॉर्कला जाणे बाबासाहेबांना प्रशस्त वाटले नाही. शिवाय इतक्या लांबचा (सहा हजार मैल) प्रवास करण्याची दगदग आपल्या ढासळलेल्या प्रकृतीमुळे शक्य होईल की नाही याची त्यांना खात्री नव्हती. म्हणून त्यांनी युनिर्व्हसिटीला कळविले की सध्या मला अमेरिकेला येण्यास सवड नाही. युनिर्व्हसिटीचे त्यावेळचे अध्यक्ष जनरल ऐसेनहॉवर हे होते. हेच पुढे अमेरिकेचे अध्यक्ष झाले. बाबासाहेब त्यावेळी गेले असते तर ऐसेनहॉवरच्या हस्ते सदर पदवीदान समारंभ झाला असता. कोलंबिया युनिर्व्हसिटी बाबासाहेबांच्या गैरहजेरीत पदवी देण्यास तयार होती. पण बाबासाहेबांना ते नको होते. आपल्या विद्वत्तेला कारणीभूत झालेल्या युनिर्व्हसिटीत स्वतः जाऊन पदवी स्वीकारण्याची त्यांची इच्छा होती. म्हणून एक दोन वर्षात आपण पदवी स्वीकारण्यास येऊ असे त्यांनी युनिर्व्हसिटीला कळविले. शेवटी १९५२ च्या एप्रिलमध्ये, सर्व प्रमुख कामाच्या व्यापातून मोकळे झाल्यावर त्यांनी युनिर्व्हसिटीशी पत्रव्यवहार केला. युनिर्व्हसिटीने पदवीदान समारंभ ५-६-१९५२ ला करण्याचे जाहीर केले. ज्या पंडितांना मानाच्या उच्च पदव्या द्यावयाचे ठरविले होते त्यांची यादी युनिर्व्हसिटीने मे महिन्याच्या चौथ्या आठवड्यात जाहीर

केली. तीत बाबासाहेबांचे नाव होते. ते नाव वाचून त्यांच्या हजारो चाहत्यांनी त्यांना अभिनंदनपर तारा व पत्रे पाठविली. त्या चहात्यांपैकी भारताचे जगद्‌विख्यात तत्त्वज्ञानी पंडित आणि भारत सरकारचे उपराष्ट्रपती डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन् हे एक होते.

न्यूयॉर्क येथे एखाद्या निष्णात डॉक्टरांकडून प्रकृति तपासून घेण्याचे बाबासाहेबा्ंनी मनात योजलेले होते. त्यावेळी कोणीही बरोबर नसावे, अशी त्यांची इच्छा होती. आपल्या खर्चाला लागतील इतके डॉलर्स बँकेकडून मिळत नाहीत म्हणून आपण आपल्या पत्नीला न्यूयॉर्कला नेऊ शकत नाही असाही खुलासा बाबासाहेबांनी इलस्ट्रेटेड विकली ऑफ इंडियाचे वार्ताहर श्री. पोलेक्स यांच्या जवळ केला. ''[१]

## डॉ. बाबासाहेब आंबेडकर अमेरिकेला जाणार

'' कोलंबिया विश्वविद्यालय हे अमेरिकेतीलच नव्हे तर जगातील सुप्रसिद्ध विश्वविद्यालय आहे व या विश्वविद्यालयातूनच डॉ. बाबासाहेब आंबेडकर एम्. ए., पीएच. डी. झाले. पीएच. डी. चा प्रबंध परिक्षकांनी पदवीसाठी पसंत केल्यावर तो पुस्तक रूपाने छापल्यावरच पदवी लावायला मिळते असा या विश्वविद्यालयाचा दंडक असतानाही डॉक्टरसाहेबांची विद्वता व प्रबंधावरील श्रम लक्षात घेऊन त्यांनाच खास पदवी लावण्याची अगाऊ परवानगी दिली होती.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा अमेरिकन जनतेला जगात जास्तीत जास्त खपणाऱ्या सुप्रसिद्ध ' रीडर्स डायजेस्ट ' वगैरे मासिकाद्वारे व वृत्तपत्राद्वारे परिचय झालाच आहे. शिवाय जगातील एक महान विद्वान व ग्रंथकार व प्रभावी वक्ते म्हणून ते प्रसिद्ध आहेत. भारताचे घटनाकार म्हणून त्यांचा अगोदरच डंका वाजला आहे.

अमेरिकेत त्यांची ठिकठिकाणी व्याख्यानेपण होतील व डॉ. महाशयांच्या व्यक्तिमत्त्वाची अमेरिकन जनतेवर खास छाप पडेल.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर ह्यांना कोलंबिया युनिव्हर्सीटीने एलएल. डी. ची पदवी जी भारताची घटना तयार केल्याबद्दल दिलीं, ती पदवी स्वीकारण्यासाठी बाबासाहेब शनिवारी सकाळच्या विमानाने अमेरिकेला जाण्याकरिता मुंबईस आले. त्यावेळेस शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे अध्यक्ष व जनरल सेक्रेटरी हजर होते. तसेच मुंबई राज्य फेडरेशनचे प्रांताध्यक्ष दादासाहेब गायकवाड आणि सिद्धार्थ कॉलेजचे रजिस्ट्रार श्री. कमलाकांत चित्रे इत्यादी मंडळी हजर होती.

---

[१] डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड १० वा, पृ. २८०, २८१ आणि २८३.

बाबासाहेब, माईसाहेब आंबेडकर ह्यांच्या समवेत विमानातून उतरल्यावर प्रांताध्यक्षांनी हार घालून त्यांचा गौरव केला, लगेच ते आपल्या आवडत्या राजगृहात गेले. '' [१]

''बाबासाहेब, रविवार १-६-१९५२ च्या रात्री अमेरिकेला (न्यूयॉर्क) टी. डब्ल्यू. ए. च्या विमानाने निघणार हे नक्की ठरले, तेव्हा त्यांचे चहाते, अनुयायी, मित्र आणि पीपल्स एज्युकेशन सोसायटीचे कर्मचारी यांनी त्यांना शनिवार ३१ मे १९५२ ला रात्री क्रिकेट क्लब ऑफ इंडिया येथे सत्कार-जेवण दिले. डॉ. व्ही. एस. पाटणकर (प्रिन्सीपॉल) आणि श्री. के. व्हि. चित्रे, सेक्रेटरी, पीपल्स एज्युकेशन सोसायटी, श्री. प्रभाकर पाध्ये, श्री. बी. एच. राव, श्री. डब्ल्यू. आल्फ्रेड चेअरमन ऑफ दी युनियन ऑफ जर्नलिस्ट वगैरे लोक हजर होते. बाबासाहेबांना परदेशातील विद्यापीठे उच्च पदवी देऊन त्यांचा सन्मान करतात आणि आमची भारतीय विद्यापीठे, ज्या विद्यापीठातून बाबासाहेब प्रथम पदवीधर झाले, ते मुंबई विद्यापीठही त्यांना उच्च पदवी देऊन सन्मान करण्यास का कू करीत आहे, असे डॉ. पाटणकर म्हणाले. बाबासाहेब न्यूयॉर्कला गेल्यानंतर ते तेथे भाषणे करतील आणि भारतातील अस्पृश्यांच्या प्रश्नाबद्दल भारतीय सरकार किती उदासवाणे धोरण आखीत आहे, याबद्दल आणि इतर राष्ट्रीय स्वरुपाच्या ज्वलंत, प्रचलीत प्रश्नांबद्दल ते आपले विचार प्रदर्शित करून भारतीय सरकारची अमेरिकन लोकांपुढे टर उडवतील की काय, अशी शंका अनेक लोकांना पडली होती. या शंकेचे निरसन करण्यासाठी त्यांना तशा अर्थाचे काही प्रश्नही विचारण्यात आले. तेव्हा जेवणानंतर बाबासाहेबांनी जे आभारप्रदर्शक भाषण केले, त्यात सदर शंकेचे त्यांनी निरसन केले.

ते आपल्या भाषणात म्हणाले,

मी स्वभावाने तापट आहे. मी अनेक बड्या व्यक्तींशी त्यांच्या दिखाऊ कार्यावर प्रच्छन्न टीका करून भांडलोही आहे. पण मी आतापर्यंत एकदाही राजद्रोह केलेला नाही. माझ्या देशातील आजची परिस्थिती मी परदेशात कदापि उघड करून सांगणार नाही. देशाचा मान कसा व कोठे ठेवावयाचा हे मला चांगले कळते. आतापर्यंत मी कोणाही परकीय माणसाजवळ माझ्या देशाबद्दल वाईट बोललो नाही. मग बाहेर जाऊन बोलण्याची शक्यता दूरच. मी अमेरिकेला जाणार हे समजताच काही लोकांच्या मनात धास्ती निर्माण झाली की तेथे मी सरकारी कारभारावर प्रकाश टाकून देशाच्या स्थितीचे

[१] जनता : २४ मे १९५२.

खरे चित्र रेखाटीन. त्या लोकांना मी सांगू इच्छितो की, अधिकारारूढ पक्षाशी व अधिकारावरील गृहस्थांशी माझे मतभेद असले तरी मी त्याकरता देशाची नाचक्की कधीही करणार नाही. समोरासमोर मी मंत्र्यांशी किंवा सरकार पक्षीय सभासदांशी दोनं हात करीन. पण परकीयांदेखत किंवा परदेशात त्यांचा मानभंग करणार नाही.

गांधीजींच्याबरोबर मी गोलमेज परिषदेस हजर होतो. देशाचे हित जपण्याबाबत मी त्यांचेही पुढे २०० मैल होतो हे सांगू इच्छितो.'' [१]

''ता. ३१-५-१९५२ रोजी टी. डब्ल्यू. ए. च्या विमानाने ते जाणार होते. मुंबईच्या शे. का. फेडरेशनच्या कार्यकारिणीने त्यांना प्रेमाचा निरोप देण्याकरिता म्हणून एक जाहीर पत्रक काढले होते आणि ते पत्रक सर्व मुंबईभर वाटण्यात आले. त्याचप्रमाणे समता सैनिक दलाने 'सलामी' देण्याचे ठरविले. या दिवशी अकरा वाजता विमानतळावर दुतर्फा रांग करून सैनिक उभे होते. पत्रकाला अनुसरून हजारो लोक हार तुरे घेऊन बाबासाहेबांचे दर्शन घेण्यासाठी व हार घालण्यासाठी सैनिकांचे मागे उभे होते.

बाबासाहेबांना निरोप देण्यासाठी अनेक जिल्ह्यातील अनेक पुढारी हजर होते त्यात श्री. आर. आर. भोळे (पुणे), श्री. आर. जी. खंडाळे (दौंड), श्री. दादासाहेब शिर्के (कोल्हापूर), कु. शांताबाई दाणी (नाशिक), श्री. पी. टी. मधाळे (द. सातारा), श्री. पी. जे. रोहम (नगर), श्री. एस. बी. बाबर, श्री. एन्. एस्. कांबळे (सोलापूर), श्री. जी. एम. शेंदूर्णीकर (पू. खानदेश), श्री. आंबाभाई परमार (खेडा), श्री. पी. एम. पटणी (अहमदाबाद), श्री. जी. टी. रुपवते (नगर), श्री. ए. जी. पवार (नाशिक), श्री. के. आर. जाधव (सोलापूर), तसेच श्री. बी. सी. कांबळे, (एम्. एल. ए.), श्री. जी. के माने, श्री. आर. जी. भंडारे, श्री. जी. एन्. बाबरीया व श्री. भाऊसाहेब आंबेडकर खास निरोप द्यायला हजर होते.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर, सौ. माईसाहेबांसमवेत बरोबर साडेदहा वाजता विमानतळावर येताच लोकांनी टाळया वाजवून ' जयभीम ' गर्जना केली. त्यांना प्रत्येक संस्थेतर्फे हार तुरे झाले. त्यापूर्वी श्री. ससाळेकर जी. ओ. सी. यांनी प्रथम सलामी दिल्यावर सैनिकांनी ' गार्ड ऑफ ऑनर ' दिला. नंतर डॉ. बाबासाहेबांनी आपल्या स्नेही मंडळी व इतर उपस्थित मंडळीबरोबर चर्चा केली. डॉ. बाबासाहेब आनंदी दिसत होते.

बरोबर पावणे दोन वाजता ' टी. डब्ल्यू. ए. ' चे अधिकारी त्यांना घेऊन विमानाकडे गेले. लोकांनी परत एकदा ' आंबेडकर झिंदाबाद ' ' जयभीम ' असा जयघोष केला. डॉ. बाबासाहेबांनी फिरून एकदा साऱ्यांना नमस्कार केला. बरोबर दोन वाजता विमान निघाले.

---

[१] डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड १० वा, पृ. २८३, २८४ आणि २८६.

## डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा अमेरिकेत सत्कार

कोलंबिया विश्वविद्यालयाचा पदवीदान समारंभ तारीख ६ जून रोजी न्यूयॉर्क येथे झाला. त्यावेळी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना एलएल. डी. पदवी बहाल करण्यात आली.

कोलंबिया विश्वविद्यालयाचे ६ हजार आठशे अठ्ठेचाळीस पदवीधर होते. हे सतरा शाळा व कॉलेजातील विद्यार्थी होते. डॉ. बाबासाहेबांबरोबर कॅनडा सरकारच्या परराष्ट्राच्या कारभाराचे सेक्रेटरी श्री. पीवरसन आणि श्री. डॅनियल मॉकेंट फ्रान्सचे सुप्रसिद्ध वाङ्मय इतिहासकार यांचाही गौरव करण्यात आला. याशिवाय आणखी आठ अमेरिकन नागरिकांचा सत्कार करण्यात आला. याप्रसंगी शेकडो लोक हजर होते. विश्वविद्यालयाला अस्तित्वात राहून एकशेंअठ्ठ्याण्णव वर्षे झाली. अशा सुप्रसंगी डॉ. बाबासाहेबांना खास बोलावून त्यांचे थाटाने स्वागत करण्यात आले. " भारताचे एक प्रमुख नागरिक सुप्रसिद्ध समाजसुधारक व मानवी हक्कांसाठी झगडणारे वीर" असा त्याना पदवी देताना गौरव करण्यात आला, तेव्हा लोकांनी टाळयांचा कडकडाट केला." [१]

" डॉक्टर ऑफ लॉज या पदवीचे " सायटेशन " लॅटिन व इंग्रजी या दोन्ही भाषेत होते. हे " सायटेशन " ५ जूनला युनिव्हर्सिटीचे " व्हॉईस प्रेसिडेंट ॲण्ड प्रोव्होस्ट " ग्रेसन कर्क यांनी समारंभाच्या भव्य सभामंडपात वाचून दाखविले ते असे :

### CITATION

### " COLUMBIA UNIVERSITY IN THE CITY OF NEW YORK
### BHIMRAO RAMJI AMBEDKAR, LL. D.

Born in India and schooled there under heavy hardships; B.A. of the University of Bombay at twenty and for three years a graduate student in this University, receiving the doctorate in political science, subsequently a student of the Inns of Court and the University of London obtaining a doctorate in economics; for the past three decades as barrister, University professor and member of the legislative council, as a framer of the Constitution, member of the cabinet and of the Council of State, one of India's leading citizens, a great social reformer and a valiant upholder of human rights.

---

[१] जनता : ७ जून १९५२.

In the exercise of the authority conferred upon me by the Trustees, I gladly admit you to the degree of Doctor of Laws, *honoris causa*, in this University and confer upon you all the rights and privileges which attach there to, in token whereof I hand you this diploma.

Sd. Grayson Kirk,

June 5, 1952. Vice-President and Provost."

"SURATORS UNIVERSITATIS COLUMBIAE NEO EBORACENSIS

OMNIBUSET SINGULIS QUORUM INTEREST SALUTEM
HIS LITTER'S TESTAMUR NOS UNANIMI CONSENSU

Bhimrao Ramji Ambedkar

AD GRADUM

DOCTORIS IN LEGIBUS

HONORIS CAUSA PROVEXISSE EIQUE OMNIA IURA ET PRIVILEGIA QUAE AD ISTUM ATTINENT DEDISSE ET CONCESSISSE IN CVIVS REI PLENIVS TESTI MONIUM SIGILLO HVIVS UNIVERSITTIS ET PRAESIDIS CHIROGRAPHO DIPLOMA HOCCE MUNIENDUM CURAVIMVS DATUM NOVI EBORACI DIE

MENSIS IVNII QUINTO
ANNOQUE DOMINI Sd. Grayson Kirk
MILLESIMO NONGENTESM PROPR AE SES
QUINQUAGESIMO SECUNDO
Seal of the University
of Columbia." [1]



[1] डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड १० वा, पृ. २८७ - २८८.

# २९५

# सार्वजनिक फंडाचा योग्य वापर करावा

दि. १४ जुलै १९५२ रोजी मुंबई येथील दामोदर हॉलमध्ये अस्पृश्य कार्यकर्त्यांच्या सभेचे आयोजन करण्यात आले. त्याप्रसंगी डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

भगिनींनो व बंधुंनो,

तुम्हाला मी आज निमंत्रण देऊन या ठिकाणी बोलाविले आहे त्याचा हेतू हा आहे की, १९३८ साली मी मुंबईत इमारत फंड का स्थापन केला हे सर्वास माहीत आहे. या इमारत फंडाची आतापर्यंतची माहिती तुम्हास सांगावी व पुढे काय करावयाचे आहे ते ठरविण्यासाठी आजची सभा घेतली आहे. १९३८ साली इमारत फंड स्थापन केल्यावर चाळीचाळीतून या फंडाचा प्रचार करण्यात आला व अस्पृश्य बांधवांकडून या फंडाला आज १४ वर्षे होऊन गेली तरी आपल्या इमारतीला मूर्त स्वरूप आले नाही. याला अनेक कारणे आहेत. मात्र मी स्वतः १९४२ पासून मुंबई सोडून दिल्लीला गेलो हे याला मुख्य कारण आहे. माझ्या गैरहजेरीत या फंडाचे काम जोमाने झाले नाही. मी असल्याशिवाय काहीही होत नाही ही स्थिती बरी नाही. परंतु तसे झाले ही गोष्ट खरी आहे. माझ्या गैरहजेरीत गेल्या दहा वर्षात लोकांच्या मनात अनेक संशय निर्माण झाले. इमारत फंडाचे काय झाले ? किंवा पुढे काय होणार ? याची कोणालाच कल्पना नाही. मी तुम्हाला आता काही आकडे सांगणार आहे. त्यावरून इमारत फंडाचे काम बंद नव्हते तर ते सुप्तावस्थेत चालू होते असे दिसून येईल. माझ्या मते आतापर्यंत या फंडात बरे पैसे जमले आहेत. इतके की, त्याची तुम्हाला स्वप्नातही कल्पना करता येणार नाही.

आज हा इमारत फंड १,११,२२८ रु. ४ आणे ३ पैसे इतका झाला आहे. अस्पृश्य समाजाच्या इतिहासात इतकी मोठी रक्कम जमल्याचे हे पहिलेच उदाहरण आहे. एक लक्ष अकरा हजार दोनशे अठ्ठावीस रुपये चार आणे, तीन पैसे या रकमेत आपल्या लोकांची रक्कम फक्त ३१,७०९ रु. ४ आणे (एकतीस हजार सातशे नऊ रुपये चार आणे) एवढीच आहे. बाकीची ७५,५०० रुपये (पंचाहत्तर हजार पाचशे रुपये) रक्कम मी वरच्या वर्गाच्या माझ्या मित्रांकडून

---

जनता : १९ जुलै १९५२.

मिळविली आहे. या रकमेपैकी ३६,५३५ रुपये रक्कम जागा खरेदीकरिता खर्च झाली आहे. मात्र आज ही जागा विकावयास काढली तर दीड लक्ष रुपये कोणीही देईल इतक्या महत्त्वाची ती जागा आहे. या रकमेतून दुसरा मोठा खर्च झाला. प्रेसची इमारत बांधण्यासाठी ३५,००० रुपये खर्च झाले आहेत. वरील दोन्ही बाबींसाठी मिळून ७१,५२५ रुपये खर्च झाले असून, बाकीचे ३९,६९३ रुपये ४ आणे ३ पैसे एवढी रक्कम इंपीरियल बँकेत शिल्लक आहे.

आपल्या लोकांनी जी रक्कम दिली आहे, त्यापैकी, निरनिराळ्या ठिकाणच्या लोकांनी, संस्थांनी व व्यक्तींनी २५ रुपये किंवा त्यापेक्षा अधिक रक्कम दिली आहे अशांची २५,७०९ रुपये ४ आणे एवढी रक्कम आहे. २५ रुपयांपेक्षा कमी रक्कम देणारांची १,००० रुपये रक्कम आहे व जिचा तपशील समजला नाही अशी ५,००० रुपये रक्कम आहे. रुपयाचा या रकमेचा तपशील का समजला नाही ? तर लोकांनी नेलेली पावती पुस्तके परत आणून दिली नाहीत म्हणून समजला नाही. त्या पावती पुस्तकात आणखीही पैसे जमा झाले असण्याचा संभव आहे व हे जास्त जमलेले पैसे लोकांनी खाल्ले असा संशय उत्पन्न होणे सहाजिकच आहे. तरी हा संशय नाहिसा करण्यासाठी लोकांनी नेलेली सर्व पावती पुस्तके राहिलेल्या पैशासह परत केली पाहिजेत. पुस्तके परत न करणे किंवा जमलेले पैसे न देणे ही फसवणूक आहे व कायद्याने अशा फसवणुकीला गुन्हा ठरविले आहे हे सर्वांनी लक्षात ठेवावे.

आता हा फंड जमवून मुंबईत एक हॉल बांधावा असा माझा विचार आहे. या हॉलचे जे काही उत्पन्न येईल त्या उत्पन्नातून आपल्याला आपल्या विद्यार्थ्यांना शिक्षणाला मदत करता येईल किंवा आणखी काही लोकांच्या हिताची कामे करता येतील. ह्या किंवा पुढच्या वर्षी हॉल बांधून पुरा झाला पाहिजे.

हा हॉल बांधण्यास पावणे दोन लाख रुपये खर्च येईल असा अंदाज आहे. आज आपल्याजवळ इंपीरियल बँकेत ३९,६९३ रुपये ४ आणे ३ पैसे एवढी रक्कम आहे. सध्या इमारतीची जागा लोकांना भाड्याने वापरण्यासाठी दिली आहे. तेव्हा ते काही उत्पन्न मिळते. परंतु हॉल बांधावयाचा झाल्यास या लोकांना नोटिसा देऊन काढावे लागेल. त्यावेळी हे उत्पन्न बुडेल.

हॉल बांधण्यासाठी १ लाख रुपये खर्च येईल व हॉलमध्ये फर्निचर ठेवणे व इतर सोयी करणे यासाठी पाऊण लाख रुपये लागतील असा माहितगार लोकांचा अंदाज आहे. कदाचित थोडी कमी किंवा थोडी जास्त रक्कम खर्च होण्याचा संभव आहे.

तेव्हा एवढी रक्कम कशी उभी करावयाची हा प्रश्न आहे. मला माझ्या ६० व्या वाढदिवसानिमित्त ६०,००० रुपये देण्याचे ठरविले आहे. त्यापैकी आतापर्यंत

काहीतरी अकरा बारा हजार रुपये जमलेत असे मला समजले आहे. हीरक महोत्सवाची प्रतिज्ञा तुम्ही केली आहे ती पुरी करण्याची ईर्षा तुम्ही बाळगिली पाहिजे नाहीतर 'बोलाचीच कढी, बोलाचाच भात, जेऊनीया तृप्त कोण झाला ?' असे होता कामा नये. १२ हजार रुपये तुम्ही जमविले आहेत. तर बाकीचे ४८ हजार रुपये तुम्ही उभे केले पाहिजेत. तुम्ही ६० हजार रुपये मला दिले तर, मी ते काही माझ्या खिशात घालणार नाही. हॉलसाठीच मी ते देणार आहे. माझ्या हयातीत हे हॉलचे कार्य झाले पाहिजे अशी माझी फार इच्छा आहे. तरी तुम्ही पैसे जमविण्याच्या कामाला लागा.

काही लोक सार्वजनिक कामाला पैसे देतात. परंतु जे मध्यस्त असतात ते लोक हा पैसा मधल्या मध्येच गडप करतात आणि खातात. तेव्हा आपण दिलेला पैसा ज्या कामासाठी दिला ते काम होईल की नाही याबद्दल संशय असल्यामुळे काही लोक पैसेच देत नाहीत.

असे असेल तर तुम्ही पैसे माझ्याकडे आणून द्या. मी ते स्वीकारावयास तयार आहे. आतापर्यंत मी स्वतः कधीही पैसा घेतला नाही. आता मात्र, या कामासाठी पैसे घेण्याची माझी तयारी आहे. तरी ज्यांना कोणाला पैसे माझ्याकडेच आणून द्यावयाचे असतील त्यांनी ते दररोज संध्याकाळी ७ ते ८ च्या दरम्यान माझ्या बंगल्यावर (राजगृह दादर) आणून द्यावेत. तेथे श्री. उपशाम मास्तर तुम्हाला पावती देतील. ते या फंडाचे एक ट्रस्टी आहेत व हिशेबाचे कामही त्यांच्याकडेच आहे. माझा मुक्काम महिना दीड महिनाच मुंबईत आहे. मी सप्टेंबर महिन्याच्या पहिल्या आठवड्यात मुंबई सोडून दिल्लीस जाणार आहे. तरी मी जाण्यापूर्वीच लोकांनी पैसे माझ्याकडे आणून द्यावेत.

तुम्ही मला साठ हजार रुपये दिले तर जवळ जवळ १ लाख रुपये आपल्याजवळ तयार होतील. तरीही हॉल बांधण्यासाठी आपणास आणखी पाऊण लाख रुपये कर्ज काढावे लागणार आहे व ते मी काढणार आहे. हॉलच्या सव्वा दोन, अडिच लाख रुपयांच्या तारणावर ते मला कोणीही देऊ शकेल. मात्र मागाहून हे पाऊण लाख रुपयेही तुम्हास फेडावे लागणार आहेत. मुंबईत हॉलला किती मागणी आहे हे तुम्ही जाणताच. दरमहा १,००० रुपये हॉलचे उत्पन्न सहज येऊ शकेल. दरसाल १५ ते २० हजार रुपये फेडल्यास थोड्याच वर्षात हॉल आपल्या मालकीचा होऊ शकेल. दुसरी एक हितगुजाची गोष्ट मी तुम्हाला सांगणार आहे. 'जनता' पत्रासाठी एक ट्रस्ट असावा असे मला वाटते. 'जनतेला' काही तूट आली तर ती या ट्रस्टच्या पैशातून भरून काढता

यावी. आपल्याला वर्तमानपत्राची अत्यंत जरूर आहे. आपल्यावर होणारे जोर, जुलूम व अत्याचार आणि गाऱ्हाणी जनतेला कळविण्यासाठी आपल्याला ' जनता ' वर्तमानपत्र चालविणे आवश्यक आहे. या कामासाठी मी निराळा पैसा जमा केला आहे. ते ३२,००० रुपये (बत्तीस हजार) मी तूर्त आपल्या हॉलसाठी बिनव्याजी कर्ज म्हणून देण्यास तयार आहे. मात्र पुढे सदर पैसे तुम्ही मला परत दिले पाहिजेत. माझ्याकडे तीन प्रकारांनी पैसे जमा आहेत (१) इमारत फंडाचे, (२) जनतेचे व (३) फेडरेशनचे पैसे. हे मला निरनिराळ्या प्रांतातून मिळालेले आहेत व ते फक्त राजकारणासाठीच खर्च करावयाचे आहेत. म्हणून ते या कामासाठी मला देता येत नाही.

पूर्वीचा इमारत फंड, मुंबई सरकारच्या विश्वस्त कायद्यान्वये शेड्यूल्ड कास्ट्स् इंप्रुव्हमेंट ट्रस्ट, मुंबई या नावाने रजिस्टर केला आहे. तेव्हा या पैशाच्या बाबतीत काही अफरातफर होईल ही काळजी बाळगण्याचे कारण नाही. कारण सरकारकडून दरसाल हा हिशेब तपासला जाणार आहे.

मुंबईत सर्व लोकांच्या मालकीचे हॉल आहेत. मुंबईत घरकाम करणाऱ्या तिरळे कुणबी यांनीही परळला ' वाघे हॉल ' नावाचा स्वतःच्या मालकीचा हॉल बांधला आहे. ते आपल्या मानाने फार थोडे लोक आहेत. असे असूनही त्यांनी स्वतःच्या मालकीचा हॉल बांधला आहे. या गोष्टीची ईर्षा धरून तुम्ही ताबडतोब कामास लागले पाहिजे. मी परत सांगतो की पावती पुस्तके परत न आल्यामुळे जे जे हिशेब पुरे झाले नाहीत त्या सर्व हिशेबाची पावती पुस्तके व गोळा झालेला पैसा तुम्ही आणून दिला पाहिजे. जे लोक तसे करणार नाही त्यांची गय केली जाणार नाही.

● ● ●

# २९६
# शिक्षित मुले समाजाच्या उन्नतीप्रित्यर्थ काही करणार आहेत का ?

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना दिनांक २० जुलै १९५२ रोजी महार समाज सेवा संघाने पुष्पहार अर्पण केला, तत्प्रसंगी संघाने इमारत फंडास २६ रुपये देणगी दिली व पुढील निवेदन केले.

कार्यकारी मंडळाने परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्याच आशिर्वादाने सिद्धार्थ बोर्डींग संगमनेर व कर्जत येथे सध्या शिक्षण घेत असलेल्या ७५ मुलांच्या दोन वसतिगृहांची माहिती सांगितली, पैकी कर्जत वसतिगृहास ग्रँट मिळवावयाची आहे. सदर वसतिगृह ग्रँटशिवाय चालविता येणे दुरापास्त आहे.

सिद्धार्थ बोर्डींग संगमनेर या संस्थेस थोडी फार सरकारी मदत मिळते. त्यामुळे त्या वसतिगृहासाठी स्वतंत्र इमारत बांधण्याचा विचार चालू आहे. आपण या इमारतीस आशिर्वाद दिल्यास आमचा उत्साह द्विगुणित होऊन हे अवघड काम संघ शिरावर घेऊन पार पाडू शकेल असे कार्यकर्त्यांनी सांगितल्यानंतर बाबासाहेब आपल्या भाषणात म्हणाले,

तुम्ही हे सामाजिक कार्य करता त्याबद्दल मला समाधान वाटते. तुमच्या संगमनेर वसतिगृहाच्या इमारत फंडास मी शुभेच्छा प्रगट करतो. पण मला लोकांना एक प्रश्न विचारावासा वाटतो तो हा की, तुम्ही या समाजाच्या मुलांना स्वतः खस्ता खाऊन शिक्षण देता ती मुले शिक्षण संपादन केल्यानंतर तुमच्या समाजाच्या उन्नतीप्रित्यर्थ काही करणार आहेत का ? तुम्ही त्यांच्याकडून याबाबत काही प्रतिज्ञा लेख लिहून घेता काय ? (नाही. असे उत्तर मिळाल्यावर) पददलित समाजाची सेवा करण्यासाठी आपल्यातील काही मुले शिकून तयार व्हावीत म्हणून मी ' सिद्धार्थ कॉलेज ' काढले. पण अनुभव मात्र कटु येत आहे. शिक्षण संपादन केल्यानंतर एखादी मोठी नोकरी मिळाली की बस्स ! झाले आपले काम !! मी कोण आहे ? मला शिक्षण कोणी दिले ? कसे दिले ? त्यांनी किती कष्ट केले ? याची तिळमात्र जाणीव न ठेवता हे लोक आपल्या समाजाला विसरतात. या लोकांना काय म्हणावे हेच

---

जनता : २६ जुलै १९५२.

मला समजत नाही, तेव्हा तुम्ही हा खटाटोप करता तो फुकट आहे असे मला वाटते, नाहीतर त्यांच्यावर काहीतरी बंधनकारक राहील असे करा. कोणाची पोरे बोर्डिंगात आणायची ? त्यांना शिक्षण द्यायचे कोणी ? आणि इतके केल्यावर त्यांनी समाजाकडे ढुंकूनही पाहायचे नाही, हा कृतघ्नपणा नव्हे का ? माझे आयुष्य मी तुमच्या हितार्थ वेचतो आहे. पण माझ्या पश्चात या समाजाचे कसे होईल ? ही माझी चिंता दूर करणारी माणसे तुमच्यात अजून तयार होऊ नयेत ? या सर्व गोष्टींचा विचार केला की, मी माझे आयुष्य तुमच्यासाठी फुकट खर्ची घातले, असे वाटू लागते.

मुंबईत मी तुमच्यासाठी मोठा हॉल लवकरच बांधणार आहे, त्यासाठी मी त्या दिवशी दामोदर हॉलमध्ये निवेदन केल्याप्रमाणे तुम्ही किती पैसे जमविले आणि मी किती जमविले हे स्पष्ट केले. माझ्या नावावर तुमचा किती पैसा बँकेत आहे, हे मी तुम्हाला स्पष्ट सांगून टाकले आहे. हेतू हा की, माझ्या पश्चात माझ्या मुलानेही त्यावर आपला हक्क सांगू नये व तुम्हालाही त्याची निश्चित कल्पना यावी. तरी सर्वांनी हा हॉल बांधण्यासाठी पराकाष्ठेने प्रयत्न करा. नगर जिल्हा, नाशिक जिल्हा, नंतर संगमनेर तालुका, पुढे माझ्या गावापुरते मी पाहीन; ही उतरती दुरावस्था थांबविलीच पाहिजे.



# २९७

# मी संघर्ष करून अस्पृश्यात जाज्वल्य स्वाभिमान निर्माण केला आहे

परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली मुंबई राज्यातील व मध्य प्रदेशातील प्रमुख कार्यकर्त्यांची परिषद सिद्धार्थ कॉलेजमध्ये रविवार दिनांक १७ ऑगस्ट १९५२ रोजी भरली होती. या सभेत अगोदर जाहीर केल्याप्रमाणे ''शेड्यूल्ड कास्ट्स् इंप्रुव्हमेंट ट्रस्ट'' तर्फे मुंबईत जो हॉल बांधण्याचा संकल्प बाबासाहेबांनी जाहीर केला आहे त्यासंबंधी विचारविनिमय झाला.

दलितांचे परमपूज्य डॉ. बाबासाहेब यांचे सभागृहात आगमन होताच सर्वांची अंतःकरणे आनंदातिशयानी भरून आली. टाळयांच्या प्रचंड गजरात अभिमान भरल्या अंतःकरणांनी त्यांचे स्वागत करण्यात आले. इतक्या दिवसांनी आपल्या नेत्याचे पवित्र दर्शन घडल्यामुळे सर्व कार्यकर्त्यांना एक प्रकारचा अनिवार्य आनंद झालेला दिसला. मुंबई राज्यातील प्रमुख कार्यकर्ते, जिल्हा अध्यक्ष वगैरे बरीच मंडळी सभेस हजर होती. प्रांताध्यक्ष दादासाहेब गायकवाड, ज. से. बापूसाहेब राजभोज, बॅरिस्टर बापूसाहेब कांबळे, दादासाहेब शिर्के, श्री. आर. जी. खंडाळे, दौंड; दादासाहेब पोवार, मनमाड; पी. जी. रोहम, नगर; सावंतसाहेब, सातारा; श्री. बी. सी. कांबळे, मुंबई शहरचे अध्यक्ष खरात, ज. से. भातनकर, श्री. बाबर, सोलापूर; जिल्हाध्यक्ष श्री. पी. टी. मधाळे, सातारा वगैरे प्रमुख कार्यकर्ते हजर होते.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

बंधुंनो,

अस्पृश्यांच्या उद्धारासाठी एका माणसाला एका युगात जे काही करता येणे शक्य होते ते मी केले आहे. माझे काही मार्ग यशस्वी झाले; काही झाले नसतील पण माझे कार्य मी धैर्याने चालूच ठेवले आहे. २५ वर्षात मी तुमच्यासाठी जे कार्य केले ते एवढ्या अवधीत एका व्यक्तीने कधीही, कुठेही केलेले नाही. हे मी गर्वाने सांगत नाही तर आत्मविश्वासाने सांगतो. ही वस्तुस्थिती आहे. माझ्या कार्याची दिशा तीन पद्धतीची होती !

एक, अस्पृश्य समाजात प्रथम स्वाभिमान निर्माण करणे ! हे कार्य पृथ्वीमोलाचे मला वाटले. मी राजकारणात पडण्यापूर्वी अस्पृश्य समाज कोणत्या पातळीवर होता, कसा माणुसकीहीन बनला होता, याचे मी एक उदाहरण देतो.

---

जनता : २३ ऑगस्ट १९५२.

वीस पंचवीस वर्षापूर्वी जळगाव येथे दरवर्षी ब्राह्मण भोजने घालण्याची प्रथा होती. ती भोजने झाल्यावर त्यांच्या उष्ट्या पत्रावळया ते उकिरड्यावर टाकीत असत. तेथे आमचे अस्पृश्य बसत असत आणि त्या पत्रावळया गोळा करून उकिरड्यावरून नेत असंत. काहीकाही वेळा त्यांच्यात या उष्ट्या पत्रावळयाबद्दल मोठे तंटे माजत असत. या अवस्थेत अस्पृश्य समाज होता. केवळ तो माणुसकीहीन बनला होता असे नव्हे तर तसे मानण्यात तो धन्यवाद मानीत होता. मानवी अधःपाताची ती कमाल होती.

मी गेली पंचवीस वर्षे झगडून त्यांना सर्वस्वी सुखी करू शकलो नसलो तरी त्यांच्यात जाज्वल्य स्वाभिमान निर्माण केला आहे. अन्यायाविरुद्ध झगडण्याचे सामर्थ्य निर्माण केले आहे. हे काही साधे-सुधे काम नाही.

दुसरी गोष्ट म्हणजे त्यांना राजकीय हक्क प्राप्त करून देण्याची. आपल्याला पूर्वी दिल्ली कॅबिनेटमध्ये झाडूवाल्याचेसुद्धा काम मिळत नसे. आज २५ वर्षांनंतर तेथे अस्पृश्य समाजाचा मंत्री नेऊन बसविला आहे.

तिसरी गोष्ट शिक्षण क्षेत्रातील. २५ वर्षांपूर्वी अस्पृश्य समाजाला शिक्षणाची सारी दारे बंद होती. ती मी उघडी करून दिली आहेत. अस्पृश्य मुलांना उच्च शिक्षणाची सोय व्हावी म्हणून सरकारशी झगडून स्कॉलरशिप्स व फ्रिशिप्स मिळवून दिल्या आहेत. एवढेच नव्हे तर यांना ' आपले म्हणता ' येईल असे प्रगतिमान '' सिद्धार्थ '' नावाचे कॉलेज मी यांच्यासाठी काढून दिले आहे. या कॉलेजात ३०० अस्पृश्य विद्यार्थी आहेत. दरवर्षी त्यांना २,००० रुपयाच्या स्कॉलरशिप्स दिल्या जातात. यांना राहाण्यासाठी जोडूनच बोर्डिंग काढले आहे. तसेच औरंगाबादला याच कॉलेजची शाखा उघडली आहे.

आता एक गोष्ट करण्याची माझ्या मते अपूरी राहिली आहे. ती म्हणजे मुंबई शहरात आपल्या समाजाच्या मालकीचा एक हॉल बांधण्याचा माझा हेतू फार भिन्न आहे. मुंबईत इतर हॉल आहेत. तेथे नाटके, तमाशा वगैरे खेळ होतात. केवळ तशा तऱ्हेच्या करमणुकी करण्यासाठी हॉल बांधण्याचा माझा हेतू नाही.

हा हॉल बांधण्यात माझा एक महत्त्वाचा उद्देश आहे. अस्पृश्य समाजावर हरघडी स्पृश्य हिंदुंकडून खेड्यांवर अन्याय होत आहेत. आजच मला एक पत्र आले आहे की, औरंगाबादच्या एका खेड्यात अस्पृश्य समाजाच्या वस्तीभोवती स्पृश्यांनी तारेचे कुंपण घालून त्यांना कोंडून टाकून त्याचे जीवन असह्य केले आहे. अशा एक ना दोन हजारो तक्रारी प्रत्यही माझ्याकडे येत आहेत.

ती दुःखे तुमच्यापेक्षा मला जास्त कळतात. ह्या दुःखाचे निवारण करण्यास एक मध्यवर्ती निधी हवा आहे, पैशाची जरूरी आहे.

दुसरी गोष्ट ही की, या सर्व तक्रारी एकत्र जमवून ठेवण्यासाठी मुंबईला आपल्या समाजाची एक मध्यवर्ती कचेरी हवी आहे. त्या कचेरीत काम करणाऱ्या लोकांना पगार द्यायला हवा. पण या गोष्टी जमणार कशा ? तेव्हा हा हॉल बांधून झाला तर वर्षाला लाखभर रुपये भाड्याच्या रूपाने आम्हाला मिळतील. हे ठिकाण मध्यवर्ती आहे. तेव्हा हा हॉल बांधून झाला तर ही एक मोठी अडचण दूर होईल.

केवळ माझे नाव घेऊन जयजयकार करण्यापेक्षा जी गोष्ट माझ्या दृष्टीने अत्यंत मोलाची आहे ती करण्यासाठी प्राणाच्या मोलाने तुम्ही झटा. मी हॉल बांधण्याच्या कार्याला फार मोठे महत्त्व देतो. त्यामुळे अस्पृश्य समाजावर खेडोपाडी घडणाऱ्या अत्याचाराचे तात्काळ आपल्याला निर्दालन करता येईल. तेव्हा तीन महिन्याच्या आत तुम्ही या कार्यासाठी खेड्यापाड्यातून एक लाख रुपये जमवून पाठवा. प्रत्येक गावामधून ' दहा दहा ' रुपये जमवा आणि मुंबईला शेड्यूल्ड कास्ट्स् इंप्रुव्हमेन्ट ट्रस्टचे सेक्रेटरी श्री. शांताराम अनाजी उपशाम यांच्याकडे पाठवा. तो हॉल बांधण्यास मला दसऱ्याला सुरवात करावयाची आहे. मला एक लाख रुपयांची तूट आहे. तेव्हा प्रत्येक गावाकडून दहा दहा रुपयेप्रमाणे प्रत्येक तालुक्यातून एक एक हजार रुपये जमवून पाठविण्याचे कामास आजपासून लागा.



# सार्वजनिक पैशाचा अपहार करण्यासारखे नीच कृत्य दुसरे नाही

(१) शे. का. फेडरेशन, (२) शे. का. इंप्रुव्हमेंट ट्रस्ट, (३) म्यु. कामगार संघ, (४) महार ज्ञाति पंचायत व (५) समता सैनिक दल या पाच संस्थांतर्फे रविवार दिनांक २८ सप्टेंबर १९५२ रोजी सायंकाळी साडेपाच वाजता नरे पार्कवर मुंबईतील अस्पृश्य जनतेचे जाहीर संमेलन घेण्यात आले होते. या संमेलनात मुख्यतः डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण हाच मुख्य कार्यक्रम होता. साडेपाच वाजण्यापूर्वी अस्पृश्य स्त्री-पुरुषांनी नरे पार्क अक्षरशः फुलून गेलेला होता. बरोबर साडेपाच वाजता, 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे माईसाहेब आंबेडकरांसह संमेलनाच्या ठिकाणी आले. सर्व जनतेने मोठ्या उत्कंठेने व अंतःकरणपूर्वक टाळ्या वाजवून त्यांचे स्वागत केले. व्यासपीठावर व व्यासपीठाच्या बाजूस मुंबईतील सर्व निवडक मंडळी बसलेली होती. बॅ. कांबळे, श्री. बी. सी. कांबळे, एम.एल.ए., श्री. बोराळे, अध्यक्ष, म्यु. कामगार संघ; श्री. भंडारे, एम. ए., एल. एल. बी., श्री. जे. जी. भातनकर, श्री. शां. अ. उपशाम, सेक्रेटरी शे. का. इप्रुव्हमेंट ट्रस्ट; श्री. आर. जी. खरात अध्यक्ष, शे. का. फेडरेशन इत्यादि मंडळींचा उल्लेख करता येण्यासारखा आहे.

प्रथम श्री. उपशाम यांनी आजच्या संमेलनाचा हेतू समजावून दिला. ते म्हणाले, आज पुष्कळ दिवसांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे सामान्य जनतेत दिसत आहेत. यापूर्वीच त्यांना आपली सर्वांची भेट घ्यावयाची होती परंतु पावसामुळे त्यांना इतके दिवस दम धरावा लागला. आज पाच संस्थांतर्फे हे जाहीर संमेलन घेण्यात येत आहे. परंतु या पाच संस्था अशा काही अगदी अलग अलग नाहीत. एका झाडाच्या पाच फांद्या असाव्यात तशी त्यांची स्थिती आहे. या फांद्यांचा एकच बुंधा आहे व त्यातूनच त्यांना जीवनरस मिळत असतो. अस्पृश्य चळवळीतील निरनिराळ्या उद्देशांसाठी जरी या संस्था निघाल्या असल्या तरी त्या सर्वांचा आधार डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे एकच आहेत. तेव्हा आजच्या प्रसंगी भाषण करण्यास मी त्यांना आपण सर्वांतर्फे विनंती करीत आहे.

---

जनता : ४ ऑक्टोबर १९५२.

नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे टाळयांच्या कडकडाटात भाषण करावयास उठले. ते म्हणाले,

भगिनींनो व बंधुंनो,

आजकाल बऱ्याच लोकांचे मन राजकीय कार्यात गुंतले आहे. माझे मन मात्र आज राजकारणात रमत नाही. सध्या माझे सर्व लक्ष आपण इमारत फंड स्थापन केला आहे त्याकडे आहे. मुंबईत अनेक ज़ातीच्या इमारती आहेत. ब्राह्मणांची ज्ञातिगृहे आहेत. मराठ्यांची ज्ञातिगृहे आहेत. क्षत्रियांची ज्ञातिगृहे आहेत. एवढेच नव्हे तर कुणब्यांनीही आपले ज्ञातिगृह किंवा हॉल बांधलेला आहे. त्याप्रमाणे अस्पृश्य समाजाचेही एक ज्ञातिगृह किंवा हॉल मुंबईत असावा ही कल्पना फार जुनी आहे. या कामासाठी मी १९३८ साली मुंबईत इमारत फंड स्थापन केला. हे कार्य अंगावर घेऊन आज १०-१५ वर्षे लोटली आहेत. तरीही या कार्याला अद्याप मूर्त स्वरूप आले नाही. आता तरी हे कार्य पार पाडावयासच पाहिजे, असे मी ठरविले आहे. हे कार्य पार पाडल्याशिवाय मी दुसरे कोणतेही कार्य हातात घेणार नाही. तुम्ही सर्वांनी हे काम अतिशय निकडीचे आहे असे समजून प्रत्येकाने यात अंतःकरणपूर्वक भाग घेतला पाहिजे. या कामासाठी आज मजजवळ पुढीलप्रमाणे रक्कम आहे. पूर्वीची शिल्लक ४० हजार रुपये, मुंबईच्या लोकांनी जमविलेले हीरक महोत्सवाचे १८ हजार रुपये, यात बाहेर गावचे १ हजार रुपये आहेत. मुंबई बाहेरील लोकांनी इमारत फंडासाठी पाठविलेले ४ हजार रुपये व बिनव्याजी मिळालेले ३२ हजार रुपये. बाकीची रक्कम तुम्ही सर्वांनी जमविली पाहिजे. सदर कामासाठी कर्ज उभारण्याचा माझा विचार होता. परंतु तो आता मी सोडून दिला आहे. कारण कर्ज घेतले तर शेकडा १०-१२ रुपये आपणास निव्वळ व्याजासाठी द्यावे लागणार. व्याजासाठी एवढी रक्क्म देण्याची माझी तयारी नाही. तुम्ही सर्वांनी मनावर घेतले तर कर्ज न घेताही हे काम आपणास पार पाडता येईल. मुंबईत चाळ कमिट्या नेमून व मुंबईबाहेर काही गावच्या गाव कमिट्या किंवा तालुका कमिट्या नेमून हे काम तुम्ही केले पाहिजे. याबाबतीत मी परत काही सांगणार नाही. हे सांगण्यासाठीच मी आज येथे आलो. पहिल्या तारखेनंतर मी दिल्लीस जाणार आहे आणि कदाचित बरेच दिवस परत येणार नाही. मी येथे नाही म्हणून तुम्ही हे काम पाडून ठेवता कामा नये. मी येथे असताना जे काम चालले आहे त्यापेक्षाही जोराने काम मी मुंबईबाहेर गेल्यावर तुम्ही केले पाहिजे. तुमच्या कामाचे रिपोर्ट मी दिल्लीला गेल्यावर तिकडे आले पाहिजेत व ते मला समाधान देतील असे पाहिजेत. येथे ज्या संस्थांतर्फे संमेलन घेण्यात आले आहे त्या सर्वांनी हे कार्य आपले आहे असे समजून आपापल्या विभागात कामास लागले पाहिजे.

आज दसरा आहे. दसरा हा सोन्याचा दिवस आहे. मात्र सोने तुमच्या जवळही नाही आणि मजजवळही नाही. आजचा प्रसंग मात्र सोन्यासारखा आहे. येथून जाण्यापूर्वी तुम्ही सर्वांनी ' इमारत फंड ' जमविण्यासाठी सोन्यासारखी प्रतिज्ञा केली पाहिजे. तुमच्या प्रतिज्ञेला कस लावला तर ती १०० नंबरीच ठरली पाहिजे.

माझी सर्व जनता गरीब आहे. मात्र तिच्यावर माझा विश्वास आहे. ती गरीब असली तरी ती माझ्या हाकेला ओ दिल्याशिवाय राहाणार नाही, याबद्दल माझी खात्री आहे. मात्र, शिकल्या सवरलेल्या लोकांना याप्रसंगी मला दोन शब्द सांगावयाचे आहेत. गरीब जनतेने दिलेल्या पैशाचा हिशेब त्यांनी व्यवस्थित ठेवावा व एका पैचीही अफरातफर होणार नाही याची त्यांनी काळजी बाळगावी. सार्वजनिक पैशाचा हिशेब व्यवस्थित ठेवून तो जनतेस वेळोवेळी दाखविणे यासारखे पवित्र कार्य दुसरे नाही. तसेच सार्वजनिक पैशाचा अपहार करणे यासारखे नीच कृत्य दुसरे नाही.

माझा माझ्या समाजातील सुशिक्षितांवरील विश्वास उडाला आहे. मला इमारत फंडाचा सर्व हिशेब हवा. सर्वसामान्य गरीब आणि अशिक्षित माणसावरच आता माझा सर्व भरवसा आहे.

मी मुंबईत असेपर्यंत लोकांनी माझ्या बंगल्यावर पैसे आणून द्यावेत व मी दिल्लीस गेल्यावर श्री. शांताराम अनाजी उपशाम, सेक्रेटरी, शेड्यूल्ड कास्ट्स् इंप्रुव्हमेंट ट्रस्ट, मुंबई य़ांच्याकडे त्यांनी द्यावेत.

सध्या ते माझ्या बंगल्यावर पैसे घेण्याचे काम करतात. मी दिल्लीस गेल्यावर त्यांचे ऑफिस भारत भूषण प्रिटींग प्रेसमध्ये राहील, असे सांगून त्यांनी आपले भाषण संपविले.

शेवटी श्री. जे. जी. भातनकर यांनी बाबासाहेब व माईसाहेब यांचे आभार मानून त्यांना सर्व संस्थांतर्फे पुष्पहार घातले. सर्वांचे आभार मानल्यावर सभेचे काम संपले.



# २९९

# भावी जीवनाची उभारणी विद्यापीठात होते ह्यासंबंधी विद्यार्थ्यांनी सजग राहिले पाहिजे

एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये सोमवार, दि. १५ डिसेंबर १९५२ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण आयोजित करण्यात आले होते. ते आपल्या भाषणात म्हणाले,

या कॉलेजात मी जी चार वर्षे अध्ययन केले तो काळ मोठा गोड स्मृतींचा नाही. मी या कॉलेजातील पहिलाच अस्पृश्य विद्यार्थी होतो. माझे मन सवर्ण विद्यार्थ्यांत मिसळायला धजत नव्हते. म्हणजे भीतीमुळे नव्हे, मलाच ते मिसळणे आवडत नव्हते. कारण माझा पोषाख इतरांसारखा झकपक नव्हता व त्यामुळे त्यांच्यापासून दूर राहाणेच मला आवडत असे. आजकालच्या विद्यार्थ्यांसारखे माझे कॉलेज जीवन तेवढे उत्साही नव्हते याबद्दल मी कुणालाच दोष देत नाही. माझ्या शिक्षकांनी व विद्यालय चालकांनी मला ठीक वागवले. त्यावेळच्या विद्यार्थ्यांत आणि आजच्या विद्यार्थ्यांत जमीन अस्मानाचा फरक आहे.

आजचे विद्यार्थी ज्या विद्यापीठाचे शिक्षण घेतात त्याच्या कारभाराकडे मुळीच लक्ष घालीत नाहीत. विद्यार्थ्यांनी काय शिकावं हे विद्यापीठ ठरवित असले तरी आपल्या बौद्धिक विकासाला आपण शिकतो ते खरोखरच पोषक व आवश्यक आहे की नाही, हेही प्रत्येक विद्यार्थ्याने पाहिले पाहिजे. त्यांच्या भावी जीवनाची उभारणी याच ठिकाणी होत असते. तो राष्ट्राचा आदर्श नागरिक होणार की, त्याचे जीवित विफल होणार हेही शिक्षणक्रमच ठरविणार असल्यामुळे विद्यापीठाच्या प्रत्येक हालचालीवर विद्यार्थ्यांचे कटाक्षाने लक्ष पाहिजे. पण आजचे विद्यार्थी त्यादृष्टीने अगदी बेपर्वा असतात.

उच्च विद्यालयीन शिक्षण घेणाऱ्या या विद्यार्थ्यांची कॉलेजची चार वर्षे संपून जातात आणि विद्यापीठाच्या पदव्या घेऊन ते बाहेर पडतात. पण त्यांना प्लेटो, बेकन, नित्से, स्पिनोझा यासारख्या महाश्रेष्ठ तत्त्वज्ञान्यांच्या तत्त्वज्ञानासंबंधी

---

जनता : २० डिसेंबर १९५२.

अवाक्षरही माहिती नसते. ज्या तत्त्वज्ञानाने नव्या जगाची उभारणी केली किंबहुना आजचा नव मानव आपल्या प्रत्येक दैनंदिन जीवनात ज्या तत्त्वज्ञानावर जगत आहे त्या थोर तत्त्वज्ञानाची उपेक्षा आजच्या पदवीधरांकडून व्हावी यापेक्षा अति लाजिरवाणी गोष्ट कोणती ? याउलट आजची विद्यापीठे जेम्स आणि चार्लस यांचे तत्त्वज्ञान विद्यार्थ्यांच्या माथी जबरीने लादत आहे. विद्यार्थ्यांनी या गोष्टी स्वतःच ओळखायला पाहिजेत आणि आपल्याला योग्य शिक्षण पाहिजे याची हाकाटी त्यांनी केली पाहिजे.

मानवी जीवनातील वैचारिक आणि नैतिक मूल्ये कधीच स्थिर राहिली नाहीत. ती कालमानाप्रमाणे प्रत्यही बदलत राहातात. नुसती बदलतातच नव्हे तर ती प्रगत होत जातात. भारतीय विद्यार्थ्यांनीही या नव्या नव्या निर्माण होणाऱ्या जीवनमूल्यांची दखल घेतली पाहिजे आणि आपणही ती आचरणात आणण्यास सिद्ध राहिले पाहिजे. हे नवे तत्त्वज्ञान आपल्या विद्यादायी संस्था आपल्या शिक्षणक्रमात घालतात की नाही याकडेही पाहिले पाहिजे.

पण खेदाची गोष्ट ही की, आधुनिक विद्यार्थ्यांची बौद्धिक आणि वैचारिक पातळी रोडावत खाली चाललेली आहे. भूतकालातील मानवी प्रज्ञेशी तुलनाच होऊ शकत नाही. ही बौद्धिक पातळी का खाली घसरली ह्याचा विद्यार्थ्यांनी विचार करणे आवश्यक आहे आणि या परागतीचे कारण अगदी स्पष्ट आहे. आजचा विद्यार्थीवर्ग भूतकालीन प्रज्ञावंत आणि प्रतिभावंत यांच्या तत्त्वज्ञान व वाङ्मयकृतींचा अभ्यास मन लावून करीत नाही.

उलटपक्षी, आजचा विद्यार्थीवर्ग फुटबॉल, क्रिकेट आणि पोकळ राजकारणात दंग असतो. विद्यार्जन याला एक मोठा अर्थ असतो. आपली प्राचीन गुरुकुले एकांतात विद्या शिकवीत असत. रानावनातून ही विद्यापीठे प्रस्थापित झाली होती त्याचे मुख्य कारण असे की, त्यांना विद्येच्या अभ्यासाने नवी दृष्टी यावी, या दृष्टीतून त्यांनी खऱ्या जीवनमूल्यांचा शोध व बोध घ्यावा. पण आजचे विद्यार्थी क्रीडेच्या आणि राजकारणाच्या फंदात ती दिव्य दृष्टी प्राप्त करून घेतच नाही.

हिंदी विद्यालयातील शिक्षक मोठ्या कष्टाने, केवळ अंगिकारले आहे म्हणून विद्यादान करीत असतो. स्वयंप्रेरणेने हे विद्यादान होत नाही. शिक्षकाला लागणारी अंतःस्फूर्ती, विद्यादानाची हौस आणि त्यासाठी करावा लागणारा अव्याहत व्यासंग या सर्वांचीच त्यांच्याकडे वानवा असते. किंबहुना अध्यापक

पेशाला जे नोकरीचे हिडीस स्वरूप आले आहे आणि तास भरून काढण्यासाठीच त्याला शिकवावे लागत असल्यामुळेच अध्यापक वर्गामध्ये हे शैथिल्य निर्माण झाले असावे ! व त्यामुळे अध्यापकही विद्यार्थ्यांना विचारप्रवर्तक ज्ञान पाजण्यास असमर्थ झाले आहेत.

विद्यालयांनी आपल्या फी भरमसाठ वाढविल्या आहेत. या फी अशाच वाढू लागल्या तर विद्यार्थ्यांच्या भावी जीवनावर त्यांचा निश्चितपणे अनिष्ट परिणाम होईल. त्यांचे भवितव्य भयाण होईल. केबन म्हणतो, ' knowledge is Power ' ज्ञान ही महान शक्ती आहे, विद्यार्थी वर्गाला जर या ज्ञानाची कास धरून आपल्या देशाचा विकास आणि उद्धार करून घ्यायचा असेल तर त्यांनी विद्यापीठाच्या कारभारात जरूर लक्ष घालून आपल्या हक्कांसाठी सतत झगडत राहिले पाहिजे.

विद्यापीठाचा कारभार हाकणारी सिनेटमध्ये बसलेली ही क्रियाशून्य जुनी धेंडे गेल्याशिवाय विद्यापीठाचा कारभार सुधारणार नाही. उलट या जुन्या धेंडांकडूनच विद्यापीठात उघड लाचलुचपतीचे प्रकार सुरू आहेत. सिनेटमधल्या सभासदाकडील शिक्षणसाहित्य किंवा शास्त्रीय उपकरणे खरेदी करणाच्या अटीवरच एखाद्या नव्या शाळेला किंवा कॉलेजला मान्यता मिळते. म्हणून विद्यार्थ्यांनीच विद्यापीठाचा कारभार जातीने पाहिला पाहिजे व आपले हित साधले पाहिजे.



## ३००

# लोकशाहीच्या यशस्वी कामकाजाच्या पूर्ववर्ती शर्ती

''डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची प्रकृती साधारण जून १९५२ पासून सुधारू लागून आराम वाटू लागला. मागील १०-१५ वर्षात, भगवान बुद्धाचे चरित्र व कार्य या संबंधी जे प्रचंड वाङ्मय वाचले होते त्याची टिप्पणे ते जुलै महिन्यात काढू लागले, मधून मधून ते इतर ग्रंथ लिहिण्यासाठीही वाचन करून टिप्पणे तयार करून ठेवीत असत. त्यांना निरनिराळया संस्थांकडून भाषणे करण्याची आमंत्रणे येत होती ; पण प्रकृती अस्वास्थ्यामुळे त्यांनी कोणालाच होकार दिला नाही. गेले वर्षभर पुणेकर मंडळी त्यांचे व्याख्यान ठेवण्यासाठी धडपडत होती. पण साहेबांनी त्यांनाही होकार दिला नव्हता. ऑक्टोबरमध्ये बाबासाहेब परत मुंबईला आले तेव्हा पुण्याचे दोन वकील त्यांना भेटावयास आले. पुण्यात एखाद्या चांगल्या विषयावर बाबासाहेबांनी भाषण करावे, अशी पुनः त्यांनी बाबासाहेबांना नम्रपणे आग्रहाची विनंती केली. बाबासाहेबांनी त्यांच्या विनंतीला मान देऊन, व्याख्यान देण्याचे कबूल केले, नंतर विषयासंबंधी पत्रव्यवहार झाला व विषय निवडण्यात आला, खरी लोकशाही म्हणजे काय व ती टिकविण्यास कोणती कारणे लागतात वगैरे मुद्यांवर बाबासाहेबांनी आपले विचार प्रदर्शित करावयाचे ठरविले. हे बाबासाहेबांचे विचार सर्व भारतीय जनतेला समजावेत अशी व्यवस्था आपण करणार आहोत, असे भेटीला आलेल्या वकीलांनी सांगितले होते म्हणून बाबासाहेबांनी त्याचा खुलासा विचारला तेव्हा त्यांचे भाषण छापून प्रसिद्ध करण्याचे त्यांनी बाबासाहेबांना कळविले. ही योजना बाबासाहेबांना पसंत पडली व भाषणाची तारीख २२ डिसेंबर १९५२ ठरविण्यात आली. बाबासाहेबांनी आपले भाषण डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यात तयार केले. ते श्री. नानकचंद रत्तु यांनी टाईप केले. ''[१]

'' ठरविल्यानुसार दिनांक २२ डिसेंबर १९५२ रोजी सायंकाळी पुणा डिस्ट्रिक्ट लॉ लायब्ररीच्या हॉलमध्ये कार्यक्रम आयोजित करण्यात आला.

प्रथम डिस्ट्रिक्ट लॉ लायब्ररीतर्फे पुण्यातील सुप्रसिद्ध वकील कै. ल. र. उर्फ तात्यासाहेब गोखले यांच्या तैलचित्राचे अनावरण डॉ. आंबेडकर यांच्या हस्ते झाले. तसेच श्री. ए. बी. सेठना व हरि विठ्ठल तुळपुळे यांनी लायब्ररीस दिलेल्या पुस्तक संग्रहाचे उद्घाटनही डॉ. आंबेडकरांच्या हस्ते झाले. या समारंभास

---

१. डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड ११ पृ.२०-२१.

न्यायाधिश, मॅजिस्ट्रेट, वकील व बाहेरची मंडळी उपस्थित होती. प्रेक्षकांनी हॉल खच्चून भरला होता. हॉलच्या बाहेर किती तरी श्रोते उभे होते. अध्यक्षस्थानी सेशन्स जज्ज श्री. पी. सी. भट हे होते. अध्यक्षांच्या भाषणानंतर श्री. सेठना व तुळपुळे या सेवानिवृत्त वकिलांचा डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी पुष्पहार घालून सत्कार केला. नंतर ज्युडिशिअल क्लार्क्स असोसिएशन तर्फे डॉ. आंबेडकरांना हार घालण्यात आला. बाबासाहेब आंबेडकरांचे ते भाषण ५ ते ७ वाजताच्या दरम्यान झाले''.[१]

ते आपल्या भाषणात म्हणाले,

''आजच्या या संध्याकाळी मी आपणासमोर ज्या विषयावर बोलणार आहे तो विषय माझ्या शब्दात सांगावयाचा म्हणजे ' लोकशाहीच्या यशस्वी कामकाजाच्या पूर्वावर्ती शर्ती ' असा असेल, कोणत्याही प्रकारचा अडथळा नसताना लोकशाही शासन व्यवस्था कार्यरत व्हावी यासाठी ज्यांचे अस्तित्व आवश्यक आहे अशा पूर्वावर्ती शर्ती कोणत्या आहेत ? याच विषयावर काही विचार मांडण्याचा माझा मानस आहे.

विषयाला प्रत्यक्ष सुरूवात करण्याच्या अगोदर मी ज्याला विषयाची मांडणी म्हणतो त्याला पूरक असे काही प्राथमिक विचार मी आपणासमोर प्रथम सांगणार आहे. मला प्रस्तुत करावयाचा पहिला प्राथमिक विचार असा आहे की, लोकशाहीचे प्रकार नेहमीच बदलत आले आहेत. आपण लोकशाही संबंधाने बोलतो परंतु लोकशाही नेहमीच सारखी नसते. ग्रीक लोक अथेनिअन लोकशाही संबंधाने बोलले. परंतु प्रत्येकाला कल्पना आहे की अथेनिअन लोकशाही ही आधुनिक लोकशाहीपासून इतकी भिन्न आहे की जितके लोणी खडकापासून भिन्न असते. अथेनिअन लोकशाहीमध्ये अशा लोकांचा अंतर्भाव होता की ज्यांच्यामध्ये ५० टक्के लोक गुलाम होते, फक्त ५० टक्केच लोक स्वतंत्र होते. जे ५० टक्के लोक गुलाम होते त्यांना शासनात कसलेच स्थान नव्हते. म्हणूनच आपली लोकशाही अथेनिअन लोकशाहीपासून निश्चितच भिन्न आहे. एक प्राथमिक विचार म्हणून दुसऱ्या एका गोष्टीकडे मी आपले लक्ष वेधू इच्छितो. ती म्हणजे एकाच देशामध्ये लोकशाही नेहमीच सारखी नसते. आपण इंग्लंडचा इतिहास विचारार्थ घ्यावा. कोणीही असे म्हणू शकत नाही की, सन १६८८ मधील इंग्लिश क्रांतीच्या अगोदरची इंग्लीश लोकशाही,त्या क्रांतीनंतरच्या लोकशाही सारखीच होती. तसेच, असे सुद्धा कोणी म्हणू शकत नाही की, पहिला सुधारणा कायदा पास झाला त्या काळातील म्हणजे सन १६८८ व १८३२ या सालात अस्तित्वात

[१] जनता : २७ डिसेंबर १९५२.

असलेली लोकशाही तो कायदा पास ( सन १८३२ ) झाल्यानंतरच्या परिणत झालेल्या लोकशाही सारखीच होती. लोकशाहीचे स्वरूप सारखेच बदलत राहते.

तिसऱ्या एका गोष्टीकडे मी आपले लक्ष वेधू इच्छितो आणि ती म्हणजे लोकशाहीचे केवळ स्वरूपच बदलत नाही तर लोकशाहीच्या हेतुमध्ये देखील वेळो-वेळी बदल होत जातो. आपण प्राचीन इंग्लीश लोकशाही विचारात घ्या; त्या लोकशाहीचा हेतू काय होता? राजाला पायबंद घालणे, तसेच आपण ज्याला कायद्याच्या भाषेत परमाधिकार म्हणतो त्या अधिकारांच्या अंमलबजावणीपासून राजाला परावृत्त करणे हाच लोकशाहीचा हेतू होता. राजाची मजल त्यावेळी असे सांगण्यापर्यंत गेली होती की, '' कायदा करणारी एक संस्था म्हणून जरी संसद अस्तित्वात असली तरी ' मी ' एक राजा म्हणून मला कायदा करण्याचा परमाधिकार आहे आणि माझाच कायदा सर्वश्रेष्ठ आहे.'' राजाच्या या स्वयंसत्ता पद्धतीमुळेच लोकशाही अस्तित्वात येऊ शकली.

सध्या लोकशाहीचा हेतू काय आहे? राजाच्या स्वयंसत्ताकपद्धतीला जास्तीतजास्त पायबंद घालणे हा विद्यमान लोकशाहीचा हेतू नसून जनसामान्यांचे कल्याण करणे हाच तिचा हेतू आहे. हाच लोकशाहीच्या हेतूमधला लक्षणीय बदल आहे आणि म्हणून माझ्या विषयाला मी जे शीर्षक दिले आहे त्यामध्ये आपल्या हे दृष्टोत्पत्तीस येईल की, '' विद्यमान लोकशाहीच्या यशस्वी कामकाजाच्या पूर्वावर्ती शर्ती '' ह्या शब्दप्रयोगाचा मी जाणीवपूर्वक उपयोग केला आहे.

लोकशाही म्हणजे आपण काय समजतो? विषयाला सुरवात करण्याच्या अगोदर आपणाला या विषयाची स्पष्ट कल्पना आली पाहिजे. आपणास याची जाणीव आहे की, राज्यशास्त्राच्या लेखकांनी, तत्त्वज्ञांनी आणि समाजशास्त्रज्ञ अशासारख्या पुष्कळशा लोकांनी लोकशाहीची व्याख्या केली आहे. माझ्या मुद्याचे स्पष्टीकरण व्हावे या उद्देशाने मी फक्त दोनच व्याख्यांचे आपणासमोर विवेचन करणार आहे. आपणापैकी किती लोक वाल्टर बेगहॉट यांनी ब्रिटिश संविधानावर लिहिलेल्या प्रसिद्ध ग्रंथाशी परिचित आहेत याची मला कल्पना नाही. परंतु तो ग्रंथ म्हणजे लोकशाहीचा सत्य आराखडा सांगण्याचा पहिलाच आधुनिक प्रयत्न आहे. वाल्टर बेगहॉट यांचा उपरोक्त ग्रंथ जर आपण पाहिला असेल तर त्याने 'चर्चेतून चालणारे शासन' अशी लोकशाहीची व्याख्या केल्याचे आपणास आढळेल. याप्रमाणे त्याने लोकशाहीची व्याख्या केली आहे.

दुसरे उदाहरण घ्या आणि ते म्हणजे अब्राहम लिंकनचे. दक्षिणेकडील राज्यांच्या विजयानंतर गेट्टीसबर्ग येथे केलेल्या प्रसिद्ध भाषणात त्याने लोकशाहीची अशी व्याख्या केली आहे की, 'लोकांचे, लोकांनी व लोकांच्यासाठी चालविलेले शासन म्हणजे लोकशाही'. ठीक आहे! लोकशाही म्हणजे काय याची लोकांना जाणीव करून देण्यासाठी दुसऱ्या पुष्कळशा व्याख्यांची यामध्ये भर घालता येईल. मी स्वतः व्यक्तीगत लोकशाहीची एका वेगळया मार्गानी व्याख्या करतो आणि मला असे वाटते की, ती पुष्कळशी सत्य आहे. लोकशाहीची माझी व्याख्या अशी आहे की, 'रक्तपाताशिवाय लोकांच्या आर्थिक आणि सामाजिक जीवनात क्रांतीकारी बदल घडवून आणणाऱ्या शासन व्यवस्थेच्या प्रकारास आणि पद्धतीस लोकशाही म्हणतात.' लोकशाहीची ही माझी व्याख्या आहे. लोकशाही, जर ती चालविणाऱ्या लोकांना, लोकांच्या सामाजिक व आर्थिक जीवनात मूलभूत बदल घडवून आणण्यासाठी सहाय्यभूत होत असेल आणि लोक हा बदल रक्तपाताचा आश्रय न घेता स्वीकारण्यास तयार असतील तर त्या ठिकाणी लोकशाही आहे असे मी मानतो. लोकशाहीची ही खरी कसोटी आहे. कदाचित ही कठोर कसोटी असेल परंतु ज्यावेळेस तुम्ही एखाद्या वस्तुच्या गुणवत्तेचे मूल्यांकन करता त्यावेळेस तुम्ही ती कठोर कसोटीस लावता. अशाप्रकारे कोणत्याही परिस्थितीत, आजच्या माझ्या व्याख्यानाच्या संदर्भात मी लोकशाहीची व्याख्या प्रस्तावित करीत आहे. आणि मग अशी ही लोकशाही कशी यशस्वी होईल हाच माझ्या भाषणाचा मुख्य विषय आहे. दुर्दैवाने ज्यांनी लोकशाही या विषयासंबंधी लिहीले आहे त्यांनी या विषयावर कोणतीही आग्रही मते मांडलेली नाहीत. या आग्रही मतावरून लोकशाही यशस्वी करण्याच्या पूर्वावर्ती शर्तीची त्यांच्या अभिप्रायाप्रमाणे एक निश्चित कल्पना आली असती. यासाठी एखाद्याला इतिहास वाचावा लागेल आणि इतिहासाच्या या वाचनाचा परिणाम म्हणून जगातील वेगवेगळया भागात ज्या ठिकाणी लोकशाही राबविली जात आहे त्या ठिकाणच्या लोकशाही जीवनाच्या बिघाडाचा शोध घ्यावा लागेल.

माझ्या मताप्रमाणे लोकशाहीच्या यशस्वी कामकाजाची पहिली शर्त म्हणजे समाजामध्ये भयानक विषमता असता कामा नये, पिळलेला वर्ग असता कामा नये, दडपलेला वर्ग असता कामा नये. ज्याला सर्व विशेषाधिकार आहेत व जो केवळ ओझ्याचा बैल आहे असे समाजामध्ये वर्ग असता कामा नयेत. समाजाच्या या व्यवस्थेत, पद्धतीत व विभाजनात रक्तरंजित क्रांतिची बीजे असतात आणि कदाचित हे दुखणे नाहीसे करणे लोकशाहीला अशक्य होईल. गेट्टीसबर्ग येथील पूर्वी उल्लेखिलेल्या भाषणात लिंकनने असे म्हटले होते की, ''ढासळलेले

घर उभे राहणे शक्य नाही'' याचा नेमका अर्थ लोकांना समजलेला नाही. दक्षिणेकडील व उत्तरेकडील राज्यांच्या संघर्षाच्या संदर्भात खचितच त्याने हे उद्‌गार काढलेले आहेत. तो म्हणाला, ''दक्षिणेकडील राज्यातील तुम्ही व उत्तरेच्या राज्यातील आम्ही जर विभागलेले असू तर परकीय आक्रमणाच्या वेळेस आपणास संघटितपणे उभे राहता येणार नाही.'' 'ढासळलेले घर उभे राहू शकत नाही' हे उद्‌गार त्याने ज्यावेळेस काढले त्यावेळेस त्याला अगोदर सांगितलेल्या अर्थानेच हे सांगावयाचे होते परंतु मला असे वाटते की त्याची संज्ञा किंवा त्याचे वाक्य यापेक्षा जास्त खोलवर अर्थगर्भित आहे आणि त्याचा अर्थ माझ्या समजुतीप्रमाणे असा आहे की, वर्गा-वर्गात खोलवर रूजलेली फाटाफूट हाच लोकशाहीच्या यशातील सर्वात मोठा अडथळा आहे. कारण लोकशाहीत नेमके काय घडते? लोकशाहीत दबलेल्यांना, पिळलेल्यांना व मानवी हक्कांपासून वंचित केलेल्यांना व जे ओझ्याचे बैल आहेत अशा सर्वांना विशेषाधिकारी लोकांच्या सारखाच मतदानाचा अधिकार असतो. विशेषाधिकारी लोक ज्यांना विशेषाधिकार नसतात अशा लोकांपेक्षा संख्येने कमी असतात. लोकशाहीत बहुसंख्यांकांचा कायदा हाच निर्णायक मानला जात असल्यामुळे अल्पसंख्यांक विशेषाधिकारी लोकांनी जर त्यांच्या खास हक्कांचा स्वेच्छेने व राजीखुषीने त्याग केला नाही तर विशेषाधिकारी लोक व सर्वसामान्य जनता यांच्यात निर्माण होणाऱ्या दरीने लोकशाहीचा नाश होईल व यातूनच काहीतरी फारच वेगळे निर्माण होईल.

जर तुम्ही जगातील वेगवेगळया भागातील लोकशाहीच्या इतिहासाची तपासणी केलीत तर तुम्हाला असे आढळून येईल की, सामाजिक विषमता हे लोकशाहीच्या नाशाला कारणीभूत होणाऱ्या कारणांपैकी एक आहे, याबद्दल माझ्या मनात कोणताही संदेह नाही.

लोकशाहीच्या यशस्वी कामकाजासाठी आवश्यक असणारी दुसरी गोष्ट म्हणजे विरोधी पक्षाचे अस्तित्व. पक्ष पद्धतीला दूषण देणारे लोक मी केवळ याच देशामध्ये पाहिलेले नाहीत तर इंग्लंड सारख्या देशात देखील मी असे पुष्कळसे लोक पाहिले आहेत. इंग्लंडमधील पक्ष पद्धतीवर हॅन्सार्ड सोसायटीने प्रसिद्ध केलेले एक छोटेसे पुस्तक मी येथे येण्यापूर्वी नुकताच वाचत होतो. या पुस्तकात पक्ष पद्धती चांगली आहे काय व ती सहन करता येण्यासाठी आहे काय या प्रश्नाला एक संपूर्ण प्रकरण वाहिलेले आहे. या प्रश्नावर बरीच मतभिन्नता आहे. मला सध्या असे वाटते की, पक्ष पद्धतीच्या विरूद्ध असणारे सर्व आणि याच संदर्भात जे विरोधी पक्षाच्या विरोधी आहेत अशा सर्वांना लोकशाही संकल्पनेचा पूर्णपणे अपसमज झालेला आहे. मग लोकशाही म्हणजे तरी

काय ? मी तिची व्याख्या करीत नाही. मी लोकशाहीच्या कार्यासंबंधी प्रश्न निर्माण करीत आहे. मला असे वाटते की, लोकशाही म्हणजे नकारशक्ती आहे. आनुवंशिक अधिकार किंवा स्वयंसत्ताक अधिकार यांचा प्रतिशोधक म्हणजे लोकशाही. ज्यांची देशावर सत्ता आहे त्यांच्या अधिकारावर कोठेतरी केव्हातरी नकाराधिकार वापरणे म्हणजे लोकशाही. स्वयंसत्ताक राज्यव्यवस्थेत नकाराधिकार नसतो. राजाची एकवेळ नियुक्ती झाल्यानंतर अनुवंशिक किंवा दैवी अधिकार म्हणूनच तो राज्य करतो. त्याला प्रत्येक पाच वर्षांनी जनतेसमोर जाऊन खालील प्रश्न विचारण्याची गरज पडत नाही. " मी गेल्या पाच वर्षात चांगले काम केले आहे, असे आपणास वाटते काय ? आणि असे जर वाटत असेल तर तुम्ही माझी पुन्हा नियुक्ती कराल काय ? " राजाच्या सत्तेला आव्हान करणारा नकाराधिकार कोणाहीजवळ नसतो. परंतु लोकशाहीत जे सत्तेवर असतात त्यांना प्रत्येक पाच वर्षांनी जनतेसमोर जाऊन जनतेला असे विचारावे लागते की, जनतेच्या मताप्रमाणे त्यांच्या हिताची काळजी घेण्यासाठी, त्यांचे संरक्षण करण्यासाठी व त्यांच्या नियत जीवनात बदल घडविण्यासाठी सत्ता व अधिकार संपादण्यास ते लायक आहेत काय ? यालाच मी नकाराधिकार म्हणतो. सत्ताधाऱ्यांनी पाच वर्षाच्या शेवटी जनतेपर्यंत जावे व मधल्याकाळात सत्ताधाऱ्यांना जाब विचारणारे कोणी नसावे या पंचवार्षिक नकाराधिकाराने लोकशाहीचे समाधान होत नाही. लोकसत्तेच्या पाच वर्षाच्या दीर्घकालीन नकाराधिकाराशीच केवळ शासनाची बांधिलकी नसते तर तात्काळ नकाराधिकाराची लोकशाहीला फार आवश्यकता असते. जे शासनाला तेथेच आणि त्यानंतर तात्काळ आव्हान करू शकतील अशा लोकांची संसदेत फार आवश्यकता असते. मी जे काही आपणास सांगत आहे ते जर तुम्हाला नीट समजले तर लोकशाही म्हणजे राज्य करण्याचा कोणाचाही अखण्ड अधिकार नव्हे. राज्य करण्याचा हा अधिकार लोकांच्या मान्यतेला बांधलेला असतो व त्याला संसदेत आव्हान करता येते. यामुळे विरोधी पक्ष ही संकल्पना किती महत्त्वाची आहे याची आपणास जाणीव होईल. सत्ताधाऱ्यांनी त्यांच्या पक्षाला न मानणाऱ्या लोकांसाठी केलेल्या प्रत्येक कृतीचे समर्थन करणे यालाच विरोधी पक्ष म्हणतात.

दुर्दैवाने आपल्या देशातील सर्व वृत्तपत्रे, कोणत्यातरी एका कारणासाठी किंवा अन्य काही कारणासाठी माझ्या मताप्रमाणे-जाहिरातीपासून उत्पन्न उपटण्याचे साधन आहे. अशा वृत्तपत्रांनी शासनाला विरोधी पक्षापेक्षा जास्त प्रसिद्धी दिली आहे. कारण त्यांना विरोधी पक्षाकडून जाहिरातीचे उत्पन्न मिळत नाही. शासनाकडून त्यांना उत्पन्न मिळते आणि मग साहजिकच सत्ताधारी

पक्षाच्या सदस्यांनी केलेल्या भाषणांच्या वृत्तांताने दैनिक वर्तमानपत्रांचे स्तंभच्या-स्तंभ भरले जातात व विरोधी पक्षांच्या सदस्यांच्या भाषणाचे वृत्तांत कोठेतरी शेवटच्या पानावर शेवटच्या स्तंभात दिले जातात. मी लोकशाहीवर टीका करीत नाही. लोकशाहीला आवश्यक असणारी पूर्वावर्ती शर्त मी आपणास सांगत आहे. विरोधी पक्ष ही लोकशाहीची पूर्वावर्ती शर्त आहे. परंतु आपणास याची कल्पना असेल की, इंग्लंडमध्ये विरोधी पक्षाला केवळ मान्यताच नाही तर विरोधी पक्षाच्या नेत्याला विरोधी पक्ष चालविण्यासाठी शासनाकडून पगार दिला जातो. त्याला सचिव असतो, त्याला लेखनिकांचा व लघुलेखकांचा छोटासा कार्यवृंद देण्यात येतो. ज्या ठिकाणी बसून तो त्याचे काम करू शकेल अशी 'हाऊस ऑफ कॉमन्समध्ये' त्याला एक खोली देण्यात येते. याच धर्तीवर कॅनडामध्ये विरोधी पक्षाच्या नेत्याला तेथील पंतप्रधानासारखा पगार मिळतो. कारण या दोन्ही देशातील लोकशाहीची अशी धारणा आहे की, शासन जर चुकीच्या मार्गाने जात असेल तर ते दाखविण्यासाठी कोणाची तरी निश्‍चितच आवश्यकता लागते आणि हे काम तात्काळ व सातत्याने करावे लागते. म्हणूनच विरोधी पक्ष नेत्यावर निधी खर्च करण्यास त्यांना काही वाटत नाही.

माझ्या मताप्रमाणे जिला लोकशाहीच्या यशस्वीतेसाठी पुर्वावर्ती शर्त म्हणता येईल अशी तिसरी शर्त आहे. आणि ती म्हणजे कायदा आणि प्रशासन या संदर्भात सर्वांना सारखी समानता. जरी कायद्याबाबत सर्वांना सारखीच समानता नसल्याची इतस्थः प्रकरणे असली तरी या घडिला कायद्यासमोर सर्वांना सारखी समानता या संबंधी एखाद्याला जास्त विस्ताराने सांगण्याची गरज नाही. परंतु प्रशासनात समानतेची वागणूक ही बाब फार महत्त्वाची आहे. सत्ताधारी पक्षाने त्या पक्षाच्या सदस्यांच्या फायद्यासाठी प्रशासन राबवल्याची प्रकरणे आपणापैकी पुष्कळशा लोकांना ठाऊक असणे शक्य आहे. अशा प्रकारची उदाहरणे मला स्वतःला वस्तुतः खूप आठवतात. आपण अशी कल्पना करा की अनुज्ञप्ति (लायसन) घेतल्याशिवाय कोणालाही एखाद्या विशिष्ट पदार्थाचा व्यापार करता येणार नाही अशा प्रकारचा कायदा आहे. या पद्धतीच्या कायद्याबाबत वादविवाद होऊ शकत नाही. कारण तो सार्वत्रिक आहे. या एका विशिष्ट कायद्यामध्ये भेदाभेद होऊ शकत नाही.

मंत्रीमहोदय निर्णय घेताना पहिल्या माणसाला अनुज्ञप्ति (लायसन) देतात व दुसऱ्या माणसाला नाकारतात. अनुज्ञप्ति मिळविण्यासाठी वरील दोन्ही माणसे जरी सारख्याच प्रमाणात योग्यतेवर पात्र असून देखील असे घडते. ही बाब शासनातील सापत्नभाव निश्‍चितपणे दर्शविते कारण या ठिकाणी समान न्याय

नाही. अनुज्ञप्तीचा (लायसन) प्रश्न म्हणजेच हा किंवा तो विशेषाधिकार बहाल करणे ही खचितच एक क्षुल्लक बाब आहे आणि परिणामतः अशा सापत्नभावाचा दुष्परिणाम भोगणाऱ्यांची संख्या देखील फारच थोडी असते. परंतु थोडेसे पुढे जाऊन आपण असे पाहू या की हा सापत्नभाव जर शासनात बोकाळला तर काय होईल. अशी कल्पना करा की एखाद्या पक्षाच्या सदस्यावर भरपूर पुराव्यानिशी कोणत्यातरी गुन्ह्यासाठी खटला भरला जात आहे आणि त्या विशिष्ट भागातील पक्षप्रमुख जिल्हा न्यायाधिशाकडे जाऊन त्यांना असे सांगू लागला की तो गुन्हेगार त्याच्या पक्षाचा असल्यामुळे त्याच्यावर खटला भरणे बरोबर होणार नाही आणि पुढे म्हणतो,'' मी सांगतो त्याप्रमाणे आपण वागला नाही तर हे प्रकरण मंत्रीमहोदयाकडे घेऊन जाऊन आपली या ठिकाणावरून बदली केली जाईल. '' असे घडू लागले तर कोणत्या प्रकारची अनागोंदी आणि अन्याय शासनात निर्माण होतील याची आपण केवळ कल्पनाच केलेली बरी ! अशा प्रकारची प्रकरणे अमेरिकेत घडत होती. त्याला नाशपद्धति (Spoils system) असे म्हणत. नाशपद्धती म्हणजे एखादा पक्ष सत्तेवर आल्यानंतर त्याच्या पूर्वसुरी सत्ताधारी पक्षाने नेमलेल्या कर्मचाऱ्यांना, कारकून आणि शिपाई यांच्यासह सर्वांना कामावरून काढून टाकणे व त्यांच्या ठिकाणी त्या नवीन पक्षाला सत्तेवर येण्यासाठी ज्यांनी मदत केली अशा सद्‌गृहस्थांची नेमणूक करणे. यामुळे अमेरिकेसारख्या देशाला वस्तुतः कित्येक वर्षे नाव घेण्यासारखे प्रशासन मिळाले नाही. शेवटी त्यांना याची जाणीव झाली की अशा गोष्टी लोकशाहीला पोषक नाहीत. त्यांनी ही ' नाशपद्धती ' नष्ट केली. इंग्लंडमध्ये प्रशासन शुद्ध, निःपक्षपाती व राजकीय धोरणापासून दूर असावे यासाठी त्यांनी राजकीय कार्यालये व प्रशासकीय कार्यालये यांच्यामध्ये निश्चित वेगळेपणा निर्माण केला. प्रशासकीय सेवा ही स्थायी असते. ती सर्व पक्षांची सारखीच सेवा करते मग सत्तेवर कोणीही असो ! आणि अशाप्रकारे ती मंत्रीमहोदयांच्या कोणत्याही हस्तक्षेपाशिवाय प्रशासन चालवीत असते. या पद्धतीचे प्रशासन ज्यावेळेस ब्रिटिश आपल्या देशात होते त्यावेळेस निश्चितच अस्तित्वात होते. भारत सरकारचा ज्यावेळेस मी सदस्य होतो त्यावेळच्या माझ्या स्वतःच्या जीवनातील एका घटनेचे मला स्पष्टपणे स्मरण होते. आपणास याची कल्पना असेल की दिल्लीत त्यावेळच्या काही रस्त्यांना व मंडळांना व्हाईसरॉयची नावे दिलेली होती. लिनलिथगो हेच असे एक गव्हर्नर-जनरल होते की त्यांच्या नावावरून दिल्लीतील कोणत्याही रस्त्याला किंवा संस्थेला नाव दिले नव्हते. त्यांचे खाजगी सचिव माझे मित्र होते. माझ्याकडे त्यावेळी सार्वजनिक बांधकाम खाते

होते. माझ्या अखत्यारीत पुष्कळच कामे होती. तो माझ्याकडे आला आणि मला म्हणाला, '' डॉक्टर महोदय, लॉर्ड लिनलिथगो यांचे नाव एखाद्या संस्थेला किंवा सार्वजनिक बांधकामास देण्याच्या बाबतीत आपण काही करू शकाल काय ? '' ते पुढे म्हणाले '' प्रत्येकाची नावे वेगवेगळया संस्थांना किंवा सार्वजनिक बांधकामांना दिली आहेत परंतु त्यांचेच नाव दिलेले नसावे ही बाब फ़ारच खटकणारी आहे. '' मी म्हणालो, '' मी विचार करीन. '' मी त्यावेळी जमुना नदीवर दिल्ली शहरास उन्हाळयात पाणी पुरवठा करण्यासाठी बंधारा बांधण्याच्या योजनेवर विचार करीत होतो. कारण उन्हाळयात दिल्ली एकदम रखरखीत असते. ही बाब माझ्या प्रिअर नावाच्या युरोपियन सचिवास सांगितली. मी म्हणालो, '' महोदय हे पहा, गव्हर्नर-जनरलांच्या सचिवानी सांगितलेली सूचना आपणास ठाऊक आहेच. तेव्हा त्या बाबतीत आपण काही करू शकू असे आपणास वाटते काय ? '' त्यांचे उत्तर काय असावे याची आपणास कल्पना आहे ? त्यांनी असे उत्तर दिले की, '' महोदय, ही गोष्ट आपण करता कामा नये. या देशात अशा प्रकारच्या गोष्टी करणे कोणत्याही परिस्थितीत अशक्यप्राय आहेत. '' एखाद्या अधिकाऱ्याने मंत्रीमहोदयांच्या इच्छेविरूद्ध काही तरी बोलावे ही बाब माझ्या मताप्रमाणे निखालस अशक्य आहे. परंतु त्याकाळी अशा गोष्टी शक्य होत्या. कारण ब्रिटिश लोकांप्रमाणे आपण सुद्धा शासनाने प्रत्यक्ष कारभारात ढवळाढवळ करू नये अशाप्रकारचा सूज्ञ निर्णय घेतला होता. कारण शासनाचे मुख्य कार्य प्रशासनात ढवळाढवळ करणे किंवा भेदभाव करणे हे नसून धोरण निश्चित करण्याचे असते. ही बाब अत्यंत मूलभूत आहे. आणि मला भीती वाटते कारण त्या न्यायापासून आपण दुरावलो आहे. आपणाकडे असलेल्या त्या गोष्टीचा आपण संपूर्णपणे त्याग करू किंवा ती नष्ट करून टाकू.

माझ्या अभिप्रायाप्रमाणे यशस्वी लोकशाहीच्या कामकाजाची चौथी पूर्वावर्ती शर्त म्हणजे सांविधानिक नैतिकता. आपल्या संविधानाबद्दल पुष्कळसे लोक अतिउत्साही दिसतात. खरोखरच या गोष्टीची मला भीती वाटते. परंतु मी तसा नाही. ज्यांना भारतीय संविधान नष्ट करून त्याचा नवीन मसुदा करावासा वाटतो अशा लोकांमध्ये सामील होण्यास माझी खरोखरच तयारी आहे. परंतु आपण हे विसरतो की आपले संविधान म्हणजे दुसरेतिसरे काही नसून वैध तरतुदींचा समावेश असलेला तो केवळ सांगाडा आहे. या सांगाड्याचे मांस, आपण ज्याला सांविधानिक नैतिकता म्हणतो त्यामध्ये आढळते. यालाच इंग्लंडमध्ये संविधानाचे संकेत असे म्हणतात. आणि लोकांनी या खेळाच्या

नियमांचे पालन केलेच पाहिजे. या संदर्भात या क्षणाला मला आठवणारी एक दोन उदाहरणे मी आपणास सांगणार आहे. आपणास हे आठवतच असेल की ज्यावेळी अमेरिकेतील १३ वसाहतींनी बंड पुकारले त्यावेळी वॉशिंग्टन त्यांचा नेता होता. त्यावेळच्या अमेरिकन जीवनात केवळ नेता म्हणून वॉशिंग्टनचा उल्लेख करणे म्हणजे त्याच्या दर्जाचे खरोखरच अवमूल्यन करण्यासारखे होय. कारण अमेरिकन लोकांसाठी वॉशिंग्टन हा प्रत्यक्ष परमेश्वरच होता. तुम्ही जर त्याचा जीवन-इतिहास वाचला तर तुम्हाला असे आढळून येईल की तेथील संविधान तयार झाल्यानंतर त्याला अमेरिकेचा पहिला राष्ट्रपती म्हणून निवडण्यात आले. त्याची मुदत संपल्यानंतर काय घडले? दुसऱ्यावेळी निवडणूक लढविण्यास त्याने नकार दिला. माझ्या मनामध्ये याबद्दल तिळमात्र शंका नाही की वॉशिंग्टन जर लागोपाठ दहावेळा राष्ट्रपती पदासाठी उभा राहिला असता तर तो प्रतिस्पर्ध्याशिवाय-बिनविरोध निवडला गेला असता. परंतु दुसऱ्या वेळी तो खाली उतरला. ज्यावेळेस त्याला '' असे का '' म्हणून विचारण्यात आले त्यावेळी त्याने असे सांगितले की, '' माझ्या मित्रांनो, ज्या हेतूने आपण आपले संविधान तयार केले त्याचा तुम्हाला विसर पडलेला दिसतो. आपणाला आनुवंशिक राज्यसत्ता नको आहे. तसेच आपणाला आनुवंशिक राजा किंवा हुकूमशहा नको आहे. यासाठी आपण हे संविधान तयार केले आहे. इंग्लिश राजाच्या राज्यनिष्ठेचा त्याग व अव्हेर करून जर तुम्ही या देशात आला असाल आणि वर्षानुवर्षे व सातत्याने तुम्ही माझी पूजा करू लागलात तर तुमच्या तत्त्वप्रणालीचे काय होणार? इंग्लिश राजाच्या ठिकाणी जर तुम्ही मला बसवले तर इंग्लिश राजाच्या अधिकाराविरूद्ध तुम्ही न्याय्य बंड पुकारले असे तुम्हाला म्हणता येईल काय? जरी माझ्यावरील तुमची निष्ठा व श्रद्धा मी दुसऱ्यांदा उभे राहावे याचा पुरस्कार करण्यासाठी तुम्हाला भाग पाडत असेल, तरी सुद्धा माझ्या सारख्याने, म्हणजे ज्याने आनुवंशिक अधिकार आपणाकडे नसावेत या तत्त्वाची प्रतिज्ञा केली, त्याने तुमच्या भावनांना बळी पडणे निश्चितच चांगले नाही.'' शेवटी फक्त दुसऱ्यांदाच त्याला निवडणुकीस उभे करण्यामध्ये येथील लोकांना यश मिळाले आणि तो उभा देखील राहिला परंतु त्याला तिसऱ्यांदा उभे करण्यासाठी ज्यावेळेस लोक त्याच्याकडे गेले त्यावेळेस मात्र त्याने लोकांना झिडकारले. मी आपणास दुसरे उदाहरण देतो. ज्याची वैवाहिक कथा नुकतीच ' टाइम्स ऑफ इंडियात ' प्रसिद्ध झाली आहे तो ८ वा विंडसोर एडवर्ड तुम्हाला ठाऊकच आहे. मी राऊंड टेबल परिषदेसाठी तेथे गेलो असताना राजाला त्याच्या इच्छेप्रमाणे हव्या असलेल्या स्त्रीबरोबर लग्न करण्यास परवानगी आहे काय, यावर मोठा वादविवाद माजला होता. विशेषतः

तो (राजा) त्यावेळेस तिच्या बरोबर प्रतिलोम विवाह करण्यास तयार होता. कारण तिला राणी होतां येऊ नये किंवा ब्रिटिश लोकांनी त्याचा तो वैयक्तिक अधिकारसुद्धा नाकारून पदत्यागास भाग पाडावे. मा. बाल्डविन, अर्थातच, राजाच्या या लग्नाविरूद्ध होते. त्याने राजाला परवानगी दिली नाही आणि तो म्हणाला, '' तुम्ही जर माझे ऐकले नाही तर तुम्हाला पदत्याग करावा लागेल. '' आपले मित्र मा. चर्चिल ८ व्या एडवर्डचे मित्र होते व ते त्याला या बाबतीत उत्तेजन देत होते. या प्रश्नाचे भांडवल करून मा. बाल्डविन यांचा पराभव करता येईल किंवा काय यावर त्यावेळी लेबर पार्टीचे लोक विचार करीत होते. कारण कॉंझरव्हेटीव्ह पक्षातील पुष्कळसे लोक त्यांच्या निष्ठेतून राजाला पाठिंबा देऊ इच्छित होते आणि मला असे आठवते की दिवंगत प्रा. लास्की, लेबर पार्टीने असा काही पवित्रा घ्यावा याविरुद्ध ' हेरॉल्ड ' मध्ये लेखमाला लिहित होते. ते म्हणत होते, '' आपल्या संकेताप्रमाणे राजाने पंतप्रधानांचा सल्ला स्वीकारलाच पाहिजे, ही बाब आपण नेहमी मान्य केली आहे आणि जर राजाने पंतप्रधानांचा सल्ला मानला नाही तर पंतप्रधानांनी त्याला काढून टाकले पाहिजे. हा आपला संकेत असल्यामुळे राजाचा अधिकार वाढेल अशा या प्रश्नावर बाल्डविनचा पराभव करणे ही गोष्ट आपल्या दृष्टीने चूकीची आहे. '' लेबर पार्टीने त्यांचा हा सल्ला मानला आणि त्याप्रकारचे त्यांनी काही केले नाही. ते म्हणाले, '' त्यांनी खेळाचे नियम पाळले पाहिजेत. '' तुम्ही जर इंग्लंडचा इतिहास वाचलात तर तुम्हाला अशाप्रकारची अनेक उदाहरणे सापडतील की सत्तेवर असणाऱ्या किंवा विरोधात असणाऱ्या विरोधकांना तात्पुरती सत्ता प्राप्त होईल अशा मुद्यावर पकडून इजा करण्याचे अनेक मोह पक्ष प्रमुखांच्या समोर होते. परंतु अशा मोहास बळी पडण्यास त्यांनी नकार दिला. कारण अशा गोष्टीमुळे त्यांच्या संविधानास व लोकशाहीस नुकसान पोहचेल याची त्यांना जाणीव होती.

माझ्या मताप्रमाणे लोकशाहीच्या कामकाजासाठी फार महत्त्वाची बाब म्हणजे लोकशाहीच्या नावावर बहुमतवाल्यांनी अल्पमतवाल्यांवर जुलूम करता कामा नये. बहुमतवाले जरी सत्तेवर असले तरी अल्पमतवाल्यांना स्वतःबद्दल सुरक्षितता वाटली पाहिजे. अल्पमतवाल्यांची मुस्कटदाबी केली जाते किंवा त्यांना डावपेचाने मार दिला जातोय अशी अल्पमतवाल्यांची भावना होता कामा नये. या गोष्टीचा हाऊस ऑफ कॉमन्समध्ये फारच मान राखला जातो. सन १९३१ साली ज्यावेळेस रॅम्से मॅक्डोनाल्ड यांनी लेबर पार्टीचा राजीनामा दिला व राष्ट्रीय सरकार स्थापन केले त्यावेळच्या इंग्लंडमधील सार्वत्रिक निवडणुकांचे निकाल आपणापैकी पुष्कळशा लोकांना स्मरत असतील. ज्यावेळेस निवडणुका होणार होत्या त्यावेळेस लेबर पार्टीचे १५० च्या आसपास सदस्य होते.

परंतु निवडणुकानंतर लेबर पार्टीला फक्त ५० जागा मिळाल्या व पंतप्रधान बाल्डविन यांच्या पक्षाला ६५० जागा मिळाल्या. मी त्यावेळेस इंग्लंडमध्ये होतो. कॉन्झरव्हेटीव्ह पक्षाच्या या बेफाट बहुमताखाली काम करणाऱ्या लेबर पार्टीच्या अल्पमतात असलेल्या ५० सदस्यांनी त्यांचा भाषण स्वातंत्र्याचा, विरोध करण्याचा आणि कोणत्याही प्रकारचा प्रस्ताव मांडण्याचा अधिकार नाकारला जातोय अशाप्रकारची तक्रार केल्याची एखादीसुद्धा घटना माझ्या ऐकिवात नाही. त्याची आपणास देखील कल्पना असेलच. आपण आपल्या संसदेचे उदाहरण घ्या. आपले विरोधी पक्ष सदस्य सातत्याने जे निंदाव्यंजक प्रस्ताव व स्थगन प्रस्ताव आणतात त्याचे मी काही समर्थन करीत नाही. संसदेत अशाप्रकारे नेहमी स्थगन प्रस्ताव मांडून काम करणे ही बाब काही सुखकारक नाही. खरे म्हणजे, ही गोष्ट आपल्या निदर्शनास आली असेलच की इंग्लंड सारख्या देशात संसदेत निंदाव्यंजक किंवा स्थगन प्रस्ताव चर्चेसाठी क्वचितच स्वीकारले जातात. या गोष्टीचे मला खरोखरच आश्चर्य वाटले. इंग्लिश संसदीय चर्चा–वृत्तांच्या माझ्या वाचनात सभापतींनी स्थगन प्रस्ताव अस्वीकृत केल्याचे मला क्वचितच आढळले आहे. मात्र अर्थातच तो शासनाचा आदेश असावा लागेल. मी ज्यावेळेस मुंबई विधान सभेचा सभासद होतो, त्यावेळी श्रीयुत मोरारजी, श्रीयुत मुन्शी आणि श्रीयुत खेर व इतर काही आमची मित्रमंडळी सत्तेवर होती. त्यांनी त्यावेळी चर्चेसाठी एकसुद्धा स्थगन प्रस्ताव स्वीकृत केला नव्हता. त्यावेळी आमचे मित्र श्री. मावळणकर सभापती होते. त्यांनी एक तर असे स्थगन प्रस्ताव नियमबाह्य ठरवून सत्ताधाऱ्यांना मदत केली किंवा त्यांनीच मान्य केल्याप्रमाणे, मंत्रीमहोदयांचा विरोध आहे असे सांगितले. अशा प्रस्तावांना मंत्रीमहोदयांनी विरोध केला म्हणजे काय होते याची आपणास कल्पना आहेच. ज्यावेळी मंत्रीमहोदय विरोध करतात त्यावेळी ज्या सदस्याने स्थगन प्रस्ताव प्रस्तुत केला असेल त्या सदस्याला ३० किंवा ४० सदस्यांचा पाठिंबा असल्याचे दाखवावे लागते किंवा जी काही संख्या ठरलेली असेल ती. ज्या अल्पमतवाल्या लहान पक्षाचे सभागृहातील प्रतिनिधीत्व फक्त ४, ५ किंवा ६ सदस्याइतकेच मर्यादित असेल अशा अल्पमतवाल्या पक्षाने मांडलेल्या स्थगन प्रस्तावास सत्ताधारी पक्षाने जर नेहमीच विरोध केला तर अल्पमतात असलेल्या सदस्यांना त्यांची गाऱ्हाणी मांडण्यास संधी मिळणार नाही. याचा परिणाम असा होतो की, अल्पमतातील लोकांमध्ये बेसनदशीर क्रांतिची वृत्ती बळावते. यासाठी हे आवश्यक आहे की, लोकशाहीप्रमाणे ज्यावेळेस कामकाज चाललेले असते आणि ज्या बहुमतातील लोकांवर ती अवलंबून असते त्यावेळेस बहुमतातील लोकांनी जुलमी पद्धतीने वागता कामा नये.

मी आणखी एका मुद्याचा उल्लेख करून माझे भाषण संपविणार आहे. माझ्या मताप्रमाणे समाजातील नैतिक अधिष्ठान कार्यशील ठेवणे लोकशाहीला अत्यावश्यक असते. दुर्दैवाने आपल्या राज्यशास्त्रज्ञांनी लोकशाहीच्या या पैलूचा विचारच

केला नाही. '' नीतिशास्त्र हे राजकारणापासून काहीतरी वेगळे आहे. आपण राजकारण शिकू शकतो आणि आपण नीतिशास्त्रासंबंधी काहीही जाणत नसलो तरी चालेल कारण राजकारण जणू काही नीतिशास्त्राशिवाय काम करु शकते.'' माझ्या मताप्रमाणे हे एक थक्क करून सोडणारे विधान आहे. शेवटी लोकशाहीत नेमके काय घडते ? 'मुक्त शासन' असे लोकशाही संबंधाने बोलले जाते आणि 'मुक्त शासन' म्हणजे आपण काय समजतो ? मुक्त शासन म्हणजे समाज जीवनाच्या भव्य दृष्टिकोनातून लोकांना कायद्याच्या हस्तक्षेपाशिवाय प्रगतीसाठी मोकळे सोडणे होय ! किंवा जर कायदाच करावयाचा असेल तर कायदा करणाऱ्याला अशी खात्री पाहिजे की, कायदा यशस्वी होण्यासाठी समाजामध्ये पुरेसे नैतिक अधिष्ठान आहे. लोकशाहीच्या या पैलूचा ज्याने उल्लेख केला आहे असा माझ्या मताप्रमाणे लास्की हाच एक माणूस आहे, त्याच्या एका पुस्तकात त्याने असे अत्यंत ठामपणे सांगितले आहे की 'लोकशाहीत, नैतिक सुस्थिती नेहमीच ग्राह्य मानावी लागते.' जर नैतिक सुस्थिती नसेल तर लोकशाहीचे आज आपल्या देशात ज्याप्रमाणे होताहेत त्याप्रमाणे तुकडे तुकडे होतील.

निर्देश करण्यासारखा शेवटचा मुद्दा म्हणजे लोकशाहीला 'लोकनिष्ठेची' फार आवश्यकता असते. सर्वच देशामध्ये अन्याय असतो याबद्दल शंका नाही. परंतु त्याची तीव्रता सर्व ठिकाणी सारखीच नसते. काही देशामध्ये अन्यायाची तीव्रता फारच कमी असते आणि दुसऱ्या काही ठिकाणी लोक अक्षरशः अन्यायाच्या ओझ्याखाली चिरडले आहेत. या संदर्भात एखाद्याला इंग्लंडमधील ज्यूंचे उदाहरण नमूद करता येईल. ख्रिश्चनांनी जे अन्याय केले त्यामध्ये ज्यू लोकांना त्यांच्यापासून सर्वात जास्त अन्याय सहन करावा लागला. जे घडले ते मात्र असे की, हा अन्याय दूर करण्यासाठी केवळ ज्यू लोकांनाच संघर्ष करावा लागला. या अन्यायाचे कारणसुद्धा असामान्य होते. आणि ते कारण असे होते की जुन्या ख्रिश्चन कायद्याप्रमाणे मुलांना वडिलांच्या संपत्तीचा वारसा हक्क मिळत नसे. त्याला दुसरे तिसरे काही कारण नसून केवळ ते ख्रिश्चन नव्हते व ज्यू होते हे त्याचे कारण. तेथील राजा राज्यांचा अवशिष्ट मृत्यूपत्राने झालेला वारस होत असल्यामुळे दिवंगत ज्यूची संपत्ती तो स्वीकारीत असे. राजाला या गोष्टी अर्थातच प्रिय होत्या. राजा आनंदी होता. ज्यावेळेस दिवंगत ज्यूंची मुले वडिलांच्या संपत्तीचा वाटा मिळावा म्हणून निवेदन घेऊन राजाकडे जात असत त्यावेळेस राजा त्यांना थोडीशी संपत्ती देत असे व राहिलेली बहुतेक स्वतःकडे ठेवित असे. परंतु मी आपणाला अगोदर सांगितल्याप्रमाणे कोणत्याही इंग्रज माणसाने ज्यूना मदत केली नाही. अशा परिस्थितीत ज्यूनी त्यांचा संघर्ष चालू ठेवला. ज्याला 'लोकनिष्ठा' म्हणतात त्याच्या अभावाचा हा परिणाम आहे. लोकनिष्ठा म्हणजे सर्व अन्यायाच्या विरोधात आंदोलनासाठी उभी राहाणारी कर्तव्यनिष्ठा होय ! कोणावर अन्याय होतोय ही गोष्ट गौण आहे.

याचाच अर्थ असा आहे की, प्रत्येकाने, मग तो त्या विशिष्ट अन्यायाखाली भरडलेला असो अगर नसो, अन्यायाखाली भरडल्या जाणाऱ्या माणसाच्या मुक्तीसाठी मदत करण्याची तयारी केली पाहिजे. विद्यमान काळातील उदाहरण म्हणून साऊथ आफ्रिकेचा आपण विचार करावा. तेथे अन्यायाखाली भरडली जाणारी जनता, अर्थातच भारतीय आहे. खरे आहे ना ? तेथील गोऱ्या लोकांवर अन्याय होत नाही. परंतु असे असूनदेखील एक गोरा माणूस म्हणजे रेव्हरंड स्कॉट हा अन्याय दूर करण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा करीत आहे. नुकतेच मी असे वाचत होतो की तेथील गोऱ्या वंशातील तरूण मुले मुली साऊथ आफ्रिकेतील भारतीय लोकांच्या मुक्ती आंदोलनात सहभागी होत आहेत. यालाच लोकनिष्ठा म्हणतात. आपणाला धक्का बसावा यासाठी मी हे सांगत नाही. परंतु काही वेळा मला असे वाटते की, आपण खरोखरच फार विसराळू आहोत. आपण साऊथ आफ्रिकेतील अन्यायासंबंधी बोलत आहोत. मी स्वतःशीच काही वेळेला या गोष्टीचे आश्चर्य करतो की, विलीनीकरण व अन्य गोष्टींच्या विरोधात बोलणाऱ्या आपणासारख्या लोकांकडे प्रत्येक खेड्यात साऊथ आफ्रिका नाही काय ? आपल्या प्रत्येक खेड्यात साऊथ आफ्रिका आहे. आणि असे असून देखील एखादा सवर्ण जातीतील माणूस वर्गीकृत वर्गाची समस्या घेऊन लढताना मला क्वचितच दिसतो. येथे असे का घडते ? कारण येथे लोकनिष्ठा नाही. ''मी आणि बहुमतवाल्यांचा माझा देश याच एका विश्वामध्ये मी गुरफटलेला आहे.'' जर अशा पद्धतीच्या गोष्टी घडल्या तर अन्यायाखाली चिरडल्या जाणाऱ्या अल्पसंख्यांकांना अन्यायाचे निवारण करण्याच्या हेतूसाठी इतरांच्यापासून मदत मिळणार नाही. याच गोष्टीमुळे लोकशाही धोक्यात आणणारी बंडाची मनोवृत्ती बळावेल.

शेवटी सभ्य गृहस्थहो, आणि महिलांनो, या ठिकाणी मला निमंत्रण देण्यापाठीमागे आपला काय हेतू किंवा प्रेरणा होती याची मला कल्पना नाही. मला या गोष्टीची शंका नाही की ज्या विषयासंबंधी मी आपणासमोर बोललो आहे तो विषय या देशासाठी अत्यंत महत्त्वाचा आहे. आपली सर्वसाधारण धारणा आहे की आपणास स्वातंत्र्य मिळाले आहे. ब्रिटिश निघून गेले आहेत. लोकशाहीला पोषक असे संविधान मिळालेले आहे आणि अर्थातच, आपणास यापेक्षा जास्त काय हवे आहे ? यापेक्षा जास्त काही न करता आपला कार्यभाग संपलेला आहे असे समजून आपण आता विश्रांती घेतली पाहिजे, संविधान तयार झालेले असल्यामुळे आपला कार्यभाग संपलेला आहे अशा प्रकारच्या ' शिष्टपणाच्या ' भावनेविरूद्ध मला आपणास ताकीद देणे भाग आहे. कर्तव्य संपलेले नाही, त्याला आता कुठे सुरूवात झाली आहे. तुम्हाला याचे स्मरण ठेवावे लागेल की, लोकशाहीचे रोपटे सर्वच ठिकाणी वाढत नाही. ते अमेरिकेत वाढले, ते इंग्लंडमध्ये वाढले. काही प्रमाणात ते फ्रान्समध्ये वाढले.

खरोखरच इतर ठिकाणी काय घडले हे पाहाण्यासाठी ह्या उदाहरणातून आपणास काही प्रमाणात धैर्य प्राप्त होईल. तसेच आपणापैकी काही लोकांना हे स्मरण असेल की, पहिल्या महायुद्धाचा परिणाम म्हणून आणि ऑस्ट्रिया-हंगेरिया साम्राज्याचे विभाजन म्हणून विल्सनने स्वयंनिर्णयाच्या आधारावर ऑस्ट्रियापासून स्वतंत्र असे वेगवेगळे छोटे देश निर्माण केले. त्याची सुरवात लोकशाही संविधानाने व लोकशाही शासनाने झाली. आणि त्यांच्या संविधानात मूलभूत अधिकारांचा समावेश देखील होता. हे मूलभूत अधिकार व्हरसाइल्सच्या शांतता तहाने त्यांच्यावर बंधनकारक केले होते. माझ्या मित्रांनो, त्या लोकशाहीचे काय झाले हे आपणास ठाऊक आहे काय ? लोकशाहीचा अंश तरी त्या ठिकाणी पाहावयास मिळतो काय ? त्या सर्व संपलेल्या आहेत. त्या सर्व नष्ट झालेल्या आहेत. काही दुसरी विद्यमान उदाहरणे विचारात घ्या. सिरियामध्ये लोकशाही शासन होते. फारच थोड्या वर्षानंतर तेथे लष्कराची क्रांती झाली. सिरियाचा प्रमुख कमांडर येथील राजा झाला व लोकशाही लोप पावली. दुसरे उदाहरण घ्या. इजिप्तमध्ये काय घडले ? तेथे सुद्धा सन १९२२ पासून सतत ३० वर्षे लोकशाही शासन व्यवस्था होती. परंतु एकाच रात्रीत फरूकला राज्यसत्ता सोडावी लागली व नजीब इजिप्तचा हुकूमशहा झाला. त्याने लगेच तेथील संविधान नष्ट केले.

ही सर्व उदाहरणे आपल्या डोळ्यांसमोर आहेत आणि म्हणून मला असे वाटते की, आपल्या भवितव्यासंबंधी आपण फारच सावध आणि फारच समजुतदार राहिले पाहिजे. आपली लोकशाही सुरक्षित ठेवण्यासाठी आपल्या मार्गातील काही दगडधोंडे व शिला दूर करण्याच्या कामी आपण काही ठाम कार्यक्रम घेणार आहोत किंवा नाही याचा आपणास गंभीरपणे विचार करावा लागेल. मी आपणासमोर मांडलेल्या काही विचारांमुळे आपणामध्ये जर काही जागृती निर्माण झाली असेल व या समस्यांबाबत आपण गाफील राहून चालणार नाही असे आपणास वाटत असेल तर माझे कर्तव्य मी पार पाडले आहे असे मला वाटते.'' [१]

'' भाषणानंतर काही जणांनी प्रश्न विचारले. बाबासाहेब आंबेडकरांनी त्यांना उत्तरे दिली.'' [२]



---

[१] यशस्वी संसदीय लोकशाहीच्या प्राथमिक शर्ती : अनुवादक सचित तासगावकर.

[२] जनता : २७ डिसेंबर १९५२.

# ३०१

# स्त्रियांनी आपल्या हक्कांसाठी मनोदौर्बल्य टाकून, कंबर कसून पुढे आले पाहिजे

तारीख २५ डिसेंबर १९५२ रोजी कोल्हापूर येथे कोल्हापूरातील स्त्रियांच्या निरनिराळया नऊ संस्थांतर्फे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना तेथील राजाराम चित्रपटगृहात मोठ्या थाटाने मानपत्र अर्पण करण्यात आले व त्यांनी स्त्रियांच्या विनंतीवरून आपल्या हिंदू कोड बिलात स्त्रियांना कोणकोणते हक्क दिले होते व काय तरतुदी केल्या होत्या याविषयी थोडक्यात पण सुबोध रीतीने विवेचन केले. या समारंभास असंख्य स्त्रिया व कित्येक पुरूषही हजर होते.

सुरूवातीस सुरेल असे महाराष्ट्र गीत झाल्यानंतर सौ. विमलाबाई बागल यांनी प्रास्ताविक भाषण केले त्यावेळी त्यांनी डॉ. आंबेडकरांचे हिंदू कोड बिल बारगळल्याबद्दल खेद व्यक्त करून सांगितले की, ते बिल होईपर्यंत आपण स्त्रियांनी डॉ. आंबेडकरांच्या पाठिशी राहिले पाहिजे.

त्यानंतर त्यांनी मानपत्र वाचून दाखवून ते अर्पण केले, तसेच करवीर भगिनी मंडळ, शुक्रवार पेठ भगिनी मंडळ, महिला सेवा मंडळ, वनिता समाज, नामदेव महिला मंडळ, शारदा भगिनी मंडळ, स्त्री मंडळ, शिवाजी पेठ भगिनी मंडळ, मराठा महिला मंडळ या संस्थांतर्फे डॉ. आंबेडकरांना पुष्पहार घालण्यात आले. मेजर दादासाहेब निंबाळकर यांनीही डॉ. बाबासाहेब व सौ. माईसाहेब आंबेडकर यांना हार घातले.

त्यानंतर उत्तरदाखल भाषण करताना डॉ. आंबेडकर म्हणाले,

आजच्या जगात संपत्तीच स्वातंत्र्याचा आधारस्तंभ आहे. जोवर स्त्रियांना संपत्तीचा वारसा मिळत नाही, तोवर त्यांची गुलामगिरी संपणार नाही. त्यादृष्टीने हिंदू कोड बिलात मी तरतूदही केली होती. पण ते बिल मंजूर होऊ शकले नाही. यापुढे आता येणारे बिल कोणत्या स्वरूपात येते व त्यात स्त्रियांच्या स्वातंत्र्याची, हक्कांची काय तरतूद आहे याकडे महिला वर्गाने फार बारकाईने पाहिले पाहिजे. इतकेच नव्हे तर आपल्या हक्कांसाठी झगडण्यास त्यांनी आपले मनोदौर्बल्य टाकून कंबर कसून पुढे आले पाहिजे, तरच त्यांची सुधारणा व प्रगती होईल. एखाद्या स्त्रीने दुधात विरजण घालून ठेवावे आणि तिला ते विरजण

---

जनता : ३ जानेवारी १९५३.

शेवटी नासले असल्याचे दिसावे, तशी स्थिती माझ्या हिंदू कोड बिलाची झाली आहे. मी चार वर्षे खर्डेघाशी करून ज्या स्वरूपात ते बिल तयार केले होते त्याच स्वरूपात आता नवीन बिल येईल की नाही, हे सांगता येणार नाही. पण त्यात आमूलाग्र बदल होईल असे मात्र खात्रीने वाटत नाही. माझ्या बिलाच्या टीकाकारांनी ते हिंदू धर्मशास्त्रास सोडून आहे अशी टीका केली. पण तसे म्हणणाऱ्यांना माझे आव्हान आहे, की मनुस्मृतीचा आधार नाही असे त्यात कोणते कलम आहे, ते त्यांनी दाखवून द्यावे.

तसेच स्त्रियांना घटस्फोटाची तरतूदही त्यात करून दिली होती. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या त्रैवर्णिक समाजाखेरीज बाकीच्या समाजात घटस्फोटाची म्हणजे काडीमोडाची चाल चालूच आहे. ही चाल असणारे ९० टक्के शूद्र या भारतात आहेत. पण कायद्यामध्ये घटस्फोटाची तरतूद करू लागताच उपरोक्त त्रैवर्णियांनी माझ्यावर टीकेचे काहूर उठविले.

त्या बिलात स्त्रियांच्या हिताच्या दृष्टीने सर्व बाबींची तरतूद आहे, त्यातील काही महत्त्वाच्या बाबी आहेत, लग्नात किंवा दत्तक घेण्याच्या बाबतीत जातीभेदाचे बंधन नसावे हे मुख्य तत्त्व मांडले होते. त्याचा अर्थ असा नव्हे की, जबरदस्तीने आंतरजातीय विवाह व दत्तक व्हावेत. एकमेकांवरील प्रेमामुळे जर कोणाला आंतरजातीय विवाह करावयाचा झाला किंवा परजातीतील मुलगा दत्तक घ्यावयाची इच्छा झाली तर तसे करण्यास स्मृतीमुळे ती बंदी होती, ती या बिलाने काढून टाकली होती.

'नवरा हाच देव' मानणाऱ्या आर्य स्त्रिया आहेत. नवऱ्याने कसेही वागविले, तो कसाही व कितीही वाईट असला, त्याच्याशी जीवन कंठणे कितीही कष्टमय झाले तरी आर्य स्त्री आपल्या जुन्या शास्त्रानुसार त्याला सोडून जाऊ शकत नाही. नवऱ्याला मात्र मुभा आहेत. म्हणून ज्या स्त्रीला आपल्या नवऱ्याबरोबर संसार करणे बरे वाटणार नाही, तिला घटस्फोट घेण्याची या बिलाने मुभा देण्यात आली होती.

त्याचप्रमाणे स्त्री-धनाच्या तरतुदी केल्या आहेत. नवरा मेल्यानंतर त्याच्या ईस्टेटीची मालकी त्या स्त्रीला मिळण्यास आजवर बंधने होती, ती मी काढून टाकली होती. नवऱ्याच्या मालमत्तेची पूर्ण मालकी त्याच्या पत्नीलाच मिळाली पाहिजे. तसेच एखादी स्त्री वारल्यास तिच्या मुलीलाच मिळाली पाहिजे हा माझा हटवाद आहे. बाप मेल्यावर भाऊ-भाऊ बापाच्या संपत्तीची वाटणी करून घेतात, त्या भावाबरोबर त्यांच्या बहिणीलाही का वाटणी मिळू नये ?

स्त्रियांच्या सर्वस्वी हिताचे हे बिल मंजूर करण्यासाठी स्त्रियांनी काहीच हालचाल केली नाही ही खेदपूर्वक बाब आहे. मी पुरूष असून देखिल स्त्रियांच्या हितासाठी भांडलो, पण स्त्रियांनी का उत्सुकता दाखविली नाही हे समजत नाही. या बिलाला पाठिंबा देण्याची गोष्ट तर बाजूलाच राहो, पण काही स्त्रियांनी माझ्याकडे येऊन ते बिल चांगले नाही असे मला सांगण्याचा प्रयत्न केला. मी दिल्लीत असताना तर काही प्रमुख स्त्रियांचे शिष्टमंडळच माझ्याकडे आले. त्यांना मी, ' ते बिल वाचले का ? ' म्हणून विचारले तर त्यांनी ते वाचले नाही असे सांगितले, न वाचताच का विरोध करता असे त्यातील मुख्य स्त्रीला बोलावून विचारता ती म्हणाली ' माझ्या नवऱ्याने मला सांगितले की, तू त्या बिलाला विरोध कर, नाही तर मी दुसरी बायको करून घेतो.' म्हणून सवत पत्करण्यापेक्षा बिलालाच विरोध करणे मला भाग आहे. पण स्त्रियांची मानसिक दुर्बलता आहे. त्यांच्या या दुर्बलतेमुळेच या बिलाचा घात झाला. स्त्रियांच्या पायात ताकद असती तर ते बिल बारगळले नसते. पार्लमेंटमध्ये निवडून आलेल्या स्त्रियांनी देखील या बिलाबाबत काही जागरूकता दाखविली नाही. त्या स्त्री-सभासदांचे सारे लक्ष युनो, आय. एल. ओ., कोरिया या गोष्टीकडेच लागलेले असायचे ! माझ्या बिलाला पाठिंबा देण्यास त्या तयार दिसल्या नाहीत. कारण त्यामुळे पंतप्रधान नाखुष होतील व आपल्याला युनोत किंवा दुसरीकडे कोठे जाण्यास संधी मिळणार नाही याची त्यांना भीती वाटते. अशा प्रकारच्या लोभी वृत्तीनेच आपल्या देशाचे नुकसान होत आहे. सार्वजनिक व राजकीय क्षेत्रात कार्य करणारा हरेक मनुष्य आज आपल्याला कमिश्नर होता येईल काय किंवा अमुक जागा मिळेल काय या लोभाने धडपडत असतो. स्त्रियात हा दोष मला फार दिसतो. स्त्रियांच्या मनावर परंपरेचा पगडा जास्त असतो. त्यामुळे त्यांच्यात हे मनोदौर्बल्य आहे हे त्यांनी काढून टाकले पाहिजे.

इंग्लंडमधील स्त्रियांनी मतदानाचा हक्क मिळविण्यासाठी चळवळी केल्या आहेत. त्याचप्रमाणे स्त्रियांना आपली सुधारणा होण्यासाठी, आपल्याला स्वातंत्र्य मिळण्यासाठी जर हे बिल यावे असे वाटत असेल तर त्यासाठी त्यांनी चळवळ केली पाहिजे. त्याखेरीज स्त्रीवर जुलूम करणारा पुरुष तिची सुधारणा करणार नाही. इंग्लंडमधील स्त्रिया आपल्या इच्छेप्रमाणे घटस्फोट घेऊन स्वतंत्र जीवन जगू शकतात. याचे मूळ कारण त्यांना संपत्तीचा वारसा हक्क असतो हे आहे. तसेच मलबारी समाजात गेल्या ५०-६० वर्षापासून घटस्फोट फारसे

होतच नाहीत याचे कारण तेथे स्त्रीलाही वारसा हक्क आहे. त्यामुळेच पुरूष तिच्याशी चांगल्या प्रकारे वागतो. म्हणून पुरूषांप्रमाणेच आपल्यालाही वारसा हक्क मिळावा यासाठी स्त्रियांनी चळवळ सुरू करावी, घरात बसून किंवा सभा, संमेलने व ठराव करून या गोष्टी होणार नाहीत. त्यासाठी स्त्रियांनी स्वतः चळवळ करण्यास पुढे यावे.

हिंदु कोड बिलाची मुहूर्तमेढ १९३९ साली रोवली गेली व तेव्हापासून गेली अकरा वर्षे त्या बिलाच्या स्वरूपावर चर्चा चालू असताना पुनः त्या बिलाचे विभाग पाडून जनतेपुढे त्याच्या वावड्या का उडविल्या जात आहेत हे समजत नाही.

आपण येणाऱ्या बिलातील प्रत्येक कलम नीट तपासून पाहा. निव्वळ आंतरजातीय विवाहाचे कलम पाहून चालणार नाही. तेवढेच कलम नवे व बाकीचे कायदे जुनेच राहिले तर अनर्थ ओढवतील. आंतरजातीत स्त्री-पुरुषापासून झालेल्या संततीस आपल्या जुन्या शास्त्राप्रमाणे संपत्तीची मालकी मिळत नाही, म्हणून अशी संतती कायदेशीर ठरवून तिला मालकी देण्याची तरतूदही कायद्यात करून घेतली पाहिजे.

या बिलासाठी स्त्रियांना कळकळीचा पुन्हा एकवार आदेश देऊन त्यांनी आपले भाषण संपविले.

शेवटी सौ. उर्मिलाबाई सबनीस यांनी आभारप्रदर्शन करून ज्या छत्रपती ताराबाईने करवीर राज्य स्थापन केले, त्या करवीरच्या महिला चळवळीत आघाडीवर राहातील असे सांगितले.



# ३०२
# लोकात तेज व जागृती उत्पन्न होईल असे राजकारण हवे

दिनांक २५ डिसेंबर १९५२ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी कोल्हापूर येथील नगरपालिकेला भेट दिली. सुरवातीस नगराध्यक्ष श्री. भाऊसाहेब पाटील यांनी प्रास्ताविक भाषण करून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या कार्याविषयी धन्योद्‌गार काढले आणि नगरपालिकेची माहिती दिली.

त्याप्रसंगी बोलताना डॉ. आंबेडकर म्हणाले,

भयभीताचे राजकारण आज चालणार नाही. आपल्याला जे पटते, ते उघडपणे मांडले पाहिजे. त्यात सोंग वा ढोंग किंवा लपवाछपवी नको. ज्या राजकारणामुळे लोकात तेज व जागृती उत्पन्न होईल असे राजकारण हवे. कोल्हापूरच्या जनतेत अग्नी आहे पण तो वारंवार फुलवला पाहिजे, नाहीतर अग्नी आहे त्याच स्थितीत राहिल्यास राख होऊन तो खलास होईल, तसेच तुम्हाला ज्या मार्गानी जायचे त्या मार्गाने निधडेपणाने जावे, सरकारच्या कायद्याची वा तुरूंगाची भीती बाळगू नका. तुरूंगात घातले तर त्यात वाईटही वाटून घेण्याचे कारण नाही. जो प्रतिबंधक स्थानबद्धतेचा कायदा मी केला आहे, त्याखाली हे सरकार उद्या मलादेखील अडकवून ठेवील. पण त्याची खंत बाळगण्याचे कारण नाही. कारण राजकारण हा क्रिकेटचा खेळ आहे. त्यात पराभूत झालेला जिंकणारच नाही कशावरून ? पण पराभूत झालेल्याने निराश होऊन सामना गुंडाळून बसता कामा नये.

आज वरच्या वर्गातील लोकांच्या हाती सत्ता आलेली असून ते अशा भ्रमात आहेत की, इंग्रज गेले, आता राज्यकर्ते आम्हीच, पण ते ज्या खुर्चीवर डौलाने बसू इच्छितात त्या खुर्चीचे पाय कापल्याशिवाय खालचा समाज केव्हाही राहाणार नाही, वरच्या वर्गीयांना खालच्या वर्गीयांचे राज्य यायला नको आहे पण ते आल्याशिवाय राहाणार नाही. त्यासाठी रशिया, फ्रान्स देशाप्रमाणे क्रांतीही होईल.

सदर कार्यक्रमाच्या आधी कोल्हापूर जिल्हा शे. का. फेडरेशनतर्फे म्यु. च्या सभागृहात डॉ. आंबेडकरांना थाटाचा अल्पोपहार देण्यात आला. त्यावेळी शहरातील अनेक प्रमुख नागरिक, स्त्री-पुरूष हजर होते.



---

जनता : ३ जानेवारी १९५३.

# ३०३

# भारतात प्रत्येक खेड्यात दक्षिण आफ्रिका आहे

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी दिनांक २५ डिसेंबर १९५२ रोजी निपाणी (जिल्हा बेळगाव) येथे दक्षिण महाराष्ट्राच्या दौऱ्यावर असताना भेट दिली.

तेथील सभेला संबोधित करताना ते म्हणाले,

भगिनींनो आणि बंधुंनो,

दक्षिण महाराष्ट्रात दौऱ्यावर येण्याचे बऱ्याच दिवसात घाटता घाटता आज तो योग आला. मी तुमच्या भागात आलो किंवा न आलो याबद्दल तुम्ही दिलगीर असता कामा नये. मी कुठेही असलो तरी आपल्या भोवतीचा आपल्या प्रश्नाचा आपणच कळकळीने विचार केला पाहिजे. कारण आपले प्रश्न स्वतःलाच अधिक तातडीने सोडवता येतात.

१८८५ साली काँग्रेस स्थापन झाली. पण आम्ही काँग्रेसच्या चळवळीपासून चार पावले दूरच राहिलो. कारण ही चळवळ आमच्यावर सामाजिक गुलामगिरी लादणाऱ्या ब्राह्मणवर्गाची होती. काँग्रेसची ही संघटना ब्राह्मणांचीच संघटना होती हे आम्हाला कळून चुकले होते आणि पेशवाईतील ब्राह्मणांची नीती आम्हाला चांगलीच ज्ञात आहे. पगड्या पाहून निवाडा करणाऱ्या या समाजसुधारकात आम्ही शिरलो असतो तर आम्हाला यांनी ओसरीच दिली असती. दिवाणखान्यात शिरता आले नसते. काँग्रेसला स्वराज्य हवे होते ते ब्रिटिश आमदानीत हरवलेले आपले स्वत्व टिकविण्यासाठी ! पण मराठेसुद्धा त्यावेळी काँग्रेसच्या चळवळीत नव्हते. काँग्रेस ब्राह्मणांची होती तेव्हा त्याकाळचे मराठा पुढारी घाबरले होते. आमचे कसे होईल अशी त्यांना भीती होती. त्यांनी एक परिषद बोलावून आपल्या मराठा वर्गाला राखीव जागा द्याव्यात अशी मागणी केली. त्याप्रमाणे त्यांना ७ जागा राखीव मिळाल्या. त्यांनी सर्व ब्राह्मणेतरांची एक संघटना केली. पुढे हे सर्व ब्राह्मणेतर आपणाला सोडून काँग्रेसमध्ये शिरले. कारण गांधीजींनी ही मूस फोडून टाकिली व मराठा पुढाऱ्यांना आमिषे दाखविली. त्या आमिषांना भाळून ते काँग्रेसमध्ये शिरले.

---

जनता : ३ जानेवारी १९५३.

त्याचप्रमाणे आमच्यातले चांभार बंधु आपला फायदा करण्याकरिता कॉंग्रेसमध्ये शिरले. स्वराज्यामध्ये आपल्याला एकंदर २७ राखीव जागा मुंबई राज्याकरिता मिळालेल्या आहेत. त्यात २५ कॉंग्रेसी चांभार निवडून आले. त्यांनी आतापर्यंत एक प्रश्नसुद्धा अस्पृश्यांविषयी लोकसभेमध्ये किंवा असेंब्लीमध्ये विचारला नाही.

एका सिंहीणीला दोन पिल्ले झाली. त्यांना सोडून ती सिंहीण रानात भटकण्याकरिता गेली. तिला जवळ दोन कोल्ह्यांची पिल्ले दिसली. तिने ती पिल्ले उचलून आपल्या पिल्लात आणली. त्या पिल्लांना ती आपल्या पिल्लाबरोबर दूध पाजीत असे. ती सर्व पिल्ले मोठी झाल्यावर एकदा कडेला उभी होती. तिकडून एक हत्ती मान डोलवीत चालला होता. तो जवळ येताच कोल्ह्याची पिल्ले घाबरून पळून गेली. तेव्हा सिंहीणीच्या पिल्लांना संशय आला. त्यांनी हा प्रश्न आईला विचारला. संशयास बाध येऊ नये म्हणून त्या कोल्ह्याच्या पिल्लांना तिने नेऊन सोडून दिले.

ही गोष्ट सांगण्याचा मतलब एवढाच की, आपण गेल्या निवडणुकीत पराभूत झालो नाही. आपल्या लोकांनी स्वतः पायी येऊन मतदान केले. मी असे आव्हान देतो की, ज्यांना असे वाटते की आमच्या लोकांनी आम्हाला मते दिली नाहीत त्यांनी हे खरे करून दिले आणि ते खरे ठरले तर मी राजकारणातून बाहेर निघून जाईन.

आता आपण एकटे राहिलो. आपण अल्पसंख्यांक लोक आहोत. आपण ताकदीप्रमाणे पराक्रम करीत आलोत. दुसऱ्याशी हात मिळवणी झाली तर आपण राज्य मिळवू. पण निराश होण्याचे कारण नाही. आजचे कॉंग्रेस सरकार, ब्राह्मण व मराठे एक तोबरा, दोन माना ह्याप्रमाणे चालले आहे. पण चणा कोण खातो हे पाहावयाचे आहे. मराठ्यांचा घोडा नवीन आहे. दुसऱ्या वेळेस मराठे सर्वच चणे खातील. पुढे ब्राह्मणांना काहीच उरणार नाही व ते परत आपणाकडे फिरतील. मराठ्यांना नळी मिळाली, आमचा ' घुडसा ' आहेच ; ही काही आपुलकीची भावना नाही. ह्याच्यामुळे पेशवाई येईल. आमचे सरकार घटनेप्रमाणे दिलेल्या सवलती काढून घेणार आहे. पं. नेहरूने नागपूरच्या ' हरिजन ' परिषदेमध्ये भाषण केले. त्यात अस्पृश्यांना आता सवलतीची काही गरज नाही, त्यांची सुधारणा झाली आहे, असे म्हटले. मला वाटते ह्या नेहरूला ठाण्याच्या वेड्याच्या हॉस्पिटलमध्ये ठेवण्यासारखे आहे. ज्यांना आपल्या देशातील लोकांची परिस्थिती माहीत नाही त्याला पंतप्रधान निवडावे हे देशाचे दुर्दैव होय. याप्रमाणे आपल्याला मिळालेल्या सवलती काढून घेण्यात येत आहेत.

ह्या आमच्या पंतप्रधानांना दक्षिण आफ्रिकेचा प्रश्न डोळयासमोर दिसतो. भारतात प्रत्येक खेड्यात दक्षिण आफ्रिका आहे. दक्षिण आफ्रिकेचा प्रश्न वर्णभेदाचा आहे. त्यांच्याकरिता तेथील ब्रिटिश लोक हिरीरीने भाग घेत आहेत पण हे आमच्या प्रश्नाला मात्र कलाटणी देण्यास तयार होतात. तेव्हा ह्या पंतप्रधानांना शहाणा म्हणावे की वेडा म्हणावे हा आमच्यापुढे प्रश्न आहे. पेशव्यांचे सरदार बापू गोखले यांनी मुसलमानांवर स्वारी केली. त्यात सिदनाक महार सरदार होता. त्याचा तंबू पेशव्यांच्या जवळ असे. त्याचा तंबू ठोकीत असताना पेशव्यांच्या लोकानी अडथळा केला. बातमी त्यांना कळली. त्यावेळेस दरबार भरला होता. सिदनाक महाराने आपली तलवार खाली ठेवली व जाण्यास निघाला. तेव्हा हंबीरराव मोहिते ताडकन उठला आणि म्हणाला, ही लग्नाची पंगत नाही, वीरांची पंगत आहे. येथे कोणताच भेदभाव नाही. यामुळे आम्हाला राजकारणात वरचा वाटा पाहिजे. मी जर आजपर्यंत काँग्रेसमध्ये असतो तर नेहरू पंतप्रधान झाला असता काय ? मुळीच नाही. मी झालो असतो.

आमच्या फेडरेशनमध्ये बरेच बाजारबुणगे जमा झाले आहेत. ज्यांना फेडरेशन सोडावयाची असेल त्यांनी आताच तिथून चालते व्हावे. त्यांना तीत जागा नाही. दोन दगडावर पाय ठेवू नये, फेडरशेनचे झाड लवकर फळ देणार नाही. त्याला फळे उशिरा येणार आहेत, पण ती चिरकाल टिकणारी आहेत. जे झाड लवकर येते व फळ लवकर लागतात ते झाड लवकर लयास जाते. असले झाड आमच्या उपयोगाचे नाही. तेव्हा ज्यांना लवकर फळ पाहिजेत त्यांनी तिकडे जावे.

आमच्या लोकांनी आजपर्यंत हालअपेष्टा सहन केल्या, त्यांच्याकरिता मला काहीतरी करावयाचे आहे. त्यांना मला वाऱ्यावर सोडून द्यावयाचे नाही. आमच्या कार्यकर्त्यांना आरामखुर्चीचे राजकारण करावयाचे नाही. पुढे पुढे लोखंडाचे चणे खावे लागतील. तेव्हा ज्यांना हे पचणार नाही त्यांनी निमूट निघून जावे. मला फेडरेशनमध्ये थोडे लोक असलेले चालतील. ज्यावेळेस मी चळवळ सुरू केली त्यावेळेस मी, अध्यक्ष आणि टेबल एवढेच होतो ! त्याच्यावरून मी हताश झालो नाही. जरी ह्या निवडणुकीमध्ये आपला पराजय झाला, तरी आपण निराश होता कामा नये. आपली चळवळ जिवंत ठेवा. वेळ आल्यास मी तुम्हाला हाक मारीन आणि तुम्ही हाकेला ओ द्या.

● ● ●

# ३०४

# आपल्यावर होणाऱ्या अन्याय-अत्याचारांचा प्रतिकार दलित प्राणपणाने करतील

नवी दिल्ली येथे दिनांक २९ जानेवारी १९५३ रोजी गुरू रविदास यांच्या ५५५ व्या जयंतीचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला. या कार्यक्रमाला मोठा जनसमुदाय हजर होता.

त्या प्रसंगी बोलताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

गुरू रविदास हे तेराव्या शतकात होऊन गेले. त्यांनी दलित जनतेच्या उद्धारासाठी खूप परिश्रम केले. दलित जनतेवर होणारा अत्याचार, अन्याय जर इतःपर थांबला नाही तर दलित जनता प्रसंगी देशाच्या हिताहिताचा विचार न करता आपल्यावरील अन्याय प्रतिकारासाठी पुढचं पाऊल टाकील. दलित जनतेच्या हक्कांवर दिवसेंदिवस अतिक्रमण होत असून त्यांच्यावरील अन्याय वाढत चालला आहे. ही स्थिती जर वेळीच थांबली नाही तर स्वोद्धाराचा स्वतंत्र मार्ग आम्हाला चोखाळावा लागेल. आमच्या हितरक्षणासाठी आम्ही धीट व समर्थ नाही असा जर तुमचा समज होत असेल तर तो चुकीचा आहे.



---

जनता : ३१ जानेवारी १९५३.

३०५

# बुद्ध तत्त्वज्ञानामुळे जग युद्धापासून दूर व शांततेच्या जवळ जाईल

नवी दिल्ली येथे रविवार तारीख १५ फेब्रुवारी १९५३ रोजी इंडोजपानी सांस्कृतिक संघटनेचे चिटणीस श्री. मूर्ती व त्यांच्या पत्नी यांचा श्री. राजभोज यांनी सत्कार केला. या सत्काराला पूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर, सौ. माईसाहेब आंबेडकर, रोहिणीकुमार चौधरी, ज. भोसले, आमदार कृष्णा व इतर पंधरा-वीस आमदार हजर होते. या प्रसंगी भाषण करताना श्री. बापूसाहेब राजभोज यांनी जपानमधील आपल्या दौऱ्याची थोडक्यात हकीकत सांगितली व तेथे बौद्धधर्माच्या विकासाचे आपल्याला जे दर्शन घडले त्याचेही वर्णन केले. श्री. मूर्ती व त्यांची संघटना यांचे आपल्याला अनमोल सहाय्य झाले याबद्दल त्यांनी कृतज्ञताही व्यक्त केली.

यावेळी पूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी एक छोटेसे व विचार परिप्लुत असे भाषण केले. ते म्हणाले,

जगापुढे विशेषतः आशिया खंडापुढे आज दोनच मार्ग उपलब्ध आहेत. एक बुद्धाचा मार्ग व दुसरा मार्क्सचा मार्ग. बुद्धाच्या तत्त्वज्ञानाचा वेळीच जगाने स्वीकार केला नाही तर, कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाचा विजय होणे अपरिहार्य आहे. बुद्धाचे तत्त्वज्ञान हाच जगाला एकमेव आधार आहे व त्याचा जेवढा प्रचार होईल तेवढे जग युद्धापासून दूर व शांततेच्या नजिक जाईल.

पूज्य बाबासाहेब आंबेडकर यांच्या भाषणाचा तेथे जमलेल्या लोकांवर अत्यंत परिणाम झाला व बौद्ध तत्त्वज्ञानाबद्दल एक नवीनच दृष्टी घेऊन त्यांच्यापैकी काहीजण बाहेर पडले.



---

जनता : १४ मार्च १९५३.

# ३०६

# संघटनेची ताकद प्रामाणिकपणा, एकनिष्ठता आणि शिस्तपालनावर अवलंबून

शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या कार्यकारिणीची बैठक बुधवार ता. २५ आणि गुरुवार, तारीख २६ मार्च १९५३ रोजी २६ अलीपूर रोड, दिल्ली येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर ह्यांच्या निवासस्थानी भरली होती. फेडरेशनचे अध्यक्ष श्री. एन. शिवराज ह्यांची प्रकृती बरी नसल्याने ते दिल्लीस येऊ शकले नाहीत म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकर ह्यांच्या अध्यक्षतेखाली बैठकीचे कामकाज चालले.

बैठकीस खासदार बापूसाहेब राजभोज, सरचिटणीस, श्री दादासाहेब गायकवाड (मुंबई), श्री तिलकचंद कुरील (उत्तर प्रदेश), आमदार ए. रत्नम (मद्रास), आमदार पी. एम. स्वामीदोराई (म्हैसूर), श्री. दशरथ पाटील, श्री. हरदास आवळे व श्री. रेवाराम कवाडे (मध्य प्रदेश), श्री. गंगाराम (मध्यभारत), सरदार हरवन्त सिंग (पंजाब), आमदार मियासिंग गिल (पेप्सू), मिल्कीराम (जम्मू व काश्मीर), श्री. बाल मुकुंद (पंजाब) आणि स्वामी दर्शनानंदजी (दिल्ली) आदि सभासद व निमंत्रित हजर होते.

डॉ. बाबासाहेब बैठकीस मार्गदर्शन करताना म्हणाले,

दलित समाजाची उन्नती केवळ दलित समाजाच्या संघटनेच्या ताकदीवर अवलंबून आहे. दलित समाजास घटनेनुसार सरकारकडून ज्या सवलती मिळाल्या आहेत त्या कायम स्वरूपाच्या नाहीत! आज ना उद्या त्या काढून घेतल्या जाणार. तेव्हा ह्या सवलतीवर, सरकारच्या 'कृपाळू' वृत्तीवर अवलंबून राहून दलित समाजाची उन्नती होणार नाही. त्यासाठी खंबीर, भरभक्कम, देशव्यापी अशी संघटनाच पाहिजे आणि म्हणून त्या कार्याकडेच आता दलित फेडरेशनच्या सर्व कार्यकर्त्यांनी आपले लक्ष केंद्रीभूत केले पाहिजे. समाजाच्या प्रत्येक घटकाशी निकटचे संबंध आणून फेडरेशनच्या झेंड्याखाली त्यास आणावयाचे हा निर्धार करूनच कामास लागा; त्याशिवाय दलित समाजास आता दुसरा तरणोपाय नाही.

---

जनता : १४ एप्रिल १९५३.

शिस्त आणि प्रामाणिकपणा ह्या दोन गोष्टींची कार्यकर्त्यांमध्ये विशेष जरूरी आहे. फेडरेशनच्या धोरणाविरुद्ध उघडपणे वा गुप्तपणे काम करणाऱ्यास फेडरेशनमध्ये स्थान नाही. तसेच, संघटनेची ताकद ही केवळ सभासदांच्या संख्येवर अवलंबून नसून सभासदांच्या प्रामाणिकपणावर, संघटनेशी एकनिष्ठतेवर आणि शिस्तपालनावर अवलंबून असते. फेडरेशनचे धोरण ज्यांना पसंत नसेल त्यांनी खुशाल फेडरेशनमधून जावे; ज्यांना फेडरेशनमध्ये राहावयाचे असेल त्यांनी मात्र पक्षाची शिस्त मोडता कामा नये आणि इतर राजकीय पक्षांशी वा गटांशी फेडरेशनच्या धोरणाविरुद्ध जाऊन एकजुटिची अगर कराराची बोलणी करता कामा नयेत; तसेच त्यांनी आपल्या प्रत्येक व्यवहारात फेडरेशनशी प्रामाणिक आणि एकनिष्ठ राहिले पाहिजे.



# ३०७

# मी माझे आयुष्याचे शेवटचे दिवस बुद्ध धर्माच्या प्रचारातच व्यतीत करण्याचे ठरविले आहे

दिनांक २७ मे १९५३ रोजी बुद्ध जयंती निमित्त सकाळी ८ वाजता वरळी, आंबेडकर मैदानावर डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामुदायिक प्रार्थना कशी करावी याचे मार्गदर्शन करणार आहेत आणि सायंकाळी ५ वाजता नरेपार्क, परेल (जी. आय. पी. रेल्वे वर्क शॉप समोरील मैदान) येथे त्यांचे जाहीर व्याख्यान होईल असे दि. २३ मे १९५३ च्या जनतेत श्री. आर. डी. भंडारे, सेक्रेटरी, बौद्ध धर्म प्रचार समिती यांनी जाहीर केले होते.

त्यानुसार मुंबई नरेपार्क येथे दिनांक २७ मे १९५३ रोजी सायंकाळी या कार्यक्रमाला प्रचंड जनसमुदाय होता. प्रथम श्री. आर. डी भंडारे यांनी भ. बुद्धाच्या फोटोला हार अर्पण केला. त्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

भगिनींनो आणि बंधुजनहो,

आपण आज सर्वजण बुद्ध जयंती निमित्ताने एकत्र आलो आहोत. आज या ठिकाणी जी बुद्ध जयंती साजरी होत आहे तशी ती अनेक ठिकाणी साजरी होत असली तरी येथील जयंतीला विशेष महत्त्व आहे. बुद्ध जयंतीचा दिवस हा सुट्टीचा दिवस मानला जावा म्हणून मी सन १९४२ सालापासून सरकारकडे मागणी करीत होतो. मध्यंतरीच्या काळात मंत्रीमंडळात असतानाही मी बुद्ध जयंतीची सुट्टी मिळावी म्हणून प्रयत्न करीत होतो. परंतु माझे मनोरथ पूर्ण होऊ शकले नाही. त्यावेळचे गृहमंत्री श्री. मॅक्सवेल यांचीही बुद्ध जयंतीची सुट्टी असावी अशी मनीषा होती. परंतु लढाईच्या काळामुळे ती सफल होऊ शकली नाही. बुद्ध जन्मदिनाची सुट्टी जर जाहीर केली तर आपणास युद्धासाठी मुसलमानांपासून मिळत असलेली मदत मिळणार नाही, या विवंचनेत ते होते. त्यानंतर मला पुन्हा काँग्रेस मंत्रीमंडळात घेतले गेले. मंत्रीमंडळात गेल्यानंतर ही माझी जी मागणी होती ती श्री. पंडित जवाहरलाल नेहरुंनी तरी मान्य करावी म्हणून मी त्यांच्या खूप पाठिशी लागलो. माझ्या या मागणीला महाबोधी सोसायटीचे अध्यक्ष डॉ. शामाप्रसाद मुखर्जी यांनीही साहाय्य

---

जनता : ३० मे १९५३.

केले. तेहतीस कोटी हिंदुंच्या जन्म दिवसास सुट्टी, मुसलमान, पारसी, जैन. खिस्ती या धर्मातील देवांच्या जन्म दिवसास सुट्टी मिळते. मग बुद्ध जयंतीस का नको ? एकतर या सर्व सुट्यातून एखादी कमी करून ती आम्हास द्या अगर एक सुट्टी जास्त वाढवा, अशी मागणी मी श्री. नेहरूंकडे केली. पं. नेहरूंना बुद्धाबद्दल बराच आदर आहे. सुदैवाने नेहरू सरकारने बुद्ध जयंतीची सुट्टी चालू वर्षापासून जाहीर केली. परंतु आपल्या मुंबई सरकारने तिला हरताळ फासला. आपले मुंबई सरकार खूप सुसंस्कृत आहे. मुंबई सरकार कल्चरच कल्चर आहे. वाटल्यास तुम्ही त्यास 'ॲग्रीकल्चर' म्हणा. अशा या सरकारने सुट्टी न दिल्यामुळे पाच वाजता होणारी ही सभा साडेसात वाजता होत आहे.

बुद्धाचे नाव काढले की ज्या हिंदू लोकांना एक प्रकारची भीती वाटत होती व आपणावर कोणी बॉंब तर टाकीत नाही असे वाटत होते; त्यांच्यामधील कैक लोकात सुज्ञानपणा येऊन ते आज बुद्धाचा गौरव करू लागले आहेत. मी काही एखादा भविष्यवादी नाही व पुढे काय होईल हे सांगू शकत नाही, पण एक गोष्ट मात्र निश्चित सांगू शकतो की, बुद्धाचा धर्म या पृथ्वीतलावर पुन्हा अवतीर्ण होईल. तो कोणत्या मार्गाने येईल हे आज सांगता येत नाही.

मी एक बौद्ध धर्माचा उपासक आहे. मी नुसताच बोध घेतलेला नाही व नुसते बोलतो असे नाही तर प्रत्यक्ष कृती करून दाखवीन. माझे शेवटचे आयुष्याचे दिवस आता बुद्ध धर्माच्या प्रचारातच खर्च करण्याचे मी निश्चित ठरविले आहे. मी हे बुद्ध धर्म प्रचाराचे शेत पेरणार आहे व त्यात कोणते पीक येते हे पाहाणार आहे. बुद्ध धर्माबद्दल आपणास विशेष आस्था का वाटते, असे मला अनेक लोक विचारतात. डॉ. राधाकृष्णन् सारखे तत्त्ववेत्ते म्हणतात की, बौद्ध धर्मात विशेष असे काय आहे ? त्यात व हिंदू धर्मात काय फरक आहे ? उपनिषदातून बुद्धाने सारे काही घेतले, असे हिंदू तत्त्ववेत्ते म्हणतात. मला अशा लोकांबद्दल फारच आश्चर्य वाटते. ज्यांनी कोणी ब्राह्मणांच्या १३८ उपनिषदांचा अभ्यास केला असेल व ती पूर्णपणे वाचली असतील तर त्यात ब्रह्म व आत्मा या दोन गोष्टी शिवाय काय आहे, असेच त्यांना वाटेल.

उपनिषदांच्या या कारखान्यातील ब्रह्म व आत्मा या दोन गोष्टीकडे पाहिले तर बुद्धाने त्यापैकी एकही गोष्ट मान्य केली नाही. बुद्धाने स्पष्ट सांगितले की, मला ईश्वर नको, परमेश्वर नको तर या पृथ्वीतलावर जन्मास आलेल्या प्रत्येक माणसास सुख व शांती मिळाली पाहिजे व सर्वांनी सुखाने राहिले पाहिजे. बुद्धाने नुसती शांतताच सांगितली नाही. बुद्ध हा खरा विचारवंत होता. त्याच्यासारखा विचारवंत अजूनपर्यंत जगात झालाच नाही.

बुद्धाला वेद मुळीच मान्य नव्हते. हे त्यांनी स्पष्टपणे जाहीर केले होते. वर्णव्यवस्थाही बुद्धाला मान्य नव्हती. बुद्ध वाङ्मयात बुद्धाने चातुर्वर्ण्यावर पदोपदी प्रहार केलेले आहेत आणि त्यामुळेच त्याला कट्टर हिंदू धर्माचा कडवा विरोध झाला. या देशात तीन महत्त्वाचे पंथ आहेत. एक हिंदू, दोन जैन व तीन बुद्ध. जैनांबद्दल मला काहीच सांगावयाचे नाही. बुद्धाने जातीभेदावर कठोर प्रहार केले. मी ब्राह्मणांचा द्वेष करीत नाही, परंतु 'जरी ब्राह्मण झाला भ्रष्ट । तरी तो तिन्ही लोकी श्रेष्ठ' हे मी मान्य करणार नाही, अशी त्याची विचारसरणी होती.

जातीभेदाचे मूळ कायमचे उपटून टाकण्यासाठी आपण हिंदू धर्माचा त्याग करणे आवश्यक आहे. चैनीत असलेल्यांना पायाखाली काय कुजत आहे, याची जाणीव येणार नाही. ही जातीभेदाची समाजरचनाच जर उलथून पाडावयाची असेल तर आपणास बौद्धधर्माचीच शिकवण अंमलात आणली पाहिजे. ही गोष्ट मी निव्वळ गळयापासून बोलत नसून बेंबीच्या देठापासून बोलत आहे. ज्याप्रमाणे पांडव हे वनवासात गेले असताना त्यांनी आपली शस्त्रास्त्रे एका शमीच्या झाडावर ठेवून गुप्तपणे वनवास पत्करला व नंतर तीच धनुष्ये घेऊन त्यांनी पराक्रम गाजविला त्याचप्रमाणे आम्हीही आमची आयुधे बाहेर काढणार आहोत. मी माझा प्रचार तुमच्यापुरताच मर्यादित न ठेवता साऱ्या हिंदू धर्माला या नव्या क्षेत्रात आणण्याचा प्रयत्न करीन. यश कितपत येते ते पाहू. मानवतेचे संरक्षण होण्यासाठी हिंदुस्थानलाच काय पण साऱ्या जगाला शेवटी बौद्ध धर्माची कास धरावी लागेल, यासाठी मी बौद्ध धर्माचे बायबल लिहीले आहे, ते लवकरच प्रसिद्ध होईल व ते वाचल्यावर बौद्ध धर्म स्वीकारावयाचा की नाही, हे तुमच्या हाती राहील. एकदा तुम्ही जो मार्ग चोखाळला तो तुमच्या लक्षात राहिला पाहिजे. बुद्धाचे एक देऊळ मी मुंबईत बांधणार आहे. बुद्ध धर्माचे पुनरुज्जीवन करण्यासाठी आपण प्रत्येकजण या मंगलप्रसंगी प्रतिज्ञा करू या.



## ३०८

# आपल्याला कमीपणा येईल असा पोषाख करू नका

चेंबूर, मुंबई येथील 'अस्पृश्य संघटना मंडळा' तर्फे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना हीरक महोत्सवाच्या रूपाने इमारत फंडास १००१ रु. दिले. त्यानिमित्त डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी शुक्रवार दिनांक २९ मे १९५३ रोजी चेंबूर विभागाला भेट दिली. सदर प्रसंगी हँडबिले काढली नव्हती तरीही स्त्री-पुरुषांचा अफाट जनसमुदाय जमला होता.

सदर प्रसंगी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी भाषण केले. आपल्या भाषणात त्यांनी अस्पृश्यांनी वापरावयाचा पोषाख आणि दागदागिने याबाबत मार्गदर्शन केले. ते म्हणाले,

भगिनींनो व बंधुंनो,

तुम्ही आतापर्यंत हे एक हजार एक रुपये धरून चार हजारावर रक्कम इमारत फंडाला दिली आहे, अशी माहिती माझे मित्र व शे. का. इंप्रुव्हमेंट ट्रस्टचे सेक्रेटरी श्री. उपशाम यांनी मला दिली आहे. तुमच्या वस्तीच्या मानाने ही रक्कम बरीच मोठी आहे. एवढी रक्कम तुम्ही दिल्याबद्दल मी समाधान व्यक्त करतो. तुम्ही जसे आपले कर्तव्य पार पाडले तसेच आपले सर्व लोक जर इमारत फंडाबद्दलचे आपले कर्तव्य पार पाडतील तर मुंबईतच हा फंड एक लाखावर जमेल व आपली इमारत टोलेजंग होईल अशी मला आशा वाटते.

अलिकडे आपल्या समाजातील तरुणांचा व तरुणींचा पोशाख मला आवडतो. नेहमी आपणाजवळ कमीतकमी दोन पोशाख पाहिजेत. आपण जो धंदा करतो त्यावेळी घालावयाचा एक पोषाख व धंदा संपल्यानंतर, शूचिर्भूत झाल्यानंतर घालावयाचा दुसरा पोषाख. मी पाहातो की आमचे काही लोक निरनिराळया ऑफिसात व कंपन्यात कामाला असतात. तेथे त्यांना खाकी युनिफॉर्म मिळतो. हा पोशाख त्यांनी कामापुरताच घालावा. घरी आल्यानंतर त्यांनी आपल्याला शोभेल असा पोशाख करावा. नोकरी-धंद्यातलाच पोशाख सभा, समारंभात किंवा लग्नकार्यासारख्या खाजगी प्रसंगी वापरणे बरे दिसत नाही.

---

जनता : ६ जून १९५३.

आपल्या समाजातील स्त्री-पुरूषांच्या पोशाखात अलिकडे पुष्कळच चांगला बदल झाला आहे, याबद्दल मला समाधान वाटते. मात्र जुन्या बायांच्या पोशाखात अद्याप बदल व्हावयास पाहिजे. त्यांना झंपर, पोलकी असा नवा पोशाख वापरणे आवडत नसेल तर त्यांनी तो वापरू नये. मात्र चोळी-लुगडे असा जुनाच पोशाख वापरावयाचा असला तरी तो व्यवस्थित वापरावा. पोशाख भारी किंमतीचाच पाहिजे, असे माझे म्हणणे नाही. पोशाख साधा का असेना, पण तो व्यवस्थित पाहिजे. पेशवाईत कपडे वापरण्यावर व दागिने घालण्यावर आपल्या लोकांवर पुष्कळच निर्बंध होते. अस्पृश्यांनी मळके व फाटकेच कपडे वापरले पाहिजेत व चांदीचेच दागिने वापरले पाहिजेत, सोन्याचे दागिने वापरता कामा नयेत असा निर्बंध होता. परंतु ते निर्बंध आता नाहीत. तरीही आमच्या जुन्या बाया वेळा, तोडे, फुल्या, मासोळ्या व जोडवी हे चांदीचे अवजड व बोजड दागिनेच वापरतात. त्यांनी ते वापरण्याचे सोडून दिले पाहिजे. नाकाला भोक पाडून भली मोठी नथ नाकात अडकविणेही बरे दिसत नाही. आपल्या पोशाखावरून आपण अमुक एका जातीचे आहोत, असे ओळखता येता कामा नये. नाही तर काही वेळा मोठी पंचाईत होते.

मी कॉलेजला शिक्षण घेत असताना एकदा लग्नकार्यासाठी आम्हाला गावी जावे लागले. आमच्याबरोबर आमच्या आप्तांपैकी काही जुन्या वळणाच्याही बाया होत्या. मी, माझे बंधु व आमच्या कुटुंबातील मंडळीचा पोशाख व्यवस्थित होता. तेव्हा बंदरावर उतरल्याबरोबर हमाली करणाऱ्या कुळवाड्यांनी आमचे सामान उचलले व ते आमच्याबरोबर चालू लागले. अर्धी अधिक वाट चालून गेल्यावर त्यांच्या लक्षात आले की, आमच्याबरोबर चाललेल्या त्या जुन्या वळणाच्या बायांची व आमची जात एकच आहे. हे समजण्याचा अवकाश, त्यांनी आमचे सामान खाली ठेवले व हमाली न मागताच ते लोक पसार झाले. शेवटी आम्हाला दोन-चार खेपा करून ते सामान मुक्कामावर न्यावे लागले.

प्रत्येकाने आपल्या घरात दहा आणे किंमतीचा बुद्धाचा फोटो लावावा.



# ३०९

# शीलाशिवाय शिक्षणाची किंमत केवळ शून्य

पूर्वी ठरल्याप्रमाणे रावळी कँप महिला मंडळाच्या विनंतीला मान देऊन, दि. ३ जून १९५३ रोजी सायंकाळी ७ वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी सौ. माईसाहेब आंबेडकर यांचेसह रावळी कँपला भेट दिली.

सदर प्रसंगी स्त्री-पुरुष समुदाय अतिशय प्रचंड होता. प्रथम अनेक भगिनींनी व संस्थांनी डॉ. बाबासाहेब व सौ. माईसाहेब आंबेडकर यास हार अर्पण केले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर याप्रसंगी केलेल्या भाषणात म्हणाले,

भगिनींनो व बंधुंनो,

येथील स्त्रियांनी इमारत फंडाला १,००१ रुपये देण्याचे कबूल करून आज जी रक्कम दिली त्याबद्दल मी त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानतो. या वस्तीत मी आज प्रथमच आलो आहे. आज येथील स्त्रियांनी जशी मदत केली तशीच येथील एक सोसायटीही इमारत फंडाला मदत देणार आहे. या सोसायटीची काही रक्कम म्युनिसीपालिटीत शिल्लक आहे. ती रक्कम ते इमारत फंडाला देणार आहेत. ती रक्कम या वस्तीने आतापर्यंत दिलेल्या सर्व रकमांपेक्षाही मोठी आहे. अर्थात ती घेण्यासाठी मला परत याठिकाणी यावे लागणार आहे व त्यावेळी मी जरूर येईन.

तुम्हाला एक महत्त्वाची गोष्ट आता मी सांगणार आहे. परवा दिनांक २७-५-१९५३ रोजी आपण मोठ्या प्रमाणावर बुद्ध जयंती साजरी केली. वास्तविक आपण ही एक मोठी चांगली गोष्ट केली, असे मला वाटते. परंतु काही वर्तमानपत्रांनी या गोष्टीला विपरित स्वरूप दिले. जेथे ३० हजार लोक हजर होते तेथे ३ हजार लोकच होते असे आपल्या बातमीत डोळ्यावर कातडे ओढलेल्या वर्तमानपत्रांनी ठोकून दिले. काहींनी तर बुद्ध जयंतीच्या बातमीला आपल्या वर्तमानपत्रात थाराच दिला नाही. हे त्यांचे नेहमीचेच आहे. डॉ. आंबेडकरांचे कार्य म्हटले की, एकतर त्याला प्रसिद्धीच द्यावयाची नाही आणि प्रसिद्धी दिलीच तर त्या कार्याला गौणत्व तरी आणावयाचे किंवा विपरीत स्वरूप तरी द्यावयाचे ! बुद्ध जयंतीवर वर्तमानपत्रात जी टीका आलेली आहे त्या टीकेला समर्पक व सविस्तर उत्तर मी देणार आहे. या वर्तमानपत्रात आलेल्या टीकेचा तुमच्यावर मात्र विपरीत परिणाम होऊ देऊ नका. मी तुम्हाला जे काही सांगतो आहे ते अगोदर तुम्ही नीट समजावून घ्या व मगच त्यावर विश्वास ठेवावयाचा किंवा नाही ते ठरवा.

---

जनता : १३ जून १९५३.

वर्तमानपत्रात एक पाढा नेहमी म्हटला जातो की, '' काही जरी केले तरी अस्पृश्यता जाऊ शकत नाही, राजकारणाने म्हणा किंवा धर्मकारणाने म्हणा अस्पृश्यता जाणार नाही. '' अशा लोकांना माझ्याबरोबर चर्चा करावयाची असल्यास माझी तयारी आहे. हे लोक उपजत आंधळे आहेत, असे मला वाटते. त्यांनी इतिहास वाचला नाही. जगात आतापर्यंत किती परिवर्तने झाली याची त्यांना माहिती नाही. म्हणून ते अशी मूर्खपणाची टीका करतात.

आज या ठिकाणी बसलेला प्रचंड स्त्री-पुरुष समुदाय हाच मागची परिस्थिती काय होती व आजची परिस्थिती काय आहे, हे समजावून देईल. लोक काय म्हणतात इकडे तुम्ही लक्ष देऊ नका. ते जे काही लिहितात ते तुमचा गैरसमज करण्याकरिता लिहितात. सर्व वर्तमानपत्रे माझ्यावर टीका करतात, मात्र, त्याची मला पर्वा नाही. त्यांच्या टीकेमुळे माझे वजन घटेल असे समजण्याचे कारण नाही. मी दरवर्षाला पाहतो तो माझे वजन वाढतच आहे.

नाशिक सत्याग्रहाची गोष्ट घेऊ. आता खऱ्या गोष्टी तुम्हाला सांगावयास हरकत नाही. श्री. भाऊराव गायकवाड इत्यादि पाच-सहा प्रमुख लोकच माझ्या मदतीस होते. त्यावेळी रात्री १२ वाजता सभा घेतली. सत्याग्रहासाठी किती लोक नावे देतात ते आम्ही पाहिले. त्यावेळी आम्ही काय प्रकार पाहिला ? सकाळपर्यंत आम्हाला एकही गडी सत्याग्रहासाठी मिळाला नाही. सत्याग्रह केला तर काय होईल याची भीती लोकांच्या मनात होती. सकाळी आम्ही एक मिरवणूक काढण्याचे ठरविले. सुदैवाने म्हणा किंवा दुर्दैवाने म्हणा या मिरवणुकीतल्या लोकांवर इतर लोकांनी दगड धोंडे टाकले. त्यामुळे प्रथम आम्हाला पंधरा-वीस सत्याग्रही मिळाले. नंतर लोकांच्या लक्षात आले की, सत्याग्रह करणे यात स्वाभिमान आहे. ही गोष्ट समजल्यावर आम्हाला सत्याग्रही मिळण्यास अडचण पडली नाही. नंतर आम्ही एक-दोन वर्षे नव्हे तर चार-पाच वर्षे सत्याग्रह चालवू शकलो. पूर्वीच्या गोष्टीचा विचार केला तर आता पुष्कळच सुधारणा झाली आहे, असे मला म्हणावयाचे आहे.

आपण शिक्षणाचीच गोष्ट घेऊ. माझ्यावेळी ' मला शाळेत घ्यावे की नाही ' याचा खल करण्यासाठी ३ दिवस मास्तरांची सभा भरली होती. मला त्यावेळी सरकारकडून ३ रुपये स्कॉलरशिप मिळत होती. या मुलाला शाळेत घेतले नाही तर सरकारचा कोप होण्याचा संभव आहे, या सबबीवर मला सरकारी हायस्कूलमध्ये घ्यावयाचे ठरले. त्यावेळी मी निव्वळ गावठी पोर होतो. त्यात ब्राह्मणी जोडा घालावयाचा. पहिल्या दिवशी मी हायस्कूलमध्ये गेलो तर माझ्या ४० वर्षे वयाच्या भावाचे शर्ट घालून गेलो. पायापर्यंत घातलेले शर्ट असा त्यावेळी माझा अवतार होता. त्यावेळी एल्फिन्स्टन हायस्कूलमध्ये असंख्य मुले

शिकावयास होती. तर महाराचा मी एकटाच पोर त्या शाळेत होतो. आज सिद्धार्थ कॉलेजात पाहा. इतरांपेक्षाही आपल्या मुलांचा पोशाख चांगला असतो. पहिल्या वर्षी सिद्धार्थ कॉलेजात अस्पृश्यांची १५-२० मुलेच होती. परंतु आज पाहा. अस्पृश्यांची ३०० मुले सिद्धार्थ कॉलेजात शिकत आहेत.

दुसरी गोष्ट धर्माची. मनुष्याने स्वार्थच करीत न राहाता थोडाफार परार्थही केला पाहिजे. यासाठीच धर्माची जरूरी आहे. तुमच्यासाठी हे सर्व मी करीत आहे. मला हे धर्माने शिकविले. नुसते पोट भरले म्हणजे सर्व काही झाले असे समजू नका. पोट काय रांडरळीसुद्धा भरते. '' कबीर कहे कूच उद्दम कीजे। आप खाये, और औरनको दीजे ''। या कबीराच्या दोह्याप्रमाणे उद्योग करा, आपण खा व दुसऱ्यांनाही द्या. स्वार्थ व परार्थ दोन्ही साधा. घर प्रथम सांभाळा. मात्र समाजकार्यालाही मदत करा.

एका लोहित नावाच्या ब्राह्मणाने बुद्धाला दोन प्रश्न विचारले होते. पहिला प्रश्न हा की, विद्या ही ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्गांनाच शिकविली पाहिजे. शूद्र या चौथ्या वर्गाला विद्या शिकविता कामा नये, हे तत्त्व तू का मान्य करीत नाहीस ? याला उत्तर मिळाले ते असे : चार वर्ग हे धंद्याकरिता पडलेले आहेत परंतु ज्ञान हा काही रोजगारीचा प्रश्न होऊ शकत नाही. ज्ञान हे जीवनाला अत्यंत आवश्यक आहे. ज्ञान नसल्यामुळे आपले अत्यंत नुकसान होते. उदा. नाशिकला एका शेतकऱ्याकडे एक खतपत्र होते. सर्व काही व्यवस्थित होते. केस त्याच्या बाजूची व्हावयास पाहिजे होती. परंतु त्याच्या वकिलाने त्याला दम दिल्यामुळे विरुद्ध निकाल लागला. हे झाले ते त्या शेतकऱ्याच्या अज्ञानामुळे झाले.

हिन्दुस्थानात जातीभेद राहिला याला मुख्य दोन कारणे आहेत. एकतर सर्वांना शस्त्रे वापरण्याची परवानगी नव्हती व दुसरी गोष्ट अज्ञान. मी पूर्वजांना पुष्कळ शिव्या देतो की, त्यांनी आपल्यावर होणाऱ्या अन्यायाचा प्रतिकार का केला नाही. परंतु त्याला वर वर्णन केलेली परिस्थितीच कारणीभूत होती.

' तव्याचा जाय बुरसा, मग तो सहजच होय आरसा ' या न्यायाने आता आपण स्वतःच आपल्यातील कमीपणा घालविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. इतरांनी मदत केली नाही तरी आपली सुधारणा आपणच केली पाहिजे आणि आपण अशारीतीने सुधारलो तर इतरांना आपणाला दोषी ठरविता येणार नाही. आपला कलंक आपणच काढला पाहिजे. समजा आपल्यातले लोक शिकले, ऑफिसर झाले तर इतरांना त्यांच्या हाताखाली काम करावेच लागणार व त्यांना मान द्यावाच लागणार. आमची व त्यांची स्थिती एक झाल्यावर आपल्याला ते कमी लेखणारच नाहीत.

प्रत्येक माणसाची काया, वाचा व मने अशी त्रिशुद्धी झाली पाहिजे. अशारितीने पवित्र झालेल्या माणसाला अपवित्र कोण म्हणणार ? त्यांच्यापेक्षा तुमचे कपडे डौलदार असल्यावर तुम्हाला कोण कमी लेखणार ? आमच्या उन्नतीचा प्रयत्न आता आम्हालाच करावयास पाहिजे.

आपण धर्मासाठी सत्याग्रह केला. धर्मांतराचा ठराव केला. सर्वकाही केले. आता आपण आपले मन पवित्र केले पाहिजे. आपला सद्‌गुणांकडे ओढा असला पाहिजे. अशारितीने आपण धार्मिक बनावयास पाहिजे. आपण शिकलो म्हणजे सर्वकाही झाले असे नाही. शिक्षणाचे महत्त्व आहे यात शंका नाही. मात्र शिक्षणाबरोबरच माणसाचे शीलही सुधारले पाहिजे. शीलाशिवाय शिक्षणाची किंमत केवळ शून्य आहे. ज्ञान हे तरवारीसारखे आहे. समजा एखाद्या माणसाच्या हाती तरवार आहे. तिचा सदुपयोग की दुरूपयोग करावयाचा हे त्या माणसाच्या शीलावर अवलंबून राहील. तो त्या तरवारीने एखाद्याचा खूनही करील किंवा एखाद्याचा बचावही करील. ज्ञानाचेही तसेच आहे. एखादा शिकलेला माणूस त्याचे शील चांगले असेल तर आपल्या ज्ञानाचा उपयोग लोकांच्या कल्याणासाठी करील परंतु त्याचे शील चांगले नसेल तर तो आपल्या ज्ञानाचा उपयोग लोकांचे अकल्याण करण्याकडेही खर्च करील. शील हे धर्माचे मोठे अंग आहे. शिकलेली माणसे नुसती पोटभरू असून भागणार नाही. ज्यांना स्वार्थापलिकडे काही दिसत नाही; ज्यांना थोडाही परार्थ करता येत नाही ती माणसे नुसती शिकली म्हणून काय झाले ? त्यांचा दुसऱ्याला उपयोग तो काय ? ' तव्याचा जाय बुरसा, मग तो सहजच होय आरसा '. शिक्षणाचा उपयोग असा झाला पाहिजे.

जोतीबा फुले यांना मी आपला गुरू मानतो. माळी समाजात त्यांचा जन्म झाला व पुष्कळ मराठेही त्यांचे शिष्य होते. परंतु आजची परिस्थिती मोठी चमत्कारिक झाली आहे. जोतीबांचे नाव आज कोणीच घेत नाही. आज मांग, चांभार हे निव्वळ उष्ट्याचे धनी झाले आहेत. प्रगतीचे खरे मालक आम्ही आहोत. आज आमच्यावर अन्याय होत आहे. आम्ही चळवळ करतो म्हणून इतर लोक आमच्याकडे खुनशीपणाने पाहात आहेत. परंतु आमची चळवळ निष्काम बुद्धिने व फळाची आसक्ती न धरता चालू आहे. आम्हाला आशा आहे की, एक दिवस असा येईल की या वृक्षाचे धनी आम्हीही होऊ. आज जे काही एक न करता चैन करतात, आपण न कमविलेले खात आहेत त्यांनाच पुढे शरम वाटेल.

प्रत्येकाने बुद्धाचा फोटो आपल्या घरात लावावा एवढे सांगून मी माझे भाषण संपवितो.



# ३१०

# आपल्या कार्यकर्त्याने राजकीय, धार्मिक आणि आर्थिक प्रश्नांचा बारकाईने अभ्यास केला पाहिजे

जुलै १९५३ मध्ये मराठवाडा शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या वतीने मराठवाडा भागातील* कार्यकर्त्यांच्या बैठकीत, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी मार्गदर्शनपर भाषण केले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

कार्यकर्त्यांची अशी भावना झाली आहे की, निवडणूक म्हणजेच राजकारण. निवडणुकाशिवाय राजकारणाला दुसरा काही अर्थच नाही अशीही भावना दिसते. म्हणूनच निवडणुकीच्या वेळी तिकीट मिळविण्यासाठी सर्वांची धडपड चाललेली असते आणि निवडणुका संपल्या की जो तो आपला स्वस्थ बसतो. परंतु समाजाचे आयुष्यात राजकारण हे एक अल्प कारण आहे. राजकारण म्हणजेच काही सर्वस्व नव्हे. खरे पाहिले तर पॉलिटिक्स, राजकारण जे काय आहे ते शेष अन्न आहे. समाजाची काही उन्नती होते, ती केवळ राजकारणाने होत नाही. समाज उन्नतीची अनेक कारणे आहेत. सामाजिक, आर्थिक या बाबी काही कमी महत्त्वाच्या नाहीत. समाजाची सर्वांगीण उन्नती होण्यासाठी या सर्व बाबींकडे सारख्याच प्रमाणात कार्यकर्त्यांनी लक्ष देणे जरुर आहे.

राजकारण हीच एक महत्त्वाची बाब आहे अशी भावना झाल्यामुळेच निवडणुकीच्या वेळी तिकीट मिळविण्यासाठी धडपड करणे, तिकिट न मिळाल्यास समाजात फाटाफूट करणे, निवडणुकीत पडल्यास निराश होऊन स्वस्थ झोपणे आणि निवडून आल्यास असेंब्लीमध्ये जाऊन तोंड बंद करून बसणे एवढेच कार्य आहे, असा कार्यकर्त्यांचा समज होत असतो.

या हैद्राबाद विभागात आज जवळ जवळ दोन वर्षे असेंब्लीचे कामकाज चालू झालेले आहे. या विभागात राखीव जागेवर एकंदर ३१ सभासद अस्पृश्य समाजाचे वतीने निवडून आले आहेत. परंतु या दोन वर्षात त्यांनी तेथे जाऊन काय केले? असेंब्लीमध्ये एकंदर तीन प्रकारे काम करावयाचे असते. असेंब्लीमध्ये एक, ठराव आणणे, दोन, बिल मांडणे आणि तीन, बजेटचा अभ्यास करून बजेटवर भाषण करणे. या तिन्ही गोष्टींपैकी, एखादी तरी

---

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे : संपादक मा. फ. गांजरे, खंड ७, पृ. ९९-१०३.

*भाषणाचे स्थळ दर्शविलेले नाही–संपादक.

गोष्ट या ३१ लोकांपैकी एखाद्याने केलेली आहे काय ? माझ्या तरी निदर्शनास यापैकी काहीच आलेले नाही. मग कदाचित असेंब्लीच्या कामकाजाचा वर्तमानपत्रात वृत्तांत येत नसतो म्हणून मला माहीत होत नसेल. सांगण्याचा उद्देश एवढाच की, असेंब्लीमध्ये निवडून गेल्यावर निदान या गोष्टी तरी आपल्या सभासदांनी करावयास पाहिजेत. राजकारण हाच जर कार्यकर्त्यांच्या समोर मुख्य उद्देश असेल तर त्यांनी तो तरी कार्यक्रम चांगल्याप्रकारे पार पाडला आहे काय ? मला हे सुद्धा दिसत नाही.

या ३१ लोकांनी एका उद्देशाने, एका निश्चयाने, एका जमावाने जर वागायचे ठरविले तर मला खात्री आहे की काँग्रेस सरकारच नव्हे तर काँग्रेस आणि इतर पक्षही आपल्या लोकांना घाबरल्याशिवाय राहाणार नाहीत.

या ज्या राखीव जागा मिळविल्या आहेत त्या अस्पृश्य समाजाच्या हितासाठी मिळविल्या आहेत. जी माणसे आमच्यासाठी पाठविली, ज्यांच्यावर आमचा विश्वास आहे अशा निवडून आलेल्या माणसांनी अस्पृश्य समाजाचे हितासाठी झगडावयास नको काय ? माझा जो गांधींशी विरोध होता किंवा देशातील लोकांचा आणि काँग्रेसचा जो मी विरोध सहन केलेला आहे, त्याचे कारण एकच. अस्पृश्य समाजाचे हितासाठी ते लोक काहीच करू शकत नाहीत, हेच ते कारण आहे. सरकारने किंवा या देशातील लोकांनी आमचे म्हणणे ऐकले, आमच्या मागण्या मान्य केल्या, तर मग विरोधाचे आणि लढ्याचे काहीच कारण राहाणार नाही. पण हे असे होत नाही, म्हणूनच आपणास लढावे लागते.

राजकारण कोणास करावयाचे असेल, तर राजकारणाचा चांगला अभ्यास केला पाहिजे. अभ्यासाशिवाय जगामध्ये कोणालाच काहीच साधता येणार नाही. आपल्या समाजातील प्रत्येक कार्यकर्त्याने राजकीय, धार्मिक आणि आर्थिक या सर्व प्रश्नांचा चांगला बारकाईने अभ्यास करावयास पाहिजे. ज्यांना पुढारी व्हावयाचे असेल त्यांनी पुढाऱ्याची कर्तव्यकर्मे, पुढाऱ्याची जबाबदारी काय आहे याची जाणीव ठेवावयास पाहिजे. कारण आपल्या समाजातील पुढाऱ्यांवर अत्यंत मोठी जबाबदारी आहे. इतर समाजाच्या पुढाऱ्यांसारखी आपल्या समाजातील पुढाऱ्यांची स्थिती नाही. इतर पुढाऱ्यांचे काय ? सभेत जाणे, लांबलचक भाषण करणे, टाळ्या मिळविणे आणि शेवटी हार गळयात घालून घरी येणे, एवढेच काम इतर पुढाऱ्यांकडे असते. आपल्या समाजातील पुढाऱ्यांना हे करून भागणार नाही. चांगला अभ्यास करणे, विचार करणे समाजाच्या उन्नतीसाठी स्वतः रात्रंदिवस सतत अंगमेहनत करणे, हे आपल्या तरी पुढाऱ्यांना करावे लागेल. तरच तो लोकांचे थोडेफार भले करू शकेल, तोच खरा पुढारी ठरू शकेल.

तुम्हाला वाटते पुढारी होणे फार सोपे आहे पण माझ्या मते पुढारी होणे फारच अवघड काम आहे. मला स्वतःला पुढारीपण फार जड वाटते कारण इतरांसारखे माझे पुढारीपण नाही. मी ज्यावेळी चळवळ सुरू केली त्यावेळी कसल्याही तऱ्हेची संघटना नव्हती. मलाच स्वतःला सर्व कामे करावी लागत होती. संघटना करावयाची म्हटले तर मला स्वतःलाच ती करावी लागत असे. वर्तमानपत्र काढावयाचे म्हटले तर मलाच काढावे लागले. म्हणूनच 'मूकनायक', 'बहिष्कृत भारत', 'जनता' वगैरे वृत्तपत्रे मला स्वतःलाच काढावी लागली. प्रेस चालवावयाचा म्हटले तर मला स्वतःच प्रेसची जुळवाजुळव करावी लागली. थोडक्यात सांगायचे म्हटले म्हणजे मला शून्यातून सर्व निर्माण करावे लागले. मी असे म्हणत नाही की जे काय झाले आहे ते पूर्ण झाले आहे. तर मी असेच म्हणतो, मी जे काही केले ते व्हावयास पाहिजे त्याचा शतांश देखील झालेला नाही. अद्याप पुष्कळ करावयाचे शिल्लक आहे. रस्ता पुष्कळ चालून जावयाचे आहे. आतापर्यंत जे झाले ते फक्त रोपटे लावले आहे. चळवळीचा अद्याप वृक्ष वाढावयाचा आहे. सांगायचा उद्देश हाच की, आपल्यातील पुढाऱ्यांवर पुढारीपणाची फारच मोठी जबाबदारी आहे.

लोकात जागृती निर्माण करणे, त्यांची संघटना करणे हे अत्यंत महत्त्वाचे काम आहे. ते दरेक पुढाऱ्याने केले पाहिजे. आपल्या कार्यकर्त्यांच्या अंगी फारच धैर्य असावयास पाहिजे. ज्याच्या अंगी धैर्य नाही तो पुढारीच होऊ शकत नाही. जो मनुष्य मरावयास तयार होतो तो कधीच मरत नाही आणि जो मरणास भितो तो अगोदरच मेलेला असतो असे समजावे. या देशातील हिंदू लोक आपणाला पुष्कळ त्रास देतील, आपल्या मार्गात अनेक अडचणी निर्माण करतील. परंतु काही झाले तरी आपण जो मार्ग स्वीकारलेला आहे, ज्याला आपण इन्सानियत म्हणतो, माणुसकी म्हणतो, तो मिळविण्याचा मार्ग आपण कधीच सोडता कामा नये. यासाठीच आपला प्रत्येक कार्यकर्ता धैर्यवान असावयाच पाहिजे. मान सन्मानाने वागणे हे आपले परम कर्तव्य आहे, असे समजले पाहिजे आणि त्याच्यासाठी आपली चळवळ चालू आहे.

दुसरी गोष्ट आपल्या लोकात देवभोळेपणा फारच शिरला आहे. जो तो उठला सुटला पंढरी-पैठण-आळंदीला जातो. मला आपणास हे विचारावयाचे आहे की पंढरी-पैठण-आळंदीला जाऊन आपण काय मिळविले आहे ? पंढरीला जाऊन कोणाचे भले झाले आहे काय ? किंवा आळंदीला जाऊन कोणाचा उद्धार झाला आहे काय ? तुम्ही एकनाथाला फार मोठा मानता, त्याने काय केले ? एक भागवत ग्रंथ लिहिला पण त्याची कथा मी आज तुम्हाला सांगतो. तो मेला

त्यावेळी त्याची प्रेतयात्रा एका रस्त्याने जात होती. त्याच रस्त्याने एक सासुरवाशीण एक महार सोबतीला घेऊन सासरी जावयास निघाली होती. तिने ते एकनाथाचे मढे पाहिले. हा मला अपशकून झाला असे ती महारास बोलली. हे तिचे बोलणे एकनाथाच्या मढ्याने ऐकले तेव्हा एकनाथ तिरडीवर उठून बसला आणि त्या सासुरवाशीणीस बोलला '' मी आज मरत नाही. कारण तुला अपशकून होत आहे. '' असे म्हणून तो परत घरी गेला. नंतर पुढे एकनाथ व त्याची बायको यांनी नदीत जीव दिला. त्यांनी जीव का दिला याचा अद्याप शोध लागला नाही. आता तुम्हीच सांगा, कोणाचे तरी मढे जिवंत झाल्याचे तुम्ही ऐकले किंवा पाहिले आहे काय ?

दुसरे ज्ञानेश्वराने तरी काय केले ? त्याने भगवद्‌गीतेवर ज्ञानेश्वरी नावाचा ग्रंथ लिहिला. त्या ग्रंथाचे सार काय ? तर जग हे ब्रह्ममय आहे. सर्व जगच जर ब्रह्म आहे तर मग महार मांगातही ब्रह्म असावयास पाहिजे. मग ज्ञानेश्वर महार मांगात का राहिला नाही ? ब्राह्मणाने आपणास परत घ्यावे म्हणून त्याने प्रयत्न का केला ? ब्राह्मणाने त्याला वाळीत टाकल्यानंतर त्याने त्यांना सांगावयास पाहिजे होते की, तुम्ही जरी मला जातीत घेतले नाही तरी हरकत नाही. मी महार-मांगात जाऊन राहीन कारण जग हे ब्रह्ममय आहे. असे ज्ञानेश्वराने का सांगितले नाही. सर्वसाधारण जनतेला भुलविण्यासाठी हे सर्व थोतांड रचलेले आहे आणि या थोतांडाला तुम्ही सर्व भुललेले आहात. तेव्हा तुम्ही पंढरी-आळंदी किंवा जेजुरीला किंवा दुसऱ्या कोणा देवाच्या नादी लागलात तर तुम्हाला वाळीत टाकण्याचा मला हुकूम द्यावा लागेल. त्याच्याशिवाय तुमचा देवभोळेपणा जाणार नाही आणि तुमची सुधारणाही होणार नाही. आजचे हे युग विचाराचे युग आहे. कोणीही कसलेही थोतांड रचले तरी ते थोतांड आहे हे तुम्हाला ओळखता आले पाहिजे. कारण यापुढे तुम्हाला जगात वागताना विचार करूनच वागले पाहिजे.

आपण आपली संघटना मजबूत करावयास पाहिजे. आपसातील सर्व मतभेद बाजूस सारून एक विचाराने आपण वागले पाहिजे. कारण संघटना असल्याशिवाय जगात आपणास कोणीच विचारणार नाही. मला माहीत आहे की निवडणुकीच्या वेळी आपणास दुसऱ्या कोणाशी तरी हातमिळवणी करावी लागेल. पण आपली जर संघटनाच नसेल तर इतर लोक आपणाकडे येणार नाहीत. आपणास विचारणार नाहीत. पॉलिटिक्स करावयाचे असेल तर ते चांगल्या रीतीने केले पाहिजे. त्याकरिता लोकात जागृती निर्माण करून संघटना केली पाहिजे. मला पुढाऱ्याचे भय नाही. पुढारी जर चांगले वागले

नाहीत, त्यांनी लोकांचे काम केले नाही तर त्यांना काढून टाकण्यास मी मुळीच घाबरणार नाही. म्हणून प्रत्येक विभागात निदान वर्षातून एक तरी परिषद घेतली गेली पाहिजे. त्याचप्रमाणे सभा, स्नेहसंमेलने, चर्चामंडळे, कॅम्प्स् वगैरे घेतले पाहिजेत. म्हणजे आपले कार्यकर्ते वेळोवेळी एके ठिकाणी येतील, चळवळीचा अभ्यास करतील आणि कार्य जोमात होईल.

शेवटी मला सांगावयाचे आहे की मी व्यक्तीशः कोणत्याही कार्यकर्त्यावर प्रेम करीत नाही. प्रेम फक्त कार्यावरच असते. जो कार्य करील तोच फक्त मला आवडतो.



# ३११

# वाघासारखे बना म्हणजे तुमच्या वाटेला कोणीही जाणार नाही

दिनांक ९ ऑगस्ट १९५३ रोजी औरंगाबाद येथील गड्डीगुडम (छावणी) येथील शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या वार्ड कमिटीमार्फत श्री. दाभाडे, कांबळे, मल्हारराव यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना अल्पहार दिला. सदर प्रसंगी मुंबई राज्य शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे प्रांताध्यक्ष कर्मवीर दादासाहेब गायकवाड, मध्यप्रांत शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे सरचिटणीस श्री. बाबू हरिदास आवळे, नाशिक येथील रामपाला, आमदार नेरलीकर, सरचिटणीस मराठवाडा ; पी. इ. एस. कॉलेजचे रजिस्ट्रार श्री. वराळे, श्री. बी. एस. मोरे, नगरचे श्री. पी. जे. रोहम आदी कार्यकर्ते हजर होते.

खेड्यापाड्यातील अस्पृश्य जनतेकडून सरकार जमिनी परत घेत आहे असे डॉ. बाबासाहेबांना सांगण्यात आले. या प्रसंगी केलेल्या भाषणात डॉ. बाबासाहेब म्हणाले,

तुम्ही काही करीत नाही म्हणून सरकार असे करते. (त्यांनी उपनिषदातील एक कथा सांगितली) मेंढराला कोणीही कापते, म्हणून मेंढरू देवाजवळ फिर्याद घेऊन गेले, तेव्हा देवाने सांगितले की तुझे मांस नरम व मऊ असते. म्हणून मला तुला खावेसे वाटते. देवाने प्रश्न केला की, वाघाला, लांडग्याला कोणी खाते का ? नाही, मग तू देखील त्यांच्या सारखाच हो. तसेच तुम्ही वाघासारखे बना म्हणजे तुमच्या वाटेला कोणीही जाणार नाही. मुसलमानाला कोणी छळते का ? कारण त्याच्याजवळ सुरा आहे हे लोकांना माहीत आहे. खाटेवर बसून चालणार नाही म्हणून तुम्हीसुद्धा अर्जावर अथवा विनंत्यावर अवलंबून राहू नका. हिम्मतवान बना ! उपाशीपोटी राहाण्यापेक्षा पडित जमीन मिळवा.

त्यानंतर आलेल्या पाहुण्यांचे आभार मानल्यावर हा गोड कार्यक्रम संपला.



---

जनता : १५ ऑगस्ट १९५३.

## ३१२

# अस्पृश्यता नष्ट करण्याची तळमळ न बाळगणाऱ्या राजकीय पक्षांपासून सावध रहा !

मीरत येथे दिनांक ५ ऑक्टोबर १९५३ रोजी एका जाहीर सभेत अस्पृश्यांना उद्देशून डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

जातीभेद व अस्पृश्यता नष्ट करण्याची तळमळ न बाळगणाऱ्या इतर राजकीय पक्षांपासून सावध रहा.

भारतीय कम्युनिस्ट पक्ष रशियन ध्येयप्रणालीवर उभारला असेल तर आगामी म्युनिसीपल निवडणुकीत त्या पक्षाशी सहकार्य करण्यासही शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन तयार आहे. पण इतर पक्षांप्रमाणे भारतीय कम्युनिस्टही जातीभेद व अस्पृश्यता घालवू शकलेले नाहीत.

या प्रसंगी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना थैली अर्पण करण्यात आली.



---

जनता : १० ऑक्टोबर १९५३.

# ३१३
# खऱ्या आणि श्रेष्ठ धर्माची पुनःस्थापना करण्याचे बिकट कार्य भावी पिढीवर येऊन पडले आहे

दिनांक २४ जानेवारी १९५४ रोजी अखिल भारतीय साई भक्त संमेलनाचे मुंबई येथील झेवियर कॉलेजच्या मैदानावर उद्‌घाटन करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

आज तर मूर्तिपूजा, साधुसंत आणि चमत्कार करणाऱ्या व्यक्तींची पूजा हाच धर्म होऊन बसला आहे. आपल्या धर्मात आता देव आणि नीतीही राहिली नाही. आजची अवस्था म्हणजे मानवी मनाचा संपूर्ण अधःपात आहे. म्हणूनच खऱ्या आणि श्रेष्ठ धर्माची पुनः स्थापना करण्याचे बिकट कार्य भावी पिढीवर येऊन पडले आहे.

साईबाबांना प्रत्यक्ष भेटण्याचे किंवा पाहाण्याचे भाग्य मला लाभले नाही. त्यांच्याबद्दल मी थोडे फार ऐकून आहे एवढेच. म्हणून अशावेळी साईबाबांच्या जीवनाचे अष्टपैलू माहित असलेल्या व्यक्तिला बोलाविले असते तर फार बरे झाले असते. माझे साईबाबांबद्दलचे ज्ञान अगदी शून्य आहे आणि जे आहे त्याचे अधिष्ठान देखील ऐकीव गोष्टीवरच आहे. साईबाबा कालवश होऊन बरेच दिवस लोटले असले तरी त्यांचा भक्तगण मात्र इंदुकलेप्रमाणे सारखा वाढत आहे. साईबाबा हे धर्मगुरू म्हणूनच पुष्कळांना माहीत आहेत. हिंदुस्थानात धर्माची अनेक स्थित्यंतरे झाली. माणसाच्या आत्म्याला मुक्ती मिळण्याचे साधन हीच धर्माची प्राथमिक अवस्था अशी समजूत होती. कालांतराने धार्मिक दृष्टिकोन, हेतू आणि साधना यामुळे मूळ कल्पनेत आमूलाग्र बदल झाला आणि धर्म हा नैतिक मूल्यांनी परस्पराविषयी आदर भाव निर्माण करून विश्वबंधुत्वाची उभारणी करण्याचे साधन आहे असाही अर्थ लावला गेला. धर्माची तिसरी अवस्था म्हणजे मानवी जीवनातील दैनंदिन गरजांची जी व्यक्ती पूर्तता करील तिची देवाप्रमाणे पूजा करणे ही होय. कुणाला मुले हवी होती, कुणाला सोने हवे होते, कुणाला संकटमुक्त व्हायला पाहिजे होते ! ज्या व्यक्तीने या इच्छा पूर्ण

---

जनता : ३० जानेवारी १९५४.

केल्या ती व्यक्ति त्या त्या इसमांचा देव होऊन बसली. त्यानंतर तर सामान्य माणसापेक्षा काही तरी चमत्कृती करून दाखविणाऱ्या व्यक्तिचीही पूजा होऊ लागल्याचे सर्व हिंदुस्थानभर आपण पाहात आहोत.

धर्माच्या बाबतीत आपण चुकीच्या मार्गाने गेलो आहोत, एवढेच नव्हे तर आजकालच्या काळात धर्माच्या नावावर पैसा गोळा करून तो अनिष्ट बाबींवर खर्च केला जातो. आज जगात दारिद्र्य आणि दुःख असताना अशारितीने धर्माच्या नावावर पैसा जमवून तो ब्राह्मणादी आणि उत्सवावर खर्च करणे हा एक भयंकर गुन्हा आहे. गौतम बुद्धांनी हा प्रश्न व्यवस्थितपणे हाताळला होता. त्यांनी आपल्या नैतिक शास्त्रात पंचशील, अष्टांगमार्ग आणि निर्वाण फार उत्कृष्ट रीतीने सांगितले आहेत. याशिवाय त्यांनी आपल्या अनुयायांना खालील दहा तत्त्वे आत्मसात करण्यास सांगितली आहेत. ती अशी : (१) प्रज्ञा, (२) शील, (३) नेखम्म, (४) दान, (५) वीर्य, (६) खन्ति, (७) सच्च, (८) अधित्थान, (९) मैत्री, (१०) उपेख्खा.

ज्यामुळे अज्ञानांधकार नाहिसा होतो ती प्रज्ञा म्हणजे ज्ञानरूपी प्रकाश; शील म्हणजे नैतिक विचार; कोणतीही वाईट गोष्ट करू नये परंतु चांगली गोष्ट मात्र सतत करीत राहावे. नेखम्म म्हणजे ऐहिक सुखापासून अलिप्त राहाणे. दान म्हणजे कोणत्याही प्रकारची अपेक्षा न करता दुसऱ्यासाठी तनमनधन अर्पण करणे. वीर्य म्हणजे धैर्य, कसोटी की ज्यामुळे हाती घेतलेल्या कामात कधी माघार न घेणे. खन्ति म्हणजे सहनशीलता. द्वेषाला द्वेषाने उत्तर न देणे. सच्च म्हणजे सत्य. प्रत्येकाने खोटे कधी बोलू नये, सत्य बोलावे. जे बोलावे ते सत्यच असावे. अधित्थान म्हणजे मनोनिग्रह. मैत्री म्हणजे प्रेम, मग ती मित्राविषयी असो किंवा शत्रूविषयी असो, मानवाविषयी असो किंवा इतर प्राणीमात्राविषयी असो. उपेख्खा म्हणजे उपेक्षा; ज्यामुळे मन सुखदुःखाच्या पलिकडे गेले असून कोणत्याही परिणामाने विचलित न होता कर्तव्यपरायण राहाणे. वरीलपैकी जास्तीत जास्त गुण प्रत्येक माणसाने आत्मसात करावे अशी बुद्धाची अपेक्षा होती. म्हणूनच पाली वाङ्मयात असे म्हटले आहे की गौतम बुद्धांनी वरीलप्रमाणे '' दान पारमिता '' जरी शिकविली असली तरी दान हे सतपात्री असण्याबद्दल त्यांचा कटाक्ष होताच. दान देण्यासाठी दाता जरी प्रवृत्त झाला तरी त्यामुळे ज्याला दान दिले जाते त्याला मात्र त्याने कमीपणा येता कामा नये. पददलितांना एक दिवस स्वतःच्या पायावर उभे राहाण्यास सामर्थ्य निर्माण करणारी शक्ति, जिला आपण मदत म्हणतो तेच खरे दान. साधुसंतांच्या नावावर पैसा जमा केला असेल तर त्याचा पारमितामध्ये सांगितलेल्या तत्त्वाप्रमाणे

विनियोग करणे अत्यंत आवश्यक आहे. दारिद्र्य, अज्ञान, रोगराई इतकी आहे की सध्याच्या काळात ती नष्ट करण्यासाठी असा पैसा खर्च न करता तो धनिकांसाठी खर्च करणे म्हणजे दुष्टपणा ठरेल. त्या पैशाचा विनियोग रूग्णालये, शिक्षण, बेकारासाठी छोटे छोटे धंदे, गरीब व अनाथ महिलांसाठी काही तरी धंदेशिक्षण देणे अशा कार्यावर त्यांनी करावा. आपण जर जमा केलेल्या पैशाचा विनियोग अशारितीने केला तर त्यामुळे आपल्या कार्याची वाहवा होईल. एवढेच नव्हे तर साईबाबाची कीर्ती दाही दिशांना दुमदुमत राहील.



## ३१४

# आज देशात चारित्र्यच उरलेले नाही, ज्या देशाला नीतीमत्ता नाही त्या देशाचे भवितव्य खडतर आहे

मुंबईच्या फेमस स्टुडियोमध्ये रविवार दिनांक एकतीस जानेवारी एकोणविसशे चौपन रोजी आचार्य अत्रे ह्यांच्या 'महात्मा फुले' ह्या चित्रपटाच्या चित्रीकरणाचा मुहूर्तसमारंभ मोठ्या थाटामाटाने साजरा करण्यात आला. समारंभाचे अध्यक्षस्थान डॉ. बाबासाहेब आंबेडकर ह्यांनी स्वीकारले होते आणि सातारचे कर्मवीर भाऊराव पाटील आशिर्वाद देण्यासाठी आचार्य अत्रे ह्यांच्या निमंत्रणावरून मुद्दाम उपस्थित झाले होते.

श्री. आचार्य अत्रे उपस्थित पाहुण्यांचे आभार मानताना म्हणाले, ''महात्मा फुले ह्यांचे क्रान्तिकारक जीवन रुपेरी पडद्यावर आणण्याचे माझे अनेक वर्षाचे स्वप्न आज साकार होत आहे, ह्याबद्दल मला अतिशय आनंद होत आहे. पुणे शहराच्या ज्या विभागात फुले ह्यांनी शंभर वर्षापूर्वी काम केले, त्याच क्षेत्रात माझी अनेक वर्षे गेली. त्यामुळे त्यांच्या कार्याचा आणि परंपरेचा माझ्या मनावर फार परिणाम झाला आहे. ह्या चित्रपटाचा प्रारंभ डॉ. बाबासाहेब आंबेडकर ह्यांच्या हस्ते होत आहे, हा सर्वात मोठा सुयोग आहे. कारण महात्मा फुले ह्यांच्या तत्त्वज्ञानाचे सर्वात मोठे अनुयायी जर कुणी असतील, तर ते डॉ. आंबेडकर हेच होत. राजकारणातील, धर्मकारणातील आणि समाजकारणातील डॉ. आंबेडकरांची भूमिका सर्वस्वी महात्मा फुले ह्यांच्या सारखीच आहे, म्हणून महात्मा फुले ह्यांच्याबद्दल त्या काळात जो गैरसमज झाला, तोच डॉ. आंबेडकर ह्यांच्या आजही वाट्याला येत आहे. रयत शिक्षण संस्थेचे संस्थापक कर्मवीर भाऊराव पाटील हे ह्या चित्रपटाला आशिर्वाद द्यावयास येथे उपस्थित राहिले हाही दुसरा सुयोग आहे; कारण त्यांनी आपले सबंध आयुष्य महात्मा फुले ह्यांच्या तत्त्वज्ञानाच्या प्रचारामध्ये खर्च केले.

इंग्रजी भाषेमध्ये फुले यांचे चरित्र लिहिण्याची डॉ. आंबेडकरांची इच्छा आहे हे मला माहीत आहे. पण साधनांच्या अभावी ते तसेच पडून आहे. माझे काम झाल्यानंतर सर्व सामुग्री त्यांच्या हवाली करण्याची माझी इच्छा आहे. फुले ह्यांच्या जीवनासंबंधी सर्वसामान्य समाजात अज्ञान पसरलेले आहे. ह्या चित्रपटाद्वारे महात्मा फुल्यांच्या जीवनाचे दर्शन घडविण्याचा मी प्रयत्न करीत आहे.''

---

जनता : ६ फेब्रुवारी १९५४.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

हे काम हाती घेतल्याबद्दल मी श्री. अत्र्यांचे अभिनंदन करतो. कारण जोतीराव फुले हे आद्य समाज सुधारक होत ! पूर्वी, सामाजिक सुधारणा आधी की राजकीय सुधारणा आधी हा वाद चाले. आधी समाज सुधारणा झाल्या पाहिजेत असे रानडे, गोखले, आगरकर प्रतिपादन करीत; पण टिळकांचा भर राजकीय सुधारणांवरच होता. टिळक आपल्या विरोधकांवर याबाबतीत विजय मिळवू शकले नाही. पण पुढे महात्मा गांधींनी मात्र समाज सुधारणावाद्यांवर विजय मिळविला. परंतु समाज सुधारणा होण्यापूर्वी देशाला राजकीय स्वातंत्र्य मिळाले. त्याचे परिणाम फारसे चांगले झालेले नाहीत. आज देशात चारित्र्यच उरलेले नाही आणि ज्या देशाला नीतिमत्ता नाही त्या देशाचे भवितव्य अतिशय खडतर आहे. जवाहरलाल नेहरू, तुमचे मुख्यमंत्री असोत वा मोरारजी देसाई असोत, तुमच्या भविष्यात काळोखच भरला आहे. देशाचे मंत्री देशाचा उद्धार करीत नाहीत, तर धर्म ज्याला उत्तमरीतीने समजला आहे तोच देशाला तारू शकेल. महात्मा फुले अशा धर्मसुधारकांपैकी होते. त्यादृष्टीने ह्या थोर समाजसुधारकाच्या जीवनावर आधारलेला हा बोलपट उपयुक्त ठरेल.



# ३१५

# धर्माप्रमाणे राजकारणातही निष्ठा बाणली नाही तर तो '' लफंग्यांचा बाजार '' ठरेल

शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे प्रभावी नेते, अस्पृश्य समाजाचे अध्वर्यू आणि भारतीय राज्यघटनेचे शिल्पकार डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि सौ. माईसाहेब आंबेडकर ही दोघे ता. २० एप्रिल १९५४ रोजी सकाळी १० वाजता विमानाने दिल्लीहून नागपूरला आली. त्यांच्या स्वागतासाठी अस्पृश्य समाज हजारोंच्या संख्येने उपस्थित होता आणि डॉ. आंबेडकर माईसाहेबांसह विमानातून उतरताच 'आंबेडकर झिंदाबाद थोडे दिनमें भिमराज' इत्यादी घोषणांनी त्यांचे स्वागत करण्यात आले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे भंडारा द्विमतदारसंघातील संसदीय पोटनिवडणुकीत राखीव जागेसाठी उमेदवार म्हणून उभे आहेत आणि भंडारा मतदार संघात निवडणूक प्रचार करण्यासाठी ते नागपूरला आले आहेत.

विमानतळावर त्यांच्या स्वागतासाठी पंचवीस हजाराच्यावर अस्पृश्य स्त्री-पुरुषांचा आणि लहान मोठ्यांचा संमर्द उपस्थित होता. समता सैनिक दलाचे गणवेषधारी शेकडो स्वयंसेवक व्यवस्था ठेवण्यासाठी आणि डॉ. बाबासाहेबांना सलामी देण्यासाठी रांगेने उपस्थित होते.

विमान नागपूर विमानतळावर उतरताच श्री. बापूसाहेब राजभोज यांनी त्यांचे स्वागत केले. विमानातून उतरताच डॉ. बाबासाहेब माईसाहेबांसह प्रचंड जनसमुदायाजवळ सावकाश गेले. तेथे निरनिराळ्या राजकीय पक्षांकडून त्यांच्या गळयात हार टाकून त्यांचे स्वागत करण्यात आले. नंतर मोटारीत बसून विश्रांतीसाठी ते माउंट हॉटेलकडे रवाना झाले. तेथेही त्यांच्या स्वागतासाठी दहा हजार जनसमुदाय उपस्थित होता. वाटेतही पुष्कळ ठिकाणी त्यांच्या दर्शनासाठी अनेक लोकांचे थवेचे थवे जमले होते. रात्री आठ वाजेपर्यंत डॉ. बाबासाहेबांच्या दर्शनासाठी माउंट हॉटेलच्या पटांगणात हजारोंच्या संख्येत जनसमुदाय उभा होता.

---

जनता : २४ एप्रिल १९५४.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे भंडारा संसद पोटनिवडणुकीत उमेदवार म्हणून उभे राहिल्यानंतर मध्यप्रदेशातील अनेक पक्षांनी आपला डॉ. बाबासाहेबांना पाठिंबा असल्याचे जाहीर केले. डॉ. बाबासाहेब येथे आल्यानंतर त्यांच्या उमेदवारीला पाठिंबा देणाऱ्या पक्षांच्या कार्यकर्त्यांना मुद्दाम निमंत्रित करण्यात आले. या मेळाव्यात म. प्र. जनसंघाचे दत्तोपंत ठेंगडी, प्र. स. पक्षाचे श्री. आवारी, हातमाग, विणकाम संघाचे श्री. रा. बा. कुंभारे, निर्वासितातर्फे श्री. हंसराजनी, कम्युनिस्ट पक्षाचे श्री. बर्धन, प्रा. शि. संघ आणि सं. महाराष्ट्र परिषद या संस्थेचे श्री. भोसले व शे. का. फे. चे श्री. राजभोज, दादासाहेब गायकवाड, मुं. वि. सभेचे व शे. का. फे. सदस्य श्री. बापू चंद्रसेन कांबळे, बॅ. खोबरागडे, नागपूर कार्पोरेशनचे डे. मेयर श्री. धरमदास मेश्राम आणि हरिदास आवळे इत्यादी प्रतिष्ठित कार्यकर्ते उपस्थित होते.

दिनांक २० एप्रिल १९५४ रोजी आपल्या स्वागत समारंभात बोलताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

राष्ट्र नाशाच्या मार्गाला लागले आहे असे मला वाटते. म्हणूनच मी निवडणुकीस उभा राहात आहे. काँग्रेसशी '' तडजोड '' करण्याची तयारी मी दर्शविली असती तर लोकसभेत टिकून राहाणे मला अशक्य झाले नसते. पण धर्माप्रमाणे राजकारणातही निष्ठा बाणली नाही तर तो '' लफंग्यांचा बाजार '' ठरेल. विरोधी पक्षाच्या जागेवरून लोकांपुढे भिन्न दृष्टिकोन ठेवण्यासाठीच मी ही निवडणूक लढवित आहे.

काँग्रेस सरकारला आपली कर्तबगारी सिद्ध करण्यासाठी भरपूर अवधी दिला गेला असूनही आतापर्यंत कुठलाही प्रश्न ते सोडवू शकलेले नाहीत. यापुढे नुसते भाविकतेने पाहून चालणार नाही तर चिकित्सक मनाने या सगळ्या गोष्टींकडे पाहिले पाहिजे. प्रथम देश, मागाहून पंतप्रधान नि काँग्रेस अशा निर्लेप मनाने पाहिले पाहिजे. चालू सरकार बदलून घेणे हे लोकांचे आज महान कर्तव्य ठरते.

आज भारताला जगात कुणी मित्र राहिलेला नाही. हिटलरच्या जर्मनीभोवती जसा वेढा पडला होता तसे काहीसे येथे झाले आहे. पाकिस्तानला मिळावयाची अमेरिकन लष्करी मदत ही अत्यंत गंभीर अशी गोष्ट आहे. तिचे विराट परिणाम होतील. पाकिस्तानला अशी मदत मिळत असता इतस्ततः विखुरलेली खंडित झालेली इंतर मुसलमान राष्ट्रेही एक होतील व त्यांचे '' इस्लामी संयुक्त राज्य '' स्थापन होईल, हे काय सांगायला हवे ? या इस्लामी संयुक्त राज्याचा आपल्या

सबंध राष्ट्राला वेढा पडेल. मी तुम्हाला असेही निक्षून सांगतो की अफगाणिस्ताननेही अमेरिकन मदत स्वीकारली असून संकल्पित पाक-अफगाण फेडरेशनच्या बातम्यांचा जो इन्कार होत आहे ती केवळ ' धूळफेक ' आहे; दुसरे काही नाही. दुसऱ्या बाजूने आशिया काबीज करून त्याला कम्युनिझमच्या प्रभावळीत आणण्यासाठी रशिया व चीनही डाव टाकीत आहेत.

तेव्हा तुम्हाला प्रभावी व्हायचे असल्यास तुम्ही हातात बंदूका घेतल्या पाहिजेत. मऊ गुळगुळीत भाषणांनी काम व्हायचे नाही. तुम्ही कुठलीतरी एक खंबीर भूमिका घेतली पाहिजे. तुम्हाला पार्लमेंटरी सरकार पाहिजे काय ? ग्यानबाची मेख इथेच आहे. जर पार्लमेंटरी सरकार हवे असेल तर जिथे पार्लमेंटरी सरकार आहे व बाह्य आक्रमणाविरुद्ध त्याचे रक्षण करण्यासाठी जे सिद्ध आहेत अशांना आपण सहकार्य केले पाहिजे. तसे नको असेल तर उद्या आपण रशिया व चीन यांच्याशी दोस्ती करु या.



## ३१६

# निवडणुकीद्वारे जागा मिळविणे हे एक साधन आहे, साध्य नव्हे

दि. २० एप्रिल १९५४ रोजी फेडरेशनच्या कार्यकर्त्यांना हितोपदेश करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

गेल्या निवडणुकीत शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या झालेल्या पराभवामुळे माझे सहकारी हताश झाले असावेत आणि काहींना या निवडणुकाच नको, असेही वाटत असावे. परंतु त्यांनी असे हतबल होण्याचे काहीच कारण नाही. राजकारण हे पायरी पायरीने चढ घेत जाते. मी तरी अपयशाची कधीच पर्वा केली नाही, करीत नाही आणि यापुढेही करणार नाही. केवळ निवडणुकीत जागा मिळविणे हे फेडरेशनचे ध्येय नाही. निवडणुकीद्वारे जागा मिळविणे हे एक साधन आहे, साध्य नव्हे. फेडरेशनचे साध्य–ध्येय अस्पृश्य जनतेचा उद्धार करणे हे आहे आणि जोपर्यंत अस्पृश्य समाजाची सर्वांगीण उन्नती होत नाही तोपर्यंत शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन पक्षाची जरूरी आहे, नव्हे अत्यंत निकड आहे, आणि फेडरेशन तोपर्यंत जिवंत राहील, असे मी निक्षून सांगत आहे. ज्या काही फुटीर वावटळी उठल्या असतील त्या वारा संपल्यावर नाहीशा होतील, त्यांची खंत बाळगू नका. फेडरेशन पक्ष नसेल तर अस्पृश्यांना भारताच्या राजकारणात स्वाभिमानाचे स्थान उरणार नाही. फेडरेशनला अपयश येण्यामुळेच दिवसेंदिवस आपण आपल्या उद्धारासाठी नवनव्या कार्यक्रमाची आखणी करीत आहोत. जे फेडरेशनचे कार्यकर्ते आहेत, त्यांच्यावर मोठी जबाबदारी आहे. त्या सर्वांना असे सांगणे आहे की फेडरेशनला अपयश येणे हे वाऱ्याने झोडपलेल्या झाडासारखे आहे. परंतु त्यामुळे त्या फेडरेशनरूपी झाडाचे मूळच मरून गेले, असा अर्थ लावणे चुकीचे ठरेल. तेव्हा डोळे उघडून सतत कार्य करीत राहा.



---

जनता : २४ एप्रिल १९५४.

## ३१७

# आपला देश दोन राष्ट्रात विभागला आहे एक वरच्या लोकांचे, दुसरे खालच्या लोकांचे

भंडारा संसद पोटनिवडणुकीत उभे असलेल्या चारही उमेदवारांचा निवडणूक प्रचार आता या भागात अगदी शिगेस पोहचला आहे. दिनांक २१ एप्रिल १९५४ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे नागपूरहून निवडणूक प्रचारासाठी भंडारा येथे आले आणि सायंकाळी त्यांचे जाहीर भाषण झाले. वीस-वीस, पंचवीस कोसावरून बाबासाहेबांचे दर्शन घेण्यासाठी हजारो स्त्री-पुरुष भंडाऱ्यास जमा झाले होते.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर सायंकाळी ७-०० वाजता नव्या तलावाशेजारी विस्तीर्ण मैदानावर आले. या मैदानावर प्रशस्त व्यासपीठ व शामियाना उभारण्यात आला होता. गावोगावाहून आलेले हजारो लोक बाबासाहेबांच्या स्वागतासाठी अत्यंत आतुर झाले होते. बाबासाहेब सभास्थानी येताच " आंबेडकर जिंदाबाद ", " आंबेडकर कोण आहेत ? आमचा राजा आहे " अशा घोषणांनी सारे वातावरण दुमदुमून गेले.

सुरवातीस भजनाचा कार्यक्रम झाला. हा कार्यक्रम चालू असतानाच बाबासाहेबांना अनेक संस्थांकडून आणि व्यक्तींकडून हार अर्पण करण्यात आले. डॉ. बाबासाहेबांच्या बरोबर सौ. आंबेडकर, शे. का. फे. चे सरचिटणीस श्री. राजभोज, श्री. कांबळे, श्री. गायकवाड आदी मंडळी व्यासपीठावर चढली. भूतपूर्व म. प्र. शे. का. फे. चे अध्यक्ष श्री. दशरथ पाटील, बॅ. खोब्रागडे, श्री. आवळे, श्री. ना. ह. कुंभारे, श्री. भाऊसाहेब दलाल, श्री. निनावे वकील आदी मंडळी व्यासपीठावर दिसत होती.

व्यासपीठावरून समोरच्या जनसंमर्दाकडे पाहाताच कोणालाही पं. नेहरू यांच्या सभेला लोटणाऱ्या गर्दीची सहज आठवण होई. कमीत कमी दोन लाख लोक मोठ्या उत्साहाने या सभेला हजर झाले होते. भंडाऱ्यात एवढी प्रचंड जाहीर सभा आजपर्यंत कधी झाली नाही.

---

तरुण भारत, नागपूर : २३ एप्रिल १९५४.

हार समर्पणानंतर बाबासाहेबांना सुयश चिंतणारे आणि त्यांना निवडून आणण्याचे आश्वासन देणारे एक सुंदर गाणे खड्या आवाजात गायले गेले.

या सभेत बाबासाहेबांविषयीचा आपला आदर आणि भक्ती व्यक्त करण्यासाठी कारंजाचे श्री. महादेव बोरकर यांनी ५०१ रुपये व श्री. चंद्रभान श्यामकुवर यांनी १०१ रुपये बाबासाहेबांना अर्पण केले.

प्रथम नागपूर प्र. शे. का. फे. चे अध्यक्ष बॅ. खोब्रागडे यांनी प्रास्ताविक भाषण करून पोटनिवडणुकीची पार्श्वभूमी थोडक्यात सांगितली.

त्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर बोलावयास उभे राहिले आणि त्या दोन लाखांच्या जमावाने पुन्हा एकदा उच्चरवाने बाबासाहेबांचा जयजयकार केला. जवळपास दीड तास त्यांचे भाषण झाले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर भाषणाला सुरवात करून म्हणाले, जी दोन माणसे संसदेत पाठवायची आहेत त्यापैकी मी एक उमेदवार म्हणून उभा आहे. मला निवडणुकीत उभे राहाण्याची आवश्यकता नाही कारण मी वरच्या लोकसभेचा* सभासद आहे. पण खेदाची गोष्ट अशी की, या वरिष्ठ सभागृहात काहीही काम होत नाही, असे मी पाहिले आहे. मध्यवर्ती सरकारला वरिष्ठ लोकसभेची बैठक वारंवार भरवून देशहिताचे कार्य तिच्याकडून करून घेण्याची इच्छा नाही म्हणून मी शेवटी संसद निवडणुकीत उभे राहावयाचे ठरविले.

दोन जागांसाठी चार उमेदवार उभे असल्याने ही निवडणूक चुरशीची होणार आहे. कोणाला मत द्यावे, हे निश्चितपणे लोकांना सांगण्यासाठी मी हा दौरा सुरू केला आहे. मला प्रकृतीच्या कारणास्तव सर्वच ठिकाणी जाता येणे शक्य नसल्याने दोन-चार प्रमुख ठिकाणीच जाणार आहे. पण आज येथे काही कारणांमुळे उपस्थित नसलेल्यांना माझे विचार तुम्ही पोचवाल अशी आशा आहे.

संसदेतील ५०० पैकी सुमारे ४०० सदस्य काँग्रेसचे आहेत. अशी स्थिती असूनही हरेक मतदान क्षेत्रात कोणी उमेदवार उभा राहिला की, त्याला विरोध करणे हे लोकशाहीला लज्जास्पद आहे आणि ही झुंज ते लढवितात ते मारवाड्यांच्या पैशाच्या जोरावर. काँग्रेसने दोन उमेदवार उभे केले आहेत. त्यांचा हेतू काय ? तर काँग्रेसवाले सांगतात की, पंडित नेहरू यांचे हात बळकट करण्यासाठी या दोघांना संसदेत पाठवा. पण तसा पाठिंबा देण्याच्या लायकीचे पं. नेहरू आहेत काय ? याचा विचार अवश्य करावा लागेल.

---

*याठिकाणी राज्यसभा अभिप्रेत आहे—संपादक

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर सात वर्षाची मुदत मिळाली. त्या मुदतीत कर्तबगार पुरुष अस्मान खाली आणू शकेल. पण पं. नेहरू यांनी काय केले ? आम्ही ब्रिटिशांच्या राजवटीत स्वातंत्र्य का मागितले ? जे अनेक प्रश्न ब्रिटिश राजवटीत उत्पन्न झाले, त्यांची सोडवणूक आम्ही करू असे हे नेते त्यावेळी म्हणत. सध्याचा मुख्य प्रश्न विषमता हा आहे पण त्याविषयी कोणी बोलतच नाही. तसे पाहिले तर आपला देश दोन राष्ट्रात विभागला गेला आहे. एक राष्ट्र वरच्या लोकांचे आणि दुसरे खालच्या लोकांचे. सर्व मंत्री वरच्या वर्गाचेच, एखादा अपवाद सोडून. सामान्य माणसांना त्या स्वातंत्र्याचा यत्किंचितही फायदा मिळालेला नाही.

गेल्या वर्षी पं. नेहरू यांनी एका सभेचे उद्घाटन करताना सांगितले की, माझ्या दृष्टीने अस्पृश्यता हा सामाजिक प्रश्नच नाही. ते कामगार आहेत आणि इतर कामगारांबरोबर त्यांचेही प्रश्न सुटतील. गांधी लाजेकाजेस्तव का होईना, अस्पृश्यता हा हिंदू धर्मावरील कलंक आहे व तो धुवून टाकावा असे म्हणत. तेवढेसुद्धा हा माणूस म्हणत नाही.

सर्वोदय म्हणजे मला ढोंग वाटते. एक माणूस कसा सर्वोदय करू शकेल हे कळत नाही. व्यवहारात '' मात्स्य न्याय '' आहे. सर्वांचेच हित पाहिले पाहिजे. या म्हणण्यावर तुमचा विश्वास बसतो काय ? सर्वोदयाच्या अनुषंगाने मला विश्वामित्राची आठवण येते. विश्वामित्राने ब्रह्मदेवाशी स्पर्धा करून प्रतिसृष्टी निर्माण केली. तिचे वर्णन करताना मुक्तेश्वराने सांगितले आहे की, या विश्वामित्राच्या सृष्टीत जन्मजात हाडवैरी असलेले मुंगुस आणि साप प्रेमाने क्रीडा करीत होते, उंदीर मांजरीचे दूध पीत होते व सिंह आणि हत्ती परस्पर प्रेमाने नांदत होते. वास्तविक हे असे घडणे शक्य नाही. पण कवी मुक्तेश्वराने पुढे सांगितले आहे की, हे सर्व कपटजाल होते. सर्वोदय मजुरांबरोबर श्रीमंतांचे हित पाहाणार असेल, त्यांना प्रेमाने एकत्र नांदवू इच्छित असेल तर ते कपटजाल आहे असेच म्हणावे लागेल.

लाचलुचपत का होते याचे कारण हे आहे की, पंडित नेहरू यांच्या अंगी ताकद नाही. स्वतः पंडित नेहरू प्रामाणिक आहेत. त्यांच्याविषयी मला काही म्हणावयाचे नाही. पण त्यांचा दोष एकच की त्यांनी एखाद्याला मित्र म्हटले की, ते त्याला कायमचा आश्रय देतात. मेनन यांचे जीप प्रकरण तर प्रसिद्धच आहे. मी मंत्रीमंडळात असताना पंडित नेहरू यांना सांगितले होते की, हे इतके जागोजाग वकील का नेमता ? बेधडकपणे ८ कोटी रुपये दरसाल या वकिलातीवर खर्च करण्यात येतात. तुम्हाला माहीत नसेल म्हणून सांगतो की,

अमेरिका व कॅनडा येथील सरकारांनी, '' तुमच्या वकिलांना परत बोलवा '' अशी मागणी केली. तुर्कस्तान मधील वकिलाने अन्न खरेदीत गोंधळ घातला. परदेशात ज्या माणसांनी आपले आणि देशाचे नाव बद्दू केले त्यांना इकडे आल्यावर काय शिक्षा मिळते ? अशा एका माणसाला तो भारतात आल्यावर गुन्हेगार करण्यात आले आणि नंतर पुन्हा वकील म्हणून परदेशी पाठविण्यात आले. पंडित नेहरू हे गाजरपारखी आहेत. आपल्या आवडीची माणसे आणि देशाचे हित यात काहीच फरक नाही का ? पण पंडित नेहरू यांना हा फरक कळत नाही आणि अशा माणसाला पाठिंबा द्यायचा काय ?

पंडितजींचे पूर्वज ३०० वर्षापूर्वी भारतात आले. पण आजही त्यांना वाटते की, मी प्रथम काश्मिरी आहे आणि नंतर भारतीय आहे. तेव्हा मला आश्चर्य वाटते की, जो माणूस स्वतःला अभिमानाने प्रथम हिंदी म्हणवून घेत नाही, त्याला भारताचा पंतप्रधान होण्याचा काय हक्क ?

काश्मीरसाठी माझ्या भारताचे रक्तशोषण किती करावे याचा विचार ते करीत नाहीत. काश्मीरच्या राजाला एकूण ९ लाख रुपये वार्षिक तनखा आहे. पण त्यापैकी काश्मीर सरकार फक्त ३ लाख रुपये देते आणि बाकीचे ६ लाख भारत सरकार या देशातील जनेतवर कर बसवून मिळालेल्या पैशातून देते. मी निवडून गेलो तर मी त्यांना हे विचारणार आहे की, गेल्या सात वर्षात काश्मीरमधील आपल्या सैन्यावर किती रुपये खर्च झाले आहेत ? त्यांनी हे मुद्दाम गुप्त ठेवले आहे. माझ्या मते हा खर्च २०० कोटींवर गेला असावा. पण इकडे भारताची प्रजा उपाशी मरत असताना एवढा खर्च कसा करावा असा विचार पं. नेहरू यांना कधी सुचत नाही.

पं. नेहरू हे दुसऱ्या कोणी सुचविलेली चांगली गोष्ट घेण्यास तयार नाहीत आणि स्वतः काही नवीन सुचवावयास त्यांची बुद्धी नाही.

हल्ली लोक जसे सिनेमा स्टारचे वेडे होतात, तसे पं. नेहरूंसाठी वेडे झाले आहेत. पण सिनेमा स्टारच्या मागे लागून वेडा होणारा तरुण आपल्या आवडीच्या नटीचा सिनेमा पाहून परत घरी आल्यावर बायकोवर प्रेम करतो आणि सुखी होतो. पण पं. नेहरू यांच्याबाबतीत असे घडत नाही. ते सर्वजण पं. नेहरू यांनाच चिकटून बसतात.

महाभारतात सांगितले आहे की, द्रोण आणि भीष्म पांडवांची बाजू खरी आहे असे म्हणत. पण ऐन लढाईच्या वेळी मात्र ते कौरवांच्या बाजूने लढले. लोकांनी प्रश्न विचारला तेव्हा भीष्मानी सरळ सांगितले की, '' अर्थस्य पुरुषो दासः '' आज काँग्रेसला श्रीमंत मारवाडी लोक सढळ हाताने पैसा पुरवित आहेत. याचा परिणाम काय होईल ते तुम्ही जाणताच '' अर्थस्य पुरुषो दासः '' हे सूत्र येथेही लागू पडतेच.

पार्लमेंटमधील किती काँग्रेस सभासद किती भाषणे करतात हे त्यांना विचारा. बोरकर येथे असते तर मी त्यांना विचारले असते की, तुम्ही काय करणार आहात ? ते काय करू शकतात ? त्यांना कायद्याचे ज्ञान आहे का ? भत्त्याचे ३० रुपये मिळवण्यासाठी ते जात आहेत, या पलिकडे काय ? पार्लमेंटच्या कामाला पुनमचंदजी कितपत लायक आहेत हे मला माहीत नाही. लोकांचा आपल्यावर विश्वास आहे असे काँग्रेसला वाटते. पण वाटेल त्या माणसाला आमच्या नावावर मते द्या असे त्या विश्वासाचा दुरुपयोग करणे म्हणजे विश्वासघात नव्हे काय ? काँग्रेसचे लोक इतके निर्लज्ज बनले आहेत, धिक्कार असो त्या काँग्रेसच्या लोकांचा. '' चोरापासून सावध राहा '' अशा पाट्या आपण नेहमी वाचतो. मी तुम्हाला सांगतो की, काँग्रेसपासून सावध राहा. कारण ती चोर आहे.

माझा सर्व विश्वास अस्पृश्य वर्गाच्या मतदारांवर आहे. तुम्ही कोणत्याही प्रकारच्या लाचलुचपतीला बळी पडता कामा नये. मत ही एक अमोल चीज माना. आप '' गिरी हुआी '' जात का ? लक्षात घ्या की आपल्याला काही अधिकार नाही, ब्राह्मणांचे धार्मिक सामर्थ्यही आपल्याला नाही, सामाजिक सामर्थ्यही नाही म्हणून आपल्यासाठी मत ही राजकीय क्षेत्रातील एक अमोलिक चीज आहे. ती विकता कामा नये. आपण अल्पसंख्यांक आहोत. तेव्हा आपण एकेक दाणा निवडून भरला तरच पोते भरेल. ज्याला ज्याला मतदानाचा अधिकार आहे, त्याने अवश्य मतदान केले पाहिजे, तरच मी विजयी होईन.

मी राखीव जागेसाठी उभा आहे. पण ज्या स्पृश्यांना माझे धोरण केवळ अस्पृश्यांपुरतेच मर्यादित नसून, माझा दृष्टिकोन देशव्यापी आहे, असे वाटते, त्यांनीही मला मते द्यावीत. मी हे त्यांना सांगितले पाहिजे असे नाही.

दुसऱ्या मताचे काय करणार, असा प्रश्न विचारण्यात येतो. त्याचा खुलासा करणे अवश्य आहे. आम्ही कॉँग्रेसचा विरोध करीत आहोत. तेव्हा कॉँग्रेसला उपयोगी पडेल असे काहीही करता कामा नये. बोरकर आणि मी दोघेही आपलेच म्हणून तुम्ही जर माझ्याबरोबर बोरकरला मत दिले, तर माझे डिपॉझिटही जप्त होईल. मी विजयी व्हावे असे वाटत असेल, तर तुम्ही बोरकरला मुळीच मत देता कामा नये. आता उरले दोघे जण श्री. राका आणि श्री. मेहता.

मी समाजवादी पक्षावर नाराज आहे. त्याचा कारभार अनागोंदी आहे. मला अशी आशा होती की, ते इतर देशातल्याप्रमाणे तात्त्विक बैठकीवर आपली पक्ष संघटना उभी करून पुढे येतील. म्हणून मी त्यांना गेल्या निवडणुकीत मदत केली. पण आमचे त्यात फार मोठे नुकसान झाले आहे. आमच्या लोकांनी मते दिली म्हणूनच त्यांचे उमेदवार निवडून आले. पण त्याविषयी आभाराचा साधा शब्दही त्यांनी कधी बोलून दाखविला नाही. असे असल्यामुळे मला त्यांच्याविषयी खंतही नाही आणि आदरही नाही. त्रावणकोर-कोचीनमध्ये ते कम्युनिस्टांशी खांद्याला खांदा लावून लढले आणि निवडणुकीनंतर मात्र त्यांनी पगडी फिरवून '' तुमचा आमचा संबंध नाही '' असे सांगितले. त्यांना सगळी मंत्री पदाची घाई.

श्रीमती सुचेता कृपलानी यांनी मला पत्र पाठवून अशोकला पाठिंबा देण्याची विनंती केली आहे. तसेच अशोक मेहतांचेही मला पत्र आले आहे म्हणून आणि अशोक हे राकांपेक्षा राजकारणात अधिक मुरलेले आणि अधिक विद्वान आहेत यासाठी त्यांना आपले दुसरे मत द्या. ते सोशॅलिस्ट पक्षाचे उमेदवार आहेत म्हणून नव्हे तर ते '' अशोक '' आहेत म्हणून तुम्ही त्यांना आपले दुसरे मत द्या.

कॉँग्रेसविरोधी उमेदवारांना आपण प्रचंड बहुमताने निवडून द्याल अशी मला आशा आहे.

यानंतर श्री. राजभोज यांनी आभार मानल्यावर ही प्रचंड सभा हळूहळू विसर्जन पावली. ''

'' या सभेला अलोट जनसमुदाय लोटलेला होता. उन्हाळयाच्या दिवसामुळे लोक तहानेने व्याकूळ झाले होते. हॉटेलवर पाण्यासाठी होत असलेली गर्दी पाहून मालकाने एक ग्लास पाण्याची किंमत दोन आणे ठेवली. तरीही लोकांची गर्दी वाढतच होती. तसेच हॉटेलमधील खाद्यपदार्थ चुटकीसरशे संपले व त्यांची किंमतही हॉटेल मालकाला वाजवीपेक्षा जास्त मिळाली.'' [१]



[१] जनता : १ मे १९५४.

# दीपमालेतील न विझणाऱ्या दिव्याप्रमाणे, आमचा पक्ष लहान असूनही इतर पक्षांना मार्गदर्शन करील

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे भंडारा निवडणुकीसाठी येतील त्यावेळेस अस्पृश्यांनी आपली एकेक दिवसाची मजूरी जमवून सुमारे पाच हजार रुपयांची थैली त्यांना अर्पण करावी असा संकल्प पुलगाव येथील एका जाहीर सभेत प्रगट करण्यात आला होता.

" ज्या महान मानव श्रेष्ठाच्या दर्शनाकरिता मध्यप्रदेशातील विशेषतः खेड्यापाड्यातील जनता कित्येक दिवसापासून आशा करीत आहे त्या महर्षी परमपूज्य डॉ. बाबासाहेबांचे, दलितोद्धारकाचे, अप्रतिम देश-सेवकाचे शुभागमन रविवार ता. २५ एप्रिल १९५४ रोजी पुलगाव (जिल्हा वर्धा) येथील नाचणगावरोड पावर हाऊसच्या भव्य पटांगणावर होईल, या शुभप्रसंगी परमपूज्य डॉ. बाबासाहेबांना पाच हजार रुपयांची थैली अर्पण करण्याचा निर्धार पुलगाव नगर शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या नेतृत्त्वाखाली स्थापन झालेल्या आगमन समितीतर्फे केला आहे. याकरिता या सुवर्ण संधीचा फायदा घेऊन या पवित्र कार्यास प्रत्येक अस्पृश्य बंधु-भगिनींनी हस्ते परहस्ते, सढळ हाताने, स्वखुशीने तन-मन-धनाने मदत करुन निधी गोळा करण्याचा अधिकार असलेल्या कार्यकर्त्यांजवळच अधिकारपत्र पाहून निधी देण्याची कृपा करावी. वरील शुभ कार्यास सर्वत्र जनतेनी हजारोंच्या संख्येने उपस्थित राहून डॉ. बाबासाहेबांच्या अमृततुल्य भाषणाचा फायदा घ्यावा " असे ह. दा. आवळे, ऑर्गनायझींग व सुपरवायझींग सेक्रेटरी, मध्यप्रदेश शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन नागपूर, आणि आगमन स्वागत समिती, पुलगाव यांनी जनता ता. ३ एप्रिल १९५४ मध्ये प्रसिद्ध केले होते.

त्यानुसार रविवार, दिनांक २५ एप्रिल १९५४ रोजी पुलगाव (जिल्हा वर्धा) येथे मध्य प्रदेश इलेक्ट्रिसिटी बोर्डाच्या विस्तीर्ण पटांगणावर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या सत्कारार्थ एका प्रचंड सभेचे आयोजन करण्यात आले होते. भंडारा विभागातील संसदीय पोटनिवडणूकीकरिता डॉ. बाबासाहेब आंबेडकर या भागात निवडणूक प्रचारार्थ दौऱ्यावर आहेत. आपल्या आवडत्या नेत्याचे दर्शन घेण्यासाठी वऱ्हाडातून दूरदूरचे लोक मुद्दाम येथे आले होते.

---

जनता : १२ डिसेंबर १९५३, १ आणि १५ मे १९५४.

या प्रसंगी शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे कार्यकर्ते आणि डॉ. बाबासाहेबांचे चहाते यांनी पाच हजार रुपयांची थैली डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना अर्पण केली. या प्रसंगी शे. का. फेडरेशनचे सरचिटणीस श्री. पी. एन. राजभोज, गुजरातचे श्री. परमार, महाराष्ट्राचे श्री. गायकवाड, मराठवाड्याचे श्री. बी. एस. मोरे यांची या सभेत भाषणे झाली.

यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर याचे भाषण झाले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

भगिनींनो आणि बंधुंनो,

मी या भागात, भंडारा जिल्ह्यात निवडणुकीच्या दौऱ्यावर आलो आहे. हा विभाग निवडणूक विभागात येत नाही. पण काही लोकांनी ५,००० रुपयांची थैली अर्पण करण्याचे मला आश्वासन दिले. पूर्वीच २,००० रुपये दिले व सध्या १,५०० रुपये अर्पण करतो, असे येथील कार्यकर्ते म्हणतात. अशा प्रसंगी निवडणुकीच्या बाबतीत काही सांगणे अप्रयोजक आहे. परंतु ज्या विषयासंबंधाने मी बोलणार आहे ते मात्र महत्त्वाचे आहे.

१९५२ साली झालेल्या निवडणुकीत सर्व भागात फेडरेशनचा पराभव झाला; तेव्हा काँग्रेसला फार आनंद झाला. यावेळी काँग्रेसच्या विरुद्ध झगडणारा फेडरेशन हा एकच पक्ष होता. दुसरे पक्ष आपआपली भूमिका विसरून गेले. आम्ही निवडणुकीत हरलो असे पाहून काही लोक मला म्हणत, आंबेडकरांनी हा पक्ष नाहिसा करावा, खुंटीला टांगून ठेवावा. कारण यात काही जीव नाही, त्राण नाही. बाहेरच्या लोकांप्रमाणेच आमच्यातीलही काही लोक असेच म्हणत. पण मला तसे काही वाटत नाही. आता झालेल्या काही सभातून जे २-३ लाखाचे वर लोक जमले त्यावरून फेडरेशनची आवश्यकता स्पष्टपणे प्रतीत झाली. (टाळ्या) फेडरेशनची आवश्यकता काय आहे हे जाणून घेण्यासाठी आजच्या परिस्थितीत देशाचा कारभार कसा चालू आहे, ही गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. इंग्लंडात जेव्हा एखादा पक्ष अधिकारारूढ होतो तेव्हा तो सर्व लोकांना समभावाने वागवितो. कॉन्झरवेटीव्ह पक्ष अधिकारावर असला तर लायसन्स अथवा ग्रँट देताना व्यक्तीच्या राजकीय पक्षाचा, अधिकारी वर्ग मुळीच विचार करीत नाही. हीच नीती इतरही देशात आहे. पण ह्या देशातील राज्यकर्ते इतर पक्षाबद्दल बेपर्वा आहेत. ज्या लोकांनी लहान-मोठ्या संस्था चालविल्या त्यांना मी सांगितल्याप्रमाणे कटु अनुभव आले असतील. इंग्रजांच्या राज्यात अधिकारी वर्ग कोणाबद्दलही मनात अढी न बाळगता न्याय देई पण आज पांढरी टोपी घालणारा काँग्रेसचा बगळा जिल्ह्याचा

राजा आहे. तो एखाद्या व्यक्तिला घेऊन न्यायाधिशाकडे जातो व त्याच्याबद्दल शिफारस करतो. त्याने नाही ऐकले तर तो मिनिस्टरपर्यंत पोहोचतो. जर न्यायाधीश प्रामाणिक असेल तर बिचाऱ्याच्या नोकरीवरून पाणीच फिरले म्हणून समजा.

या साऱ्याचं कारण एकच. या देशात राज्यकर्त्या पक्षाला बंधन घालणारा दुसरा मजबूत पक्ष नाही. अशीच परिस्थिती चालू राहिली तर येथे जर्मनीप्रमाणे हिटलरशाही अथवा रशियाची स्टॅलिनशाही आल्याशिवाय राहणार नाही. याकरिता आम्ही अल्पसंख्य असूनही विरोधाचा अग्नी तेवत ठेवू. या कार्यात इतरांचे सहकार्य मिळो वा न मिळो. केव्हाना केव्हा आमची मनोभावना, कार्यशक्ती याचा इतरांवर परिणाम होऊन ते आमचे ऐकतील. ज्याप्रमाणे एखाद्या दीपमालेतील सर्व दिवे विझले पण एकच पणती मिणमिणत राहिली तरी पण तीच साऱ्यांना मार्गदर्शन करते. त्याचप्रमाणे आमचा पक्ष लहान असूनही इतर पक्षांना मार्गदर्शन करील.

इलेक्शन ही क्रिकेटची मॅच आहे. क्रिकेटमध्ये पराभव झालेली टीम गाशा गुंडाळून स्वस्थ बसत नाही. ती पुन्हा दुसऱ्या वर्षी नव्या जोमाने खेळावयास प्रारंभ करते. असाच आशावाद आपण ठेवला पाहिजे. दोन वर्षांपूर्वी लखनौला भाषण देताना काँग्रेस हे जळते घर आहे, असे मी सांगितले होते. याचे तुम्हाला प्रत्यंतर आलेच असेल. आता या घराचे फक्त आढे जे नेहरू तेच उरले आहे, तेही थोड्याच दिवसात जळून जाईल. आपल्याजवळ आर्थिक बल नाही. फक्त राजकीय सामर्थ्य आहे. शरण जाणे माणसाला शोभत नाही. प्रसंगात माणूस शरण जातो पण पुन्हा तलवार हाती घेतो. आपली स्थिती यापुढे १९५२ च्या निवडणुकाप्रमाणे होणार नाही. मनुष्य कितीही दीर्घायुषी असला तरी त्याला उतरती कळा लागणारच. पण आपला मग उत्कर्षच होणार आहे. म्हणून संघटना मजबूत करा हेच माझे नेहमीचे निक्षून सांगणे आहे.

● ● ●

# ३११

# आदिवासी अजूनही रानटी युगातच आहेत स्वातंत्र्याने त्यांच्या जीवनात बदल घडवून आणलेला नाही

भंडारा संसद पोटनिवडणुकीच्या प्रचारासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर वडसा (जिल्हा चंद्रपूर) येथे दिनांक २९ एप्रिल १९५४ रोजी आले. तेथे आयोजित सभेला संबोधित करताना ते म्हणाले,

तुम्ही अस्पृश्यांसाठी काय केले ? या प्रश्नास उत्तर देताना येथील प्रचंड निवडणूक सभेत डॉ. आंबेडकर यांनी, तत्कालीन ब्रिटिश सरकारकडून अस्पृश्यांसाठी ज्या शैक्षणिक सोयी करवून घेतल्या त्यांचा उल्लेख केला व लेव्हिन कमिशननुसार परदेशात उच्च शिक्षण घेण्यासाठी दर वर्षी पाठविण्यात यावयाच्या विद्यार्थ्यांच्या एकूण संख्येच्या साडेबारा टक्के अस्पृश्य विद्यार्थी निवडले जावे अशी तरतूद केल्याचे सांगितले. ते पुढे म्हणाले, '' हिंदुस्थानात अस्पृश्यांबाबत जी गोष्ट कधीही घडली नव्हती, ती आता घडत आहे. ती म्हणजे एकाच वर्षी एकदम १६ अस्पृश्य विद्यार्थी परदेशात पाठविले जाणार ही होय.

लोकशाहीत जो कोणी लोकांचा प्रतिनिधी म्हणून अधिकाराच्या व जबाबदारीच्या जागेवर स्थानापन्न होतो, त्याचे दोष उघडकीस आणून व त्यामुळे होणाऱ्या चुका टाळून पर्यायाने देशकल्याण करण्याचे कर्तव्य प्रत्येक नागरिकाने पार पाडले पाहिजे. त्यासाठी योग्य टीका करण्याचा हक्क प्रत्येक नागरिकास प्राप्त झाला आहे. नेहरू हे कोणी देवाचे अवतार नव्हेत. कुठल्याही जबाबदारीच्या व अधिकाराच्या स्थानावर असलेल्या माणसाचे दोषदिग्दर्शन करण्यासाठी मी टीका करीन.'' घटना परिषदेच्या वेळचे निरनिराळे अनुभव सांगताना डॉ. आंबेडकरांनी स्वतःचे राज्यशास्त्रविषयक ज्ञान किती सखोल आहे हे पटवून दिले व ' नेहरू व आंबेडकर यात राजा भोज कोण व गंग्या तेली कोण ' हे लोकांनी ओळखावे, असे सांगितले. काश्मीरविषयी ते म्हणाले, '' आपल्या पंतप्रधानांना हिंदुस्थानच्या भवितव्याऐवजी जर काश्मीरचाच मोह सुटला असेल, तर त्यांनी पंतप्रधानाची जागा रिकामी करून खुशाल काश्मीरचा राजा व्हावे.''

---

दैनिक 'तरुण भारत,' नागपूर : २ मे १९५४.

शेवटी ते म्हणाले, " आदिवासी अजूनही रानटी युगातच आहेत. त्यांच्या जीवनात कुठल्याही प्रकारचा बदल स्वातंत्र्याने घडवून आणलेला नाही. त्याचप्रमाणे सर्वोदयाची कल्पना ही मुक्तेश्वराने वर्णिलेल्या विश्वामित्राच्या सृष्टीची प्रतिकृतीच होय."



## ३२०

# तत्त्व आणि व्यवहाराची सांगड घातली नाही तर वरिष्ठ वर्गाचा नि:पात होण्यास वेळ लागणार नाही

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी तारीख २ मे १९५४ रोजी मुंबईच्या सिद्धार्थ कॉलेजमध्ये यूथ असेंब्लीचे उद्‌घाटन केले.

त्याप्रसंगी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण झाले. ते म्हणाले,

मी गेली कित्येक वर्षे विद्यार्थी चळवळीचे निरीक्षण करीत आहे. परंतु केवळ शिक्षणाच्या प्रश्नांकडे किंवा विद्यार्थांच्या अडीअडचणींकडे विद्यार्थ्यांच्या एकाही परिषदेने लक्ष दिलेले मला दिसले नाही. विद्यार्थ्यांच्या निरनिराळया संस्था, निरनिराळया राजकीय पक्षांच्या चाकाला बांधलेल्या असतात. एवढेच नव्हे, तर काही विद्यार्थी संघटना कम्युनिस्ट राष्ट्रांना तर काही संघटना लोकशाहीवादी राष्ट्रांना पाठिंबा देण्यासाठीच जन्माला आल्या आहेत असे मला वाटते. त्यामुळे शिक्षणाच्या प्रश्नाकडे लक्ष न देता केवळ वादाच्या नादाने भलतीकडेच त्या वहात जातात.

स्वातंत्र्य, समता व भ्रातृभाव यांच्या आपण खूप गप्पा मारतो. नव्हे, या त्रयीवर आपण व्याख्यानेही झोडू शकतो. परंतु या तिन्हीपैकी एकतरी आपल्या भारतीय समाजात बसत आहे की नाही याचा विचारही आपण करीत नाही. जणू काही तत्त्वांची आणि व्यवहारांची सांगड घालण्याची आपणावर काहीच जबाबदारी नसल्याचे वाटते !

भारतामध्ये बहुसंख्य जनता अज्ञान आणि भोळसर खुळया कल्पनेत गुरफटून गेली आहे. नव्हे, येथील समाज रचनाच खुळया कल्पनांना जन्म देते. म्हणून उपास-तापास, नवस-सायास, देव-देवऋषी करणे म्हणजे धर्मपालन करणे अशी लोकांची भावना झालेली आहे. या खुळया आणि धर्मभोळया जनतेची या कल्पनेतून सुटका करावयास पाहिजे. विद्यार्थ्यांनी चाळीचाळीत जाऊन जनतेचे अज्ञान आणि खुळया समजूती दूर केल्या पाहिजेत; तरच आपल्या शिक्षणाचा जनतेला काही तरी लाभ होईल. आपण आपल्या ज्ञानाचा केवळ

---

प्रबुद्ध भारत जयंती विशेषांक : १४ एप्रिल १९५६.

परीक्षा पास करण्यासाठीच उपयोग करून चालणार नाही. ज्ञानाचा उपयोग आपण आपल्या बांधवांची सुधारणा, प्रगती करण्याकरिता केला पाहिजे. तरच भारत उन्नतावस्थेला जाईल.

जगातील अनेक गुंतागुंतीचे प्रश्न सुटलेले नाहीत. ते सोडविण्याचा मानव सारखा प्रयत्न करीत आहे. त्यासाठीच निरनिराळे सिद्धांत पुढे मांडण्यात येतात. कार्लमार्क्स आज आपणापुढे खरा प्रश्न आहे. आजचे प्रश्न सोडविण्यास मार्क्सच्या विचारसरणीऐवजी दुसरी एखादी प्रभावी विचारसरणी उपयोगी पडेल काय ? हाच आजच्या काळाचा प्रश्न आहे. आपले सारे प्रश्न सोडविण्यास कार्लमार्क्सचे सिद्धांत समर्थ ठरतील की नाही हीच आजची समस्या आहे. ही समस्या आजच्या पिढीने शक्य तितक्या लवकर सोडविली पाहिजे.

या देशात बहुसंख्य लोक अज्ञानात आणि दारिद्र्यात आहेत. वरिष्ठ वर्ग या लोकांची सारखी पिळवणूक करीत आहे. म्हणूनच मी सांगू इच्छितो की, वरिष्ठ वर्गानी वेळीच जागे होऊन बहुसंख्य पददलित लोकांच्या आशाआकांक्षा, भावना विचारात घेतल्या पाहिजेत. त्यांनी वेळीच आपले वर्तन सुधारले नाही तर त्यांचा संपूर्ण निःपात होण्यास फार वेळ लागणार नाही !

● ● ●

# ३२१

# तुम्ही बांधलेल्या देवळात बुद्धाच्या मूर्तीची प्रतिष्ठापना करा

मु. देहू रोड, जि. पुणे येथे संत चोखोबाराय व बुद्ध वाचनालय मंदीर बांधण्यात आले आहे. या मंदिरासाठी आजपर्यंत एकूण १,२०० रुपये जमा झाले. या रकमेत मंदिराचा कळस होऊन अर्धे अधिक काम व्हावयाचे आहे. या मंदिरात मूर्तीची प्रतिष्ठापना करण्यासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर लोणावळा मुक्कामी आले असता, मंदीर समितीच्या काही सदस्यांनी त्यांची भेट घेतली. सदरप्रसंगी डॉ. बाबासाहेबांनी बौद्धधर्माबद्दल सविस्तर माहिती सांगून, बौद्धधर्म प्रचाराची अत्यंत आवश्यकता असल्याचे मंडळीस समजावून देताना ते म्हणाले,

तुम्ही चोखोबारायाचे मंदीर बांधले आहे. ज्या चोखोबाची मूर्ती आपल्या नजरेसमोर नाही किंवा पाहिलेली नाही, किंबहुना त्या काळात चोखोबाला आपल्या जीवनात काही करता आले नाही, त्या चोखोबाबद्दल आपण आस्था बाळगणे हितावह नाही, आणि म्हणून आपण आता ज्या भावनेने प्रेरित झालो आहोत त्या भावनेला या काळात तरी पायाखाली तुडविता येत नाही.

माझ्या कार्याचा एक भाग जर मी या विषयासाठी ठेवला असता तर या गोष्टीबद्दल जनतेत आदर निर्माण झाला असता व माझ्या ध्येयाचे धागेदोरे हमखास जगभर पसरले असते. परंतु माझ्या मागे अनेक कामांचा व्याप असल्यामुळे मला या गोष्टीसाठी थोडाही वेळ देता आला नाही.

धर्म, प्रचलित रुढीच्या आहारी गेलेली दलित जनता अंधश्रद्धेने अधोगतीस गेली आहे. हिंदू धर्माच्या ३३ कोटी देवांची पूजा करताना हजार पावसाळे त्यांनी घालविले. धर्माचा अभिमान म्हणून आजवर ही भोळी जनता त्याची री ओढीत आहे. परंतु सत्यता, अहिंसा, परोपकार या त्रिवेणी संगमाचा झरा वाहणाऱ्या झऱ्याला शंकराचार्यांनी बांध घातला व आज तीच नदी समुद्र होऊन तिच्यात काही अंधश्रद्धाळू पूज्य भावनेने स्नान करून पापाचे क्षालन करीत आहेत. ज्या धर्मात माणुसकी नाही त्या धर्माच्या देवाबद्दलसुद्धा आपलेपणा वाटणे इष्ट नाही आणि म्हणून आता यापुढे आपणास अन्य भावनेने किंवा हेतूनेच पुढील कार्याची आखणी करावयास पाहिजे. म्हणून मला तुम्हाला असा सल्ला द्यावासा वाटतो की, तुम्ही बांधलेल्या देवळात बुद्धाच्या मूर्तीची प्रतिष्ठापना करा.

शेवटी मंदिर समितीने, मूर्तीची प्रतिष्ठापना डॉ. बाबासाहेबांच्या हस्तेच करण्याची इच्छा त्यांच्यासमोर व्यक्त केली. तेव्हा मूर्तीच्या प्रतिष्ठापनेसाठी जातीने हजर राहाण्याचे आश्वासन देऊन, मित्राकडून बुद्धाची मूर्ति देवविण्याचेही डॉ. बाबासाहेबांनी कबूल केले आहे.



---

जनता : ८ मे १९५४.

जनतेच्या अंकात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या भेटीची तारीख दर्शविली नाही- संपादक.

# ३२२

# समाजाची दिशाभूल करणाऱ्या पुढाऱ्यांवर कडक नजर ठेवली पाहिजे

मुंबईतील कामा हॉलमध्ये दि. १ जुलै १९५४ रोजी मुंबई प्रदेश शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या वार्ड कमिट्यांच्या बैठकीत डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी भाषण दिले ते म्हणाले,

बंधु आणि भगिनींनो,

तसे पाहिल्यास मला या ठिकाणी काही स्थान आहे असे वाटत नाही. कारण मी कोणता एखादा वार्ड मेंबर म्हणून येथे आलो नाही, तर पुढे होणाऱ्या हीरक महोत्सवासाठी तुम्ही किती पैसा गोळा केला आहे व करणार आहात हे पाहावयासाठी मी येथे आलो. बऱ्याच शेड्यूल्ड कॉस्ट्स् फेडरेशन शाखेच्या कार्यकर्त्यांनी आजपर्यंत पैसा जमविला, पावत्या पुस्तके नेऊन पैसा उकळला, परंतु योग्य त्या अधिकाऱ्याकडे मात्र तो पोहोचता केलेला नाही असे मला आढळून आले आहे. कुणाकडे किती पैसे आहेत व त्याची काय विल्हेवाट लावली आहे याचा हिशोब नाही. तेव्हा त्या गोष्टीची अगोदर चौकशी व्हावी असे मला वाटते.

आज पर्वताला देखील मुंग्या भोके पाडू लागल्या आहेत व आता पुढेही पाडीत राहातील याची तुम्हाला फारशी जाणीव नाही. तेव्हा आज तुमची ही स्थिती आहे, पुढे काय होणार ? तुमचा भावी काळ काय आहे ? तुमचे भवितव्य काय आहे ? ह्याची अजून कल्पना नाही. तुमच्या पुढील काळाची जरी कल्पना असली तरी आज मी तुम्हाला त्याबद्दल काही बोलत नाही. असा एखादा दिवस येईल की, ज्या दिवशी मी तुम्हा साऱ्यांना एकत्र जमा करून पुढे काय होणार आहे व त्याकरिता काय करावयास पाहिजे, हे सर्व काही सांगेन. निदान आजतरी या बाबतीत मी काही बोलू इच्छीत नाही. परंतु तुमच्या भविष्यकाळाकडे नीट नजर द्या.

आपल्या सार्वजनिक कार्यासाठी अशा एखाद्या हॉलची जरूर आहे की ज्याच्या भाड्यावर आपला थोडाफार सार्वजनिक खर्च भागेल. त्यासाठी पैशाची अत्यंत आवश्यकता आहे. तुम्ही ८७ हजार जमा केले पण मी एक लाखाच्यावर जमा केले आहेत. अद्याप आपल्याला २५ हजारांची आवश्यकता आहे. त्याकरिता तुम्ही ठिकठिकाणी चाळ कमिट्या स्थापन करा. ज्यांच्याकडे पावत्या पुस्तके

जनता : ३ जुलै १९५४.

किंवा त्याबद्दलचे पैसे शिल्लक राहिले असतील त्यांच्याकडे जा, त्यांच्या सारखे पाठीशी लागून, त्यांच्याकडून सार्वजनिक कामाचा पैसा काढून योग्य माणसाकडे पोहचता करा. सार्वजनिक काम करताना, समाजाचा पैसा देताना किंवा घेताना कोणी आपणाला फसवीत तर नाहीना याचा संपूर्णपणे विचार करा. असा पैसा गोळा करणे व योग्य त्या व्यक्तिकडे पोहचता करणे हे तुम्ही तुमचे कर्तव्य समजले पाहिजे. कारण समाजाचा पैसा खाण्याची चाल अलिकडे फार बोकाळली आहे व त्याचा निदान मला तरी अत्यंत कंटाळा आला आहे. अशा लोकांना समाजातून हुडकून काढले पाहिजे व कोण समाजाला कशा धर्तीने फसवितो हे बारकाईने पाहिले पाहिजे.

समाजात कार्य करणारी माणसे अत्यंत थोडी असतात. कार्याची कळकळ फार थोड्या माणसांना असते. सर्वजण कार्यकर्ते असते तर इमारत फंडासाठी एवढा आटापिटा करावयास लागलाच नसता. सामाजिक कार्याचा उमाळा फारच थोड्या लोकांना असतो. बाकीचे सर्वजण शेणातल्या किड्याप्रमाणे स्वतःच्या आनंदात मग्न असतात. तेव्हा अशा माणसाला टोचून ' तू शेणातल्या किड्याचे जीवन जगतो आहेस ' याची जाणीव करून देणे हे प्रत्येक सुशिक्षिताने आपले कर्तव्य समजले पाहिजे.

निदान आज तरी ' आंधळे दळते कुत्रे पीठ खाते ' अशी परिस्थिती समाजापुढे येऊन ठेपली आहे. आम्ही शेताची राखण व्हावी म्हणून खास कुंपणाची सोय केली. परंतु आता कुंपणच शेत खाऊन टाकायला लागले आहे. तेव्हा याला काय म्हणावे. या बिकट प्रसंगाची जाणीव प्रत्येकास झाली पाहिजे.

समाजाची अशा धर्तीने दिशाभूल करणाऱ्या पुढाऱ्यावर कडक नजर ठेवली पाहिजे. सामाजिक जीवनातील त्याच्या चळवळीवर बारकाईने लक्ष पुरविले पाहिजे. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे आजपासून तीन चार महिन्यांनी हीरक महोत्सवासाठी मी येणार आहे, तेव्हा इमारत फंड जितक्या लवकर जमा होईल तितका बरा. कारण त्या कार्याला आता उशीर लावण्यात काही तथ्य आहे असे मला वाटत नाही. म्हणून जागोजागी चाळ कमिट्यामधून पैसा गोळा करा. ज्याच्याकडे पैसे राहिले असतील, पावत्या पुस्तके राहिली असतील ती गोळा करा. मी तुमच्याबरोबर आहेच.



# ३२३

# तुमची झोपडी जिवंत राहिली तर लोक तुमच्या आश्रयाला येतील

तारीख २६-२७ ऑक्टोबर १९५४ रोजी मुंबई प्रदेश अखिल भारतीय शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे अधिवेशन, मुंबई येथील पुरंदरे स्टेडियमवर घेण्यात आले होते. पहिल्या दिवशी डॉ. बाबासाहेब आंबेडकर परिषदेला हजर राहून त्यांनी कार्यकर्त्यांना मार्गदर्शन केले. त्याच दिवशी श्री. आर. डी. भंडारे यांनी ' शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या कार्यकारिणीचे आणि शाखांचे विसर्जन करून नव्या निवडणुका घेण्यात याव्या ' हा ठराव डॉ. बाबासाहेबांच्या संमतीने मांडला व त्या ठरावाला पुण्याचे श्री. आर. आर. भोळे यांनी पाठिंबा दिला. सदर ठराव बहुमताने व टाळ्यांच्या गजराने पास करण्यात आला. या ठरावामुळे फेडरेशनच्या कार्यकर्त्यांमधील असंतोष कमी झाला यात तिळमात्र शंका नाही. कारण सध्याचे पदाधिकारी १९४५ मध्ये नेमले गेले होते आणि तेव्हापासून ते जागा अडवून बसल्यामुळे इतर कार्यकर्ते अस्वस्थ झाले होते. नव्या निवडणुका ६ महिन्यांच्या आत होणार आहेत.

पहिल्या दिवशी दिनांक २६ ऑक्टोबर १९५४ रोजी परिषदेला मार्गदर्शन करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

मित्रहो,

ज्या कार्याकरता आपण ही सभा भरविण्याचे ठरविले होते तो उद्देश सभासंचालकांना पूर्णपणे समजलेला दिसत नाही. नाहीतर ही आता जी सभा चव्हाट्यावर भरली आहे ती कुठे तरी गुप्त ठिकाणी भरली असती. मला कार्यकर्त्यांना बरेच सांगावयाचे होते परंतु ते गुप्त सांगावयाचे होते. आता मी जे सांगणार आहे ते स्पष्टपणे सांगणार नाही. त्याचा मी फक्त मतितार्थ सांगणार आहे. . शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनमध्ये जी घाण साचली आहे ती उपसण्याचा माझा इरादा होता. म्युनिसीपालिटीची गटारे साचली म्हणजे कशी घाण होते त्याप्रमाणे शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनमध्ये घाण निर्माण झाली आहे. ती घाण गुप्तपणे उपसावयास पाहिजे होती. शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या राजकारणाला १९१९ सालापासून सुरूवात झाली. त्याचे

---

जनता : ६ नोव्हेंबर १९५४.

अगोदरसुद्धा अस्पृश्य चळवळीचे काम चालू होते. ही संस्था आजकालची नाही. ती काँग्रेसइतकीच नव्हे तर त्यापेक्षा जास्त जुनी आहे. काँग्रेसच्या आयुष्याला सुरूवात गांधीजींच्यापासूनच झाली, असे म्हणण्यास हरकत नाही आणि ते साल देखील १९१९ सालच आहे. दुर्दैवाची गोष्ट म्हणजे त्या सालापासूनच आम्हाला काँग्रेसशी विरोध करावा लागला आहे. तेव्हा तरी काँग्रेसशी विरोध करणे हेच कार्य ठरले होते. त्यांच्यापासूनच आपल्या हक्कांची पायमल्ली होत होती. शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन हे तेव्हापासून टिकून राहिले आहे. शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन हा दगडाचा परंतु भक्कम किल्ला आहे. काँग्रेसचा किल्ला हा पैशावर उभारला आहे. लोकमान्य टिळक फंड आणि गुजराथी बंधूंची थैल्यांची मदत यावर हा किल्ला उभारला आहे. परंतु शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचा किल्ला हा अस्पृश्य जनतेच्या भावनेवर उभारला आहे. हा किल्ला मोडू नये, अशी माझी पूर्ण इच्छा आहे. माझे शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनकडे गेली १० वर्षे दुर्लक्ष झाले. या १० वर्षाच्या गैरहजेरीत शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनमध्ये पुष्कळ मतभेद निर्माण झाले आहेत. यापूर्वी असले मतभेद नव्हते. प्रत्येक माणसाने फेडरेशनमध्ये गटबाजी सुरू केली आहे. प्रत्येकाने आपापले लहान लहान गट निर्माण केले आहेत. एकाचे वर्चस्व दुसऱ्यास नको आहे. यामुळे आपले लोक अजून तरी राजकारणात पक्के मुरले नाहीत. राजकारण म्हणजे काय ह्याची त्यास पूर्णपणे जाणीव नाही. आपल्या समाजात आपापसात फार मतभेद असतात. ते मतभेद ताबडतोब नष्ट होत नाहीत. त्या मतभेदाची झाडे त्यांच्या पोटात वाढू लागतात. त्यांचे मतभेद त्यांच्या मुलांच्याही पोटात वाढतात. अशा रीतीने मतभेद हे वाढत जातात. हा गुणधर्म आपल्या लोकात जास्त प्रमाणात आहे. काँग्रेससारख्या पक्षातसुद्धा मतभेद आहेत. त्याबरोबरच त्यांच्याजवळ काही सद्‌गुणही आहेत, असे अनुभवाने म्हणावे लागते. त्यांचा एक गुण फार महत्त्वाचा आहे आणि तो म्हणजे बहुमताने ठरलेले ते सर्व मान्य करतात. मग त्या गोष्टीचे विरोधकसुद्धा खोट्याचे समर्थन करू लागतात. ही कृती राजकारणात फार आवश्यक आहे. माझ्या मताप्रमाणे जर कारभार चालला तरच मी संस्थेत राहीन, अशी प्रवृत्ती फार वाईट. हम करे सो कायदा नको.

संस्थेत कोण मोठा ? डॉ. आंबेडकरांचे खालोखाल कोण ? वगैरे मतभेद फार वाढले आहेत. दलित फेडरेशनच्या परिषदा होत नाहीत. इलेक्शन्स होत नाहीत, असे मी नेहमी कार्यकर्त्यांकडून ऐकतो. हे सर्व खरे असले तरी त्याचा त्यांनी विचार केला आहे काय ? या गोष्टीला लागणारा पैसा आमचेजवळ नाही. म्हणून परिषदा बोलावणे, इलेक्शन्स घेणे हे आम्हाला शक्य

नाही. भोळे यांनी जर आम्हाला पैसा पुरविला तर वर्षातून काय परंतु सहा महिन्यानीसुद्धा आम्ही परिषदा घेऊ. तसे पैसे देऊन भोळयांनी पुण्याला बोलवावी बैठक ! काँग्रेससारख्या संस्थेजवळ पैसा आहे, आम्हाला पैशाची अडचण आहे. काही लोक म्हणतात आपण सरकारवर टीका करू नये, त्याचेशी सहकार्य करावे. आमचे हक्क पदरात पाडणे, हेच आमचे पहिले काम आहे. ते हक्क जर पदरात पडत नसतील तर आम्ही टीका करणारच. सरकारवर टीकाच नसेल तर दलित फेडरेशनची आवश्यकता तरी काय आहे ? सरकार काय, देव आला तरी आम्ही त्याच्यावर टीका करूच. ज्यांना हे पसंत नसेल त्यांनी दलित फेडरेशन सोडून जावे. आम्ही सरकारशी सहकार्य केले नाही काय ? मी चार वर्षे त्याच्याबरोबर नव्हतो का ? आम्ही वेळोवेळी सहकार्य देत आलो आहोत. सरकार जर आमच्याकरिता काही करणार नसेल तर आम्ही सदोदित टीका करू. आम्ही गप्प का बसावे ?

लोक सांगतात की दलित फेडरेशन चढाव करत नाही. चढाव म्हणजे काय ? चढावाचे राजकारण आम्हाला पचणार आहे काय ? आम्ही चढाव केला तर त्याचा तुम्हालाच त्रास होईल. आम्ही तुरूंगात जाऊन बसलो तर तुम्हालाच लोक छळतील. तुम्ही आंबेडकरांना मदत करता काय बेट्यांनो ? तुमचे पाहून घेऊ, असे म्हणून तुम्हालाच त्रास देतील. यापेक्षा तुम्ही कष्ट करा. कष्ट करणे हा माझा धर्मच होऊन बसला आहे. मला अजून विश्रांती मिळाली नाही आणि मी विश्रांतीही घेत नाही. दुसरी गोष्ट आपले मन निर्मळ पाहिजे. त्यामुळे आपसातील मतभेद नाहीसे होतात. दलित फेडरेशनमध्ये मुख्य वाद आहे तो डॉ. आंबेडकरानंतर मुख्य कोण ? याचा अर्थच मला कळत नाही. मी मरण्याचे अगोदरच हा वाद निर्माण झाला आहे. म्हणजे मी लवकरच मरावे की जगावे असा प्रश्न माझ्यापुढे निर्माण होतो. बरे हा वाद तर मिटविलाच पाहिजे, यावर मी एक उपाय शोधून काढला आहे. हा वाद मिटविण्याकरिता दलित फेडरेशनच्या पुढाऱ्यांचे आणि मेंबर्सचे इलेक्शन झाले पाहिजे. तरच हा वाद मिटेल. जो काम करतो तोच खरा पुढारी. लोकांना माहीत आहे. खरा पुढारी कोण ? काम केले तर लोक खरा पुढारी कोण हे समजू शकतात. ही पद्धत अंमलात आणण्याकरिता चार आण्याची वर्गणी आम्हास नको. दलित फेडरेशनमध्ये पैसे खाण्याची प्रवृत्ती फार प्रमाणात शिरली आहे. म्हणून काँग्रेससारखे चार आण्याचे बंधन आम्हास नको. प्रत्येक अस्पृश्य माणूस हा दलित फेडरेशनचा सभासद आहे. तो जरी तसे म्हणाला नाही तरी तसे आम्ही समजणार. अशा रीतीने प्रत्येक गावातील लोकांनी आपल्या गावातील पाच लोक निवडून द्यावे. याप्रमाणे सर्व

तालुक्यातील गावची पाच माणसे प्रमाणे, लोकांनी आपले अध्यक्ष, सेक्रेटरी यांची निवड करावी. यामुळे तक्रार राहण्याचे कारण नाही. ही निवड सर्वांनाच बंधनकारक राहील. जे पैसे जमतील ते बँकेमध्ये ठेवण्यात येतील.

लोकांकरिता जे झटतात तेच पुढारी होतात. लोकांना हे समजते आणि म्हणूनच काम केले पाहिजे. राजकारणातून मी आता बाहेर पडणार आहे. मी आता फक्त सल्ला मसलत देणार आहे. सल्ला देण्यास नेहमी तयार आहे. मी जरी शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनमधून बाहेर पडलो तरी फेडरेशन जिवंत ठेवली पाहिजे, अशी माझी इच्छा आहे. इलेक्शनमध्ये आपणास मान नाही असे समजू नये. इलेक्शन आपण जिंकूच असे सुद्धा नाही, किडवाई हा माझा दोस्त होता. तो काँग्रेसचा प्राण होता. त्याच्यामागे काँग्रेस ही पोरकी झाली आहे. त्याप्रमाणे जवाहरलाल नेहरू हे देखील काँग्रेसचा प्राण आहेत. नंतर काँग्रेस काहीच नाही. जनता तुमचेच पाठीमागे येणार आहे. बाकीच्यांची घरे मोडली तरी आपली झोपडी तशीच ठेवा. लोक तुमच्याच झोपडीच्या आश्रयाला येतील. तुमची झोपडी जिवंत राहिली तरच तुमचा जय आहे. शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचा किल्ला हा अस्पृश्य जनतेच्या भावनेवर उभारला आहे. तो मोडू देता कामा नये. हा समाज ब्राह्मणेतर पक्षाशी सहकार्याने वागत होता. आम्ही जोतीबाचे शिष्य आहोत. त्यांच्याशी आम्ही सहकार्य केले, परंतु पुढे हा समाज काँग्रेसशी जाऊन मिळाला. तशी त्यांना दुर्बुद्धी आठवली. आपणास ध्येयप्राप्ती होण्याकरता इतरांशी संबंध ठेवावे लागतील. कोणाशी संबंध ठेवायचे हे मी नंतर सांगणार आहे. जे लोक आपले बरे करतील तो पक्ष आमचा मित्र राहील. राजकारणात भांडणे होतात ती विसरुन जाण्याची सवय ठेवली पाहिजे. या भांडणाचे झाड मनात वाढते. हा स्वभाव बरा नाही. माझे हृदय निर्मळ आहे. माझेसुद्धा इतरांशी मतभेद असतात परंतु ते मी लवकर विसरतो. माणसाचे मन फुलाप्रमाणे स्वच्छ असावे लागते. मारवाड्याच्या मिशीप्रमाणे आमचे धोरण ठेवायला पाहिजे. आपले ध्येय साधण्याकरिता काही वेळा मिशी वर तर काही वेळा मिशी खाली, अशी मारवाड्याची स्थिती असते. त्याप्रमाणे आपले धोरण ठरविले पाहिजे. ही गोष्ट लक्षात घ्यावी. एवढे बोलून मी आपली रजा घेतो.

● ● ●

३२४

# माझे आयुष्य तीन गुरू आणि तीन उपास्य दैवतांनी घडले आहे

गुरुवार ता. २८ ऑक्टोबर १९५४ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना त्यांच्या हीरक महोत्सवानिमित्त पुरंदरे स्टेडियम, मुंबई येथे भरविण्यात आलेल्या अपूर्व सोहळयात १ लक्ष १८ हजार रुपयांची थैली अर्पण करण्यात आली. हा सर्व पैसा डॉ. साहेबांनी आपल्या प्रकृतिस्वास्थ्यासाठी उपयोगात आणावा अशी विनंती हीरक महोत्सव समितीचे सेक्रेटरी श्री. शां. अ. उपशाम आणि श्री. आर. डी. भंडारे यांनी केली. त्यांच्या विनंतीचे सभेला जमलेल्या ३० हजार प्रेक्षकांनी टाळयांच्या गजरात स्वागत केले. परंतु ' माझ्यासारख्या बॅरिस्टरने आपल्या निढळाच्या घामाने जमविलेला गरीब जनतेचा पैसा स्वीकारणे बेशरमपणाचे आहे ' असे उद्‌गार काढून डॉ. बाबासाहेबानी ती सर्व रक्कम मुंबईला बांधण्यात येणाऱ्या इमारत फंडाला दिल्याचे जाहीर केले.

## अपूर्व स्वागत

एकशे पन्नासच्यावर संस्थांतर्फे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना हारतुरे अर्पण करण्यात आले. त्यांच्या समवेत सौ. माईसाहेब आंबेडकर याही होत्या. अध्यक्षस्थानी श्री. आर. डी. भंडारे होते. सिद्धार्थ कॉलेजचे प्रिन्सिपॉल श्री. पाटणकर, प्रा. व्ही. जी. राव, रा. ब. बोले, श्री. दादासाहेब गायकवाड, श्री. आर. आर. भोळे, जनतेचे संपादक श्री. यशवंतराव आंबेडकर, प्रा. बोराळे, श्री. अनंत हरी गद्रे, श्री. ब. ह. वराळे, श्री. डी. जी. जाधव, शांताबाई दाणी वगैरे मंडळी हजर होती.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

मित्रहो,

आपण ही जी थैली, एक लाख अठरा हजार रुपयांची दिली आहे खरी, पण ती अगदीच हलकी आहे. (हंशा) मला थोडासा संशय आला. तरी हा जो मोठा आकडा मॅनेजिंग ट्रस्टी यांनी जाहीर केला आहे त्याची सारी जबाबदारी मी त्यांच्याकडे सोपवीत आहे.

---

जनता : ६ नोव्हेंबर १९५४.

खरे म्हणजे माझा हीरक महोत्सव साजरा करून त्याप्रित्यर्थ ही थैली देण्यात आली, असे आताच सांगितले. हीरक महोत्सव हे माझं निमित्त झालं आहे. हे पैसे तुमचेच असून एक हॉल बांधण्यासाठी जमा केले आहेत. त्याला मूर्त स्वरूप यावं म्हणून मी ते माझ्या वयाच्या साठाव्या वर्षी द्यावे असे फक्त म्हटलेले आहे. हा फंड गोळा करायला सुरुवात बऱ्याच वर्षांपूर्वी झाली. १९४२ साली माझी एक्झिक्युटिव्ह कौन्सिलमध्ये नेमणूक झाल्यामुळे मला मुंबई सोडून जावं लागलं. तेव्हा पैसा गोळा करण्याचं काम जरा जास्त सुस्त झालं होतं म्हणून १९५२ साली परत आल्यावर पुन्हा ते काम हाती घेतलं. परंतु दुर्दैवाने इमारतीसाठी जी जागा घेतली होती तिथं भाडोत्री घातल्यामुळे इमारतीचे काम सुरू करता येईना. भाडोत्रीही काढून टाकणं अशक्य झालं आहे. आता सांगायला काहीच हरकत नाही. मी थोडसं वजन खर्च करून मुंबईचा कायदा बदलून घेतला आहे. त्या कायद्यामुळे ते भाडोत्री आता निघून जातील व इमारतीचे काम सुरू होईल. मी हे जे केले ते जनतेसाठी केले आणि ही जी रक्कम जमा झाली आहे ती तुमचीच आहे. आपल्या समाजातील या दारिद्री बाया-पुरुषांच्या निढळाच्या घामातून गोळा केलेला हा पैसा आहे आणि मी बॅरिस्टर आहे. एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचा मेंबर होतो. तेव्हा प्रकृतीच्या निमित्ताने या गरीब जनतेचा पैसा घेणे बेशरमेची गोष्ट आहे. तेव्हा हा सर्व पैसा, एकदा मी सांगून टाकल्याप्रमाणे इमारतीसाठी खर्च केला जाईल. मला त्यातली एक छदामही नको, असे येथे मी जाहीर करतो. (टाळ्यांचा गजर).

मित्रहो ! आज या ठिकाणी बसलो असताना माझ्या पूर्व आयुष्यात ज्या काही घडामोडी झाल्या त्या सर्व चित्रपटासारख्या उभ्या राहतात. मी जन्मलो कुठे, माझ्या वडिलांनी कुठं कुठं मला नेलं, माझं काय काय केलं हे सारं डोळ्यांपुढे उभं राहिलं आहे. परंतु मला इथं एक गोष्ट सांगावयाची आहे ती ही की, माझ्या वयाला ६० वर्षे पूर्ण झाली याला पुरावा तरी काय आहे ? (हंशा) मी कोणत्या साली जन्मलो याचा रेकार्ड नाही. कारण माझे वडील सिक्स पायोनियर बटालियनमध्ये होते. नंतर ते सेवन पायोनियर बटालियनमध्ये गेले. तेव्हा त्यांना मी त्यांचा मुलगा म्हणून काहीच महत्त्व वाटलं नाही. जन्म तारीख लिहून ठेवली नाही. ही किती यःकश्चित गोष्ट आहे. पण तीही त्यांना जमली नाही. आज जी जन्मतारीख आहे ती खरीच आहे असं कोणी सांगू शकत नाही.

परतु माझ्याविषयी दोन तीन गोष्टी मात्र निश्चित सांगता येतील. राजपुतान्यात महू मुक्कामी मी जन्मलो. त्यामुळे कोकणाचा माझा काही संबंध राहिला नाही. वडील कोकणातलेच. परंतु नोकरीमुळे त्यांना राजपुतान्यात जावे लागले. तेव्हा जन्म महू मुक्कामी झाला हे मात्र नक्की. दुसरी गोष्ट म्हणजे माझा जन्म बरोबर बाराच्या ठोक्याला झाला. त्यावेळी माझे वडील कामावर होते आणि माझ्या आईचं बाळंतपण चाललं होतं. माझा पिंड फार मोठा होता. माझ्या आईला फार त्रास झाला, असे म्हणतात. माझ्या वडिलांना चिंता वाटत होती. परंतु एकदा दाईनी त्यांना येऊन सांगितले '' घरात जा. मुलगा झाला. ''

तिसरी गोष्ट म्हणजे मी मूळ नक्षत्रावर जन्मलो आणि ज्योतिषाने सांगितले की हे मूल फार वाईट आहे. याची आई लवकर मरेल. यामुळे इतर भावंडांना मी अतिशय अप्रिय झालो. जे ते मला झिडकारीत व म्हणत ' हे मूल आईला वाईट आहे ' शेवटी आमची आई लवकरच वारली. ह्या अशा माझ्या जन्माविषयी तीन गोष्टी सांगता येतील.

माझं बालपण म्हणाल तर माझं मलाच आश्चर्य वाटतं. मी बारा-तेरा वर्षाचा होईपर्यंत सर्व लोकांना अशी खात्री वाटत होती की हे पोर घराण्याला काळिमा लावणार. याच्या हातून काही होणार नाही. कारण मी बारा-तेरा वर्षाचा होईपर्यंत लंगोटीशिवाय दुसरी वस्तूच नेसलो नाही (हंशा) शिवाय दारोदार गावच्या बायकांना विचारी की '' तुमची लाकडं फोडायची आहेत काय ?'' मला शिक्षणात प्रथम काही राम वाटेना. आई वारल्यावर माझं संगोपन आत्याने केले. मला वाटे शिकून काय करणार ? सहा महिने मी माळयाचा धंदा केला. मिलिटरी कँपात बागबागाईत असायची. तेथील माळयाच्या पोराशी संगत केली. माती, दगड उचलले. जागा साफ केली, नळानं पाणी बागेला द्यायचं होतं पण ते काही होईना. तेव्हा मी घरावरची सर्व कौलं काढली आणि त्याच्या नाल्या केल्या होत्या. काय पण माझं आयुष्य असं वाटतं.

सातान्याला जेव्हा आम्ही होतो तेव्हा इतर सुभेदार नातेवाईकही होते. त्यांच्या घरासमोर एक उकिरडा होता, शेणकचरा होता आणि त्या उकिरड्यावर एक उंबराचं झाडही होतं. मी झाडावर चढण्यात फार पटाईत. वानर देखील इतक्या लवकर चढणार नाही. आता पायाने अशक्त झालो. त्या झाडावर मी चढे आणि त्यावर कांबळ टाकून झोपत असे, व लहर आली की त्या उकिरड्यावरील राखेत उडी घेत असे. त्यावेळी सातान्याला प्लेग आला

होता. लोक म्हणत, बरेच लोक प्लेगने मेले आणि या पोरालाच प्लेग का होत नाही. ही अशी माझी परिस्थिती ! एकदा कसाई तीन रुपयाला बकरी देईनात. तेव्हा आम्ही उगारणी केली आणि दोन बकऱ्या घेऊन आलो. तेव्हा लांब बांबू घेऊन आम्ही बकऱ्यांना चारा घालीत असू. रस्त्यात कोणी ह्या बकऱ्या चांगल्या नाहीत म्हणून सांगितलं. बिन शिंगाच्या बकऱ्या चांगल्या म्हणे. असं हूडपणाचं माझं बालपण गेलं.

घरात बऱ्याच लोकांनी लडिवाळपणानं वागवलं. आमची आत्या होती. तिचा मी फारच लाडका. तिने सर्वांना ताकीद दिली होती. ' आईविना पोरगं आहे. त्याला धुसफूस करू नका ' आणि यामुळेच मी स्वातंत्र्याचा दुरुपयोग केला. सर्वांना वाटे की ह्या पोराच्या हातून काही होणार नाही. ज्यांनी माझे लालन पालन केले त्यातील कोणी जगली नाहीत. ते आज हे माझे कौतुक पाहायला हजर असते तर मला फार आनंद झाला असता. अशा प्रकारे माझे बालपण गेले. तुम्हाला कल्पना असेल आयुष्यात किती क्रांती झाली. मी गुराखी झालो असतो किंवा काबाडकष्ट करणारे काम केले असते तर ह्या पदाला पोहोचलो नसतो. माझे वडील मला नेहमी सांगत ' सावलीतले काम शीक ' या साऱ्या आठवणी एकत्र करून एक चरित्र लिहावे असा माझा विचार आहे. ( टाळयांचा कडकडाट ) पण चरित्र नाही तर एक लहानसे ' माझं बालपण ' म्हणून चरित्रपर पुस्तक लिहिणार आहे. त्यात सर्व गोष्टी मी सविस्तर देईन.

माझ्यामध्ये काही उपजत गुण होते आणि म्हणून मी या पदाला पोहोचलो, असं काही नाही. माझं आयुष्य जसं चाललं तसं चालू दिलं असतं तर मी एक नीतिपर माणूस झालो असतो. पण मला माझी पूर्ण आठवण होती. माझ्या आयुष्याला जे काही वळण मिळालं ते का मिळालं, कसं मिळालं, याचे कारण मी देणार आहे.

माझे तीन गुरू आहेत. प्रत्येकाला गुरू असतातच, तसे मलाही आहेत. मी काही सन्याशी नाही की बैरागी नाही. पण मला गुरू आहेत. माझे पहिले आणि श्रेष्ठ गुरू बुद्ध होत. मी दहा बारा वर्षाचा असेन. माझे वडील कबीर पंथी साधु होते. हे मला तेव्हापासून आठवतं. माझ्या वडिलांचं घर धर्मासन म्हणता येईल, तसेच विद्यासन असंही म्हणता येईल. माझे वडील विद्येचे भक्त होते, तसेच ते धर्माचे चाहते होते. माझ्या लहानपणी रामायण, महाभारत इत्यादी

सर्व ग्रंथाची त्यानी माझ्याकडून पारायणे करवून घेतली होती. रामायण, महाभारत वाचून माझ्या मनावर फार मोठा परिणाम झाला. माझे वडील मला म्हणत, " आपण गरीब असलो म्हणून भिण्याचं काही कारण नाही. तू विद्वान का होऊ शकणार नाहीस ? " एकदा मी कोणती तरी परीक्षा पास झालो होतो. त्यावेळी चाळीतल्या लोकांनी माझ्या वडिलांची इच्छा नसताही दादा केळुस्करांच्या मदतीने माझा सत्कार करायचं ठरविलं. माझे वडील म्हणायचे, ' नको सत्कार, मुलांचा असा सत्कार केला म्हणजे त्यांना पुढारी झालो असे वाटते. ( हंशा आणि टाळया ) त्यावेळी शेवटी सत्कार झालाच आणि दादा केळुस्करांनी मला बुद्धाच्या चरित्राचं एक पुस्तक बक्षीस दिलं. हे पुस्तक वाचल्यानंतर माझ्यात काही निराळाच प्रकाश पडला. मारुती, सीता, राम वनवासाला गेले ; धोब्याच्या सांगण्यावरून सीतेचा त्याग, कृष्णाच्या सोळा सहस्त्र बायका ह्या गोष्टी काहीतरी भयंकरच वाटल्या. ह्या गोष्टी माझ्या मनाची पकडच धरेनात. परंतु बुद्ध धर्माच्या त्या अभ्यासाने मला जास्त अभ्यास करावासा वाटला. त्या धर्माची पकड माझ्या मनावर कायमची आहे व माझी अशी ठाम खात्री झाली आहे की जगाचं कल्याण फक्त बुद्ध धर्मच करू शकेल. हिन्दू लोकांना आपलं राष्ट्र जगवायचं असेल तर बुद्ध धर्मच स्वीकारला पाहिजे असं माझं नेहमीच सांगणं आहे.

माझे दुसरे गुरू कबीर होत. माझे वडील कबीर पंथी होते. त्यामुळे कबीराच्या जीवनाचा आणि तत्त्वाचाही माझ्यावर फार मोठा परिणाम झाला. माझ्या मताप्रमाणे कबीराला बुद्धाच्या तत्त्वज्ञानाचे खरे रहस्य कळले. मी मोठा कोणालाच म्हटले नाही. गांधीला मी महात्मा म्हटले नाही. कारण कबीराने म्हटले आहे, माणूस होना कठीण है ! तो साधु क्या बने ! जो माणूस झाला नाही तो महात्मा कसा होईल ?

आणि माझे तिसरे गुरू म्हणजे जोतीबा फुले होत. ब्राह्मणेतरांचे खरे गुरू तेच होत. शिंपी, कुंभार, न्हावी, कोळी, महार, मांग, चांभारांना माणुसकीचे धडे फुल्यांनीच दिले आणि शिकविले. पूर्वीच्या राजकारणात आम्ही जोतीबांच्या मार्गानेच जात होतो. पुढे मराठे आमच्यातून फुटले. कोणी काँग्रेसमध्ये उष्टे खाण्यासाठी गेले व त्यांच्याचपैकी आमचे रा. ब. बोले हे हिन्दू महासभेत गेले. ते येथे हजर आहेतच. कोणी कोठेही जावोत, पण आम्ही मात्र जोतीबांच्याच मार्गानी जाऊ. जोडीला कार्ल मार्क्स घेऊ किंवा दुसरे काही घेऊ पण जोतीबांचा मार्ग सोडणार नाही. हे असे माझे तीन गुरू आहेत. यांच्या शिकवणीने माझे आयुष्य बनले आहे.

यानंतर माझी तीन उपास्य दैवतेही आहेत. कोणाची मरीआई, खंडोबा, अशी दैवतं असतात, तशी माझी तीन दैवतं आहेत. माझे पहिले दैवत विद्या होय. विद्येशिवाय मानवाला शान्तता नाही आणि माणुसकीही नाही. विद्या ही सर्वांना अवगत झाली पाहिजे. ती महासागरासारखी आहे. बुद्धाने एकदा म्हटले आहे की बुद्ध धर्म हा शुद्ध धर्म आहे. येथे भेदभाव नाही. श्रमण, भिक्षु, ब्राह्मण, भंगी मग तो कोणीही असो, सारे एक आहेत. माझ्या संघात येण्यापूर्वी नदी नाला, मग नाव कोणतेही असो, यमुना असो, ब्रह्मपुत्रा, गंगा, गोदावरी कोणतीही नदी असो, ह्या सर्व नद्या आपल्या प्रांतातून सागरात गेल्या. त्यांचं पाणी एक झालं की हे पाणी मग सांगता येणार नाही की हे यमुनेचं की हे गंगेचं, की हे गोदावरीचं ! तेव्हा माझा संघ हा महासागरासारखा आहे. जात पात नाही. तुम्ही सर्व एक आहात. तुझी विद्येची आवड आहे ना मग ती सफल कर. ज्याप्रमाणे माणूस जगायचा असला तर अन्नाची आवश्यकता आहे तशीच विद्येचीही आवश्यकता आहे. ज्ञानाशिवाय तो काय करू शकेल ? ब्रह्मदेशात शेकडा ९० लोक सुशिक्षित आहेत. आज हिन्दुस्थानात शेकडा ९० लोक निरक्षर आहेत. याचे कारण ब्राह्मणांनी आम्हाला विद्या दिली नाही हेच होय. धर्माचे कायदे आमच्या आंड आले आणि आमची विद्या हिरावून घेतली. आपले लोक समजत की दगड ही विद्या. म्हणून आपल्या धार्मिक समजुती अतिशय रसातळास गेल्या. दगडाची पूजा करणारे भाविक आमच्यात सर्वच लोक आहेत. तुकोबाने एके ठिकाणी म्हटलं आहे, नवस सायासे कन्या पुत्र होती ! तरी कासया करणे लागे पती !! याचे कारण त्यांना विद्या दिली नाही. अत्यंत मोठी वस्तू आहे ही विद्या. माझे विद्येचे वेड भयंकर आहे. ब्राह्मणाच्या घरी नाहीत इतकी पुस्तके आता दिल्लीला मजजवळ आहेत. एकूण तीस हजार पुस्तके आहेत मजजवळ ! आहेत कोणा ब्राह्मणाजवळ ? दाखवून द्यावीत त्याने ! ठाकूर आणि कंपनीची माझ्यावर हजाराची उधारीची बीलं थकलेली आहेत. मला उधारीचा माल कुठेही मिळतो. जिथं माझी उधारी थकली तिथं मी दारातच मोटार उभी करतो, इतके माझं विद्येविषयीचं वेड आहे. हे वेड सर्वांना पाहिजे. एखाद्याची रांड असते ना ! ती दुसऱ्या गावाला असते. समजा, रात्री बारा वाजता त्याला आठवण येते. मग तो रात्रीचा उठून स्मशान पाहत नाही, काही पाहत नाही, तो तिच्या घरी जाणारच ! एवढं जेव्हा पुस्तकावर प्रेम होईल तेव्हाच तो विद्येचा खरा पुजारी होईल. मी विद्येची पूजा २४ तास करीत असतो.

माझे दुसरे दैवत स्वाभिमान होय. मी कोणाची याचना केली नाही. माझं ध्येय असं होतं की पोट तर भरलं पाहिजे आणि माझ्या लोकांची सेवाही केली पाहिजे. डॉ. परांजपे यांच्या विनंतीने एका महाविद्यालयात एकॉनॉमिक्सचा

प्रोफेसर झालो. तेव्हा मला त्यांनी तेरा व्याख्यानं देण्यासाठी सांगितले. मी म्हणालो फक्त चार व्याख्यानं देईन. पटलं तर ठेवा नाहीतर माझा मार्ग मला मोकळा आहे. कारण मला माझ्या लोकांची सेवा करावयाची होती, त्यासाठी वेळ हवा होता. पोयबावडीच्या नाक्यावरच्या ४८ व ५० नंबरच्या खोलीत मी कण्याचा भात आणि कण्याची भाकरी खाल्ली. पण समाज सेवेला सोडून भारी पगाराकडे वळलो नाही. मार्ग निघाला. लोकांनी थैली स्वीकारून घरं बांधली. माझ्या माहितीच्या एका पुढाऱ्याने म्हणे ४७ हजाराच्या प्रॉमिसरी नोटा लिहून दिल्या होत्या आणि लोकांनी जेव्हा लाखभर रुपयांची थैली अर्पण केली तेव्हा ते फेडले. मला तसे करायचे नाही. मी माझे स्वतःचे पोट स्वतःच भरून जी काही सेवा करायची ती केली. नोकरी मला करायची नव्हतीच. कोणीही गव्हर्नर जनरल येवो त्याच्याशी माझी मैत्री असे. परंतु मी कोणाजवळही याचना केली नाही की मला अमुक बनवा किंवा मला ही जागा द्या. हो, दुसऱ्यासाठी मी काही केलं असेल पण स्वतःसाठी एक बोट भर चिठ्ठी लिहिल्याचं कोणीही दाखवून द्यावं. एक्झिक्युटिव्ह कौन्सिलर व्हावं ही मात्र माझी दांडगी इच्छा होती; ती पुरी झाली. आता मला ना पेन्सन, ना पगार, ना प्राव्हिडंड फंड ! काही नाही. एकदा इंग्रजांच्या राज्यात कौन्सिलरशिप पत्करली. एकदा काँग्रेसच्या राज्यात. पण तेथेही काँग्रेसशी माझा खटका उडाला. मला जज्ज होता आलं असतं. पण अडकून घेऊन करणार काय ? तेव्हा माझं सागणं हेच की दीनता असू नये. मी काही तरी आहे असं मानलं पाहिजे. मी परमेश्वराला देखील कमी मानतो इतका माझा स्वाभिमान तळपता आहे.

आणि माझं तिसरं दैवत म्हणजे शील होय. माझ्या आयुष्यात मी दगाबाजी, फसवणूक, आत्मसिद्धीकरिता पाप केलं, असं मला आठवत नाही. याबद्दल मला मोठा अभिमान वाटतो. मी विलायतेला अनेक वेळा गेलो. पण अजून दारू प्यालो नाही, विडी प्यालो नाही. मला कसलं व्यसन नाही. पुस्तक आणि कपडा या गोष्टी अधिक प्रिय आहेत. शील संवर्धन हा गुण माझ्यात मोठ्या प्रमाणात आहे, हे मला सांगायला फार अभिमान वाटतो. अशाप्रकारे माझे तीन गुरू आणि तीन उपास्य दैवतं आहेत. यांचा मी बनलेला आहे. या पदाला मी पोहोचलो हे त्यांच्याच शक्तिमुळे होय. मी मात्र केवळ कारण आहे. त्यांचा मी बनलेला एक पुतळा आहे. तेव्हा यांचं अनुकरण करा. तुम्ही माझा समारंभ केलात तो व्यक्ती करिता केला नसून या तीन दैवतांचा आदर्श म्हणून त्यांचा कृतार्थ होण्यासाठी केलात असं म्हणून मी ही थैली स्वीकारीत आहे.

१९१९ सालापासून म्हणजे गांधींनी पाय टाकला तेव्हापासून मी राजकारणात आहे. तरीही त्यांचं माझं जुळलं नाही. अनेक प्रकारच्या खटापटी आम्ही केल्या. महाडचा पाण्याचा सत्याग्रह, नाशिकचा मंदीर प्रवेशाचा सत्याग्रह,

नानाप्रकारचे सत्याग्रह केलेत. परंतु कोणी सहानुभूती दाखविली नाही. वर्तमानपत्रातून आमची व्यंगचित्रे येत. बातमीदार येत नसत. मी बहिष्कृत भारताचा संपादक होतो. १९१९ पासून १९४२ पर्यंत मी संपादक होतो. एकदा केसरीला जाहिरात पाठविली. त्याबरोबर जाहिरातीचे बिल रु. ३ ची मनीऑर्डरही केली. पण परत आली. कारण जागा नाही म्हणून. टाइम्स ऑफ इंडियाला टेलिफोन केला. त्यांना वाटले कुठली ही भिकारडी त्रास द्यायला लागली. त्याचेही उत्तर नाही आणि आता सारखे पाठीमागे लागतात रिपोर्ट द्या म्हणून. ही अशी परिस्थिती. इतक्या थराला आमची चळवळ गेली. मी खरोखरच महार लोकांचा अतिशय ऋणी आहे. महार लोकांच्या बळावरच मी हे करू शकलो. हा माझा तीस वर्षांचा अनुभव आहे. महार रणशूर आहेत, लढू शकतात, त्याग करू शकतात. इतर कोणतीही जात हे करू शकत नाही. तेव्हा माझ्यादृष्टीने त्यांचे माझ्यावर अनेक उपकार झाले आहेत. मी येथे जातीवाचक उच्चार करतो याबद्दल कोणी आरोप करील. पण मी या जातीत जन्मलो याबद्दल मला मोठा अभिमान आहे. या स्थितीला अस्पृश्य समाज आला त्याचे बरेचसे श्रेय तुम्हा पुरुषांना आहे. त्यात स्त्रियांचाही मोठा भाग आहे. ३० वर्षापूर्वीच्या स्त्रिया फार वेडगळ आणि गलिच्छ राहात. मला त्यावेळी स्त्रिया ' बामण ' आहे असं म्हणत ' आम्हाला नाही बामण व्हायचं '– असं त्या म्हणत. आजची तशी स्थिती नाही. परंतु अजून आपण शिखरावर पोहोचलो नाही. मध्यावर आलो आहोत. कठडा चढत आहोत. कधी पाय घसरेल सांगता येत नाही. अजूनही संकटस्थिती मानली पाहिजे. मी पुढारी का तो पुढारी हे भांडण आता मिटविले पाहिजे. सार्वजनिक कार्याला मदत करा. हजारो प्रकारच्या संस्था दानधर्म करून जातीचा उद्धार करतात. कोकणस्थ ब्राह्मण, देशस्थ ब्राह्मण, सारस्वत ब्राह्मण, प्रभू इ. ब्राह्मणांच्या संस्था आहेत. त्यांनी आपल्या जातीच्या विद्यार्थ्यांना विलायतेला पाठविले आहे. मोठ्या हुद्याच्या जागा मिळवून दिल्या आहेत. त्या गोष्टी ध्यानात घेऊन महिन्याला एक रुपया द्यायचं ठरविलं तर वर्षाकाठी कितीतरी कार्य होईल. माझी आता म्हटली तर आठ दहा वर्षच राहिली आहेत. बाबासाहेब आहेत म्हणून आम्ही काहीच करायचं नाही असं म्हणून भागणार नाही. मी आता राजकारणापासून अलिप्त होणार आहे. तुमचं जीवन तुम्हीच उज्ज्वल करायचं आहे. त्याग, चिकाटी, निस्वार्थीपणा, बल एकवटून कार्य करा. मला माझ्या हयातीत तुम्ही आपलं काय करता ते पाहू द्या. मेल्यावर तुम्ही भलं केलं की वाईट केलं हे मला कळणार कसं ? हे माझं तुम्हाला निक्षून सांगण आहे.

● ● ●

# राष्ट्राच्या लष्करी संरक्षणासाठी हैद्राबाद ही भारताची उपराजधानी असणे आवश्यक

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे सौ. माईसाहेब आंबेडकर यांच्यासमवेत हैद्राबाद येथील बेगमपेठ विमानतळावर तारीख १४ नोव्हेंबर १९५४ रोजी दुपारी १२ वाजून १५ मिनिटांनी आगमन झाले. त्यांच्या स्वागताप्रित्यर्थ सिकंदराबाद शे. का. फे. चे अध्यक्ष श्री. यादगीरवार, मराठवाडा शे. का. फे. चे सहचिटणीस श्री. व्ही. एल. सुरवसे, बीड जिल्हा शे. का. फे. चे अध्यक्ष श्री. व्ही. जे. आरक, औरंगाबाद जिल्हा शे. का. फे. चे सहचिटणीस श्री. ए. एम. साळवे, औरंगाबाद कॉलेजचे रजिस्ट्रार श्री. बी. एच. वराळे, हैद्राबाद राज्याचे अर्थमंत्री श्री. विनायकराव विद्यालंकार इत्यादी सद्‌गृहस्थ हजर होते.

प्रारंभी शे. का. ट्र. फं. होस्टेलच्या विद्यार्थी-विद्यार्थिनींनी व कै. व्यंकटराव होस्टेलच्या विद्यार्थ्यांनी डॉ. बाबासाहेब व सौ. माईसाहेब यांना पुष्पहार अर्पण केले. उपस्थित जनसमुदायाने '' डॉ. बाबासाहेब आंबेडकर की जय '', '' आंबेडकर झिंदाबाद '' , '' शे. का. फे. चा विजय असो '' आदि घोषणा करून वातावरण दुमदुमून सोडले. नंतर त्यांना परसियस हॉटेलमध्ये नेण्यात आले.

त्यानंतर त्यांनी मराठवाडा साहित्य परिषद व मराठी ग्रंथसंग्रहालय या संस्थांना भेट दिली. त्यांचा या दोन संस्थांच्या प्रमुखांकडून सत्कार करण्यात आला व सुमारे दीड तास त्यांनी विविध विषयांवर औपचारिक चर्चा केली.

भाषावार प्रांतरचनेवर बोलताना ते म्हणाले,

भारतातील सर्व भाषिक प्रांतात अत्यंत दुर्दैवी प्रांत जर कोणता असेल तर तो महाराष्ट्र होय. महाराष्ट्र इतरांकडून संपूर्णपणे नागवला गेला. सर्वांनी महाराष्ट्रीयांचे यथेच्छ दमन केले. महाराष्ट्रावर गुजराती-मारवाड्यांचे अबाधित वर्चस्व आहे, तर इकडे हैद्राबादेतील मराठवाड्यावर तेलगू लोकांचे आहे. वऱ्हाड तर हिन्दी भाषिकांना आपली वसाहतच वाटत आली आहे. याला कारण महाराष्ट्रीयांचे दुबळेपण. त्यांच्यात काहीच प्राण उरलेले नाही. दिल्ली जिंकायच्या केवळ बाताच ते उठल्या-सुटल्या मारीत असतात. ५०/६० रुपयांच्या कारकुनीखेरीज त्यांना इतर काहीच करता येत नाही. परंपरा

---

जनता : २७ नोव्हेंबर १९५४.

पुष्कळ चांगली आहे; पण केवळ दिव्य भूतकाळ असून काय उपयोगाचा ? आमचे तथाकथित पुढारी गप्पा तर खूप मर्दुमकीच्या मारतात, पण एक जणही महाराष्ट्राच्या उत्कर्षाकरिता त्याग करावयास तयार नाही. प्रत्येकाला वाटते, जवाहरलालजी काय म्हणतील ? अमुक काय करतील ? या भीतीनेच सर्व पछाडलेले आहेत. ही काय लोकशाही ? याला का विवेक म्हणायचा ? आज ज्यांच्या हाती सत्ता आहे त्यांना लोकशाहीवृत्तीचा स्पर्शही झालेला नाही. त्यांना वाटेल तसे ते करतात व करतील, त्यांना वाटेल तर संयुक्त महाराष्ट्र होईल.

सर्व दृष्टीने मुंबई शहर हे महाराष्ट्राचेच आहे. मुंबईवर आज गुजराती, पारशी व मारवाडी इत्यादी महाराष्ट्रीयेतरांचे वर्चस्व आहे. पण असे वर्चस्व देशातील सर्वच मोठ्या शहरांवर आहे. मद्रास, कलकत्ता वगैरे सर्वच मोठ्या शहरांची कमी अधिक प्रमाणात अशी स्थिती आहे. मद्रासमध्ये आंध्रच्या हाती ३० टक्क्याहून अधिक व्यापार आहे. इतरांच्या मानाने लोकसंख्याही आंध्राची अधिक आहे. पण इतके असूनही भौगोलिक दृष्टीने मद्रास, आंध्रला मिळालेले नाही. कलकत्त्याचेही उदाहरण बघण्यासारखे आहे. कलकत्त्यावर बंगाल लोकांखेरीज, आसामी, उरीया वगैरे परप्रांतीय लोकांचाच व्यापारी व आर्थिक दृष्टीने ताबा आहे. बंगाली बाबू तेथे निव्वळ कारकुनी व मोलमजूरी करतात. असे असताही कलकत्ता बंगालचाच आहे. मग मुंबई हीच महाराष्ट्राची नाही, असे म्हणणे आंधळेपणाचे व अन्यायाचे आहे.

मुंबई महाराष्ट्राला मिळेल. त्यांना निराळे वाटले तर ते चक्क करून दाखवतील व तुम्हाला म्हणतील, तुम्ही कोण आम्हाला विचारणार ? तुम्हाला काय करायचे ते करून घ्या. त्यांचे खरेही आहे. कारण त्यांना माहीत आहे की कारकुनांची ही जात आपले काय करणार आहे ? शिवाय आजची लोकशाही आणि दर पाच वर्षांनी येणाऱ्या निवडणुका त्यांच्या पाठीशी आहेतच. आमच्या या लोकशाहीत निवडणुकीची तिकिटे चक्क विकत मिळतात. जो जास्त पैसे देईल, लांड्यालबाड्या करील तो निवडून येईल आणि ५ वर्षे मजा करील. ज्यांच्याजवळ भरपूर पैसा नाही त्यांनी स्वस्थ बसावे आणि घडेल त्याला लोकशाही म्हणून आशिर्वाद द्यावा.

राष्ट्राचे लष्करी संरक्षण आणि सत्तेच्या यंत्रणेत समान वाटा यादृष्टीने दक्षिणेत भारताची उपराजधानी असणे अवश्य आहे. माझे फार दिवसांचे मत आहे की हैद्राबाद, सिकंदराबाद व बोलाराम हा सर्व भाग मध्यवर्ती सरकारने ताब्यात घेतला पाहिजे व तेथे उपराजधानी कायम केली पाहिजे. दिल्लीला

बसून सरकार राज्य हाकू म्हणते तेव्हा मला त्याच्या लष्करी निपुणतेचे हसू येते. आमचे राष्ट्र लष्करी बनवावयाचे असेल तर दक्षिण भारतात उपराजधानी ठेवणे संरक्षणाच्या दृष्टीने किमान गरजेसाठी अवश्य आहे. आज मध्यवर्ती सरकारात उत्तर भारतीयांचे वर्चस्व आहे. अध्यक्ष व पंतप्रधानांची दोन प्रांतातील बड्या व्यक्तीत आळी-पाळीने अदलाबदल होत राहाणार आहे. दक्षिण भारतातील सामान्य लोक सध्या सुद्धा नोकऱ्याकरिता दिल्लीला जाणे शक्य नाही व यंत्रणेत त्यांना वाटा मिळणेही त्यामुळे दुरापास्त आहे. भारतीय सर्व एक हे जरी खरे असले तरी व्यवहारात ही भावना निरर्थक आहे. राजकारणात हे औदार्य अंगलट येते व भोळयाभाबड्यांचा घात होतो. यासाठी हैद्राबादेत उपराजधानी आली तर दक्षिण भारतीयांना सरकारी यंत्रणेत स्थान मिळेल. सत्तेत इकडील लोकांनाही भाग घेता येईल. आमच्या डोक्यात हा व्यवहार येत नाही.

' लिटरेचर ' या इंग्रजी शब्दाचे ' साहित्य ' हे चूक भाषांतर आहे. साहित्य स्वयंपाकाचे असते, हजामतीचे असते. त्या अर्थाने साहित्य या शब्दाची येथे समर्पकता पटणारी नाही. ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, तुकारामाची गाथा वगैरे आपण वाचतो. ज्ञानेश्वर मोठा विद्वान होता. पण माझी एक शंका आहे. सर्व ज्ञानेश्वरीत ज्ञानेश्वरांनी वेदान्त विषयावर भाष्य केले. ब्रह्म हे सत्य आहे व ते सर्वव्यापी आहे, असे ज्ञानेश्वर म्हणाले. पण ज्ञानेश्वरीच्या शेवटी त्यांनी चातुर्वर्ण्याचे हिरीरीने समर्थन केले. ज्ञानेश्वर व त्याच्या इतर भावंडांना ब्राह्मणांनी जातीबहिष्कृत केले होते. त्यांना पुन्हा जातीत जावयाचे होते. यामुळेच त्यांनी रूढ चातुर्वर्ण्याच्या कल्पना उचलून धरल्या व समाजदंडापुढे कच खाल्ली. ब्रह्म जर सर्वव्यापी आहे तर ज्ञानेश्वर असे म्हणू शकले असते की तुम्ही मला बहिष्कृत केले तर मी महारवाड्यात राहील. त्यांच्यातही ब्रह्म आहे. पण असे म्हणण्याऐवजी त्यांनी रेड्यामुखी वेद बोलविले. हा रेडा तेव्हापासून मात्र मुका झाला आहे.

इंग्लंडच्या लोकशाहीमागे शेकडो वर्षांची परंपरा आहे. तेथील सर्वसामान्य समाजातील सर्व अपप्रवृत्ती नष्ट झाल्यावर तेथे प्रौढ मतदानाचा हक्क मिळाला. आमच्या येथे लोकांचे अज्ञान हेच प्रौढ मतदानाच्या अधिकाराचे अधिष्ठाण झालेले आहे. लोकांना व त्यांच्या प्रतिनिधींना कसलेच ज्ञान नाही. यामुळे या पोकळ लोकशाहीच्या चौकटीचा लबाड, संधिसाधू व हितसंबंधी लोक फायदा घेतात. पदवीधर होण्यासाठी मॅट्रिकच्यानंतर चार वर्षे अभ्यास

करावा लागतो. क्रमाक्रमाने पदवीधर बनतो. पण लोकसभेचे, विधिमंडाळाचे सभासद होण्यास अगर मंत्री बनण्यास आमच्या लोकशाहीत क्रम नाही. कसे तरी करून कोणी तरी निवडून यायचे, हजार भानगडी करून एका रात्रीतून मंत्रीपदापर्यंत पोचायचे, अशी विचित्र दशा आहे आमच्या राजकारणाची. अशारितीने निवडून येणाऱ्याच्या हातून लोकशाही परंपरा कशी निर्माण होणार आहे. येणाऱ्या २० वर्षापर्यंत समाजाची शैक्षणिक, बौद्धिक व वैचारिक पातळी एकसूत्रीपणे वाढविली पाहिजे. लोकांना समजावून सांगून त्यांना पटवून देण्याची पद्धती ( Persuasive method ) अधिक वापरली पाहिजे. ही हुकूमशाही वाटेल, पण ती अवश्य आहे. ( श्रोत्यांपैकी एकाने रशियातील हुकूमशाही ४० वर्षापासून अबाधित राहिलेली असून तिची मिठी अधिकाधिक घट्ट होत असल्याचे सांगितले. तशाच रीतीने हुकूमशाही भारतातही कायम स्वरूप धारण करणार नाही का ? असे विचारले असता,) बाबासाहेब म्हणाले, धोका तर निश्चित आहे, पण धोका नाही कोठे ? आमची लोकशाही धोक्यापासून मुक्त आहे काय ? रशियात आजही हुकूमशाही ठेवणे मला अयोग्य वाटते. या प्रदीर्घ काळाचा खरे म्हटले तर रशियाने खरीखुरी लोकशाही व व्यक्तिस्वातंत्र्य प्रस्थापित करण्याकरिता उपयोग करून घ्यावयास हवा होता. परंतु तसे तेथे झालेले नाही. हुकूमशाहीतील हा धोका मला मान्य आहे पण लोकशाहीसाठी लागणारी अनुकूल जागृती व परंपराच आमच्या येथे आहे कोठे ? अंधश्रद्धा, रूढिप्रियता वगैरे दोषांमुळे आमचा समाज दृष्टिहीन बनला आहे.

कुंभमेळ्यात नागव्या साधूंच्या पायाखाली हजारो नागरिक तुडवून मेले. ही घटना काय दर्शविते ? मी मंत्री असतो आणि अधिकार माझ्या स्वाधीन असते तर मी या साधुंना सेना पाठवून हाकून लावले असते. अवश्य असते तर गोळीबारही केला असता. गिरिकंदरात राहाणाऱ्या या साधुंना लोकात यावयाचे असेल तर त्यांनी वस्त्रे लेवून नीट रीतीने आले पाहिजे. पण आमच्या राज्यकर्त्यांनी या प्रसंगी काय केले ? लोकांच्या धार्मिक अंधश्रद्धांचा लोकप्रियतेसाठी त्यांनी त्यांचा चक्क वापर केला.

❁ ❁ ❁

# ३२६

# अपुरे विद्यार्जन उपयोगाचे नाही

हैद्राबादच्या मुक्कामात दिनांक १४ नोव्हेंबर १९५४ रोजी संध्याकाळी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी शेड्यूल्ड कास्ट ट्रस्ट् फंड तर्फे संचालित होस्टेलला भेट दिली. या प्रसंगी होस्टेल लतापल्लवांनी सुशोभित करण्यात आले होते. होस्टेलचे चालक श्री. शेरसिंग यांनी थोडक्यात होस्टेलचा अहवाल सादर केला.

त्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी विद्यार्थ्यांच्या प्रचंड मेळाव्यापुढे भाषण केले. ते म्हणाले,

ज्या लोकांनी ही बोर्डींग काढली आहेत, त्यांचे आभार मानले पाहिजेत. त्याचबरोबर हैद्राबाद सरकारचेही आभार मानणे जरूर आहे. लोक आपणास नावे ठेवतील अशाप्रकारचे वर्तन विद्यार्थ्यांनी ठेवू नये. त्यांना मिळालेल्या या संधीचा वेळीच योग्य फायदा करून घेतला पाहिजे. माझ्यावेळची परिस्थिती फारच कठीण होती. आमची दहा बाय दहाची एक खोली होती. तीत सामान, कुटुंबातील दहा माणसे, एक बकरी व दोन पैशाच्या तेलाची एक चिमणी इतका परिवार होता. अशा परिस्थितीत मला अभ्यास करावा लागला आहे. मी फार अभ्यास केला असल्यामुळे लोक मला भितात. दुसऱ्यांनी वर्षभर प्रयत्न करूनही जे काम होत नाही ते मी दोन मिनिटात करतो (टाळया). याचे कारण मी फारच शिकलो आहे. तसेच तुम्हीही शिकण्याचा प्रयत्न केला पाहिजे. अपुरे विद्यार्जन करून काही उपयोगाचे नाही. परीक्षा कोणीही पास होतो. नुसत्या परीक्षा पास होऊन पदव्या मिळविण्यात काही अर्थ नाही. विद्यार्थ्यांनी रचनात्मक कार्य करून दाखविले पाहिजे. दगड फोडीचे काम करण्यात व कारकून बनण्यात काहीच फरक नाही.

या देशात ब्राह्मण समाजाची अशी समजूत होती की, विद्या फक्त आम्हीच प्राप्त करू शकतो. परंतु हे साफ खोटे आहे. कोणाएका युरोपियनाने म्हटले आहे की जगात सहा विद्वान आहेत. त्यापैकी डॉ. बाबासाहेब आंबेडकर एक होत (टाळया). विद्या ही एक तरवार आहे. या तलवारीने कोणी कोणाची मान

---

जनता : २० नोव्हेंबर १९५४.

कापतो तर शीलवान मनुष्य तरवारीने कुणाचे रक्षण करतो. त्यासाठी धर्मशील बनले पाहिजे. रोज सकाळ-संध्याकाळ सामुदायिक वंदना करून बौद्धतत्त्वाची उपासना केली पाहिजे. दर आठवड्याला वादविवादात्मक विषय ठेऊन कोणाला तरी बोलावून त्यावर व्याख्याने करविली पाहिजेत. तुम्हाला जगात कसे राहावे हे शिकविले जात आहे. तेव्हा सुटीत घरी गेल्यावर आरोग्य व स्वच्छता याविषयी आई-वडीलांना माहिती सांगून त्यांना सुधारण्याचा प्रयत्न केला पाहिजे. सध्या तुमच्या बोर्डिंगला जी आर्थिक मदत मिळत आहे ती तळयातील पाण्याप्रमाणे आहे. ती केव्हाना केव्हा आटणार हे निश्चित. यासाठी सरकारने कायम स्वरुपाच्या मदतीची सोय केली पाहिजे.



# ३२७

# कोणत्याही निष्णात पंडितांने बौद्ध धर्माच्या तत्त्वाविषयी माझ्याशी चर्चा करावी मी त्याचा पराभव केल्यावाचून राहाणार नाही

श्री. फुना, व्हीचार्न ऑफ थायलंड यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ४ डिसेंबर १९५४ रोजी रंगून येथे तिसऱ्या जागतिक बौद्ध धर्माच्या अधिवेशनास रीतसर सुरूवात झाली. सदर प्रसंगी अमेरिका, इंग्लंड, सिलोन, मलाया, जर्मनी, फ्रांस, इन्डोनेशिया इत्यादी राष्ट्रांच्या प्रतिनिधींनी बौद्ध धर्म व त्याची शिकवण या विषयावर उद्‌बोधक भाषणे केली. अध्यक्षांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची ओळख हिंदुस्थानातील प्रतिनिधींचे पुढारी व तेथील सात कोटी दलितांचे नेते या नात्याने करून देऊन त्यांचा गौरव केला.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी सुमारे पन्नास मिनिटे अस्खलितपणे भाषण केले. आपल्याला या पवित्र ठिकाणी अधिवेशनास बोलाविल्याबद्दल त्यांनी येथील चालक मंडळीचे प्रथम आभार मानले.

ते आपल्या भाषणात म्हणाले,

या ठिकाणी जमलेले आपण सर्व बुद्धअनुयायी आहोत. जगातील इतक्या राष्ट्रातून बौद्धधर्म प्रचलित असला तरीदेखील त्याचा प्रचार जितक्या झपाट्याने व्हायला पाहिजे तितका झालेला नाही हे मला मोठ्या खेदाने म्हणावे लागते. आज या ठिकाणी उपस्थित असलेल्या सर्व राष्ट्रांमध्ये सिलोन आणि ब्रह्मदेश ही दोन राष्ट्रे बौद्धधर्माभिमानी या दृष्टीने बरीच आघाडीवर आहेत असे दिसते. परंतु माझ्या दृष्टीने या दोन्ही राष्ट्रांची बौद्धधर्माच्या प्रचाराची कार्य-पद्धती अगदीच वाखणण्याजोगी नाही.

येथील श्रीमंत स्त्रियादेखील खूप पैसे दान देतात. धर्माच्या नावाने जमा होणारे हजारो रुपये ते धार्मिक उत्सवप्रसंगी निरर्थक खर्च करतात. घरादारांना व झाडांना विजेचे दिवे लावून हवी ती आरास करण्यात हे पैसे खर्च होतात. त्याऐवजी धर्मासाठी खर्च होणारा पैसा बौद्ध धर्माच्या प्रचारासाठी खर्च झाला पाहिजे, असे माझे स्पष्ट मत आहे. ऐश्वर्य नि शोभा या गोष्टी भगवान

---

जनता : १८ डिसेंबर १९५४.

गौतम बुद्धांना मुळीच पसंत नाहीत. ज्या देशात या धर्माचे नावही नाही अशा देशात धर्म प्रचाराच्या संस्था निर्माण करून त्यांच्यामार्फत भगवान गौतम बुद्धाच्या शिकवणुकीचे बी पेरावे. हे आपले सिलोनी बंधु असे का करीत नाहीत, त्याचे मला मोठे नवल वाटते. तसेच या ब्रह्मदेशातील लोकही धार्मिक उत्सवाप्रित्यर्थ हजारो रुपये खर्च करतात. ते त्यांनी मी वर सांगितल्याप्रमाणे खर्च केले तर अल्पावधीत आपणाला बौद्ध धर्माचा प्रसार करता येईल.

भारत देशाविषयी बोलावयाचे झालेच तर मला मोठ्या दुःखाने म्हणावे लागते की, ज्या देशात गौतम बुद्धाचा जन्म झाला त्याच देशात त्याच्या धर्माचा लोप व्हावा अशी विचित्र घटना का घडावी ? तुमच्यापैकी फारच थोड्या राष्ट्रांना याची कल्पना असेल की, हिंदुस्थानात ब्राह्मणांनी आपले हिंदू धर्माचे वर्चस्व पुष्कळ वर्षापासून अबाधितपणे चालू ठेवले आहे. परंतु ब्राह्मणांना मी आव्हान देतो की, कोणत्याही निष्णात पंडिताने बौद्ध धर्माच्या तत्त्वाविषयी माझ्याशी चर्चा करावी. माझी खात्री आहे की मी त्याचा पराभव केल्यावाचून कधीही राहाणार नाही. ( टाळया )

प्राचीन काळी हिन्दू धर्मात यज्ञविधिमध्ये गाईचा बळी दिल्याने स्वर्गप्राप्ती होते, असे ब्राह्मण म्हणत असत. माझा त्यांना उघड सवाल आहे की, अशा रीतीने जितक्या कालावधीत स्वर्गप्राप्ती होत असेल त्यापेक्षाही लवकर आपल्या वडिलांचा बळी दिल्याने स्वर्गप्राप्ती होईल. मग हे लोक आपल्या बापाचा बळी का देत नाहीत. एकेकाळी अशारितीने वागणारे ब्राह्मण आता गोहत्त्या प्रतिबंधक प्रचार करीत आहेत. हा एक गौतम बुद्धाच्या अहिंसा तत्त्वाचा मोठा विजय होय.

ब्राह्मणाव्यतिरिक्त ब्राह्मणेतर पक्ष भारतात संखेने बराच मोठा आहे. धर्माच्याविषयी त्यांचीही स्थिती केविलवाणी झाली आहे. हजारो देव देवता या देशामध्ये ब्राह्मणांनी निर्माण केल्या आहेत. कोणत्या देवाची उपासना केल्याने मोक्ष–मुक्ती मिळेल हे त्यांनाही समजत नाही. आपल्या बौद्ध धर्मात मोक्ष–स्वर्ग या खुळया कल्पनांना स्थान नाही. उलट मानवी जीवित सुखसमाधानाने घालवावयाचे असेल तर मानवाने शुद्धाचरण, अहिंसा, समता आणि बंधुत्व या गोष्टींचाच अवलंब करावा. त्याशिवाय त्याला दुसरा मार्गच नाही. या गोष्टी गौतम बुद्धाच्या धर्मातील तत्त्वे म्हणून प्रसिद्ध आहेत आणि हीच तत्त्वे मी माझ्या सहा कोटी अनुयायांना सांगितली आहेत. ती त्यांना पटली

आहेत. पैशाच्या अभावी मी त्यांच्यासाठी आज काहीच करू शकलो नाही ; तरी पण उद्या अल्पावधीतच मला योग्य ती साधने उपलब्ध झाली की बौद्ध धर्माचा प्रसार भारतात केल्यावाचून मी कधीही राहाणार नाही. (टाळया)

मी पार्लमेंटमध्ये असताना बौद्ध धर्माच्या पुनरूत्थानाविषयी काही गोष्टी करून टाकल्या आहेत. भारताच्या घटनेचा मी शिल्पकार आहे. मी ती घटना तयार केली. तीत पाली भाषेच्या उत्थानाची योजना करून ठेवली आहे, ही एक गोष्ट. दुसरी गोष्ट म्हणजे राष्ट्राध्यक्षाच्या राजवाड्यावर गौतम बुद्धाच्या शिकवणुकीतील पहिलेच चरण-धम्मचक्र परिवर्तन-घातले असून ते मी ब्रह्मदेशाचे अध्यक्ष डॉ. जी. पी. मललशेखर याच्या दृष्टोत्पत्तीस आणले आहे. हे पाहून त्यांनाही मोठे आश्चर्य वाटले.

तिसरी गोष्ट म्हणजे भारतीय पार्लमेंटच्या निशाणावर अशोक चक्र हे भारत सरकारचे प्रतीक म्हणून घटनेत मान्य करून घेतले आहे. हे सर्व करताना मला हिंदू, मुसलमान, ख्रिश्चन व पार्लमेंटच्या इतर सभासदांचा विशेष विरोध झाला नाही. इतके स्पष्ट नि मुद्देसूद विवेचन मी पार्लमेंटमध्ये केले होते.

या तिसऱ्या अंतरराष्ट्रीय अधिवेशनाला जमलेल्या या अठ्ठावीस राष्ट्रांपैकी एखाद्या राष्ट्राने तरी असे केले आहे का ? एवढेच करून मी थांबलो नाही, तर मुंबई शहरात सिद्धार्थ नावाचे एक मोठे कॉलेज मी स्थापन केले आहे. तसेच अजिंठा, वेरूळ इकडे जाताना वाटेत औरंगाबाद येथेही दुसरे कॉलेज स्थापन केले आहे. मुंबईतील कॉलेजमध्ये २,९०० व औरंगाबाद येथे ५०० विद्यार्थी शिक्षण घेत आहेत.

या विद्यार्थ्यांकडून गौतम बुद्धाच्या चरित्रावर प्रबंध लिहून घेऊन ज्याचा प्रबंध सरस ठरेल त्याला एक हजार रुपये देण्याचा माझा विचार आहे. हा प्रबंध लिहून घेण्याचा हेतू हा की, बौद्ध धर्माचा सखोल अभ्यास त्यांनी करावा म्हणजे आपोआप बौद्ध धर्म प्रचाराचे काम होईल. या चढाओढीत पारशी, मुसलमान, हिंदू वगैरे धर्मातील विद्यार्थ्यांना भाग घेता येईल.

तसेच पुरेसा पैसा जमा झाल्यास दिल्ली, मुंबई, कलकत्ता, मद्रास या शहरात बुद्ध विहार स्थापन करून प्रत्येक रविवारी लोकांच्या उपासनेची सोय करण्याचा माझा मानस आहे. मी स्थापन केलेल्या दोन्ही कॉलेजसाठी भारत सरकारकडून २२ लाख रुपये कर्ज घेतले आहे. हे कर्ज मी मरेपर्यंत फेडीन की नाही याची मला मोठी शंकाच वाटते. (हंशा)

अशारितीने माझा या धर्माच्या बाबतीत प्रयत्न चालू आहे. जगात भारत हा असा एकच देश आहे की, जेथे बौद्ध धर्माचा प्रसार फारच थोड्या काळात करता येईल. शेतकरी जमीनीचा मगदूर पाहूनच तीत बी पेरतो, तद्वतच या भारत देशात बौद्ध धर्माचा प्रसार करण्यासाठी आवश्यक अशा अनुकूल गोष्टी आहेत. त्याचा आपण सर्व राष्ट्रांनी आर्थिक सहाय्य करून उपयोग करून घ्यावा, अशी माझी विनंती आहे. कोणी सहाय्य करो वा न करो, माझा मार्ग मी आक्रमिल्यावाचून राहाणार नाही, असे या सभागृहास मी आश्वासन देतो. (टाळया)

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण चालू असताना जगातील अठ्ठावीस राष्ट्रांचे प्रतिनिधी हे भाषण शांत चित्ताने ऐकत होते.



# ३२८

# ब्रह्मदेशात अस्पृश्यता नाही म्हणूनच तुम्हाला व्यापार व उद्योगधंद्यात प्रगती करता आली

रंगून येथे वास्तव्य करीत असलेल्या आंध्र प्रदेशातील शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या मंडळींनी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या सत्काराची जंगी जाहीर सभा दिनांक ४ डिसेंबर १९५४ रोजी घेतली होती. यापूर्वीच सदर मंडळींनी बाबासाहेबांच्या दर्शनाचा लाभ तेथील जनतेला व्हावा म्हणून प्रयत्न केला होता. परंतु बाबासाहेबांच्या आजारपणामुळे त्यांच्या प्रयत्नास यश आले नाही. परंतु दी वर्ल्ड फेलोशिप ऑफ बुद्धीस्ट कॉन्फरन्सच्या वेळी येथील जनतेची विनंती मान्य करून जाहीर सभेच्या कार्यक्रमास हजर राहाण्याची डॉ. बाबासाहेबांनी संमती दिली. सदर दिवशी येथील प्रशस्त अशा भव्य हॉटेलात तेथील मंडळींनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना टी पार्टी (चहापान) दिली. तत्प्रसंगी रंगून येथे व्यापारानिमित्त अगर इतर उद्योगधंद्यानिमित्त कायमचेच राहिलेले पाचशे प्रतिष्ठित हिंदी नागरिकही उपस्थित होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा या हॉटेलात प्रवेश होताच या सर्व नागरिकांनी उभे राहून टाळ्यांच्या गजरात त्यांचे स्वागत केले.

चहापानानंतर सर्वांना उद्देशून डॉ. बाबासाहेबांनी फक्त १५ मिनिटेच भाषण केले. ते म्हणाले,

या ठिकाणी तुम्ही सर्व हिंदी लोक एकमेकांशी प्रेमाने व संघटनेने वागता हे पाहून मला समाधान वाटते. आपल्या देशात हे दृश्य पाहावयास मिळत नाही. ब्रह्मदेशाचे उदाहरण आपल्यापुढे ठेवून तुम्ही वागलात तर तुमचा अभ्युदय झाल्याशिवाय राहाणार नाही. मला येथील शेड्यूल्ड कास्ट्स्च्या लोकांनी या प्रशस्त हॉटेलात चहापान देऊन माझ्या विषयीचे प्रेम व्यक्त केले आहे. ही गोष्ट घडण्यास त्यांची सांपत्तिक परिस्थिती समाधानकारक असली पाहिजे. त्याशिवाय ही महान खर्चाची बाब घडून येणे शक्य नाही. तुम्ही सर्वांनी असेच बंधुभावाने वागावे एवढेच मी या ठिकाणी सांगू इच्छितो.

---

जनता : २९ जानेवारी १९५५.

गेल्या वेळी मी आपणास भेट देऊ शकलो नाही. त्यावेळी मी आजारी होतो. आता देखील मला पाहिजे तसे बरे वाटत नाही, तरी पण आपली पुन्हा निराशा होऊ नये म्हणून आजच्या प्रसंगी मी या ठिकाणी उपस्थित राहिलो. या देशात राहाणाऱ्या आपल्या लोकांची सांपत्तिक परिस्थिती मला चांगली वाटते. मी असे ऐकतो की, आपल्यातील साधा मजूरदेखील रोज दहा कॅटस-रुपये मिळवितो. तुमच्यापैकी काही लोक तांदळाचे व्यापारी आहेत, कोणी टिम्बर मर्चंटस्–लाकडाचे व्यापारी आहेत. आपापल्या धंद्यात तुम्ही प्रगतिमान आहात, हे ऐकून मला समाधान वाटले. माझे सबंध आयुष्य मुंबईत गेले आहे. मुंबईतील आपल्या जनतेचेही माझ्यावर फार प्रेम आहे. ते सभा वगैरे भरवतात. पण तुमच्यासारखी टी पार्टी (चहापान) त्यांनी मला अजून तेथील ताजमहाल हॉटेलमध्ये दिलेली नाही. यावरून तुमच्या व त्यांच्या आर्थिक परिस्थितीत बरीच तफावत आहे असे दिसते. त्यांना असे का करता येत नाही, याचे कारण उघड आहे. तेथे अस्पृश्यता आहे. या देशात तिचे नावही नाही.

या ठिकाणी मला तुम्हाला एक गोष्ट सांगाविशी वाटते की, ज्या या ब्रह्मदेशात ' अस्पृश्यता ' हा शब्द देखील माहीत नाही त्या देशात तुम्ही स्वतःला शेड्यूल्ड कास्ट्स् म्हणवून का घेता ? शेड्यूल्ड कास्ट्स् म्हणजे पददलित. आम्ही नीच-हलक्या जातीचे लोक आहोत, असे या ब्रह्मी लोकांना तुम्ही स्वतः होऊन का सांगता ? तेव्हा पहिल्यांदा ही गोष्ट करा की शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन ही तुमची संस्थाच या देशातून नाहिशी करा. तुम्हास तुमची संघटनाच हवी असेल तर त्या संघटनेस मी तुम्हाला नवीन नाव सुचवीन पण स्वतःला शेड्यूल्ड कास्ट्स् म्हणवून घेऊ नका. तुमच्यासारखी वागणूक जर आम्हाला हिंदी सरकारने दिली, तर मी देखील भारतात शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन ही संस्था अजिबात बंद करीन. परंतु अशी समानतेची वागणूक आम्हाला मिळत नाही आणि म्हणूनच आपल्या हिताचे संरक्षण करण्यासाठी आम्हाला शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन ही संस्था ठेवावी लागली.

दुसरी गोष्ट मला तुम्हाला सांगाविशी वाटते ती ही की, तुम्ही या देशात २०-२५ वर्षांहून अधिक काळ आहात. तर मग तुम्ही लोकांनी या देशाचे नागरिकत्व का पत्करले नाही. हिंदी नागरिकत्व चालू ठेवण्यात तुमचा काय फायदा आहे. ज्या देशातील लोकांच्या नसानसातून विषमता भरलेली आहे, अस्पृश्यतेचा मोठा कलंक ज्या देशाला लागलेला आहे, ज्या देशातील लोक अस्पृश्य लोकांची आर्थिक उन्नती होऊ देत नाहीत, त्या देशाचे नागरिकत्व

चालू ठेवणे मुर्खपणाचे आहे. ब्रह्मी सरकारचे तुम्ही लोकांनी आभार मानावयास पाहिजे की, त्यांनी आपल्या घटनेत या देशात (ब्रह्मदेशात) आठ वर्षे राहात असलेल्या प्रत्येक इसमास या देशाचे कायद्याने नागरिकत्व पत्करता येईल, ही तरतूद करून ठेवली आहे. ती अभिनंदनीय आहे.

आमचे हिंदी सरकार व सिलोनी सरकार यांचा या नागरिकत्वाच्या बाबतीत केवढा मोठा झगडा चालू आहे. सिलोनी सरकार हिंदी लोकांचे नागरिकत्व मान्य करण्यास बिलकूल तयार नाही. या मानाने पाहाता ब्रह्मी सरकार किती तरी चांगले म्हणायचे. याकरिता तुम्ही लोकांनी विलंब न लावता या देशाचे नागरिकत्व अगोदर मान्य करा. या देशात अस्पृश्यता नाही म्हणूनच तुम्हाला व्यापारात व इतर उद्योगधंद्यात स्वतःची प्रगती करता आली. तुम्ही आपला नैतिक दर्जा वाढविला पाहिजे.

नंतर श्री राव, शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन प्रमुख यांनी तेथील जनतेच्या वतीने डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना चांदीच्या करंडीतून मानपत्र अर्पण करून त्यांचा गौरव केला.



# ३२९

# पंढरपूर येथे बौद्ध धर्माचे देवालय होते हे मी सिद्ध करून देईन

दिनांक २५ डिसेंब १९५४ रोजी देहू रोड येथील बुद्ध मंदिरात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या हस्ते भगवान बुद्धाच्या मूर्तीची विधीपूर्ण कृत्ये झाल्यानंतर प्रतिष्ठापना करण्यात आली. ही मूर्ती सुमारे अडीच हजार रुपये किंमतीची असून डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी ती खास रंगूनहून आणली आहे. या समारंभाप्रसंगी सुमारे ४० हजारावर जनसमुदाय हजर होता.

ॲडव्होकेट शंकरराव खरात, ऑर्गनायझिंग सेक्रेटरी, महाराष्ट्र प्रदेश शे. का. फे. यांच्या हस्ते ध्वजारोहण करण्यात आले.

उपस्थित जनसमुदायाला मार्गदर्शन करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

आज या ठिकाणी या छोट्याशा मंदिरात भगवान बुद्धाच्या मूर्तीची स्थापना करण्यात आली आहे. नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे एखादे मंदीर बांधण्यात आले तर त्यात भैरोबा, खंडोबा, मरीआई वगैरे नानाप्रकारच्या देवता ठेवल्या जातात. आपले लोक भाविक असल्यामुळे ते विष्णू, शिव अशात-हेच्या देवतांची स्थापना करतात. इथला प्रसंग नवीन आहे. इथल्या मंदिरात मरीआई, खंडोबा, महादेव आणलेला नाही. येथे आज हा नवा देव आणून स्थापला आहे. हा प्रसंग सर्वांच्या दृष्टीने आमच्यामध्ये नवीन आहे. आपल्यापैकी काही जणांनी भगवान बुद्धाचे नाव देखील ऐकले नसेल.

काही लोक म्हणतात की, हा नवीन देव कोठून आणला आहे ? हा देव कोठून आणला, त्याची उत्पत्ती कशी झाली याची चिकित्सा करणे अत्यंत महत्त्वाचे आहे. बुद्ध भगवंताचा हा धर्म या देशामध्ये अत्यंत जुना आणि प्राचीन आहे. हा धर्म फार प्राचीनकाळी या देशात उगम पावला आहे. चीन, जपान, सयाम, इंग्लंड या बाहेरील देशातून हा धर्म येथे आणलेला नाही. हा वृक्ष येथेच उगवला

---

जनता : १ जानेवारी १९५५.

आहे. या देवाला येथे कोणी आणले याबद्दल अनेक प्रश्न विचारले जातात. या देवाला येथे कोणी आणले याबद्दलचा पहिला खुलासा असा करता येईल की, या देशातील पुरातन देवता आपल्याला ठिकठिकाणी सापडतात. तो इथलाच आहे.

इतिहासाच्या काळामध्ये जी अनेक कारणे घडली त्यामुळे या धर्माचा लोप झाला. या धर्माचे शत्रु या देशात राहूच शकत नाहीत. आपण मराठीमध्ये शत्रुला बोलताना म्हणतो की, 'माझा देव जागती ज्योत आहे. माझा देव काही कच्चा नाही. तुझ्यावर सोडीन तर तुझा सत्यानाश करील.' त्याचप्रमाणे या धर्माचे आहे. आज मी असे भाकीत करतो. हे पाहायला कदाचित मी जगणार नाही. मात्र ही गोष्ट होईल यात तिळमात्र शंका नाही. एक मनुष्य काही माणसांना काही काळ फसवू शकतो. एक मनुष्य सर्व लोकांना सर्व काळ फसवू शकत नाही.

बुद्ध धर्माला १९५६ साली अडीच हजार वर्षे पुरी होतील. हा धर्म साडेबाराशे वर्षे जिवंत असा होता; हे सिद्ध करण्यासाठी आज मी इतिहासातील पुरावा देणार आहे. पूर्वी या देशावर मुसलमानांच्या स्वाऱ्या झाल्या. मुसलमान मूर्तिपूजक नसतात. त्यांनी बुद्ध धर्माच्या लोकांवर हल्ला चढविल्यामुळे हा धर्म खालावला. अफगाणातील शंभर टक्के लोक बुद्ध धर्माचे होते. तेथे बुद्ध धर्म होता. येथे बुद्ध धर्मात सात हजार भिक्षु होते. या मुसलमानांनी त्यांच्यावर स्वाऱ्या केल्या त्यावेळी त्या मुसलमानांपुढे दोनच प्रश्न होते. या देशातील लोकांनी मुसलमान धर्माचा स्वीकार करावा, हा पहिला प्रश्न आणि दुसरा प्रश्न म्हणजे जो हा धर्म स्वीकारणार नाही त्यांची कत्तल करणे. त्यांनी या सात हजार भिक्षुंची कत्तल केली.

हा धर्म जिवंत होता तेव्हा तो फार प्रभावी होता. या देशात नालंदा विश्वविद्यालय होते. ज्ञानप्राप्ती करून देणे हे या धर्माचे तत्त्व होते. एक आचार्य व त्यांचे १० पोरे एकत्र बसत आणि ब्राह्मण शास्त्र शिकवित. अशी या धर्माची स्थिती नव्हती.

पहिले विश्वविद्यालय बौद्ध धर्मीय लोकांनी स्थापन केले. नालंदा विश्वविद्यालयात तेरा हजार विद्यार्थी व एक हजार अध्यापक होते. ब्राह्मण धर्म हा एकांगी होता. अन्य कारणांमुळे मुसलमानांच्या तडाख्यातून त्याचा बचाव झाला. बौद्ध धर्माविरूद्ध ब्राह्मणांची कारस्थाने चालू होती. यामुळे तो खाली पडला.

बुद्ध धर्मावर मी इंग्रजीतून पुस्तक लिहीत आहे. हे पुस्तक दोन महिन्यांनी प्रकाशित होईल. या पुस्तकाचे मराठीत भाषांतर करून ते छापण्यात येईल.

तुमचा बौद्ध धर्म एवढा चांगला होता तर त्याचा ऱ्हास का झाला ? असे माझे काही मित्र मला प्रश्न विचारतात. तेव्हा मी त्यांना असे विचारतो की, हा धर्म वाईट आहे म्हणून या धर्माचा ऱ्हास झाला असे म्हणावे तर चीन, जपान, कंबोडीया, सिलोन या देशांमध्ये या धर्माचा ऱ्हास का झाला नाही ? तेथे अजून तो का टिकून आहे ? या देशात हा धर्म नाहिसा झाला नाही तर त्याला निराळी वाळवी लागली असेल, कारस्थाने झाली असतील. सांगायचा मतलब असा की, त्याच्या निर्मितीपासून तो साडेबाराशे वर्षेपर्यंत यच्चयावत चालला होता. हा इतिहास इतिहासकारांनी लपवून ठेवला आहे. यावेळी मी सबंध भारताविषयी बोलणार नाही. फक्त महाराष्ट्रासंबंधी सांगणार आहे. आपला महाराष्ट्र देशसुद्धा शंभर टक्के बौद्ध धर्मीय होता आणि त्याला पुरावा म्हणून महाराष्ट्रातील पुरातनकाळच्या कोरीव लेण्यांची उदाहरणे देता येतील. भारतातील दोन हजार लेण्यांपैकी दीड हजार लेण्या महाराष्ट्रात आहेत. ही लेणी म्हणजे बौद्ध भिक्षुंची राहाण्याची ठिकाणे होती. हेच त्यांचे निवाऱ्याचे स्थान होते. महाराष्ट्रात जी काही लेणी आहेत ती पांडवांची आहेत, असे सांगण्यात येते. परंतु विराटनगरी कोठे व पांडवाचे राज्य कोठे ?

या विहारामध्ये २५ भिक्षु असतात. पंधरा हजार विहारातून सुमारे पस्तीस हजार भिक्षु राहात असत. जनतेकडून भिक्षा मागून ते आपली उपजीविका करीत. भिक्षा मागून त्यांचे कार्य चालत असे. एक हजार दोनशे पन्नास वर्षे ते या प्रांतामध्ये होते. आपण मोडके घर पुन्हा बांधतो. त्याला नवीन पत्रा टाकतो. छप्पर नवीन बसवितो. म्हणजेच त्या घराचा जीर्णोद्धार करतो. आपल्या वाडवडिलांपासून भगवंताची पूजा आपण करीत आलो आहो. तोच देव आपल्याला पुन्हा बसवावयाचा आहे. या देशात धर्म म्हणून काही राहिलेला नाही, असे माझे स्पष्ट मत आहे. हिंदू लोकांची धर्माची व्याख्या फार निराळी आहे. देवळात जाणे, घंटा वाजविणे, पूजा करणे आणि भटाला दोन पैसे देणे एवढेच या धर्माचे कार्य ! जणू काही भटाच्या बापाचे ऋण फेडणे होय. परंतु आम्हाला काही हे जमले नाही. विष्णूची पूजा करून विष्णू पावला नाही, शिवाच्या देवळात जाऊन शिव पावला नाही आणि मरीआई, म्हसोबा, खंडोबा तर पावलाच नाही. व्यक्तिच्या व समाजाच्या जीवनाला आवश्यक म्हणून धर्म हवा आहे. धर्माला नीतीचे बंधन हवे आहे. काही लोक मला विचारतात की, धर्म काय करावयाचा आहे, परंतु माझा

त्यांना सवाल आहे की, आम्ही डल्ली खावयाची सोडली आहे. केवळ पोटच भरावयाचे तर मग तुम्हीही डल्ली, सागोती का खात नाही ? धर्म हा दुराचरणावर नियंत्रण ठेवतो. तुम्हाला सांगण्यासारखे पुष्कळ आहे. पण तुमच्या भाषेत मला काय सांगता येईल ? येथे उदाहरणादाखल मी तुम्हाला एकच गोष्ट सांगतो. बैलगाडीला दोन चाके, दोन बैल, गाडा तसेच हाकणारा मनुष्य वगैरे सर्व असते. मी लहानपणी बैल हाकायचे काम केले आहे. गाडीला वंगण असते, चाकाला खीळ असेल तर बैल गाडा ओढतील. त्याचप्रमाणे मनुष्याच्या पापी, दुराचारी वर्तनाला बंधन म्हणजेच धर्म ! धर्माचे बंधन असल्याशिवाय कार्य टिकू शकत नाही.

कोणताही धर्म घेताना चोखाळून घेतला पाहिजे. आपण बाजारात जातो, सोने बावनकशी आहे किंवा नाही याची खात्री करून घेतो. त्याचप्रमाणे धर्म म्हणजे बाजारपेठ आहे. ते विष्णुचे, ते शिवाचे, रामाचे दुकान आहे. तेथे पुजारी धूप, कापूर जाळत बसले आहेत. कृष्ण, राम, शिव, विष्णू यांचा धर्म हा असा धर्म आहे. धर्म मनुष्याचा उद्धार करतो. धर्म घात करण्याकरिता नसतो. आमची अवनती झाली असेल तर ती जातीभेदामुळे ! जो धर्म जातीभेदाने बरबटलेला आहे, ज्या धर्मात असमानता आहे तो धर्म आम्ही कसा घेऊ ? ज्या धर्मात समानता अधिष्ठित झाली आहे असा धर्म पाहिजे. बौद्ध धर्मात सर्वांना समान संधी व सर्वांना समान अधिकार दिलेला आहे. त्यात ऐक्यता आहे. भेदभाव नाही.

ह्या प्रसंगी आपणाला एका सुक्ताची आठवण करून द्यावीशी वाटते. ब्राह्मणाची पोरे होती, त्यांच्यामध्ये तत्त्वज्ञानाविषयी वाद चालू होता, ' ब्रह्म हे घर आहे व आत्मा ब्रह्माची छाया आहे. सूर्य आणि सूर्याचे प्रतिबिंब, घर आणि त्याची छाया याप्रमाणे ब्रह्म आणि आत्मा याचे आहे.' ही सगळी पुराणातील वांगी आहेत. ब्रह्माची जर छायाच आत्मा आहे तर अस्पृश्यांना शनिवार वाड्यातील हौदात पाणी का भरू देत नाही ? हा वाद मिटत नाही असे पाहून ती पोरे बुद्धाजवळ गेली. त्यांना ब्राह्मणांचे तत्त्वज्ञान पटलेले नव्हते. भगवंतानी त्यांना विचारले : हे ब्रह्म सत्य आहे काय ? तुम्ही ब्रह्म पाहिले आहे काय ? ते काही काळासाठी आहे की नित्य आहे ! त्याचं रंगरूप कसं काय आहे ? ते काही बोलते काय ? त्याला चव आहे का सुगंध आहे ? ते गुलाबाच्या फुलासारखे आहे की चाफ्याच्या ? ते गोड आहे, तिखट आहे की आंबट आहे ?

मनुष्यमात्राला सत्य कळण्याकरिता पाच इंद्रिये आहेत. डोळा, कान, नाक, जीभ वगैरे हीच ती पाच इंद्रिये होत. डोळयाने पाहाता येते, कानाने ऐकायला येते, नाकाने सुगंधित आहे की दुर्गंधित आहे असा वास कळतो. जिभेने खारट, तिखट, आंबट चव कळते. पाच इंद्रियांची साक्ष ज्याला मिळते तेच सत्य. ब्रह्म सत्य मानणे म्हणजे न पाहिलेल्या मुलीवर प्रेम करण्यासारखे आहे. बुद्ध भगवानाचा धर्म हा समानतेचा धर्म आहे. नुकताच माझ्याविषयी श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी एक लेख लिहिला असल्याचे माझ्या निदर्शनास आले आहे. माझ्याविषयी सहसा कोणी लिहीत नाही आणि लिहिलेच तर ते चांगले असेलच हे सांगता यायचं नाही. श्री. जोशी यांनी आपल्या लेखाच्या शेवटी डॉ. आंबेडकरांचे अवतारकार्य आता संपले असे लिहिले आहे. पण माझे अवतारकार्य संपले नसून त्याला सुरवात होणार आहे. लक्ष्मणशास्त्रीसारखा विद्वान मनुष्य असं लिहितो याला काय म्हणावे ? आम्ही महाडचा सत्याग्रह केला. तुम्ही हिन्दू लोक आम्हाला हिन्दू म्हणता ना ! मग हे लोक आपल्याला पाणी प्यायला देतात किंवा नाही हेच पाहाण्यासाठी हा सत्याग्रह केला होता. आपल्याला देवळात जाऊ देतात की नाही हे बघण्यासाठी मंदीर प्रवेशाची चळवळ केली. इतके दिवस नांगरट झाली, जमीन आता पेरायला उपयोगी झाली आहे. माझे आयुष्य आता थोडे राहिले आहे. दुर्दैवाने जी सामाजिक कार्ये माझ्या हाती होती ती माझ्याकडून पूर्ण झाली नाहीत. मी आता इतर सर्व कार्यातून निवृत्त होणार आहे. मला बौद्ध धर्माच्या प्रसाराचे कार्य करावयाचे आहे. आजचा हा आपला प्रसंग पाहून काही लोक आपला उपहास करतील. परंतु चांगले कार्य हे अवघड असते. महार जात धैर्यवान आहे. तिच्या डोक्यावर इतर जमाती आहेत. लंगोटी, कांबळी, काठी हाच त्याचा पोषाख. जैन साधु नग्न हिंडतात. त्याचप्रमाणे आम्ही नग्न हिंडू.

मला आपणाला दोन गोष्टी सांगावयाच्या आहेत. तुम्ही या धर्माचा स्वीकार कराल त्या दिवशी बऱ्याच गोष्टी सोडून दिल्या पाहिजेत. एकादशीला पंढरपूरला जाणे, द्वादशीला इतर क्षेत्राला जाणे बंद करायला हवे. मला चांगली आठवण आहे. नाशिक जिल्ह्यात त्र्यंबक येथे कुंड होते. या कुंडात फक्त पसाभर पाणी होते. यात्रेकरू लोक त्यात फडके भिजवून घेऊन अंगाला चोळीत. अशा तऱ्हेची खिचडी मी बौद्ध धर्मात होऊ देणार नाही. स्वच्छ पाण्यात घाणेरडे पाणी ओतता कामा नये. भगवान बुद्धाचा धर्म तोच आमचा धर्म, असा आता आम्ही निश्चय केला आहे. तुम्ही पंढरपूरला जाता, पांडुरंगाचे अभंग म्हणता. पुण्याच्या इतिहास संशोधन मंडळातील लोकांची पंढरीचा विठ्ठल

कोण होता यावर हुज्जत चालू आहे. पण माझा त्यांना खडा सवाल आहे की, विठ्ठलाची भानगड सोडून देऊन पंढरीचा पांडूरंग कोण ? याचे पहिल्यांदा उत्तर द्या. तो होता कुठे ? त्याला पळविलं कोणी ? कोणी डुबविलं ? पांडूरंग म्हणजे पंढरपूर येथे बौद्ध धर्माचे देवालय होते हे मी त्यांना सिद्ध करून देईन. (प्रचंड टाळया) पुंडलीक या शब्दापासून पांडूरंग हा शब्द झाला. पुंडलीक याचा अर्थ कमळ. बौद्ध धर्मात मूर्तीपूजा नव्हती. अज्ञानी लोकांना तत्त्वज्ञान काय कळे ! कमळाला पाली भाषेत पांडूरंग असे म्हणतात. तुम्हाला भुलविण्यासाठी ब्राह्मणांनी बुद्धाच्या नावाचा लोप केला. मतलबी लोक महाराष्ट्रातील लेणी ही पांडव लेणी असल्याचे सांगतात. इकडे ' पांडव ' कशाला आले होते ? पांडव दिल्लीच्या बाहेर ८० मैलाच्या पलिकडे गेले नाहीत. त्यांनी अलवार स्टेटमध्ये पंधराशे लेणी खोदली कशी ? त्यांच्याजवळ टिकास नव्हती की पावडं नव्हतं. भगवान बुद्धाने सांगितले की ' ये आणि पाहा ' ! मी सांगतो म्हणून तुम्ही हा धर्म घ्यावा असे नाही. तुझी अविद्या नाहिशी झाली तरच तू या धर्माचा स्वीकार कर. आपणाला एक गोष्ट सांगायची बाकी राहिली आहे. हे जे देऊळ बांधण्यात आले आहे हे अत्यंत लहान आहे. ते जर आपण आहे ह्याच स्थितीत ठेवाल तर आपल्याला काळिमा लागेल. या देवळाला एक हॉल पाहिजे. प्रदक्षिणा करण्यासाठी जागा हवी आहे. तुम्ही सर्वांनी वर्गणी गोळा करून या मंदिराला भव्य स्वरूप देण्याचा प्रयत्न करावा. मात्र भगवंताच्या नावावर जमा केलेला पैसा खाऊ नका.

आजच्या प्रसंगाला अनुसरून जे काही सांगावयाचे होते ते मी सांगून टाकले. आजचा हा प्रसंग इतिहासामध्ये नोंदला जाईल. बाराशे वर्षानंतर भगवान बुद्धाच्या मूर्तीची स्थापना करण्याचा पहिला मान आपल्याला मिळाला आहे. याचे सारे श्रेय आपल्यालाच आहे. म्हणून आपण धन्यता मानली पाहिजे.



# ३३०

# हिंदू धर्मात देव, आत्मा याला जागा आहे पण मनुष्याच्या जीवनाला कोठे आहे ?

मुंबई येथील बौद्धधर्म सल्लागार समितीतर्फे दिनांक १४ जानेवारी १९५५ रोजी वरळी येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण आयोजित करण्यात आले. सभेला ५० हजारापेक्षा जास्त समुदाय हजर होता.

या सभेला संत गाडगे महाराज, श्री. अनंत हरी गद्रे, श्री. संत मोडके महाराज, कांबळे, करमाळेकर तसेच दलित फेडरेशनचे कार्यकर्ते उपस्थित होते.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

बऱ्याच दिवसापासून मी असा एक निर्णय घेतला होता की, कोणत्याही सार्वजनिक कार्यात नुसत्या व्याख्यानासाठी कधीच हजर राहावयाचे नाही. कारण नुसत्या व्याख्यानबाजीचा मला कंटाळा आला आहे. व्याख्यानात माझा सारा जन्म गेला आहे, उभी हयात गेली आहे. तथापि माझ्या व्याख्यानांचा समाजावर काहीच परिणाम झाला नाही, असे नाही. आज माझ्यापुढे अस्पृश्य समाजात जी जागृती झालेली दिसून येत आहे, ती माझ्या व्याख्यानांचेच फळ आहे, असे मी अभिमानाने सांगू शकतो.

जागृती हे जरी समाजाच्या उन्नतीचे मुख्य अंग असले तरी नुसत्या जागृतीचा उपयोग नाही. समाजाच्या उन्नतीकरिता काही विधायक कार्यक्रमाची आवश्यकता आहे. समाजात एखाद्या माणसाने जागृती केली व त्याच्या मरणानंतर समाजाला दिशा दाखविणारा दुसरा एखादा कर्तबगार पुरूष निर्माण झाला नाही तर एकखांबी तंबूप्रमाणे समाज मोडकळीस येतो.

मला आता काही तरी विधायक कार्यक्रम करायला पाहिजे परंतु त्याकरिता पैशाची अत्यंत जरूर आहे. त्यासाठी पैसा हवा आहे. मी एक मोठा याचक आहे. समाजातील इतर लोकांचे अंतरंग जर निर्मळ असेल व त्या निर्मळ अंतःकरणाच्या लोकांना आपले कार्य मंगल आहे असे वाटले व त्यांनी जर द्रव्याची मदत केली तर आम्हाला ती हवीच आहे ; परंतु त्यांच्या मदतीवर आपण विसंबून राहून चालणार नाही. आपण आपल्या बळावर उभे राहिले पाहिजे.

---

जनता : २२ जानेवारी १९५५.

'ज्याचे मढे तोच खांद्यावर उचलतो' तद्वतच आपल्या कार्याचा भार आपणच उचलला पाहिजे. आपल्या कार्याला आपणच मुक्त हस्ताने दान दिले पाहिजे.

आज माझा धर्मोपदेशाचा उपोद्‌घात आहे. बौद्ध धर्मासंबंधी मला सांगावयाचे आहे. बौद्ध धर्माची माझी घोषणा आजकालची नसून मी चौदा वर्षाचा विद्यार्थी होतो तेव्हापासूनची आहे. चौदा वर्षाचा असताना बौद्ध धर्माशी माझा परिचय झाला. चौदा वर्षाचा असतानाच रामायण, महाभारत, कृष्णलीलामृत, शिवलीलामृत, श्रीधराख्यान वगैरे सर्व मराठी ग्रंथ माझ्या वडिलांनी मजजवळून दहा दहा वेळा वाचून घेतले होते. वडिलांच्या अशा वागण्याचा निदान त्यावेळी तरी मला कंटाळा आला होता.

एल्फिन्स्टन हायस्कूलमध्ये असताना मी कुठली तरी एक परीक्षा पास झालो होतो. ज्या 'बटाट्याच्या चाळीत' मी राहात होतो तेथील लोकांनी मी पास झाल्याबद्दल अभिनंदनपर सभा घ्यावयाचे ठरविले. दादा केळूस्करांना मध्यस्थी घालून मोठ्या प्रयासाने तेथील लोकांनी माझ्या वडिलांची परवानगी घेतली, एक टेबल खुर्ची मांडून सभेस सुरुवात झाली. पण काय, सभेला काही निवडक लोक सोडून कोणीच हजर नाही. जो तो लंगोटी लावून आपापल्या उंबरठ्यावर व ओट्यावर पान, तंबाखू चघळीत बसलेला होता. सभेचे महत्त्व कोणालाच समजलेले नव्हते.

पण आज परिस्थिती निराळी आहे. आज अस्पृश्य समाज जागृतीने बराच पुढे आहे. लहानपणी माझ्या अभिनंदनाप्रित्यर्थ जी पहिली सभा घेण्यात आली तिचे अध्यक्ष श्री. दादा केळूस्कर होते. त्यावेळेला मी सभेत काय वेडेवाकडे बोल बोललो असेन ते मला आता आठवतही नाही. भाषण संपल्यानंतर केळूस्करांनी गौतम बुद्धाचे छोटेसे चरित्र मला बक्षीस म्हणून दिले. रामायण-महाभारतासारखे बरेच ग्रंथ मी वाचून काढले होते. तसेच हेही पुस्तक मी वाचले. परंतु बुद्धाची शिकवण व इतर ग्रंथांची शिकवण यात बरीच तफावत आहे, असे मला आढळून आले. पुढे या पुस्तकासारखी नवीन नवीन पुस्तके जसजसी मी वाचू लागलो तसतसा माझ्या डोक्यात नवा प्रकाश पडू लागला. बुद्ध धर्म कसा व हिंदू धर्म कसा, दोहोत किती भेद आहे, किती निराळी दृष्टी आहे हे मला कळू लागले.

माझे वडील म्हणत असत की, आपण गरीब आहोत. पण आपली महत्त्वाकांक्षा अत्यंत दांडगी पाहिजे. महाभारतातील द्रोणाचार्य गरीब होते. द्रोणाच्या मुलांना त्याची आई पाण्यात बाजरीचे पीठ मिसळून दूध म्हणून पाजित असे. कर्ण हा गरीबीतूनच वर आला. थोर पुरुष नेहमी गरीबीतून जन्माला येतात. हाती पडलेले गौतम बुद्धाचे चरित्र वाचून माझे मन डळमळू लागले आणि मग इतर धर्मग्रंथांचे पठण मला बरोबर वाटले नाही. वडील वारल्यानंतर अशा धर्मग्रंथ पठणाची ब्याद माझ्या मागून निघून गेली.

उच्च शिक्षणासाठी म्हणून मी अमेरिकेला गेलो. तेथेही बुद्ध धर्माचा बराच अभ्यास केला. बुद्ध धर्म काय आहे हे समजावून घेण्याकरिता व बुद्ध धर्म-चरित्राने मनात उडविलेली खळबळ शमविण्याकरिता मी तेथे बरेच वाचन केले. बराच विचार केला. तेव्हा हिंदू धर्म व बुद्ध धर्म यातील अंतर मला कळून चुकले. बौद्ध धर्माचे माझे वेड बरेच पुरातन आहे.

लोक म्हणतात राजकारणात माझी हानी झाली. आता बुद्ध धर्मानेही माझे नुकसान होणार आहे. परंतु नुकसान माझे होणार आहे, ते नुकसान सोसण्यास मी तयार आहे. धर्म ही माझी खाजगी बाब आहे. बुद्ध धर्म मला पटला. तो मी उचलला. राजकारणातील खोट्या निवडणुका मला नको आहेत. खोट्या निवडणुकांनी मी महामंत्री सुद्धा होऊ शकेन ; पण ते मला नको. राजकारण म्हणजे क्रिकेटचा खेळ नव्हे. तो एक सांप्रदाय आहे. रामानंदी, कबीरपंथी माणसाला तू पंथ सोड, असे सांगितल्याने तो पंथ सोडणार नाही. त्याचप्रमाणे माझा धर्म अटळ आहे. हा धर्म मी एकदा स्वीकारला, मग मला त्या मार्गानेच गेले पाहिजे.

बौद्ध धर्म मी स्वीकारला आहे. तुम्हीही स्वीकारा. नुसत्या अस्पृश्य समाजानेच तो स्वीकारून चालणार नाही तर साऱ्या भारताने व त्याबरोबर साऱ्या जगानेही बुद्ध धर्म स्वीकारावा, अशी माझी इच्छा आहे. ( टाळ्या )

बुद्ध धर्म मी का स्वीकारला, ते तुम्हास सांगतो. याची कारणमीमांसा करणे योग्य आहे. गौतम बुद्धाला पहिल्या प्रथम पाच शिष्य मिळाले. त्यांना ' पंचवर्गीय भिक्खु ' असे म्हणतात. एकंदर चाळीस शिष्य झाल्यानंतर बुद्धाला वाटले आपण शिष्यांना अनुज्ञा करावी. धर्मप्रचारासाठी दूरदूर

पाठवावे. त्यावेळी बुद्ध धर्माची व्याख्या गौतम बुद्धाने शिष्यात सांगितली ती अशी ; ' बहुजनहिताय, बहुजनसुखाय, लोकनुकंपाय, हिताय, सुखाय, देव मनुस्सानं, धम्म आदी कल्याणं, मध्य कल्याणं, अंति कल्याणं '.

बुद्ध धर्म हा बहुजन लोकांच्या हिताकरिता, सुखाकरिता, त्यांच्यावर प्रेम करण्याकरता आहे. हा धर्म नुसत्या माणसांनीच स्वीकारून चालणार नाही, तर देवांनीसुद्धा त्याचा स्वीकार करावयास पाहिजे. ( टाळया ) ज्याप्रमाणे ऊस हा मुळातही गोड असतो, मध्येही गोड असतो व शेंड्यासही गोड असतो, त्याचप्रमाणे बुद्ध धर्म सुरवातीलाही कल्याणकारक आहे, मध्येही कल्याणकारक आहे व शेवटीही कल्याणकारक आहे. या धर्माचा आदि, मध्य, अंत सर्व गोड, हितकारक व कल्याणकारी असे आहेत.

पण कोणीही मला सांगावे की, आमचा हिंदू धर्म–ज्याला मी ब्राह्मणी धर्म समजतो–हा ' बहुजन हिताय, बहुजन सुखाय ' आहे काय ? ब्राह्मण व इतर विद्वान लोक सांगतात की, ब्राह्मणी धर्माची संस्कृती १० हजार वर्षापूर्वीची आहे. जुनी संस्कृती आहे, पण आजही हिंदू धर्मात ७ कोटींच्यावर अस्पृश्य आहेतच. समाजातून बहिष्कृत केल्यामुळे जंगलात राहाणारे वन्य व चोऱ्या करून उपजिविका करणारे असंख्य गुन्हेगार लोकही या धर्मात आहेत. सांगा, अशा हिंदू धर्माला ' बहुजन हिताय, बहुजन सुखाय ' धर्म म्हणता येईल काय ?

जगातील काही कम्युनिस्ट वगळले तर असा एकही मनुष्य आढळणार नाही, ज्याला धर्म नको आहे. त्याचप्रमाणे धर्म आम्हालाही पाहिजे. पण तो सत्‌धर्म हवा, असा सत्‌धर्म म्हणजे जेथे सर्व लोक समसमान राहातील, सर्वांना सारखीच संधी मिळेल, तोच खरा धर्म. बाकीचे सारे अधर्मच होत.

हिंदू धर्माच्या शिकवणीप्रमाणे जर सर्वत्र ब्रह्मच आहे तर मग महारात, मांगात, चांभारातही ते असले पाहिजे. मग हिंदू धर्मात अशी असमानता का ?

इ.स. १९१० साली जेव्हा हिंदू-मुसलमानात जातीयवादावर बखेडा सुरू झाला तेव्हा हिंदू कोणास म्हणावे, हिंदूची व्याख्या काय, असा कठीण प्रश्न उपस्थित झाला. तेव्हा भारतातील अकरा विद्वानांनी अकरा निरनिराळया व्याख्या केल्या.

हिंदू शब्दाच्या व्याख्येतील बेबनाव व बेबंदशाही खरोखरच हास्यास्पद आहे. कुणाचाही ताळमेळ बसत नाही. सावरकरांची हिंदू शब्दाची व्याख्या पाहा–

' आसिंधुः सिंधु पर्यंता यस्य भारत भूमिका ।
पितृभुभुः पुण्यभुश्चैव सवै हिंदुः इति उच्यते ।।

तर राधाकृष्णन् यांची व्याख्या काही निराळीच आहे, ती टिळकांच्या व्याख्येशी जुळते घेत नाही. टिळकांचा ' हिंदू ' म्हणजे–

' प्रामाण्यं बुद्धिर्वेदषु साधनानाम् अनेकता उपारस्या नाम नियमः '

असे मानणारा आहे. टिळकांच्या दृष्टीने ' हिंदू ' म्हणजे वेदांना प्रमाण मानणारा पुरुष. मग धर्माचरणात त्याची साधना काही जरी असली तरी चालेल. एखाद्या हिंदू मनुष्याने वेदांना प्राधान्य देऊन ' पिराची ' जरी पूजा केली तरी हरकत नाही, तो हिंदूच. टिळकांच्या या व्याख्येला काय ठाव आहे. मग सांगा, असा धर्म ' बहुजन हिताय, बहुजन सुखाय ' होईल काय ? ( टाळ्या ).

बुद्ध धर्माची प्रतिष्ठापना पाहून बऱ्याच लोकांनी कोल्हेकुई सुरू केली आहे. वर्तमानपत्रातून ओरड केली. पण मला आताच त्यांच्याकडे पाहावयास वेळ नाही. एकदा सर्वांचे लिखाण होऊन जाऊ दे. माझ्याविरुद्ध कोण कोण काय लिहितात हे बघू. त्यांची लेखणी बंद झाली म्हणजे मी माझी लेखणी उचलीन.

धर्म हा प्रत्येक मनुष्यमात्राच्या जीवनाला अत्यंत आवश्यक व पोषक आहे. इतर धर्माप्रमाणे आत्मा आहे काय ? तो कोठे बसला आहे, हे मला माहीत नाही. आंगठ्याएवढा आहे, की तो काळजाजवळ बसला आहे, कोणास ठाऊक ? देव मला अजून दिसला नाही. हिंदू धर्मात देव, आत्मा याला जागा आहे. पण मनुष्याच्या जीवनाला कोठे जागा आहे ?

बुद्ध धर्मात मात्र भेदभाव नाही. सर्वत्र समसमानता आढळून येईल. बुद्धधर्मात देव, आत्मा यांचा विचार केलेला नसून माणसाने माणसाशी कशा प्रकारे वागले पाहिजे, याचा विचार केलेला आढळतो. या धर्मात नीतीचे संबंध सांगितले आहेत. म्हणून हा सत्धर्म आहे. बाकीचे धर्म झूट आहेत. ब्राह्मण आणि पुजाऱ्यांनी हिंदू धर्म बनविला आहे. बुद्ध धर्मात मोक्ष मिळवून देण्यासाठी ख्रिश्चन लोकांसारखे पाद्री नाहीत व आत्म्यास सद्‌गती देणारे, पूजाविधी व यज्ञयाग करणारे ब्राह्मण तर मुळीच नाहीत.

जो धर्म माणसाला कल्याण साधायला कारणीभूत होईल तोच धर्म. बुद्ध धर्माचे अधिष्ठान हे जीवनात कल्याण साधायला अत्यंत आवश्यक आहे, म्हणून या धर्माची महती आहे.

अमेरिकेत ख्रिस्ती धर्माचा प्रादुर्भाव फार पुरातन कालापासून होता व आहे ; परंतु अमेरिकेसारख्या प्रभावी राष्ट्रात दोन हजारावर बौद्ध भिक्षु आहेत. पिढ्यान् पिढ्या चालत आलेला ख्रिस्ती धर्म लोकांनी सोडला व बौद्ध धर्म घेतला आहे.

अमेरिकेमध्ये फौजेतील शिपाईसुद्धा बुद्ध धर्म अनुयायी आहेत. एवढेच नव्हे तर बुद्ध धर्माबद्दल आस्था म्हणून शिपाई लोक आपल्या ड्रेसवर (गणवेश) बुद्ध धर्माचे चिन्ह लावतात. अमेरिकन सरकारला बौद्ध चिन्ह वापरण्याबद्दल कायदे करण्यास त्यांनी भाग पाडले आहे. अमेरिकेत एक नुकताच अवाढव्य विहार बांधण्यात आला. त्याला साऱ्या जगातील देशांमधून जवळ जवळ २० लाख रुपये देणगी मिळाली.

जर्मनीत तर विचारायलाच नको. बुद्ध धर्म प्रचारसंस्था हजारोंनी गणल्या जातात. युरोपात असा एकही देश नाही की, जेथे बुद्ध धर्माचा प्रचार होत नाही. भगवान गौतम बुद्ध हा जगप्रसिद्ध युगपुरुष आहे. तेथील लोकांना रामाची, कृष्णाची, विष्णुची ओळख नाही.

जगाला हिंदुस्थानची आठवण म्हणजे गौतम बुद्धाची आठवण होय. हिंदुस्थान देश हा याच जगप्रसिद्ध पुरुषाची जन्मभू म्हणून ओळखला जातो. अजाणपणे ख्रिश्चन धर्माचा स्वीकार केलेले हिंदी विद्वान लोक आज पश्चातापाने विव्हळ होऊन असे कबूल करीत आहेत की, तुलनात्मक दृष्टीने बौद्ध धर्म हा श्रेष्ठ धर्म आहे.

आपणाला कल्याणकारक बुद्ध धर्म पाहिजे. आपले पूर्वज अज्ञानी होते. महारकी, भीक मागणे हीच यांची वर्तने. त्यांना धर्माची काय आवड ? पण आपण स्वावलंबी बनलो आहोत. इतर वर्गांच्या जोडीला जाऊन आपल्याला उभे राहायचे आहे. धर्मामध्ये उन्नतीचा मार्ग मोकळा हवा.

माझ्या इतर मित्रांचा असा समज आहे की, धार्मिक बाबींमुळे आर्थिक प्रश्नांकडे दुर्लक्ष होईल. मी काही आर्थिक प्रश्न हाती घेणार आहे. धार्मिक बाबींमुळे आर्थिक प्रश्नांकडे दुर्लक्ष होईल, असे एखाद्या ' गड्याचे अथवा भाऊचे ' म्हणणे असेल तर त्याने मला आपली आर्थिक योजना दाखवावी. मला जर त्या योजनेची कल्पना पटली तर मी माझी सर्व शक्ती त्या कार्याला वेचीन.

खिस्ती धर्मात व बुद्ध धर्मात अंतर आहे. खिस्ती धर्मात येशुने सांगितले आहे की, गरीब लोकहो, तुम्ही दारिद्र्याला भिऊ नका. मेल्यावर सारे जग तुमचेच आहे. (हंशा) अशी बुद्ध धर्मात आर्थिक बाब डावललेली नाही.

एकदा अनाथपिंडीकाने भगवंताला आर्थिक बाबीबद्दल प्रश्न विचारला होता. तेव्हा भगवंताने उत्तर दिले, " संपत्ती ही मानवी जीवनाला अत्यंत आवश्यक आहे. संपत्ती गोळा करावी. पण तिचा उपयोग दुसऱ्याला नाडण्यासाठी, गुलामगिरीत डांबण्यासाठी कधीही करू नये. ती शुद्ध साधनांनी मिळवून तिचा सदुपयोग झाला पाहिजे." धर्म व अर्थ या दोन्हीही गोष्टी माणसाला अत्यंत आवश्यक आहेत. जीवनोपयोगी वस्तुंच्यासाठी धर्म व अर्थही पाहिजेत.

वर्षातून एकदा तरी शेती नांगरण्याचे काम मालकाने केले पाहिजे, अशी शाक्य लोकात रूढी होती. त्याप्रमाणे भगवंताने वडिलांना प्रश्न केला " दुसऱ्याच्या कष्टाचे फळ आम्ही खावे हे रास्त आहे काय ?" आमचे अन्न आम्हीच कष्टाने मिळवून खाल्ले पाहिजे. धर्म व अर्थ या दोन्हीही गोष्टी जोडीनेच केल्या पाहिजे. तेव्हा आपल्या योजनेने आर्थिक हानी होईल हे त्यांनी मला पटवून द्यावे. नुसत्या अर्थानेही अनर्थ होईल. अर्थामध्ये धर्म हवा आहे.

कम्युनिझम हा कसा जगला ? तो कसा टिकून राहिला ? ही शक्तीची बाब आहे. शक्ती आणि जबरदस्तीने तो टिकला आहे. त्यांना प्रॉपर्टी, मालमत्ता हवी. रशियामध्ये प्रापर्टीसाठी यादवी माजली आहे. रशियातील कडक शिस्त बाळगणारे जमीनदार लुप्त होताच लोक उसळी मारून उठतील, बेबंदशाही माजेल आणि मग समाजाचा व्यवहार बेबंदशाहीने चालू लागेल. बुद्धाचा धर्म कम्युनिझममध्ये आहे. बुद्ध धर्मातील भिक्षुंप्रमाणेच कम्युनिस्टांना ठराविक जीवनोपयोगी वस्तू ठेवण्याचा अधिकार आहे. तांब्या, पाणी गाळण्यासाठी कापड व वस्तरा या तीन वस्तू होत.

भगवान बुद्धाचा अंत होऊन २ हजार वर्षे लोटली पण अजूनही हा धर्म जोमाने फोफावतो आहे, त्याला कुणी शास्ता नाही की सर्वाधिकारी नाही. अंत:काळी भगवंताला त्यांच्या शिष्याने विचारले, ' भगवंत तुम्ही गेल्यानंतर तुमच्या पश्चात या धर्माचे काय होणार ? याला कुणी तरी शास्ता ठेवा ' तेव्हा भगवंताने उत्तर दिले की " माझ्या गैरहजेरीत धर्म हाच तुमचा शास्ता आहे. तो जर पाळीत नसाल तर त्याचा काय उपयोग ? विशुद्ध मनाने घेतलेला धर्म हाच तुमचा शास्ता."

जगाचा व्यवहार धर्माने चालला आहे. एखाद्या बाळंत झालेल्या बाईला सांगितले की हे मूल तुझा शत्रु आहे. तू त्याला दूध पाजू नकोस. त्यामुळे तू अशक्त होशील, म्हातारी होशील, तुझे सौन्दर्य कमी होईल, हे मूल तुला काळ ठरणार आहे. तर त्या मुलाची आई हे ऐकेल काय ? ती कितीही दु:ख झाले, आजारी असली तरी मुलाला दूध पाजील. मुलाचे प्रतिपालन करणे हा तिचा धर्म आहे. जगाचे सर्व व्यवहार धर्माने चालले आहेत.

पुण्यातील लोक अर्धपोटी राहून खाना घेऊन (जेवणाचे डबे) जात असतात. बिरयाणी, पुलाव अशा प्रकारचे जेवण असते. पण ते लोक कर्तव्य बुद्धिने व प्रामाणिकपणे डबे पोचते करतात. म्हणून धर्म हा सर्वांनी पाळला पाहिजे. तो सत्‌धर्म पाहिजे. अधर्म नको–तो सुकर्म पाहिजे, दुष्कर्म नको.

धर्मासंबंधी लोकांच्या मनावर किती परिणाम आहे, हे स्वत: जाऊन बघायला पाहिजे. मी नुकताच ब्रह्मदेशाला जाऊन आलो. तिकडे काही गोष्टी आश्चर्यकारक आहेत. तिथे दर्जात कमी अगर जास्त असा भेदभाव नाही. कोणत्याही प्रकारच्या उच्चनीच भावनेला, वासनेला थारा नाही. जातीयतेला थारा नाही. तिथं खरी खरी लोकशाही नांदत आहे. त्यांची घरे म्हटली म्हणजे टेबल किंवा खाटेसारखी वाटतात. १५-२० फूट आकाराची. वरती लाकडे व त्यावर चटया लावलेल्या असतात. भिंती, विटा, चुना, लोखंड वगैरे पाहिजे तितकी काळजी आपल्याकडे घेतली जाते. त्यांच्या घराचा दरवाजा चटयाचाच असतो. लाथ मारली तर ही घरे कोसळून पडतील.

तेथील लोक संध्याकाळी ६ वाजता जेवतात. संध्याकाळी ६ ते रात्री ११ वाजेपर्यंत ते भटकतात. तेथील चहाची दुकाने बंद झाली की ते चहाचं सामान जेथल्यातेथेच ठेवतात; परंतु सामानाची चोरी होत नाही. आपल्याकडे सिमेंटमध्ये लोखंड घातलेल्या भिंतीसुद्धा चोर फोडतात. (हंशा)

दुसरी गोष्ट म्हणजे ब्रह्मी लोक पैसा जपून ठेवत नाहीत. खायचं व दानधर्म करायचा, हाच पैशाचा उपयोग. त्यांचा बँकेत पैसा नाही. बुद्धाचं सांगण आहे की काहीच नित्य नाही.

मंडाले पर्वतावरील बुद्धाचे मंदीर मी पाहावयास गेलो. मंदीर बघण्यासाठी मी १,०८० पायऱ्या चढलो. अर्थात् मनाचा निश्चय म्हणून. एरव्ही मला चढायला त्रास होतो. या मंदिरात बुद्धाची १४ फूट उंचीची उभी मूर्ती आहे. ही संपूर्ण सोन्याची बनविलेली आहे. तेथेच उंच ठिकाणी एक पागोडा बांधला आहे. त्यात जवळ जवळ अर्धा कोटी रुपयाचे सोने आहे. सकाळी ते रात्री ११ वाजेपर्यंत लोक प्रार्थनेला येतात व जातात. रात्री ११ नंतर तेथे कोणी बसत नाही. मूर्तीला जवळ जवळ ६०० वर्षे झालीत. पण कोणीही गुंजभर सोने चोरलेले नाही. पण आमचे इकडे देवीचे दागिने ब्राह्मण पुजारीच चोरून नेतो. (हंशा)

तेथील लोक खोटे बोलत नाहीत. चोरी करीत नाहीत. कारण बुद्ध धर्माची शिकवणच तशी आहे.

येथे जोपर्यंत हिंदू धर्म आहे तोपर्यंत महारवाडा, मांगवाडा हे राहाणारच. या धर्माची नीतीच अशी आहे. झुणकाभाकरीसारखा कार्यक्रम धर्म व रूढी यात बदल करू शकत नाहीत. समाजसुधारणेचे घोंगडे पांघरणारे ब्राह्मण, धर्ममार्तंड जोपर्यंत येथे आहेत तोपर्यंत हे असंच चालणार. झुणकाभाकर, सत्यनारायण करणाऱ्यांनीही बुद्ध धर्मात यावे, असे माझे सांगणे आहे.

एकदा बुद्धाला विशाखा नावाच्या शिष्याने प्रश्न विचारला की 'धर्म म्हणजे काय ?' "मलीन मनाला साफ करणे हाच धर्म होय" असे उत्तर मिळाले. अस्पृश्यता काही रस्त्यात पडलेला धोंडा नाही, की समाजसुधारकांना बाजूला फेकून देता येईल. जेव्हा आपला मनोधर्म बदलेल तेव्हाच धर्म बदलेल.

जगात प्रथम धर्माची आवश्यकता खालच्या लोकांना वाटू लागली. रोमन, इटालियन साम्राज्यात खिस्ती धर्म प्रथम गरिबांनीच स्वीकारला.

ह्या देशाची संस्कृती एकस्वरूप आहे, असा विद्वानांचा दावा आहे पण त्यांचा इतिहास खोटा आहे. येथे संस्कृतीचे दोन प्रवाह सुरू आहेत. एक ब्राह्मणी धर्म व दुसरा बौद्ध धर्म. ब्राह्मणी धर्माचं घाण पाणी बुद्ध धर्माच्या स्वच्छ पाण्यात एक झालं. हिंदू धर्माच्या घाण पाण्याला नाली काढून स्वच्छ पाणी बाजूला काढू या.

कृष्णाने गीतेत काय सांगितले आहे ? मारा, हत्त्या करा. गरिबांच्या उद्धाराबद्दल काही सांगितले आहे ? तिचा काही उपयोग नाही. मी गीतेवर लिहिणार आहे.

मी या धर्माची माहिती मिळविण्यासाठी अनेक ग्रंथांचा अभ्यास केला आहे. हा धर्म कसा खालावला याची कारणमीमांसा मी लिहीत असलेल्या पुस्तकात करणार आहे. धर्मांतरासाठी घाई करणार नाही, आताच तुम्हाला मेन्ढरासारखा घेऊन जाणार नाही. त्यासाठी मी एक पुस्तक लिहितोय.

बुद्ध धर्माची दीक्षा घेतल्यानंतर त्याच्या नियमानुसार वागायला पाहिजे. तरवारीच्या धारेप्रमाणे आचरण करणारे पाचच अनुयायी जरी मिळाले तरी पुष्कळ झाले !

नंतर श्री. संत गाडगे महाराज व इतरांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना पुष्पहार अर्पण केल्यावर सभा विसर्जित झाली.



# ३३१

# लोकशाहीचे दोन शत्रु—एक, हुकूमशाही आणि दोन, माणसा-माणसात भेद मानणारी संस्कृती

ही सभा ब्रह्मदेशातील सुप्रीम कोर्टाचे न्यायधीश यू चॅन टयून (Hon'ble Justice U Chan Htoon, Judge of the Supreme Court of the Union of Burma) यांच्या सत्काराप्रित्यर्थ दिनांक ३ एप्रिल १९५५ रोजी मुंबई येथील बुद्ध भुवन, सिद्धार्थ कॉलेज येथे भरविण्यात आली. या प्रसंगी डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

भगिनींनो आणि बंधुनो,

लोकशाहीचे प्रामुख्याने दोन शत्रु आहेत. एक म्हणजे हुकूमशाही आणि दुसरी म्हणजे माणसा-माणसात भेद मानणारी नीती किंवा संस्कृती. अमेरिकन स्वातंत्र्यासंबधी उद्‌गार काढताना बकल प्रतिपादितो की, हुकूमशाहीमुळे निर्माण झालेली शक्ती किंवा सामाजिक संघटना कायम टिकू शकत नाही. कारण हुकूमशाही प्रेरणा ही मुळातच अबाधित स्वरूपाची नाही. ती प्रेरणा काढून घेतली की, ती संघटना गडगडते आणि म्हणूनच कम्युनिझमची राजवट ही अबाधित नाही. त्याप्रमाणे माणसा-माणसात भेद करणारी नीती, सामाजिक, आर्थिक भेद बुद्धिपुरःसर करणारी संस्कृती ह्या दोन्हीही लोकशाही स्वरूपाला मोठे धोके आहेत.

हिंदू धर्मापुरते बोलावयाचे झाल्यास त्याचे प्रामुख्याने तीन ढोबळ वर्ग पडतील. पहिला खालचा पददलित वर्ग, ह्या वर्गाची सामाजिक व आर्थिक गळचेपी धर्माने घालून दिलेली आहे. दुसरा वर्ग हा ब्राह्मणेतर व मागासलेले वर्ग यांचा आहे. हा वर्ग तुलनात्मकदृष्ट्या स्थितिप्रज्ञ असा आहे. या वर्गात स्थित्यंतर व बदल व्हायला शिक्षणाच्या अभावी, नव्या जाणिवेच्या अभावी थोडा जास्त वेळ लागेल. तिसरा व शेवटचा वर्ग म्हणजे ब्राह्मण व तत्सम जातींचा आहे. या वर्गासाठी मात्र या धर्मात विशिष्ट अधिकार व हक्क आहेत. हा वर्ग त्यांच्या अधिकारावर व उपभोगावर अतिक्रमण झाल्यावर कालानुरूप बदल तर राहोच पण वेळी प्रतिकार केल्याशिवाय राहणार नाही. कारण त्यांना धर्माने

---

जनता : ९ एप्रिल १९५५.

दिलेले उच्च स्थान टिकवायचे आहे व म्हणूनच त्यांना अशातऱ्हेचा धर्म मुद्दाम टिकवावयाचा आहे. त्यांची दृष्टी होणाऱ्या बदलाकडे अधिरतेने पाहाते व त्यांचे विचार वेदापलीकडे निर्भेळपणे (Intellectual interpretation) पाहू शकत नाही. पण मी बहुजन समाजाची उपेक्षा करू शकत नाही आणि म्हणूनच मी माझ्यावरची सर्व टीका लक्षात घेऊनही बुद्ध धर्माच्या या देशातील भविष्याविषयी अगदी आशावादी आहे.

ब्रह्माच्या तोंडातून ब्राह्मण, बाहूतून क्षत्रिय, पोटातून वैश्य व पायातून शूद्र निर्मिती यावर आधारभूत झालेली हिंदू धर्मरचना ही मानवतेचा अपमान करणारी, बुद्धिचा भेद करणारी व ईश्वराचा द्रोह करणारी अशीच आहे आणि अशातऱ्हेच्या धर्मरचनेत समता कधीच नांदू शकत नाही, व्यक्तिविकास कधीच पूर्ण होऊ शकत नाही आणि म्हणूनच संपूर्ण विचाराअंती मला वाटते की, खालच्या वर्गाने या विचारसरणीविरूद्ध बंड पुकारले पाहिजे, नव्हे, ती त्यागिली पाहिजे. याचा अर्थ असा की, अशातऱ्हेचा हा धर्म सोडून सर्व समतेची–मानवी ऐक्याची घालून दिलेली बुद्धाची शिकवणूक त्याने अंगिकारली पाहिजे. म्हणून माझ्या सर्व बांधवांना शेवटची हाक देत आहे की, मुक्ती साधावयाची असेल तर बौद्ध धर्माची दीक्षा घ्या. पाश्चिमात्य इतिहासाकडे पाहिले तर राज्य आणि धर्म ( State and Church ) यांचे विभक्तीकरण करून जी युद्धे झाली ती त्या इतिहासातील मोठी चूक आहे. धर्माची मानवी जीवनातून अशी फारकत करता येत नाही. धर्म उलट मानवी जीवनाचे सर्वांग आहे ; अधिष्ठान आहे. ती सर्व बाबींची मूळ अंतःप्रेरणा आहे. ही गोष्ट कुणीही विचारवंत दुर्लक्षू शकत नाहीत. रोमचा ऱ्हास (Fall and decline of Rome ) ह्या गीबनने लिहिलेल्या पुस्तकातील काही भाग वाचला तर एक गोष्ट स्पष्टपणे निदर्शनाला येते की, ख्रिश्चन धर्माची चाहूल लागताच उमरावांच्या (Patritious) जुलूमाला कंटाळून निवाऱ्यावाचून संध्याकाळच्या जेवणाची फिकीर करीत रस्त्यावर भटकणाऱ्या गुलामांनीच तो पहिल्यांदा जीवनमुक्ती (Salvation) म्हणून कवटाळला. रोम देशात गुलामांनीच ख्रिश्चन धर्माचे पहिले पाऊल उमटविले हा एक मोठा ऐतिहासिक दाखला (Historical reality) आहे आणि म्हणून भोवतालच्या परिस्थितीचे अवलोकन करता आपल्यावर होणाऱ्या अन्याय ( Injustice ) व जुलूमातून (Torture ) बुद्ध धर्माचे बिजारोपण झाल्याशिवाय राहाणार नाही.

हिंदू धर्म विषमतेवर (Discrimination ) आधारभूत झाल्याचे मी स्पष्ट केले आहेच व दुसरा मोठा पौर्वात्य धर्म-मुसलमानी धर्म (Muslim Religion ) हा होय. हा धर्म बंधुभावाबद्दल (Brotherhood ) ख्यातनाम आहे. पण ही बंधुता त्यांच्या

धर्मापुरतीच मर्यादित आहे. त्यात प्रामुख्याने मानवता (Human brotherhood) याचा अभाव आहे. बौद्ध धर्मच सर्व मानवांना समानतेचे अधिकार देतो. त्या धर्मातच मानवी जीवनातील योग्य तो आदर (Respect for human being) आहे. त्यात अशातऱ्हेची भेदनीती (Discrimination) नाही. बौद्ध धर्म हाच खरा समतेचा धर्म आहे. मी या कार्याला थोडा उशीर केला. याबद्दल मला थोडे वाईट वाटते. नाहीतर मी आजमितीला त्या बिजारोपणाची फळं पाहिली असती. माझ्या समाजातील शेकडा ९० लोक माझ्या म्हणण्याला रूकार देतील याबद्दल मला यत्किंचितही संदेह वाटत नाही. टीकाकार काहीही म्हणोत. मला मात्र बौद्ध धर्माचे या देशात पुनः जोमाने पुनर्जीवन होणार आहे याचे स्पष्ट दृश्य (Vision) दिसत आहे व त्याबद्दल मला तिळमात्रही संदेह वाटत नाही.

सद्यःस्थितीत माणसाला धर्माची काय जरूर आहे, अशा अर्थाची टीका काही लोक करतात. पण मला वाटते हे लोक मानवी समाजाच्या धारणेसाठी धर्माची किती आवश्यकता आहे हीच गोष्ट विसरतात. मानवी समाजाला धर्माने दोन देणग्या दिल्या आहेत आणि त्या म्हणजे मानवी जीवनात ऐक्य अबाधित करणारी मानसिक प्रेरणा निर्माण करणे. धर्मामुळेच मानवी ऐक्याला पोषक असे एका विशिष्ट तऱ्हेचे मानसिक वातावरण निर्माण होऊ शकते व दुसरे म्हणजे मानवी समूहात धर्मच समता निर्माण करू शकतो. या दोन महत्त्वाच्या कसोट्यांमुळे सद्यःस्थितीत समता निर्माण करून चांगल्यातऱ्हेने लोकशाही नांदावयाची असेल तर धर्माची अत्यंत आवश्यकता आहे.



## ३३२

# मानवाच्या विवेकबुद्धीला केवळ बुद्धाने आवाहन केले आहे

भगवान बुद्धाचा जन्म, बुद्धत्व प्राप्ती आणि परिनिर्वाण या तिन्ही महत्त्वपूर्ण घटना वैशाख पौर्णिमेलाच झालेल्या, त्यामुळे हा दिवस विशेषत्वाने साजरा केला जातो. १९५५ साली ६ मे या दिवशी वैशाख पौर्णिमा होती. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी हा दिवस सोपारा येथील बुद्ध अवशेष प्राप्त झाले त्या ठिकाणी घालविण्याचे ठरवले.

सोपारा हे पूर्वी भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील महत्त्वाचे बंदर होते. अरबी प्रवाश्यांनी हजारो वर्षापूर्वी लिहिलेल्या प्रवास वर्णनात ' सोपारक ' चा कुबेर नगरी असा उल्लेख केला. सोपारकाजवळ नुकतेच सम्राट अशोकाचे शिलालेख संशोधकांना आढळले. सोपारकामुळेच बोरीवली जवळील कान्हेरी येथील बौद्ध विहारांची स्थापना त्याकाळी झाली असावी. सोपारा येथे भगवान बुद्धाचा दात त्यासाठी खास उभारलेल्या वास्तूमध्ये व्यवस्थित ठेवलेला उत्खनन करताना संशोधकांना आढळला होता. १९५५ ची वैशाख पौर्णिमा साजरी करण्यासाठी याच स्थळाची निवड बाबासाहेबांनी केली होती. अगदी मोजकी अशी मंडळी तेथे उपस्थित होती. त्या प्रसंगी बाबासाहेबांनी आम्रवृक्षाखाली चौथऱ्यावर आसन मांडून धर्मासंबंधी जे विचार सांगितले, त्यांचा गोषवारा येथे देण्यात येत आहे.

आज मी तुम्हाला भगवंताच्या धर्माचे सार थोडक्यात सांगणार आहे. बुद्धाने सांगितलेला धर्म सोडला तर सर्वच धर्माची उभारणी देव आणि आत्मा या जोडीवर करण्यात आली आहे. भक्तीच्या तथाकथित पुण्याईचे गाठोडे घेऊन जीवा-शीवाची गाठ पडते, आत्मा ईश्वरात विलीन होतो असा काल्पनिक आधार देव आणि आत्मा यांची बैठक पक्की करण्यासाठी दिलेला आहे. अशा कच्च्या

---

प्रबुद्ध भारत : ३ मे १९५८.

सदर गोषवारा श्री. व्ही. पागराऊत यांनी लिहिला आहे– कार्यकारी संपादक जनता.

पायावर उभारलेला हा देव-आत्म्याचा पोकळ डोलारा आहे. भक्तिचे प्रकार आपल्याला माहीत आहेतच. पूजा-अर्चा, धूप-दीप, मंत्र-तंत्र, जप-तप, कर्म-कांड या मार्गाचा अवलंब ईश्वर भक्तिसाठी केला जातो. पण त्याशिवाय जीव हिंसा, नरबली इत्यादी अघोरी प्रकारही आहेत. भूतेखेते प्रसन्न करण्यासाठी नाना खुळचट विधी आहेत.

सर्वांच्या मुळाशी एकच कल्पना. जीव हा पापी असल्यामुळेच जन्माला येतो. तेव्हा पापक्षालनासाठी जीवाने देह झिजवून तपत्याग साधले तरच ईश्वराची त्याच्याशी गाठ पडू शकते. अशारितीने जन्माचे सार्थक होऊन जन्म-मरणाच्या फेऱ्यातून सुटका होते. थोड्या फार फरकाने अशाच भ्रामक कल्पना आत्मा आणि ईश्वर यांचा संबंध जोडण्यासाठी व त्यांचे अस्तित्व सिद्ध करण्यासाठी सर्वत्र पसरवलेल्या आहेत. बौद्ध धर्मात आत्म्याला स्थान नाही तसेच ईश्वराची उचलबांगडी करण्यात आली आहे.

बौद्ध धर्म सोडून जगाच्या पाठीवर दुसरा कोणताही धर्म घ्या. प्रत्येक धर्मानुयायी आणि त्यांचे प्रमाण ग्रंथ तो धर्म ईश्वराने सांगितलेला आहे, असेच प्रतिपादन करतात. ज्यांच्यामार्फत ईश्वराने धर्म सांगितला ते धर्म प्रवर्तक ईश्वराचे प्रेषीत अथवा दूत मानले जातात. खिस्ती धर्माचे संस्थापक येशू, यहुदी धर्म प्रणेता मोझेस आणि इस्लाम धर्म प्रवर्तक मोहम्मद यांनी प्रत्येकाने ईश्वराचे प्रेषीत म्हणजे ईश्वराचा निरोप मानवांना पोचविणारे दूत असल्याचे सांगितले. प्रेषिताची भूमिका ईश्वर मानव संबंधात पोस्टमनपेक्षा वेगळी असल्याचे आढळत नाही. जरी प्रेषीत हा मानवच असला तरी ईश्वराचे आदेश तो इतर मानवांना सांगत असल्यामुळे प्रेषिताने व्यक्त केलेले विचार, त्याच्या तोंडून निघालेले शब्द आणि वचने संशय-प्रुफ (संशयातीत) मानली गेली.

अशाप्रकारे प्रेषितांनी सांगितलेल्या ईश्वर प्रणीत वचनांची चिकित्सा करण्याचा मार्गच बन्द करण्यात आला. जिज्ञासा तृप्त करण्याला व खरेखोटेपणा पडताळून पाहून ती वचने कसोटीवर लावण्याचे साधनच नाहिसे करण्यात आले.

भगवंतानी धर्म सांगताना, मी तो सांगतो म्हणून स्वीकारा, असे कधीच म्हटले नाही. उलट तुमच्या विचाराला पटेल तरच स्वीकारा असे म्हणून विवेक-बुद्धिला आवाहन केले आहे. बौद्धधर्म हा चिकित्सेनंतर सांगितलेला धर्म आहे. रोग निदानानंतर दिलेले औषध आहे. भगवंतानी प्रथम मानव जातीच्या

रोगाचे निदान केले. जगात दुःख आणि दारिद्र्य हे महाभयंकर रोग आहेत हे या चिकित्सेनंतर शोधलेले उत्तर होय. यालाच बौद्ध धर्माचे अधिष्ठान (Flooring) म्हणता येईल. आता प्रश्न उपस्थित होतो की, दुःख आणि दारिद्र्य हे रोग कोणता धर्म नाहिसा करील ? जो धर्म हे दुःख आणि दारिद्र्य नाहीसे करण्याचा प्रभावी आणि परिणामकारक मार्ग दाखवू शकत नाही, तो धर्मच होऊ शकत नाही. कारण धर्म हा समाज धारणेसाठी आहे.

इतर धर्ममतात मेल्यानंतर काय होईल याचाच विचार केला आहे. तेवढीच एक चिकित्सा ते करीत बसले, मेल्यानंतर स्वर्ग मिळायचा का नरकात जायचे, ही भीती आयुष्यभर लोकांच्या मानगुटीवर, सिंदबादच्या पाठकुळीवर घट्ट बसलेल्या म्हाताऱ्यासारखी बसवून ऐदी, ऐतखाऊ, धूर्त लोकांचे धर्म हे एक कुरण झाले. मेल्यानंतरच्या स्थितीची काल्पनिक चित्रे रंगवून भय निर्माण करून लोकांना नाडायचे व स्वतःची वंशपरंपरा चैन चालू ठेवण्यासाठी एक व्यवसाय लबाड लोकांना मिळाला. मेल्यानंतर काय व्हावयाचे ते होईल. परंतु जे कष्टमय आहे ते सुखमय करण्याचा प्रश्न या जीवनानंतरच्या काल्पनिक प्रश्नांचा खल करून कसा सुटणार ? त्या दृष्टिकोनातून पाहाता एकटे भगवान बुद्धच वास्तववादी होते. त्यांनी दुःखाची कारणे शोधली. ती कारणे तीन प्रकारची आहेत. आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक.

आध्यात्मिक म्हणजे वैयक्तिक. व्यक्तिने स्वतःच्या वागणुकीने ओढवून घेतलेले दुःख, आपल्या कर्मामुळे उत्पन्न झालेले दुःख. दारुड्याने दारु पिऊन स्वतःच्या संसाराची धुळधाण आणि शरीराची राखरांगोळी स्वतःच्या हाताने करणे याला आध्यात्मिक दुःख म्हणावे.

आधिभौतिक म्हणजे सामुदायिक दुःख. विषम वागणुकीमुळे आणि अन्यायामुळे ओढणारी संकटे, जसे अस्पृश्यांना होणारी सामाजिक दुःखे, समानसंधी प्राप्त न होणे यांचा यात समावेश करता येईल.

आधिदैविक म्हणजे नैसर्गिक. रेल्वे, विमान, आगबोट, मोटार अपघातामुळे, वादळ, महापुरादी आपत्तीमुळे निर्माण होणारी दुःखे. वैयक्तिक आचरणामुळे ओढवणारी दुःखे नाहिशी करण्यासाठी पंचशील हे साधन सांगितले आहे. कोणाचा जीव घेऊ नकोस, चीज-वस्तु चोरू नकोस, खोटे बोलू नकोस, व्यभिचार करू नकोस आणि दारू अथवा अन्य मादक पदार्थांचे सेवन करू नकोस. हे पाच नियम पालन केले तर ही दुःखे निर्माणच होणार नाहीत.

आधिभौतिक दुःख नाहीसे करण्यासाठी श्रेष्ठ अशा अष्टांगिक मार्गाचा अवलंब केला पाहिजे. (१) सम्यक दृष्टी, (२) सम्यक संकल्प, (३) सम्यक वाचा–चहाडी न करणे, (४) सम्यक कर्म, (५) सम्यक आजीव–वाईट मार्गाने उपजिविका न करणे. पोट भरण्यासाठी चांगलाच धंदा करणे, (६) सम्यक व्यायाम–सुविचार वाढीला लावून वाईट विचारांना थारा न देणे. वाईट विचार निर्माण झाल्यास त्याचा नाश करणे, (७) सम्यक स्मृति–शरीरातील सुखदुःखादी वेदनांचे वारंवार अवलोकन करणे, आणि (८) सम्यक समाधी–कोणत्याही दुष्ट प्रवृत्तीपासून मन अलग ठेवून चित्त प्रसन्न आणि शांत टेवणे.

यापैकी सम्यक दृष्टीला महत्वाचे स्थान आहे. आपण जे काही करतो त्यामुळे स्वतःचाच लाभ होतो की काय हे पाहाण्याऐवजी माझे हीत साधत असताना दुसऱ्याची हानी किंवा कोणाला अपाय होतो की काय हे पाहिले तर जगातील आधिभौतिक दुःखे नाहिशी होतील.

याच बरोबर दहा पारमिता सांगितल्या आहेत. पारमिता म्हणजे आपल्याला करता येईल तेवढे. या पारमितात प्रज्ञा श्रेष्ठ आहे. प्रत्येक पारमितेला प्रज्ञेची कसोटी लागलीच पाहिजे. प्रज्ञा म्हणजे इंग्रजीत ज्याला Wisdom म्हणतात ती ; प्रज्ञेचा वापर न केल्यामुळे माणूस कसा मुर्खासारखा वागतो याचे एक उदाहरण मी तुम्हाला सांगतो.

एका लहानशा गावी पाद्री राहात होता. संकट ओढवले की गुडघे टेकून प्रार्थना करावी हे एकवचन त्याला माहित होते. एकदा त्या गावातील झोपड्यांना आग लागली. हा पाद्री तेथे गेला आणि सर्वांना एकत्र करून प्रार्थना करायला सुरुवात केली. अर्थातच आगीमुळे एकूणएक झोपडी जळून खाक झाली. थोडा प्रज्ञेचा वापर केला असता तर आग विझविण्यासाठी पाद्री बादली घेऊन स्वतः धावून गेला असता आणि इतरांना प्रार्थनेत न गुंतविता, तर कदाचित आगीपासून बऱ्याच झोपड्या वाचविता.

शील आणि नैष्कर्म्य यांचा परस्पर संबंध आहे. संकटग्रस्तांना वाचविण्यासाठी पराकाष्ठा करणे याला ' दान ' पारमिता म्हणतात. जनकल्याणाची कामे उत्साहाने आणि तत्परतेने करणे याला ' वीर्य ' पारमिता म्हणतात. राग आपोआप येतो पण ' क्षमा ' हा गुण प्रयत्नांनी मिळवावा लागतो. ' सत्य ' नसेल

तर लाचारी आणि हांजीहांजीखोर वृत्ती येते. ' अधिष्ठान ' म्हणजे दृढनिश्चय. तो जसा मोठ्या कार्याच्या बाबतीत ठेवावयाचा तसाच लहान-सहान बाबीतही पाहिजे. सर्वांवर सारखे प्रेम करणे याला ' मैत्री ' आणि शुभ कार्यात अडथळा निर्माण न करणे याला ' उपेक्षा ' पारमिता नाव आहे.

पंचशील, आर्य अष्टांगिक मार्ग आणि या दहा पारमिता दु:ख निरोध करून दु:खाचा नाश करण्यास समर्थ आहेत. जगातील दु:ख निवारण व्हावे हेच बौद्ध धर्माचे सार. आम्ही भारतीय आपल्या तत्त्वज्ञानाचे भारीच अभिमानी. परंतु गेल्या हजार वर्षात एकही तत्त्वज्ञ अथवा तत्त्वचिंतक निर्माण झाला नाही. तात्विक विचार करून एखादा सिद्धांत मांडण्यासाठी जी मनोभूमिका विद्वानांची असावयाला हवी होती ती न राहिल्याने विद्वान विचारविनिमयाला आणि देवाणघेवाणाला पारखे झाले. त्यामुळे विद्वानांची बुद्धि कप्प्याकप्प्यात बंदिस्त होऊन कुंठीत झाली. त्यामुळे सत्यशोधन आणि सत्यग्रहण करण्याचे कार्य मागे पडून पंडितांऐवजी पुस्तकी पढीतांचा वर्ग निर्माण झाला.

## ज्ञानाची किल्ली,
## सांगेन एकच बोली
## ही कल्पना निमाली

भाराभर ग्रंथ नुसते वाचून काय उपयोग ? गाढवाच्या पाठीवर ग्रंथ लादण्यापासून गाढवाला जेवढा लाभ तेवढाच लाभ फार तर अशा वाचनाने होऊ शकेल. ग्रंथ वाचून रसग्रहण करण्याची शक्ती पाहिजे, नवनवीन कल्पना सुचल्या पाहिजेत, सिद्धांत परिपोष करता आला पाहिजे.

आज कोणताही विषय घ्या किंवा शास्त्र घ्या. साहित्य, तत्त्वज्ञान, अर्थशास्त्र, आरोग्यशास्त्र, विज्ञानशास्त्र, राजनीती, युद्धनीती इत्यादी कोणतीही ज्ञानाची शाखा घ्या. भारतीय म्हणून जे काही आहे ते पूर्णतेला पोचलेले नाही. तसे ज्ञान कधीही पूर्णत्वाला पोचू शकत नसते. आज परिपूर्ण वाटणारे ज्ञानाचे अंग किंवा शाखा भविष्य कालात अपूर्ण वाटणारच कारण दिवसागणिक त्यात वाढ होत असते, भर पडत असते. माझ्या म्हणण्याचा आशय असा की, या देशातील विद्वानांनी, पंडितांनी, नालंदा, तक्षशिला, विक्रमशिला, उज्जयनी, अवन्ती या जागतिक किर्तीच्या त्या काळातील विद्यापिठातील आचार्यांनी जो ज्ञानसंचय केला त्यात गेल्या शेकडो वर्षात यत्किंचितही भर तर पडलीच नाही पण '' जे जे आपणांसी ठावे ते ते दुसऱ्याशी शिकवावे, शहाणे करूनी सोडावे, सकळ जन '' याच्या उलट वागणूक केल्यामुळे मुळात असलेले ज्ञानही लोप पावले. गुरूने

शिष्याला विद्या देताना हातचे एक राखून ठेवावे. गुरूला शंभर उपचार माहीत असतील तर नव्याण्णव चीजा चेल्याला देऊन एक गुरूकिल्ली आपल्या हाती ठेवावी. असा पायंडा पडल्यामुळे ज्ञानाचा ऱ्हास होऊन त्याचे विकृत स्वरूप तेवढे शिल्लक उरले.

माणसाला निर्वाणपद प्राप्त करता आले पाहिजे. धम्मपदात ' निब्बाणं परम सुखं ' असे म्हटले आहे. गडगंज संपत्ती जवळ आहे म्हणून सुख लाभत नसते. नुसत्या पांडित्याने माणूस सुखी राहत नाही. तो दुःखी नसतो. पण असुखी असतो कारण अतिलोभ, खून, चोरी, परदारागमन इत्यादी विकार जन्मजात आलेले असताना विकारावर ताबा ठेवता आला पाहिजे.

भगवंत म्हणतात मानव हा जळता अग्नी आहे. विकार हे या अग्नीमुळे पाण्यासारखे उकळत असतात. अग्नी चेतवता येतो किंवा शांत करता येतो, विकार नाहिसे करता येतील. परंतु समूळ उपटून टाकता येत नाहीत. अग्नीचा उपयोग करून घेण्यासाठी तो जसा मंद ठेवून अन्न शिजवून घ्यावे त्याप्रमाणे मानवाचा उपयोग समाजाला व्हावा यासाठी मधली स्थिती निर्वाण ही होय. त्यामुळे दश विकारांच्या आधीन न जाता मानव तर्कशुद्ध विचारसरणी ठेवून समाज उपयोगी कार्य करू शकतो.

ज्यांनी धर्मतत्त्वाबद्दल चर्चा केली त्यांनी त्याचे एवढे गुपीत राखले की, भगवंतांना सांगावे लागले. स्त्रिया, खोटी धर्ममते आणि भटा-भिक्षुकांच्या पोथ्या या तीनच गोष्टी गुप्तता पाळतात. तरी देखील

श्रुतीविभिन्ताः स्मृतिविंभिन्ताः<br>
धर्मस्व तत्वं नि हितं गुहायां<br>
महाजनो येन गतस्य पंथः

' पीछेसे आई आगे चलाई ' अशी अवस्था धर्मतत्त्वांची करण्यात आली. श्रुती वेगळे सांगतात, स्मृत्या त्याही काही निराळाच उपदेश करतात. धर्माची तत्त्वे फारच गहन आणि गूढ ! मग काय करायचे तर चार मोठी माणसे ज्या मार्गाने जात असतील तो पंथ स्वीकारा. भगवंताने सांगितले की, मी सांगतो म्हणून नव्हे तर तुमच्या बुद्धिला, विवेकाला पटत असेल तर हा धर्ममार्ग स्वीकारा. एकीकडे आंधळेपणाने चार लोकांच्या मार्गाने आपण चला असा आदेश तर दुसरीकडे बुद्धिला आवाहन. किती मोठे अंतर आहे दोन विचारसरणीत.

कोणताही प्रश्न विचारला की, बड्याबड्या ऋषींनी कानांवर हात ठेवले. याज्ञवल्क्य ऋषीला विचारले, तुम्ही आत्मा म्हणता तर आत्मा कोठे आहे ? उत्तर मिळाले नेति, नेति. बरे, आत्म्याचे मृत्यूनंतर काय ? तरी देखील नेति, नेति. म्हणजे मला माहीत नाही. हे माहीत नसेल पण आत्म्याचा आकार तर माहीत असेल म्हणून प्रश्न केला. आत्मा ताडाच्या झाडाएवढा आहे का ? तरी नेति, नेति. म्हणजे नन्नाचा पाढा.

आत्म्याचे स्थान कोणते, त्याचा आकार कसा आहे, पुढे त्याचे काय इत्यादिबद्दल काही माहिती नसताना आत्म्याबद्दल इतकी वायफळ गडबड झाली आहे की, नुसत्या सतत प्रचाराने एका केवळ काल्पनिक वस्तुच्या अस्तित्वाचा मोठ्या हिरीरीने पुरस्कार केला जात आहे. प्रेयसीचे नाव माहित नाही, गाव जाणत नाही, रंग-रूप, वयाची कल्पना नाही पण माझे तिच्यावर प्रेम आहे हो. असे सांगणाऱ्या मूर्ख प्रेमवेड्यासारखी स्थिती आत्म्याचे अस्तित्व मानणारांची आहे.

खरे पाहता, आत्मा नाही, हे सिद्ध करीत बसण्याची आवश्यकताच नाही. आत्मा आहे असे प्रतिपादन करणारांनी तो असल्याचे सिद्ध करणे ही त्यांची जबाबदारी आहे. आत्मा नाही हे सत्य. आत्मा आहे हा प्रचार भ्रम आहे.

आत्मा सिद्ध करण्यासाठी पुनर्जन्माचे घोडे पुढे दामटण्यात आले. शरीर नाशवान आहे ते सोडून आत्मा दुसऱ्या शरीरात प्रवेश करतो वगैरे भाकडकथा निवेदन केल्या जातात. शरिरातील एकूण एक भाग चीरफाड केल्यावर दिसू शकतो, मग हा आत्माच का नाही शरीरातून काढून दाखवित ? चांगले निष्णात शस्त्रवैद्य आहेत. त्यांना जाऊन विचारा ? सांगा म्हणावे आत्मा कोठे आहे तो ? काढून दाखवा शरीरातून ?

बौद्ध तत्त्वज्ञानात पुनर्जन्म मानण्यात येतो असा दाखला लागलीच देण्यात येईल, परंतु त्या सिद्धांताचा आत्म्याशी कोणताच अर्थाअर्थी संबंध नाही. बौद्ध पुनर्जन्म सिद्धांत म्हणजे पुनर्निर्मिती. निसर्गाची पुनरावृत्ती. पित्याच्या आकारासारखा चेहऱ्यामोहोऱ्याचा पुत्र होतो म्हणून तो काही संपूर्णपणे पिता नाही. याला बौद्ध तत्त्वज्ञानात पिता पुत्राच्या रूपाने जन्म घेतो असे म्हटले आहे. परंतु पित्यातील सर्व गुणांचा वास पुत्राच्या ठिकाणी राहू शकत नाही. कारण त्याबाबतीत पित्याबरोबर मातेचे गुण त्यात येतात. शिवाय वातावरणाचा परिणाम होतोच. एका आंब्यापासून दुसरा आंबा निर्माण

होतो. त्याप्रमाणे चाललेल्या जगरहाटीला पुनर्निर्मिती म्हणतात. परंतु जमीन, पाणी, वारा, खत यांचा जोड परिणाम होऊन मूळ आंब्याला जसे मधूर फळ येईल तसेच दुसऱ्या आंब्याला येऊ शकेल असे नाही. कदाचित चांगला परिणाम झाला तर चांगले फळ येईल, वाईट झाला तर वाईट येईल. ' शुद्ध बीजा पोटी फळे रसाळ गोमटी. ' म्हणूनच एका प्रांतात विशेष फळ-फुल झाडांची वाढ होते. इतरत्र ते जगू देखील शकत नाहीत. जसे चहा-कॉफी आसाम, निलगीरीत होते. नारळ समुद्र किनाऱ्यावरच वाढतात. संत्री चांगली मध्य-प्रदेशात नागपुरलाच होतात. मसाल्यासाठी जावा बेट प्रसिद्ध आहे. हापूस आंबा रत्नागिरी जिल्ह्यातलाच चवीला आणि रसाला चांगला. एकूण पुनर्निर्मितीच्या कार्यालाच पुनर्जन्म असे म्हटले आहे. परंतु पुनर्जन्म शब्दाचा आधार घेऊन त्याबरोबर आत्मा बौद्ध तत्त्वज्ञानाला मान्य आहे असा गैरसमज पसरविला जात आहे. पण तो गैरसमजच आहे.

' कर्म ' याचा अर्थ ब्राह्मण व बौद्ध धर्म वेगवेगळा करतात. कर्म ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे. हा जगाचा व्यवहार कसा काय चालला आहे ? ब्राह्मण ग्रंथ म्हणतात नियंता चालवितो. त्याला ब्रह्माही म्हणतात. इतर धर्मही ईश्वर, अल्ला, गॉड या नावानी त्याच कल्पनेला पुष्टी देतात. बौद्धधर्मात ईश्वर नाही. बौद्धधर्मानुसार जगाचे व्यवहार दरएकाच्या कर्माने चालतात. यामुळे बौद्धधर्माने मनुष्यमात्रावर जबाबदारी टाकली आहे. केले तसे भोगावे लागेल अशी ताकीद दिली. याला कर्मविपाक म्हणतात. कर्मविपाक म्हणजे आमच्या क्रियेपासून निर्माण होणारी फळे. कर्म म्हणजे पूर्वसंचीत, पूर्वजन्मी साठविलेले पापपुण्याचे गाठोडे असा अर्थ बौद्ध तत्त्वज्ञानात नाही. काही कर्म असे असते की, त्याचा परिणाम ताबडतोब भोगावा लागत नाही. त्या कर्माचा, क्रियेचा परिणाम कालांतराने होतो. परंतु जन्मांतराने नव्हे. कारण पुनर्जन्मच नाही.

यामुळे बौद्ध धर्माने माणसाला स्वतःच्या सद्‌गुणांची वाढ करण्याला वाव ठेवला आहे. मानवाला स्वतःच्या प्रगतिसाठी, उन्नतिसाठी स्वतःच झटावे लागेल असा आदेश दिला आहे. ' माझ्या कपाळी हे लिहिले आहे. हे विधीलिखीत आहे. ब्रह्माची रेघ आहे ' म्हणून हताश न होता, निराश न होता स्वतःच्या उद्धाराचा राजमार्ग दाखविला आहे. संचित हे एक माणसाला निष्क्रिय करणारे, धैर्य खचवणारे थोतांड आहे.

पूर्व जन्माच्या कल्पनेमुळे पापकर्मे करण्याला उत्तेजन मिळालेले आहे. मागच्या जन्मात साठवून ठेवलेले पुण्य आहे मग आता पाप करायला काय हरकत आहे असे एखादा खाऊनपिऊन बरा असा गृहस्थ आपल्या मनाशी विचार करतो. पण असा माणूस हा मानवजातीला अपायकारक असतो. पतित दोन प्रकारचे असतात. एक पतित ज्याला आपण पतित आहोत याची जाणीव असते व त्याची बोचणी लागलेली असते. दुसरा पतित ज्याला आपल्या पापकर्माबद्दल काहीच वाटत नाही. जसा एखादा मारखाऊ कोडगा असतो तसा.

ज्या पतिताला आपल्या स्थितीची जाणीव असते व बोचणी लागते तो आपल्या पतित अवस्थेतून वर येण्यासाठी धडपड करतो. तो या जाणीवेमुळे स्वतःचा उद्धार करू शकतो. परंतु दुसऱ्या प्रकारचे पतित सुधारूच शकत नाही. कारण त्याची मानसिक ठेवणच तशी असते.

अशाप्रकारे आपल्या अधःपतनाबद्दल खंत वाटणाऱ्यांना मार्ग दाखविण्याचे कार्य करण्यासाठी समाजसेवकांची जरूरी आहे. समाजाला वैचारिक भूमिका देण्यासाठी आणि सांस्कृतिक कार्य करण्यासाठी सेवकांची जरूरी आहे. गरीब समाजाला त्यांना मेहनताना देता येणार नाही. पण त्यांच्या पोटापाण्याची सोय करता येईल. अशा कार्यकर्त्यांना ऐतखाऊ म्हणता येणार नाही. कारण हजार आकर्षणे सोडून समाजसेवा करावी लागते.

बौद्ध भिख्खुंची संघटना ही अशाच समाजसेवेसाठी भगवंतानी निर्माण केली आहे. हे सतीचे वाण आहे. ते स्वीकारून भगवान बुद्धानी दाखवून दिलेल्या मार्गाने जाण्याने आज जगाचे कल्याण होईल. मानवतेचे हित होईल.



# बुद्ध धर्म व हिंदू धर्म यात जमीन अस्मानाचं अंतर आहे

भारतीय बौद्धजन समितीच्या विद्यमाने भगवान गौतम बुद्ध जयंती उत्सव श्री मंगलदास पक्वासा, माजी राज्यपाल, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या प्रमुख उपस्थितीत रविवार दिनांक ८ मे १९५५ रोजी सायंकाळी ७ वाजता, नरे पार्क, सेंट्रल रेल्वे वर्क्स शॉप समोर परळ, मुंबई नं. १२ येथे मोठ्या प्रमाणात साजरा करावयाचा आहे. मिरवणुकीसाठी तीन मार्ग आखलेले आहेत. त्याप्रमाणे ठिकठिकाणच्या लोकांनी या मिरवणुकीत भाग घेण्याची कृपा करावी. मिरवणुकीच्या लोकांनी ४-३० वाजता मिरवणुकीस सुरूवात करून सात वाजेपर्यंत नरे पार्क मैदानावर येण्याची खबरदारी घ्यावी. इतर ठिकाणच्या लोकांनी परस्पर नरे पार्क मैदानावर संध्याकाळी ७ वाजेपर्यंत यावे, असे समितीच्या सचिवाने, जनता, दिनांक ७ मे १९५५ च्या अंकात प्रसिद्ध केले होते.

यानुसार मुंबई नरे पार्क येथे दिनांक ८ मे १९५५ रोजी बुद्ध जयंतीच्या निमित्ताने कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले होते. कार्यक्रमाला ऐंशी हजार जनसमुदाय हजर होता. त्याला संबोधित करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

अध्यक्ष महाराज, बंधु आणि भगिनींनो,

आज या ठिकाणी माझे येणे झाले आहे, ते एका दृष्टीने आगंतुक आहे. या सभेला मी हजर राहीन, अशी अपेक्षा नव्हती. आज, उद्या, परवा दिल्लीला जाणार अशा अपेक्षेत मी होतो. पण कर्मधर्म संयोगाने मला १२ तारखेपर्यंत गाडीचें तिकीट न मिळाल्यामुळे राहावं लागलं. त्या संधीचा फायदा घेऊन मी या सभेला हजर राहावं म्हणून मला आग्रह करण्यात आला. त्यांच्या विनंतीला मान देऊन मी येथे उपस्थित झालो.

माजी गव्हर्नर अध्यक्ष असताना मला सभेला येण्याचे कारण नव्हते. माझ्या येण्याने सभेला महत्त्व येईल, असे वाटत नव्हते. परंतु लोकांचे म्हणणे धुडकावून लावणे योग्य नाही. या ठिकाणी एवढा मोठा जनसमुदाय पाहून मला मोठा आनंद वाटतो. तुम्हा सर्व लोकांना चाळीचाळीचा अभिमान. तो माझगावच्या

---

जनता : १४ मे १९५५.

अड्ड्यात राहणारा, मी भायखळ्याच्या पिवळ्या चाळीत राहणारा ! जो कार्यक्रम व्हावयाचा असेल तो माझ्या अड्ड्यात व्हावा ही इच्छा. आपापल्या गल्लीत कसला तरी समारंभ साजरा करतात. ही रुढी टाकून एकमताने हा समारंभ साजरा केलात याबद्दल अभिनंदन. तुम्ही नवीन धडा घातलेला आहे. तो दरवर्षी अशारीतीने चालवीत राहाल, अशी उमेद आहे.

मला अन्य गोष्टींचा आज समाचार घ्यावयाचा आहे. आज एक महिना मी मुंबईत आहे. मुंबईची वर्तमानपत्रे मी वाचतो. कोणीतरी माझ्याकडे कटिंगही पाठवित असतो. बौद्ध धर्म स्वीकारण्याबद्दल अनेक लोकांची मते वाचायला मिळतात. किमानपक्षी सर्व वर्तमानपत्रातून टीका येते. अस्पृश्य लोक या कार्याला उद्युक्त झालेले आहेत, त्यांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन त्यांना आंबेडकर बहकविण्याचा प्रयत्न करतात, तुम्ही धर्म स्वीकारल्यास तुमचे नुकसान होईल, डॉ. आंबेडकर वेडा आहे, त्यांच्या मागे लागू नका, तुम्ही खड्ड्यात पडाल, अशी ते टीका करतात. सार्वजनिक कार्यात टीका करण्याचा अधिकार सर्वांना आहे. याचा मला खेद वाटतो अशातला भाग नाही. माझा जन्म दुसऱ्याची टीका सहन करण्यात गेला. ज्याप्रमाणे लहान पोराला त्याची आई दृष्ट लागू नये म्हणून काजळ लावते त्याप्रमाणे हे लोक मला नेहमी काजळ लावतात. या कृत्याचे मला विशेष काही वाटत नाही.

आपल्यातील पुष्कळसे लोक अज्ञानी व काही सज्ञानी आहेत. त्यांच्यावर वर्तमानपत्रातल्या लिखाणाचा परिणाम होत असेल. त्या लिखाणाचा परामर्ष घेणे अगत्याचे आहे. तथापि, मला एक गोष्ट सांगावयाची आहे की टीका करण्याचा हक्क कोणाचा ? कोणी कोणावर टीका करायची ? ज्याला सहानुभूती आहे, त्यालाच टीका करण्याचा अधिकार असतो. संरक्षण करणारालाच टीका करण्याचा अधिकार आहे, जीव घेणाराला-मारणाराला टीका करण्याचा अधिकार नाही.

भगवान बुद्धाचा चुलत भाऊ देवदत्त शिकारी होता. त्याला शिकार करण्याचा नाद, तिरकमठा घेऊन पक्षी मारायचा. भगवान बुद्ध अहिंसेचा भक्त. देवदत्ताचे करणे भगवंताला नापसंत होते. ते म्हणत 'निरपराधी श्वापदांचा जीव घेऊ नका.' त्यांना इतर लोक म्हणत, तू नामर्द आहेस, तू क्षत्रिय नाहीस. एकदा देवदत्तांने शिकारीला जाण्याचे ठरविले. तेव्हा बुद्धाने सांगितले ' मी तुमच्या बरोबर शिकारीला येईन, पण बाजूला बसेन, तुम्ही

शिकार करा.' शेवटी ते शिकारीला गेले. एका झाडाखाली भगवान बुद्ध बसले. त्यानंतर देवदत्त तेथून निघून गेला. काही अवकाशानंतर एक पक्षी आकाशातून खाली पडला. तिथे भगवान बुद्ध बसले होते. तो पक्षी भगवंताने पाहिला. तो पक्षी तीर लागून पडला होता. त्यांनी त्याच्या छातीतील तीर काढला. त्याला पाणी पाजले. त्याला छातीजवळ घेऊन ऊब दिली. त्याला सावध केले. देवदत्त पक्षाचा शोध घेत आला. त्याने बुद्धाला विचारले, मी एका पक्षाला उडत असताना बाण मारला. तो कोठे पडला तुला माहीत आहे काय ? तो तुझ्या भवती पडला असेल. भगवंताने सांगितले : पक्षी माझ्याजवळ आहे. त्याच्या पोटात बाण होता तो काढून टाकला. त्याची जखम धुतली. त्याला उब देऊन सावध केले.

देवदत्त म्हणाला, हा पक्षी माझा आहे. त्याबद्दल बराच वाद झाला. देवदत्ताने सांगितले शिकारीचा नियम असा आहे की ज्याने जनावराला मारले तो त्याचा धनी. मी याला मारले आहे, मी याचा धनी. बुद्धाने सांगितले, " जो मरणासन्न जीवाचे रक्षण करील तोच धनी, मारणारा धनी नव्हे " उभयतांचे पुष्कळ वेळ भांडण झाले. ते म्हणाले : आपण हे पंचायतीपुढे मांडू. प्रत्येकाने आपापला प्रश्न पंचायतीसमोर मांडला. पंचायतीने बुद्धाच्यातर्फे निकाल दिला. जो रक्षण करतो तो धनी, हीच नीती खरी आहे.

म्हणून मला वर्तमानपत्रकर्त्यांना असे विचारावयाचे आहे की तुम्ही आमचे रक्षणकर्ते की आमचे विनाशकर्ते ? तुम्ही आहात तरी कोण ? हजारो वर्षे आम्ही तुमच्या समाजात वावरत आलो. कोणीतरी पुढे येऊन सांगावे की अस्पृश्यांसाठी या गोष्टी केल्या. अस्पृश्यांच्या उद्धारासाठी ज्यांनी करंगळीसुद्धा वरती केली नाही त्यांना टीका करण्याचा काय अधिकार ? ह्या लोकांना माझे असे सांगणे आहे की तुम्ही तोंड गप्प करून बसा. आम्हाला खड्ड्यात पडायचे असेल तर पडू. तुम्ही इतके दिवस आम्हाला खड्ड्यात टाकलात, आता ते स्वातंत्र्य आम्हाला द्या. खड्ड्यात पडण्याचा अधिकार, चुका करण्याचा अधिकार आम्हाला द्या. तुम्ही कोणत्याही प्रकारची मदत दिली नाही. तुम्ही अस्पृश्यांच्या पोरांना विलायतेला पाठविलं आहे काय ? त्यांना ह्या ज्या स्कॉलरशिप्स मिळत आहेत त्या मी मिळविल्या आहेत. ह्या पडीत जमिनी तुम्ही स्वखुशीने दिल्या आहेत काय ? आम्ही आमच्या पायावर उभे राहू. हिंदुंनी आमच्यासाठी काय केले ? त्यांनी एकच सुधारणा केली. ती म्हणजे रेल्वेमध्ये जाताना ते आमच्या डब्यामध्ये बसतात. तेही माहीत नसतं म्हणून. (हंशा)

पेशवाईच्या काळात कोणी कसे कपडे घालावेत याबाबत कायदे होते. माझी आई सांगत असे, महार लोकांना कपडा विकत घ्यावयाचा असेल तर तो लांबून पाहावयाचा. त्याचे दाम काय ते विचारावयाचे. दुकानदार दुकानातून कपडा हालवीत असे. त्या माणसाने कपडा घेतला तर तांब्यात पाणी आणायचे. त्या कपड्यावर शिंपडावयाचे, नवीन कपडा चिखलात घासावयाचा. कारण त्यांनी नवीन कपडा घालू नये ! फाटलेला कपडा त्यांनी वापरावयाचा. माती मध्ये घासलेल्या लुगड्यामध्ये दोन बोटे घालून त्याचे दोन भाग करावयाचे. नंतर महाराने पैसे ठेवावयाचे व कपडे घेऊन जावयाचे. आम्ही लोक लंगोट्या लावतो. ती पेशव्यांचीच आज्ञा होती. ब्राह्मणांनी दोन्ही बाजूंनी निऱ्या घालायच्या. ब्राह्मणेतरांनी फक्त मागच्या बाजूने निऱ्या घालायच्या. भंडारी लोकांनी ढुंगणाला रूमाल लावून त्याचा मोठा भाग ढुंगणाभोवती गुंडाळावयाचा. असा हा नियम होता.

इंग्रज सरकार आल्याने मुंबई ब्रिटिशांच्या ताब्यात गेली. सोनारावर पेशव्यांचा फार डोळा होता. सोनार म्हणत आम्ही ब्राह्मण. पेशवे म्हणत आम्ही ब्राह्मण. सोनार ब्राह्मणासारखी धोतरे नेसत. त्यांनी अशी धोतरे नेसू नये, भ्रष्टाकार झाला, म्हणून सर्व पत्रामध्ये खळबळ उडाली. ब्रिटिशांनी धर्म बुडविला, असे ओरडू लागले. साहेब बावरले, पेशव्याची तक्रार साहेबांनी ऐकून घेतली. पेशवे म्हणाले, आमच्या पूर्वीच्या प्रजाजनावर निर्बंध होता. ते तुमच्या राज्यात आल्याने कासोटी घालतात. ईस्ट इंडिया कंपनी त्यावेळेला बालक होती. बाळकेश्वराला महाजन लोक होते. मुख्य अधिकाऱ्यांनी तक्रार ऐकून घेतली. त्यांनी महाजन लोकांना बोलावून चौकशी केली. सोनार कासोटा घालीत होते. सोनाराने कसोटा घालावयाचा नाही. पंचानी ५० रुपये दंड सांगितला. आता लोक कोट-पाटलोन घालतात.

यांच्यात गाडीत बसण्याखेरीज दुसरा काही फरक झाला नाही. मग हे लोक टीका का करतात ? हे आमचे हितचिंतक ? ते म्हणतात की तुम्ही बौद्धधर्मीय झाला तर स्कॉलरशिप्स जातील. पण गिरणीत जाणाऱ्यांना स्कॉलरशिप्सचं काय महत्त्व कळणार. ह्याचे महत्त्व जे शाळेत जातात त्यांना. ह्या पत्रकारांना असे कसे वाटते ? म्हणे स्कॉलरशिप्स मिळणार नाही. पण त्यासाठी मी जिवंत आहे ना ! (टाळया) मी मरेन तेव्हा काय व्हायचं असेल ते होईल. मी जिवंत आहे तोपर्यंत भिण्याचे कारण नाही. शीख अस्पृश्याना स्कॉलरशिप्स मिळते. धर्मावर स्कॉलरशिप्स अवलंबून नाहीत. त्या दैन्यावस्थेवर अवलंबून

आहेत. तुम्ही दिली ती किती दिवस दिली. ' यावच्चंद्रदिवाकरौ ' असे तर नाही ना ? चंद्र-सूर्य आहे तोवर स्कॉलरशिप्स मिळेल काय ? हे एक वर्षाचं, दोन वर्षाचं किंवा चार वर्षाचं. कुंकू लावायचं आहे तर नवरा जगेल किंवा नाही, याचा भरवसा पाहिजे. आता सरकारी नोकरी किती वर्षे राहील. मी विधान केल्यानंतर पाच महिन्यांनी मुन्शीसाहेबांच्या पोटात गोळा उभा राहिला. त्यांनी मुसलमानांच्या सवलती काढून घेतल्या. ख्रिश्चन होते त्यांनाही सवलती दिलेल्या होत्या. पण त्यांचा एक मनुष्य होता. त्यांना गव्हर्नर व्हावयाचे होते. त्यांनी मला काही नको म्हणून सांगितले. मग माझ्याकडे कागद आला. मी तो फाडून टाकला. दुसरे सोन्याची सरी घालतात म्हणून आम्ही काय फास लावायचा ? मी लिहून दिले नाही म्हणून. आजपर्यंत आम्ही ते ठेवलं, पण आज त्याचा काही उपयोग नाही.

आमच्यातला एक मनुष्य इंजिनियर होण्याच्या लायकीचा आहे. पण त्याला अजून इंजिनियर करण्यात आले नाही. आमचा मुख्यमंत्रीदेखील त्यात सामील ! राजा जर प्रजाजनाला मारू लागला तर मग त्यांनी जावं कोणाकडे ? ' भूसके लड्डू जिसने खाया वह फसा, न खाया वह भी फसा. '

मला शिकलेल्या लोकांना सांगावयाचे आहे. महार लोक काय करीत होते ? रात्री उठून तराळला हिंडायचे. सकाळचा काहीतरी भाकरी तुकडा राहिला असेल तो खावयाचा फलटण गावामध्ये महार होते. त्यांना २४ बिघे जमीन होती. तिथे एक देऊळ होते. त्यात अन्नछत्र होत असे. आपले एक मिनिस्टर होते. एक गाडी लाडू, ज़िलेबी, चपाती वगैरे या छत्रालयातून देण्यात येत असे. महार लोक देवळाच्या दाराजवळ बस़ायचे आणि उष्टे अन्न घेऊन जावयाचे. एवढे मिळाल्यानंतर महारांना जमीन मिळवायची काय गरज ! काही दिवसांनी जेवण देण्याचे बंद केल्यानंतर हे महार म्हणाले, " आमची एवढी जमीन होती, ती मराठ्यांनी घेतली . " देवळातील उष्टे मिळायचे. अशी त्यांची अवस्था होती.

जळगावाला श्राद्ध झालं तर महार भिकारड्यासारखे कचऱ्यावर बसायचे. हा ख्रिस्ताव झाला, तोंडचा घास काढला याने, याचं कसं बरं होईल, असे लोक मला म्हणत. माझा एक ब्राह्मण विरोधी होता. तो दरदिवशी त्रैराशिक मांडायचा. ढोराचे मांस, शिंगे, कातडी, हाडं यांची दोन-चार हजाराची किंम़त

दाखवीत असे. ' डॉ. आंबेडकरानी केलेले महाराचे नुकसान ' असा मजकूर केसरीतून येत असे. पण मी त्याला कधी उत्तर दिले नाही.

संगमेश्वरला एकदा सभा होती. महारांच्या सभेत मला या ब्राह्मणाकडून विचारणा झाली. मी जेवावयाला बसलो होतो. जेवल्यावर येतो म्हणून सांगितले. आणि त्यांना जर वेळ असेल तर त्यांनी आत यावे असे मी त्याला सांगितले. तो गृहस्थ म्हणाला. काम थोडसं आहे पण महत्त्वाचं आहे. तो म्हणाला '' तुम्ही या सर्व लोकांना सांगता मांस खाऊ नका, ढोरं ओढू नका. हे तुम्ही महारांचे नुकसान करता हे बरे का ? '' मी बरे म्हणून सांगितले. मी त्याच्या प्रश्नाचे उत्तर खाजगी देऊ की सभेत देऊ म्हणून विचारले. सभेत उत्तर द्या, असे तो म्हणाला. मी लोकांना सांगितले यांना प्रश्न विचारावयाचे आहेत. तुम्ही त्यांचा प्रश्न लक्षात घ्या. त्यांनी त्रैराशिक मांडले ; ' तुमची चळवळ नुकसानकारक आहे ' त्याने मांडलेले त्रैराशिक खरे होते. त्यांचे एक हजार रुपयांचे नुकसान होते, असा त्यांचा प्रश्न होता. मी सांगितले, मी हे तुम्हाला एक हजार रुपये द्यावयास तयार आहे आणि तुम्ही जर ही ढोरं ओढाल तर एक हजार रुपयांचे बक्षिस देण्यासही मी तयार आहे, पण त्यांच्याबरोबर तुम्ही वागायला हवं.

स्वाभिमान अत्यंत आवश्यक आहे. एखादी बाई कामाठीपुऱ्यात गेल्यावर पलंग, सोन्याचांदीचे दागिने आणते आणि सकाळी हाटेलवाल्याला हाक मारून सांगते, ए, अर्धा प्लेट खिमा, एक स्लाईस रोटी आण. चार वाजता चहा. संध्याकाळी पावडर लावून बसावयाचं. तिचे जीवन सुखमय असते, पण वेश्येला काही किंमत नाही, अब्रू नाही हे लक्षात ठेवा.

आम्हाला स्वाभिमानाचं जीवन हवं. त्यात दारिद्र्य प्राप्त झालं तरी हरकत नाही. मी ४८ नंबरच्या चाळीत ५० नंबरच्या खोलीत राहात असे. झोपायला जागा नाही, उशी आणि धोतर घेऊन वर गच्चीवर झोपायला जायचा. खायला प्यायला मिळतय हा प्रश्न महत्त्वाचा नाही, स्वाभिमानाच्या जीवनाला महत्त्व आहे. किडा मुंगीचे जीवन आम्ही जगणार नाही. मी बौद्धधर्मात गेल्याने काही लोक म्हणतील, पॉलिटिक्स मधला किडा गेला ! पण हा पॉलिटिक्स मधला किडा जाणार नाही. राहाणार आहे, या लोकांना घेऊन राहाणार आहे.

माझी बौद्धधर्माची कल्पना वेगळी आहे. या धर्मातील लोक वकील, बॅरिस्टर, प्रधानमंत्री होतील, अशी तरतूद हवी आहे. हा धर्म आम्हाला पुनीत करणार. पथभ्रष्ट करणाऱ्यांच्या प्रयत्नांवर विश्वास ठेवू नये.

हे लोक हिंदू धर्मात व बौद्ध धर्मात फरक नाही, असे म्हणतात. मग त्यातली चांगली वैरण आहे ती का खात नाहीत ? आम्हाला का खाऊ देत नाहीत ? बौद्ध धर्म वाईट आहे असे कोणी सांगू नये. हा वाईट धर्म आहे असे म्हणण्याची कोणाची प्राज्ञा नाही. साऱ्या हिंदुस्थान देशाने बौद्ध धर्म स्वीकारावा. बुद्ध धर्म व हिंदु धर्म एकच आहे, ही गोष्ट खोटी आहे. त्यात जमीन अस्मानाचं अंतर आहे. यासाठी मी ५-७ मुद्दे सांगणार आहे. हिंदू धर्मात खंडोगणती देव आहेत. तेहतीस कोटी देव आहेत. त्यांचे देवाशिवाय चालत नाही. सृष्टी कशी उत्पन्न झाली ? कोणी सांगतं कुणीतरी अंड टाकलं, पण ते कुणी टाकलं हे माहीत नाही. भगवंताने सांगितले सृष्टीची उत्पत्ती कशी झाली हे सांगता यावयाचे नाही. हा प्रश्न महत्त्वाचा नाही. ती कशापासून तरी केली किंवा काही अस्तित्वात नसताना केली, हे दोनच पर्याय असू शकतात, तिसरा पर्याय नाही.

जगामध्ये काही नसताना सृष्टी निर्माण केली ही गोष्ट दुरापास्त. ईश्वर हा सृष्टीचा निर्माण कर्ता नव्हता. हिंदू धर्मात ईश्वर आहे, बुद्ध धर्मात ईश्वर नाही, हा मुख्य भेद आहे. बुद्ध धर्मात आत्मा नाही, हिंदू धर्मात आत्मा आहे. एकदा अर्जुनाने श्रीकृष्णाला विचारले आत्मा कसा आहे ? ' आत्मा वस्तु अशी आहे की लोखंडाने ज्याला कापले तरी घाव पडत नाही ' असे उत्तर मिळाले. लोखंड हे लोखंडाने कापता येते. आत्मा ही वस्तु अशी आहे की लोखंडाने घाव करता येत नाही ! असे असू शकेल काय ? त्याचप्रमाणे आत्मा जळू शकत नाही, असे श्रीकृष्णाने उत्तर दिले. त्याचे असे सांगणे आहे की आत्म्याला क्लेश नाही. ताप येतो, खोकला येतो, पडसं होतं, हे सर्व थोतांड आहे. याच्यात सत्य नाही. भगवंताने एकदा विचारले आत्मा किती मोठा आहे ? त्याचा साईज काय आहे, लांबी-रूंदी काय आहे ? हा आत्मा आहे तरी कोठे ? असे याज्ञवल्क्य याला हजारो प्रश्न विचारले. ब्राह्मणांनी ग्रंथ रचून ब्रह्म आहे, हे लोकांच्या घशात कोंबलं आहे.

तिसरी गोष्ट, हिंदू चातुर्वर्ण्य मानतात ; पण बुद्ध धर्मात चातुर्वर्ण्य व जातीभेद नाही. एकदा लोहित ब्राह्मणाने भगवंताला प्रश्न केला की तू शूद्रांना विद्या का शिकवितोस ! ' जो पात्र असेल त्याला विद्या, अपात्र असेल त्यांना विद्या नाही. ' ब्राह्मणी धर्म असा नाही. एकदा बुद्धाने आईला प्रश्न विचारला, संकट समयी मारणं हे कर्तव्य कसं ? बौद्ध धर्मात असे नाही. वैश्यांनी दगाबाजी करावयाची हे काय म्हणून ? बौद्ध धर्मात जातीभेद, असमानता, चातुर्वर्ण्य नाही. जातीभेद नष्ट करण्यासंबंधी ठराव करण्यात येतात. पण ते

पुराणातील वागी पुराणात, याप्रमाणेच होत. प्रत्यक्ष करायला सांगितले तर ते करीत नाहीत. जातीभेदाने अपरिमीत नुकसान झाले आहे. जातीभेद नष्ट करा ! अवघेची धरू सुपंथ ! पण त्यांना सुपंथ नको आहे.

बंधू आणि भगिनींनो, शिवाजीचे अष्ट प्रधान ब्राह्मण होते. त्यांची कुळकथा निराळी आहे. ते मराठ्यांना पंगतीला जेवावयाला घेत नसत. शिवाजीने बाळाजी आवजीला हे सांगितले, तो म्हणाला तुम्ही राज्याभिषेक करून घेतल्याखेरीज तुमचा दर्जा वाढणार नाही. शेवटी शिवाजीने सांगितले काय करावयाचे असेल ते तुम्हीच करा. मोरोपंत पिंगळे हा मुख्य प्रधान होता. तो म्हणाला ; ' लेका शुद्रा तू आमचा राजा होणार ! ' त्याने शिवाजीची बेइज्जत केली. शेवटी बाळाजी आवजी हा राजपुतान्याकडे गेला. तेथे त्याने शिवाजीची वंशावळी तयार केली ; आणि काशीहून ब्राह्मण आणून राज्याभिषेक करविला.

जातीभेदाच्या शेणातील किडे हे शेणातच राहतील. त्यांची शेणातून निघण्याची इच्छा नाही. त्यांच्या डोक्यामध्ये प्रकाश पडेल तेव्हा ते आपल्यामागे येतील. त्यांना असं वाटतं, दोनच माणसे हिंदू समाजातून जातील. डॉ. आंबेडकर व त्यांची बायको. परंतु बौद्धधर्मसंबंधाने मतपरिवर्तन फार झाले आहे. पुढच्या वर्षी सारनाथ येथे बुद्धशिष्य जमा होतील. त्यांच्या खर्चासाठी उत्तरप्रदेश सरकार पस्तीस लाख रुपये खर्च करणार आहे. भारत सरकार दोन कोटी रुपये खर्च करणार. उत्तरप्रदेश मागासलेला देश. त्याला पूर्वी गोंडवण-आर्यावर्त म्हणत. उत्तरप्रदेश सरकारचे पस्तीस लाख रुपये म्हणजे उगवणाऱ्या झाडाची हिरवी पाने. कोणी काही तरी केले तरी बुद्ध धर्म या देशात येणार. त्याला कोणी आड येऊ शकत नाही. या पुरामध्ये सर्व वाहून जातील. जे उलट दिशेला जातील तेही वाहून जातील. या देशातील सारी जनता अज्ञान होती. ब्राह्मणांनी पुस्तकात काय लिहिलय याची त्यांना कल्पना नव्हती. २-४ आण्याला ही पुस्तकं मिळतात. मी इथं येण्याच्यापूर्वी भागवत वाचीत होतो. त्यावरून ज्ञानवान माणसे असे कसे लिहू शकतील अशी शंका येते.

तुम्ही अज्ञान आहात. तुमच्यातली शिकलेली मुलंही अज्ञान आहेत. मी दोन-चार दिवसापूर्वी उपनिषद वाचीत होतो. त्यातील छांदोग्योपनिषदात गुरूशिष्यांचा संवाद दिला आहे. शिष्याने शंका विचारली आहे. पण शंका

काढण्याला देखील ज्ञान लागतं. 'तुला ज्ञान आहे काय ? तुला ज्ञान नाही तर मग तुला शंका काढण्याचा अधिकार काय ?' असे गुरुने उत्तर दिले, आमच्या विद्वानांना याचं काय ज्ञान.

भगवान बुद्धाने आनंदाला हेच सांगितले. मी सांगतो म्हणून हा धर्म तुम्ही घेऊ नका. व्यवहारात हा धर्म चालू शकेल असं तुम्हाला वाटलं तरच घ्या. तुमच्या बुद्धिला पटला तरच हा धर्म माना. एकजीवाने, अेक चित्ताने आपणाला गेलं पाहिजे. याच मार्गाने आपला उद्धार होईल.

बौद्ध धर्मामध्ये दोन प्रकारचे लोक आहेत. या धर्माचे संशोधन करण्याचा माझा मार्ग नाही. आपले मुख्य कार्य प्रचार करण्याचे, आम्हाला लोकांना बुद्धिस्ट करून घ्यावयाचे आहे. हेच कर्तव्य होय. दोन-चार दिवसापूर्वी आम्ही एक संस्था स्थापून रजिस्टर केली आहे. या संस्थेचे सभासद व्हावे, अशी विनंती आहे. वरच्या वर्गाचे लोक पैसे देतील अशी अपेक्षा नाही. कार्याला सुरवात तर झाली पाहिजे. तरी सर्वांनी समितीचा मेंबर व्हायला पाहिजे. यासाठी एक रुपया भरावा लागेल. आपल्याला मंदिरे बांधावी लागतील. तेथे स्त्रिया-पुरूष जाऊन भक्तिभावाने पूजा करतील. आपल्यात उपटसुंभ लोक फार आहेत. तो प्रकार मी इथं होऊ देणार नाही. पावती घेतल्याशिवाय कोणी पैसे देवू नयेत. श्री. बी. एस. गायकवाड, श्री. का. वि. सवादकर, श्री. बाळू कबीर हे तुमच्याकडून फॉर्म भरून घेऊन पावती देतील.



# ३३४

# विद्या, प्रज्ञा, करुणा, शील व मैत्री या पंचतत्त्वानुसार प्रत्येक विद्यार्थ्याने आपले चारित्र्य बनविले पाहिजे

औरंगाबाद येथील मिलिंद महाविद्यालयातील बोधि मंडळाच्या विद्यमाने दि. १२ डिसेंबर १९५५ रोजी सभा भरविण्यात आली होती. या सभेला मार्गदर्शन करण्यासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना निमंत्रित करण्यात आले होते. त्यांनी आपल्या भाषणात प्रथम श्री. शंकरराव देव यांच्या दि. ७ डिसेंबर रोजी महाविद्यालयात झालेल्या व्याख्यानातील एका विधानाचा परामर्श घेतला. श्री. शंकरराव देव यांनी आपल्या भाषणात म्हटले होते की, '' महाविद्यालयाला केवळ ' मिलिंद ' हे नाव देऊन भागणार नाही, तर अक्रोधाने क्रोध जिंकणाऱ्या बौद्ध शिकवणुकीचाच पुरस्कार तिथे झाला तर मिलिंद हे नाव सार्थ होणार आहे. ''

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे श्री. देवांच्या टीकेसंबंधी बोलताना म्हणाले,

मिलिंद हा एक ग्रीक होता. त्याला आपल्या विद्वतेबद्दल घमेंड होती की, ग्रीकांसारखे विद्वान लोक जगाच्या पाठीवर कोठेही सापडावयाचे नाहीत. त्याने जगाला आव्हानही दिले होते. त्याला एकदा वाटले की आपण एखाद्या बौद्ध भिक्खुबरोबर वाद करावा. पण त्याच्याबरोबर वाद करण्यास कोणीही तयार झाला नाही. मिलिंद हा एक क्षुल्लकसा मनुष्य होता. तो काही तत्त्वज्ञानी नव्हता किंवा जाडा विद्वानही नव्हता. त्याला राज्यकारभार कसा चालवावा हेच माहीत होते. पण अशा मिलिंदाबरोबर वादविवाद करण्यास कोणीही तयार झाला नाही. महाप्रयासाने '' नागसेन '' भिक्खुला तयार केलं गेलं. मिलिंदाचं चॅलेंज आपण स्वीकारलं पाहिजे, असा त्याने निश्चय केला, मग त्यात यश येवो किंवा अपयश येवो.

नागसेन हा ब्राह्मण होता. वयाच्या सातव्या वर्षी त्यानं आपल्या आईबापाचं घर सोडलं होतं. अशा या नागसेनाने भिक्खु लोकांचा आग्रह मान्य केला. नंतर मिलिंद व नागसेन यांचा वादविवाद होऊन मिलिंदाचा पराजय झाला. त्या वादविवादाचं एक पुस्तक प्रसिद्ध झालं आहे. त्या पुस्तकाला पाली भाषेत ' मिलिंद पन्ह ' असं नाव आहे. या पुस्तकाचं मराठीत भाषांतर

---

जनता : १७ डिसेंबर १९५५.

' मिलिंद प्रश्न ' असं आहे. या पुस्तकाचं शिक्षकांनी व विद्यार्थ्यांनी अवश्य वाचन करावं अशी माझी इच्छा आहे. त्यात शिक्षकांच्या अंगी कोणते गुण असावेत हे दिलेले आहे. म्हणून मी व माझ्या सोसायटीने ह्या कॉलेजला मिलिंद महाविद्यालय हे नाव दिलं व जागेला ' नागसेन वन ' असं नाव दिलं. मिलिंद हरला व बौद्ध झाला, म्हणून मी हे नाव दिलेलं नाही. मी जे ह्या कॉलेजला नाव दिलेले आहे ते आदर्शभूत असंच आहे, असं माझं मत आहे.

शिक्षणसंस्थेला एखाद्या श्रीमंत व्यापाऱ्याने केवळ पैशाची देणगी दिली म्हणून त्याचे नाव देणे हे अत्यंत अनुचित आहे.

बौद्धधर्माशी संलग्न झालेले ' मिलिंद ' हे नाव महाविद्यालयास देण्याचे दुसरे कारण असे की, विद्या ही अन्नासारखी सर्व मनुष्यास आवश्यक आहे. प्रत्येकाला तिचा लाभ झाला पाहिजे. हा उदार विचार पहिल्यांदा उद्घोषित केला असेल तर तो भगवान बुद्धानीच. तेव्हा ज्या असंख्य लोकांना कैक शतके अज्ञानात दडपून ठेवण्यात आले त्यांना सुविद्य बनविण्याचा प्रारंभ करताना बुद्धाचे अथवा त्याच्या शिष्याचे नाव आठवावे हे स्वाभाविकच आहे.

मुंबईच्या सिद्धार्थ कॉलेजात २,९०० व या कॉलेजात ६०० विद्यार्थी आहेत. मी या कॉलेजचा खूप भार सहन केला आहे.

श्री. शंकरराव देवांनी या कॉलेजला मिलिंद हे नाव दिल्याबद्दल आमच्या धम्मपदातील श्लोक तुम्हाला सांगितला आहे. तो असा ; ' अक्रोधेन जेयत् क्रोधं ! ' मनुष्याने क्रोध हा अक्रोधाने जिंकावा, असं ते म्हणाले. कारण मी अतिशय क्रोधी आहे, हे जगाला चांगले परिचित आहे. श्री देव म्हणतात, माणसाने क्रोध गिळला पाहिजे. मला यावरून वाटते की देवांचं वाचन अपुरं आहे. त्यांनी चांगलं वाचन केलेलं दिसत नाही (टाळ्या). भगवान बुद्धानी ' राग ' (Anger) यावर व्याख्यान दिलं आहे. ते जर देवांनी वाचलं असतं तर त्यांनी असले उद्गार काढले नसते. मनुष्य रागीट असला तर त्याच्यावर टीका करू नये. राग दोन प्रकारचे असतात. (१) द्वेषमूलक, (२) प्रेममूलक. जो कसाई असतो तो कुऱ्हाड घेऊन जातो. त्याचा राग हा द्वेषमूलक असतो. आईने आपल्या मुलाला चापट मारली तर तिला कोण काय म्हणेल ? तिचा राग असतो तो प्रेममूलक असतो. मुलाने सदाचारी व्हावं म्हणून आई मुलाला मारीत असते. माझा रागही प्रेममूलक आहे. तुम्ही समतेनं वागावं म्हणून मी राजकारणात शिव्या देतो. माझ्यावर टीका करणाऱ्या लोकांची मी मुळीच पर्वा करणार नाही. (टाळ्या) मी सगळं केलं ते झगडा करून केलं आहे.

पूर्वी फक्त ब्राह्मण जात विद्या घेत होती. आम्हाला विद्या शिकता आली नाही. आम्हाला विद्या शिकण्याची इच्छा होती; पण ती आम्हाला ब्राह्मणांनी घेऊ दिली नाही. परंतु भगवान बुद्धाने हा दंडक मोडला.

एकदा भगवंतास लोहित नावाच्या ब्राह्मणाने प्रश्न विचारला की तू सगळ्यांना विद्या का शिकवितोस. यावर भगवंताने त्याला सांगितले की, ज्याप्रमाणे मनुष्यप्राण्याला अन्नाची जरूरी आहे, त्याचप्रमाणे सर्वांना विद्येची जरूरी आहे. ही विचारसरणी प्रथम बुद्धानेच या भूतलावर सुरू केली. (टाळ्या) विद्या ही एक प्रकारची तलवार आहे. ही दुधारी असते. तिने दुष्टांचा संहारही करता येतो व दुष्टांपासून आपले रक्षणही करता येते. म्हटलेच आहे की–

स्वदेशे पूज्यते राजा।

विद्वान सर्वत्र पूज्यते ॥

तुम्ही सर्वजण विद्या शिकण्यासाठी आला आहात; पण माझ्या मते केवळ विद्याच पवित्र असू शकत नाही. विद्येबरोबर भगवान बुद्धांनी सांगितलेली प्रज्ञा म्हणजे शहाणपणा, शील म्हणजे सदाचरणानं संपन्न असं आचरण, करुणा म्हणजे सर्व मानव जातीसंबंधी प्रेमभाव आणि मैत्री म्हणजे सर्व प्राणिमात्रांविषयीची आत्मियता, या चार पारमिता असल्या पाहिजेत. तरच विद्वत्तेचा काही उपयोग आहे. विद्येबरोबरच मानवाजवळ जर करूणा नसली तर तो कसाई आहे, असं मी समजतो. करूणा म्हणजे माणसामाणसावरचं प्रेम! ह्याच्यापुढेही मनुष्य गेला पाहिजे व त्याने मैत्री संपादन केली पाहिजे. ही विचारसरणी जर कोणी मांडली असेल तर ती भगवान बुद्धानीच होय. मी माझ्यासारखा विद्वान भारत वर्षात पाहू इच्छितो.

सर्व धर्मात श्रेष्ठ धर्म जर कोणता असेल तर तो भगवान बुद्धाचा बौद्ध धर्म होय. इतर धर्म निरर्थक आहेत. माझ्या धर्मात ईश्वराला मुळीच वाव नाही. कारण लोक सांगतात की, ईश्वराने सृष्टी निर्माण केली व त्याने नकारापासून साकार व साकारापासून नकार उत्पन्न केले. पण या जगात साकार वस्तु अगोदर होत्या व आहेत. ईश्वर असता तर त्याने इकडे डोळेझाक केलीच नसती. म्हणून ईश्वर आहे, ही कल्पनाच मुळी खोटी आहे. जर देव (परमेश्वर) असलाच तर आर्डिनरी जीवनात त्याचा उगीच खुंटा कशाला? माझ्या धर्मात आत्म्यालाही स्थान नाही. बौद्धधर्माचा मूळ पाया दुःख दूर करणे हा आहे. तोच धर्म माझ्या मते सर्वश्रेष्ठ होय. इतर धर्म मनुष्य व ईश्वर यांच्या काल्पनिक संबंधावर भर देऊन आधारलेले आहेत.

जगात काही माणसे भित्री असतात. माणसाने एकटं जाण्याचं धैर्य केलं पाहिजे. एकटं जाण्याचं धैर्य मी करतो. (टाळ्या) हजारो लोक जरी माझ्या मागे नसले तरी मी त्याची पर्वा करीत नाही किंवा त्याची खंतही बाळगीत नाही.

एक डॉ. पिक्विक व त्याचे दोन चार भिडू होते. तो आपल्या भिडूंना म्हणाला की, मी तुम्हाला जत्रा दाखवितो. तो आपल्या भिडूसह एका गावात गेला व तेथे त्यांनी दोन तीन खोल्या राहाण्यासाठी घेतल्या. त्या गावात इलेक्शन होतं. डॉ. पिक्विकच्या कंपनीतला सॅम वेलर नावाचा पोऱ्या त्याच्याजवळ त्याची सेवा करण्यासाठी ठेवण्यात आला होता. निवडणुकीची धामधूम ऐकल्यावर तो त्या खोलीतून बाहेर बघण्याचा प्रयत्न करू लागला व त्याने दरवाजा उघडण्यास व लावण्यास सुरवात केली. भित्र्या डॉ. पिक्विकने विचारले की, "What are you doing there ?" (तू तिथे काय करतो आहेस ?) त्याने उत्तर दिले की "There is a big crowd, Sir." (सर, तिथे मोठा जमाव आहे.) सॅम वेलर बाहेर जाण्याची धडपड करू लागला. तेव्हा डॉक्टरने त्याला बजावलं की Go with bigger crowd and not with little one (मोठ्या जमावा-सोबत जा, लहानासोबत जाऊ नकोस.) आणि पुन: असं सांगितलं की " हा मोठा जमाव जिकडे जाईल तिकडे जा. अथवा त्याच्या मागे जा. " माझे मात्र तुम्हाला असे सांगणे आहे की, केवळ अशा प्रकारच्या ' जमावा ' मागे तुम्ही जाऊ नका.

विद्या, प्रज्ञा, करुणा, शील व मैत्री या पंचतत्त्वानुसार मिलिंद महाविद्यालयातील प्रत्येक विद्यार्थ्याने आपले चारित्र्य बनविले पाहिजे आणि या मार्गाने एकट्यानेच जावे लागले तरी मनोधैर्य व निष्ठा राखून गेले पाहिजे. ' महाजनो येन गतः सपन्थः ' ही पर प्रत्ययनेय बुद्धी सोडून विवेकाने, जो मार्ग आपणास योग्य वाटेल त्याच मार्गाने यापुढे गेले पाहिजे.



# ३३५

# मराठवाड्याच्या प्रगतीसाठी स्वतंत्र मराठवाडा हेच उचित

मिलिंद महाविद्यालय औरंगाबादच्या वार्षिकोत्सव प्रसंगी अध्यक्ष या नात्याने दि. २१ डिसेंबर १९५५ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी भाषण दिले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

भगिनींनो आणि बंधुंनो,

मुंबई शहराच्या औद्योगिक क्षेत्रातील बहुसंख्य कामगार व बहुतेक सर्व कचेऱ्यातील नोकरवर्ग हा महाराष्ट्रीय आहे व तो शहराच्या वाढीसाठी सतत मेहनत करीत आहे.

गिरण्यात कामगार म्हणून काम करणाऱ्यात व कचेऱ्यात काम करणाऱ्यात पार्शी लोकांची संख्या अतिशय थोडी आहे. महाराष्ट्रीयनांशिवाय मुंबई शहराची वाढ होणार नाही असे माझे ठाम मत आहे.

पश्चिम महाराष्ट्र, मध्य महाराष्ट्र व पूर्व महाराष्ट्र अशी माझी त्रिगट राज्याची कल्पना असून या राज्यांची राजधानी अनुक्रमे मुंबई, औरंगाबाद व नागपूर अशी राहील. पूर्व महाराष्ट्र हा राज्य पुनर्रचना मंडळाने सुचविलेला विदर्भाचा भाग राहाणार आहे. त्यात नागपूर, भंडारा, वर्धा, यवतमाळ, अकोला, अमरावती, बुलढाणा, चांदा जिल्हा याचा समावेश होईल. मध्य महाराष्ट्रात मराठवाड्यातील पाच जिल्हे : औरंगाबाद, परभणी, नांदेड, बीड, उस्मानाबाद व नाशिक, डांग, अहमदनगर, पूर्व व पश्चिम खानदेश व सोलापूर जिल्ह्यातील कर्नाटकाला जोडलेला मराठी विभाग यांचा समावेश होईल. बाकीचा भाग पश्चिम महाराष्ट्रात जाईल त्यात ठाणे, कुलाबा, रत्नागिरी, पुणे, उत्तर भाग आणि दक्षिण सातारा, कोल्हापूर, बेळगाव आणि कारवार या जिल्ह्यांना अंतर्भूत करण्यात यावे.

आर्थिक व सांस्कृतिकदृष्ट्या हे तीन भाग कार्यक्षम राहातील व या योजनेमुळे त्या त्या भागातील लोकांच्या आकांक्षाही पूर्ण केल्या जातील.

माझ्या दृष्टीने अखंड संयुक्त महाराष्ट्राची मागणी अयोग्य आहे. कारण संयुक्त महाराष्ट्रात मराठवाड्यासारख्या जिल्ह्यातील मागासलेल्या लोकांची प्रगती होऊ शकणार नाही. त्यामुळे संयुक्त महाराष्ट्रामध्ये गोंधळ निर्माण

---

जनता : २४ डिसेंबर १९५५.

होण्याचा संभव आहे. तेव्हा या मागासलेल्या मराठवाड्याची प्रगती व्हावी अशी जर इच्छा असेल तर त्यांना स्वतंत्र मराठवाडा करून देणे हेच उचित होय. माझ्या त्रिगट योजनेप्रमाणे महाराष्ट्राची तीन राज्ये करण्यात आली तर राज्यकारभाराच्या दृष्टीने ती कार्यक्षम ठरतील आणि जनतेला आपली उन्नती करून घेण्यास संधी मिळेल.

शैक्षणिकदृष्ट्या मराठवाडा मागासलेला असल्यामुळे मराठवाड्यासाठी स्वतंत्र विद्यापीठाची अत्यंत आवश्यकता आहे.



# ३३६

# मुंबईला महाराष्ट्रापासून तोडण्याचे कृत्य निषेधार्ह

दिल्ली येथे दिनाक १८ जानेवारी १९५६ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

फक्त पंधरा टक्के गुजराती लोकांसाठी मुंबईला महाराष्ट्रापासून तोडण्याचे कृत्य निषेधार्ह आहे.

इतर अनेक राज्यात १५ टक्क्याहून अधिक अल्पसंख्य लोक असता कोणीही त्यांच्यासाठी वेगळी राज्ये केली नाहीत. मुंबईचा कारभार केंद्रशासित करण्यात कोणत्या दृष्टीने मुंबईचे लोक इतरांहून कमी प्रतीचे आहेत ?

मुंबई शहराचे जादा उत्पन्न विजेमुळे होते. ही वीज महाराष्ट्राकडून खरीदलेली असते व ती मुंबईत वापरली जाते. या विजेच्या उत्पन्नाचा भाग महाराष्ट्राला मिळाला पाहिजे.

महाराष्ट्राचे चार भाग करण्यात यावेत अशी माझी सूचना आहे. मुंबईचे वेगळे राज्य करण्यास महाराष्ट्रीयांनी हरकत करण्याचे कारण नव्हते. काही लोक एकत्र करून त्यांच्यावर गरीब व मागासलेल्या लोकांबद्दल आस्था न वाटणारे सरकार स्थापन करण्यात अर्थ नाही. मी सुचविल्याप्रमाणे चार राज्ये स्थापन करण्यात यावीत आणि मुंबईचे जादा उत्पन्न या राज्यात वाटण्यात यावे.



---

जनता : २८ जानेवारी, १९५६.

# ३३७

# बुद्धाच्या व जैनांच्या अहिंसेत महदंतर आहे

नवी दिल्ली येथील बुद्ध विहारात महाबोधी सोसायटीने दिनांक ५ फेब्रुवारी १९५६ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण आयोजित केले होते. ते म्हणाले,

कम्युनिझमला उत्तर देऊ शकत नाही असा कोणताही धर्म अस्तित्त्वात राहाणार नाही. माझ्या मते, कम्युनिझमचा प्रतिकार करण्यासाठी उपयुक्त ठरेल असा केवळ बुद्धधर्मच आहे.

जे लोक सर्व धर्मावर विश्वास ठेवतात आणि प्रत्येक धर्मातून थोडेफार निवडून उचलतात त्यांच्याशी माझे सहमत नाही. अशा प्रकारची प्रवृत्ती भारतात निदर्शनास येते. प्रत्येकाने आपापली निवड करावी आणि तिच्यावर विसंबून राहावे.

प्रत्येक धर्म दुसऱ्याहून भिन्न असण्याचीच शक्यता आहे. बुद्ध धर्माने उपदेशिलेली अहिंसा आणि जैन धर्माने उपदेशिलेली अहिंसा यात महदंतर आहे. जैन धर्माने अहिंसेला अतिरेकास नेऊन पोहोचविले.



---

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे : मा. फ. गांजरे, खंड ७, पृ. १८८.

# ३३८

# भाकरीपेक्षा स्वाभिमानाला अधिक महत्त्व आहे

आग्रा येथे रविवार दिनांक १८ मार्च १९५६ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण आयोजित केले होते. सभेच्या अध्यक्षस्थानी उत्तर प्रदेश शे. का. फेडरेशनचे अध्यक्ष श्री. तिलकचन्द कुरील हे होते. व्यासपीठावर पंडित श्रीकृष्णदत्त पालीवाल आणि उत्तर प्रदेशातील अनेक नामांकित सार्वजनिक कार्यकर्ते व पुढारी उपस्थित होते. सभेला दोन लाखाचा जनसमूह उपस्थित होता.

ज्या ठिकाणी त्यांचे भाषण झाले त्या रामलीला मैदानावर डॉ. बाबासाहेबांचे साडेसहा वाजता आगमन झाले.

रामलीला मैदानावर त्यांनी प्रवेश करताच 'आंबेडकर की जय हो' अशा गगनभेदी घोषणांनी वातावरण दुमदुमून गेले. त्यांच्या भाषणासाठी आग्रा शहरातीलच नव्हे तर आसपासच्या अनेक शहरे व खेडी यातून हजारोंच्या संख्येने अस्पृश्य समाज आला होता. मोटारीतून उतरल्यानंतर त्यांना दुसऱ्याचा आधार घेऊन काठी टेकवित व्यासपीठाकडे जावे लागले परंतु भाषण देताना फक्त एका स्टूलच्या आधाराने ते ताठ उभे होते. याप्रसंगी त्यांना एक पाच हजार रुपयांची व दुसरी एक हजार रुपयांची थैली देण्यात आली. ते आपल्या भाषणात म्हणाले,

२५ वर्षापूर्वी राजकारणात प्रवेश करताना माझ्या जीवनात तीन उद्देश होते. प्रथम उद्देश होता : अस्पृश्यांच्या घराघरात ज्ञानगंगेचा प्रवाह नेणे. हा माझा उद्देश बऱ्याच अंशी सफल झाला असून शैक्षणिक क्षेत्रात अस्पृश्य आघाडीवर नसले तरी काही दिवसात ते योग्य प्रगती करू शकतील, हा मला आत्मविश्वास आहे. सरकारी नोकऱ्यांमध्ये अस्पृश्य जमातीच्या लोकांना व्यापक प्रतिनिधीत्व मिळवून देणे हा माझ्या कार्यातील दुसरा उद्देश होता. माझ्या प्रयत्नांना आलेले यश आज तुम्हा सर्वांना दिसतच आहे. मला या दोन्ही उद्देशात सफलता प्राप्त झाली आहे. परंतु खेड्यापाड्यातून राहाणाऱ्या माझ्या असंख्य दलितांच्या परिस्थितीत सुधारणा घडवून आणण्याचा माझा तिसरा उद्देश म्हणावा तेवढा सफल होऊ शकला नाही. म्हणून माझे उरलेले आयुष्य व माझ्या अंगी असलेले सर्व सामर्थ्य मी खेड्यापाड्यातील अस्पृश्य जनतेची सर्वांगीण सुधारणा करण्यासाठी खर्च करण्याचा निश्चय केला आहे.

---

प्रबुद्ध भारत : २४ मार्च १९५६.

जोपर्यंत ते खेडी सोडून शहरात राहायला येणार नाहीत तोपर्यंत त्यांच्या जीवन-स्थितीत सुधारणा होणार नाही. आमच्या खेड्यातून राहाणाऱ्या या अस्पृश्यांना वाडवडिलांच्या गावी राहाण्याचा मोह सुटत नाही. त्यांना वाटते, तेथे आपली भाकरी आहे. परंतु भाकरीपेक्षा स्वाभिमानाला अधिक महत्त्व आहे. ज्या गावी त्यांना कुत्र्यासारखे वागवले जाते, ज्या ठिकाणी त्यांचा पदोपदी मानभंग होतो, जेथे त्यांना अपमानाचे स्वाभिमानशून्य जीवन जगावे लागते ते गाव काय कामाचे ! खेडेगावातील या अस्पृश्यांनी तेथून निघून जेथे कोठे पडीत जमीन असेल ती ताब्यात घेऊन त्यावर मालकी दाखवावी. जर कोणी जमीन ताब्यात घेताना अडवले तर त्यांना स्पष्ट सांगावे की, आम्ही जमीन सोडणार नाही, परंतु योग्य तो शेतसारा सरकारला द्यावयाला तयार आहोत आणि नवीन गावे बसवून स्वाभिमानपूर्ण माणुसकीचे जीवन जगावे. तेथे नवा समाज निर्माण करावा. तेथील सर्व कामे त्यांनीच करावी. अशा गावातून त्यांना कोणी अस्पृश्य म्हणून अपमानास्पद वागणूक देणार नाही. माझी प्रकृती ठीक होताच मी स्वतः अस्पृश्यांनी पडीत जमिनी ताब्यात घेण्याची चळवळ चालविणार आहे.

आपल्या दरिद्री व अज्ञानी बांधवांची सेवा करणे, हे सुशिक्षितांचे पहिले कर्तव्य आहे. बड्या हुद्द्यांच्या जागी गेल्यावर या सुशिक्षितांना आपल्याच अशिक्षित बांधवांचा विसर पडतो. याचे कारण, त्यांच्यात स्वतःच्या समाजाविषयी आपुलकीची भावना नाही, त्यांच्या ठिकाणी आपल्या बांधवांबद्दल कळकळ व तळमळ नाही, हे होय. धर्मभावनेचा अभाव हेही एक कारण आहे. जर त्यांनी आपल्या या असंख्य बांधवांकडे योग्य लक्ष दिले नाही तर समाजाचा ऱ्हास होईल.

दुसऱ्या कोणत्याही धर्मापेक्षा बौद्ध धर्म श्रेष्ठ आहे. माझी इच्छा आहे की, तुम्ही सर्वांनी माझ्याबरोबर बौद्ध धर्माचा या वर्षी स्वीकार करावा. मी या बाबतीत तुमच्यावर सक्ती करणार नाही. हा तुमच्या इच्छेचा प्रश्न आहे. परंतु माझ्या बौद्ध धर्म ग्रहणानंतर मी अस्पृश्य राहाणार नाही. आपण सर्व बौद्ध झाल्यानंतर राखीव जागेचे अधिकार राहाणार नाहीत. त्याचबरोबर आपण हेही ध्यानात ठेवले पाहिजे की, विधीमंडळे–लोकसभा यातील राखीव जागांची मुदत घटनेप्रमाणे फक्त दहाच वर्षांची आहे. ती मुदत लौकरच संपेल. आयुष्यभर राखीव जागा थोड्याच राहाणार आहेत. शेवटी आपल्याला स्वतःच्या सामर्थ्यावर

अवलंबून राहावे लागेल. शेवटी आपल्याला आपल्याच पायावर उभे राहिले पाहिजे. राखीव जागांच्या पांगुळगाड्याच्या आधाराने आपण विशेष प्रगती करू शकणार नाही.

बौद्ध झाल्याबरोबर मला तुमचे नेतृत्व करता येणार नाही आणि मला फेडरेशनमध्येही राहाता येणार नाही. यासाठी माझी अशी हार्दिक इच्छा आहे की, दलित वर्गीयांपैकी कोणी अशा व्यक्तिने पुढाकार घ्यावा की जी व्यक्ती माझ्या ऐवजी आपले नेतृत्व करू शकेल. नाहीतर एक खांबाच्या आधारावर असलेल्या तंबूसारखी ही संघटना कोसळून पडेल.

बौद्ध झाल्यावर राजकारण मात्र सोडणार नाही. फक्त शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या तिकिटावर उमेदवार म्हणून निवडणूक लढविणार नाही. मी आपल्या स्वतःच्या हिंमतीवर निवडणूक लढवीन. मग माझा विजय होवो अथवा पराभव होवो. त्याची मला किंचितही पर्वा नाही.

अर्थ मंत्र्यांना तर तेल मीठ विकण्याची अक्कल नाही. ज्यांची साधे बेलदाराचे मातीकाम करण्याची योग्यता नाही ते आज एम. पी. व एम. एल. ए. होऊन मासिक ४०० रुपये पगार व २१ रुपये भत्ता खात आहेत.

• • •

## ३३९
# बुद्ध धर्माची लाट कधीही परत जाणार नाही

दि. २४ मे १९५६ रोजी मुंबईत बुद्धजयंती मोठ्या प्रमाणात साजरी करण्यात येणार आहे. आपले एकमेव नेते डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी पददलीत समाजाला अचूक मार्ग दाखवून अखिल भारतीयांना बौद्ध धर्म स्वीकारण्याचा आदेश दिला आहे. सत्य, अहिंसा, समता प्राप्त करून घ्यावयाची असेल तर बौद्ध धर्म स्वीकारा, असा त्यांचा दिव्य संदेश आहे. त्यांचा हा संदेश शिरसावंद्य मानून भारतातील अखिल अस्पृश्य जनता धर्मांतर करण्यास तयार झाली आहे. भारतीय बौद्धजन समितीकडे डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे केव्हा आणि कोठे धर्मांतर करणार आहेत, सार्वत्रिक की सामुदायिक धर्मांतराचा कार्यक्रम कोठे आणि कसा पार पाडावा, अशा आशयाची शेकडो पत्रे आलेली आहेत. याबाबतीत डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्याकडे समितीमार्फत पत्रव्यवहार करण्यात आलेला आहे. सर्व लोकांच्या माहितीसाठी त्यांनी पाठविलेल्या पत्राचा आशय खालीलप्रमाणे देत आहोत,--

" मी मागे जाहीर निवेदन काढून येत्या वैशाख पौर्णिमेला धर्मांतर करण्याचा माझा मनोदय जाहीर केला होता. त्याप्रमाणे अस्पृश्य समाजातील व इतर वर्गीयांपैकी शेकडो लोक धर्मांतर करण्यास तयार झाले आहेत, हे ऐकून मनाला समाधान वाटते व धर्मांतर करण्यास तयार झालेल्या सर्व लोकांचे मी मनापासून अभिनंदन करतो. तुमची सामुदायिक धर्मांतराची इच्छा पूर्ण व्हावी म्हणून मी अनेक ठिकाणी दौराही काढणार आहे. आपणाप्रमाणेच माझ्याकडे उत्तर भारतीयांचीही शेकडो पत्रे आली आहेत. त्यांच्या शाखा स्थापून त्यामार्फत प्रचंड बहुसंख्येने धर्मांतरास योग्य तो अवसर सर्वांना मिळावा यासाठी आपले धर्मांतर चारपाच महिने पुढे ढकलावे अशी त्यांनी विनंती केल्यावरून मी माझे धर्मांतर येत्या ऑक्टोबर महिन्यात करण्याचे योजिले आहे. आपण इतके दिवस थांबलात तसे काही दिवस थांबाल अशी आशा बाळगतो. येत्या वैशाख पौर्णिमेस तुम्ही सर्वांनी गतवर्षी प्रमाणेच २५०० वी बुद्ध जयंती साजरी करावी. "

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या पत्राचा आशय भारतीय बौद्धजन समितीच्या सर्व शाखांनी लक्षात घेऊन २५०० वी भगवान बुद्ध जयंती आपआपल्या भागात महान प्रमाणात साजरी करावी ही विनंती. असे पत्रक का. वि. सवादकर, बा. कृ. कबीर, भ. स. गायकवाड, चिटणीस, भारतीय बौद्ध जनसमिती, मुंबई यांनी ' प्रबुद्ध भारत ' दिनांक १२ मे १९५६ च्या अंकात प्रकाशित केले.

'' यानुसार मुंबई, येथे ता. २४ मे १९५६ रोजी २५०० व्या भगवान बुद्ध जयंती महोत्सवानिमित्त भारतीय बौद्धजन समितीतर्फे नरेपार्कवर प्रचंड सभा झाली. सभेला मुंबईतीलच नव्हे तर बाहेर गावाहूनही लोक आले होते. जवळ-जवळ पाऊण लाख स्त्री-पुरूष-बालके सभेला हजर होते.

सभास्थानी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे आगमन सायंकाळी साडे सहा वाजता झाले. त्यावेळी समता सैनिक दलाच्या गणवेषातील एक हजार स्वयंसेवकांनी त्यांना शिस्तबद्ध मानवंदना दिल्यानंतर बाबासाहेबांच्या जयघोषाने वातावरण दुमदुमून गेले.

व्यासपीठावर भारतीय बौद्धजन समितीचे सर्व सेक्रेटरीज, मुं. प्र. शे. का. फेडरेशनचे अध्यक्ष श्री. आर. डी. भंडारे, प्राध्यापक व्ही. जी. राव, अन्तुमामा गद्रे, आमदार कांबळे, श्री. निकुंभ, मुं. प्र. शे. का. फे. चे ज. से., व्ही. एस. पगारे वगैरे प्रतिष्ठित व्यक्ती आणि सौ. माईसाहेब आंबेडकर उपस्थित होत्या. सभेचे अध्यक्ष मुंबईचे माजी मुख्यप्रधान श्री. बाळासाहेब खेर यांनी बुद्धवंदनेनंतर बौद्ध धर्म आणि बुद्ध चरित्र यावर भाषण केले.

बरोबर साडे सात वाजता डॉ. बाबासाहेबांनी आपल्या महत्त्वपूर्ण भाषणाला प्रारंभ केला. सुमारे सव्वा तास त्यांनी आपले बौद्ध धर्मावरील विचार जनसमुदायापुढे मांडले. डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

अध्यक्ष महाराज, बंधु आणि भगिनींनो,

आज वैशाख पौर्णिमेला भगवान बुद्ध यांच्या २५०० व्या परिनिर्वाण दिनासाठी मला रंगून येथे ब्रह्मदेश सरकारच्या आमंत्रणावरून हजर असावयास पाहिजे होते. परंतु मी आज मुंबईत या सभेला हजर आहे.

गेली पाच वर्षे मी बौद्ध धर्मावर एक पुस्तक लिहिण्यात गुंतलो होतो. त्या पुस्तकाचे प्रकाशन माझ्या धर्मदीक्षेअगोदर वैशाख महिन्यात व्हावे या हेतूने मी मुंबईला आलो. परंतु मी एका विलक्षण आजाराने जायबंदी झाल्यामुळे मला ते पुस्तक लवकर लिहून संपविता आले नाही. पुस्तकाची ७०० पाने असून तो ग्रंथ इंग्रजी भाषेत असल्यामुळे आपल्यापैकी बऱ्याच जणांना तो समजणे अवघड

जाईल. म्हणून मी लौकरच त्याचे मराठी भाषांतर करवून घेणार आहे. केवळ याच कामामुळे मला रंगूनला जाता आले नाही. तथापि माझ्यासमोर जमलेला हा जनसमुदाय पाहून मला अत्यंत आनंद होत आहे.

मी १४ वर्षांचा असतानाच एका सभेत श्री. दादासाहेब केळूसकर यांनी मला भगवान बुद्धाचे एक चरित्राचे पुस्तक बक्षीस म्हणून दिले होते आणि तेव्हापासून बौद्ध धर्माचा माझ्या मनावर पगडा बसला आहे.

मी लहान असतानाच माझे वडील आमच्याकडून रामायण, महाभारत इत्यादी ग्रंथ वाचून घेतल्याशिवाय आमची सुटका करीत नसत. परंतु रामायण, महाभारत वाचण्याची आमच्यावर सक्ती का ? असे विचारण्याची कोणाची हिंमत नसे. ज्या पुराणात शूद्र आणि अस्पृश्य यांचे पदोपदी वर्णन आढळते त्या पुराणपुरुषांचे जीवन चरित्र वाचण्यात तरी काय तथ्य आहे ? माझ्याइतका धर्मशास्त्रवेत्ता कोणी नाही. मी वडिलांना हे ग्रंथ वाचण्याची सक्ती का, असा प्रश्न विचारल्यावरून त्यांनी उत्तर दिले की " आपण जरी अस्पृश्य असलो तरी रामायण-महाभारतातील पुराणपुरुषांची जीवन चरित्रे वाचल्यानंतर आपल्या मनाचा न्यूनगंड दूर होतो. " पण ते मला नीटसे समजले नाही.

महाभारतातील द्रोणाचार्य हा अत्यंत पराक्रमी राजगुरू होता. कौरव आणि पांडव दोघांनाही त्याने शस्त्रास्त्रांची विद्या शिकविली. तरीसुद्धा महायुद्धामध्ये द्रोणाचार्य खरी न्यायाची बाजू न धरता कौरवांच्याच बाजूने लढले. कारण कौरवांची ते नोकरी करीत होते. वास्तविक ज्या कुंतीपुत्र कर्णाची हलक्या कुळातला म्हणून अवहेलना केली जाते तो कर्णच खरोखर वीर व नीतीतत्त्व जाणणारा महान् पुरुष होता.

रामायणातील रामाला आम्ही एकवाणी, एकपत्नी म्हणून संबोधितो. परंतु वाली आणि सुग्रीव यांपैकी एकाची बायको दुसऱ्याला देऊन त्याने त्याचा बाणाने घात केला. एकपत्नीव्रताच्या गप्पा मारणाऱ्या रामाची सीता जेव्हा रावणाने अशोक वनात नेऊन ठेवली तेव्हा रावणाशी युद्ध करण्यापूर्वी रामाने अशोक वनात जाऊन प्रथम सीतेची चौकशी करावयास पाहिजे होती. परंतु मारुतीच्या वारंवार सांगण्यावरूनसुद्धा रामचंद्राने सीतेची चौकशी केली नाही. रावणाशी द्रोह करून लंकेचे राज्य जिंकण्यास मदत करणाऱ्या बिभीषणाला प्रथम राज्याभिषेक करणे हे कार्य रामाच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचे होते. तेव्हा अशा पुराण-पुरुषांच्या चरित्रापासून काय लाभ होणार ?

माझे हे बौद्ध धर्माचे वेड फार पुरातन कालापासूनचे आहे. वास्तविक १९५१ सालच्या खानेसुमारीत तुम्हाला सर्वधर्मीय व पंथाचे लोक आढळतील पण उभ्या भारतात एकही बुद्धधर्मीय माणूस या खानेसुमारीत तुम्हाला आढळणार नाही.

भारतात जर एकही बुद्धधर्मीय नाही तर आज २५०० वर्षापूर्वी होऊन गेलेल्या भगवान बुद्धाची आम्हाला उत्कट आठवण का होते ? बौद्धधर्माचे हे मढे उकरून काढून आम्ही त्याची का पूजा करीत आहोत ? भगवान बुद्धाच्या धर्माला सर्वत्र मागणी आहे. बुद्ध धर्माचा प्रचार नुसत्या भारतातच नसून सर्व जगात आहे. धर्म प्रसाराच्या व्यापारात रामकृष्णाला फारसे स्थान नाही.

बुद्ध धर्मावर बरेच लोक खोडसाळपणे टीका करतात. त्यापैकी सावरकर एक होत. वास्तविक त्यांना काय म्हणायचे आहे हेच मला कळत नाही. बुद्ध हा वाईट मनुष्य आहे, असे त्यांना म्हणावयाचे आहे काय ? बौद्ध धर्म प्रचारक राजे वाईट होते, असे त्यांना म्हणावयाचे असेल तर त्यांनी आपली भूमिका स्पष्ट शब्दात मांडावी. मी त्यांना उत्तर देण्यास समर्थ आहे. केसरीत प्रसिद्ध केलेल्या ' बौद्धांच्या आततायी अहिंसेचा शिरच्छेद ' या लेखातून त्यांनी स्पष्टपणे सांगितले नाही. सावरकरच काय, पण कुणालाही बौद्ध धर्माबाबत काही विचारावयाचे असल्यास त्यांनी उघडपणे मला विचारावे, त्यांना उत्तर देण्याची माझ्यात हिम्मत आहे.

भगवान बुद्धाचा जो अफाट भिक्षूसंघ होता त्यात शेकडा ७५ टक्के ब्राह्मण होते. हे सावरकरांना माहीत आहे काय ? सारीपुत्त मोग्गलायनसारखे पंडित ब्राह्मण होते, हे सावरकरांनी विसरू नये. सावरकरांना मला असा प्रश्न विचारायचा आहे की पेशवे कोण होते, ते भिक्षु होते काय ? मग त्यांच्या हातून इंग्रजांनी राज्य कसे हिसकावून घेतले ? तेव्हा अशा नादान व बेजबाबदार लोकांच्या आपण नादी लागू नये. काही लोक म्हणतात सावरकर विष ओकले. पण मी म्हणतो सावरकर आपल्या पोटातील नरक ओकले ! कुणी कितीही खोडसाळ टीका केली तरी माझा मार्ग निश्चित आहे. मी बुद्ध धर्म स्वीकारणार ! तुम्हाला पटला तर तुम्हीही स्वीकारा. आतापर्यंत हिंसक मार्गाने व अमानुष अत्याचाराच्या जोरावर बुद्ध धर्माची लाट परतवून लावली. परंतु आता बुद्ध धर्माची लाट येईल, ती कधीही परत जाणार नाही. या अफाट सागराला भरती येईल, पण ओहोटी येणार नाही. भगवान बुद्धाच्या संघटनेत काही त्रुटी राहिल्या. काही छिद्रे राहिली होती. म्हणून त्या छिद्रांद्वारे बाहेरील पाणी आत येऊन बुद्ध धर्माचा प्रवाह थोडा दूषित झाला होता. परंतु आता मी त्या धर्माची डागडुजी करून ती छिद्रे बुजविणार आहे.

बुद्ध चरित्रावर मी जे पुस्तक लिहिले आहे त्यात बुद्धाचे स्थान काय आहे याचे संपूर्ण विवेचन केले आहे. ख्रिश्चन धर्मात येशू स्वतःला ईश्वराचा पुत्र समजतो. किंबहुना तो बायबलमधून असेही सांगतो की, मी तुम्हाला ईश्वराचा संदेश सांगत आहे. तुम्ही मेल्यानंतर जेव्हा स्वर्गात जाल तेव्हा मला

तुमची परमेश्वरापुढे शिफारस, रिकमेंड करावी लागेल, तेव्हा मी असा विचार करीन की, मी पृथ्वीवर असताना तुम्ही मला ईश्वराचा पुत्र मानीत होता काय ? मुसलमान धर्माच्या महंमद पैगंबराचीही तीच स्थिती आहे. महंमदसुद्धा स्वतःला ईश्वराचा प्रेषित समजतो. पण भगवंताच्या उपदेशात तसा आशय नाही. भगवंतानी सांगितले, केवळ मी सांगतो म्हणूनच नव्हे तर तुमच्या विचारशक्तीला पटेल तरच त्याचे ग्रहण करा. बुद्धानी शोधून काढलेला मार्ग (Discovery) हा स्वप्रयत्नाने, स्वकष्टाने व स्वाध्यायनांने तयार केलेला आहे. कुणा दुसऱ्याच्या पुंजीवर भगवंताचा धर्म आधारलेला नाही.

मार्क्सवाद्यांना क़ाय सांगावे ? त्यांनी भगवान बुद्धाचे तत्त्वज्ञान अवश्य वाचावे. दुःखी पिडीत लोकांना दुःखातून मुक्त करण्याचा खरा मार्ग भगवंताने शोधून काढला. हजारो पिडीतांना त्यांनी स्वयंप्रकाशाने दुःखमुक्त केले. आलार-कालाम याच्या ज्ञानाने भगवंताचे समाधान झाले नाही. कारण त्याची शिकवण अपूर्ण होती. सांख्य तत्त्वज्ञानवेत्ता कपिल महर्षी यांनी तत्त्वज्ञानाच्या आधारे सांगितले की पृथ्वी ही जड आहे. हलत नाही. मग तिचा विकास कसा होतो ? ती तऱ्हेतऱ्हेची रूपे कशी घेते ? कपिलाने सांगितले की, पृथ्वीच्या उदरात रज, तम, आणि सत्व हे गुण जेव्हा समतोल (Balance) प्रमाणात असतात तेव्हा पृथ्वी जड वाटते. परंतु या त्रिविध गुणांचा समतोलपणा जेव्हा ढासळतो तेव्हा पृथ्वी अस्थिर होते व मग पृथ्वी तऱ्हेतऱ्हेची रुपे घेते. कपिलाने एवढेच सांगितले. परंतु त्यामुळे लौकिक दुःखाचे परिहरण होणार नाही, हे भगवंताच्या लक्षात आले आणि म्हणून त्यांनी चार आर्य सत्यांचा अवलंब केला.

बायबलमधील मोझेससारखी माझी स्थिती होण्याचा संभव आहे. पॅलेस्टाईन-मधील गुलामांना सुखी करण्यासाठी मोझेस यास फार परिश्रम करावे लागले. मोझेस इजिप्तमधून गुलाम विकत आणीत असे व त्यांना पॅलेस्टाईनमध्ये नेऊन सुखी व स्वतंत्र करीत असे. या प्रयत्नात मोझेस यास अत्यंत कष्ट सहन करावे लागले. इजिप्तच्या बाहेर जात असताना मोझेसला फार हाल काढावे लागले. कदाचित मजवरही फार हालअपेष्टा सहन करण्याची पाळी येईल पण तरीसुद्धा माझ्या अस्पृश्य समाजास घेऊन मी बौद्ध धर्माचा स्वीकार करणार हे निश्चित.

मी माझे धर्मांतर या ऑक्टोबरमध्ये मुंबईत करणार आहे. त्यापूर्वी या धर्मावर माझे एक पुस्तक मी प्रसिद्ध करणार आहे. भगवंताच्या बुद्ध धर्मात जी त्रुटी आहे त्याचा सविस्तर विचार मी त्या पुस्तकात मांडणार आहे. बुद्ध धर्मात उपासकाला दीक्षा दिली जात नसे. संघ दीक्षेवर त्याचा विपरीत परिणाम

होतो. उपासकाच्या मनाची परिपूर्ण तयारी झालेली नसते. परंतु माझ्या धर्मात उपासकांनाही धम्म दीक्षा दिली जाईल. तत्पूर्वी धम्म दीक्षेवर मी एक पुस्तक लिहिणार आहे. ते पुस्तक प्रत्येकाला विकत घ्यावे लागेल व त्या पुस्तकातील ठराविक प्रश्नांची उत्तरेही प्रत्येकाला द्यावी लागतील. तरच त्याला बुद्ध धर्मात प्रवेश मिळेल. बुद्ध धर्मात प्रवेश करण्यासाठी प्रत्येकाने शुभ्रवस्त्र परिधान केले पाहिजे.

धर्म नष्ट का होतो याचा ' मिलिंद पन्ह ' या ग्रंथात खुलासा आहे. धर्माला जवळजवळ तीन प्रमुख कारणांनी ग्लानी येते. पहिले कारण म्हणजे धर्मतत्त्व अबाधित नसेल किंवा पुरतेपणी विचार न करता धर्मतत्त्वाची बांधणी केली गेली तर धर्माला ग्लानी येते. दुसरे कारण धर्मातील वितंडवाद. ज्या बाजूला वादविवाद पटूंचा भरणा जास्त असतो त्या धर्मपंथाचा नेहमी जय होतो. तिसरे कारण म्हणजे धर्मतत्त्व हे सामान्यजनांना कळण्याजोगे असले पाहिजे.

अफगाणिस्तान हा सबंध देश एकेकाळी बुद्धभिक्षुकांचा होता. भगवान बुद्धाचा जगामध्ये सर्वात भव्य आणि उंच पुतळा अफगाणिस्तानमध्ये आहे. परंतु धर्मवेड्या मुसलमानांनी ७ हजार बुद्धभिक्षुकांची मुंडकी तोडून रस्त्यावर त्याचा ढीग घातला व म्हणून तेथून बुद्धभिक्षु पळून गेले.

आता बुद्ध धर्माची लाट आली तर ती कधीही परत जाणार नाही. धर्म स्थापनेसाठी देवळांची अत्यंत आवश्यकता आहे. परंतु आपल्या स्वकष्टाने मला एक असे देऊळ बांधावयाचे आहे की जे तुम्ही कधी पाहिले नसेल. पंण त्याकरिता मी कोणा धनिकापुढे लाचार होऊन हात पसरणार नाही. तुम्ही पैसे जमवून देत असाल तर बांधीन व चांगले बांधीन. आपल्या स्वपराक्रमाने बांधीन, दुसऱ्याच्या ओंजळीने बांधणार नाही.''[१]



[१] प्रबुद्ध भारत : २ जून १९५६.

# ३४०

# स्वतंत्र विचारसरणीचे, स्वतंत्र वृत्तीचे निर्भय नागरिक व्हा !

दिल्ली येथे ता. १० जून १९५६ रोजी आंबेडकर भवनाच्या पटांगणात सभा आयोजित करण्यात आली होती. त्यात तीस हजारांच्यावर समुदाय हजर होता. ही सभा २५०० वा बुद्ध महापरिनिर्वाण, जयंती आणि संबोधी दिन साजरा करण्याकरिता भारतीय बौद्धजन समितीच्या दिल्ली येथील शाखेमार्फत बोलावण्यात आली होती. कंबोडियाचे आदरणीय वीर धर्मवीर महाथेरा हे या सभेचे अध्यक्ष होते. या प्रसंगी डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

बंधु आणि भगिनींनो,

ब्राह्मण धर्म हा अन्याय, निर्दयता आणि गरिबांची पिळवणूक यांचे माहेरघर आहे. वर्णव्यवस्थेत सर्वात वर ब्राह्मण असून त्यांच्या खाली क्षत्रिय नंतर वैश्य व सर्वांचे ओझे डोक्यावर असलेला शूद्र सर्वात खालच्या रांगेत आहे. जर शूद्राला आपली उन्नती करून घ्यावयाची असेल तर त्याला तिन्ही वरच्या वर्णाशी झगडा करावा लागेल. या तिन्ही वर्णांना स्वतःच्या कल्याणाची मुळीच काळजी कराविशी वाटत नाही. धर्म ग्रंथांनी ब्राह्मणांकडे वैश्य-क्षत्रियांपेक्षा श्रेष्ठत्त्व दिले असल्यामुळे ते अक्षरशः ब्राह्मणवर्गाचे धार्मिक गुलाम आहेत. साध्या शब्दात सांगायचे म्हणजे शूद्राच्या प्रगतीआड येणारे हे तीन वर्ण त्याचे शत्रु आहेत.

ज्या समाजव्यवस्थेत धार्मिक पिळवणूक होत असेल तेथे तुम्ही प्रगतीची कशी अपेक्षा करू शकता ? याच कारणामुळे शूद्राला नेहमी टाचेच्याखाली ठेवण्यात आले आणि जेव्हा जेव्हा शूद्रांनी विरूद्ध लढण्यासाठी कंबर कसली तेव्हा तेव्हा त्यांची मुंडकी उडविण्यात आली.

याउलट बौध्द धर्माकडे पाहा. येथे जातीयतेला आणि विषमतेला थारा नाही. सर्व अधिकार समसमान. सर्वांना धर्मात सारखे अधिकार. कोणी उच्च नाही अन् कोणी नीच नाही. स्वतः बुध्दाने अन्यायाविरूद्ध झगडून ' बहुजन हिताय, बहुजन सुखाय ' अशा धर्माची स्थापना केली.

---

प्रबुद्ध भारत : २१ जुलै १९५६.

पूर्वी आर्य (ब्राह्मण) पूजाविधी करीत असताना हजारो पशुचा बळी देत असत. पशु हत्त्येचा इतिहास (गाई आणि म्हशींची कत्तल) जर आपण पाहिला तर ब्रिटिशांनी आणि मुसलमानांनी या देशातील जेवढ्या गाई मारून खाल्ल्या नाहीत त्यापेक्षाही अधिक गाई त्या काळातील ब्राह्मणांनी खाल्लेल्या आहेत.

अगोदर चार प्रकारचे ब्राह्मण होते. मग कालांतराने त्यांच्या सतरा पोटजाती झाल्या. ब्राह्मण धर्मग्रंथांवरून असे दिसून येते की, गोमांसाच्या वाटणीवरून, गाई-म्हशींच्या कातड्याच्या मालकीबाबत त्या ब्राह्मणांनी आपसात नेहमी युद्धे केली आहेत. ब्राह्मणांच्या देवतांना प्रसन्न ठेवण्यासाठी जे पशुहत्त्या करीत नसत त्यांना ब्राह्मण धर्मानुयायी समजण्यात येत नसे. याचमुळे बौद्ध धर्म अस्तित्त्वात आला. बौद्ध धर्माने मानवाला विचार करण्याचे स्वातंत्र्य देऊन पूर्ण विचाराअंती योग्य मार्ग अनुसरण्याची परवानगी दिलेली आहे. नैतिकतेवर आधारलेल्या अहिंसेचा उपदेश बौद्ध धर्मात आहे. याबद्दल आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. अहिंसेचा अर्थ लोकांनी चुकीचा लावला. माणसाने पशुहत्त्या करू नये किंवा हातात तरवार घेऊन देशरक्षणाकरिताही लढू नये. ही अहिंसा नाही. अहिंसा दोन गोष्टीवर आधारलेली आहे. आवश्यकतेसाठी हत्त्या आणि हत्त्या करण्याची इच्छा होणे ! जर राष्ट्रावर परचक्र आले, देश संकटात सापडला तर हातात तरवार घेऊन राष्ट्ररक्षणासाठी तळहातावर शीर घेऊन समरांगणात उडी घेणे आणि शत्रुंचा निःपात करणे, त्यांची हत्त्या करणे हे प्रत्येक नागरिकाचे प्रथम कर्तव्य आहे. याचा अर्थ ही हिंसा आवश्यक होती. त्याला बौद्ध तत्त्वज्ञानात उच्चतम प्रतीची अहिंसा म्हणतात. दुसरी, मारण्याची इच्छा होणे. म्हणजे स्वतःच्या समाधानाकरिता पशुबली देणे, पशुहत्त्या करणे ही हिंसा होय.

बौद्ध तत्त्वज्ञान जसेच्या तसे उचलून त्यात आपली जातीभेद वगैरे तत्त्वे दडपून देऊन हिंदू तत्त्वज्ञानी ते आपले म्हणून मिरवितात. ब्राह्मण धर्माचे लेखक म्हणतात की, वेद प्रजापतीने दिले. भगवान बुद्धाने प्रश्न विचारला की प्रजापती कोणत्या ठिकाणाहून जन्माला आला. हिंदुंचे वेद आणि गीता यांचा अभ्यास केला तर भगवत्‌गीता हे दुसरे तिसरे काही नसून ' धम्मपद ' आहे. ही धम्मपदाची नक्कल करताना त्यात जाती संस्था घुसडून देण्यास ब्राह्मण विसरले नाहीत. स्वतः श्रीकृष्णाने आपल्या शिष्यांना उपदेश केला की, ब्राह्मणेतरांना कोणतेही ज्ञान देऊ नका अथवा धर्मोपदेश करू नका !

प्रार्थना केल्याने अथवा कोणाचे पाय धरल्याने ते तुम्हाला काही देणार नाहीत. झगडा करावयाचा तर आपल्याला अंगात पहिलवानासारखे बळ पाहिजे. पहिलवान खूप खातो, पचवितो आणि सामर्थ्य निर्माण करतो.

तसे तुमचे मानसिक बल वाढले पाहिजे. जर सत्य व योग्य मार्गाचे अवलंबन केले तर तुम्हाला मानसिक शक्ती प्राप्त होईल. भित्रे भागूबाई कधीच लढू शकत नाहीत. मी ह्या अस्पृश्यतेचे वैगुण्य घालविण्याचा प्रयत्न कसोशीने अनेक वर्ष करीत आलो. परंतु अद्याप माझा उद्देश पूर्णपणे सफल झाला नाही. माझे मन मजबूत आहे. त्यामुळे मी शेवटपर्यंत लढेन. जुलूमशाहीविरूद्ध झगडण्यासाठी नैतिक धैर्य व मानसिक बल पाहिजे. ते तुम्हास प्राप्त व्हावे यासाठी मी नवा मार्ग तुम्हाला दाखवितो. तुम्ही जर बुद्धमार्गाचे अनुसरण केले तर जगात तुम्हाला प्रतिष्ठा प्राप्त होईल एवढेच नव्हे तर, तुम्हाला बलप्राप्ती होईल आणि तुमच्या मुलाबाळांचा भविष्यकाळ उज्वल राहील. समानता आणि स्वाभिमानाने जगण्याचे स्थान दाखविल्याबद्दल ते तुमचे आभारी राहातील.

मी असे ऐकले आहे की, लोकांनी जुलूमाविरूद्ध झगडे करू नये यासाठी त्यांना आपल्या पक्षात ओढण्यासाठी काँग्रेस काही लोकांना पैसे वाटत आहे. सरकार मलाही पैसा घेण्यास सांगत होते. हेतु हा की माझे तोंड बंद करावे. पण मी पैसा कधीच घेतला नाही, हे तुम्हाला माहीत आहेच. माझ्या उदरनिर्वाहाकरिता मी आपले श्रम करून पैसे मिळवीन आणि अस्पृश्यांच्या हितासाठी व हक्कासाठी शेवटपर्यंत झगडत राहीन. एवढ्यासाठी मी तुम्हाला विनंती करतो की, काही झाले तरी तुमचा स्वाभिमान कोणी विकत घेऊ शकणार नाही याची खबरदारी घ्या आणि समाजाची मान नेहमी उंच राहील यासाठी डोळयात तेल घालून दक्ष राहा. सर्वस्व पणाला लावून तुमचा आणि समाजाचा स्वाभिमान कायम राखा. मी प्रेषित नाही, पैगंबर नाही किंवा ईश्वराचा प्रतिनिधीही नाही. मी भगवान बुद्धाचा विनम्र शिष्य आहे. मी तुम्हाला हा मार्ग दाखवित आहे. जर तुम्हाला हा मार्ग योग्य वाटत असेल तर त्याचे अनुकरण करा. परंतु हा मार्ग स्वीकारण्यापूर्वी त्याचा सर्वांगीण विचार करा. भगवान बुद्धाने आपल्या अनुयायांना सांगितले की, कोणत्याही गोष्टीचा स्वीकार पूर्ण विचाराअंती करा. आंधळेपणाने स्वीकार करू नका. निसर्गतः मानव स्वतंत्र आहे. म्हणून मी तुम्हाला सांगेन की, स्वतंत्र विचारसरणीचे, स्वतंत्र वृत्तीचे निर्भय नागरिक व्हा !



# ३४१
# एकेकाळी अफगाणिस्तान हा देश संपूर्ण बौद्ध होता

दिल्ली येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या निवासस्थानी बुद्ध जयंती निमित्त ' बौद्धजन महासभा ' (अ. भा. बौद्धजन समितीची दिल्ली येथील शाखा) तर्फे दिनांक २३ जून १९५६ रोजी सभा आयोजित केली होती. सभेत दिल्ली आणि आसपासच्या विभागातील निवडक अस्पृश्य आणि बौद्धजन उपस्थित होते.

## प्रचंड मिरवणूक

सभेच्या पूर्वी दिल्ली शहरातून भगवान बुद्धाच्या प्रतिमेची आणि त्यांच्या जीवन प्रसंगावरील लहान मुलांनी अभिनित केलेल्या सजीव दृश्यांची प्रचंड मिरवणूक काढण्यात आली होती.

मिरवणुकीत भाग घेऊन ती यशस्वी करणाऱ्या सुयोग्य कार्यकर्त्यांना व बालक अभिनेत्यांना डॉ. बाबासाहेबांच्या हस्ते रौप्य पदके व भगवान बुद्धाच्या प्रतिमा वितरण समारंभ झाला.

या समारंभाप्रसंगी प. पू. बाबासाहेब आंबेडकरांनी उपस्थितांना संबोधित केले. ते म्हणाले,

बंधु आणि भगिनींनो,

बौद्ध धर्म हा वास्तववादी धर्म आहे. नुसत्या काल्पनिक गोष्टींवर बुद्धाने आपल्या धर्माची उभारणी केली नाही. त्याचमुळे ईश्वर आणि आत्मा किंवा अशाच भलभलत्या गोष्टी बुद्धाला मान्य नव्हत्या. जे मानवाला अनुभवता येत नाही किंवा ज्याचे अस्तित्व सिद्ध करता येत नाही, अशा कोणत्याही गोष्टीवर बुद्धाचा विश्वास नव्हता.

प्रत्येक धर्माला दोन बाजू असतात. एक विचारावर आधारलेली तात्त्विक आणि दुसरी नीती नियम. यातील एक अधिक महत्त्वाची व दुसरी कमी महत्त्वाची आहे, असे म्हणता येणार नाही. ब्राह्मण धर्माच्या या दोन्ही बाजू

---

प्रबुद्ध भारत : २१ जुलै १९५६.

पडताळून पाहिल्या तर हा धर्म विघातक असल्याचे आपल्याला आढळून येईल. कारण मानवा-मानवात असमानता व विषमता ही हिंदू धर्माची वैचारिक बैठक आहे. ब्राह्मण भ्रष्ट असो की महामूर्ख असो तो सर्वश्रेष्ठ आहे, ही या धर्माची शिकवण ! ब्राह्मणापेक्षा क्षत्रिय कनिष्ठ, क्षत्रियापेक्षा वैश्य आणि वैश्याहून शूद्र. शेवटच्या तीन वर्णांना अध्ययनाचा अधिकार नाही. ब्राह्मणाला अध्ययनाचा अधिकार असल्यामुळे साहजिकच सर्व वर्गासाठी विचार करण्याचे राखीव अधिकार ब्राह्मणांकडे होते. एकट्या क्षत्रियाने देशाचे रक्षण करावे. कशी आत्मघातकी व्यवस्था होती ? एकाच्या हाती तलवार देऊन त्याच्यावर विसंबून राहाण्यास सर्वांना सांगण्यात आले. याचा परिणाम हा झाला की जेव्हा जेव्हा क्षत्रियांचा पराभव झाला तेव्हा तेव्हा सर्व देशच्या देश शत्रुंनी पादाक्रांत केला.

माझ्या या विधानाला इतिहास साक्ष आहे. १९३९ ते १९४५ या दुसऱ्या जागतिक महायुद्धाच्या काळात युरोपात देखील उण्यापुऱ्या १०० लढाया झाल्या. त्यातील काहीत पराभव झाला तर काही जिंकल्या गेल्या. परंतु सर्व युरोपभर हिटलर कधीच स्वामित्व गाजवू शकला नाही. सरते शेवटी, हिटलरचा पराभव होऊन सर्व युरोपचे रक्षण झाले. कारण भारतासारखी तेथे एकाच वर्णावर देशरक्षणाची जबाबदारी टाकण्यात आलेली नव्हती. जेव्हा जेव्हा मुसलमानांनी भारतावर आक्रमण केले आणि रजपुतांचे शिरकाण केले तेव्हा तेव्हा जणूकाही सर्व देशच निर्वीर्य झाला.

ज्यांचे ध्येय फक्त नफा मिळविण्याचे व संपत्ती गोळा करण्याचे आहे, असा एक वर्ग आहे. त्यांना आपण ' वाणी, ' ' बनिया ' अथवा उत्तरेकडे ' लाला ' या नावाने ओळखतो. देशाच्या कल्याणाची अथवा इतर कोणाच्या भलाईची चिंता ते कधीच करीत नाहीत. संपत्ती जमा करण्यात त्यांच्यासारखा हावरा आणि महालोभी माणूस सापडणार नाही. देश तिकडे युद्धात हरला तरी चालेल पण हा युद्ध साहित्यात देखील नफा उकळल्याशिवाय राहाणार नाही.

प्रत्येक पौर्णिमेला असे समारंभ घडवून आणण्याचा समितीचा मनोदय आहे, ही अत्यंत आनंदाची गोष्ट आहे. पौर्णिमेच्या प्रशांत वातावरणात पूर्ण चंद्राच्या शीतलतेत माणसाला आपल्या कार्याचे सिंहावलोकन शांततापूर्वक आणि गांभीर्याने करण्याची संधी मिळते, हेच पौर्णिमेचे वैशिष्ट्य होय.

गत काळात दैनंदिन्या, रोजनिशा, कॅलेंडर्स नसायची. तेव्हा कालगणना करण्यासाठी लोक पौर्णिमेच्या दिवशी उपवास करीत असत. इतर धर्मीयांप्रमाणे उपवासामुळे आपली सर्व पापे धुवून जातील आणि आपल्याला स्वर्गलाभ होईल

अशी बुद्ध धर्माची शिकवण नाही. बौद्ध धर्मात अनाकलनीय वस्तु अथवा वर (बक्षिस) यांना स्थान नाही. ज्या वस्तुंची माणसाला जाणीव होऊ शकेल, ज्यांना स्पर्श करू शकेल, ज्यांच्याविषयी बोलू शकेल आणि ज्यांचा माणूस नाश करू शकेल अशाच वस्तु किंवा गोष्टींविषयी बुद्धाने उपदेश केला आहे.

प्रत्येकाला धर्माची परीक्षा करुन त्याची तपासणी करता आली पाहिजे. बाजारात सराफाच्या दुकानी आपण सोन्याचा दागिना खरेदीसाठी जातो. तेव्हा तुम्ही काय करता ? तुम्ही हे पाहाता की, हे सोने खरे आहे की खोटे ? हे समजून घेण्यासाठी कसोटीवर त्या दागिन्याला कस लावून पाहाण्यात येतो. तसेच धर्माला ' कस ' लावून त्याची परीक्षा पाहिली पाहिजे, धर्म तत्त्वांची छाननी करून, सिद्धांत आणि आचार पडताळून आपण पाहू या की कोणता धर्म माणसाला सुखसमाधान देऊ शकेल ?

या दृष्टिकोनातून पाहिल्यास मानव समाजाच्या अस्तित्वाला ब्राह्मणी धर्म नुसता विघातकच नाही तर भयंकर विषारी आहे. महाराष्ट्रात देवगिरीच्या रामराव यादवांचा पंतप्रधान हेमाडपंत नामक ब्राह्मण होता. त्याने आचारविधी कर्मकांडांचे सातशे प्रकार आपल्या पुस्तकात लिहून ठेवले आहेत. एका वर्षात दिवस ३६० च असतात. मग हे सातशे विधी कशासाठी ? हेमाडपंत ब्राह्मण असल्यामुळे त्याने हे सातशे ' आचार ' लिहून ठेवून ब्राह्मणांच्या पोट भरण्याची परस्पर सोय करून ठेवली आहे.

दुसरा तसाच प्रकार सत्यनारायण कथेचा ! ही ' सत्यनारायणाची कथा ' दुसरे तिसरे काही नसून ब्राह्मणांच्या शिधा/भोजनाची सोय करून ठेवण्यासाठी कोणा ब्राह्मणाच्या सुपीक मेंदुतून निघालेला शोध आहे. सत्यनारायण पूजेचा समारंभ पाहिला तर तुम्हाला आढळून येईल की सत्यनारायणाला अर्पण करण्यासाठी ज़ी मेवामिठाई आणि फळफळावळे असतात ती फक्त ब्राह्मणांच्याच खाण्याच्या उपयोगी असतात. एखाद्या जातीबरोबर पंगतीत आपण जेवावे की नाही हे ठरविण्याचा अधिकार ब्राह्मणाचा. आपल्यापेक्षा नीच समजून ब्राह्मणाने त्या जातीने तयार केलेले भोजन जेवण्यास नकार दिला तर ब्राह्मणाला त्या बदली अंदाजे वीस रुपये आणि काही फळफळावळे प्राप्त करून घेता येतात. तो ब्राह्मण ते जेवण्याच्या बदली मागतोच. शूद्राने तयार केलेले जेवण त्याला चालत नाही. परंतु त्याच्याऐवजी स्वतःच्या घरी शिजविता येईल अशी सर्व शिधासामग्री ब्राह्मण त्या शूद्राच्या घरून गोळा करून घेऊन जातो. शूद्राने कितीही पवित्र सोवळ्याने त्याच शिधासामग्रीचा उपयोग करून जेवण तयार केले तर ते चालत नाही. कारण अशी शिधासामग्री त्याच्या पाच दहा दिवसांची सोय करून देण्याइतपत असते.

जर ' नारायण ' स्वतःच खरा असेल तर ' सत्य ' हा शब्द आणखी का जोडण्यात आला आहे ? यांचा हा ' नारायण ' नाहीच. ब्राह्मण-पंडितासारखाच तो पिळवणूक करणारांचा रक्षणकर्ता आहे एवढेच. हे सर्व फोल आचारविधी आहेत.

काही लोक गंगेवर स्नानासाठी जातात. गंगेच्या किनाऱ्यावर ब्राह्मण बसलेले असतातच ! स्नानासाठी जाणाऱ्या प्रत्येक माणसाकडून दक्षिणा (पैसा) उकळण्यासाठी ब्राह्मण तयार असतो. गंगा ही नदी अविरत वाहत आहे. गंगा काही स्नानासाठी पैसे मागत नाही किंवा कोणाला घ्यायला सांगत नाही. ब्राह्मणाला एक आणा देऊन ब्राह्मणाने काही मंत्र पुटपुटावे आणि नंतर गंगास्नानासाठी परवानगी द्यावी, याची काही आवश्यकता आहे काय ? भोळया लोकांची समजूत अशी की अशारितीने ब्राह्मणाला दक्षिणा देऊन गंगा नदीत स्नान केल्यास सर्व पापे धुवून जातात. काय मूर्ख आहेत ते सारे ! गंगा नदी आणि लोक यांच्यामध्ये ब्राह्मण हा दलाल मानण्यात येतो, हे मोठेच आश्चर्य आहे.

जर पाप गंगा स्नानाने व ब्राह्मणांना दक्षिणा वगैरे दिल्याने धुवून जात असेल, नाहिसे होत असेल तर माणूस माणसाविषयी मुळीच सहानुभूती बाळगणार नाही. परस्परांवर प्रेम करणार नाही. अशा अवस्थेत कायद्याची आवश्यकताच उरत नाही आणि सरकारचेही महत्त्व शिल्लक राहात नाही. परंतु हे स्वीकारण्यास कोणीही तयार नाही.

मी मंत्री असताना एकदा हरिद्वार येथे गेलो होतो. मंत्री असल्यामुळे मला तेथे चारी बाजूंना पाणी असलेले एक लहान मंदीर दाखविण्यात आले. त्याला ' हर की पायरी ' म्हणतात. तेथील पाण्यात माणसाची हाडे आणि इतर सर्व घाणेरड्या वस्तू जमा झाल्या होत्या. एखादे गटार त्यापेक्षा बरे असे वाटत होते. अशा त्या ' हर की पायरी ' च्या घाण पाण्यात प्रत्येक स्त्री-पुरुष आंघोळ करीत होते. त्या पाण्यामध्ये मृतांच्या अस्थी टाकल्यावर ब्राह्मणांच्या मध्यस्थीने त्यांचे आप्त-नातलग स्वर्गाला जातील आणि तेथे स्नान केल्यावर हे सगे-सोयरे पवित्र होतील, ही खुळचट श्रध्दा का असावी, हे मला कळत नाही. मला वाटते, या सर्व गोष्टींचा विचार केलाच पाहिजे.

सोने कसोटीवर खरे उतरल्याशिवाय विकत घेत नाहीत तसेच धर्म देखील मानवाला उपयोगी आहे किंवा नाही या कसोटीवर घासून पारखून पाहिला पाहिजे. जोपर्यंत धर्माची अशी परीक्षा होत नाही तोपर्यंत तो स्वीकारणीय ठरणार नाही. आमचे जुने लोक अशिक्षित असल्यामुळे ब्राह्मणांच्या प्रत्येक शब्दावर त्यांनी भोळेपणाने विश्वास ठेवला. आता काळ बदलला आहे ; तुम्ही संपूर्ण विचाराअंती धर्माचा स्वीकार केला पाहिजे.

हिंदू आणि बौद्ध धर्मात महान अंतर आहे. मी ते सर्व तुम्हाला समजावून देतो. मिलिन्द राजाने भिक्खु आचार्य नागसेनाशी केलेली चर्चा प्रश्नोत्तर रुपाने ' मिलिन्द पन्ह ' ग्रंथात दिलेली आहे. त्याची आठवण मला या प्रसंगी झाली आहे. मला लोक विचारतात भारतातून बौद्ध धर्म का विलयाला गेला ? असाच एक प्रश्न मिलिंद राजाने भिक्खु नागसेनला विचारला होता. मिलिंद राजा म्हणाला, धर्माचा ऱ्हास का होतो ? तेव्हा आचार्य नागसेन यांनी उत्तर दिले होते की धर्म ऱ्हासाची तीन कारणे आहेत :—

(१) जो धर्म तात्कालिक (सामयिक) असतो, म्हणजे त्या काळापुरता असतो तो विलयाला जातो. ज्या काळापर्यंत धर्म जनमनाची पकड घेतो, तोपर्यंत तो धर्म राहातो.

(२) जर धर्मोपदेशक विद्वान नसतील आणि जर चर्चेच्या प्रसंगी ते आपल्या धर्माचे उत्तमरितीने प्रतिपादन करून यशस्वी होऊ शकत नसतील, तर तो धर्म विलयाला जातो.

(३) जेव्हा सर्वसाधारण माणूस खऱ्या धर्मावर विसंबून राहात नाही केवळ नक्कल करतो त्यामुळे धर्म विलयाला जातो. कारण नक्कल चिरंतन नसते.

भारतातून बौद्ध धर्माच्या ऱ्हासाची जी कारणे आहेत त्यांच्याशी या कारणांचा सरळ संबंध नाही. मी या संबंधात कोणाशीही चर्चा करायला तयार आहे.

मी तुम्हाला सांगतो की जगातील अखिल मानवाच्या कल्याणासाठी सदासर्वकाळ फक्त बौद्ध धर्मच राहील. मुसलमानांनी या देशावर आक्रमण करून बौद्ध विहारांचा नाश करून बुद्ध मूर्ती फोडल्यामुळे त्यांना ' बुत शिकन् ' म्हणजे मूर्ती फोडणारे म्हटले जाते. यातील ' बुत ' हा मूर्तीसाठी शब्द आहे. तो ' बुद्ध ' या मूळ शब्दाचे विकृत (अपभ्रंश) रूप आहे. मुस्लिमांच्या बौद्ध धर्मावरील आक्रमणाबाबत मी एक पुस्तक लिहीत आहे.

एके काळी अफगाणिस्तान हा संपूर्ण बौद्ध देश होता. आक्रमक मुसलमानांना तेथे पिवळी वस्त्रे परिधान केलेले लोक इकडून तिकडे जाताना आढळले. मुसलमान सरसेनापतीने त्यांना इस्लामी धर्माचा स्वीकार करण्याचा निरोप पाठविला. पण भिक्खुंनी तसे करण्यास नकार दिला. एक दिवस हा सरसेनापती अरण्यातून जात असताना त्याला तेथील झाडावर माणसांची मुंडकी लटकलेली आढळून आली व आश्चर्य वाटले. जवळजवळ सातशे बौद्ध भिक्षुंची कत्तल करून त्यांची डोकी झाडावर टांगण्यात आली होती. हे पाहून आपल्या हुकूमाची चुकीची अंमलबजावणी झाल्याचे पाहून त्या सरसेनापतीला फार खेद झाला. तोपर्यंत आपला जीव व धर्म वाचविण्यासाठी सर्व भिक्खु पुढे चीन, तिबेट आणि इतर देशात पळून गेले होते. तेच भिक्खु पुढे जपानला गेले.

मुसलमानांनी बौद्ध व हिंदू धर्मावर आक्रमण केले होते, ही गोष्ट खरी आहे. त्यांनी हिंदू व बौद्ध दोन्ही धर्माची मंदिरे उध्वस्त केली परंतु बौद्ध धर्माचा जो संबंध आहे त्याबाबतीत एवढेच सांगता येईल की बऱ्याच भिक्खुंची कत्तल होऊन काही उरलेल्यांनी देशांतर केल्यामुळे बौद्ध अनुयायांना आपण कोणाचे अनुसरण करावे ते कळेनासे झाले. बौद्ध अनुयायी अन्धःकारात चाचपडत होते. कारण भिक्खु हा जन्मतः भिक्खु होत नाही ; तो घडविला जातो. त्याच्यावर अनेक संस्कार होतात. असे भिक्खु मुस्लिम आक्रमणानंतर देशात उरले नव्हते.

भिक्खु विद्वान आणि तावून सुलाखून निघालेला असावा लागतो. भिक्खुंच्या शिक्षणाच्या निरनिराळया पायऱ्या असत. अठरा वर्षाचा विद्यार्थी ज्येष्ठ भिक्खुकडे पाच वर्षे उच्च धार्मिक विद्यार्जनासाठी पाठविण्यात येत असे. तेथे चांगला अभ्यास केल्यावर वयाच्या पंचविसाव्या वर्षी तो ' श्रामणेर ' होण्याची योग्यता संपादन करीत असे. ' श्रामणेर ' पुढे पाच वर्षे धकाधकीच्या आयुष्यातून गेल्यावर त्याची भिक्खु म्हणून ' उपसम्पदा ' होत असे. म्हणजे साधारणतः पंचवीस वर्षे वयापर्यंत योग्य विद्याध्ययन करून, चांगले आचरण ठेवण्यास उतरलेलाच भिक्खु होऊ शकत असे.

ब्राह्मण पुरोहितांचे तसे काहीच नव्हते. ब्राह्मणाच्या घरात जन्माला आला की झाला तो पुरोहित. त्याला विद्याध्ययनाची, सद्वर्तनाची किंवा दुसरी कसलीही अट नव्हती. त्यामुळे जरी ब्राह्मण धर्मावर हल्ला झाला, त्यांची मंदिरे नष्ट झाली, तरी ब्राह्मण जन्माला येऊ लागले आणि ते आपल्याला ब्राह्मण धर्माचे म्हणवू लागले.

भिक्खुंचे अस्तित्व न राहिल्याने साधारण जन अशा ब्राह्मणांच्या तडाख्यात सापडले. या ब्राह्मणांना त्यामुळे मोकळे रान मिळाले व ते आपल्या धर्माचा प्रचार व प्रसार करू लागले.

ईश्वर आहे काय ? गरीब लोकांची पिळवणूक करून धर्माच्या नावाखाली ज्यांना लुटावयाचे आहे, त्यांनीच ईश्वराचे बुजगावणे उभे केले आहे.

महिलाही या सभेला उपस्थित आहेत ही चांगली गोष्ट आहे. परंतु स्वतःचे चेहरे पदराने झाकून ठेवणे चांगले नाही. निर्भयतेने जीवन जगण्यास शिका. अस्पृश्य स्त्रियांची सर्वांगीण सुधारणा झाल्याखेरीज अस्पृश्य समाजाची सुधारणा पूर्ण होणार नाही.



## ३४२

# बुद्ध धर्मानेच जगाचा उद्धार होणार आहे

'' भारतीय बौद्धजन समितीचे प्रवर्तक आणि अध्यक्ष, भारतातील दलित जनतेचे कंठमणी, आंतरराष्ट्रीय किर्तीचे घटना-पंडित, अखिल भारतीय शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे संस्थापक आणि कर्णधार परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी येत्या १४ ऑक्टोबर १९५६ च्या सकाळी ८ वाजता नागपूर येथे बौद्ध धर्म दीक्षा घेण्याची महत्त्वपूर्ण घोषणा केली आहे.

**डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा**

**संदेश**

२६, अलीपूर रोड,
दिल्ली, ता. २३ सप्टेंबर १९५६

बौद्ध धर्म स्वीकारण्याचा दिवस व ठिकाण मी आता निश्चित केले आहे. येत्या दसऱ्यास तारीख १४ ऑक्टोबर १९५६ रोजी नागपूर येथे मी धर्मांतर करणार आहे.

या दिवशी सकाळी ९ ते ११ वाजता माझा धर्म-दीक्षा विधी समारंभ होईल व संध्याकाळी माझे सर्व लोकांसाठी जाहीर व्याख्यान होईल.

बी. आर. आंबेडकर,
२३ सप्टेंबर १९५६.

' प्रबुद्ध भारत ' च्या संपादकांना एक विशेष संदेश डॉ. बाबासाहेबांनी पाठविला असून बौद्ध धर्म स्वीकारावयाचा वर दिलेला दिवस, तिथी आणि समय कळविला आहे.

विजयादशमीचा मुहूर्त धर्मदीक्षेसाठी साधण्यात अत्यंत औचित्य आहे. विजयादशमी ही महान बौद्ध सम्राट अशोकाच्या विजयाचा दिन म्हणूनच पाळली जाते. अलिकडील तिनशे वर्षात पावसाळयाच्या समाप्ती नंतर मराठे सीमोल्लंघन या विजयादशमीला करीत असत. अस्पृश्य आणि दलित समाजाच्या डोक्यावर

गेली हजार वर्षे जे काळेकुट्ट ढग जमले होते ते या अडीच हजाराव्या बौद्ध वर्षाच्या विजयादशमीला धर्मचक्र नवप्रवर्तन करून डॉ. बाबासाहेब नष्ट करणार आहेत. हिंदू धर्माच्या सीमामध्ये बंदिस्त अस्पृश्य समाज या दिवशी त्यांना शतकानुशतके गुलाम ठेवणारी धार्मिक तटबंदी उल्लंघून नव स्वातंत्र्याचे उदक पिण्यास तयार होणार आहे. हेच ते खरे सीमोल्लंघन. ते केल्यावर परत यावयाचे नाही, या भीम निश्चयाने प्रत्येक अस्पृश्य दलिताचे पाऊल पुढे पडणार आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा बौद्ध-धर्म-दीक्षा समारंभ ब्रह्मदेशचे महास्थविर पूज्य भिक्षु चंद्रमणी संपन्न करणार आहेत. त्याचवेळी लाखो लोक बौद्धधर्माची दीक्षा घेण्यासाठी नागपूरला एकत्र येतील.

नागपूर शहरात पूर्व दिशेकडून रायपूर, दुर्ग, गोंदिया, भंडारा या जिल्ह्यातून धर्म स्वीकारणारे इच्छुक बौद्धजन प्रवेश करतील, पश्चिम दिशेकडून वर्धा, अमरावती, अकोला, बुलढाणा या जिल्ह्यातून येणारे धर्मप्रवासी प्रवेश करतील. तर दक्षिणेकडून मराठवाडा, चांदा, बल्लारशहा या विभागातील बौद्ध यात्रेकरू येतील आणि उत्तर दिशेकडून उत्तर प्रदेश, मध्यभारत, भोपाळ, हुशंगाबाद, बैतूल, शिवणी आदी विभागातील जनता पथकापथकाने समारंभाच्या जागेकडे ' बुद्धं सरणं गच्छामि ' च्या घोषणा करीत येतील.

या प्रसंगी वर्धा आणि इतर भागातील सवर्ण हिंदुंचा एक प्रचंड गट बौद्ध दीक्षेसाठी येणार आहे. दीक्षा प्रसंगी पांढरे शुभ्र कपडे परिधान केले पाहिजे व दीक्षा घेणाराचे वय अठरा वर्षापेक्षा अधिक असले पाहिजे हे नियम कसोशीने पाळले जातील.

त्याच दिवशी सायंकाळी नागपूर येथेच डॉ. बाबासाहेबांचे बौद्ध धर्म स्वीकारावरील ऐतिहासिक भाषण होणार आहे. जगाच्या धार्मिक इतिहासातील या क्रांतिकारक घटनेचे प्रत्यक्ष अवलोकन करण्याची संधी व त्यात भाग घेण्याचे महद्भाग्य आपल्याला लाभलेले आहे. असे सांगतात की, भगवान बुद्धानंतर प्रथमतःच एका वेळी, एका दिवशी, एके ठिकाणी इतक्या मोठ्या संख्येने बौद्ध धर्म स्वीकार केल्याचे कोठेही नमूद नाही.

## नागपूरचे वैशिष्ट्य

१९३० साली ऑल इंडिया डिप्रेस्ड क्लासेस लीगची स्थापना, तद्नंतर १९४२ साली अखिल भारतीय शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनची मुहूर्तमेढ डॉ. बाबासाहेबांनी नागपूरला केली तसेच बौद्ध धर्म स्वीकाराचा समारंभ नागपूरलाच होणार.

## प्रतिज्ञेची पूर्ति

१९३५ साली डॉ. बाबासाहेबांनी ' मी हिंदू म्हणून जन्माला आलो असेन पण हिंदू म्हणून मरणार नाही ' अशी प्रतिज्ञा केली आहे, तीची पूर्तता २१ वर्षानंतर होत आहे.

आर. डी. भंडारे ''[१]

### बौद्ध धर्म स्वीकारासंबंधी डॉ. बाबासाहेबांचे विचार

'' जे भगवान बुद्ध या देशात नांदत होते, त्यांचा तो धर्म आज़ही या देशाचा धर्म होईल यात मला शंका वाटत नाही.

मनुष्यत्व, समदृष्टी, बंधुभाव, प्रेम यांनी हा खरा धर्म झालेला आहे, हा धर्म तुम्ही स्वीकारा.

मी जे धर्मांतराचे कार्य आरंभिले ते नीट समजवून घ्या ; त्याचे महत्त्व पारखून घ्या व काय करायचे ते ठरवा, मात्र ते ठरल्यावर जुने ते टाकून द्या. आज मी २० वर्षे तुमच्या बद्दल विचार करीत आहे. जो निरनिराळ्या धर्माचा अभ्यास, मानवास करिता येण्यासारखा आहे, तो मी केला आहे व शेवटी माझा अनुभव असा आहे की, बुद्धधर्माशिवाय दुसरा धर्म जगाला नाही. जगात जर कोणता धर्म राहावयाचा असेल तर तो बुद्धधर्मच होय. ''[२]

'' ज्यांना माझ्याबरोबर बौद्ध धर्माचा स्वीकार करावयाचा असेल त्यांनी यावे. ज्या व्यक्तिचे मन स्वतंत्र नाही तो स्वतंत्र नाही. मी हिंदू धर्माचा त्याग करण्याचा पूर्ण निश्चय केला आहे. ज्यांना त्याग करावयाचा असेल त्यांनी पुढे यावे. मला जे कर्तव्य करावयाचे आहे ते मी करणार. माझ्या आयुष्यात अनेक कामे करावयाची आहेत. जितकी कामे होतील तितकी करीन. माझे वडील हिंदूधर्मात वारले. माझा परिवार याच धर्मात वारला, मीही येथे राहून चालणार नाही. अव्यवहारी मार्ग मला बदललाच पाहिजे. ''[३]

[१], [२] आणि [३] प्रबुद्ध भारत : २९ सप्टेंबर १९५६.

या बौद्ध दीक्षेच्या कार्यक्रमाची संपूर्ण जबाबदारी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी स्थापन केलेल्या भारतीय बौद्धजन समितीच्या नागपूरच्या शाखेवर सोपविण्यात आली होती. त्यानुसार समितीचे चिटणीस वा. मो. गोडबोले यांनी धर्मदीक्षेचा कार्यक्रम यशस्वी होण्याच्या दृष्टीने दिनांक २१ सप्टेंबर १९५६ रोजी समितीच्या वतीने पत्रक प्रसिद्ध केले आणि ते भारतातील आंबेडकरी चळवळीतील अनेक लोकांना पाठविले होते. ते पत्रक खालीलप्रमाणे--

"MASS CONVERSION

**Revered Dr. BABASAHEB AMBEDKAR,** the Founder and President of the Buddhist Society of India—**The Bharatiya Bouddha Jana Samiti**—shall embrace Buddhism at the ceremony to be held at Nagpur at 8 a. m. On the Vijaya Dashami Day-**Sunday, the 14th October, 1956. Venerable Bhikkhu Chandramani Maha Thera of Burma,** now in India, shall perform the ceremony.

People desirous of getting themselves converted shall be able to do so at the very ceremony, and shall be required to wear clean white garments.

APPEAL FOR FUNDS

In this benevolent ceremony the people of India, it is hoped, shall participate in lacs ; and shall render every possible aid to the **local Branch of the Bharatiya Bouddha Jana Samiti** to whom the Revered Baba has entrusted the task of managing this great ceremony. While rendering the financial aid the local benevolents shall insist on having receipts of the Samiti concerned. Outsiders will kindly remit money by money order.

Those who want to volunteer themselves to assist the management of the celebrations shall see the undersigned on or before the 30th September, 1956.

**(W. M. Godbole),**
Secretary.
Bharatiya Bouddha Jana Samiti
Dated, (Nagpur-Branch), Kothari Mansion,
21st Sept. 56. Sitabuldi, Nagpur."[1]

[1] बोधिसत्व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या धम्म दीक्षेचा अविस्मरणीय इतिहास : वामनराव गोडबोले, पृ. २६६.

याचप्रमाणे समितीच्या वतीने तारीख १४ ऑक्टोबर १९५६ रोजी आयोजित सामुदायिक धर्मांतराकरिता जाहीर पत्रक काढण्यास आले होते. ते ' प्रबुद्ध भारत खास पुरवणी, तारीख १२ ऑक्टोबर १९५६ ' म्हणून प्रकाशित केल्या गेले. ते येणेप्रमाणे--

'' ॥ नमो तस्स भगवतो अरहतो सम्मासम्बुद्धस्स ॥

## सामुदायिक धर्मांतर

भारतीय बौद्धजन समितीचे संस्थापक व अध्यक्ष परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा बौद्धधर्मदीक्षाग्रहणविधी ब्रह्मदेशीय पूज्य भिक्षू चंद्रमणी महास्थविर यांचे हस्ते नागपूर येथे रविवार, दिनांक १४ ऑक्टोबर, १९५६ विजयादशमीचे दिवशी होईल हे यापूर्वीच जाहीर पत्रकाद्वारे प्रसिद्ध केले आहे.

भारताच्या इतिहासातच नव्हे तर अखिल बौद्ध जगताच्या इतिहासात या महान मंगल समारंभाची छाया आबाल-वृद्ध, स्त्री-पुरुष, अबौद्ध-बौद्ध या सर्वांवरच आहे. अशा या भव्य समारंभात जनता लाखोंच्या संख्येने भाग घेईल यात शंका नाही. परमपूज्य बाबांच्या या महान समारंभाच्या व्यवस्थेचा भार भारतीय बौद्धजन समितीच्या नागपूर शाखेवर सोपविला गेला आहे. जनतेच्या–विशेषतः नागपूर निवासी जनतेच्या–सहाय्याने हा भार वाहिला जाणार आहे. तरी उभ्या आयुष्यात एवढा परमपवित्र प्रसंग दुसरा नाही हे जाणून नागपूरवासी जनता तनमनधनाने मदत करील अशी आशा आहे. नागपुरात प्रत्येक मोहल्ल्यात भारतीय बौद्धजन नागपूर शाखेची वर्गणी पुस्तके पाठविली आहेत. तरी आर्थिक मदत देताना पावती अवश्य घ्यावी. बाहेरगावच्या मंडळींनी मनिऑर्डरने समितीच्या चिटणीसांना वर्गणी पाठवावी. या महान समारंभाच्या स्वागत समितीच्या सभासदत्वाची फी २५ रु. आहे. दिनांक १० ऑक्टोबर १९५६ ला किंवा तत्पूर्वी ही फी भरून कोणालाही स्वागत समितीचा सदस्य होता येते.

धर्माचे हे परम पवित्र कार्य अखंड आहे. त्यासाठी परमपूज्य बाबांनी भारतीय बौद्धजन समिती स्थापन केली आहे. वार्षिक वर्गणी १ रुपया देऊन सभासद बनणे हे प्रत्येकाचे कर्तव्य आहे. समितीच्या सीताबर्डी येथील कार्यालयात सभासदांची नोंदणी मुंबई केंद्रीय समितीचे चिटणीस श्री. भ. स. गायकवाड हे करीत आहेत. तरी प्रत्येकाने १ रुपया देऊन नाव नोंदवून घ्यावे. ज्यांनी मागचे वर्षी वर्गणी दिली त्यांनी देखील या वर्षीची वर्गणी द्यावी व पावती घ्यावी.

या समारंभाला कसलेही तिकीट नाही. जे दीक्षा घेणारे आहेत त्यांना किंवा प्रेक्षकांना कोणालाच तिकीट किंवा फी नाही. या समारंभाला सर्वांनी उपस्थित राहावे ही विनंती.

## दीक्षा घेऊ इच्छिणाऱ्यांना विनंती

दीक्षा घेऊ इच्छिणाऱ्यांनी स्वच्छ पांढरी वस्त्रे परिधान करून येणे आवश्यक आहे. मंडपात बायांसाठी व पुरुषांसाठी बसण्याची वेगवेगळी व्यवस्था आहे. तसेच प्रेक्षकांसाठी व दीक्षा घेणाऱ्यांसाठी वेगळी व्यवस्था आहे. दीक्षा घेऊ इच्छिणाऱ्यांची नोंदणी दिनांक ११ ऑक्टोबर १९५६ पासून समितीच्या कार्यालयात तसेच दीक्षेच्या जागी चालू राहील. नोंदणी करवून घेणाऱ्याला विनामूल्य दोन तिकीटे मिळतील. ती सांभाळून ठेवावीत. मंडपातील दीक्षार्थी विभागात प्रवेश मिळण्यास त्या रोज कामी पडतील. जे जे स्वच्छ पांढरी वस्त्रे घालून येतील अशाच दीक्षार्थींना दीक्षार्थी विभागात प्रवेश मिळेल.

## स्वयंसेवकांना विनंती

स्वयंसेवकांनी पांढरा हाफ् शर्ट व पांढरी हाफ् प्यांट घालून यावे. त्यांनी आजपासूनच आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून आपल्या कार्याची माहिती करवून घ्यावी व त्याप्रमाणे आपले कार्य तत्परतेने करावे. दीक्षा समारंभाचे वेळी ज्यांची ज्या ठिकाणी नेमणूक केली जाईल त्यांनी त्या ठिकाणीच दीक्षा घ्यावी. दीक्षा घेणाऱ्यांनी काय म्हणावयाचे असते हे लाऊड स्पीकरवरून ऐकू येईलच. त्याप्रमाणे स्वतः म्हणावे.

बाहेरगावच्या स्वयंसेवकांच्या पथकातील मुख्यांनी स्वयंसेवक दलाचे प्रमुख श्री. क. वि. उमरे, श्री. सच्चिदानंद माणके व आर. आर. पाटील यांना भेटून आपल्या कार्याचा वाटा उचलावा.

## जनतेस विनंती

हे धार्मिक कार्य परमपवित्र आहे. समारंभाचे सर्व कार्यक्रमात शांतता व स्वच्छता अगदी परिपूर्ण राहील असेच वर्तन प्रत्येकजण ठेवील अशी आशा आहे. मोहल्ल्यातून निघताना मोहल्ल्यातील सर्व स्त्री-पुरुषांनी एकत्रित जमावे व सतत ' बुद्धं सरणं गच्छामि ', ' धम्मं सरणं गच्छामि ', सौम्य आवाजात व मधून मधून ' भगवान बुद्ध की जय ', ' डॉ. बाबासाहेब आंबेडकर की जय ', आणि ' बाबासाहेब करे पुकार, बौद्ध धर्म का करो स्वीकार ' म्हणत पायी जावे. ज्यांना सोबत झेंडे आणावयाचे असतील त्यांनी बौद्ध झेंड्याविषयी समितीच्या कार्यालयातून माहिती मिळवून त्याप्रमाणे झेंडे तयार करावेत.

सकाळच्या व सायंकाळच्या मधल्या वेळात देखील शांततेनेच भोजनादि कार्ये उरकून घ्यावीत ही विनंती आहे. लाखो लोकांची उपस्थिती असल्यामुळे '' क्यू '' लावण्याचा प्रसंग येईल तिथे तिथे रांगेत राहाणे आवश्यक राहील. आपल्या

शांत चित्तावर समारंभाच्या व्यवस्थेची यशस्विता अवलंबून आहे. मंडपाबाहेरील ' चौकशी दफ्तरात ' चौकशी करावी.

**कार्यक्रम**

**स्थळ : माता कचेरी (श्रद्धानंद पेठ) जवळील भव्य पटांगण**

कार्यक्रम–दिनांक १२ ऑक्टोबर १९५६ पासून १६ ऑक्टोबर १९५६ पर्यंत राहील. खुलासेवार कार्यक्रम वेगळे पत्रक काढून प्रसिद्ध केले जातील.

| | |
|---|---|
| अध्यक्ष–पंडित रेवाराम कवाडे | चिटणीस–श्री. वा. मो. गोडबोले, |
| उपाध्यक्ष–श्री. स. म. मेश्राम | सहचिटणीस–श्री. मा. डो. पंचभाई |
| उपाध्यक्ष–श्री. एच. डी. आवळे | सहचिटणीस–श्री. पंजाबराव शंभरकर |
| उपाध्यक्ष–श्री. मारोतराव साखरकर | सहचिटणीस–श्री. क. वि. उमरे |
| उपाध्यक्ष–श्री. एच. एल. कोसारे | सहचिटणीस–श्री. बा. ना. वैद्य |
| कोषाध्यक्ष–श्री. द. ल. पाटील. | सदस्य–श्री. डब्ल्यू. एस. कामळे |
| | सदस्य–डॉ. रामटेके इत्यादी २५ '' |

**'' नागपूर येथे होणाऱ्या डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या बौद्ध दीक्षा विधीस लाखोंनी हजर रहा**

**१४ ऑक्टोबरला आपापल्या वस्तीत सामुदायिक बुद्ध वंदना साजरी करा**

तारीख १४ ऑक्टोबर १९५६ रोजी दसरा सीमोल्लंघनाच्या दिवशी बौद्ध धर्माच्या पुनरुज्जीवनाचे एकमेव भारतीय प्रणेते डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे नागपूर येथे बौद्ध धर्म दीक्षा घेणार आहेत हे आता सुप्रसिद्ध झाले आहे. डॉ. बाबासाहेबांच्या भारतीय दलित वर्गाच्या एवढेच नव्हे तर अखिल भारत देशाच्या जीवनातील हा सर्वश्रेष्ठ व अभूतपूर्व असा समारंभ आहे. अर्थात या समारंभासाठी, सर्व दलित व इतर भारतीय बंधुभगिनींनी लाखोंच्या संख्येने हजर राहावे, अशी त्यांना आग्रहाची विनंती आहे.

नागपूर शहरी, या समारंभाबाबत प्रचंड प्रमाणावर तयारी चालू आहे. सर्व दलित कार्यकर्ते अक्षरशः तन-मन-धनाने या समारंभाच्या व्यवस्थेसाठी, प्रयत्नात गढून गेले आहेत आणि सुमारे पाच लाखांपेक्षा अधिक लोकसमुदाय हजर राहील असा अंदाज आहे.

भारतातील सर्व राज्यांमधून या समारंभास दलित बांधव हजर राहातील. गुरुत्वाकर्षणाच्या नियमाप्रमाणे, सर्व भारतातील दलित जनता नागपूर येथे जमा

होणार आहे. रेल्वे, मोटारी, बैलगाड्या यांची नुसती रीघ नागपूरच्या रस्त्याने लागून राहिली आहे. नागपूरला जमणाऱ्या प्रचंड गर्दीमुळे आपले साहित्य सुटसुटीत ठेवावे, त्याचप्रमाणे वेळप्रसंगी, मुक्कामाच्या सोयीसाठी, आपला छोटा बिछानाही सोबत घ्यावा.

ज्या दलित बांधवांना नागपूरला येण्याची इच्छा असूनही, काही अडचणीस्तव येता येत नसेल त्यांचे लक्ष, खाली प्रसिद्ध केलेल्या भारतीय बौद्ध महासभेच्या चिटणीसाच्या निवेदनाकडे आम्ही वेधू इच्छितो.

## जाहीर आदेश

बंधु आणि भगिनींनो,

आपले पूजनीय नेते डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे नागपूर मुक्कामी दिनांक १४-१०-५६ रोजी सिमोल्लंघनाच्या सुमुहूर्तावर बौद्धधर्माची दीक्षा घेत आहेत. नागपूरकरांनी ह्या कामी अविश्रांत मेहनत घेऊन लाखो रुपयांची झीज सोसली आहे. ह्या त्यांच्या दिव्य कार्याने मुंबईकरांना नवी चालना मिळाली असून महामुंबईत चार लाख सभासद नोंदणीचा विधायक कार्यक्रम त्यांनी हाती घेतला आहे. हा कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी वयात आलेल्या सर्व स्त्री-पुरुषांनी प्रत्येकी एक रुपया देऊन '' भारतीय बौद्ध महासभेचे '' सभासद व्हावयाचे आहे. इतरांबरोबर तुमच्याही खोलीतील वयात आलेल्या स्त्री-पुरुषास सभासद करून घेण्याची सर्व जबाबदारी तुमची आहे. आपल्या चाळीत स्थानिक शाखा स्थापन झाली आहे ; तिच्यामार्फतच आपण ही जबाबदारी पार पाडावी. '' भारतीय बौद्ध महासभेचा '' हा आदेश कृतीत उतरविण्यासाठी सर्वांनी सहकार्य करावे.

का. वि. सवादकर, वा. कृ. कबीर,
भ. स. गायकवाड. चिटणीस, भा. बौ. महासभा.

## दिनांक १४ ऑक्टोबर कसा पार पाडावा

भारतीय बौद्ध महासभेच्या सर्व केंद्राधिकाऱ्यांस, शाखा प्रमुखांस तसेच इतर स्थानिक कार्यकर्त्यांस जाहीर करण्यात येते की, आपले पूजनीय नेते डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे नागपूर मुक्कामी रविवार दिनांक १४-१०-५६ रोजी बौद्ध धर्म दीक्षा घेत आहेत. त्यांच्या धर्म स्वीकारासमयी शुभेच्छा प्रकट करण्यासाठी सर्व शाखांनी आपआपल्या वस्तीत सामुदायिक बुद्धवंदना घ्याव्यात, बुद्ध वंदना अति शांत वातावरणात पार पाडण्यात याव्यात. वंदनेत सर्व

स्त्री-पुरुषांनी भाग घ्यावा. वंदना सकाळी ९ ते ११ ह्या वेळात घेण्यात याव्यात, संध्याकाळी ४ वाजता सर्व केंद्राधिकाऱ्यांनी, शाखा प्रमुखांनी तसेच इतर स्थानिक कार्यकर्त्यांनी सिद्धार्थ कॉलेज, आनंदभवन येथे घेण्यात आलेल्या सभेस हजर राहावे.

आपले नम्र,

का. वि. सवादकर, वा. कृ. कबीर,
भ. स. गायकवाड. चिटणीस, भा. बौ. महासभा.

दिनांक १३-१०-५६ पर्यंत जमणारी सर्व वर्गणी दिनांक १५-१०-५६ रोजी संध्याकाळी ६ वाजता (बुद्ध भूषण छापखाना) भा. बौ. महासभेच्या कचेरीत भरणा करावी. इतर कार्यासाठी तिचा उपयोग करू नये.

निवेदनाप्रमाणे भारतातील ठिकठिकाणच्या दलित बांधवांच्या शुभेच्छा, डॉक्टर बाबासाहेब आंबेडकरांच्या बौद्ध दीक्षादिनी व्यक्त करण्यासाठी, सामुदायिक बुद्ध वंदना घ्याव्यात. या बुद्ध वंदनेत, सर्व आबाल वृद्धांना समाविष्ट करून घ्यावे, कोणीही गैरहजर राहू नये. सकाळी नऊ वाजण्याचे आत सर्वांनी स्नान करून व पांढरे कपडे परिधान करून ९ ते ११ अशी सामुदायिक बुद्ध वंदना करावी. संध्याकाळी आपल्या वस्तीत, सर्वांनी एकत्र जमून, सभा घेऊन, प्रसंगाचे महत्त्व व बौद्ध धर्माची आवश्यकता यावर विवेचन करावे. या सभा अत्यंत शांत, एकोप्याच्या व बंधुभावनेने पार पाडाव्यात. सदर सूचना, भारतीय बौद्ध महासभेच्या चिटणीसांच्या निवेदनाप्रमाणे, जिल्ह्या-जिल्ह्यातील दलित बांधवांकरिता प्रामुख्याने आहेत. त्या उत्कृष्टरित्या पार पाडल्या जातील अशी खात्री आहे.

नागपूर येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा बौद्ध दीक्षेचा विधी झाल्यावर मुंबई, पुणे वगैरे अन्य ठिकाणी इतर दलित बांधवांच्या सामुदायिक धर्मांतराच्यावेळी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे हजर राहू शकतील की काय याची माहिती पुढे प्रसिद्ध करण्यात येईल.

ज्या कोणा दलित बांधवांना नागपूर येथील डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या बौद्ध दीक्षेचा समारंभ पाहाण्याचे भाग्य लाभणार नाही, त्यांच्याकरिता ' प्रबुद्ध भारत ' मध्ये नागपूरची इत्थंभूत माहिती पुढील अंकी देण्यात येईल, छायाचित्रे देखील प्रसिद्ध करण्यात येतील. ' प्रबुद्ध भारत ' चा खास ''बौद्ध धर्म दीक्षा-अंक '' म्हणूनच प्रसिद्ध होईल. तरी वाचकांनी आपला पुढील अंक राखून ठेवावा.'' [१]

---

[१] प्रबुद्ध भारत : १३ ऑक्टोबर १९५६.

**' नवयुग ' मुंबईच्या वार्ताहराने या बौद्ध धम्मदीक्षेच्या सोहळयाकरिता हजर राहणाऱ्यांचे मुंबई ते नागपूर पर्यंतचे प्रवास वर्णन आणि नागपूर येथील सोहळयाचे वर्णन जे केले आहे ते येणेप्रमाणे–**

'' ज्यांच्या आजोबा पणजोबांना रस्त्यावर थुंकण्याची मनाई असल्यामुळे गळयात मडकी बांधून हिंडावे लागत होते, ज्यांच्या वाडवडिलांना रस्त्यावर ब्राह्मण येताना दिसला की त्याच्यावर आपली सावली पडू नये, म्हणून काट्याकुट्यात उड्या माराव्या लागत होत्या आणि आजतागायत ज्यांना खेडोपाडी मृत ढोरांची व्यवस्था करावी लागते, आजतागायत ज्यांना बिगारीसाठी वेठीवर धरले जाते, त्या पाच लाख अस्पृश्य बांधवांनी जीर्णशीर्ण हिंदू धर्माचा त्याग करून ता.१४ ऑक्टोबर १९५६ रोजी नागपूर येथे श्रद्धानंद पेठेत खास उभारलेल्या मंडपात बुद्ध धर्माची दीक्षा घेतली.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे आपल्या लक्षावधी अनुयायांसह ता. १४ ऑक्टोबर १९५६ रोजी नागपूर मुक्कामी बुद्ध धर्माचा स्वीकार करणार ही वार्ता सर्व महाराष्ट्रात जाहीर झाल्याबरोबर सर्व अस्पृश्य समाजात एकच खळबळ उडाली होती. वास्तविक पाहाता डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या घोषणेत नवीन असे काहीच नव्हते. १९३५ साली सर्व अस्पृश्य बांधवांनी धर्मांतर करावे असा ठराव डॉक्टरसाहेबांच्या नेतृत्वाखाली असलेल्या संघटनेने पास केला होता. तेव्हापासून हा विचार डॉक्टरसाहेब हे भारतातील केवळ एक विद्वान गृहस्थ नाहीत, तर अमानुषपणे हजारो वर्षे वर्णाश्रम धर्माने माणुसकी नष्ट करून टाकलेल्या कोट्यावधी दलित जनतेचे जबाबदार पुढारी आहेत. या दलित समाजाबद्दलची त्यांची आत्मीयता ही भाडोत्री नाही. या दलित समाजाबद्दल त्यांना वाटणारे प्रेम आणि कळकळ ही '' अस्पृश्य समाजाचा उद्धार केला पाहिजे '' या रजोगुणी अहंकारातून निर्माण झालेली नाही. अस्पृश्य समाजाच्या उद्धाराचे कार्य डॉक्टरसाहेबांनी उंटावरून शेळया हाकण्यासारखे केलेले नाही. स्वतः त्या समाजातीलच असल्यामुळे त्यांना चातुर्वर्ण्यावर आधारलेल्या हिंदू धर्मात '' अस्पृश्य '' समाजातील मानवी प्राणी उत्क्रांतीचे सारे नियम गुंडाळून पशु कसा बनतो हे अगदी जवळून पाहावयास मिळाले होते. अस्पृश्य समजला गेलेला मानवी प्राणी पृथ्वीवर कोठल्याही देशात सापडणार नाही. दगडधोंड्यात सुद्धा '' ब्रह्माचा '' साक्षात्कार मिळणाऱ्या या भारतातच तो हजारो वर्षापासून आढळून येतो. हिंदू धर्माच्या '' उच्च, उदात्त, विशाल '' अशा तत्त्वज्ञानाचा अनुभव व्यक्तिशः डॉक्टरसाहेबांना अगर त्यांच्या हजारो अस्पृश्य बांधवांना क्वचितच मिळाला असेल. वास्तव जीवनात अस्पृश्य बांधवांना न्याय, दया, करूणेचा अनुभव क्वचितच येतो, आणि '' समता '' अनुभवण्यासाठी, तर प्रत्यक्ष शारीरिक मृत्युलाच

कवटाळावे लागते. '' आत्मिक समता '' यामुळे साध्य होते असा सनातन्यांचा दावा आहे. बिचाऱ्या अस्पृश्य बांधवाच्या देहाला जिवंतपणी तर सामाजिक समतेचा अनुभव कधी येत नाहीच, पण मेल्यावरही त्याचे प्रेत स्पृश्य हिंदुंच्या स्मशानभूमीत परवा परवापर्यंत जाळले जाणेही अशक्य होते.

या हिंदू धर्मातून बाहेर पडण्याचा निर्णय डॉ. आंबेडकरांनी १९३५ साली घेतला. यात अस्पृश्यांना आश्चर्य ते कसले वाटणार ? त्यांना आश्चर्य याचेच वाटते की, त्यापूर्वीच हा निर्णय का घेतला नाही ? आणि १९५६ पर्यंत निर्णय घेऊन सुद्धा डॉक्टर का थांबले ? स्वतःच्या कोट्यावधी अनुयायांची गंभीर जबाबदारी आणि या अनुयायांच्या सामाजिक, आर्थिक, राजकीय प्रश्नांमधील गुंतागुंत यामुळेच डॉक्टरसाहेबांना हा विलंब लागला असावा असे वाटते.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या या निर्णयाबद्दल त्यांच्याबरोबर मतभेद असू शकेल, पण त्यांच्या विलंबाचा आधार घेऊन त्यांच्या हेतुचा विपर्यास करणे हा तर शुद्ध अधमपणा होता. डॉक्टरसाहेबांच्या या उपक्रमाला '' राजकीय स्टंट '' म्हणून संबोधण्यासही काही विद्वान लोकांनी कमी केले नाही, १४ ऑक्टोबरला नागपूर मुक्कामी या तथाकथित '' स्टंटचे '' प्रात्यक्षिक ज्यांनी ज्यांनी पाहिले असेल त्यांना त्यांना या कुत्सित टीकेची चीड येणे स्वाभाविकच होते आणि तिचा फोलपणा तर मैदानावर जमलेल्या सुमारे पाच लाख लोकांनी बुद्ध धर्माची दीक्षा घेऊनच सिद्ध केला. सनातन वर्णाश्रम धर्मावर इतका जबरदस्त प्रहार भगवान बुद्धानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनीच केला या विधानाला प्रत्यक्ष इतिहासाचीच ग्वाही मिळू शकते आणि म्हणूनच बाबासाहेबांच्या लक्षावधी अनुयायांच्या तोंडून आज एकच घोषणा निघत आहे ;

बाबासाहेब करे पुकार।
बुद्धधर्मका करो स्वीकार।

अस्पृश्य समाजाच्या आणि सवर्ण हिंदू समाजाच्या दृष्टीने सुद्धा ही युगप्रवर्तक सामाजिक घटना प्रत्यक्ष घडत असताना तिथे हजर राहाण्याची संधी मला मिळाली याबद्दल मी स्वतःला धन्य समजतो.

नागपूरला एक दिवस अगोदर पोहोचणे बरे असा सूज्ञ विचार करून मी १२ तारखेला रात्रीच नागपूर एक्सप्रेसने निघालो. टिकिट काढले आणि बोरीबंदर स्टेशनवरच खडूने लिहिलेला एक मोठा बोर्ड मी पाहिला. '' नागपूरला

जाण्यासाठी स्पेशल ट्रेन रात्री सव्वा नऊला सुटणार आहे '' असे या बोर्डावर लिहिले होते. स्टेशनवर

''आकाश पाताळ एक करो।
बुद्ध धर्मका स्वीकार करो।''
''परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर की जय,''
'' भगवान गौतम बुद्ध की जय.''

या घोषणा हजारो मुखातून होत होत्या. स्त्रिया, मुले, म्हातारे, तरूण एकच धावपळ करताना दिसत होते. अस्पृश्य समाजातील सुशिक्षित मंडळी प्रोफेसर, डॉक्टर, वकील हे आपापसात जोराजोराने '' बौद्धिक पातळीवर '' चर्चा करीत होते. अस्पृश्य समाजातील शेकडो रेल्वे कामगार, गिरणी कामगार, म्युनिसीपालिटीमधील कामगार उत्साहाने घोषणा देत होते. या वेळचे एक दृश्य मी कधीही विसरणार नाही. वयाने बहुतेक साठी उलटलेली, पण अंगापिंडाने मजबूत, पदर कमरेत खोचलेला, हातावर कोपरापर्यंत गोंदविलेले अशी एक बाई एका तरूण मुलीला हात धरून नागपूर एक्स्प्रेसच्या डब्यांकडे खेचून घेऊन जात होती. जाता जाता घोषणाही देत होती. हसत होती. जास्त चौकशी करता ही बाई वडाळयाला राहात होती असे समजले. ती, तिची सून, तिचा मुलगा सगळे कुटुंबच्या कुटुंबच नागपूरला बुद्ध होण्यासाठी निघाले होते. स्पेशल ट्रेनने या म्हणून तिची विनवणी अनेक कार्यकर्त्यांनी केली, समता सैनिक दलाच्या लोकांनीही तिला विनंती केली, पण म्हातारीने- म्हातारी कसली ती ? ते साफ नाकारले आणि '' मला पण तुमच्या दलात घ्या. '' अशी उलट तिने स्वयंसेवकांना विनंती केली. शेवटी म्हातारी डब्यात चढलीच आणि दारात उभे राहून घोषणा देऊ लागली.

स्टेशनवर आलेल्या इतर मंडळीकडेही मी कुतूहलाने पाहात होतो, आणि ते काय बोलतात ते लक्षपूर्वक ऐकत होतो. एका सुशिक्षित ब्राह्मणाची मुलगी आपल्या नोकरीवर चाललेल्या नवऱ्याला निरोप देत होती. या घोषणांनी बिचारी हैराण झालेली दिसली. काही कॉलेज विद्यार्थी आपसात '' हे काय बुवा आज नवेच '' अशा भावनेने मिस्कील चेहरा करून पाहात होते. '' अरे, डॉ. आंबेडकर बुद्ध होताहेत '' असे त्यांच्यापैकी कोणीतरी सांगितले. फर्स्ट क्लासच्या डब्याजवळ कोणीतरी सन्माननीय काँग्रेस पुढारी उभे होते आणि त्रासिक मुद्रा करून घोषणा ऐकत होते. त्यांच्याजवळ घोळका करून त्यांचे काही चाहते उभे होते, त्यांना या महाशयांनी सुनावले '' अरे बुद्ध व्हा नाहीतर आणखी काही व्हा. निवडणुकीची वेळ मात्र डॉ. आंबेडकरांनी बरोबर शोधून काढली अं !''

एका डब्यात शे. का. फे. चे मुंबई, महाराष्ट्रातील प्रमुख पुढारी आणि कार्यकर्ते बसले होते. त्यांची चर्चा ऐन रंगात आली होती. मुंबईचे आमदार बी. सी. कांबळे व के. आर. पवार, वकील, पुण्याचे श्री. शंकरराव खरात, वकील, सिद्धार्थ कॉलेजमधील प्रो. करडक, अहमदनगरचे श्री. डी. टी. रूपवते, वकील ही मंडळी साधारणपणे माझ्या परिचयाची होती. पण त्यांच्या चर्चेमध्ये अडथळे यावयास नको म्हणून मी पलिकडच्या डब्यात जाऊन बसलो. गाडीत झोप कुठली ? प्रत्येक स्टेशनवर लोक येत होते. घोषणा चालू होत्या. कार्यकर्ते एकमेकांना मिठ्या मारीत होते. हसत होते. त्यांच्या उत्साहाला सीमा नव्हती. मनमाड स्टेशनवर तर इतकी गर्दी होती की, माणसाला उभे राहाण्याससुद्धा प्लॉटफार्मवर जागा नव्हती. गाडीतही जागा नव्हती. मागच्या स्पेशल ट्रेनने या, अशी कार्यकर्ते येणाऱ्यांची समजूत काढण्याचा प्रयत्न करीत होते. काही ऐकत होते, काही न ऐकताच डब्यात घुसत होते. घोषणा चालू होत्याच.

तेरा तारखेला दुपारी सव्वातीन वाजता नागपूर मुक्कामी गाडी पोहोचली. स्टेशनवर शंभर तरी स्वयंसेवक असतील. महाराष्ट्र शे. का. फे. चे अध्यक्ष श्री. दादासाहेब गायकवाड स्वत: स्टेशनवर हजर होते. स्वयंसेवक सर्वांची व्यवस्था पद्धतशीरपणे लावीत होते. स्टेशनबाहेर पडण्यास मला जवळ जवळ वीस मिनिटे लागली !

स्टेशनबाहेर रस्त्यावर, हातात पिशव्या घेतलेल्या, अंगात एक मळका सदरा, एखादी सुरकतलेली टोपी अशी हजारो माणसे दिसली. चौकशी करता समजले की आजुबाजूच्या खेड्यापाड्यातून हे हजारो लोक नागपुरी भाषेत बोलायचे म्हणजे " येऊन राहिलेत. " " त्यांची उतरण्याची सोय कुठे केली आहे ? " मी स्वयंसेवकाला विचारले. " गावातल्या बहुतेक सगळया प्राथमिक शाळांच्या इमारतींमधून यांची सोय केली आहे, पण ती अपुरी पडणार असा रंग दिसतो. "

" किती लोक समारंभासाठी येतील असे तुम्हाला वाटते ? "

" अबब, त्ये कोन सांगणार ? दोन चार लाख तर सहज येतील. "

मुंबईहून आलेल्या स्वयंसेवकात उत्कृष्ट शिस्त दिसली आणि अशा समारंभाचा त्यांना चांगला अनुभवही दिसला. स्टेशन बाहेर आल्याबरोबर त्यांचा शिस्तीत " मार्च " सुरू झाला. मधून मधून ते घोषणा देत होते. मी टॅक्सी ठरवली आणि हॉटेलमध्ये सामान टाकले. आंघोळ केली आणि वार्ताहराचे पॅड हातात घेऊन बाहेर पडलो.

नागपूर शहराला एक नवीनच स्वरूप आलेले दिसले. जिकडे तिकडे माणसेच ! झुंडीच्या झुंडी चालल्या होत्या. चातुर्वर्ण्याच्या बाहेरील

जनताजनार्दनाचे हे '' परब्रह्मी '' विशाल स्वरूप मी जन्मात कधी विसरणार नाही. आपल्या असामान्य नेत्याच्या हाकेला ओ देऊन हे लोक नागपूरला जमा होत होते. आपल्या नेत्याची आज्ञा वंदनीय मानून त्याच्या पाठोपाठ बुद्ध धर्माची दीक्षा घेण्याचा निश्चय त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्टपणे दिसत होता. ते गंभीर होते पण आनंदी होते. भारताच्या चारी कोनातून लाखो अस्पृश्यांनी नागपुरात गर्दी केली आहे. रेल्वे, मोटारी, रिक्षा, बैलगाड्या आदी वाहनांचा उपयोग दूर दूरहून येणारे करीत होते. वाहनांच्या धंदेवाल्यांचे उखळ पांढरे होत होते, पण यापेक्षाही जेव्हा मला हजारो अस्पृश्य बांधव पुण्यापासून पंढरीच्या यात्रेला पायी जावे त्याप्रमाणे नागपूरला येत आहेत असे दिसले, तेव्हा तर माझ्या आश्चर्याला सीमा राहिली नाही. ७५ /१०० मैलांवरूनही हे लोक नागपूरला येत होते, वाटखर्चाच्या पैशाची सोय स्वत:जवळचे किडुक मिडुक विकून त्यांनी केली होती. कित्येक लोकांना गावच्या लोकांनी वर्गणी जमा करून पाठविले होते. त्यांच्या उत्साहाला सीमा नव्हती. त्यांच्या '' जय भीम '' च्या आणि इतर घोषणांना खंड नव्हता. एका काळी बौद्ध महापंडित नागार्जुन यांच्या वास्तव्याने पुनीत झालेले हे नागपूर शहर आज तमाम अस्पृश्य समाजाचे धर्मक्षेत्र झालेले दिसले.

नागपूर शहरामध्ये वाहनांची अतिशय गैरसोय आहे. मुंबईसारख्या मीटर असलेल्या टॅक्सी नाहीत आणि पुण्यासारख्या ऑटोरिक्षा नाहीत. टॅक्सी तासावर ठरवावयाची आणि किमान साडेतीन रुपये तास भाडे द्यावयाचे. टॅक्सी ड्रायव्हर ताबडतोब वर्दळीवर येणारे ; बरे सायकल रिक्षा करावी तर ते पुण्या-मुंबईकडील माणसाला कसेसेच वाटते आणि गावातील वातावरण बुद्धमय. बुद्धाच्या जयजयकाराच्या घोषणा आजुबाजूला होत असताना, एक माणूस दुसऱ्या माणसाला धापा टाकीत ओढून नेतो आहे हे दृश्यच एकंदर वातावरणाशी विसंगत वाटते. मी शेवटी एक टॅक्सी ठरविली आणि सर्व दीक्षार्थी निवासांना भेट देण्याचे ठरविले. या सर्वांची सोय प्राथमिक शाळांमधून केली होती. प्रत्येक ठिकाणी स्वयंसेवक होते आणि ते पाणी देणे वगैरे कामे त्वरेने करीत होते. बरेचसे लोक हॉटेलात जावून काही तरी खात होते, पण अनेक ठिकाणी तीन दगडाच्या चुली मांडून त्यावर कित्येक बाया भाकऱ्या भाजीत असलेल्या दिसल्या. ठिकठिकाणी लोक दहा-दहा, पाच-पाच असे बसून चर्चा करीत होते. लेनिनने कोठे तरी म्हटले आहे की, जी गोष्ट शिकण्यास एरवी वर्षानुवर्षे लागतात, तीच गोष्ट क्रांतीच्या काळात जनता काही दिवसातच शिकते. या दोन दिवसात नागपूरला जमलेल्या लाखो लोकांनी तत्त्वज्ञानाचे, धर्माचे, सामाजिक परिस्थितीचे जितके ज्ञान मिळविले तितके त्यांना आतापर्यंत कधीच मिळालेले नाही, असे म्हटल्यास बिलकूल अतिशयोक्ती होणार नाही.

## अखंड चर्चा

या सर्व निवासस्थानांमध्ये अखंड चर्चा चालू होती. कामगार-शेतकरी या वर्गातीलच बहुतेक लोक दिसत होते आणि चर्चा चालली होती तरी किती प्रकारे ? काही ठिकाणी गंभीरपणे, आता आपल्या गावातील मंडळी आणि '' बामण '' काय म्हणतील याची चर्चा चाललेली दिसली. काही ठिकाणी कोणातरी वृद्ध माणसाच्या '' पंढरीला '' जाण्याची थट्टा तरूण मंडळी करीत होती. काही ठिकाणी आपल्या गावातील भूतखेत आता पळून जातील अशी ग्वाही तरूण मंडळी बरोबर आलेल्या वृद्ध मंडळींना देत होती. एके ठिकाणी तर एक तरूण खेडूत आपल्या आईला '' आता कसं तुझ्या अंगात येतंय ते बघतो '' असे हसून सांगत होता, त्याची तरूण बहीण त्याला साथ देत होती आणि हसत होती. त्याची म्हातारी आईही त्याला हसून यापुढे आता माझ्या अंगात येणार नाही असे आश्वासन देत होती. एका १५ /२० लोकांच्या घोळक्यात स्वयंसेवकांच्या मदतीने मी घुसलो आणि त्यांच्या गप्पात सामील झालो. एक कट्टर आंबेडकरवादी तरूण गोष्ट सांगत होता ती जशीच्या तशी या ठिकाणी देण्याचा मोह मला आवरत नाही. '' आमच्या गावात महारवाड्याच्या एका टोकाला आहे म्हसोबा आणि दुसऱ्या टोकाला आहे मरीआई. आम्ही एकदा काय केलं, रात्री उठून मरीआईला म्हसोबाच्या जवळ टाकून द्यावयाची असे ठरविले. अर्थात गावातले हे (त्याने काही वृद्ध स्त्री-पुरूषांकडे बोट दाखविले) आमच्या फार विरूद्ध होते पण आम्हाला तर टिंगल करायची होती, म्हणून आम्ही असं उठविलं की, मरीआई म्हसोबाकडे चालत जात होती असे आम्ही पाहिले ! तिचे वर्णन केले, मळवट वगैरे तिने कसा भरला होता तेही सांगितले आणि महारवाड्यात, त्याचा परिणामही झाला. त्या दिवशी मरीआईचे तीन-चार दगड आम्ही रात्री उचलले आणि थोडे फार चालून गेलो नाही तोच कोणाची तरी चाहूल लागली, आम्ही मरीआईच्या दगडाला तिथेच टाकले आणि पळालो, दुसऱ्या दिवशी महारवाड्यात एकच कल्लोळ उडाला. पंचाक्षरी आला आणि मंत्र बडबडायला लागला, इतक्यात आमच्यापैकी एकाच्या डोक्यात अक्कल आली आणि तो म्हणाला, अरे, मरीआई फक्त रात्री चालते, तिला निघायला उशीर झाला आणि थोडी चालली नाही तोच पहाट झाली. त्याबरोबर ती आहे तिथेच पुन्हा दगड होऊन पडली, अहिल्येसारखी. '' गोष्ट संपली आणि सारे खो-खो हसत सुटले, आणि त्यात ते वृद्ध स्त्री-पुरूष सामील झालेले दिसले. शेवटी तो म्हातारा म्हणाला, '' आता गावी गेल्याबरोबर ती मरीआई आणि तो म्हसोबा, दोघांनाबी नदीत फेकून देऊ. आता बाबांची आज्ञाच अशी आहे. बाबा सांगतो तर आपल्याला मरीआईची बी जरूरी काय ? आणि म्हसोबाची बी जरूरी काय ? ''

'' रेनायझन्स '' मला प्रत्यक्षात पाहावयास मिळत होता. मनुष्याने सत्कर्मरत व्हावे येवढेच, देवाची त्याला काहीही जरूरी नाही. देव नाही. सबझूट ! या निर्णयाला लाखो लोकांनी ; या सर्व तऱ्हेचे लोकभ्रम हाडीमाशी खिळलेल्या भारतात येणे म्हणजे काय साधी गोष्ट आहे ? जादूची कांडी फिरवल्याप्रमाणे डॉ. आंबेडकरांनी ती गोष्ट साध्य केलेली मला प्रत्यक्षात दिसली.

यानंतर मी मंडपाच्या व्यवस्थेची माहिती तेथे जाऊन मिळविली. नागपूर येथे दक्षिण अंबाझरी रस्त्यावर अंधविद्यालयापलिकडच्या प्रशस्त पटांगणात बुद्धकालीन शिल्पानुसार भव्य स्तूप उभारण्यात आला होता. सुमारे ४/५ लाख लोक बसू शकतील एवढा खुला मंडप होता.

या मंडपासमोर सडकेच्या डाव्या बाजूला दुकानांची ओळ लागलेली होती. एरवी निर्जन असलेल्या या पटांगणाला प्रचंड यात्रेचे स्वरूप आलेले दिसले. मंडपाचे काम गेले आठ दहा दिवस चालले होते. शेकडो अस्पृश्य बांधव त्या ठिकाणी श्रमदान करत होते. सुमारे ५० ते ७५ हजार रुपये या श्रमदानाने वाचविले आहेत. आता फक्त २५/३० हजार रुपये रोख दीक्षा समारंभाला लागतील असे कार्यवाह यांच्याकडून समजले. एकूण जवळ-जवळ १ लक्ष रुपये या दीक्षा समारंभाला खर्च होतील असा अंदाज आहे. ज्या स्तूपासमान व्यासपीठावरून बाबासाहेबांचा दीक्षा समारंभ झाला त्या ठिकाणी एक कायमचे स्मारक होणार असेही समजले.

## नवे धर्मक्षेत्र

नागपूर हे अस्पृश्य समाजाचे नवे धर्मक्षेत्र बनणार हे आता स्पष्ट दिसते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या राजकीय आणि सामाजिक जीवनाशी नागपूर हे प्रथमपासूनच निगडीत आहे. १९३० साली नागपूर जवळ कामठी येथेच डॉक्टरसाहेबांनी संयुक्त मतदार संघाला विरोध करून विभक्त मतदार संघाची मागणी केली. पहिले शे. का. फे. चे अधिवेशन नागपूरलाच झाले आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे नागपूरलाच बुद्ध धर्माची दीक्षा घेत आहेत. ' नागपूर ' जवळच रामटेकच्या टेकडीत बौद्ध महापंडित नागार्जुनची गुहा आहे. पूर्वी हे शहर बौद्धांचे तिर्थक्षेत्र होतेच. आता परत नव्याने या शहराला तेच महत्त्व प्राप्त होणार हे उघड आहे. या मंडपाच्या ठिकाणीच मला समजले की डॉक्टरसाहेब आणि त्यांच्या सुविद्य पत्नी सौ. डॉ.माईसाहेब आंबेडकर हे तेथे आलेले असून त्यांचा मुक्काम बर्डीवरील शाम हॉटेलमध्ये आहे. डॉ. साहेबांना दीक्षा देण्यासाठी काशिया (प्राचीन इतिहासात कुशीनारा या नावाने ओळखल्या जाणाऱ्या) गावाहून सुप्रसिद्ध ब्रह्मी बौद्ध भिक्षु चंद्रमणी महास्थविर हे आज नागपूरास आले आहेत, त्यांच्याबरोबर आणखीही पाचसहा बौद्ध भिक्षु आलेले आहेत.

पहाटे ३ च्या सुमारासच घोषणा ऐकून मी जागा झालो आणि खिडकीपाशी जाऊन पाहू लागलो. रस्त्यावरून मुंग्यांसारखी माणसे चालली होती. वातावरण शांत होते, घोषणा गंभीर होत्या. लोक भराभर मंडपात जागा अगोदर पटकावण्यासाठी जात होते. सकाळी सहा वाजता मीही या जनसमुदायात सामील झालो आणि मंडपाकडे निघालो. बहुतेक स्त्री-पुरूषांनी पांढरी शुभ्र वस्त्रे परिधान केलेली होती. तशा तऱ्हेची सूचना सर्वांनाच देण्यात आली होती.

मी मंडपात प्रवेश केला. मुंबई समता सैनिक दलाने व्यवस्था उत्कृष्ट ठेवली होती. कोठेही गडबड नव्हती, गोंधळ नव्हता. श्रद्धायुक्त अंतःकरणाने लोक शांतपणे मंडपात प्रवेश करून स्वयंसेवकाने दाखविलेल्या जागी बसत होते. सकाळी सात वाजताच निम्मा मंडप भरलेला दिसला. दोन अडीच लाख लोक तरी असावेत. वार्ताहरांपैकी अद्याप कोणीही आलेले नव्हते. वार्ताहरांसाठी स्टेज जवळच व्यवस्था केली होती. लाऊडस्पीकरची व्यवस्था उत्कृष्ट होती. लाऊडस्पीकरवरून नेहमीप्रमाणे मुलगी हरवली, मुलगा हरवला, अशा सूचना होत होत्या. समाज सारखा वाढत होता.

याच वेळी लाऊडस्पीकरवरून एक महत्त्वाची घोषणा झाली. '' दीक्षार्थींना प्रवेशपत्रिका देण्यात आल्या, पण दीक्षार्थींची संख्या इतकी वाढली की प्रवेशपत्रिका संपल्या. तेव्हा कोणीही मला दीक्षा घ्यावयाची असे सांगितले की, त्याला आत सोडा आणि दीक्षार्थी मंडपात नेऊन बसवा '' अशी लाऊडस्पीकरवरून घोषणा करावी लागली. समाज वाढतच होता, जनतेच्या अफाट उत्साहामुळे पूर्वनियोजित कित्येक व्यवस्था कोलमडून पडत होत्या. पण त्या उत्साहामुळेच सर्व काही व्यवस्थितपणे पार पडत होते.

### मानवी प्रेमभावना

मी स्तूपाच्या आकाराच्या विशाल व्यासपीठाकडे नजर टाकली. भगवान बुद्धाची धीरगंभीर प्रतिमा सर्व मानव जातीला आपला आशिर्वाद देत होती. डॉ. बाबासाहेबांची प्रतिमा लाखो लोकांना उत्साह आणि आश्वासन देत होती. बुद्ध धर्माचा झेंडा शांतपणे वाऱ्यावर फडफडत होता. व्यासपीठावरही भगवान बुद्धाची एक प्रतिमा होती. तिच्यापुढे उदबत्त्या जळत होत्या. त्यांचा मंद चंदनी सुवास वातावरणात एक प्रकारे गंभीरता निर्माण करीत होता. माणूस माणसाच्या जास्त जास्त जवळ येत होता. सर्वांच्या अंतःकरणात एकच मानवी प्रेमाची भावना उफाळत होती. मित्र एकमेकांना भेटत होते. एकमेकांचे सुहास्य मुद्रेने स्वागत करीत होते. राग, द्वेष, असूया मंडपातून हद्दपार झाले होते. लाऊडस्पीकरवरून घोषणा होत होती, ' भगवान गौतम बुद्ध की जय. '

सकाळचे नऊ वाजले, जमाव वाढतच होता. मैदान जवळ जवळ पूर्ण भरलेले दिसले. वृत्तपत्र वार्ताहर अंदाज करू लागले. बहुतेक सर्वांच्या मते सुमारे पाच लाख लोक तरी जमले असावेत. परत शिट्ट्या वाजल्या. आणि एकच खळबळ उडाली. लाऊडस्पीकरवरून लोकांना शांत राहाण्याचे आदेश एकसारखे देण्यात येत होते. तीनचार मोटारी व्यासपीठाकडे येत होत्या. लाऊडस्पीकरचे आदेश मानण्याच्या मनःस्थितीत लोक नव्हते. '' परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकरकी जय '' ही एकच घोषणा लक्षावधी मुखामधून होत होती. बरोबर सव्वा नऊ वाजले होते आणि मोटारमधून उतरून दोन माणसांच्या खांद्यावर हात टाकून डॉ. बाबासाहेब हळूहळू स्टेजवर जात होते. '' पुरःस्सर गदासवे झगडता तनू भागली '' याचे हे मूर्तिमंत दृश्य होते. लक्षावधी लोकांच्या डोक्यात एकच विचार घोळत होता. डॉक्टरसाहेबांनी स्वतःचे शरीर अक्षरशः तिळ तिळ झिजवून अस्पृश्य समाजाला काही तरी बरे दिवस दाखविले. डॉक्टरसाहेबांच्या शत्रुंना देखील हे मान्य करावे लागेल. या वेळपावेतो डॉक्टरसाहेब आणि त्यांच्या पत्नी व्यासपीठावर चढून बसल्या होत्या. घोषणांचा पहिला पूर ओसरला होता. वातावरण परत शांत होत होते आणि मुख्य समारंभाला लवकरच सुरूवात होणार होती. डॉ. आंबेडकर यांनी शुभ्र रेशमी धोतर परिधान केले होते. त्यांच्या अंगावर तशीच शुभ्र शाल होती. त्यांच्या धर्मपत्नीनेही पांढरेशुभ्र वस्त्र धारण केले होते. व्यासपीठावर शेडयूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे बहुतेक पुढारी प्रामुख्याने दिसत होते.''[१]

(धर्मांतराच्या ऐतिहासिक घटनेचा वेध घेणारा बी. सी. कांबळे यांचा लेख प्रबुध्द भारताच्या दि. २७-१०-१९५६ च्या अंकात प्रकाशित झाला होता. तो इथे देणे अप्रस्तुत होणार नाहीं. ––संपादक)

ते लिहितात–

### '' तारीख २३ सप्टेंबर १९५६ चे ऐतिहासिक निवेदन

या बौद्ध दीक्षा विधी समारंभाच्या माहितीची सुरवात तारीख २३-९-१९५६ पासून करावी लागेल. या तारखेस डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी दिल्लीतील २६, अलिपूर रोडच्या आपल्या निवासस्थानातून एक निवेदन जाहीर केले.* ते निवेदन बिलकूल छोटे होते. जेमतेम ४-५ ओळींचा मजकूर त्यामध्ये

---

[१] नवयुग : मुंबई, रविवार २१ ऑक्टोबर १९५६.

* प्रस्तुत निवेदन पृष्ठ क्रमांक ४८२ वर आहे.

होता. भारतामध्ये बौद्ध धर्माचे पुनरूज्जीवन करण्यासाठी प्रत्यक्ष बौद्ध धर्म स्वीकाराचा जो इतिहास लिहिला जाईल, त्यामध्ये इतिहासकारांना या निवेदनास खास महत्त्व द्यावे लागेल एवढेच नव्हे तर भारतीय भूमीत बौद्ध धर्माच्या पुनःश्च बीजारोपणाचे त्यामुळे भारतभर व्हावयाच्या प्रचंड प्रसाराचे मूलांकूर या निवेदनामध्ये सापडतील.

हे निवेदन वृत्तपत्रात प्रसिद्ध झाले होते. दैनिक बातम्या देणाऱ्या भारतीय वृत्तपत्रांनी, हे त्रोटक निवेदन, त्यांच्या सोईप्रमाणे, एका कॉलममध्ये तसेच दिले. जणू अनेक बातम्यांपैकी, ही नित्यापैकी एक बातमी असावी त्याप्रमाणे वृत्तपत्रांनी त्या निवेदनाची सामान्य दखल घेतल्याप्रमाणे वर्तन केले व त्या बातमीवरून डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे बौद्ध धर्म स्वीकारणार ही माहिती अखिल भारतीयांना कळली.

## धर्म पुरुषांची प्रथम वाणी

तथापि, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या या त्रोटक निवेदनामध्ये किती विलक्षण सामर्थ्य आहे व ते भारतीय समाजरचनेचा विचार करता, किती असामान्य प्रतीचे आहे, याची कल्पना भारतीय वृत्तपत्रांना जवळजवळ आलीच नाही, असे म्हणावे लागते. या निवेदनातील वृत्त नेहमीच्या वृत्तांप्रमाणे नव्हते. रोजची वृत्तपत्रात येणारी बातमी व सदर निवेदन यामध्ये सर्वदृष्टींनी महान फरक होता. ज्या ज्या धर्मसंस्थापकांनी, अगर त्या त्या धर्माचे पुनरुज्जीवन करणाऱ्या महापुरुषांनी, धर्म स्थापनेसाठी अथवा त्या धर्मावरील ग्लानी दूर करण्यासाठी आपली प्रथम वाणी उच्चारली त्याप्रमाणे त्या प्रथम वाणीची बातमी पोहोचविणारे हे निवेदन होते.

## बौद्ध दीक्षेचा निश्चय करण्यापूर्वी

सदर निवेदनावर सही करण्यापूर्वी त्याचप्रमाणे बौद्ध दीक्षेचा विधी, ठिकाण व तारीख ठरविण्यापूर्वी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी किती तासन्तास विचार केला असेल याची कल्पना कोणासही येणार नाही. हा निर्णय घेण्यापूर्वी, त्यांच्या नजरेपुढे या घटनेचे संभाव्य असे कोणकोणते परिणाम भारतातील दलित जनतेवर, भारतीयांवर व जगातील इतर जनांवर होतील, यांचे चित्र खचित उभे झाले असेल. निरनिराळ्या धर्माच्या इतिहासाची पाने त्यांच्या मनःचक्षू समोरून भराभर गेली असतील. ख्रिश्चन धर्म, मुसलमानी धर्म, बौद्ध धर्म आदी प्रमुख धर्म जगात का व कसे उदय पावले, त्यांचा प्रसार कसा झाला व त्यापैकी काहींचा अस्त का झाला याचे त्यांनी पुनः पुनः मनन केले असेल. भारतीय दलितांना

व विशेषतः मानीव अस्पृश्य समाजास बौद्ध धर्माच्या आश्रयाशिवाय दुसरा काही परिणामकारक मुक्ततेचा मार्ग आहे काय याचाही पुनः पुनः त्यांनी पडताळा घेतला असेल व शेवटी त्यांची सर्व सद्सदविवेकबुद्धि केंद्रित होऊन परम निश्चयाने एकमेव सन्मार्ग म्हणून बौद्ध दीक्षा घेण्याचे जाहीर करणाऱ्या निवेदनावर सही केली असेल. मनोविश्लेषणाच्या दृष्टीने विचार केला तर ता. २३ सप्टेंबर १९५६ चा दिवस डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या जीवनातील अभूतपूर्व, हर्षयुक्त व निश्चयाच्या कसोटीला आपण उतरलो याचे अत्यंत उत्कट असे दर्शन घडविणारा ठरला आहे.

## बौद्ध जगतावरील परिणाम

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या बौद्ध दीक्षा घेण्याच्या निवेदनाचा चित्तवेधक परिणाम निदान भारतीय दलित वर्गात व जागतिक बौद्ध जनात झाला यात शंकाच नाही. बौद्ध जनांनी ब्रह्मदेश, सिलोन, जपान, नेपाल आदी देशांमधून या निवेदनाचे अत्यंत हर्षाने स्वागत केले. बौद्ध-दीक्षा-विधीसंबंधी, अखिल बौद्ध जगतातील जे संदेश आलेले आहेत त्यावरून ती गोष्ट बिलकूल स्पष्ट होते. या संदेशांशिवाय बौद्ध जनांनी सदर दीक्षा विधीबाबत जो बंधुभाव व्यक्त केला तो कृतीत दिसून आला. ब्रह्मदेशाचे पूज्य भिख्खु चंद्रमणी महास्थवीर हे ८० वर्षाचे ! भारतातील सर्वात वृद्ध भिख्खु ! परंतु त्यांनी आपल्या प्रकृतिमानाकडे न पहाता डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना बौद्ध दीक्षा देण्यासाठी स्वतः येण्याचे मान्य केले व ते आलेही. त्यांच्या हस्तेच डॉ. बाबासाहेब आंबेडकर व सौ. माईसाहेब आंबेडकर यांचा बौद्ध-दीक्षा-विधी पार पडला, याशिवाय, खालील बौद्ध भिख्खु सदर समारंभास होते.

(१) थेरो पन्नातिस, सांची विहार (भोपाळ)

(२) व्हेनरबल भिख्खु, एच. सिद्धतिस, सिलोन

(३) व्हेनरबल, एम. सौघरत्तना, सारनाथ (बनारस)

(४) भिख्खु जी. प्रज्ञानंद, बुद्ध विहार (लखनौ)

(५) नेर श्रमनेर, धम्मोदय विहार (पश्चिम बंगाल)

(६) रिव्हीरर्ड परमसंधी

## पाच कोट बौद्ध

एवढे भिख्खु निरनिराळया देशातून व विभागातून आले ही सामान्य घटना नव्हे. बौद्ध जगताला डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या बौद्ध दीक्षेबद्दल आकर्षण वाटणे दोन दृष्टींनी स्वाभाविक आहे. एक कारण हे की,

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा दीक्षाविधी म्हणजे मोजून गणित केल्याप्रमाणे भारतातील सुमारे पाच कोट अस्पृश्य बांधवाचाच दीक्षाविधी होय हे त्यांच्या (डॉ. बाबासाहेबांच्या) मागे असलेल्या अनुयायांच्या संख्येवरून व अनुयायांच्या निष्ठेवरून मानावयास मुळीच हरकत नाही हे त्यांनी ओळखले. भारतामध्ये प्रथम दृढमूल झालेली पण आज बिलकूल सुकून गेलेली बौद्ध धर्माची पाळेमुळे पुनःश्च टवटवीत कशाने होणार असतील तर भारतातील दरेक खेड्यात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे जे असंख्य अनुयायी आहेत, त्यांच्या दीक्षाविधीने व निष्ठेनेच होतील, हे आता बौद्ध जनास चांगलेच कळून चुकले आहे. तेव्हा या दृष्टीने बौद्ध जगताला, डॉ. बाबासाहेबांच्या बौद्ध दीक्षेबद्दल आकर्षण वाटणे स्वाभाविक होते.

## मूर्तिमंत प्रज्ञा मिळाली

. परंतु, याहीपेक्षा दुसऱ्या दृष्टीचे आकर्षण त्यांना अधिक होते, असे म्हणावयास हरकत नाही. बौद्ध धर्मामध्ये प्रज्ञेचे स्थान सर्वश्रेष्ठ आहे. शांतता, न्याय व प्रज्ञा असा क्रम बौद्ध धर्माच्या शिकवणुकीचा आहे. बुद्ध म्हणजे प्रज्ञावंत, आणि प्रज्ञा म्हणजे ज्ञान संपन्न व जीवन विन्मुक्त ! डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अलौकिक बुद्धिमत्तेकडे सहज दृष्टी टाकली तरी डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणजे मूर्तिमंत प्रज्ञाच आहे असे म्हणण्यात अतिशयोक्तिची चूक होईल असे वाटत नाही. अशी प्रज्ञामय घ्यक्ती लाभणे अत्यंत दुर्मिळ असते. लक्षावधी, नव्हे, करोडो रुपये देखील खर्ची घालून अशा व्यक्तीचे साधे मत अगर पाठिंबा मिळविणे कठीण असते. ज्ञान ही अपूर्व मोलाची चीज आहे, अणुशास्त्राचे ज्ञान गुपितपणाने फोडण्याचे प्रकार आता सर्वांना माहीत झाले आहेत. त्यासाठी, केवढे पहारे ठेवले जातात, परराष्ट्रीय वकालतीत मसलती होतात आणि गुप्तपणे असे ज्ञानी लोक ' पळवून ' नेण्यासाठी केवढा अमाप पैसा खर्च केला जातो. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे ज्ञान अतुलनीय आहे. त्यांचे धर्म विषयक ज्ञान म्हणजे, मनाच्या सूक्ष्म रचनेचे व मनुष्यत्व पूर्णत्वास नेण्यासाठी मन सुसंस्कृत बनविण्याचे ज्ञान आहे. जगातील कोणत्याही धर्माच्या प्रसारकापेक्षा सरस ठरू शकेल असे त्यांचे ज्ञान आहे. तेव्हा डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी, बौद्ध जगताला पाठिंबा दिलेला आहे एवढेच नव्हे तर आपले ज्ञान बौद्ध धर्मासाठी अर्पण करून बौद्ध धर्माचे ते जवळजवळ एकमेव पुरस्कर्ते बनले आहेत. नव्हे, चालू युगातील ते भारतीय बुद्धच होत. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या बौद्ध दीक्षेमुळे बौद्ध जगतास, अपूर्व ज्ञानाचा पुरस्कर्ता अत्यंत निकडीच्या वेळी प्राप्त झाला या दुसऱ्याही दृष्टीने अखिल बौद्धजनांना डॉ. बाबासाहेबांच्या वरील निवेदनामुळे परमहर्ष होणे स्वाभाविक आहे.

भारतातील दलित जनतेची प्रतिक्रिया अपरिमित आनंदाची होती. विशेषत: नागपूर ते मुंबई या दोन शहरात व त्या दरम्यानच्या प्रदेशात उत्साहाची प्रचंड लाटच उसळल्याप्रमाणे झाले. ' प्रबुद्ध भारत ' हे दलित जगताचे जणू काही अधिकृत असे गॅझेटच आहे. त्यामध्ये ता. २९ सप्टेंबर १९५६ व १३ ऑक्टोबर १९५६ च्या अंकात लागोपाठ बौद्ध-दीक्षा-विधीची बातमी दलित जनतेच्या झोपड्या-झोपड्यातून पोहोचविण्यात आली. नागपूर भागातील ' सिद्धार्थ ' ' धर्मदीप ' ' धर्मदूत ' ' बोधीसत्व ' याही प्रसंगानुरूप प्रसिद्ध होत असलेल्या साप्ताहिकांनी मध्यप्रदेशातील विभागात सदर माहिती प्रसृत केली. नागपूर शाखेच्या भारतीय बौद्धजन महासभेच्या समितीने छापील पत्रके काढून, सर्व दलित बांधवांस, बौद्ध-दीक्षा-विधीच्या कार्यक्रमाबद्दल तपशीलवार माहिती दिली.

## कार्यक्रमाचा तपशील

समितीच्या पहिल्या छापील पत्रिकेत स्वागत समितीचे अध्यक्ष, श्री. रेवाराम कवाडे व श्री. वा. मो. गोडबोले यांनी खालील कार्यक्रम जाहीर केला.

## सामुदायिक धर्मांतर कार्यक्रम पत्रिका

शनिवार ता. १३-१०-५६ रोजी सायंकाळी ५ ते ८ परित्राण. ८ ते १० महाबोधी सोसायटीचे जनरल सेक्रेटरी, श्री. डी. वलीसिन्हा यांचे भाषण; आणि भगवान् बुद्धाचे चरित्र व भारतातील प्रसिद्ध बौद्ध स्थळे यावर मॅजिक लॅन्टर्न शो.

रविवार ता. १४-१०-५६ (अशोका विजयादशमी) सकाळी ८ ते ११ परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर व सौ. माईसाहेब आंबेडकर आणि इतर दीक्षार्थींची पूज्य भिक्षू चंद्रमणी महास्थविर यांच्या हस्ते बौद्ध-धर्म-दीक्षा, सकाळी ११ ते ११ . २५ महाबोधी सोसायटी, कलकत्ता तर्फे परमपूज्य डॉ. बाबासाहेब यांना भगवान बुद्धांची प्रतिमा भेट. सायंकाळी ६ ते ७ महाबोधी सोसायटीचे जनरल सेक्रेटरी श्री. डी. वलीसिन्हा यांचे भाषण. सायंकाळी ८ ते ११ बोधिमंडळ, मिलिंद महाविद्यालय, औरंगाबाद यांचा ''युगयात्रा'' या मराठी नाटकाचा प्रयोग.

सोमवार ता. १५-१०-५६ सकाळी ८ ते ११ परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे जाहीर भाषण. सायंकाळी ८ ते १० मॅजिक लॅन्टर्न शो.

याशिवाय स्वागत समितीने इंग्रजी भाषेत एक पत्रिका प्रसिद्ध केलेली होती. त्यानंतर स्वागत समितीने प्रसिद्ध केलेली तिसरी पत्रिका ता. १३-१०-५६ च्या 'प्रबुद्ध भारत' च्या अंकात खास पुरवणी म्हणून प्रसिद्ध केलेलीच आहे. एवढ्या साधनानिशी बौद्ध-दीक्षा-विधी समारंभाची समयोचित माहिती भारतातील दलित वर्गांना व इतरांना देण्यात आली.

ही माहिती प्रसिद्ध झाल्या झाल्या ज्यांना ज्यांना या बौद्ध-दीक्षा-विधीसमारंभास जावयाचे होते, त्यांनी आपापल्या परी तयारी केली. रेल्वेमध्ये काम करणाऱ्या दलित बांधवांनी तर आपले रेल्वे सवलतीचे पास मुक्रर करून टाकले, भारतीय बौद्ध महासभेचे चिटणीस श्री. सवादकर, श्री. कबीर व श्री. गायकवाड यांनी पत्रके काढून, ज्यांना नागपूरास यावयाचे आहे त्यांच्या जाण्या-येण्याची रेल्वेची सवलतीची तिकीटे त्यांनी नावे नोंदविल्यास मिळवून देण्याची व्यवस्था केली जाईल असे जाहीर केले. मुंबई प्रदेश दलित फेडरेशननेही अशीच व्यवस्था करण्याचे आश्वासन दिले. या संयुक्त प्रयत्नांमुळे, मुंबईहून एक खास रेल्वेची गाडी ता. १३ ऑक्टोबर १९५६* रोजी बौद्ध दीक्षा विधीच्या आदले दिवशी रात्री सोडण्यात आली. खास गाडी, फुल भरून गेली होती. ता. १३ ऑक्टोबर १९५६ या दिवशीच्या रात्रीच्या नागपूर-एक्सप्रेसने कर्नाटकातून आलेले कर्नाटक प्रदेश शे. का. फे. चे अध्यक्ष श्री. डी. ए. कट्टी व मुंबईहून सिद्धार्थ कॉलेजचे रजिस्ट्रार श्री. तळवटकर हे निघाले. त्यांना योगायोगाने त्याच गाडीत, नासिकचे श्री. ए. जी. पवार, वकील, भेटले. 'नवयुग' ने मुद्दाम पाठविलेले खास प्रतिनिधी याच गाडीने आले. खास सुटलेल्या रेल्वे गाडीने मुंबई प्रदेश दलित फेडरेशनचे ज. सेक्रेटरी श्री. दहिविलकर बुवा, श्री. आर. जी. खरात, याशिवाय मुंबईहून वॉर्ड कमिट्यांचे असंख्य कार्यकर्ते होते. सर्वांचा निर्देश या ठिकाणी करणे अक्षरशः अशक्यप्राय आहे. एवढी ती प्रचंड गर्दी होती.

प्रवासात, गाडीमधून ही दीक्षार्थी मंडळी, " बाबासाहेब करे पुकार बौद्ध धर्म का करो स्वीकार " " भगवान बुद्ध की जय " " डॉ. बाबासाहेब आंबेडकर की जय " या व अशा घोषणा वारंवार देत होती. ठिकठिकाणची रेल्वे स्टेशने या सामुदायिक घोषणांनी दुमदुमून गेली होती. मुंबई ते नागपूर ज़णू अहोरात्र, जागृत जनताच चाललेली आहे असे ते अपूर्व दृश्य होते. या मंडळीत भगिनीमातांची संख्याही जवळ जवळ एक तृतियांश होती. नागपूर रेल्वे स्टेशनवर ता. १३ व १४ ऑक्टोबर १९५६ रोजी येणाऱ्या रेल्वेच्या गाड्या सर्व बौद्ध दीक्षा घेऊ इच्छिणारांनीच गच्च भरून येत होत्या.

नागपूर शहराच्या दक्षिणेस जवळ जवळ शहराच्या बाहेर अंबाझरी नावाचा रोड आहे. या रोडला लागून असलेले सुमारे १४ एकर क्षेत्राचे विस्तीर्ण मैदान बौद्ध-दीक्षा-विधीसाठी मुक्रर करण्यात आले होते. या मैदानास सभोवार तट्टे मारले होते. सर्व मैदानाच्या सभोवार सुमारे २,००० ते ३,००० विद्युत दीपांची

---

*ही तारीख १२ ऑक्टोबर १९५६ असायला हवी--संपादक.

(बल्ब्स) व्यवस्था केली होती. स्त्रियांसाठी अर्ध्या भागात स्वतंत्र व्यवस्था एका छोट्या मंडपासह केलेली होती. पुरूषांकरिता राहिलेले सर्व मैदान होते. एरवी तसा नागपुरचा अंबाझरी रोड ओसाडच असतो. पण सदर समारंभामुळे, रोडवर निरनिराळ्या प्रकारची दुकानेच स्थापन झाल्याचे दिसून आले. लाल हाफ शर्टस् घातलेल्या नागपुरच्या समता सैनिक दलाने मैदानापासून अलिकडेच चार फर्लांग एवढ्यावर अंबाझरी रोडचा बंदोबस्त ठेवला होता. मुंबईचे समता सैनिक दलही, मैदानातील समुदायाची व्यवस्था ठेवित होते. एवढी प्रचंड गर्दी पण, मध्यप्रदेशाचे पोलीस क्वचित् कोठे तुरळक १०/११ पाहावयास मिळाले. बाकी, शांतता व सुव्यवस्था स्वयंसेवकांनीच ठेवली होती.

## नागपूरातील धमाल

नागपूर शहर ता. १४ ला तीनलाच जागे झाले असे म्हणावयास हरकत नाही. सुमारे ४ लाख लोक तरी, नागपूर बाहेरून आलेले होते. त्यांची व्यवस्था, नागपूर शहरातील जेवढ्या शाळा, हायस्कूल आहेत, त्यांच्या इमारतीत (सुटीत रिकाम्या असल्याने) करण्यात आली. या संस्थांच्या चालकांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. परंतु एवढ्या प्रचंड लोकसंख्येस, शाळा हायस्कूलच्या इमारती कितीशा पुरेशा पडणार ? पहाटे ३ पासूनच मिरवणुकांना व घोषणांना सुरुवात होऊन, नागपूर जागे झाले. अंबाझरी रोडला एकच एक गर्दी सकाळपासून लोटली होती. खुद्द नागपूरकरच असे म्हणत होते की, या प्रकारचा लोकसमुदाय व उत्साह आजपर्यंत नागपुरात इतर कोणत्याही समारंभात दिसून आला नाही. एवढ्या प्रचंड गर्दीचा परिणाम व्यापारी नागपुरावर झाला. रिक्षा, जेवणे, यांचे दर दुप्पट वाढण्यातही दोन दिवसात घडून आला. या समारंभाची व्यवस्था व जबाबदारी भारतीय बौद्ध महासभा, नागपूर शाखेने घेतली होती व प्रामुख्याने ती जबाबदारी श्री. कवाडे, श्री. गोडबोले, श्री. पंचभाई आदिंनी पार पाडली त्याबद्दल त्यांना धन्यवाद देणे उचितच होईल.

## हृदय भेदक प्रसंग

या बौद्ध दीक्षा घेण्याच्या विधीतील सर्वात अगदी हृदयास भिडणारा परमोच्च प्रसंग नमूद केला पाहिजे. तो प्रसंग हा की, ज्या वेळी डॉ. बाबासाहेब आंबेडकर मनुष्यमात्रास नीच मानणाऱ्या हिंदू धर्माचा मी त्याग करतो असे म्हणाले, तेव्हा त्यांचा गळा दाटून आला व त्यांच्या डोळ्यात अश्रू चमकले. डॉ. बाबासाहेब

आंबेडकरांना कोणते दुःख झाले असले पाहिजे ? त्यांच्यासारख्या असामान्य निश्चयाच्या या महापुरूषाच्या नेत्रातून अश्रू का यावे ? डॉ. बाबासाहेबांना असे वाटले असण्याचा संभव आहे की, मी ज्ञान मिळविण्याची पराकाष्ठा केली, उत्कृष्ट चारित्र्य ठेवले, वैयक्तिक लाभाची पर्वा केली नाही, अनेक ग्रंथ लिहून भारताच्या ' विचारात ' भर घातली, ब्रीदाने जीवन घालविले, म्हणजे ज्ञान, शील व सचोटी याबाबतीत मी कोणापेक्षा कमी नसता व गेली ३० वर्षे हिंदू धर्म समाजरचनेत राहिलो, पण केवळ, माझ्या दलित बांधवांना इज्जतीचा व स्वतंत्र बाण्याचा मार्ग दाखवितो म्हणून हिंदुंनी कोणत्या प्रकारच्या कारवाया करून माझे मार्ग बंद करण्याचे कार्य अव्याहतपणे ठेवले ? त्यांना याबाबत साध्या माणुसकीचीसुद्धा आठवण राहिलेली नाही. तेव्हा मी व माझ्या बांधवांनी असे कोणते पाप केले की, त्यांच्यामध्ये राहूनही ते आम्हास साध्या माणुसकीने राहू देत नाहीत. काहीही असो या अतिशय बिकट परिस्थितीतून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी जो मार्ग आता आपल्या दलित बांधवांना दाखविला, तो पूर्ण ' स्वतंत्र ' बाण्याचा सर्वोत्कृष्ट आहे यात शंकाच नाही.'' [१]

### '' भारत सरकार फिल्म घेणार

अस्पृश्य समाजाच्या इतिहासातील ही एक महत्त्वपूर्ण घटना असल्यामुळे भारत सरकारतर्फे या समारंभाची पूर्ण डॉक्युमेन्टरी फिल्म घेण्यात येणार असून डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषणही रेकॉर्ड केले जाणार आहे.

### जगाचे डोळे लागले

नागपूरातील आणि नागपूरात बाहेर गावाहून आलेला हजारोंच्या संख्येतील अस्पृश्य समाज या भव्य धर्मचक्रप्रवर्तन समारंभाची तहानभूक विसरून उत्कंठेने प्रतिक्षा करीत आहे यात नवल नाही, सर्व जगाचे डोळे आज या समारंभाकडे लागले असून, सर्व देशांचे वार्ताहर येथे आलेले आहेत.'' [२]

### '' बौद्ध दीक्षेचा सोहळा

समारंभासाठी १४ एकर क्षेत्राचे पटांगण सभोवार तट्ट्या मारून तयार केले होते. एकूण तीन मंडप होते. मधील मंडप सुमारे ४०' X २०' होता, त्याजवर बौद्धकालीन स्मृती दर्शविणारा स्तूप उभारण्यात आला होता, या मध्यवर्ती

[१] प्रबुद्ध भारत : डॉ. आंबेडकर बौद्ध दीक्षा विशेषांक, २७ ऑक्टोबर, १९५६.

[२] दैनिक ' तरुण भारत ' नागपूर : १५ ऑक्टोबर १९५६.

मंडपातच डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा बौद्ध -दीक्षा-विधी करण्यात आला. दोन्ही बाजूच्या मंडपापैकी एक स्त्रियांकरिता व दुसरा, प्रमुख नागरिकांसाठी होता. मध्यवर्ती मंडपासमोर वृत्तपत्रांच्या वार्ताहरांकरिता खास बसण्याची सोय केली होती. स्वदेशी व परदेशी मिळून जवळजवळ ३० वार्ताहर व फोटोग्राफर्स हजर होते. मंडपावर व विस्तीर्ण पसरलेल्या मैदानात ठिकठिकाणी बौद्धधर्मी निशाणे फडकत होती. निळा, तांबडा, हिरवा असे पट्टे असलेली ती निशाणे होती.

## ५ लाखांवर उपस्थिती

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे महास्थविर भिख्खु चन्द्रमणी यांचेसमवेत सकाळी साडे नऊला समारंभ स्थळी आले. तोपर्यंत संपूर्ण मंडप भरून गेला होता. अदमासे ५ ते ६ लक्षापर्यंत जनसमुदाय उपस्थित झाला होता. त्यापैकी जवळ जवळ ३ ते ४ लक्ष लोक बाहेर गावचेच होते.

त्यावेळी ' भगवान बुद्ध की जय ' ' बाबासाहेब करे पुकार, बौद्ध धर्मका करो स्वीकार ' अशा घोषणांनी वातावरण दुमदुमून गेले.

व्यासपीठावर अग्रभागी एका मेजावर बुद्धाचा ब्राँझचा पुतळा ठेवण्यात आला होता व त्याचे दोन्ही बाजूला एकेक सिंह होता व समोर उद प्रज्वलित होत होता.

## बाबासाहेबांच्या पिताजींच्या पुण्यतिथीचे स्मरण

समारंभास कु. इंदुताई वराळे यांनी स्वागत पद गाऊन सुरवात केली, तद्‌नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे पिताजी, कै. रामजी मालोजी आंबेडकर यांची पुण्यतिथी दिनांक १४-१०-१९५६* रोजीच असल्यामुळे त्यांच्या स्मृतीस अभिवादन करण्यासाठी सर्व पाच लाखांवरील जनता काही मिनिटे स्तब्ध राहिली.

---

* डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे वडील रामजी सुभेदार, दिनांक २ फेब्रुवारी १९१३ रोजी सायंकाळी दिवंगत झाले असे डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र-चां. भ. खैरमोडे, खंड- १, पृ. ६३ तसेच धनंजय कीर लिखित Dr. Ambedkar : Life and Mission या ग्रंथात पृ. २४ वर दर्शविलेले आहे. यानुसार त्यांची पुण्यतिथी १४ ऑक्टोबर रोजी नव्हती. दीक्षा विधी अगोदर त्यांचे स्मृतीस अभिवादन पुण्यतिथी असल्यामुळे केले नसून त्यांनी केलेल्या कार्यावरून डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जीवनातील या एका महान क्रांतिकारी घटनेच्याप्रसंगी केले असावे. –संपादक

नंतर डॉ. बाबासाहेब व माईसाहेब यांनी पूज्य चंद्रमणी यांच्यासमोर उभे राहून, भगवान बुद्धाच्या मुर्तिपुढे आपले हात एकत्रित जोडून,

**नमो तस्स भगवतो अरहतो सम्मासम्बुद्धस**

(**अर्थ** :– त्या भगवान बुद्धाला माझे नमन असो ; की, जो **जीवन मुक्त**, **संपूर्ण व जागृत** आहे.)

असे पाली भाषेत लागोपाठ तीन वेळा म्हटले. पुढे पूज्य चंद्रमणी यांनी उभयतांना खालील पाली भाषेतील **सरणत्तयं (तीन अनुसरणें)**, **पन्चसीलानी** (पाच शीले) म्हणावयास सांगून ती म्हणवून घेतली.

सरणंत्तयं (तीन अनुसरणे)

बुद्धं सरणं गच्छामि ।।

धम्मं सरणं गच्छामि ।।

संघं सरणं गच्छामि ।।

दुतियम्पि, बुद्धं सरणं गच्छामि ।।

दुतियम्पि, धम्मं सरणं गच्छामि ।।

दुतियम्पि, संघं सरणं गच्छामि ।।

ततियम्पि, बुद्धं सरणं गच्छामि ।।

ततियम्पि, धम्मं सरणं गच्छामि ।।

ततियम्पि, संघं सरणं गच्छामि ।।

(**अर्थ** :–मी बुद्धाला अनुसरतो.

मी त्याच्या धर्माला अनुसरतो.

मी त्याच्या संघाला अनुसरतो.

दुसऱ्यांदा मी बुद्धाला अनुसरतो.

दुसऱ्यांदा मी त्याच्या धर्माला अनुसरतो.

दुसऱ्यांदा मी त्याच्या संघाला अनुसरतो.

तिसऱ्यांदा मी बुद्धाला अनुसरतो.

तिसऱ्यांदा मी त्याच्या धर्माला अनुसरतो.

तिसऱ्यांदा मी त्याच्या संघाला अनुसरतो.)

पन्चसीलानि । (पाच शीले)

पाणातिपाता वेरमणी –

सिक्खापदं समादियामि ॥१॥

अदिन्नादाना वेरमणी –

सिक्खापदं समादियामि ॥२॥

कामेसु मिच्छाचारा वेरमणी –

सिक्खापदं समादियामि ॥३॥

मुसावादा वेरमणी –

सिक्खापदं समादियामि ॥४॥

सुरा-मेरय-मज्ज-पमादट्ठाना वेरमणि –

सिक्खापदं समादियामि ॥५॥

अर्थ :–

(१) मी जीवहिंसेपासून अलिप्त राहाण्याची प्रतिज्ञा करतो.

(२) मी चोरी करण्यापासून अलिप्त राहाण्याची प्रतिज्ञा करतो.

(३) मी कामवासनेच्या अनाचारापासून अलिप्त राहाण्याची प्रतिज्ञा करतो.

(४) मी खोटे बोलण्यापासून अलिप्त राहाण्याची प्रतिज्ञा करतो.

(५) मी मद्य, मादक तसेच इतर सर्व मोहात पाडणाऱ्या मादक वस्तूंच्या सेवनापासून अलिप्त राहाण्याची प्रतिज्ञा करतो.

## बुद्धाच्या चरणी

शेवटी उभयतांनी, भगवान बुद्धाच्या प्रतिमेस स्वच्छ कमलांचा पुष्पहार अर्पण केल्यावर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी प्रत्यक्षात आपले मस्तक भगवान बुद्धाच्या चरणी ठेवून तीन वेळा वंदन केले.

तद्नंतर डॉक्टरसाहेब म्हणाले,

" भगिनींनो व बंधुजनहो, आम्ही दोघांनी तुमच्यासमोर भिक्खु चंद्रमणी यांच्या हस्ते बौद्ध धर्माचा अनुग्रह केला आहे. चंद्रमणी हे भारतातील सर्वांत वयस्क भिक्खु आहेत. आता आमचा जो बौद्ध धर्म अनुग्रह झाला तो पाली भाषेत झाला. त्या अनुग्रहाचे मराठी भाषांतर करून, पुनः अनुग्रह घेत आहे."[१]

[१] प्रबुद्ध भारत–आंबेडकर बौद्ध दीक्षा विशेषांक : २७ ऑक्टोबर १९५६, पृ. ३४.

" यानतर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची गंभीर वाणी लाऊडस्पीकरवरून ऐकू आली :

' बंधु भगिनींनो, अनुग्रह आता तुम्हाला मराठीतही समजला आहे. आता मी तुम्हा सर्वांना बुद्ध धर्माची दीक्षा देणार आहे. ज्यांना हिंदू धर्माचा त्याग करून बुद्ध धर्म स्वीकारावयाचा आहे त्यांनी कृपा करून उभे राहावे आणि माझ्यामागून शब्दांचे उच्चारण करावे. '

सर्वच्या सर्व समाज, म्हणजे सुमारे पाच लाख लोक उभे राहिले, फक्त आम्ही काही वार्ताहरच याला अपवाद होतो. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी या सर्व लोकांना बौद्ध धर्माची दीक्षा गंभीरपणे दिली.

तद्नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी दिक्षाविधीचा एक भाग म्हणून बावीस प्रतिज्ञा दीक्षार्थीकडून वदवून घेतल्या ".[1] त्या पुढीलप्रमाणे–

" बौद्ध जनांच्या प्रतिज्ञा असे म्हणून त्यांनी खालील प्रतिज्ञा घेतल्या.

(१) मी ब्रम्हा, विष्णू आणि महेश यांना देव मानणार नाही किंवा त्यांची उपासना करणार नाही.

(२) मी राम व कृष्ण यांना देव मानणार नाही किंवा त्यांची उपासना करणार नाही.

(३) मी गौरी-गणपती इत्यादी हिंदुधर्मातील कोणत्याही देवदेवतेस मानणार नाही किंवा त्यांची उपासना करणार नाही.

(४) देवाने अवतार घेतले, यावर माझा विश्वास नाही.

(५) बुद्ध हा विष्णूचा अवतार आहे हा खोटा आणि खोडसाळ प्रचार होय, असे मी मानतो.

(६) मी श्राद्धपक्ष करणार नाही ; पिंडदान करणार नाही.

(७) बौद्ध धम्माच्या विरूद्ध विसंगत असे कोणतेच आचार कर्म मी करणार नाही.

(८) कोणतेही क्रियाकर्म ब्राह्मणांचे हातून करवून घेणार नाही.

(९) सर्व मनुष्यमात्र समान आहेत, असे मी मानतो.

(१०) मी समता स्थापन करण्याचा प्रयत्न करीन.

(११) मी भगवान बुद्धाने सांगितलेल्या अष्टांग मार्गाचा अवलंब करीन.

(१२) मी बुद्धाने सांगितलेल्या दहा पारमिता पाळीन.

---

[1] नवयुग : २१ ऑक्टोबर १९५६.

(१३) मी सर्व प्राणीमात्रावर दया करीन, त्यांचे लालनपालन करीन.

(१४) मी चोरी करणार नाही.

(१५) मी खोटे बोलणार नाही.

(१६) मी व्यभिचार करणार नाही.

(१७) मी दारू पिणार नाही.

(१८) मी प्रज्ञा, शील आणि करूणा या बौद्ध धम्माच्या तीन तत्त्वांची सांगड घालून माझे जीवन चालविन.

(१९) माझ्या जुन्या, मनुष्यमात्राच्या उत्कर्षाला हानिकारक असणाऱ्या आणि मनुष्यमात्राला असमान व नीच मानणाऱ्या हिंदू धर्माचा मी त्याग करतो व बुद्धाच्या धम्माचा स्वीकार करतो.

(२०) बुद्ध धम्म हा सद्धम्म आहे अशी माझी खात्री पटलेली आहे.

(२१) माझा नवा जन्म होत आहे, असे मी मानतो.

(२२) इतःपर मी बुद्धाच्या शिकवणीप्रमाणे वागेन अशी प्रतिज्ञा करतो.

हा संपूर्ण समारंभ सुमारे ५० मिनिटे चालू होता. स्वतः बाबासाहेब आंबेडकर आणि सौ. माईसाहेब यांचा दीक्षाविधी ९-४० ते ९-४५ या पाच मिनिटात झाला. बौद्ध धर्मदीक्षा घेतल्यानंतर बाबासाहेबांना पुष्पहार घालून त्यांचे स्वागत करण्यात आले. नंतर १० वाजता सामुदायिक दीक्षाविधी झाला व 'सरणां' च्या त्रिवार घोषणेनंतर 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर की जय' चा निनाद वातावरणात घुमला.

यावेळी अ. भा. महाबोधी समितीचे सरचिटणीस श्री. वलीसिन्हा यांनी बाबासाहेबांना एक चिकण मातीची बुद्ध प्रतिमा भेट म्हणून दिली.

बौद्ध धर्माची दीक्षा ज्यांनी घेतली त्यात पुढील प्रमुख व्यक्तींचा समावेश होतो. बॅ. राजाभाऊ खोबरागडे (शे. का. फे. चे सरचिटणीस), महाराष्ट्र शाखेचे अध्यक्ष श्री. भा. कृ. गायकवाड, श्री. आर. डी. भंडारे (अध्यक्ष, मुंबई प्रदेश फेडरेशन), शांताबाई दाणी, श्री. सी. एन. मोहिते, श्री. गो. ति. परमार (गुजरात शाखेचे अध्यक्ष), श्री. वा. कां. परमार, श्री. डी. जी. जाधव, सौ. सरोजिनी जाधव, पुण्याचे श्री. वि. रा. रणपिसे, श्री. ससालेकर, श्री. हरिदास आवळे, श्री. सदानंद फुलझेले, श्री. अहोटे, श्री. व्ही. एस. पगारे, श्री. उपशाम, श्री. बी. एस. मोरे, श्री. बी. एच. वराळे, श्री. धोंडीराम पगारे, श्री. यशवंतराव आंबेडकर (बाबासाहेबांचे पुत्र), श्री. मुकुंदराव आंबेडकर, श्री. बी. सी. कांबळे वगैरे.

याचवेळी न्या. भवानीशंकर नियोगी, श्री. कुलकर्णी (बुद्ध समितीचे चिटणीस), औरंगाबादच्या मिलिंद कॉलेजचे प्रिन्सिपाल श्री. एम. व्ही. चिटणीस, श्री. बी. एस. कबीर आदि सवर्ण हिंदुंनीही बौद्ध धर्माची दीक्षा घेतली.

सकाळचा हा कार्यक्रम ११ वाजेपर्यंत चालू होता. नंतर रात्री औरंगाबादच्या मिलिंद महाविद्यालयाच्या विद्यार्थ्यांनी ' युगयात्रा ' या नाटकाचा चांगला प्रयोग करून दाखविला. त्यावेळी सौ. माईसाहेब आंबेडकर उपस्थित होत्या.

## थोरांचे शुभ संदेश !

डॉ. बाबासाहेबांच्या बौद्ध-दीक्षा-विधीनिमित्ताने ब्रह्मदेशाचे पंतप्रधान यू. बा. स्वे, तसेच माजी पंतप्रधान यू. नू., पूर्व पाकिस्तान बुद्धिस्ट कॉन्फरन्सचे पूज्य प्रियदर्शी सिहाबिर, आंध्रा बुद्धिस्ट असोसिएशन अध्यक्ष पी. बी. सेनागुप्ता, बौद्ध धर्मकुंवर सभेचे (कलकत्ता) डॉ. अरविंद बारुआ, एम्. ए., पीएच.डी., बार अॅट-लॉ, कोलंबोचे एच. डब्ल्यू. अमरासुरीया, रंगूनचे महाथेरो पन्नलोक, कोझिकोडे येथील महाबोधी बुद्धिस्ट मिशनचे भिख्खु धर्मानंद वगैरे अनेक थेरो, बौद्ध भिक्खु व महापुरुषांचे संदेश आले. दीक्षाविधी संपल्यानंतर बाबासाहेबांचे अभिनंदन आणि अभीष्टचिंतन करणारे संदेश वाचून दाखविण्यात आले. त्यापैकी काही निवडक संदेश संक्षेपाने दिले आहेत.

ब्रह्मदेशाचे पंतप्रधान **यू. बा. स्वे व माजी पंतप्रधान, यू. नू.** आपल्या संदेशात म्हणतात :--

" पंतप्रधान यू. बा. स्वे व माजी पंतप्रधान यू. नू. या दोघांनाही तारीख १४ ऑक्टोबर १९५६ रोजी नागपूर येथे होणाऱ्या डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या बौद्धदीक्षा विधी समारंभाचे निमंत्रण मिळाल्याबद्दल आनंद वाटतो. दोघांवरही अनेक कामांची जबाबदारी असल्यामुळे, त्यांना नागपूर येथे तारीख १४ आक्टोबर रोजी हजर राहाता येत नाही याबद्दल खेद होतो. मात्र, यू. बा. स्वे व यू. नू. हे दोघेही सदर समारंभास व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना अतिशूभ इच्छितात व डॉ. आंबेडकर यांना धन्यवाद देतात. डॉ. आंबेडकरांचा बौद्ध-धर्म-दीक्षाविधी समारंभ अपूर्व आहे. त्यांना भारतात तसेच ब्रह्मदेशातही आदरयुक्त भावनेने मानले जाते. "

**कोलंबोचे एच. डब्ल्यू. अमारसूरिया** आपल्या संदेशात म्हणतात :-

" तारीख १४ ऑक्टोबर १९५६ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर व त्यांचे अनुयायी चहाते, बौद्ध धर्म दीक्षा घेणार असल्याचे वाचून अत्यानंद झाला. १४ ऑक्टोबर हा जगामधील सर्व बौद्धजनांना सुवर्ण अक्षराने लिहून

ठेवावा लागेल यात संशय नाही. आधीच्या माझ्या कार्यामुळे नागपूरला येऊ शकत नाही, याबद्दल मला खेद वाटतो. डॉ. आंबेडकर यांचे मी हार्दिक अभिनंदन करतो. सर्वसाधारण अखिल बौद्ध जनात, बुद्ध शासनास उच्च दर्जा प्राप्त करून घेण्यासाठी व विशेषतः शास्त्रोक्त पायावर भारतात बुद्ध शासन पुनश्चः प्रस्थापित करण्यासाठी डॉ. आंबेडकर यांना दिर्घायूष्य लाभो. ''

**डॉ. अरविंद बारुआ (एम. ए., पीएच.डी., बार ॲट-लॉ.)** कलकत्त्याहून पाठविलेल्या संदेशात लिहितात :–

'' डॉ. बाबासाहेब आंबेडकर व त्यांचे अनुयायी बौद्ध दीक्षा घेऊन बौद्ध जगात समाविष्ट होत आहेत, त्यांचे मी मनःपूर्वक स्वागत करतो. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी बौद्ध दीक्षा घेण्याबाबत घेतलेला निर्णय अक्षरशः युगप्रवर्तक आहे. त्यांचेबद्दल मला परम आदर आहे. बौद्ध धर्मास पुनः उच्चपदी नेण्यास व सांप्रतची धर्मग्लानी दूर करण्यास डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्यासारख्या दैदिप्यमान व्यक्तिची जगातील बौद्धजनास आज फारच आवश्यकता आहे. त्यांच्या अष्टपैलू व्यक्तित्त्वाने व प्रज्ञेने ते जगातील बुद्ध शासनाचा आदर मिळवतील अशी माझी खात्री आहे आणि त्यांनी आता या महान कार्यासाठी पुढे यावे अशी माझी विनंती आहे.

१४ ऑक्टोबर १९५६ च्या नागपूरच्या शुभप्रसंगी, मी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या थोर शिकवणुकीशी निष्ठा व त्यांच्या अनुयायांशी शुद्ध बंधुभाव अंतःकरणपूर्वक व्यक्त करतो. ''

**रंगूनचे महाथेरो, यू पन्नलोक** आपल्या संदेशात म्हणतात :–

'' डॉ. आंबेडकर व त्यांचे अनुयायी ता. १४ ऑक्टोबर १९५६ रोजी बौद्ध दीक्षा घेऊन, भगवान बुद्धाच्या शिकवणुकीच्या तीन आश्रयाखाली येणार हे समजल्यावर हर्ष झाला. त्यांना सर्वांना मी शुद्ध व मुक्त जीवन चिंतितो. भगवान बुद्धाचे अष्टमार्ग सर्वांनी अनुसरावे व मानवमात्राचे दुःख नष्ट करून खऱ्या शांततेचे प्रतीक ' निर्वाण ' त्यांना प्राप्त व्हावे असे प्रार्थितो.'' [१]

---

[१] प्रबुद्ध भारत–डॉ. आंबेडकर बौद्ध दीक्षा विशेषांक : २७ ऑक्टोबर, १९५६ पृ. २९-३१.

" सोमवार दिनांक १५ ऑक्टोबर १९५६ रोजी सकाळी १० ते १२ पर्यंत डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे बौद्ध धर्माचा स्वीकार यासंबंधी उद्‌बोधक, स्फूर्तिदायक आणि अत्यंत तळमळीचे, माहितीपूर्ण भाषण दीक्षामंडपात झाले. लाखो लोक, ते भाषण उन्हात उभे राहून व जागा मिळेल तसे बसून एकाग्रतेने ऐकत होते."[१]

ते आपल्या भाषणात म्हणाले,

" सर्व बौद्धजनहो आणि उपस्थित पाहुणे मंडळी,

काल आणि आज सकाळी जो बौद्ध दीक्षा घेण्याचा व देण्याचा विधी समारंभ या ठिकाणी घडून आला त्याचे स्थान, विचारवंत लोकांना कदाचित अवघड वाटत असेल. त्यांच्या व माझ्याही मताने कालचा समारंभ आज व आजचा समारंभ काल व्हावयास पाहिजे होता. आपण हे कार्य अंगावर का घेतले, त्याची जरूरी काय व त्याने काय होईल, याची छाननी करून घेणे आवश्यक आहे. ते समजावून घेण्यानेच आपल्या कार्याचा पाया मजबूत होईल. हे समजावून घेण्याचे कार्य आधी व्हावयास हवे होते. परंतु काही गोष्टी अशा अनिश्चित असतात की त्या आपोआपच घडत असतात. आता या विधीबाबत व्हावयाचे तसे घडले आहे खरे, तथापि अशी दिवसांची अदलाबदल झाली तरी मोठेसे काही बिघडले नाही.

पुष्कळसे लोक मला असा प्रश्न करतात की या कार्याकरिता तुम्ही नागपूर हेच शहर का ठरविले ? अन्य ठिकाणी हे कार्य का केले नाही ? काही लोक असे म्हणतात की आर. एस. एस. ची–राष्ट्रीय स्वयंसेवक संघाची–मोठी पलटण नागपूर येथे असल्यामुळे त्यांच्या उरावरती म्हणून आम्ही ही सभा या शहरात घेतली आहे. हे मुळीच खरे नाही. त्यासाठी नागपूर येथे हे कार्य घेतलेले नाही. आमचे कार्य इतके मोठे आहे की आयुष्यातील एक एक मिनिट देखील कमी पडतो. आपले नाक खाजवून दुसऱ्याला अपशकून करण्यासाठी मजजवळ वेळ नाही.

हे ठिकाण निवडण्याचे कारण निराळे आहे. ज्यांनी बौद्ध इतिहासाचे वाचन केले असेल त्यांना हे कळून येईल की भारतात बौद्ध प्रसार जर कोणी केला असेल तर तो नाग लोकांनी केला. नाग लोक आर्यांचे भयंकर शत्रु होते. आर्य व अनार्य यांच्यामध्ये लढाया व तुंबळ युद्धे झाली. आर्य लोकांनी नागांना जाळून टाकल्याचे दाखले पुराणात सापडतात. अगस्ती मुनीने त्यातून फक्त एक नाग

---

१. डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : ले. चां. भ. खैरमोडे, खंड १२, पृ. ५७.

मनुष्य वाचविला. त्याचेच आपण वंशज आहोत. ज्या नाग लोकांना एवढा छळ सोसावा लागला त्यांना वर येण्यास कोणीतरी महापुरुष हवा होता ; त्यांना तो महापुरुष गौतम बुद्ध भेटला. भगवान बुद्धाचा उपदेश नाग लोकांनी सर्व भारतामध्ये पसरविला. असे आपण नाग लोक आहोत. नाग लोकांची मुख्य वस्ती नागपूर येथे व आसपास होती असे दिसते. म्हणून या शहरास ' नाग-पूर ' म्हणजे नागांचे गाव असे म्हणतात. येथून सुमारे २७ मैलावर नागार्जुनाची टेकडी आहे. नजिकच वाहणारी जी नदी आहे ती नाग नदी आहे. अर्थातच या नदीचे नाव येथे राहाणाऱ्या लोकांवरून पडले आहे. नागांच्या वस्तीमध्ये वाहणारी जी नदी ती नाग नदी आहे. हे स्थळ निवडण्याचे हे मुख्य कारण आहे. नागपूर यामुळे निवडले आहे. यामध्ये कोणालाही खिजविण्याचा कोठेच प्रश्न नाही. तशी भावनाही नाही. आर. एस. एस. चे कारण माझ्या मनाला शिवलेही नाही. तसा कोणी त्याचा अर्थ करून घेऊ नये.

इतर कारणावरून कदाचित् विरोध वाटू शकेल. हे ठिकाण विरोधासाठी पसंत केलेले नाही हे आता मी सांगितलेच आहे. मी हे जे कार्य आरंभले आहे त्यासाठी माझ्यावर अनेक लोकांनी व वृत्तपत्रांनी टीका केलेली आहे. काहींची टीका कडक आहे. त्यांच्या मते मी माझ्या गरीब बिचाऱ्या अस्पृश्य लोकांना भलतीकडेच नेत आहे. आज जे अस्पृश्य आहेत ते तसेच अस्पृश्य राहातील व जे हक्क अस्पृश्यांना मिळाले आहेत ते मात्र नष्ट होतील, असे सांगून आमच्यातील काही लोकांना ते बहकवीत आहेत. आमच्यातील अज्ञ लोकांना पगदंडीने जा असे ते म्हणतात. आमच्यातील काही तरूण व वयोवृद्ध लोकांवर कदाचित त्याचा परिणाम होत असेल. त्यामुळे लोकांच्या मनामध्ये संशय निर्माण झाले असतील तर त्या संशयाची निवृत्ती करणे हे आपले कर्तव्य आहे आणि अशा संशयाची निवृत्ती करणे म्हणजे आपल्या या चळवळीचा पाया मजबूत करणे आहे.

मागे आपण लोकांनी मांस खाऊ नये म्हणून चळवळ केली होती. त्यामुळे स्पृश्य लोकांवर मोठी गदा आल्याप्रमाणे त्यांना वाटत होते. त्यांनी जिवंत म्हशीचे दूध प्यावयाचे आणि ती म्हैस मेल्यानंतर मात्र आम्ही मृत म्हशीला खांद्यावर घेऊन जावयाचे, हा प्रकार विचित्र नव्हे काय ? आम्ही त्यांना म्हणतो की तुमची म्हातारी मेली तर तिला आम्हाला का नेऊ देत नाही ? त्यांनी मेलेली म्हैस द्यावी तशी म्हातारीही द्यावी. त्यावेळी कोणीतरी मनुष्य ' केसरी ' मधून पत्रव्यवहार करून, अमुक अमुक गावी दर वर्षाला ५० ढोरे मरतात, त्यांच्या कातड्यांची,

शिंगांची, हाडांची, मांसाची, शेपटीची, खुरांची मिळून ५०० रुपया इतकी किंमत होईल; व मृत मांस सोडल्यामुळे एवढ्या प्राप्तीला हे लोक मुकतील, असा प्रचार त्यावेळी केसरी मधून होत असे. त्याच्या प्रचाराला उत्तर द्यावयाची आवश्यकता खरे म्हणजे काय होती ? पण आमच्या लोकांना असे वाटे, या गोष्टीला आमचा साहेब उत्तर देत नाही, तर साहेब करतो तरी काय ?

एकदा मी संगमनेरला सभेला गेलो होतो. सभा झाल्यानंतर संध्याकाळी जेवणाची व्यवस्था केली होती. त्यावेळी मजकडे एक चिठ्ठी केसरीच्या त्या बातमीदाराने पाठविली व मला विचारले, '' अहो, तुम्ही तर तुमच्या लोकांना मेलेली ढोरे ओढू नका म्हणून सांगता. त्यांची हलाखी किती आहे ? त्यांच्या बायकांना लुगडे चोळी नाही, त्यांना अन्न नाही, त्यांना शेतीवाडी नाही, अशी त्यांची अत्यंत बिकट परिस्थिती असता, दरवर्षी त्यांना मिळणारे कातड्यांचे, शिंगांचे, मांसांचे ५०० रुपयांचे उत्पन्न फेकून द्या म्हणून सांगता, यात तुमच्या लोकांचा तोटाच नाही काय ? ''

मी म्हणालो, तुम्हाला याचे उत्तर कोठे देऊ ? ते येथे पडवीत देऊ की सभेत देऊ ? लोकांच्या समोरच सवालपट्टी झालेली बरी. मी त्या गृहस्थांना विचारले तुमचे म्हणणे एवढेच की आणखी काही आहे ? ते गृहस्थ म्हणाले, '' एवढेच म्हणणे आहे व एवढ्याचेच उत्तर द्या.'' मी त्या गृहस्थास विचारले, तुम्हास मुले, माणसे किती आहेत ? त्यांनी सांगितले मला पाच मुलगे आहेत, भावालाही ५/७ मुले आहेत. मी म्हणालो तर तुमचे कुटुंब मोठे आहे. तेव्हा तुम्ही व तुमच्या नातेवाईकांनी त्या गावची मेलेली सर्व ढोरे ओढावीत; आणि ५०० रुपयांचे उत्पन्न घ्यावे. हा फायदा तुम्ही अवश्य घ्यावा. शिवाय दरवर्षी मी स्वतः तुम्हाला ५०० रुपये वर देण्याची व्यवस्था करतो, माझ्या लोकांचे काय होईल, त्यांना अन्न, वस्त्र मिळेल की नाही ते माझे मी पाहीन, मग एवढी फायद्याची गोष्ट तुम्ही का सोडून देता ? तुम्ही का हे करीत नाही ? आम्ही हे काम केले म्हणजे फायदा होतो, आणि तुम्ही केले म्हणजे फायदा नाही ? ओढा ना तुम्ही मेलेली ढोरे !

काल एक ब्राह्मणाचा मुलगा मजकडे येऊन म्हणाला, '' पार्लमेंट, असेंब्ल्यांमध्ये तुमच्या लोकांना राखीव जागा दिल्या आहेत, त्या तुम्ही का सोडता ? '' मी त्यास म्हणालो, तुम्ही महार व्हा व त्या जागा पार्लमेंट, असेंब्ल्यामध्ये भरा. नोकरी

खाली असली की त्या जागा भरतात. त्यासाठी कोणा ब्राह्मणांचे, कोणा इतराचे किती अर्ज येतात ! मग नोकऱ्यांच्या जागा भरतात तशा या राखीव जागा तुम्ही ब्राह्मण लोक महार बनून का भरत नाही ?

आमचे नुकसान झाले तर तुम्ही का रडता, असा माझा त्यांना सवाल आहे. खरे म्हणजे मनुष्यमात्राला इज्जत प्यारी असते, लाभ प्यारा नसतो. सद्‌गुणी व सदाचारी बाईला व्यभिचारामध्ये किती फायदा असतो हे माहीत असते ; आमच्या मुंबईत, व्यभिचारी बायांची एक वस्ती आहे. त्या बाया सकाळी ८ ला उठल्या की न्याहारीसाठी शेजारच्या हॉटेलात वर्दी देतात आणि म्हणतात (डॉक्टरसाहेबांनी यावेळी आवाजात फरक करून नक्कल करून सांगितले) '' सुलेमान, अरे खिम्याची प्लेट व पावरोटी घेऊन ये. '' तो सुलेमान ते घेऊन येतो, शिवाय चहा, पाव केक वगैरेही आणतो. पण माझ्या दलितवर्गीय भगिनींना साधी चटणीभाकरी देखील मिळत नाही ; मात्र त्या इज्जतीने राहातात. त्या सदाचारानेच राहातात.

आम्ही झगडतो आहोत ते इज्जतीकरिता ! मनुष्यमात्राला पूर्णावस्थेस नेण्याकरिता आम्ही तयारी करीत आहोत, त्यासाठी वाटेल तो त्याग करण्याची आमची तयारी आहे. हे वृत्तपत्राचे लोक (त्यांच्याकडे वळून) माझ्या मागे गेली ४० वर्षे हात धुवून लागले आहेत. माझ्यावर केवढी टीका त्यांनी आजवर केली ! मी त्यांना म्हणतो, अजून तरी विचार करा, आतातरी पोरकटपणाची भाषा सोडून काही प्रौढ भाषा वापरा.

आम्ही बौद्ध धर्मीय झालो तरी राजकीय हक्क मी मिळवीन याची मला बालंबाल खात्री आहे. (डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा जयघोष व प्रचंड टाळ्या) मी मेल्यावर काय होईल हे सांगता येणार नाही. या चळवळीसाठी फार मोठे काम करावे लागेल. आम्ही बौद्ध धर्म स्वीकारल्यामुळे काय होईल, अडचणी आल्याच तर त्या कशा टाळता येतील, त्यासाठी काय युक्तिवाद व खटाटोप करावा लागेल, याचा मी पूर्ण विचार केला आहे. माझ्या पोतडीत सर्व काही भरलेले आहे. ते काय प्रकाराने भरले आहे ते मला पूर्ण माहीत आहे. हे जे हक्क मिळविले ते मीच माझ्या लोकांच्यासाठी मिळविले. ज्याने हे हक्क मिळविले ते तो पुन्हा मिळवून देईलच ! हे हक्क व सवलती मिळवून देणारा मीच आहे; आणि मी पुन्हा या सवलती मिळवून देईन अशी मला खात्री आहे. म्हणून सध्या तरी तुम्ही माझ्यावर विश्वास ठेऊन चालले पाहिजे. विरोधी प्रचारात काही तथ्य नाही हे मी सिद्ध करून देईन.

मला एका गोष्टीचे मात्र आश्चर्य वाटते. एवढा वादविवाद सर्वत्र होतो आहे. पण एकाही माणसाने ' मी बौद्ध धर्मच का स्वीकारला ' हा प्रश्न मला विचारला नाही. कोणताही दुसरा धर्म न स्वीकारता हाच धर्म का स्वीकारला, हा कोणत्याही धर्मांतराच्या चळवळीतील मुख्य आणि महत्त्वाचा प्रश्न असतो. धर्मांतर करताना धर्म कोणता व का घ्यावयाचा हे तावून सुलाखून पाहिले पाहिजे. आम्ही हिंदू धर्मत्यागाची चळवळ १९३५ पासून येवले येथे एक ठराव करून हाती घेतली. '' मी हिंदू धर्मात जन्मलो तरी हिंदू धर्मात मरणार नाही '' अशी प्रतिज्ञा मी मागेच केली होती आणि काल मी ती खरी करून दाखविली. मला इतका आनंद झाला आहे, हर्षवायुच झाला आहे. नरकातून सुटलो असे मला वाटते. मला कोणी अंधभक्त नको आहेत. ज्यांना बौद्ध धर्मात यावयाचे आहे त्यांनी जाणिवेने आले पाहिजे. त्यांना तो धर्म पटला पाहिजे.

मनुष्यमात्राच्या उत्कर्षाला धर्म ही अत्यंत आवश्यक वस्तू आहे. मला माहीत आहे की कार्ल मार्क्सच्या वाचनामुळे एक पंथ निघाला आहे. त्याच्या म्हणण्याप्रमाणे धर्म म्हणजे काहीच नाही. त्यांना धर्माचे महत्त्व नाही. त्यांना सकाळी ब्रेकफास्ट (न्याहारी) मिळाली, त्यात पाव, मलई, लोणी, कोंबडीची टांग वगैरे असले, पोटभर जेवण मिळाले, निवांत झोप मिळाली, सिनेमा पाहावयास मिळाला की सगळं संपलं. हे त्यांचं तत्त्वज्ञान ! मी त्या मताचा नाही. माझे वडील गरीब होते; म्हणून मला या प्रकारचे सुख काही मिळालेले नाही. माझ्याइतके कष्टमय जीवन कोणीही आयुष्यात काढलेले नाही. म्हणून माणसाचे जीवन सुखसमाधानाच्या अभावी कसे कष्टमय होते याची मला जाणीव आहे. आर्थिक उन्नतीची चळवळ आवश्यक आहे असे मी मानतो. त्या चळवळीविरूद्ध मी नाही. माणसाची आर्थिक उन्नती व्हावयास पाहिजेच.

पण मी याबाबत एक महत्त्वाचा फरक करतो. रेडा, बैल व माणूस यामध्ये फरक आहे. रेडा व बैल यांना रोज वैरण लागते. माणसासही अन्न लागते. मात्र दोहोत फरक हा आहे की रेडा व बैल यांना मन नाही ; मनुष्याला शरीराबरोबर मनही आहे. म्हणून दोन्हीचाही विचार करावयास हवा. मनाचा विकास झाला पाहिजे. मन सुसंस्कृत झाले पाहिजे. ते सुसंस्कृत बनविले पाहिजे. ज्या देशातील लोक अन्नाशिवाय माणसाचा सुसंस्कृत मनाशी संबंध नाही असे म्हणतात त्या देशाशी अगर लोकांशी संबंध ठेवण्याचे मला काहीच

प्रयोजन नाही. जनतेशी संबंध ठेवताना माणसाचे शरीर जसे निरोगी पाहिजे तसे शरीर सुदृढ होण्याबरोबर मनही सुसंस्कृत झाले पाहिजे. एरवी मानव जातीचा उत्कर्ष झाला असे म्हणता येणार नाही.

मनुष्याचे शरीर अथवा मन हे रोगी का असते ? त्याची कारणे ही की त्यास एकतर शारीरिक पीडा असते किंवा मनाला उत्साह नसतो. मनात उत्साह नसेल तर अभ्युदयही नाही. हा उत्साह का राहात नाही ? त्याचे पहिले कारण हे की मनुष्यास अशा रीतीने ठेवण्यात आले आहे की त्याला वर येण्याची संधी मिळत नाही ; अगर आशा राहात नाही. त्यावेळी त्यास उत्साह कोठून असणार ? तो रोगीच असतो. ज्या माणसाला आपल्या कृतीचे फळ मिळू शकते, त्यास उत्साह प्राप्त होतो. नाही तर शाळेत शिक्षक असे म्हणू लागला, की कोण रे हा ? हा तर महार ! आणि हा महारडा पहिल्या वर्गात पास होणार ? याला प्रथम श्रेणी कशाला पाहिजे ? तू आपला तृतीय श्रेणीतच राहा-पहिल्या वर्गात येणे हे ब्राह्मणाचे काम ! अशा व्यवस्थेत त्या मुलाला काय उत्साह मिळणार ? त्याची उन्नती ती काय होणार ? उत्साह निर्माण करण्याचे मूळ मनात आहे, ज्याचं शरीर व मनही धडधाकट असेल, जो हिम्मतबाज असेल, मी कोणत्याही परिस्थितीतून झगडून बाहेर पडेल असा ज्यास विश्वास वाटतो, त्यांच्यामध्येच उत्साह निर्माण होतो व त्याचाच उत्कर्ष होतो. हिंदू धर्मात अशी काही विलक्षण तत्त्वप्रणाली ग्रंथित केलेली आहे की त्यापासून उत्साहच वाटत नाही. माणसाला निरूत्साही करून टाकणारी परिस्थिती हजारो वर्षे टिकली तर जास्तीत जास्त कारकुनी करून पोटे भरणारे लोक होतील. या पलिकडे दुसरे काय होणार ? या कारकुनांचे रक्षण करावयास मोठा कारकून पाहिजे.

मनुष्याच्या उत्साहाला काही कारण असेल तर मन ! तुम्हाला मिलचे मालक माहीत आहेत. ते गिरण्यावर मॅनेजर नेमतात व त्यांच्याकरवी मिलमधील काम करवून घेतात. हे मिलचे मालक कसल्या ना कसल्या व्यसनात असतात, त्यांच्या मनाचा सुसंस्कृत असा विकास झालेला नसतो. आपल्या मनाला उत्साह वाटावा म्हणून आपण चळवळ केली, तेव्हा कोठे शिक्षण सुरु झाले. मी लंगोटी घालून शिक्षणाला सुरूवात केली. शाळेमध्ये मला प्यावयास पाणी सुद्धा मिळाले नाही. पाण्याशिवाय शाळेत मी किती तरी दिवस काढले ! मुंबईसारख्या एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये देखील अशीच परिस्थिती होती. अशी परिस्थिती असेल तर दुसरी काय अवस्था निर्माण होणार ? कारकुनीच निर्माण होईल !

मी दिल्लीच्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलमध्ये असताना लॉर्ड लिन्‌लिथगो व्हाईसरॉय होते. मी त्यांना म्हणालो, तुम्ही सर्वसामान्य खर्च तर करताच, पण

मुसलमानांकरता अलिगड युनिव्हर्सिटीस तीन लाख रुपये शिक्षणाकरता खर्च करता. त्याचप्रमाणे बनारसच्या हिंदू विद्यापीठासही तुम्ही तीन लाख रुपये देता. मात्र आम्ही हिंदू नाही की मुसलमान नाही. आमच्यासाठी काही करावयाचे म्हटले तर त्यांच्या हजारो पटीने जास्त करावयास हवे. निदान आमच्यासाठी मुसलमानाइतके तरी करा. तेव्हा लिन्‌लिथगोने सांगितले, तुम्हाला याबाबत काय लिहून आणावयाचे ते आणा ! त्याप्रमाणे मी एक मेमोरँडम लिहिले. ते चोपडे अजून मजजवळ आहे. युरोपियन लोक मोठे सहानुभूतीचे होते. त्यांनी माझे म्हणणे मान्य केले. पण घोडे जे पेंड खाऊ लागले ते हे पैसे कोणत्या गोष्टीवर खर्च करावयाचे त्यावर ! त्यांना वाटत होते, आमच्यातील मुली शिकलेल्या नाहीत, त्यांना शिक्षण द्यावे, त्यांची बोर्डिंग काढावीत व त्यावर, ते पैसे खर्च करावेत. आमच्यातील मुलींना शिकविले व सुशिक्षित केले तरी त्यांना वेगवेगळ्या पक्वान्नांचे पदार्थ करावयास घरी सामान कोठे आहे ? त्यांच्या शिक्षणाचा शेवटी परिणाम काय ? इतर गोष्टीवरील रक्कम सरकारने खर्च केली व शिक्षणावरील अडवून ठेवली.

म्हणून एके दिवशी मी लिन्‌लिथगोकडे गेलो आणि या शिक्षणावरील खर्चाबाबत म्हणालो, तुम्हाला राग येणार नसेल तर एक प्रश्न विचारतो. मी एकटा ५० ग्रॅज्युएटच्या समान आहे की नाही ? ते त्यांना मान्य करावे लागले. नंतर मी पुन्हा विचारले, याचे कारण काय ? ते म्हणाले, ' ते कारण आम्हास माहीत नाही.' मी म्हणालो की माझी विद्वत्ता एवढी मोठी आहे की मी राजवाड्याच्या टोकावर जाऊन बसू शकतो. मला अशी माणसे हवी आहेत. कारण तेथून सर्वत्र टेहळणी करता येते. आमच्या लोकांचे संरक्षण करावयाचे असेल तर अशी पारध करणारी माणसे निर्माण झाली पाहिजेत. कारकून काय करणार ? त्यासरशी लिन्‌लिथगोस माझे म्हणणे पटले, व त्या वर्षी १६ विद्यार्थ्यांना विलायतेत उच्च शिक्षण घेण्यासाठी पाठविण्यात आले. त्या १६ जणांपैकी काही मडकी जशी कच्ची काही पक्की असतात त्याप्रमाणे काही कच्ची काही पक्की निघाली. ही गोष्ट निराळी ! पुढे राजगोपालाचारी यांनी ही उच्च शिक्षणाची योजना रद्द करून टाकली.

या देशात आम्हाला हजारो वर्षे निरुत्साही करून ठेवील, अशी परिस्थिती आहे, ही परिस्थिती जोपर्यंत आहे तोपर्यंत आपल्या उन्नतीबद्दल उत्साह उत्पन्न होणे शक्य नाही. या बाबतीत या धर्मात राहून आम्ही काहीच करू शकत नाही. मनुस्मृतीमध्ये चातुर्वर्ण्य सांगितले आहे. चातुर्वर्ण्य व्यवस्था ही मनुष्यमात्राच्या उत्कर्षाला अत्यंत घातुक आहे. मनुस्मृतीत लिहिले आहे की शूद्रांनी फक्त सेवा चाकरी

करावी. त्यांना शिक्षण कशाला ? ब्राह्मणाने शिक्षण घ्यावे, क्षत्रियाने शस्त्रे धारण करावीत, वैश्याने व्यापार उदीम करावा व शूद्राने चाकरी करावी. ही घडी कोण उलगडू शकेल ? ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य वर्णाच्या लोकांना काही ना काही फायदा आहे, शूद्रांचे काय ? तीन वर्ण सोडले तर इतर जातीत काही उत्साह उत्पन्न होईल काय ? चातुर्वर्ण्याची व्यवस्था काही फुकाफुकी नाही ; ही रूढी नाही ; हा धर्म आहे.

हिंदू धर्मामध्ये समता नाही. गांधींना एकदा मी भेटावयास गेलो असता ते म्हणाले मी चातुर्वर्ण्य मानतो. मी म्हणालो, तुमच्यासारखे महात्मे चातुर्वर्ण्य मानतात ! पण हे चातुर्वर्ण्य कोणते व कसे ? (हाताच्या पंजाची बोटे एकावर एक येतील असा हात करून) हे चातुर्वर्ण्य उलट की सुलट ; चातुर्वर्ण्याची सुरूवात कोणीकडून व शेवट कोठे ? गांधींनी या प्रश्नाचे उत्तर दिले नाही आणि देणार तरी काय ? आमचा ज्या लोकांनी नाश केला त्यांचा देखील या धर्माने नाश होईल ! हा मी हिंदू धर्मावर उगीच आरोप करीत नाही. हिंदू धर्मामुळे कोणाचाही उद्धार होऊ शकणार नाही. तो धर्मच नष्टधर्म आहे.

आपला देश परकीयांच्या ताब्यात का गेला ? युरोपमध्ये १९४५ पर्यंत लढाया चालू होत्या. जेवढे सैन्य मरत असे तेवढे रिक्रुट भरतीमुळे पुढे येत असे. त्यावेळी कोणीही आम्ही लढाई जिंकली असे म्हणू शकले नाही. आमच्या देशाचे सगळे काही निराळे ! क्षत्रिय मेले की आम्ही खलास ! आम्हाला जर शस्त्रे धारण करण्याचा अधिकार असता तर हा देश पारतंत्र्यात गेला नसता. मग कोणीही हा देश जिंकू शकले नसते !

हिंदू धर्मामध्ये राहून कोणाचा काहीही उद्धार होणार नाही. हिंदू धर्म रचनेप्रमाणे वरिष्ठ वर्णांना व जातींना फायदे आहेत हे खरे आहे. पण इतरांचे काय ? ब्राह्मण बाई बाळंतीण झाली की तिची नजर हायकोर्ट जज्जाची जागा कोठे रिकामी आहे त्याकडे असते. आमची झाडूवाली बाई बाळंतीण झाली तर तिची नजर कोठे झाडूवाल्याची जागा रिकामी आहे तिकडे असते. अशी विचित्र रचना हिंदू धर्माच्या वर्णव्यवस्थेने केलेली आहे. यातून सुधारणा ती काय होणार ? उत्कर्ष हा फक्त बौद्ध धर्मातच होऊ शकेल.

बौद्ध धर्मात ७५ टक्के ब्राह्मण भिक्षु होते. २५ टक्के शूद्रादी होते. परंतु भगवंतांनी सांगितले. " हे भिख्खुहो, तुम्ही निरनिराळया देशातून व जातीतून आला आहात. आपल्या प्रदेशातून नद्या वाहतात तेव्हा त्या पृथक पृथक असतात, मात्र त्या सागरास मिळाल्या की त्या पृथक राहात नाहीत. त्या एकजीव व समान होतात. बौद्ध संघ हा सागराप्रमाणे आहे. या संघात सर्व सारखे व समान " ! सागरात गेल्यावर हे गंगेचे पाणी किंवा हे महानदीचे पाणी

असे ओळखणे अशक्य असते. त्याप्रमाणे बौद्ध संघात आले म्हणजे आपली जात जाते व सर्वजण समान असतात, अशी समता सांगणारा एकच महापुरुष आहे, आणि तो महापुरूष म्हणजे भगवान बुद्ध होय. (प्रचंड टाळया)

काही लोक असे म्हणतात, तुम्ही धर्मांतर करण्यास इतका अवधी का लावला ? इतके दिवस काय करीत होता ? हा प्रश्न महत्त्वाचा आहे. धर्म पटवून देणे हे काम सोपे नाही. ते एका माणसाचे काम नाही. धर्माबाबत विचार करणाऱ्या कोण्त्याही माणसास हे समजून येईल. माझ्यावर जेवढी जबाबदारी आहे, तेवढी जबाबदारी जगातील कोणत्याही माणसावर नाही. मला अधिक आयुष्य लाभल्यास मी योजलेले कार्य पूर्ण करीन. (डॉ. बाबासाहेब चिरायू होवोतच्या घोषणा व निनाद.)

महार बौद्ध झाले तर काय होईल, असे काही लोक म्हणतील. असे त्यांनी म्हणू नये, असे माझे त्यांना सांगणे आहे. ते त्यांना धोकादायक होईल. वरिष्ठ व संपत्तीवान वर्गाला धर्माची आवश्यकता वाटणार नाही. त्यांच्यामधील अधिकारावर असलेल्या साहेब लोकांना राहाण्यास बंगला आहे, त्यांची सेवा करावयास चाकर नोकर आहेत, त्यांना धन संपत्ती आहे, मानमरातब आहे, अशा माणसांना धर्माबद्दल विचार अगर चिंता करण्याचे कारण नाही.

धर्माची आवश्यकता गरिबांना आहे. पीडित लोकांना धर्माची आवश्यकता आहे. गरीब मनुष्य जगतो तो आशेवर. Hope ! जीवनाचे मूळ आशेत आहे. आशाच नष्ट झाली तर जीवन कसे होईल ? धर्म आशादायी बनवितो, व पीडितांना, गरिबांना संदेश देतो ; " काही घाबरू नकोस, होईल, जीवन आशादायी होईल " म्हणून गरीब व पीडित मनुष्यमात्र धर्माला चिकटून राहातो.

जेव्हा युरोपमध्ये खिस्ती धर्म शिरला त्यावेळी रोमची व आसपासच्या देशांची परिस्थिती अतिशय हलाखीची होती. लोकांना पोटभर जेवणही मिळत नव्हते. त्यावेळी गरीब लोकांना खिचडी वाटण्यात येत असे. त्यावेळी खिस्ताचे अनुयायी कोण झाले ? गरीब पिडलेले लोकच झाले. युरोपमधील सर्व गरीब व कनिष्ठ जनता खिस्ती बनली. हा ख्रिश्चन धर्म भीक मागणाऱ्यांचा आहे, असे गिबनने म्हटले होते. खिस्ती धर्म हा युरोपमध्ये सर्वांचा धर्म कसा झाला, याचे उत्तर द्यावयास गिबन आज हयात नाही ; नाहीतर याचेही उत्तर त्याला द्यावे लागले असते.

काही लोक असे म्हणतील, हा बौद्ध धर्म महारड्या-मांगांचा धर्म आहे. ब्राह्मण लोक भगवंताला ' भो गौतम ' म्हणजे ' अरे गौतम ' असे म्हणत

असत. ब्राह्मण बुद्धाला असे हिणवीत-चिडवीत असत. पण राम, कृष्ण, शंकर यांच्या मूर्ती परदेशात विकावयास ठेवल्या तर किती खपतील ते पाहावे. पण बुद्धाची मूर्ती ठेवली तर एकही मूर्ती शिल्लक राहाणार नाही. (टाळयांचा कडकडाट) आता घरातल्या घरात (भारतात) हे पुष्कळ झालं, बाहेर काही दाखवा ; जगात नाव जाहीर आहे ते फक्त बुद्धाचेच ! तेव्हा ह्या धर्माचा प्रसार झाल्याशिवाय कसा राहील ?

आमच्या वाटेने आम्ही जाऊ ; तुमच्या वाटेने तुम्ही जावे. आम्हाला नवीन वाट मिळाली आहे. हा आशेचा दिवस आहे. हा अभ्युदयाचा, उत्कर्षाचा मार्ग आहे. हा मार्ग काही नवीन नाही. हा मार्ग कोठून आणलेला नाही. हा मार्ग येथलाच आहे, भारतातीलच आहे. या देशामध्ये २००० वर्षे बौद्ध धर्म होता. खरे म्हणजे, या पूर्वीच आम्ही बौद्ध धर्मात का गेलो नाही, याचीच आम्हाला खंत वाटते. भगवान बुद्धाने सांगितलेली तत्त्वे अजरामर आहेत. पण बुद्धाने मात्र तसा दावा केलेला नाही. कालानुरूप बदल करण्याची सोय त्यात आहे. एवढी उदारता कोणत्याही धर्मात नाही.

बौद्ध धर्माचा नाश झाला याचे मुख्य कारण मुसलमानांच्या स्वाऱ्या हे होय. मुसलमानांनी स्वाऱ्यांमध्ये मूर्ती फोडून टाकल्या. बौद्ध धर्मावर यामुळे पहिले आक्रमण झाले. त्यांच्या स्वाऱ्यांना भिऊन बौद्ध भिख्खु नाहीसे झाले. कोणी तिबेटला गेले ; कोणी चीनला गेले ; कोणी कोठे गेले ! धर्माचे संरक्षण करण्यासाठी उपासक लोक हवे असतात. वायव्य सरहद्द प्रांतात एक ग्रीक राजा होता. त्याचे नाव मिलिंद. हा राजा सदोदीत वादविवाद करीत असे. वादविवादाची त्यास मोठी आवड होती. तो हिंदुंना सांगे, जो कोणी वादविवादपटू असेल त्याने येऊन वादविवाद करावा. त्याने पुष्कळांना निरूत्तर केले होते.

एकदा त्याला बौद्ध लोकांबरोबर वादविवाद करावा असे वाटले व वादविवादपटू कोणी बौद्ध असल्यास त्यास घेऊन यावे असे त्याने सांगितले. तेव्हा बौद्ध लोकांनी नागसेनास विनंती केली की तुम्ही या वादविवादात बौद्ध जनांची बाजू मांडावी. नागसेन विद्वान होता. तो पूर्वीचा ब्राह्मण होता. नागसेनाचा व मिलिंदचा जो वादविवाद झाला तो पुस्तक रूपाने जगाला माहीत आहे. त्या पुस्तकाचे नाव ' मिलिंद पन्ह ' आहे. मिलिंदाने असा प्रश्न विचारला की धर्मास ग्लानी का येते ? नागसेनाने त्याचे उत्तर देऊन त्याची तीन कारणे सांगितली.

पहिले कारण हे की एखादा धर्मच कच्चा असतो. त्या धर्माच्या मूळ तत्त्वात गांभीर्य नसते. तो कालिक धर्म बनतो व काळापुरता असा धर्म टिकतो.

दुसरे कारण हे की धर्म प्रचार करणारे विद्वान लोक नसतील तर धर्मग्लानी होते. ज्ञानी माणसांनी धर्म-ज्ञान सांगितले पाहिजे. विरोधकांशी वादविवाद करण्यास धर्माचे प्रचारक सिद्ध नसतील तर धर्माला ग्लानी येते.

आणि तिसरे कारण हे की धर्म व धर्माची तत्त्वे विद्वानासाठी असतात. प्राकृत व सामान्य लोकांकरिता मंदिरे-देवळे असतात. ते तेथे जाऊन आपल्या श्रेष्ठ विभूतीचे पूजन करतात.

आपण बौद्ध धर्म स्वीकारताना ही कारणे लक्षात ठेवली पाहिजेत. बौद्ध धर्माची तत्त्वे कालिक, काही कालापुरती आहेत असे कोणासही म्हणता यावयाचे नाही. आज दोन हजार पाचशे वर्षानंतरही बुद्धाची सारी तत्त्वे सर्व जग मानते. अमेरिकेमध्ये बुद्धाच्या दोन हजार संस्था आहेत. इंग्लंडमध्ये तीन लाख रुपये खर्च करून बौद्ध मंदीर बांधण्यात आले आहे. जर्मनीतही तीन, चार हजार बौद्ध संस्था आहेत. बुद्धाची तत्त्वे अजरामर आहेत. तथापि बुद्धानी असा दावा केला नाही की हा धर्म ईश्वराचा आहे. बुद्धानी सांगितले माझे वडील प्राकृत होते ; माझी आई प्राकृत बाई होती. हा धर्म तुम्हाला वाटेल तर घ्यावा. हा धर्म जेव्हा तुमच्या बुद्धीला पटेल तेव्हा तो तुम्ही स्वीकारा. एवढी उदारता दुसऱ्या कोणत्याही धर्मात सांगितलेली नाही.

बौद्ध धर्माचा मूळ पाया काय आहे ? इतर धर्मात व बौद्ध धर्मात फार फरक आहे. इतर धर्मात बदल हा घडून यावयाचा नाही, कारण मनुष्य व ईश्वर यांचा संबंध ते धर्म सांगतात. इतर धर्माचे म्हणणे असे की ईश्वराने सृष्टी निर्माण केली. ईश्वराने आकाश, वायु, चंद्र, सूर्य सर्व काही निर्माण केले. आम्हाला ईश्वराने काहीही करावयाचे शिल्लक ठेवले नाही, म्हणून ईश्वरास भजावे ! ख्रिस्ती धर्माप्रमाणे तर मृत्यूनंतर एक निर्णयाचा दिवस Day of Judgement असतो व त्या निर्णयाप्रमाणे सर्व काही घडते. देव व आत्मा यांना बौद्ध धर्मात जागा नाही. भगवान बुद्धानी सांगितले, जगात सर्वत्र दुःख आहे ; ९० टक्के माणसे दुःखाने पिडलेली आहेत. त्या दुःखातून पिडलेल्या, गरीब माणसांना मुक्त करणे हे बौद्ध धर्माचे मुख्य कार्य आहे. बुद्धापेक्षा कार्ल मार्क्सने वेगळे काय सांगितले ? भगवंतानी जे सांगितले ते वेड्या वाकड्या मार्गाने सांगितले नाही.

बंधुंनो, मला सांगावयाचे होते ते सांगितले. हा धर्म सर्वतोपरी परिपूर्ण आहे. त्यास लांछन कोठेच नाही. हिंदू धर्माची अशी काही तत्त्वप्रणाली आहे

की त्यामधून उत्साहच निर्माण होऊ शकत नाही. हजारो वर्षापासून परवापर्यंत आपल्या समाजामधून एकही मनुष्य ग्रॅज्युएट अगर विद्वान होऊ शकला नाही. मला सांगावयास हरकत नाही की माझ्या शाळेत झाडलोट करणारी एक बाई होती. ती मराठा होती. ती मला शिवत नसे. माझी आई मला सांगत असे की मोठ्या माणसास मामा म्हणत जा. पोस्टमनला मी मामा म्हणत असे. (प्रचंड हंशा) लहानपणी शाळेत असताना मला तहान लागली होती. मी मास्तरांना तसे सांगितले. मास्तरांनी माझ्या संरक्षणाकरिता चपराशाला दुसरीकडून बोलाविले व याला नळावर ने असे सांगितले. आम्ही नळावर गेलो. चपराशाने मग नळ सुरू केला व मी पाणी प्यालो. मला शाळेत पाणी प्यावयास मिळत नसे. पुढे मला डिस्ट्रिक्ट जज्जाची नोकरी देऊ केली होती. पण ती घोरपड मी गळयात बांधून घेतली नाही. माझ्या बांधवांचे कार्य मग कोण करील, असे माझ्यापुढे कोडे होते, म्हणून मी नोकरीच्या बंधनात अडकलो नाही.

मला वैयक्तिकरित्या या देशातील कोणतीही गोष्ट अशक्य नाही. (टाळया) तुमच्या डोक्यावर वैश्य, क्षत्रिय, ब्राह्मण अशी जी उतरंड रचली आहे ती कशी उलटेल व मोडेल हा खरा प्रश्न आहे. म्हणून या धर्माचे ज्ञान सर्वप्रकारे तुम्हाला करून देणे हे माझे कर्तव्य आहे. मी पुस्तके लिहून तुमच्या शंका कुशंका दूर करीन व ज्ञानाच्या पूर्णावस्थेला तुम्हास नेण्याचे सर्व प्रयत्न करीन. आज तरी तुम्ही माझ्यावर विश्वास ठेवून वागले पाहिजे.

मात्र तुमचीही जबाबदारी मोठी आहे. तुमच्याबद्दल इतर लोकांना आदर वाटेल, मान सन्मान वाटेल अशी तुम्ही कृती केली पाहिजे. हा धर्म म्हणजे आपण एक गळयात मढे अडकवून घेत आहोत असे मानू नका. बौद्ध धर्माच्या दृष्टीने भारताची भूमी सध्या शून्यवत् आहे. म्हणून आपण उत्तम रीतीने धर्म पाळण्याचा निर्धार केला पाहिजे. नाही तर महार लोकांनी तो निंदाजनक स्थितीस आणला असे होऊ नये म्हणून आपण दृढनिश्चय केला पाहिजे. हे आपल्याला साधले तर आपण आपल्या बरोबर देशाचा, इतकेच नव्हे तर जगाचाही उद्धार करू. कारण बौद्ध धर्मानेच जगाचा उद्धार होणार आहे. जगात जोपर्यंत न्याय मिळत नाही तोपर्यंत शांतता राहाणार नाही.

हा नवा मार्ग जबाबदारीचा आहे. आपण काही संकल्प केला आहे, काही इच्छिलेले आहे, हे तरुणांनी लक्षात घ्यावे. त्यांनी केवळ पोटाचे पाईक बनू नये. आपल्या प्राप्तीचा निदान २० वा हिस्सा या कामी देईन, असा निश्चय करावा. मला सर्वांना बरोबर न्यावयाचे आहे. प्रथम तथागताने काही व्यक्तींना दीक्षा दिली व त्यांना '' या धर्माचा प्रचार करा '' असा आदेश

दिला. त्याप्रमाणे पुढे यश व त्याच्या ४० मित्रांनी बौद्ध दीक्षा घेतली. यश हा श्रीमंत घराण्यातील होता. त्यांना भगवंताने सांगितले, हा धर्म कसा आहे ? तर '' बहुजन हिताय बहुजन सुखाय, लोकानुकंपाय, धम्म आदि कल्याणं, मध्य कल्याणं, पर्यावसान कल्याणं '' त्या वेळच्या परिस्थितीप्रमाणे तथागताने आपल्या धर्माच्या प्रचाराचा मार्ग तयार केला. आता आपणालाही यंत्रणा तयार करावी लागेल म्हणून समारंभानंतर दरेकाने दरेकाला दीक्षा द्यावी. दरेक बौद्ध माणसाला दीक्षा देण्याचा अधिकार आहे असे मी जाहीर करतो. ''[१]

● ● ●

[१] प्रबुद्ध भारत–आंबेडकर बौद्ध दीक्षा विशेषांक : २७ ऑक्टोबर १९५६.

# मला धर्म जास्त प्यारा आहे आणि त्यासाठीच मी माझी शक्ति वेचणार आहे

मध्य प्रदेश दलित फेडरेशन शाखेच्या वतीने, ता. १५ ऑक्टोबर १९५६ रोजी सायंकाळी ५.३० वाजता, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या सन्मानार्थ, नागपूर मधील श्याम हॉटेल मध्ये छोटीशी चहा पार्टी देण्यात आली होती. या समारंभास सौ. माईसाहेब होत्या. शिवाय, दलित फेडरेशनचे पदाधिकारी व कार्यकर्त्यांपैकी बॅ. राजाभाऊ खोब्रागडे, श्री. दादासाहेब गायकवाड, श्री. हरिदास आवळेबाबू, श्री. मेश्राम, श्री. कुंभारे, श्री. गोंडाणे, श्री. जी. टी. परमार (गुजरात), श्री. ए. जी. पवार, श्री. आर. डी. भंडारे व श्री. बी. सी. कांबळे वगैरे हजर होते.

प्रथम श्री. हरिदास आवळेबाबू यांनी, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी हजर राहून उपकृत केल्याबद्दल डॉक्टर साहेबांचे आभार मानले नंतर, दलित फेडरेशनच्या कार्यकर्त्यांना उद्देशून मार्गदर्शनपर दोन शब्द सांगावेत म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना विनंती केली.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी या विनंतीस मान देऊन, कार्यकर्त्यांना उपदेशपर असे भाषण हिंदीत केले. ते म्हणाले,

या ठिकाणी मला भाषण करावे लागेल याची काही कल्पना नव्हती. तशी कल्पना असती तर माझे विचार संकलित करून मांडणे सोईचे झाले असते. एकंदरित मला असे दिसते की तुम्हाला राजकारण फार प्यारे आहे. कोणत्याही गोष्टीपेक्षा राजकारणाची तुम्हाला अधिक आवड दिसते. माझे तसे नाही. मला धर्म जास्त प्यारा आहे आणि त्यासाठीच मी माझी शक्ती वेचणार आहे.

तुम्हाला काही खास अधिकार मिळवून देण्यासाठी मी आजवर खूप प्रयत्न केले. ते अधिकार मिळवून देण्यासाठी मी गांधींशी झगडा केला, काँग्रेसशी सामना दिला. त्यावेळी प्रथमतः त्यावेळच्या मुंबई असेंब्लीत आमचे १५-१६ लोक निवडून आले. असेंब्लीत सरकार विरोधी पक्ष म्हणून आम्ही काम केले. ते एवढे वाखाणण्यासारखे होते की असेंब्लीमधील आदर्श विरोध म्हणून त्यावेळचे मुख्यमंत्री श्री. खेर यांना उद्‌गार काढावे लागले. त्या काळानंतर लढाई आली. लढाईच्या काळात काही विशेष करता आले नाही.

---

प्रबुद्ध भारत–आंबेडकर बौद्ध दीक्षा विशेषांक : २७ ऑक्टोबर १९५६.

आपला देश स्वतंत्र झाल्यावर राज्यघटना घडविली जातेवेळी आपल्या राखीव अधिकारांचा विचार झाला. कॉंग्रेसवाल्यांना राखीव जागांकरिता स्वतंत्र मतदार संघ मान्य नव्हता. तेव्हा जे वारे वाहत होते ते संयुक्त मतदार संघाचे होते. याचाही प्रयोग करून पाहावा, असे पुष्कळांना वाटले. चोराची लंगोटीदेखील सोडू नये म्हणतात. त्याप्रमाणे राखीव जागा सोडून न देता त्यांचा संयुक्त मतदार संघाने प्रयोग करावा असे वाटले. पण आता असा अनुभव येऊन चुकला आहे की, कॉंग्रेसच्या तिकिटावर राखीव जागेवर जी माणसे येतात ती आपली तोंडे बंद करून बसतात. अशा तऱ्हेने संयुक्त मतदार संघामुळे जर गधे लोक निवडून येत असतील तर निवडणुकांचा व जागांचा उपयोग तरी काय ? त्यांचा काही उपयोग होत नाही हे अनुभवाने आता सिद्ध झाले आहे.

राखीव जागा नकोत म्हणून फेडरेशनने ठराव केला आहे. त्या ठरावास मी चिकटून राहू इच्छितो. त्या ठरावापासून ढळण्याची माझी इच्छा नाही. राखीव जागा १० वर्षासाठी आहेत. त्या जागा आता या निवडणुकानंतर राहाणार नाहीत. आपल्या समाजाचे ऐक्य ही कोणत्याही गोष्टीपेक्षा अधिक महत्त्वाची गोष्ट आहे. या राखीव जागा गौण आहेत.

आपल्या आजपर्यंतच्या फेडरेशनच्या चळवळीने स्वाभिमान अवश्य निर्माण केला. ही गोष्ट फेडरेशनला भूषणावह आहे. त्यामुळे संघटना झाली. तथापि त्यामुळे एक प्रकारची तटबंदीही निर्माण झाली. दुसरे लोक आम्हाला मत देत नाहीत व आपण लोक त्यांना मत देत नाही, ही एक प्रकारची तटबंदीच होय. दुर्दैवाने आपली लोकसंख्या कमी आहे. आपण केवळ अल्पसंख्यांक आहोत. अशा परिस्थितीत फेडरेशन आहे त्या स्थितीत ठेवणे कठीण आहे.

यासाठी इतर समाजातील आमचे दुःख जाणणारे कोण आहेत हे पाहिले पाहिजे. अशा सर्वांना आपण एकत्रित करून त्यांच्यासह जाण्याची आपली सिद्धता पाहिजे. अशा लोकांना एकत्रित करण्याचा मी प्रयत्न करीत आहे. तो प्रयत्न यशस्वी झाल्यास आपल्याला नवीन पक्ष स्थापावा लागेल व त्या पक्षात आपल्याशिवाय इतरांनाही दार मोकळे राहील.

तुमच्यातच नव्हे तर या देशात एक विचित्र विकृती दिसून येते. ती ही की आज झाड लावले की त्यास दुसऱ्या दिवशी फळ खावयास आले पाहिजे, असे लोकांना वाटते. राजकारणात अशी अपेक्षा धरणे चूक आहे.

इंग्लंडमधील राजकारण घ्या. तेथील ब्रिटिश मजूर पक्षाचा इतिहास काय सांगतो. १९०० साली त्यांचे फक्त दोन लोक पार्लमेंटात निवडून आले. १९०६ साली त्यांना सुमारे १४ जागा मिळाल्या. १९२४ पर्यंत त्यांना विशेष यश नव्हते. त्या साली मात्र त्यांचे जवळजवळ १२५ लोक निवडून तो खरा विरोधी पक्ष बनला. अशा तऱ्हेने राजकारण हा दमाचा व धीराचा खेळ आहे. ज्यांना दम, धीर नाही त्यांना राजकारण करता यावयाचे नाही.

आता इतर समाजाच्या सर्व लोकांबरोबर काम करावयास तुम्ही शिकले पाहिजे. तुमच्यात तुम्ही फूट ठेवून चालणार नाही. माझ्या दबदब्यामुळे अजून काही वेडेवाकडे घडत नाही. पण मी तुम्हासाठी कोठपर्यंत राहाणार ?

आता उमेदवार निवडण्याचे काम लोकांनीच केले पाहिजे. लोकांमध्ये तुम्ही काम केले पाहिजे. त्यांच्या अडीअडचणींना तुमच्या ताकदीप्रमाणे वाचा फोडली पाहिजे. त्यांच्या सुखदु:खाशी समरस होण्याचा तुम्ही प्रयत्न केला पाहिजे.

मी भंडाऱ्यातील निवडणुकीमध्ये पडलो त्याचे मला कधी वाईट वाटले नाही. तरी त्या निवडणुकीत मला बरीच मते पडली. आपली मते सोडली तर इतर समाजाने देखील मला मते दिलेली आहेत. ही गोष्ट माझ्या समाधानाची आहे. मी पडलो की निवडून आलो हा प्रश्न मी विचारात घेत नाही. तुम्हीही अशाचप्रकारे कर्तबगार होण्याचा प्रयत्न करून, इतर समाजास देखील तुम्हास मते द्यावीत असे वाटले पाहिजे. माझी खात्री आहे की या गोष्टीचा विचार करून तुम्ही तुमचे राजकीय जीवन व कार्यक्रम चालवाल. यापेक्षा आता अधिक काही मी सांगत नाही.

शेवटी श्री. हरिदास आवळे यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे हार्दिक आभार मानले व बाबासाहेबांच्या उपदेशाप्रमाणे आम्ही वागू असे आश्वासन त्यांनी व्यक्त केले व चहापार्टी समाप्त झाली.



## ३४४

# राजकारणात भक्तीला विभूतीपूजेचे रुप आले की सर्वाधिकारशाही निर्माण होण्याचे भय असते

" ता. १५ ऑक्टोबर १९५६ रोजी नागपूर कार्पोरेशनच्या वतीने डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा सत्कार करण्यात आला. सदर सत्कारास नागपूर शहरातील सर्व नगरपिते व प्रतिष्ठित नागरिक हजर होते. सत्कारासाठी खास मंडपही तयार करण्यात आला होता. सदर समारंभ, संध्याकाळी ६ ते ८ च्या दरम्यान पार पडला. सभा मंडप गच्च भरून गेला होता. बाहेर रस्त्यावर दोहो बाजूस प्रचंड गर्दी लोटली होती.

प्रथम नागपूर कार्पोरेशनचे मेयर (महापौर) श्री. रा. पै. समर्थ यांनी छापील मानपत्र वाचून दाखविले. ते मानपत्र असे,

**मानपत्र**

भारतीय पददलित जनतेच्या मूक भावनांची साकारमूर्ती

सन्माननीय डॉ. बाबासाहेब आंबेडकर

एम. ए., पीएच्. डी., डी. एस्‌सी., बार ॲट–लॉ.

आपल्यासारख्या समाजसुधारक, तत्त्वज्ञ व विधिज्ञ पंडिताचे स्वागत करण्याची संधी नागपूरच्या जनतेस लाभली याबद्दल आम्हास परमहर्ष होत आहे.

तसे पाहिले तर नागपूर शहराशी आपल्या जीवनाचा अत्यंत घनिष्ट संबंध आला आहे. महान परिश्रमाने विद्यासंपन्न झाल्यानंतर याच नगरीत आपण १९३० साली दलित जनता परिषद भरवून, देशातील दलित समाजाला मार्गदर्शन केले आहे व आपल्या सामाजिक आणि राजकीय जीवनाला प्रारंभ केला आहे. याच नगरीत १९४२ साली अखिल भारतीय शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनला जन्म देऊन पददलित समाजाच्या राजकीय आकांक्षांचा निनाद आपण साऱ्या भारतात प्रथम दुमदुमविला आहे आणि आज याच नगरीत आपल्या उत्तर जीवनात बौद्ध धर्माची दीक्षा घेऊन आपण आपल्या नवीन जीवनाला प्रारंभ करीत आहात.

आपल्या अष्टपैलू जीवनाकडे दृष्टीक्षेप केल्यास असे दिसून येईल की, आपला पिंड प्रगाढ पंडिताचा असला तरी तो नुसत्या तार्किक विवेचनात गुरफटून न ठेवता प्रत्यक्ष कर्तव्यसृष्टीत उतरविला आहे. शतकानुशतके धार्मिक, सामाजिक व आर्थिक अशा सर्वच बाबतीत पिळवटून निघालेल्या अस्पृश्य समाजाच्या मूक व करूण किंकाळ्यांनी आपल्या हृदयाला पाझर फुटून आपण त्यांच्या सेवेचे असिधाराव्रत स्वीकारले.

महाडचा " चवदार तळ्याचा सत्याग्रह, नाशिक येथील काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह " यासारख्या कितीतरी सत्वपरीक्षांनी आपले जीवन अधिकच उज्ज्वल केले आहे. ' वन्ही तो चेतवावा रे, चेतविताची चेततो ! केल्याने होत आहे रे आधी केलेचि पाहिजे ! ' या समर्थ रामदासांच्या उक्तीप्रमाणे दलित समाजाचा आत्मा आपल्या अविरत परिश्रमाने जागृत झाला आणि त्याने आपल्या राजकीय व सामाजिक हक्कासाठी आपल्या नेतृत्वाखाली लढा आरंभिला. त्याचाच परिपाक लंडन शहरी भरलेल्या गोलमेज परिषदेत दलित समाजाचे एकमेव नेते म्हणून आपली निवड होण्यात झाला. गोलमेज परिषदेतील आपली कामगिरी स्पृहणीय आहे.

आपल्या अंगच्या अशा असामान्य गुणांमुळेच १९४२ साली त्यावेळच्या भारत सरकारने मज़ूर मंत्री म्हणून आपली नियुक्ती केली आणि आपण ती जबाबदारी उत्कृष्टपणे सांभाळली व श्रमजिवी वर्गाची आपण अपरिमित सेवा केली.

पारतंत्र्याच्या काळोख्यात रात्रीनंतर भारतीय क्षितिजावर स्वातंत्र्यसूर्याचा उदय झाला. या स्वातंत्र्यरवीचा प्रकाश प्रत्येक भारतीयाच्या जीवनात पडून त्याचे जीवन तेजोमय झाले पाहिजें, म्हणून भारतीय सार्वभौम गणराज्याची घटना तयार करण्याचे ठरले. आपण घटना समितीवर निवडून आलात आणि या समितीचे* अध्यक्षपदी विराजमान झालात. समता, स्वातंत्र्य आणि बंधुभाव या त्रयींवर उभारलेल्या सामाजिक, राजकीय व आर्थिक न्याय्य हक्कांच्या राष्ट्रीय सनदेचा जन्म आपल्या नेतृत्वाखाली झाला. भारतीय घटनेचे शिल्पकार म्हणून आपणास कलियुगातील ' स्मृतिकार मनू ' अशी सार्थ पदवी भारतीयांनी दिली. भारतीय राज्यघटना आपली स्मृती भारतवर्षात चिरकाल टिकविल अशी आम्हाला खात्री आहे. तसेच स्वतंत्र भारत सरकारचे विधिमंत्री असताना आपण हिंदू कोड बिलाच्या योगाने भारतीय स्त्री जातीच्या हक्कांचे जे समर्थन केले त्याला दुसरी तोड नाही. युगानुयुगे भारतीय स्त्री जात आपल्या सेवेबद्दल ऋणी राहील.

शिक्षणाशिवाय जीवन पवित्र व तेजस्वी होत नाही हे ओळखून बहुजन समाजाच्या जीवनात त्याचा प्रसार करण्याकरिता अनेक अडचणींना तोंड देऊन आपण मुंबई येथे पीपल्स एज्युकेशन सोसायटी नावाची संस्था स्थापन केली व तिच्या विद्यमाने मुंबई येथे सिद्धार्थ महाविद्यालय व औरंगाबाद येथे मिलिंद महाविद्यालय काढून दलित समाजाकरिता उच्च शिक्षणाचे महाद्वार मुक्त केले आहे. बाबासाहेब, आपले सारे जीवन बहुजन हिताय व बहुजन सुखायच खर्च झाले आहे. पददलितांच्या उन्नतीशिवाय राष्ट्र उन्नत होणार नाही या आपल्या मताविषयी दुमत होऊ शकणार नाही.

---

* समितीऐवजी ' मसूदा समिती ' असा शब्द यायला हवा होता.—संपादक.

आजच्या अशांत युगात शांती व अहिंसेचेच तत्त्व जगाला आशेचा किरण दाखवून पथप्रदर्शन करील अशी प्रत्येकाची धारणा आहे. शांती व अहिंसेचा भारतात व भारताबाहेर अडीच हजार वर्षांपूर्वी प्रचार केलेल्या सम्राट अशोकाच्या अशोकचक्राला आपल्या राष्ट्रीय ध्वजावर स्थान प्राप्त झाले आहे. त्याच महान सम्राटने स्वीकारलेल्या बौद्ध धर्माची दीक्षा आपण घेत आहात. भारताच्या शांती व अहिंसा नीतीचा प्रकाश आपण साऱ्या विश्वात प्रसारित कराल अशी आम्हास खात्री आहे. परमेश्वर आपणास दीर्घायुष्य प्रदान करो !

विनित

नागपूर : महापौर व सदस्य,

दिनांक १५-१०-५६. नागपूर महानगरपालिका." [१]

मानपत्र वाचल्यानंतर महापौरांनी बाबासाहेबांना पुष्पहार अर्पण करून सत्कार केला.

मानपत्राच्या उत्तरादाखल केलेल्या भाषणात डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

" नागपूर कार्पोरेशनचे मेयर, कार्पोरेटर्स आणि उपस्थित नागरिकहो,

नागपूर शहराशी व या प्रांताशी माझा विशेष संबंध नाही. माझा राजकीय संबंधही तितकासा नाही. या प्रांताशी माझा संबंध एवढाच आहे की, येथे माझे काही लोक राहातात. या प्रांतासाठी मी विशेष असे काहीही केलेले नाही. म्युनिसीपालिटीचा मी काही सभासद नव्हतो. त्यामुळे म्युनिसीपल कारभाराबाबत तुम्हास उपदेश करू शकणार नाही. (हंशा). या प्रसंगी तुम्हास कोणत्या विषयावर दोन शब्द सांगावे याचा विचार मी करीत आहे. हा विचार करताना मला असे वाटते की, म्युनिसीपालिटीचा कारभार व देशाचा कारभार यात पुष्कळ साम्य आहे, म्हणून या प्रसंगी आपल्या देशाच्या कारभारासंबंधी मी तुम्हास दोन शब्द सांगू इच्छितो.

हिंदुस्थानात माझ्यासारखे विद्वान आहेत पण मला अभिनंदनपत्र भेट करून आपण माझा गौरव केला, ही आपली उदारता आहे. भारताची राज्यघटना अंमलात येऊन पाच वर्षे झालीत. ही घटना चालते याचा प्रत्येकाने विचार करावयास पाहिजे. बाह्यात्कारी असे दिसेल की, आपली व इंग्लंडमधील राज्ययंत्रणा, काही भाग सोडला, तर बहुतांशी सारखीच आहे. तिकडे प्रौढ मतदान पद्धतीने निवडणुका होतात, आपल्या देशातही तशाच निवडणुका

[१] प्रबुद्ध भारत–आंबेडकर बौद्ध दीक्षा विशेषांक : २७ ऑक्टोबर १९५६.

होतात. त्या देशात पार्लमेंट आहे, आपल्या देशातही पार्लमेंट आहे. त्या देशातील पार्लमेंटमध्ये बहुमताने निर्णय घेतात, आपल्या देशातील पार्लमेंटमध्येही बहुमताने निर्णय घेतात. असे असले तरी त्या देशातील राज्यकारभारात एक विलक्षण फरक दिसून येतो. इंग्लंडमध्ये प्रजातंत्रात्मक पद्धती आहे. आणि आपल्या येथे डिक्टेटरशीपचा उदय झालेला दिसत आहे. आपल्या देशातील कारभारात दिसायला एक व वागायला दुसरे असा प्रकार चालला आहे. तुम्ही या गोष्टीबाबत आपल्या देशाची राज्यघटना कशी काम करते व ती कशी राबविली जाते याचा विचार करता की नाही मला माहीत नाही. लोकांनी आता राज्यकारभाराबाबत व राज्यघटनेबाबत जागृत राहिले पाहिजे. भारताच्या नव्या संविधानाचा आद्यकर्ता मी आहे हे मी अभिमानाने सांगतो असे नाही पण निदान मी तरी तिचा आद्यकर्ता असल्यामुळे तसा नित्य विचार करीत असतो. आणि विचार करताना शेवटी या देशाचे होईल तरी काय असे भयानक चित्र माझ्या डोळ्यापुढे उभे राहते.

मला निवडणुकीची आता मोठी आवड नाही. राजकारणाचा उपयोग घेऊन मी पाहिला आहे. जातीपातीच्या भेदामुळे या देशातील राजकारण आता काँग्रेस राजवटीत असे बनले आहे की, अल्पसंख्य असलेल्या जमातींना जीवनासाठी तरणोपाय राहिलेला नाही. तरीपण मी काही राजकारण सोडणार नाही. जातीभेदामुळे अनेक वेळा अपयशच आले. पण झगडणार आहे. मी माझे राजकारण चालूच ठेवणार आहे. मी बॅट सोडून तंबूत जाणार नाही. (हंशा व टाळया)

मी तुम्हाला इंग्लंडमधील यंत्रणा व आपल्या देशातील यंत्रणा याबाबत सांगत होतो. इंग्लंड व आपल्यात मुख्य भेद असा की, आपल्याकडे मतदाराला उमेदवार निवडण्याचा हक्क दिसत नाही. तिकडे मतदारच उमेदवाराची निवड करतात. त्यांच्या मतदारसंघातील जे मतदार असतील त्यांना त्यांच्यामधील कोणता उमेदवार कसा आहे, त्याचे शिक्षण काय आहे, त्याचे चारित्र्य कसे आहे, त्याची समाजसेवेची वृत्ती कशी आहे याची चांगली कल्पना असते व त्यानुसार तेथील मतदारच आपला उमेदवार कोण असावा हे ठरवितात. आपल्या देशात याबाबतची तऱ्हा काही निराळीच आहे. कोणत्या मतदारसंघात कोण उमेदवार उभा करावा याचे स्वातंत्र्य अजूनही मतदारांना नाही. आज काँग्रेसची निवडणुकीबाबतची जी पद्धती चालू आहे त्यावरून तुम्हास हे दिसून येईल की, कोणत्या मतदारसंघात कोणास उभे करावे, हे सर्व दिल्ली काँग्रेस हायकमांड ठरविते. त्याची वास्तपुस्त मतदारसंघातील मतदारांना काहीच

नसते. हायकमांडने उभा केलेला उमेदवार कसा आहे, त्याचे चारित्र्य काय, त्याने काही काळाबाजार, अफरातफर केली आहे काय, तो समाजाच्या कल्याणाची बाजू घेऊन पार्लमेंट-असेंब्लीमध्ये झगडतो काय याच्याशी काँग्रेस हायकमांडने मतदारांना कोणतेच कर्तव्य ठेवलेले नाही. आम्ही सांगू त्याला तुम्ही मत दिलेच पाहिजे असा काँग्रेस हायकमांडचा दंडक आहे. काँग्रेसने एखादे गाढव उभे केले तरी त्याला तुम्ही मते देता. जर रस्त्यावरील खांबाला मते द्या असे सांगितले तरी काँग्रेसच्या हुकूमाप्रमाणे तुम्ही रस्त्यावरील खांबालासुद्धा मते द्याल. याला तुम्ही लोकशाही म्हणता? यास लोकशाही कोण म्हणेल? लोकशाहीवर हा शुद्ध घाला आहे. अशी पद्धत राष्ट्राला घातक आहे.

उमेदवार निवडण्याचा अधिकार त्या त्या मतदारगटाचा आहे. असे जर झाले नाही तर याला लोकशाही म्हणता येणार नाही. इंग्लंडमध्ये पक्षच नेत्याची आणि मंत्र्याची निवड करतो. आपल्याकडे मात्र नेता आपले सहकारी निवडण्याचे हक्क मागतो आणि ते राजरोस बजावतोही. ही उघड उघड हुकूमशाही आहे. त्यामुळेच आज काँग्रेस सत्ताधारी आहे. ज्या रितीने येथील कारभार चालतो व तुम्हीच काँग्रेसच्या हातात सुत्रे देता यावरून तुम्ही मूर्ख आहात, हे स्पष्टपणे तुम्हाला कोणीतरी सांगायलाच पाहिजे. (टाळ्या) हिंदुस्थान कोणीकडे जात आहे ?

सध्या काँग्रेसच्या राजकारणात स्त्रियांच्या सभासदांची संख्या वाढविण्यात येत आहे. स्त्रियांच्या या काँग्रेसी राजकारणाचा अर्थ काही समजत नाही. स्वधर्म सोडून बायकांनी राजकारणात हिंडावे यासारखी शरमेची गोष्ट नाही. महाराष्ट्रातील बायकांनी आता फक्त कासोटा सोडावयाचाच ठेवला आहे. काँग्रेसने २९२ बायका लोकसभेत घेण्याचा निर्णय घेतला आहे. जर बायका विधीमंडळात गेल्या तर पुरुषांनी काय करावे ? दिवसभर लोकसभेत राहिल्यानंतर जेव्हा फाईल्स बगलेत धरून बायका घरी येतील तर काय नवरे त्यांच्या टेबलावर भोजन ठेवतील ? या बायांनी दिवसभर पार्लमेंट-असेंब्लीमध्ये जावयाचे आणि संध्याकाळी परत आल्यावर नवऱ्याला विचारायचे, ' अहो, मी पार्लमेंटमधून आले आहे. झाली आहे की नाही घरातील सर्व व्यवस्था ? ' या बाया पार्लमेंटमध्ये जायच्या आणि त्यांची मुलं कोणी सांभाळायची ? एक मूल रडत आहे, दुसऱ्याला शेंबूड आहे, तिसरे भलते ठिकाणी गेले आहे. अशा मुलांची व्यवस्था मग ठेवणार कोण ? हे सर्व उलटे होत आहे. हा जगाचा उलटा कारभार आहे. बरे, तर पार्लमेंटमध्ये जाऊन या बाया करतात तरी काय ? त्याबाबत मला तरी सांगण्याची शरम वाटते. त्यांच्याबाबत सांगावे असा माझा विचार नव्हता.

पण आता सांगतोच. (हंशा) त्यांच्या अंगची नीतीमत्ता साफसाफ निघून चालली आहे. माझ्याकडे काही पत्रे आलेली आहेत. त्या पत्रातील मजकूर तर पंतप्रधानाबाबतचा आहे. अशी पत्रे लिहिणारी बाई महाराष्ट्रीयन आहे. ही मोठ्या शरमेची गोष्ट आहे. तिने पत्रामध्ये तर नेहरूंचा उल्लेख करून आमचे ' ते ' व आमचे ' हे ' असे करतील नि तसे करतील अशाप्रकारे लिहिले आहे. मी कॅबिनेटमध्ये असताना मला बडोद्याच्या महाराष्ट्रीयन बाईची पत्रे येत. त्यात ती मला भाऊजी म्हणत असे. जवाहरलाल नेहरूंना ती पती मानत असावी. दोन-तीन पत्रे मी जाळून टाकली. एक पत्र ठेवले. मी राजीनामा दिल्यावर मला जी पार्टी नेहरूंनी दिली त्याप्रसंगी नेहरू दुसऱ्या लोकात हिंडत म्हणून बाजूला त्यांचा कोट धरून खेचला. मजजवळचे पत्र दाखविले तेव्हा ते म्हणाले, ' अशी फडतूस पत्रे मला हजारो येतात. त्याकडे दुर्लक्ष करावे. मालवणकरांना विचारा'. हे काय उत्तर झाले ? बडोद्याची बाई तुझे नाव बदनाम करीत आहे हे मला समजावून द्यावयाचे होते. पण अशी अनेक पत्रे येतात असे उत्तर देऊन टाकले. याला काय चारित्र्याची चाड आहे म्हणावे ? या सर्व गोष्टींचा तुम्ही सर्वांनी पूर्ण विचार करावयास पाहिजे. या पार्लमेंटमध्ये जाणाऱ्या स्त्रिया अशा बहकलेल्या असतील तर त्यांना तेथे काँग्रेसने जाऊ देण्याचे काय कारण आहे ?

काँग्रेसच्या राजकारणातील आता दुसरे एक उदाहरण पाहा. आमच्या मुंबई राज्यातील मोरारजी देसाई म्हणतात, मला बिनविरोध निवडा व मंत्री कोण घ्यावयाचे ते मी ठरवीन. एकदा निवडल्यावर माझ्या कारभारात कोणीही ढवळाढवळ करता कामा नये. आता या प्रकारास काय म्हणावे ते तुम्ही पाहा. उद्या समजा मोरारजींना निवडले आणि त्यांनी त्यांच्या मंत्रीमंडळात एखादे कुत्रे नेमले तरी देखील त्यामध्ये कोणी ढवळाढवळ करू नये, असे सांगण्याचा मतलब आहे. ज्या इंग्लंडची राज्यपद्धती आपल्या राज्यघटनेमध्ये स्वीकारण्यात आली आहे तेथे हे कार्य कसे केले जाते ? त्या ठिकाणी सत्तेवर असलेल्या पक्षातील, पहिल्या रांगेत पार्लमेंटमध्ये बसलेले जे सभासद असतात त्या सर्वांच्या अनुमतीने या गोष्टी ठरविल्या जातात. एका माणसाला एकदा निवडले म्हणजे दुसरा कोणीही ढवळाढवळ करु नये असे तत्त्व तेथे कोणीही सांगत नाही व तसे सांगितले तर चालणारही नाही. पण आमच्या देशात मोरारजीभाईसारखे म्हणतात की, मी म्हणेन तेच झाले पाहिजे. उद्या मोरारजी मेले तर ती जागा त्यांच्याऐवजी तशीच राहील काय ? विधवेचा पुनर्विवाह होत नसे पण आता तसे नाही. जर्मनीमध्ये हिटलरची हुकूमशाही होती. त्याच्या एकट्याच्या तंत्राप्रमाणे त्याला राज्यकारभार हवा होता. त्यापेक्षा मोरारजी काही निराळे सांगत आहेत काय ? हा अजब प्रकार या देशातच व काँग्रेस

पक्षामार्फतच चालू शकतो. त्याचे काय घोर परिणाम या देशाला भोगावे लागतील याची कल्पना पुष्कळांना नाही. काँग्रेसच्या चालू राजवटीतील सुवेझ कॅनलबाबतचे नेहरूंचे धोरण घ्या. इजिप्तचे राष्ट्रपती नासेरने त्या कॅनलचे राष्ट्रीयीकरण केले आहे. नेहरू त्यास पाठिंबा देऊन एकप्रकारे चंचलता प्रदर्शित करीत आहेत. याबाबतीत मुख्य प्रश्न आहे तो हा की, जगाचा व्यापार-उदिम ज्या कॅनलच्या जलमार्गाच्या रहदारीवर अवलंबून आहे तो कॅनल एकाच राष्ट्राच्या अखत्यारीखाली असला पाहिजे की आंतरराष्ट्रीय नियंत्रणाखाली असला पाहिजे ? भारताचा फार मोठा व्यापार या कॅनलच्या मार्गाने होतो.

पंडित नेहरू म्हणतात, म्हणून सुवेझ कालव्याचे राष्ट्रीयीकरण करा, असे सर्व लोक म्हणतात. पण नासेर यांनी भारताची जहाजे कालव्यातून नेणे बंद केले तर विकास योजनेचे काय होईल ? याचा विचार करा. आज नासेर तुमचा दोस्त आहे. उद्या नासेरने कालवाबंदी केली तर काय होईल ?

या देशात भक्तियोग फार बोकाळलेला आहे. भारताची घटना तयार झाल्यानंतर यासंबंधात मी पार्लमेंटमध्ये शेवटचे भाषण दिले व त्यात याची मीमांसा केली होती. भक्तीला राजकारणात विभूतीपूजेचे रूप येते. त्यातून सर्वाधिकारशाही निर्माण होण्याचे भय असते. म्हणून आपण फार जागृत राहिले पाहिजे, असा मी त्यावेळी इशारा दिला होता. चमत्कारिक गोष्टींना फाजील महत्त्व दिले जाते. गटारातील पाणी पिणाऱ्यांना गटारातच सर्वत्र ब्रह्म दिसते. त्यालाच महासाधु म्हटले जाते. अशी पूर्वपरंपरा आमच्या देशात चालत आलेली आहे.

जमिनीचे तुकडे गोळा करतो, दगडधोंडे गोळा करतो, काय त्याचे नाव ? (श्रोत्यांतून आवाज, विनोबा भावे) होय. तोच तो विन्या, काय गोळा केले आहे त्याने ? नाकातून एकीकडे शेंबूड वाहात असता दुसरीकडे तो व्याख्याने देतो. देशाच्या राजकारणाशी त्याचा काय संबंध ? पार्लमेंट कशासाठी आहे ? त्याच्यासाठी पार्लमेंट का मोडून टाकीत नाही ? हे गृहस्थ ठिकठिकाणी हिंडून भूदानासाठी जमिनी गोळा करीत आहेत. एवढेच जर आहे तर लोक विनोबा भावे यांनाच पंतप्रधान का करीत नाही ? विनोबा भावे यांनी पंतप्रधान व्हावे व देशातील जमिनीचा प्रश्न सोडवावा, नाही तर उगीच हा चोंबडेपणा कशाला हवा ? हे ना धड काँग्रेस सरकारचे काम ना धड भावेचे काम असे होऊन बसले आहे.

या देशात बुवाबाजीचे फार मोठे खूळ आहे. एखाद्या माणसाने काही विचित्र केले तर तो साधुपुरुष बनतो. त्याने जर फाटके कपडे घातले, गटारातील पाणी तो प्याला अगर लंगोटी लावली असे काही विचित्र केले की, या देशात त्या माणसाला साधुपुरुष मानतात. पण एखाद्याने स्वच्छ कपडे वापरले, स्वच्छ पाणी पाहिजे असे म्हटले की, मोठा मिजासखोर आहे असे

म्हणतात. हा देश असा विक्षिप्त विचारसरणीत सापडला आहे. त्यासाठी आता सर्वांनी जागृत राहून हे प्रकार बंद केले पाहिजेत.

आपण नवीन घटना घेतली आहे. आपल्याला या नवीन पद्धतीचा अनुभव नाही. ती जर अत्यंत दक्षतेने राबविली नाही तर या देशाचा नाश होईल. केवळ पांढऱ्या टोप्यांनी काम चालणार नाही. सगळया राष्ट्राने बसून राजकारणाचा अभ्यास केला पाहिजे. एकट्या जवाहरलाल नेहरूलाच बुद्धी दिली आहे असेही नाही. जवाहरलालपेक्षा बुद्धिमान अनेक आहेत. मी पाच वर्षे कॅबिनेटमध्ये होतो. पाच वर्षाचा मला अनुभव आहे. आठ दिवसातून एकवेळ मी काँग्रेसच्या बैठकीला हजर राहात असे. जवाहरलाल चांगले तोलून पाहिले आहेत. त्याचे डोके केवळ पोकळ भोपळयाप्रमाणे आहे. त्यापलिकडे काही नाही. जवाहरलालचे नाक सरळ आहे. रंग गोरागोमटा आहे. म्हणून त्यास महत्त्व येत असेल तर गोष्ट वेगळी. पण अशी व्यक्ती शारदा नाटकात म्हटल्याप्रमाणे ' पाहिजे मुलीला सुंदर नवरा ' या दृष्टीने उत्तम ठरेल. पण नेता बुद्धिमान पाहिजे, कणखर पाहिजे, तो देशाचे कार्य करणारा हवा असेल तर असे अनेक लोक सापडतील. पण तुम्हाला मात्र तोच पाहिजे ना ! विषयांतर झाले आणि काहींना ते अरुचकर वाटले तर त्यांनी क्षमा करावी. तुम्ही कदाचित मला मते देणार नाहीत. पण त्याची मला फिकीर नाही.

मी चांगले ओळखतो की, या देशाच्या जातीगत राजनीतीमध्ये आम्हाला कोणतेही स्थान नाही. राजकीय जीवन व्यतीत करता येत नाही, अशी स्थिती आहे. जीवनातील पाच वर्षे मी केंद्रिय मंत्रीमंडळात काढली व दहा वर्षे केंद्रीय विधी मंत्रीमंडळात सदस्य म्हणून राहिलेलो आहे. आता मला पाहाण्यासारखे काही बाकी राहिले नाही. पूर्ण समाधान झाले आहे. राष्ट्राची हानी होऊ नये यासाठी हे सारे मी करतो. आज काँग्रेस सत्ताधारी आहे. ती तशीच पुढे सत्ताधारी राहिली तर या देशाला आग लागल्याशिवाय राहाणार नाही. "[१]

शेवटी स्थायी समितीचे चेअरमन श्री. चौधरी यांनी आभार मानले, आभार मानताना श्री. चौधरी म्हणाले, " काँग्रेसच्या राजकारणात, पडद्यामागे कशा कशा गोष्टी चालतात व काँग्रेस राज्य कसे हुकूमशाहीकडे चालले आहे, याची खात्री आम्हास डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या भाषणावरून पटली आहे. त्यासाठी, आपण सर्वांनी जागरुक राहिले पाहिजे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना देशकार्य करण्यास दीर्घायु लाभो अशी मी कार्पोरेशनच्या वतीने प्रार्थना करून आभार प्रदर्शन संपवितो. "[२]



---

[१] मी पाहिलेले बोधिसत्व डॉ. बाबासाहेब आंबेडकर : भिक्षु सुमेध, पृ. १०९-११४.

[२] प्रबुद्ध भारत–आंबेडकर बौद्ध दीक्षा विशेषांक : २७ ऑक्टोबर १९५६.

## ३४५
# बुद्धं सरणं गच्छामि

चंद्रपूर (महाराष्ट्र) या शहरात दीक्षा समारंभ दिनांक १६ ऑक्टोबर १९५६ला डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या हस्ते व्हावा, असा कार्यक्रम ठरला होता. त्या कार्यक्रमासाठी बाबासाहेब, माईसाहेब, नानकचंद रत्तू व बॅ. राजाभाऊ खोब्रागडे हे १६ ऑक्टोबरलाच सकाळी ५ वाजता नागपूरहून निघाले. चंद्रपूरवरून देवाजी खोब्रागडे आणि ज. गो. सन्त गुरुजी अगोदरच मूलला आले होते. त्यांनी बाबासाहेबांची मूलच्या सरकारी रेस्ट हाऊसमध्ये व्यवस्था केली होती. त्यांनी थोडा वेळ विश्रांती घेतली, विश्रांतीनंतर दुपारच्या सुमारास मूलवरून सरळ चंद्रपूरच्या सरकारी सर्किट हाऊसवर बाबासाहेब आले, तेव्हा दुपारचे ४ वाजले होते.

दीक्षा मंडपात व बाहेर लाखो लोक उपस्थित होते. सायंकाळी ७ वाजता बाबासाहेब नियोजित धम्मदीक्षेच्या स्थळी आले. त्यांच्या उजव्या हातात काठी होती. ते व्यासपीठावर येताच लाखो लोकांनी उभे राहून बाबासाहेबांचे स्वागत केले. बाबासाहेबांच्या जयजयकाराने वातावरण दुमदुमून गेले. लोकांचा उत्साह पाहून बाबासाहेबांनी त्यास प्रतिसाद देण्यासाठी हात उंचावला आणि नंतर काठीच्या आधाराने ते खुर्चीत बसले.

बुद्ध प्रतिमेच्यासमोर मेणबत्ती व अगरबत्ती लावण्यात आली. बुद्ध प्रतिमेला फुले वाहण्यात आली. त्यानंतर अनेक संस्थांच्या वतीने बाबासाहेबांना पुष्पहार अर्पण करण्यात आले. लाखो लोक दीक्षा घेण्यासाठी पांढरे शुभ्र वस्त्र परिधान करून आले होते. त्यावेळी असे सांगण्यात आले की, चंद्रपूरच्या बाजारपेठेतील पांढरे कापड हा हा म्हणता संपून गेले होते. पांढऱ्या कपड्यातील स्त्री-पुरुषांच्या चेहऱ्यावर उत्साह आणि आनंद दिसत होता.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी उपस्थित लोकांना ''बुद्धं सरणं गच्छामि...'' त्रिसरण-पंचशील आणि २२ प्रतिज्ञा दिल्या. याप्रमाणे धम्मदीक्षा दिली. अशाप्रकारे चंद्रपूरला तीन लाख लोकांनी बाबासाहेबांच्या हस्ते धम्मदीक्षा घेतली.



---

मी पाहिलेले बोधीसत्व डॉ. बाबासाहेब आंबेडकर : भिक्षु सुमेध. पृ. ११४-११६.

# ३४६
# दुःख निवारणाचा मार्ग दाखविणे बुद्ध धर्माचे अंतिम ध्येय

'' भारताचे माजी कायदेमंत्री डॉ. बाबासाहेब आंबेडकर व सौ. सविता आंबेडकर दिल्लीहून आज दिनांक १३ नोव्हेंबर १९५६ रोजी दुपारी काठमांडू येथे जगातील बौद्ध धर्मीय लोकांच्या चौथ्या जागतिक परिषदेत भाग घेण्यासाठी आले. काठमांडू विमानतळावर उभयतांचे भव्य स्वागत करण्यात आले. नेपाळ सरकारतर्फे चिफ् ऑफ प्रोटोकॉल, भिक्षू आनंद कौशल्यायन, विविध संस्थांचे प्रतिनिधी, स्वयंसेवक तसेच स्त्री-पुरुषांचा मोठा जमाव त्यांच्या स्वागताकरिता हजर होता. डॉ. आंबेडकर पती-पत्नी विमानातून खाली उतरताच '' आंबेडकर जिंदाबाद '' अशा गगनभेदी घोषणांनी तेथील वातावरण दुमदुमून गेले होते. तशाच घोषणा करीत त्यांना मिरवणूकीने नेपाळ सरकारच्या '' सितल महालात '' पोहोचविण्यात आले. नेपाळ सरकारचे खास पाहुणे म्हणून ते तेथे राहाणार आहेत. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची प्रकृती चांगली असून त्यांना नेपाळी हवामान चांगलेच मानवले असे दिसते. काठमांडूतील अस्पृश्य समाजातील प्रमुख कार्यकर्त्यांनी तसेच महिला संघटनेच्या मुख्यांनी आज रात्री डॉ. आंबेडकरांची भेट घेऊन नेपाळातील अस्पृश्यांच्या परिस्थितीची त्यांना माहिती सांगितली.

जगातील बौद्ध धर्मीय लोकांची चौथी जागतिक परिषद दि. १५ नोव्हेंबरपासून सुरु होत आहे. या परिषदेस हजर राहाण्यासाठी जगातील निरनिराळ्या देशातून बौद्ध भिख्खु, भिख्खुणी, प्रतिनिधी, खास आमंत्रणावरून बोलविलेल्या प्रमुख व्यक्ती, ऑब्झरव्हर्स इत्यादी मिळून ६२५ लोकांना आमंत्रणे पाठविण्यात आली आहेत. ही परिषद धर्मोदय सभा, काठमांडू हिच्यावतीने घेण्यात आली असून तिचे अध्यक्ष, महाथेरो अमृतानंद आहेत. डॉ. बाबासाहेब आंबेडकर पती-पत्नीला बौद्ध धर्माची धर्मदिक्षा नागपूरला देणारे कुशीनगरचे ८३ वर्षाचे महाथेरो भिख्खू चंद्रमणी आले असून त्यांच्या तिसऱ्या तुकडीत पाच लोक होते. तिचे नेतृत्व भिख्खू चंद्रमणी यांनीच केले होते... भिक्षु चंद्रमणीशिवाय

भारतातून आलेल्या भिक्षुत वर्ध्याचे (नागपूर) भिक्षु भदन्त आनंद कौशल्यायन, अगरतला (त्रिपुरा, कलकत्ता) वेणुवन विहाराचे भिक्षु आर्यमित्रही, आज विमानाने काठमांडूत दाखल झालेले आहेत. ''[1]

'' पंडित राहूल सांकृत्यायन परिषदेसाठी आले होते. त्यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भेट घेतली. यावेळी झालेल्या चर्चेची आठवण सांगताना ते लिहितात, नवम्बर १९५६ का वह दिन नही भूल सकता, जबकी नेपाल में डॉ. बाबासाहाब आंबेडकरने बडे भावावेशमें पर गंभीरता के साथ घोषित किया –दो वर्ष और जी जावूं तो भारत मे पाँच करोड बौद्धों को दिखा दूँगा। हजार अफसोस की वह संकल्प पूरा नही हुआ ''[2]

'' जागतिक बौद्धधर्मीय परिषदेच्या चौथ्या सभेमध्ये जगातील चौतीस राष्ट्रांनी भाग घेतला असून, त्यात प्रामुख्याने बर्मा, कॅनडा, सिलोन, चायना, झेकोस्लोव्हाकीया, इस्थोनिया, फार्मोसा, फ्रान्स, जर्मनी, हाँगकाँग, हंगेरी, भारत, इंडोनेशिया, इटली, जपान, कोरिया, लडाख, लाटव्हिया, लाओस, मलाया, नेपाळ, पाकिस्तान, पेनांग, फिलीपाईन्स, स्वीडन, सिक्कीम, सिंगापूर, थायलंड, तिबेट, युनायटेड किंगडम, यु. एस. ए., यू. एस. एस. आर., त्या त्या देशातील प्रतिनिधी, खास निमंत्रणाने बोलाविलेले पाहुणे, बुद्ध भिक्षु, बुद्ध भिक्षुणी, ऑब्झरव्हर्स इत्यादी मिळून ४०० निमंत्रित परदेशीय प्रतिनिधी काठमांडूतील सभेच्या ठिकाणी उपस्थित होते. काठमांडूतील भव्य अशा तुडखेल ग्राउंडवर हा जागतिक चौथ्या बौद्धधर्मीय परिषदेचा मेळावा भरला होता. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी आज भारतीय पद्धतीचा पोषाख केला होता. उलनची पँट आणि गळयापर्यंत बटन असलेला भारतीय पद्धतीचा त्याच रंगाचा कोट घातला होता आणि डोक्यावर बफ रंगाची नक्षीदार टोपी घातली होती.

बौद्धधर्मीय लोकांची चौथी जागतिक परिषद यशस्वी होवो अशी सदिच्छा व्यक्त करणाऱ्या तीस देशांनी आणि संस्थांनी आपापले संदेश पाठविले होते. हे संदेश वाचून झाल्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाले.

आपल्या भाषणात डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

मी माझ्या देशातून किंवा संस्थेकडून तुम्हाला संदेश घेऊन आलो नाही. या देशामध्ये, नेपाळात, बुद्धाचा जन्म झाला. परंतु २५०० वर्षानंतर बुद्ध धर्म नाहीसा झाला आहे. बुद्ध धर्माचा वृक्ष अद्याप आहे, त्याचा पाला सुकलेला आहे. परंतु त्याचे मूळ सुकलेले नाही. त्याला पाणी घातले तर तो वृक्ष वाढेल अशी माझी

---

[1] प्रबुद्ध भारत : २४ नोव्हेंबर १९५६.

[2] आधुनिक संसार का महान व्यक्तित्वः डॉक्टर आंबेडकर : महापण्डित राहुल सांकृत्यायन पृ. ८.

खात्री आहे. म्हणून मी येथे संदेश आणला नाही. मी तुम्हाला संदेश आणला नाही. परंतु मी बौद्ध धर्म का स्वीकारला हे तुम्हाला सांगू इच्छितो. मी बौद्ध धर्म का स्वीकारला ? कारण त्यात समता, बंधुभाव आणि स्वातंत्र्य आहे. इतर धर्मामध्ये ईश्वर आणि आत्मा यांचेशिवाय दुसरे काही नाही. मनुष्यमात्राच्या उन्नतीला ही जी तीन कारणे आहेत त्यांचा इतर धर्मामध्ये समावेश केलेला नाही. बौद्ध धर्माचे अधिष्ठान, जगात दुःख आहे ह्या तत्त्वावर बसविलेले आहे, ईश्वर व आत्मा यांचेवर बसविलेले नाही. माणसे जगामध्ये दुःखी आहेत ह्या तत्त्वावर बसविलेले आहे. इतकेच नव्हे तर त्या दुःखाचे निवारण करणे व ते निवारण्याचा मार्ग दाखविणे हे धर्माचे अंतिम ध्येय आहे, असे भगवंताने सांगितले आहे. जो धर्म या कसाला (कसोटीला) उतरणार नाही त्याला धर्म म्हणता येणार नाही, असे भगवंताने आपल्या पहिल्या सूत्रामध्ये–धर्मचक्र प्रवर्तनामध्ये–सांगितले आहे. असे कोणत्याच धर्मसंस्थापकाने सांगितले नाही. या कारणामुळे मी बौद्ध धर्म स्वीकारला आहे. दुःख निवारण्याकरिता प्रज्ञा पारमिता बुद्धाने सांगितली आहे.

यानंतर नेपाळचे प्रा. मिनिस्टर श्री. टंका प्रसाद आचार्य यांनी आलेल्या पाहुण्यांचे स्वागत करून भाषण केले. त्यानंतर गव्हर्नमेंट कमिटीचे चेअरमन आणि नेपाळ महाराजांचे प्रिन्सिपल प्रायव्हेट सेक्रेटरी श्री. लोक दर्शन यांचे स्वागत करणारे भाषण झाले. त्यानंतर नेपाळचे राजेसाहेब वीर विक्रम सहदेव आणि भिक्षु चंद्रमणी यांची चेअरमन आणि धर्म शासक म्हणून नावे जाहीर झाली. त्यानंतर नेपाळच्या महाराजांचे भाषण झाले.

त्यानंतर सभेच्या शेवटी महाथेरो भिक्षु चंद्रमणी यांचे भाषण झाले. शेवटी नेपाळच्या राजेसाहेबांनी सर्वांचे आभार मानले आणि नेपाळी राष्ट्रगीत बँडवर वाजविल्यावर त्या दिवशीच्या सभेचा कार्यक्रम संपला.'' [1]



[1] प्रबुद्ध भारत : २४ नोव्हेंबर १९५६.

# ३४७

## बौद्धधर्म व मार्क्सवाद [†]

" काठमाडू येथील विश्व बौद्ध परिषदेच्या समाप्तीपूर्वी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे प्रतिनिधींना उद्देशून एक खास भाषण दि. २० नोव्हेंबर १९५६ ला ठेवण्यात आले होते. व्याख्यानाचे स्थळ नेपाळचे वैभवशाली राजदरबार होते. बौद्ध धर्म भारतात अस्तंगत झाल्यावर तो कित्येक वर्षे नेपाळमध्ये भरभराटीत होता परंतु आज मात्र तेथे मनुप्रणीत विषमतेवर आधारलेला हिंदू धर्म कायदेशीर रीतीने जारी आहे. अशा देशाच्या दरबारात बाबासाहेबांनी बौद्ध धर्माच्या सर्व श्रेष्ठतेचा पुरस्कार करणे ही एक अपूर्व क्रांतिकारक घटना होती. या भाषणात बौद्ध धर्माकडे पाहाण्याचा आपला मूलभूत दृष्टिकोन त्यांनी दिग्दर्शित केला आहे. " [१]

" दिनांक २० नोव्हेंबर १९५६ रोजी विश्व बौद्ध परिषदेच्या शेवटच्या दिवशी विश्व बौद्ध परिषदेचे अध्यक्ष डॉ. जी. पी. मलालशेखर (सिलोन) यांनी बाबासाहेबांना विनंती केली की, त्यांनी ' बौद्ध धम्मात अहिंसेचे स्थान ' या विषयावर भाषण द्यावे. ही विनंती बाबासाहेबांनी स्वीकारली परंतु विश्व बौद्ध परिषदेतील बहुसंख्य प्रतिनिधींनी आग्रह केला की, बाबासाहेबांनी ' ' बौद्धधर्म व मार्क्सवाद ' यावर भाषण द्यावे.बाबासाहेबांनी याच विषयावर बोलण्याचे मान्य केले. विश्व बौद्ध परिषदेच्या समारोप समारंभाचा आरंभ दुपारी ३ वाजता होणार होता. त्याप्रमाणे काही वेळ अगोदर बाबासाहेब निर्धारित स्थळी आले. बाबासाहेब येताच विश्व बौद्ध परिषदेचे माजी अध्यक्ष व ब्रह्मदेश सुप्रिम कोर्टाचे मुख्य न्यायाधीश ऊ चॉन टून व त्यांच्या पत्नी यांनी बाबासाहेबांना आदरपूर्वक त्या भव्य अशा मंचाकडे नेले. बाबासाहेबांना सर्व प्रतिनिधींनी सन्मानपूर्वक उत्थापन दिले. बाबासाहेब खुर्चीवर बसले. स्टेजवर नेपाळचे राजे महेंद्र वीर विक्रम सहदेव एका सजवलेल्या खुर्चीवर विराजमान झाले. बाजूला पूज्य चंद्रमणी महास्थविर, जी. पी. मलालशेखर, पूज्य अमृतानंद महास्थविर आणि ऊ चॉन टून स्थानापन्न झाले. प्रथम पूज्य चंद्रमणी यांनी उपस्थितांना त्रिशरण व पंचशील दिले. त्यानंतर विश्व बौद्ध परिषदेचे अध्यक्ष डॉ. जी. पी. मलालशेखर माईकवर आले आणि म्हणाले,

" आजच्या विश्व बौद्ध परिषदेमध्ये भगवान बुद्धाच्या भारतभूमीमधून एक महान पुरुष आलेला आहे. त्याचे नाव आहे डॉ. बी. आर. आंबेडकर (प्रचंड टाळ्या). त्यांनी भारतातील नागपूर मुक्कामी पाच लाख पददलित लोकांना बौद्ध धम्माची

---

[†] शीर्षक दुरुस्ती - प्रथम आवृत्तीत अनवधानाने शीर्षक दिले गेले होते. ते मूळ प्रबुद्ध भारतानुसार दुरुस्त केले आहे.

[१] प्रबुद्ध भारत : ३ ऑगस्ट १९५७.

दीक्षा देऊन महान धम्मक्रांती केली आहे. आज या विश्व बौद्ध परिषदेत संपूर्ण जगातील बौद्ध प्रतिनिधींच्यावतीने मी त्यांचे हार्दिक स्वागत करतो '' आणि नंतर त्यांनी रंगीबेरंगी फुलांचा फार मोठा हार बाबासाहेबांच्या गळ्यात घातला. भाषण देण्यासाठी नंतर बाबासाहेबांना विनंती करण्यात आली.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर उभे राहिले आणि पुन्हा एकदा टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला. सविताबाई बाबासाहेबांच्या मागे उभ्या राहिल्या. कॅमेऱ्यांनी भराभर फोटो टिपले आणि मग धीरगंभीर वाणीने बाबासाहेबांनी ' बुद्ध की कार्ल मार्क्स ' या विषयावर अस्खलित असे ऐतिहासिक भाषण दिले.'' [१]

ते आपल्या भाषणात म्हणाले,

'' सन्माननीय अध्यक्ष महाराज, आदरणीय भिक्षुगण आणि सद्‌गृहस्थहो,

जागतिक बौद्ध परिषदेच्या निमित्ताने नेपाळमध्ये येऊनसुद्धा परिषदेच्या कामकाजात एखाद्या प्रतिनिधीसारखा प्रत्यक्ष भाग घेऊ शकलो नाही याबद्दल मी अत्यंत दिलगीर आहे. आज जरी मी या ठिकाणी उपस्थित असलो तरी मी शारीरिकदृष्ट्या आजारी असल्याने परिषदेच्या कामकाजातील दगदग व त्रास माझ्याने सोसवला जाणार नाही, याची जाणीव प्रतिनिधींना असावी अशी मला खात्री आहे. परिषदेचा अनादर करण्यासाठी मी मुळीच गैरहजर राहिलो नाही. माझ्या शरीरस्वास्थामुळे मी परिषदेच्या कामकाजाच्या कर्तव्यास बरोबर जागू शकणार नाही, ह्याच कारणास्तव मी उपस्थित राहू शकलो नाही. कदाचित परिषदेला गैरहजर राहिल्याबद्दल नुकसान भरपाई म्हणून की काय आज ह्या भरदुपारी तुमच्यापुढे भाषण देण्याबद्दल मला सांगण्यात आले आहे. मी भाषणासाठी मान्यता दिली आहे खरी, परंतु इथे उपस्थित झाल्यावरच ही अनपेक्षित गोष्ट माझ्यावर सोपविण्यात आली. तुम्हा लोकांपुढे व्याख्यान द्यावे लागेल याची मला किंचितही पूर्वसूचना नव्हती. मी कोणत्या विषयावर बोलू इच्छेन ह्याची मला विचारणा केल्यावर ' बौद्धधर्मातील अहिंसा ' हा विषय मी सांगितला होता. परंतु सर्वसाधारण मी ज्या विषयाचा ओझरता उल्लेख केला होता त्याच विषयावर म्हणजे ' बौद्धधम्म व साम्यवाद ' ह्यावर मी बोलावे असे परिषदेला उपस्थित असलेल्या बहुसंख्यांक लोकांना वाटत असल्याचे मला सांगण्यात आले. भाषणाचा विषय बदलण्यास जरी मी मान्यता दिली असली तरी प्रामाणिकपणे मला हे सांगितले पाहिजे की, हा विषय आकस्मिकपणे सोपविला गेला असल्याने एवढ्या महान व विस्तृत विषयावर बोलण्याची माझी तयारी झालेली नाही. हा विषय केवळ महान व विस्तृतच नाही तर अत्यंत

---

[१] मी पाहिलेले बोधीसत्व डॉ. बाबासाहेब आंबेडकर : भिक्षु सुमेध---पृ. १२६-२७.

भारदस्त आहे. ह्या भारदस्त विषयाच्या दडपणाखाली अर्धेअधिक जग सापडलेले आहे. एवढेच नव्हे तर बौद्ध राष्ट्रातील तरुण विद्यार्थी वर्गसुद्धा ह्या विषयाच्या मगरमिठीत सापडलेला आहे. ही दुसरी बाब मला अत्यंत चिंताजनक वाटते.

साम्यवाद जी जीवनप्रणाली सांगते त्या जीवनप्रणालीपेक्षा बौद्ध धम्माने सांगितलेली जीवनप्रणाली उत्कृष्ट व सरस आहे, अशी प्रशंसा जोपर्यंत बौद्ध राष्ट्रातील तरुण पिढी करीत नाही तोपर्यंत बौद्ध धर्माचे भवितव्य उज्ज्वल आहे असे म्हणता येणार नाही. बौद्ध धर्मावरील श्रद्धा दोनएक पिढ्याही तग धरू शकणार नाही. यास्तव बौद्ध धम्मावर ज्यांची दृढ श्रद्धा आहे अशा लोकांनी तरुण पिढीस बौद्ध धर्माचो महत्ता पटवून देऊन साम्यवादाला बौद्ध धर्मच पर्याय आहे, किंबहुना बौद्ध धर्मच ऐकमेव सर्वोत्तम जीवनमार्ग आहे असे सांगणे अत्यंत आवश्यक आहे. ही गोष्ट पटवून दिल्यावरच बौद्ध धर्म टिकवून धरण्याची आशा बाळगता येऊ शकते. आपण हेही तेवढेच ध्यानात घेतले पाहिजे की, युरोपमधील बहुसंख्यांक लोक व आशियामधील बहुसंख्यांक तरुण असा दृष्टिकोन बाळगतात की, आजच्या जगात कार्ल मार्क्स हाच केवळ एक पूजनीय महापुरुष किंवा प्रेषित आहे. त्याचबरोबर ते असाही विचार प्रदर्शित करतात की, बौद्ध भिक्खु संघातील फार मोठा भाग केवळ निरुपयोगीच नव्हे तर एक मोठे पिवळे संकट आहे. अशा प्रकारची विचारसरणी कशाचे द्योतक आहे हे भिक्खुंनी लक्षात घेतले पाहिजे. तिच्यामागची पार्श्वभूमी त्यांनी समजून घेतली पाहिजे आणि कार्ल मार्क्सशी तुलना केली जावू शकेल अशाप्रकारे स्वतःला घडवून घेण्याची त्यांनी पराकाष्ठा करावयास पाहिजे. तेव्हाच बौद्ध धर्माचे श्रेष्ठत्व शाबीत केले जावू शकेल.

ह्या प्रास्ताविकानंतर बौद्ध तत्त्वज्ञान व मार्क्सवाद किंवा साम्यवाद ह्यातील ठळक वैशिष्ट्यपूर्ण मुद्दे कोणते आहेत ह्याबद्दल मी आपणास विवेचन करून सांगेन. हे विवेचन बुद्धाचे तत्त्वज्ञान व मार्क्सचे तत्त्वज्ञान यांच्या आदर्शातील साम्य व भेद ह्या संबंधात असेल. जीवनातील उद्दिष्ट्ये साध्य करण्यासाठी साम्यवादी जीवनमार्गापेक्षा बौद्धजीवनमार्ग मानवी जीवनाचे ध्येय हस्तगत करण्यात चिरंतन ठरू शकेल किंवा नाही ह्याचाही त्यात उहापोह असेल. जो जीवनमार्ग अल्पकालीन असेल, रानावनातून भटकविणारा असेल किंवा अराजकतेकडे घेवून जाणारा असेल अशा जीवनमार्गाचा पाठपुरावा करणे उचित ठरणार नाही. परंतु तुम्हाला अवलंबण्यास सांगितलेला मार्ग जर मंदगतीचा व लांब पल्ल्याचा असेल. तथापि तो खात्रीचा असून सुरक्षित व भक्कम पायावर

पोहचविणारा असेल आणि तुमच्या आदर्श तत्त्वांना साहाय्यभूत ठरविणारा व तुमच्या जीवनाला स्थायीभाव देणारा असेल तर तोच मार्ग चोखाळणे न्यायाचे ठरेल. कमी अंतराचा ' शॉर्टकट ' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या काटेरी मार्गापेक्षा मंदगतीचा लांब पल्ल्याचा मार्गच आक्रमण करीत राहाणे केव्हाही रास्त असते. जीवनातले ' शॉर्टकट ' नेहमीच घातकी असतात. नुसतेच घातकी नव्हे तर महाघातकी असतात, हे सतत ध्यानात ठेवले पाहिजे.

आता मी माझ्या प्रमुख विषयाला हात घालतो. मार्क्सच्या साम्यवादाची विचारसरणी तरी काय आहे ?, त्याचे मूलभूत तत्त्वज्ञान तरी काय आहे ? साम्यवादी विचारसरणीचा मूलारंभ असा आहे की, ह्या जगात ' पिळवणूक ' चाललेली आहे. ही पिळवणूक धनिकांकडून गरिबांची होत आहे. कारण धनिकांना संपत्तीची हाव आहे. त्यांना अधिकाअधिक मालमत्ता हवी आहे आणि त्यासाठी ते जनसमुदाय गुलाम करीत आहेत. ही गुलामगिरी शेवटी यातना, दुःख व गरिबी यांच्या निर्मितीस कारणीभूत होत आहे. हेच मार्क्सवादाच्या प्रारंभाचे मूळ आहे. मार्क्स ह्याने ' पिळवणूक ' ह्या शब्दप्रयोगाचा उपयोग केला आहे. ही पिळवणूक नष्ट करण्यासाठी मार्क्सने कोणती उपाययोजना सांगितली आहे ? पिळवणूक होणाऱ्या ह्या एका वर्गाचे दैन्य व दुःख नष्ट करण्यासाठी वैयक्तिक मालमत्तेवर प्रतिबंध घातला पाहिजे असे मार्क्सचे सांगणे आहे. व्यक्तीशः कोणीही मालमत्ता बाळगू नये किंवा धनसंचय करू नये. कारण कार्ल मार्क्सच्या तांत्रिक भाषेत सांगावयाचे झाल्यास असे म्हणता येईल की, कामगारांच्या किंवा मजुरांच्या श्रमशक्तीपासून उत्पादित झालेले अतिरिक्त धन स्वतःच घेणारा किंवा स्वतःच गिळंकृत करणारा हा खाजगी मालमत्तेचा एक मालक बनतो. कामगार आपल्या निढळाच्या घामाने उत्पादन वाढवितो व अतिरिक्त धन मिळवून देतो. परंतु ह्या अतिरिक्त धनावर त्या कामगारांचा कोणताच अधिकार राहात नाही. त्याला त्यामधून काहीही हिस्सा मिळत नाही. ते सारे अतिरिक्त धन केवळ मालकच बळकावून बसतो. ही बाब लक्षात घेवून कार्ल मार्क्सने असा प्रश्न उपस्थित केला की, कामगारांनी आपल्या श्रमशक्तीच्या जोरावर निर्माण केलेल्या अधिक उत्पादित धनावर मालकाने काय म्हणून हक्क सांगावा ? मार्क्सच्या मतानुसार अतिरिक्त धनावर मालकाचा केव्हाही अधिकार असता कामा नये. अतिरिक्त धनावर केवळ राज्याचाच अधिकार असावा ; आणि हे राज्यसुद्धा कामगारांचे असावे. याच कल्पनेवर मजुरांच्या किंवा कामगार वर्गाच्या हुकूमशाहीचा सिद्धात मार्क्सने प्रस्थापित केला. मार्क्सने जे सिद्धांत प्रस्थापित केले, त्यातील हा एक तिसरा

सिद्धांत आहे. कामगार वर्गाची हुकूमशाही ह्याचा अर्थ मार्क्स असा करतो की, शासन हे शोषिकांचे म्हणजे कामगाराची पिळवणूक करणाऱ्यांचे नसावे. ते शोषितांचे म्हणजे पिळवणूक होत असलेल्या कामगारांचे असावे. अशाप्रकारचे कार्ल मार्क्सचे मूलभूत सिद्धांत आहेत. याच सिद्धांतावर आधारित्त साम्यवादाची उभारणी रशियात झालेली आहे. या सिद्धांतात भरही घातली गेलेली आहे आणि भर घालणे सतत चालूही आहे. मात्र मूलभूत सिद्धांत सुरुवातीस सांगितल्याप्रमाणेच कायम आहेत.

मी आता क्षणभर बुद्ध तत्त्वज्ञानाकडे वळतो. कारण कार्ल मार्क्सने उपस्थित केलेल्या मूलभूत विचारसरणीच्या बाबतीत बुद्धाचे काही म्हणणे आहे का हेही पाहाणे आवश्यक आहे. मार्क्सने गरिबीच्या संबंधी किंवा कामगारांच्या पिळवणुकीसंबंधी प्रश्न उपस्थित करून आपल्या मार्क्सवादाची किंवा साम्यवादाची उभारणी केलेली आहे. बुद्ध काय म्हणतो ? बुद्धाने कोठून सुरुवात केलेली आहे ? बुद्ध तत्त्वज्ञानाची किंवा बुद्धाच्या धम्माची इमारत कोणत्या पायावर उभारली गेली आहे ? कार्ल मार्क्सप्रमाणे बुद्धानेही २५०० वर्षापूर्वी म्हणजे कार्ल मार्क्सच्या कित्येक वर्षे अगोदर हीच गोष्ट सांगितली आहे. बुद्धाने म्हटले, '' जगात दुःख आहे. '' बुद्धाने कार्ल मार्क्सप्रमाणे ' पिळवणूक ' हा शब्दप्रयोग उपयोगात आणला नाही. मात्र पिळवणुकीमधून जे दुःख, दैन्य निर्माण होते त्याच दुःखाची कल्पना देवून बुद्धाने आपल्या तत्त्वज्ञानाची, आपल्या धम्माची उभारणी केली. ' जगात दुःख आहे ' हे जगद्‌मान्य सत्य आहे असे सांगून बुद्धाने दुःखाची परिभाषा निरनिराळया अर्थाने केली. दुःख म्हणजे पुनर्जन्म, दुःख म्हणजे जीवनमरणाचा फेरा असाही अर्थ बुद्धाने केलेला आहे. परंतु ह्या अर्थाशी मी सहमत नाही. दुःख हा शब्द दारिद्र्य, गरिबी ह्या अर्थानेही उपयोगात आणला गेला असल्याचे बौद्ध वाङ्मयातून दिसून पडते. तेव्हा बौद्ध तत्त्वज्ञानाचा मूलभूत पाया व कार्ल मार्क्सच्या तत्त्वज्ञानाचा मूलभूत पाया यात काहीही फरक आढळत नाही. याचाच अर्थ असा की, कार्ल मार्क्सने प्रस्थापित केलेला सिद्धांत हाही नवीन नाही. तेव्हा जीवनाचा मूलभूत पाया शोधण्यासाठी कोणत्याही बौद्ध बांधवास कार्ल मार्क्सचे दार ठोठावण्याची काहीही गरज नाही. बुद्धाने तो पाया केव्हाचाच अगदी उत्तमप्रकारे प्रस्थापित करून ठेवलेला आहे आणि तो त्याने आपल्या पहिल्या प्रवचनातील उपदेशात केलेला आहे. हे प्रवचन बौद्ध वाङ्मयात ' धम्मचक्रप्रवर्तन सुत्त ' ह्या नावाने ओळखले जाते. ज्या लोकांच्या मनावर कार्ल मार्क्सच्या विचाराचा पगडा बसलेला आहे त्यांना मला हेच सांगावयाचे आहे की, तुम्ही धम्मचक्रप्रवर्तन सुत्ताचा अभ्यास करा

व बुद्धाने काय म्हटले आहे हे समजून घ्या. मला खात्री आहे की, तुम्हाला त्यात मानवी जीवनसंग्रामाचे उत्तर खचितच आढळेल. बुद्धाने आपल्या तत्त्वज्ञानाची किंवा धम्माची उभारणी ईश्वर, आत्मा किंवा अशाच अनाकलनीय अति मानवी बाबींवर केव्हाही केलेली नाही. त्याने मनुष्याच्या वास्तव जीवनाकडेच अंगुलीनिर्देश करून आपले सारे तत्त्वज्ञान विशद केलेले आहे. मनुष्य यातना, दुःख यानी पिडलेला असतो, ही मानवी जीवनाची वास्तवता आहे. केवळ मार्क्सनेच ह्या गोष्टींचा उहापोह केला असे नव्हे तर त्याच्या जन्मांअगोदर दोन हजार वर्षांपूर्वी बुद्धाने ह्या गोष्टी जाणल्या व त्यावर उपायसुद्धा सांगितले, हे एक विशेष आहे. हे तुम्ही समजून घेतले पाहिजे. याप्रमाणे गरिबीच्या संदर्भात बुद्धाच्या तत्त्वप्रणालीत व कार्ल मार्क्सच्या तत्त्वप्रणालीत कमालीचे साम्य आहे, हे तुम्हास कळून चुकेल.

मार्क्सच्या विचारानुसार कामगारांच्या पिळवणुकीचा प्रतिरोध करण्यासाठी उत्पादनापासून प्राप्त होणारी संपत्ती राज्याने आपल्या मालकिची करावयास पाहिजे. साऱ्या जमिनी राज्याच्या मालकिच्या असाव्यात, साऱ्या उद्योगधंद्यावर केवळ राज्याचाच अधिकार असावा, म्हणजेच व्यक्तिगत मालकास हुकूमत गाजविण्यास वाव मिळणार नाही. तसेच मजुरांच्या श्रमशक्तीने निर्माण केलेल्या उत्पादित वस्तूवरील अतिरिक्त फायद्याचा लाभ त्या मालकास होणार नाही व मजुरांना लुबाडण्याचा प्रसंगच येणार नाही. अशी ही पिळवणुकीच्या संदर्भात कार्ल मार्क्सची विचारसरणी आहे.

व्यक्तिगत मालकी हक्काच्या संदर्भात बुद्धाची विचारसरणी काय आहे ते आपण तपासून पाहू या. ह्यासाठी आपणास बौद्ध भिक्खुसंघाचा विचार करावा लागेल आणि बुद्धाने भिक्खुंसाठी लावलेल्या त्यांच्या जीवनविषयक नियमांची चिकित्सकपणे परीक्षा करावी लागेल. बुद्धाने भिक्खुंसाठी असे काय नियम केले आहेत ? बुद्धाने कटाक्षाने सांगितले की, कोणत्याही बौद्धभिक्खुने खाजगी मालमत्ता बाळगता कामा नये. वस्तुतः बोलावयाचे झाल्यास कोणत्याच भिक्खुजवळ स्वायत्त मालमत्ता असू नये, असा कडक निर्बंध असूनही आज तुम्हाला अपवादात्मक काही उदाहरणे दिसतील. काही देशातील भिक्खुवर्गात त्यांच्याकडे वरील मालमत्ता असल्याचे मी स्वतः पाहिले आहे. परंतु बहुसंख्यांक भिक्खुंजवळ कोणतीच मालमत्ता नाही. मालमत्ता बाळगण्याच्या बाबतीत बौद्ध भिक्खुसंघाचे निर्बंध एवढे कडक आहेत की, रशियातील साम्यवाद्यांनी केलेले नियमसुद्धा एवढे कडक नसावेत. हा विषय अद्याप कोणीही विचारविनिमयासाठी न घेतलेला व निश्चित निर्णयाप्रत कोणीही न पोहचू शकलेला असा, म्हणून मी आज हाती घेतलेला आहे.

भिक्खुसंघ निर्मितीमागे बुद्धाचे कोणते उद्दिष्ट असावे ? भिक्खुंचा संघ असावा असे त्याला का वाटले असावे ? इतिहासाचा मागोवा जर आपण घेतला तर असे आढळून येते की, बुद्ध जेव्हा आपल्या धम्माचा प्रचार व प्रसार करीत होता तेव्हा ' परिव्राजक ' म्हटले जाणारे लोक ईतस्ततः भटकत होते. एवढेच नव्हे तर बुद्धाच्या अगोदरपासून ते वावरत होते. ' परिव्राजक ' ह्या शब्दाचा अर्थ ' निराश्रित ' म्हणजेच ज्यांना घरदार नाही असे लोक, असा होतो. आर्यकाळात आर्यांच्या निरनिराळ्या टोळ्या इतर वन्य टोळ्यांसारख्या आपापसात लढत होत्या. विजयी टोळ्या स्थायिक होऊन राहात. पराभूत टोळ्यातील काही लोक मात्र आपले घरदार, मालमत्ता सोडून केवळ भ्रमंती करीत राहात. स्थायिक जीवन त्यांनी कधीही स्वीकारले नाही. अशा भटकणाऱ्या लोकांना कालान्तराने ' परिव्राजक ' म्हटले गेले. बुद्धाने अशा भटकत राहाणाऱ्या परिव्राजक लोकांना एकत्रित करून त्यांचा संघ निर्माण करण्याचे व त्यांच्या भ्रमणजीवनाला नियमबद्ध करण्याचे फार मोठे मोलाचे कार्य केले. ज्या नियमांनी अशा परिव्राजकांना बद्ध केले गेले त्या साऱ्या नियमांचा उल्लेख आपणास ' विनयपिटकात ' आढळतो. परिव्राजक बौद्धभिक्खु बनले व विनयपिटकात निर्देशिलेल्या नियमांप्रमाणे काटेकोरपणे वागू लागले. त्यातील नियमाप्रमाणे भिक्खुला मालमत्ता जमविण्याची किंवा बाळगण्याची परवानगी नव्हती. भिक्खुला पुढील केवळ सात वस्तुच बाळगण्यास सांगितले गेले होते. एक वस्तरा, एक लोटा, एक भिक्षापात्र, तीन चिवरे आणि एक सुई ह्या त्या सात वस्तु होत. साम्यवादाच्या मूळ गाभ्याबरहुकूम व्यक्तिगत मालमत्ता असू नये अशी जर बाब असेल तर विनय-पिटकातील बौद्ध भिक्खुसाठी सांगितलेला एवढा कडक निर्बंध कुठेतरी असेल का ? मला तरी असा नियम कुढे आढळत नाही. म्हणून व्यक्तिगत मालमत्ता नसण्याच्या बाबतीत साम्यवादी मतप्रणालीमध्ये एखाद्या आजच्या पिढीतील तरुणास आकर्षण वाटत असेल, तर त्याने खचितच बौद्ध तत्त्वज्ञानाच्या विनयपिटकात डोकवावे. त्याला ज्याचा शोध घ्यावयाचा आहे, ते त्यात निश्चितच गवसेल. परंतु प्रश्न असा निर्माण होतो की, व्यक्तिगत मालमत्ता नसण्याचा नियम साऱ्या समाजाला कसा काय लागू करता येईल व केव्हापर्यंत लागू करता येईल ? अर्थात ही सारी बाब उपाययोजना, काळ, परिस्थिती व मानवी जीवनाचा विकास ह्यावर आधारित आहे. तात्त्विकदृष्ट्या विचार करता व्यक्तिगत मालमत्ता काढून घेणे खरोखरीच चुकीचे आहे का ? यदाकदाचित एखाद्यास खाजगी मालमत्ता बाळगण्याची इच्छा असेल, तर बौद्धधर्म आड येईल का ? निश्चितच नाही. कारण बौद्ध भिक्खुसंघाची निर्मिती करताना बुद्धाने काही सवलती मान्य केल्या आहेत. आवश्यक गरजा भागविण्यास लागणारी मालमत्ता बाळगण्यास बुद्धाने मनाई केलेली नाही, ही बाब विशेषत्त्वाने ध्यानात घेतली पाहिजे.

आता ह्याच बाबीच्या दुसऱ्या मुद्यांकडे आपण वळू. साम्यवाद घडवून आणण्यासाठी कार्ल मार्क्स किंवा साम्यवादी लोक कोणता मार्ग अवलंबवावा म्हणून सांगतात ? हा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा आहे. साम्यवाद (म्हणजेच दुःखाचे अस्तित्व मान्य करून व्यक्तिगत मालमत्ता नष्ट करणे हा वाद) प्रस्थापित करण्यासाठी साम्यवाद्यांचा मार्ग अत्याचारी मार्ग आहे, विरोधकांची हत्त्या करण्याचा मार्ग आहे आणि ह्यातच बुद्ध व कार्ल मार्क्स यांच्या उपाययोजनांच्या मार्गात मूलभूत फरक आहे. बौद्ध तत्त्वज्ञान किंवा बौद्धधम्म प्रस्थापित करण्यासाठी लोकांची मने वळविणे हा बुद्धाचा सनदशीर मार्ग आहे. नैतिक शिकवणीने व प्रेमाने लोकांची मने वळविणे यावर बुद्धाचा भर आहे. बुद्धाला विरोधकांना जोरजबरीने किंवा सत्तेने जिकावयाचे नसून प्रेमाने व आपुलकीने जिकावयाचे आहे. हा मूलभूत फरक लक्षात घेतला म्हणजे असे कळून येते की, तत्त्वज्ञान प्रस्थापण्यासाठी बुद्धाला रक्तपात मान्य नाही. हिंसा मान्य नाही. उलट साम्यवाद्यांना हिंसेचाच मार्ग पसंत आहे. या मार्गाने साम्यवाद्यांना ताबडतोब फलप्राप्ती होते किंवा त्यांची उद्दिष्टे जलद सफल होतात यात मुळीच वाद नाही. कारण तुम्ही जेव्हा मनुष्य निर्मूलनाचेच तत्त्व अंमलात आणता तेव्हा तुम्हाला विरोध करणारा किंवा तुमचा प्रतिकार करणाराच कोणी उरत नाही. अर्थात ही सफलता केवळ दिखाऊच असते. मार्क्सवादाच्या तुलनेत बुद्धाचा मार्ग मंदगतीचा व लांब पल्ल्याचा आहे. कदाचित तो लोकांना कंटाळवाणाही वाटण्याचा संभव आहे. कारण सफलता फार उशिरा प्राप्त होते. मात्र हेही तेवढेच खरे की त्या मार्गात सुरक्षितता आहे. तुमच्या जीवाची हमी आहे. यास्तव तुम्ही तुमच्या आदर्शाबरहुकूम मार्ग आक्रमित असताना बुद्धाच्याच बिनधोक मार्गावर पाऊल ठेवणे हितावह होणार आहे.

मी माझ्या साम्यवादी मित्रांना नेहमी दोन तीन प्रश्नांची उत्तरे मागत असतो. परंतु मला प्रामाणिकपणे सांगितले पाहिजे की, माझ्या प्रश्नांची उत्तरे देण्यास ते समर्थ नाहीत. ते मजूर वर्गाची हुकूमशाही रक्तपाताने प्रस्थापित करू इच्छितात. राजकीय सत्तेचे वर्चस्व असणाऱ्यांना ते नेस्तनाबूत करू इच्छितात. त्यांच्या मतानुसार लोकसभेत प्रतिनिधीत्व असू शकत नाही. मताधिकार असू शकत नाही. त्यांना केवळ राज्याची एकतंत्री महाप्रजा म्हणून राहावयाचे आहे. त्यांना सत्तावाटप किंवा अधिकार वाटप न करता राज्य करावयाचे आहे. त्यामुळे त्यांना मी असा प्रश्न करतो की, हुकूमशाही ही लोकांवर राज्य करण्याची योग्य पद्धती आहे का ? त्यावर ते असे उत्तर देतात की, हुकूमशाही त्यांना केव्हाही मान्य नाही. मग मी त्यांना परत विचारतो की, मजुरांची तरी हुकूमशाही त्यांनी का मान्य करावी ? त्यावर ते उत्तर देतात की, सध्याचा काळ निर्वाणीचा काळ असल्याने कामगारांची हुकूमशाही निर्माण होणे

अत्यावश्यक आहे. मजूर वर्गाची हुकूमशाही निर्माण झाल्याशिवाय प्रस्थापित भांडवलदारांची किंवा अतिरिक्त धन गिळंकृत करणाऱ्या मालक वर्गाचा नायनाट होणार नाही. अजून त्यांना प्रश्न केला की, हा निर्वाणीचा कालावधी तरी केवढा आहे ? वीस वर्षे, चाळीस वर्षे की पन्नास वर्षे ? याला त्यांचे निश्चित उत्तर नाही. ते गुळमुळीत उत्तर देतात की, साम्यवाद स्थिर झाल्यावर मजूरवर्गीय हुकूमशाही आपोआपच नष्ट होईल. कल्पना करू या की, ती आपोआपच नष्ट झाली. मग पुढे काय? तिची जागा कोण घेईल ? मनुष्याला कोणत्याच प्रकारच्या शासनाची आवश्यकता वाटणार नाही काय ? ह्या प्रश्नाचे उत्तर त्यांच्याकडे नाही.

याच संदर्भात जेव्हा आपण बुद्धाकडे वळतो आणि त्याच्या धम्मासंबंधी प्रश्न उपस्थित करतो तेव्हा तो काय म्हणतो ? बुद्धाने जगाला एक अत्यंत महान अशी गोष्ट सांगितलेली आहे. मनुष्याची मनोधारणा बदलल्याशिवाय आणि पर्यायाने जगाची मनोधारणा बदलल्याशिवाय जगाची सुधारणा किंवा उन्नती होवू शकणार नाही असे बुद्धाचे सांगणे आहे. बुद्धाच्या शिकवणुकीप्रमाणे मनुष्याची मनोधारणा बदलली गेली व त्यानुसार त्याने साम्यवादी विचारसरणी स्वीकारून तीवर निष्ठेने प्रेम केले व ती अंमलात आणण्याचा प्रयत्न केला, तर ती खचितच स्थायी स्वरूप प्राप्त करू शकेल आणि अशावेळेस मनुष्याला कायदेकानूनच्या बेडीत अडकविण्यास सैनिकी किंवा पोलिसी कारवाईची जरुरी पडणार नाही. असे का घडू शकेल ? याला उत्तर असे की, नैतिकतेने वागण्यास व योग्य मार्गाने चालण्यास तुमच्या मनाची जडणघडणच बुद्धाने तयार केलेली असेल. तुमचे मनच चिरंतन स्वरुपात सन्मार्गी झालेले असेल.

साम्यवादाची उपाययोजना संबंधाची विचारसरणी जुलूमजबरदस्तीवर आधारलेली आहे. कल्पना करा की, उद्या रशियातील साम्यवादी हुकूमशाही बारगळली किंवा तशी चिन्हे दिसू लागली तर काय होईल ? साम्यवादाची अवस्था कशी होईल हे जाणून घेण्यास मी निश्चितच उत्सूक राहीन. माझ्या कल्पनेप्रमाणे राज्याच्या मालकीची मालमत्ता बळकावण्यास रशियन लोक परस्परात रक्तपात घडवून आणतील. आपापसात लढाया करतील. ही परिणती अपरिहार्य अशीच राहील. कारण रशियातील लोकांनी साम्यवादी विचारसरणी सहजासहजी स्वीकारलेली नाही. आपणहून ती त्यांनी मान्य केलेली नाही. ती त्यांच्यावर जबरदस्तीने लादली गेली आहे. साम्यवाद प्रस्थापित करताना त्यांना ही भीती घातली गेली की, त्यांनी जर साम्यवादी विचारप्रणाली मानली नाही, तर त्यांना फासावर लटकविले जाईल आणि त्यामुळेच ते अजून ती निमूटपणे पाळीत आहेत. हे लक्षात ठेवले पाहिजे की, भयापोटी कोणतीच विचारप्रणाली मूळ धरू शकत नाही. एखादी विचारप्रणाली ग्रहण केली गेली परंतु कालान्तराने तिची

धारणाशक्ती नष्ट झाली, तर त्या विचारप्रणालीचे पुढे काय होईल, या प्रश्नाचे उत्तर जोपर्यंत देता येणार नाही, तोपर्यंत ती लोकांच्या मनावर बिंबविण्यात काहीच अर्थ नाही. कारण मनोभूमिकाच तयार केली गेली नसेल तर सत्तेची नेहमीच जरुरी भासेल. याच कारणास्तव मला नेहमी बुद्धाचे आकर्षण वाटते. बुद्धाची विचारसरणी ही लोकशाहीची विचारसरणी आहे.

अजातशत्रूला वज्जींना जिंकावयाचे होते. हे सांगण्यासाठी अजातशत्रूचा सरसेनापती बुद्धाकडे आला. बुद्ध त्याला म्हणाला की, राजा वज्जींचा पराभव करू शकणार नाही. कारण वज्जी जोपर्यंत आपल्या जुन्या पद्धतीला धरून राज्यशकट चालवीत आहेत, तोपर्यंत त्यांचा पराभव होणे शक्य नाही. बुद्धाने वज्जींच्या जुन्या पद्धतीचे उघड स्पष्टीकरण कोणत्या कारणामुळे केले नाही हे कळायला काही मार्ग नाही. परंतु ज्या बाबतीत बोलला ती बाब वज्जींच्या लोकशाहीप्रधान व गणतंत्री राज्यकारभारासंबंधीच होती यात मात्र संशय नाही. आणि म्हणूनच बुद्ध म्हणाला की, वज्जी जोपर्यंत आपल्या जुन्या पद्धतीप्रमाणे चालतील, तोपर्यंत ते कधीच पराजित होणार नाहीत. यावरून बुद्ध हा लोकशाहीचा मोठा पुरस्कर्ता होता हे उघड होते.

अध्यक्ष महाराज जर मला परवानगी देतील तर मला तुमच्या हेच निदर्शनास आणून द्यावयाचे आहे की, मी राज्यशास्त्राचा विद्यार्थी होतो, मी अर्थशास्त्राचाही विद्यार्थी होतो. एवढेच नव्हे तर मी अर्थशास्त्राचा प्राध्यापकही होतो. माझ्या जीवनातील बराच कालावधी कार्ल मार्क्स, साम्यवाद व इतर अनेक विषय ह्यांचा अभ्यास करण्यात घालविला. तसेच बुद्धाच्या धम्माचाही अभ्यास करण्यात मी बराच काळ व्यतीत केला. बुद्ध तत्त्वज्ञान व मार्क्सवाद ह्यांचा जेव्हा मी तौलनिक अभ्यास केला, तेव्हा मी ह्याच निष्कर्षाला पोहचलो की, जगातील एका फार मोठ्या समस्येच्या बाबतीत म्हणजेच जगात दुःख आहे व त्याच्या निवारणाचा एक निश्चित उपाय आहे, ह्या बाबतीत बुद्धाचाच मार्ग सर्वोत्तम आहे, सुरक्षित आहे आणि भरभक्कम आहे. ह्याच कारणास्तव मी बौद्ध राष्ट्रातील तरुण पिढीस सांगू इच्छितो की, त्यांनी बुद्धाच्याच वास्तववादी तत्त्वज्ञानावर विशेष भर दिला पाहिजे व त्यावरच आपले सारे लक्ष केन्द्रिभूत केले पाहिजे.

यदाकदाचित बौद्ध धर्मावर संकट उद्‌भवण्याचा प्रसंग आलाच, तर बौद्ध राष्ट्रातील भिक्खुंनाच जबाबदार धरावे लागेल कारण मला तरी व्यक्तीशः असे वाटते की, ज्या भिक्खुंनी तनमनधनाने आपली कर्तव्ये बजावयास पाहिजे, ती त्यांनी पाळली नाहीत असाच त्याचा अर्थ असेल. आज कोठे धर्मप्रचार होत आहे ? बौद्ध धम्म प्रचाराची आज काय स्थिती आहे ? भिक्खुचे खरे कर्तव्य धम्मप्रसार करणे असे आहे. तो भिक्खु आज काय करतो ? आजचा भिक्खु खावून पिवून विहारात स्वस्थ राहतो. तो केवळ एकच वेळ जेवण घेतो यात शंका नाही. परंतु बहुतांशी त्याचा वेळ निव्वळ आळसातच जातो. थोडेफार तो वाचन करतो. परंतु बहुधा तो झोपाच काढतो. संध्याकाळी स्वतःचे मन

संगीतात थोडे रिझवितो. हा मार्ग धम्मप्रसार करण्याचा खचितच नव्हे. मित्रहो, कोणावर टीका करण्याचा माझा हेतु नाही. परंतु धम्मात जर समाजात नवजागृती करण्याची नैतिक शक्ती असेल, तर धम्माची विचारसरणी तुम्ही सतत लोकांच्या कर्णपटलांवर आदळत ठेवली पाहिजे. धम्म तत्त्वज्ञान लोकांच्या कानात सतत ओतत राहिले पाहिजे. शाळेत मुलाला किती वर्षे घालवावी लागतात ? तुम्ही मुलाला केवळ एका दिवसासाठी शाळेत पाठवीत नाही. त्यानंतर त्याला घरी ठेवून त्या मुलाने सारे शिक्षण ग्रहण करावे, सारे ज्ञान प्राप्त करून घ्यावे, अशी तुम्ही अपेक्षा करीत नाही. मुलगा दररोज शाळेत गेला, पाच तास तेथे तो बसला व सतत त्याने अभ्यास केला, तरच तो थोडेफार ज्ञान मिळवू शकतो, थोडी फार विद्या हस्तगत करू शकतो. आजचे भिक्खु एकही दिवस लोकांना विहारात बोलावित नाहीत किंवा एखाद्या विषयाचे शिक्षण देत नाहीत किंवा धर्मोपदेशही करीत नाहीत. माझ्या तरी पाहाण्यात अशी गोष्ट नाही.

मी एकदा सिलोनला गेलो होतो. भिक्खु कसा काय धम्मप्रचार करतात हे मला अवलोकन करावयाचे आहे, असे मी तेथील लोकांना सांगितले. त्यांनी मला सांगितले की त्यांच्याकडे 'दान' ही पद्धत आहे. नंतर मला समजले की, 'वणाक' या अर्थाने 'दान' या शब्दाचा उपयोग केला जातो. त्यांनी मला अकरा वाजण्याच्या सुमारास एका ठिकाणी नेले. तेथे टेबलाच्या आकाराची एक चौरस वस्तू होती. मी जमिनीवर बसलो. थोड्या वेळात एक भिक्खु आले. बऱ्याच उपस्थित स्त्री-पुरुषांनी पाणी घेऊन त्यांचे पाय धुतले. नंतर ते चौरंगावर बसले. त्यांच्याजवळ हवा करण्यासाठी एक हातपंखा होता. ते काहीतरी पुटपुटले. पण काय पुटपुटले ते एका ईश्वरासच ठावूक ! अर्थात त्यांनी ते धम्मप्रवचन सिंहली भाषेत केले असावे. पण ते सुद्धा केवळ दोन मिनिटेच ! त्यानंतर ते निघून गेले.

आता, तुम्ही ख्रिश्चनांच्या चर्चमध्ये जावून बघा. तेथे काय होते ? तेथे प्रत्येक आठवड्याला लोक एकत्र जमतात. तेथे ते प्रार्थना करतात. एखादा त्यांचा धर्मगुरू बायबलमधील एखाद्या विषयावर प्रवचन करून ख्रिस्ताने काय सदुपदेश केला हे समजावून सांगतो. त्या सदुपदेशाचे पुन्हा पुन्हा स्मरण करा, म्हणून लोकांना आवाहन करतो. तुम्ही हे ऐकून निश्चितच आश्चर्यचकित व्हाल की, ख्रिस्ती धर्माचा नव्वद टक्के भाग तत्त्वशः व रचनात्मकदृष्ट्या बौद्धधर्मापासूनच घेतला गेलेला आहे. तुम्ही रोममध्ये जा. तेथील मुख्य चर्च पाहा. तुम्हाला भरहूत येथील 'विश्वकर्मा' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या मंदिराची निश्चितच आठवण होईल.

व्हिशबिग्ने हा चीनमध्ये एक ख्रिश्चन मिशनरी होता. त्याने बौद्ध धर्मावर एक पुस्तकही लिहिले आहे. बौद्ध धर्म व ख्रिस्ती धर्म ह्यात असलेल्या कमालीच्या साम्याबद्दल त्याने आपले आश्चर्य प्रकट केले आहे. बाह्यात्कारी जरी तो बौद्धांनी ख्रिश्चनांची नक्कल केले असे म्हणण्याचे धारिष्ट्य करीत नसला तरी ख्रिश्चनांनी बौद्ध तत्त्वज्ञानाची उसणवारी केली हेही मान्य करण्यास तो तयार नाही. या बाबतीत सांगण्यासारखे खूप आहे.

काळ आता खूपच पालटलेला आहे. ख्रिश्चनांनी बौद्ध तत्त्वज्ञानाची नक्कल केली यात मुळीच वाद नाही. परंतु बौद्ध धम्मप्रसारासाठी ख्रिश्चनांनी स्वीकारलेल्या मार्गाची बौद्धांनी नक्कल करण्यास कसलीच हरकत नसावी. जरी ते मार्ग बहकले तरी बुद्धाचा धम्म त्यांच्या मार्गदर्शनासाठी एखाद्या पोलिसासारखा सदैव उभा आहे. लोकांच्या मनावर ही गोष्ट बिंबविल्याशिवाय बौद्धधर्माचा होणारा ऱ्हास थांबविता येणार नाही. आजसुद्धा बौद्ध राष्ट्रात बौद्ध धर्माची अत्यंत वाईट स्थिती आहे. एवढे असूनही लोकांवर बौद्ध धर्माचा पगडा अजूनही कायम आहे यात संशय नाही.

जाता जाता मला एका अत्यंत मनोरंजक व महत्त्वपूर्ण बाबीची माहिती द्यावयाची आहे. ती मी ब्रम्हदेशात गेलो असताना पाहिली. तेथे मला एका परिषदेसाठी बोलावण्यात आले होते. त्यावेळेस तेथील लोकांनी मला ब्रह्मदेशात खेड्याची पुनर्रचना कशी केली जात आहे, हे दाखविण्यासाठी एका खेड्यात नेले. मला फार आनंद वाटला. तेथील एका कमिटीने खेड्याच्या पुनर्रचनेचा आराखडा तयार केलेला होता. त्या खेड्यातील सारे रस्ते नेहमीसारखे वाकडे तिकडे व अव्यस्थित होते. त्यांना ते रस्ते सरळ करावयाचे होते. त्यासाठी त्या कमिटीने लोखंडी खांब रोवून सरळ असे दोर बांधले आणि रस्ते अशा प्रकारे सरळ केले पाहिजेत असे ठरविले. मला असे आढळले की कमिटीने आखल्याप्रमाणे रस्ता बऱ्याच लोकांच्या खाजगी जागेतून जात होता. त्यावर मी प्रश्न केला की, अशा परिस्थितीत कमिटी कसा काय रस्ता तयार करू शकेल ? ज्यांच्या खाजगी जागेतून रस्ता जाणार त्या लोकांना त्याची भरपाई देण्यास कमिटीकडे तेवढा पैसा आहे का ? तेव्हा त्यांनी मला सांगितले की, कोणीही पैशाची मागणी केलेली नाही. उलट रस्ता करण्यास जागा हवी असल्यास ती खुषीने घेतली जावी अशी प्रत्येकाने तयारी दाखविलेली आहे. हे ऐकून मी खरोखरीच आश्चर्यचकित झालो. हे कसे शक्य झाले ? कारण माझ्या देशात नुकसान भरपाई केल्याशिवाय एखाद्याची थोडीसी जरी जमीन घेतली गेली तर रक्त सांडले जाते ; परंतु ब्रह्मदेशात तसे घडत नाही, असे का? ब्रह्मी लोक आपल्या

मालमत्तेबाबतीत एवढे उदार कसे ? त्यांना आपल्या जमिनीचा लोभ नाही का ? त्यांना आपल्या मालमत्तेची काळजी वाटत नाही का ? याचे कारण हेच की, बुद्धाचा 'सर्वम अनित्यम् ' हा उपदेश त्यांच्या मनावर चांगला ठसलेला आहे. जगातील कोणतीच वस्तू नित्य नाही, शाश्वत नाही, तर ती नश्वर आहे, मग अशा अनित्य वस्तुसाठी भांडावे तरी कशाला ? जमीन जर हवी आहे तर ती खुशाल घ्या, अशी त्यांची मनोधारणा बनलेली आहे.

बंधु भगिनींनो, इतःपर मी अजून काही सांगावे असे काहीच राहिलेले नाही. आपणास केवळ काही मुद्यांचे दर्शन घडवावे एवढीच माझी मनीषा होती. साम्यवादाच्या विजयदुंदुभीने तुम्ही बावरून जाऊ नका किंवा भुलून जाऊ नका किंवा दीपूनही जाऊ नका. तुम्ही जर बौद्ध विचारसरणीचा व तत्त्वज्ञानाचा एक दशांस भाग जरी आत्मसात करू शकलात तर साम्यवाद जे काही निर्माण करू इच्छितो, ते तुम्ही करुणा, न्याय व सद्‌भावना ह्यांच्या जोरावर घडवून आणू शकाल, यात तिळमात्र शंका नाही. धन्यवाद !'' [१]

'' बाबासाहेबांच्या ह्या भाषणातील विचार परिषदेच्या अनेक प्रतिनिधींना बौद्ध धर्माचे एक अभिनव दर्शनच वाटले. बुद्धाच्या चार आर्यसत्यांपैकी एक आर्य सत्य, जे दुःख, त्याचे मार्क्सच्या आर्थिक पिळवणुकीशी त्यांनी दाखविलेले साम्य, आणि बौद्ध धर्माचे एक स्फूर्तिप्रद जिवंत सामाजिक शक्ती म्हणून त्यांनी केलेले विवरण हे नवे दृष्टिकोन आहेत आणि त्याला बुद्धवचनांचा आधारही आहे असे काही विद्वान भिक्खुंनी बाबासाहेबांजवळ मुद्दाम येऊन बोलून दाखविले.'' [२]



---

[१] बुद्ध, मार्क्स आणि धम्माचे भवितव्य : रत्नमित्रा गणवीर पृ. २९-४४.

[२] प्रबुद्ध भारत : ३ ऑगस्ट १९५७.

[३] ४ थी वर्ल्ड फेलोशिप ऑफ बुद्धिस्ट कॉन्फरन्स - खाटमांडू-नेपाळचा रिपोर्ट.

# ' ब्रह्मं सत्यं जगन्मिथ्या ' ही एक बौद्धिक लटपट आहे

'' डॉ. बाबासाहेब आंबेडकर दिनांक २३ नोव्हेंबर १९५६ रोजी रात्री ९ वाजता असनसोल पॅसेंजरने येणार असल्यामुळे वाराणसी कँट स्टेशनवर त्यांचे स्वागत करण्यासाठी सन्माननीय व्यक्ती, काशी विद्यापीठ आणि हिंदू विश्वविद्यालयाचे विद्यार्थी, महाबोधि सभेचे कार्यकर्ते तसेच दलित वर्गातील लोक प्रचंड प्रमाणात उपस्थित होते. स्टेशनवर आलेल्या लोकात प्रामुख्याने श्री. प्रभुनारायणसिंह एम. एससी., भिक्षु धर्मरक्षित, भिक्षु संघरत्न, मेळा अधिकारी श्री. जगदीशशरणसिंह, श्री. जगन्नाथ उपाध्याय उपस्थित होते.

स्टेशनवर बँड वाजविण्यात येत होता तसेच घोषणा दिल्या जात होत्या. लोक बौद्ध पताका घेऊन गाडी येण्याची वाट पाहात होते. गाडी येताच ' डॉ. बाबासाहेब आंबेडकर की जय' 'आंबेडकर जिंदाबाद' असे नारे दिल्या जात असताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे स्वागत केल्या गेले. गर्दी अनावर असल्यामुळे काही लोक त्यात दबले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर स्टेशनहून ' हॉटेल दी पॅरिस ' मध्ये गेले आणि जेवण केल्यानंतर ते सारनाथ करिता रवाना झाले. ते तेथील नवनिर्मित अतिथीगृहात थांबले. त्यांचा तेथे २३ नोव्हेंबर १९५६ ते २७ नोव्हेंबर १९५६ दुपारपर्यंत मुक्काम होता. या दरम्यान त्यांनी त्या विभागात भाषणे दिली.

दिनांक २४ नोव्हेंबर १९५६ रोजी ३ वाजता काशी हिंदू विश्वविद्यालय संघाच्या द्वारे आयोजित आर्टस् कॉलेजच्या मैदानात भरलेल्या सभेला त्यांनी संबोधित केले. ''[१]

'' डॉ. बाबासाहेब आपल्या भाषणात म्हणाले,

मी आपल्यासमोर कोणत्या विषयावर बोलावे हे मला सुचविण्यात आलेले नाही. तरी तुमच्या हिंदू विद्यापीठाच्या आवारात प्रवेश केल्यावर जे विचार माझ्या मनात घोळू लागले आहेत तेच मी तुमच्यापुढे मांडणार आहे. हिंदू समाज-रचनेचा एक अभ्यासक या नात्याने हिंदू-जीवनविषयक तत्त्वज्ञानाचा अभ्यास करताना मला भिन्न भिन्न तात्विक विचारसरणी आढळल्या. बुद्धकाळी

---

[१] धर्मदुत : महाबोधी सभा, सारनाथचे मासिक मुखपत्र, संपादक त्रिपिटिकाचार्य भिक्षु धर्मरक्षित, डिसेंबर १९५६ पृ २४४, २५७-२५८.

ब्याण्णव दर्शने प्रचलित होती. त्यापैकी सहा अभ्यासनीय मानली जात. वर्तमान काळातील सर्वसामान्य हिंदू समाज तव्हंशी शंकराचार्यांचे तत्त्वज्ञान प्रमाण मानतो. शंकराचार्यांचा मुख्य सिद्धांत म्हणजे ' ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या ! ' ब्रह्म तेवढे सत्य व इतर जग मायामय आहे, या विचाराची हिंदू मनावर घट्ट पकड बसलेली आहे, आपण हा सिद्धांत मनुष्याला कितपत उपयुक्त आहे याचा विचार केला आहे किंवा नाही हे मला माहीत नाही. माझा तुम्हास प्रश्न आहे की, हा सिद्धांत माणसाला कितपत मार्गदर्शक आहे ? शंकराचार्य म्हणतात ' ब्रह्म सत्यं.' परंतु या सत्याची व्याख्या काय ? व्यावहारिक जीवनात माणसाची पंच-ज्ञानेंद्रिये हीच सत्यासत्याचा निर्वाळा देतात. ज्ञानेंद्रिये हीच त्याची ज्ञानार्जनाची अंतिम साधने आहेत. फुलाचा सुगंध घ्राणेंद्रियाने कळतो. रंग, आकार दृष्टिंद्रियाने प्रतीत होतो, त्याच्या चवीची साक्ष जिव्हा देते. परंतु शंकराचे ब्रह्म ' नेति नेति ' शब्दानेच वर्णिले जाते. शंकराची ब्रह्माची व्याख्या नकारात्मक आहे. याउलट महायानाची ब्रह्म विहाराची कल्पना चिंत्य आहे. त्यांच्या ब्रह्मविहारात दान, उपरेखा (त्याग), करूणा आणि मैत्री या चार गुणांच्या परमोत्कर्षाचा अंतर्भाव आहे. ज्या ज्या ठिकाणी या गुण चतुष्टयीचा वास आहे, त्या त्या ठिकाणी त्यांच्या दृष्टीने ब्रह्म आहे. शंकर आपले ब्रह्म कुठे आहे किंवा कसे आहे याची चाहूलही लागू देत नाही.

एखाद्या विधानात (Proposition) वास्तव सत्य नसले, केवळ काल्पनिक सत्य असले तरी व्यवहारात त्याचा उपयोग होऊ शकतो. कायद्यामध्ये आम्ही सामाजिक हितासाठी कायदेशीर काल्पनिक सत्य (Legal fiction) मानतो. उदाहरणार्थ एखाद्या माणसाकडे जमिनीचा तुकडा आहे परंतु त्याने तो कोणापासून खरेदी केला किंवा वारसा हक्काने मिळविला त्यासंबंधी त्याच्याजवळ खरेदीखत अथवा इतर कायदेशीर कागदपत्रे नाहीत अशावेळी कोर्ट एक सिद्धांत निर्मिते की त्याला ती जमीन राजाने बक्षिस दिलेली असेल असे काल्पनिक सत्य गृहीत धरण्यात काहीच चुकत नाही. शंकर ब्रह्म सर्वत्र आहे असे सांगतो. हे सार्वत्रिक ब्रह्म काल्पनिक सत्य म्हणून मानावयास हरकत नाही. पण मग असा प्रश्न उद्‌भवतो की, ब्रह्म सर्वत्र आहे तर सर्वच समान मानले पाहिजेत. जर ब्राह्मणात ब्रह्म तर तो अस्पृश्यातही असला पाहिजे. पण मग ब्राह्मण श्रेष्ठ व अस्पृश्य नीच असा भेद का केला जातो ? जर शंकराने ब्रह्माच्या सार्वत्रिकतेच्या आधाराने अखिल मानवजात एक आहे असे मानून समतेचा पुरस्कार केला असता तर तो सिद्धांत विचारार्ह

व गंभीर गणला गेला असता. मग शंकराशी वाद घालण्याचे आम्हाला कारणच उरले नसते. माझा शंकरावरील आक्षेप असा आहे की, तो ' ब्रह्मं सत्यं ' हे विधान केवळ बौद्धिक पातळीवर राखून ठेवतो, तो ते सामाजिक पातळीवर आणण्यास धजत नाही.

' जगन्मिथ्या ' म्हणजे जग एक दृष्टिभ्रम आहे. हा सिद्धांत तरी व्यावहारिक दृष्टीने कितपत साधार आहे. आमच्या ज्ञानाची साधने जी ज्ञानेंद्रिये ती जगाच्या वास्तवाची आम्हाला जाणीव करून देत आहेत. असे असताना जगाचे अस्तित्व आम्हास कसे नाकारता येईल ? जर जगालाच अस्तित्व नसेल तर मला व तुम्हाला तरी अस्तित्व कुठचे उरते ? आणि माझ्या जाणीवेला (Consciousness) तरी काय अर्थ उरतो ? अशी एक कथा आहे की, एके दिवशी शंकरावर एक उन्मत्त हत्ती धावून आला आणि शंकर जग मिथ्या आहे हा आपला सिद्धांत विसरून पळू लागला. त्याला पळताना पाहून आजूबाजूचे लोक त्याला उद्देशून म्हणाले ' अहो पळता काय ? हत्ती मिथ्या आहे ' शंकराने उत्तर दिले 'माझं पळणंही मिथ्या आहे ' या उत्तरात शंकराचे प्रत्युत्पन्नमतित्व दिसून आले असेल, परंतु त्याने कोणाही बुद्धिवाद्याचे समाधान होणार नाही. एकूण '' ब्रह्मं सत्यं जगन्मिथ्या '' ही एक बौद्धिक लटपट आहे. ज्या सिद्धांताचा तात्त्विक परिणाम चातुर्वर्ण्याला मूठमाती देण्यात झाला असता, तो सिद्धांत शंकराने बौद्धिक पातळीपुरता खरा मानून सामाजिक जीवनात त्याच्या प्रवेशाला प्रतिबंध केला. विचारआचारांची ही विसंगती आणि अप्रामाणिकपणा थेट शंकरापासून गांधींपर्यंत दिसून येतात. गांधींना मी एकदा प्रश्न केला होता की, तुमचे चातुर्वर्ण्य हाताच्या उभ्या पंजाच्या बोटांसारखे एकावर एक असे आहे की, आडव्या पंजाच्या बोटासारखे समान पातळीवर आहे ? माझ्या प्रश्नाचे त्यांनी उत्तर दिले नाही. परंतु त्यांची श्रद्धा क्रमिक विषमतेवर (Graded Inequality) होती यात संशय नाही. त्यांचे 'वर्णव्यवस्था' व ' गांधी शिक्षण ' हे गुजराती ग्रंथ त्याची साक्ष देत आहेत.

हिंदू लोक वेद मानतात आणि त्यातील पुरुषसुक्त तर त्यांच्या नित्य पठणात असते. या सुक्तात समाजाची रचना कशी असते एवढेच केवळ सांगितले असते तर ते फारसे आक्षेपार्ह ठरले नसते. समाजात चार वेगळे व्यवसाय करणारे लोक असतात हे विधान केवळ ऐतिहासिक सत्य ठरेल. परंतु या चार प्रकारच्या व्यवसायातील लोकांना श्रेष्ठ-कनिष्ठता, उच्च-नीचता धार्मिक दृष्टीने चिकटवून देणे हा शुद्ध दुष्टपणा आहे. आणि म्हणूनच विषमतेला व

उच्च-निचतेला धार्मिक अधिष्ठान मिळवून देणारा हिंदू समाजरचनेचा आद्य सिद्धांत म्हणजे तो पुरुषसुक्त सर्वतोपरी निषेधार्ह आहे. या पुरुषसुक्ताला व त्याची री ओढणाऱ्या हिंदू धर्मग्रंथांना तुम्ही मानणार की, स्वातंत्र्य, समता, बंधुता व न्याय या चार उदात्त तत्त्वांवर आधारलेल्या राज्यघटनेला मानणार ? केवळ आपले पोट भरण्याचे एक साधन म्हणून विद्यार्जनाकडे तुम्ही पाहात नसाल आणि संपादित विद्येने आपल्या मनाला सुसंस्कृत करण्याचा प्रयत्न तुम्ही करीत असाल तर, एक तर तुम्ही राज्यघटनेविरुद्ध बंड पुकारले पाहिजे किंवा विषमताप्रधान वैदिक व ब्राह्मणी धर्मग्रंथांना तिलांजली दिली पाहिजे. भारतातील प्रत्येक नागरिक भारतीय राज्यघटनेशी एकनिष्ठ राहाण्याला बांधलेला आहे. तुम्ही जर प्रामाणिक असाल तर हिंदू संस्कृतीचा तुमच्या निष्ठेशी होत असलेला विरोध विसरता कामा नये. तो विरोध विसरून गुळमुळीत जीवन तुम्ही जगाल तर तुमचे शिक्षण व्यर्थच आहे असे समजावे लागेल. असे विचार व्यक्त करून बाबासाहेबांनी आपले भाषण संपविले.

हिंदू संस्कृतीला चिरस्थायी स्वरूप देण्यासाठी पंडित मालवियांनी स्थापिलेल्या बनारस विद्यापिठातील बाबासाहेबांचे वरील व्याख्यान सर्व श्रोत्यांनी अतिशय शांतपणे ऐकले. नव्हे, बाबासाहेबांच्या अधिकारवाणीचा आणि रोखठोक प्रश्नांचा श्रोत्यांवर असा काही प्रभाव पडला की, काही अनुचित विरोध करून सभा उधळण्यास सरसावलेले विद्यार्थी, मांत्रिकाने भारल्यासारखे स्तब्ध होते. व्याख्यानानंतरच्या उपहार प्रसंगी एका प्राध्यापकाने बोलूनही दाखविले की, अशा विवाद्य विषयावर इतके निर्भय व स्पष्ट भाषण विरोधाशिवाय पार पडले ही विद्यापिठातील एक अपूर्व गोष्ट आहे." [१]

● ● ●

[१] प्रबुद्ध भारत : १० ऑगस्ट १९५७.

## ३४९

# बौद्धांचे आद्यकर्तव्य आहे की, त्यांनी दर रविवारी बुद्धविहारात जावे

'' दिनांक २४ नोव्हेंबर १९५६ रोजी दुपारी १ वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकर काशीहून सारनाथला आले. ते तेथील भिक्खुंना भेटले. त्यांच्याशी चर्चा करताना बाबासाहेबांनी मुख्यत्त्वेकरून प्रत्येक बौद्धाने दर रविवारी नियमितरित्या बुद्ध मंदिरात जाऊन उपदेश ग्रहण करावा यावर जोर दिला. तसेच त्यांनी प्रत्येक भागात बुद्ध मंदीर निर्माण करून त्यात सभा घेण्यासाठी मुबलक जागा असलेले सभागृह असावे असे निक्षून सांगितले. या दृष्टीने सिलोन, ब्रह्मदेश, तिबेट, चीन इत्यादी देशातील भिक्खुंनी अग्रेसर होऊन आणि पैसा जमवून मदत करण्याचा त्यांनी सल्ला दिला. '' [१]

याप्रसंगी उपस्थित लोकांना आणि भिक्खुंना संबोधित करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

'' जनतेने आता गंभीरपणे विचार केला पाहिजे. हिंदू धर्मग्रंथात जे जीवन वर्णन केलेले आहे त्याचा व आम्ही तयार केलेल्या घटनेत काही साम्य आहे काय ? जर साम्य नसेल तर त्याचे कारण काय ? आमचा धर्म, घटना या दोहोंपैकी एक गोष्ट आम्ही स्वीकारली पाहिजे. एक तर धर्माला जिवंत ठेवले पाहिजे किंवा घटनेलाच जगवले पाहिजे. दोन्ही गोष्टी एकाच ठिकाणी राहू शकत नाही, दोहोत मेळ बसू शकत नाही.

हिंदू धर्मात अनेक मते आहेत, त्या सर्वात शंकराचार्यांचे मत सर्वात चांगले समजले जाते. शंकराचार्यांचा ' ब्रह्मं सत्यं जगन्मिथ्या ' हा सिद्धांत सर्वात अधिक महत्त्वपूर्ण समजला जातो. परंतु बौद्ध धर्माच्या उच्च सिद्धांतासमोर तो अगदी तुच्छ व निरर्थक आहे. नवीन झालेल्या बौद्धांचे आद्य कर्तव्य आहे की, त्यांनी दर रविवारला बौद्ध मंदिरात गेले पाहिजे. असे जर झाले नाही तर नवीन बौद्धांना धर्माचा परिचय होणार नाही. यासाठी ठिकठिकाणी बुद्ध मंदिरे निर्माण झाली पाहिजेत. मंदिरात सभा घ्यायला जागा असावी. लंका, बर्मा, तिबेट, चीन आदी देशातील बौद्ध भिक्खुंनी पुढाकार घेऊन पैसा गोळा करावा व हिंदुस्थानातील बौद्ध लोकांना मदत करावी.

---

[१] धर्मदूत : डिसेंबर १९५६ पृ. २४४.

आज सकाळी उत्तर प्रदेशचे माजी सभाप्रमुख श्री. द्वारकाप्रसाद मला मिळाले होते. त्यांनी मला डिसेंबरमध्ये जोनपूरला येण्याबद्दल आग्रह धरला. मी त्यांना येण्याचे आश्वासन दिले. परंतु तारीख अजून ठरलेली नाही. जोनपूरमध्ये विराट सामुदायिक धर्मांतराच्या कार्यक्रमाची तयारी सुरू झालेली आहे. या प्रसंगी उत्तर प्रदेशातील पुर्णिया जिल्ह्यातील लाखो मागासलेले लोक दीक्षा घेतील. या मागासलेल्या लोकांचे सवर्ण हिंदुंकडून शोषण आजही सुरू आहे. बौद्ध धर्माची दीक्षा घेऊन ते आपल्या पूर्वजांचा मार्ग पुन्हा स्वीकार करतील.

बौद्ध धर्माचा प्रारंभ पक्क्या पायावर झालेला आहे. हा धर्म मानव धर्म आहे. या धर्माशिवाय मानवाच्या कल्याणाचा दुसरा कोणताही उपयुक्त धर्म नाही.

आपण भारताचा प्राचीन इतिहास समजून घेतला पाहिजे. हिंदुस्थानात सर्वात प्रथम आर्य आणि नाग लोकांचे युद्ध जुंपले, आर्यांजवळ युद्धात घोडे होते. त्या बळावर त्यांनी नाग लोकांवर विजय मिळविला. हेच नाग आज हिंदू आहेत. नागांनी सर्वात प्रथम बौद्ध धर्माचा स्वीकार केला. त्यांना बौद्ध धर्माचा प्रसार करण्यात सफलता मिळाली. परंतु या नागांचा नायनाट करण्याकरिता आर्यांनी वेळोवेळी प्रयत्न केले. याचे पुरावे महाभारतात अनेक ठिकाणी आढळून येतात. पुढे आर्यांनी ब्राह्मण धर्माला व्यापक बनविले. त्यात अनेक दोष निर्माण झाले. चातुर्वर्ण्य व्यवस्थेचा उदय हा ब्राह्मणांनीच केला. भगवान बुद्धाने चातुर्वर्ण्याला घोर विरोध केला. त्यांनी चातुर्वर्ण्य नष्ट करून समतेचा प्रचार केला व याच आधारावर बौद्ध धर्माची स्थापना केली. भगवान बुद्धाने ब्राह्मणांच्या यज्ञांना अमान्य केले व त्यांना तिलांजली दिली. ब्राह्मणांनी हिंसेची प्रथा सुरू केली होती ती नष्ट करून भगवंताने अहिंसेचा प्रचार केला.

भगवंताने म्हटले आहे की, बौद्ध धर्म महासागराप्रमाणे आहे. यात कोणत्याही प्रकारचा भेदभाव नाही. भगवान बुद्धाने करुणेचा प्रचार करून त्या काळातील पददलित लोकांची मने आकर्षित केली व त्यांना योग्य मार्ग दाखविला.

हिंदू धर्माच्या मुळात रोग झालेला आहे. याच कारणामुळे आम्हाला वेगळा धर्म ग्रहण केला पाहिजे. माझ्या समजुतीप्रमाणे बौद्ध धर्म हाच योग्य धर्म आहे. यात उच्च-नीच, श्रीमंत-गरीब, जाती-पाती आदी भावना नाहीत.

अस्पृश्य वर्गाचे कल्याण बौद्ध धर्म स्वीकारल्यानेच होण्याची शक्यता आहे. हिंदू समाजात असलेली असमानता, भेदाभेद, अन्याय व कुप्रथा बौद्ध धर्म स्वीकार केल्याने दूर होऊ शकतात.

भारतातील अस्पृश्यांनी बौद्ध धर्म स्वीकारल्यावर बर्मा, चीन, जपान, लंका आदी सर्व बौद्ध देशांची सहानुभूती आमच्या करूण दशेवर होईल व आम्ही नेहमीकरिता हिंदू धर्माच्या जाचातून मुक्त होऊ शकू. वरील देशांनी आमच्यावर होणाऱ्या अन्यायाविरूद्ध का आवाज उठविला नाही याचे कारण म्हणजे त्यांचा समज होता की हिंदुंचे हे घरगुती भांडण आहे. जर बौद्ध धर्म स्वीकार केल्यानंतरही हिंदू लोक आम्हाला समता, स्वतंत्रता आणि बंधुत्वापासून दूर ठेवतील तर आम्ही वरील बौद्ध राष्ट्रांच्या सहयोगाने तो मिळविल्याशिवाय राहाणार नाही.

हिंदू धर्माच्या कपाळावर अस्पृश्यता हा एक भयंकर कलंक लागला आहे. याचमुळे हिंदू जातीच्या हृदयातील दुष्टता दिसून येते. अस्पृश्य पवित्र व शुद्ध होवूनही देवदर्शनासाठी जातात तरी त्यांच्यासाठी मंदिराचे दरवाजे बंद केले जातात. शिवाशिवी, भेदाभेद, जातपात यांना समूळ नष्ट करणे हे सवर्ण हिंदुंचे कर्तव्य आहे. आम्ही त्यांचा मुर्दा आपल्या खांद्यावर का वाहावा.

आज मी अस्पृश्यांना आवाहन करतो की त्यांनी अशाच धर्माचा स्वीकार करावा की ज्या धर्मात मनुष्यमात्रात भेदाभेद नाही. सारखेपणा आहे व मित्रत्वाच्या नात्याने ते एकत्र येऊ शकतात. हाच उच्च आदर्श बौद्ध धर्मात आहे. ज्याप्रमाणे अनेक नद्या समुद्राला येऊन मिळतात व आपले अस्तित्व विसरतात त्याप्रमाणे बौद्ध धर्माचा स्वीकार केल्यानंतर सर्व लोक समान होतात. कोणत्याही प्रकारची विषमता त्यांच्यात राहात नाही. बौद्ध धर्म हा अस्पृश्यांनाच नव्हे तर अखिल मानवांना देखील कल्याणकारक आहे. सवर्ण हिंदुंनी या धर्माचा अवश्य स्वीकार करावा.

इतर धर्मात सृष्टी निर्माता ईश्वर समजला जातो व जे दोष राहिले त्याबद्दल ईश्वराला जबाबदार पकडले जाते. तशी विचारसरणी बौद्ध धर्मात नाही. बौद्ध धर्मात जगात दुःख आहे असे म्हटले आहे. त्या दुःखाचे निरोधन होऊ शकते व त्याकरिता कोणते मार्ग आहेत ह्याचा विचार केला आहे. हिंदू धर्मात रूढीवर सारी विचारसरणी आधारित आहे. ही रूढी चातुर्वर्ण्य पद्धतीतून जन्माला आली. बौद्ध धर्मात अनेक भिक्षु व भिक्षुणी झाल्या, त्यांच्याबद्दलची माहिती थेर गाथा व थेरी गाथा यांच्यात सापडते.

हिंदुंना न्याय करण्याचा अधिकार होता पण त्यांनी आजवर अस्पृश्यांवर अन्यायच केला आहे. हिंदुंपासून आपण पृथक होऊन भगवान बुद्धाच्या चरणावर नम्र झाले पाहिजे.

मला काठमांडू येथील पशुपतिनाथाच्या मंदिरात जाऊ दिले नाही, असे खोटेच वर्तमानपत्रातून प्रसिद्ध झाल्याचे मी ऐकले. मी कोणत्याच हिंदू मंदिरात जात नाही. मला शंभर वेळा प्रार्थना केली असती तरी मी त्या देवळात जाणे शक्य नव्हते. माझ्या खाजगी सेक्रेटरीला नेपाळच्या महाराजाने आदले दिवशी बोलावून डॉक्टरसाहेबास मंदिरात न जाऊ देण्याबद्दलची सूचना केली होती व म्हटले होते की, बौद्धांना हिंदू मंदिरात जाऊ देण्याइतपत आजची परिस्थिती नाही. नेपाळचे, लंकेचे व भारतीय भिक्षु मंदिरात जात होते. त्यांना मनाई करण्यात आली. जी व्यक्ती देवावर विश्वास करीत नाही, तिने तसे करणे म्हणजे स्वतःच्याच मनाची फसवणूक करणे होय व हिंदुंच्या देवाचा अपमान करणे होय. बौद्धांनी कधीही हिंदुंच्या देवळात जाऊ नये. बौद्ध मंदिरात सर्व समान आहेत. कोणाचाही तेथे निषेध करू नये.

जे अस्पृश्य हिंदू धर्मात राहून मंदीर प्रवेश करू इच्छितात हा त्यांचा नुसता दुराग्रह आहे. त्यांना अन्याय, अपमान व विटंबना करून घ्यायची असेल तर ह्याबाबतीत मला बोलायचे नाही. पण बौद्धांनी या भानगडीत पडू नये. आपल्या रोजच्या प्रार्थनेत आपण म्हणतो, ' नत्थि मे सरणं अञ्ञं, बुद्धो मे सरणं वरं '. मी बुद्धाशिवाय इतर कोणाला शरण जाणार नाही, असे म्हणणाऱ्यांनी हिंदू मंदिरात जाण्याचा हट्ट का पकडावा.

काशी येथील मंदीरप्रवेश हा राजकीय स्टंट, डाव आहे. त्यापासून दलितांना कसलाच फायदा व्हावयाचा नाही. म्हणून बौद्ध धर्माचा स्वीकार करूनच बंधुत्वाचा व समतेचा दर्जा प्राप्त करणे एवढेच आपले मुख्य कर्तव्य आहे.'' [१]

'' भाषणानंतर वेगवेगळया देशातून आलेल्या अंदाजे १५० भिक्खुंनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या भाषणाला अनुमोदन देऊन सर्वप्रकारची मदत करण्याचे आश्वासन दिले.

सायंकाळी ५ वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी सारनाथ येथील भग्न अवशेषांचे निरीक्षण केले. धम्मेक स्तुपाजवळ अंदाजे एक तास थांबून तिबेटी लामाच्या पूजेचे अवलोकन केले आणि त्यानंतर त्यांनी काही सूचना केल्या ज्याचे सर्वांनी मनःपूर्वक स्वागत केले.

रात्रौ ७ वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी मूलगन्ध कुटीमध्ये विधिवत बराच वेळ बुद्ध पुजा केली. त्यानंतर त्यांनी भिख्खुंचे सूत्रपाठ ऐकले. त्याचबरोबर त्यांनी अर्धा तास, तिबेटी उपदेश विधीचे अवलोकन केले. '' [२]

● ● ●

---

[१] प्रबुद्ध भारत : २३ फेब्रुवारी १९५७.

[२] धर्मदूत : मासिक, सारनाथ, डिसेंबर १९५६ पृ. २४४.

## ३५०

# बुद्ध धर्म हिंदू धर्माची एक शाखा आहे हा खोडसाळ प्रचार होय

'' दिनांक २५ नोव्हेंबर १९५६ रोजी सकाळी १० वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी काशी विद्यापीठाच्या विद्यार्थी परिषदेचे उद्‌घाटन केले. ''[१]

उद्‌घाटनपर भाषणात डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

'' बौद्ध धर्माच्या उत्पत्तिसंबंधी पुष्कळच अज्ञान दृष्टीस पडते. प्राचीन भारताचा त्रयस्थपणे अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्याला बुद्धपूर्व काळात दोन संघर्ष आढळतात. पहिला संघर्ष आर्य व नाग लोकातील व दुसरा ब्राह्मण व क्षत्रियातील.

सध्या हिंदू म्हणून समजले जाणारे पुष्कळसे लोक नागवंशीय आहेत. ज्या नाग लोकांनी आर्यापूर्वी भारतात वस्ती केली होती ते आर्यांपेक्षा अधिक सुसंस्कृत होते. त्यांना आर्यांनी जिंकले, एवढ्यावरून आर्यांची संस्कृती त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ ठरत नाही. आर्यांच्या विजयाचे कारण म्हणजे त्यांचे वाहन. आर्य घोड्यावर स्वार होऊन लढत तर नाग पायदळी लढत. आर्य-नागांमधील लढा प्राणपणाने लढला गेला. महाभारतातील खांडववन व सर्पसत्र या कथांवरील कल्पनेचे परिवेष्ठन दूर केले तर या आर्य-नाग युद्धाचे भयानक स्वरूप आपल्या दृष्टीस पडते. आर्यांनी खांडववन दहनासारखी म्हणजे Scorched earth policy ची कृत्ये करून नागांची ससेहोलपट चालविली. या विध्वंसातून अगस्तीने एका नागाला वाचविले, अशी एक कथा आहे. कथेत अतिशयोक्ती असली तरी नागांच्या वसाहती संपूर्ण नष्ट करण्यासाठी आर्य कसे झगडत होते हे त्यावरून दिसून येते. पराभवामुळे नागांच्या मनात आर्यांविषयी द्वेष वसत होता. परिक्षिताचा प्राण घेणारा तक्षक हा कोणी सर्प नसून एक नागवंशी पुढारी होता. आर्य लोकांच्या मनात नागांसंबंधी वसत असलेल्या द्वेषाचे उदाहरण म्हणून, कर्ण व अनंत यांच्या कर्णार्जुन युद्धापूर्वी झालेल्या संभाषणाचा उल्लेख करता येईल. कर्णार्जुन युद्धापूर्वी अनंत हा नागवंशीय योद्धा कर्णाला भेटला आणि आपण अर्जुनाविरूद्ध साह्य करू असे आश्वासन देऊ लागला. कर्णाने ते देऊ केलेले साह्य नाकारले. कारण, कर्ण आर्य होता आणि अनंत हा नाग होता. आर्यांनी आपापसातील युद्धासाठी नागांचे साह्य घेणे निषिद्ध होते.

---

[१] धर्मदूत : मासिक, डिसेंबर १९५६ पृ. २४५.

बौद्धपूर्व काळातील दुसरा संघर्ष म्हणजे ब्राह्मण-क्षत्रियांमधला. या लढ्याची वर्णने पुढे पुराणातून आली आहेत. त्याप्रमाणेच मनुने आपल्या स्मृतीत, क्षत्रियांनी ब्राह्मणांना आदराने का वागविले पाहिजे त्याची कारणे देताना, पूर्वकालीन ब्राह्मण-क्षत्रियांच्या संग्रामाचा उल्लेख केला आहे.

आर्य व नाग, ब्राह्मण व क्षत्रिय यांच्यामधील झगडे चालू असता ब्राह्मणांनी ऋग्वेदात पुरुषसुक्तांचा अंतर्भाव केला असावा. पुरूषसुक्तापूर्वी चातुर्वर्णातील चारही वर्ण एकाच समान पातळीवर होते. पुरूषसुक्ताने उच्चनीचतेचे तत्त्व समाजात आणले. या सुमारास भगवान बुद्धाने भारतीय जीवनात प्रवेश केला. ज्या शाक्य कुळात गौतमाचा जन्म झाला त्या शाक्यांचे गणराज्य लोकशाहीप्रधान होते. या लोकशाहीच्या परंपरेत वाढलेल्या गौतमास चातुर्वर्ण्य अमान्य होते. सध्याच्या स्वरूपातील बौद्ध धर्म हा एक नानाविध सिद्धांतांचा महासागरच झाला आहे. परंतु बौद्ध धर्माचा मध्यवर्ती सिद्धांत अथवा बुद्धमत हे समतेवरच आधारलेले आहे. बौद्ध धर्माचा स्वीकार करणारे लोक बव्हंशी नागवंशीय आणि चातुर्वर्ण्यात हीन समजल्या जाणाऱ्या वर्णांपैकी होते. नागांची युद्धप्रीती मुचलिंद नागाच्या कथेवरून सिद्ध होते. मुचलिंदाचे अग्निहोत्री कश्यपाशी वैर होते. परंतु कश्यपाकडे आतिथ्यासाठी आलेल्या बुद्धाचा तो सेवक बनला. बौद्ध धर्माच्या अभिवृद्धीचे कारण शुद्रादिशुद्रांनी त्याचा बहुसंख्येने केलेला स्वीकार. बौद्ध वाङ्मय व विशेषतः थेर व थेरीगाथा यांच्या आधारे हे सिद्ध करता येईल.

बौद्ध धर्म ही हिंदू धर्माचीच एक शाखा आहे, अशा मताचा प्रचार अलिकडे फारच बोकाळला आहे. वस्तुतः बौद्धप्रणीत धर्म समकालीन होता. तो वैदिक अथवा ब्राह्मणी धर्माहून अतिशय भिन्न होता. वैदिक वेदग्रंथांना प्रमाणे मानीत तर बुद्धाचा त्यांना विरोध होता. कलामसुक्तांमध्ये बुद्धाने माणसाला विचार स्वातंत्र्य असले पाहिजे आणि वेदांनी माणसासाठी सदासर्वकाळ टिकणारा विचार करुन ठेवला नाही असे प्रतिपादिले आहे. बुद्धाच्या वेदप्रामाण्यावरील आघाताचा पुढील काळात हिंदुंच्या भगवद्गीतेसारख्या ग्रंथावरही परिणाम झाला आहे. वेदपाठकांची गीतेने एके ठिकाणी बेडूक म्हणून संभावना केली आहे. बुद्धाने वेदांना वाळवंट म्हटले आहे. वेदामध्ये प्राधान्याने इंद्रादी देवतांना उमदे घोडे, तेजस्वी शस्त्रास्त्रे, शत्रुवर विजय इत्यादी ऐहिक सुखोपभोगासाठी केलेल्या प्रार्थना आहेत. त्यात उदात्त नीतितत्त्वांची शिकवण नाही. म्हणून बुद्धाने त्याचा धिक्कार केला.

बुद्धाचा समकालीन धर्मावरील दुसरा आघात म्हणजे यज्ञसंस्थेवरील होय. गाई-बैलांचे बळी देऊन तुम्हाला कोणते उच्चश्रेय लाभणार आहे, असा त्यांचा याज्ञिकांना प्रश्न असे. यज्ञसंस्थेवरील बुद्धाच्या टिकेमुळे हिंदुंना इंद्रवरुणादि आद्य देवतांचा त्याग करावा लागला. थोडेसे विषयांतर करून मी तुम्हाला विचारतो, हिंदू धर्मात ईश्वराची (God) कल्पना खरी आहे काय ? काशीतील तुमचा पूजनीय महादेव देव मानावा तर त्याचे लग्नही होते व तो आपल्या बायकोबरोबर नाचतोही. ब्रह्मा, विष्णूचीही तीच कथा. यांना काय देव म्हणायचे ? सामान्य माणसालासुद्धा आज लाज वाटेल अशी दृष्कृत्ये त्यांच्या हातून घडल्याचे तुमची पुराणेच सांगतात. असा एक तरी देव दाखवा की ज्याचे निष्कलंक चारित्र्य आजच्या माणसाला आदर्शवत् व अनुकरणीय वाटेल ? हिंदुंचे देव म्हणजे राजांची कुलदैवते, त्यांचे पराक्रम म्हणजे राजांचे पौरोहित्य मिळविण्यासाठी ब्राह्मणांनी रचलेली त्यांच्या दैवतांच्या खुशामतीची पुराणे. इंद्र, कृष्ण काय हे देव ? ऋग्वेदाच्या शेवटच्या भागात इंद्रपत्नीने इंद्रास मोजलेल्या शिव्या वाचून पहा ! दुर्योधन संपूर्ण वज्रदेही होऊ नये व गदायुद्धात भीमास यश मिळावे म्हणून कृष्णाने योजलेले कपट नाटक पहा. तुमचा शेजारी असे वागू लागता तर तुम्ही त्याला काय म्हणाल ! असो ! बुद्धाने पशुहत्त्येची निर्भत्सना केली आणि यज्ञाचे वैफल्य जनतेस पटवून दिले, म्हणूनच ब्राह्मणांना आपले प्राचीन याज्ञिक आचार सोडावे लागले.

आश्रम व्यवस्थेसंबंधीही बुद्धाचे मत प्रचलित वैदिक धर्मापेक्षा वेगळे होते. ब्राह्मणांच्या मते ब्रह्मचर्य आश्रमानंतर गृहस्थाश्रम स्वीकारणे आवश्यक होते. बुद्धाच्या मते ब्रह्मचर्यानंतर परिव्रज्या स्वीकारण्यास प्रत्यवाय नव्हता. ब्रह्मचर्याचा मूळचा अर्थ ज्ञानार्जनाची अवस्था, अविवाहित अवस्था हा त्यास नंतर चिकटविलेला अर्थ आहे. ब्राह्मणांनी गृहस्थाश्रमाचा काळ वाढविण्यासाठी त्याला वानप्रस्थाश्रम जोडला. ब्रह्मचर्यानंतर संन्यास (परिव्रज्या) स्वीकारण्यास ब्राह्मणांची हरकत होती. अकराशे वर्षांनी कुमारिल भट्टाने बुद्धावर घेतलेल्या आक्षेपात बुद्धाच्या परिव्रज्येच्या स्वातंत्र्यावरच भर दिलेला आहे.

बुद्धाचा वैदिक धर्माशी चवथा विरोध चातुर्वर्ण्याबाबत होता. त्याचें शिष्य उच्च कनिष्ठ समजल्या जाणाऱ्या सर्व जातीतील होते. आपल्या शिष्यांत उच्चनीचतेच्या भावनेला जागा राहू नये, याबाबतीत तो अत्यंत दक्षता पाळीत असे. आपल्या चुलत भावांना आपल्या क्षत्रियत्वाचा अभिमान वाटू नये म्हणून

त्याने त्यांच्या समवेत आलेल्या 'उपाली' स प्रथम दीक्षा दिली. ज्याची दीक्षा अगोदरची तो नंतर दीक्षा घेणारास वंद्य समजला जाई. म्हणून क्षत्रिय शाक्यांना उपाली या त्यांच्या पूर्वाश्रमीच्या नापित सेवकास अभिवादन करावे लागे. आपल्या जीवनाच्या शेवटल्या दिवसात चुन्द या हीनजातीय समजल्या जाणाऱ्या लोहाराच्या घरचे अन्न ते प्रकृतीस अनिष्ट आहे, असे समजूनही त्याने ग्रहण केले आणि सामाजिक समतेसाठी प्राणाचे मोल दिले. असे चातुर्वर्ण्य विरोधी प्रसग बुद्धाच्या जीवनात अनेक दाखविता येतील. तो आपल्या संघाला सागराची उपमा देई. ज्याप्रमाणे सागरास मिळाल्यावर नदीची पृथगात्मता राहात नाही आणि सर्व जल एकरूप होते त्याप्रमाणेच संघात येणाऱ्या भिन्न वर्णीय भिख्खुंचे वर्णवैशिष्ट्य नष्ट होते. जैन मतालाही चातुर्वर्ण्य निषिद्ध होते. परंतु त्या मुद्यावर भांडण करायला ते सिद्ध नव्हते. बुद्ध मात्र आपल्या मुद्यांबाबत गुळमुळीत मौन धारण करीत नसे. आपल्या धर्माचे आपण वीर आहोत आणि त्याच्या स्थापनेसाठी आपणाला अज्ञानाशी झगडावे हे लागणारच असे त्याचे मत होते. बुद्धाची ही चातुर्वर्ण्यविरोधाची तीव्रता ब्राह्मणांच्या मनात सदैव डाचत राहिली. म्हणूनच चातुर्वर्ण्याविषयी मूक असलेल्या निरिश्वरवादी सांख्याचार्य कपिलमुनीस त्यांनी आपले म्हटले परंतु बुद्धाशी सदैव वैर मानले.

बुद्धाचा वैदिक धर्माला पाचवा विरोध देव आणि आत्मा यांच्या अस्तित्वाबाबतचा होता. बुद्धाच्या मते सर्वशक्तिमान, सर्वज्ञ, सर्वव्यापी, न्यायी आणि प्रेममय अशा देवाचे अस्तित्व ज्ञानाची साधने जी पंचेंद्रिये आणि तर्क यांच्या साह्याने सिद्ध करता येत नाही. शिवाय धम्माचा उद्देश दुःख परिहार आहे. देव मानल्याने दुःख कमी होत नाही. माणसाने दुसऱ्या माणसाशी कसे वागावे म्हणजे सर्व माणसे सुखी होतील हे शिकवणे हे धर्माचे मुख्य कार्य आहे. म्हणून धम्माचा देवाशी संबंध येत नाही. देवाचे अस्तित्व केवळ पोकळ तर्कावर (Speculation) आधारलेले आहे आणि या अस्तित्वाच्या श्रद्धेतून पूजा, प्रार्थना, पुरोहित इत्यादी अष्टांग मार्गातील समादिट्ठीला घातक अशा खुळया समजुतीचे (Superstition) पेव फुटते. माणसाचे परस्पर संबध प्रज्ञा, शील, करुणा, मैत्री यांनी नियंत्रित होण्याऐवजी पावित्र्य, उच्चनीचता अशासारख्या भ्रामक समजुतींनी नियंत्रित होतात. देवाचे अस्तित्वावरील बुद्धाचे आक्षेप केवळ व्यावहारिक दृष्टीचेच होते असे नाही. प्रतिच्च समुत्पाद या त्यांच्या सिद्धांतात देवाच्या अस्तित्वावर सर्वसामान्य तार्किक स्वरूपाचे आक्षेप घेतलेले आहेत. या सिद्धांताप्रमाणे देव आहे किंवा नाही हा मुख्य प्रश्न नाही. त्याप्रमाणे विश्व देवानी निर्मिले की नाही हाही मुख्य प्रश्न नाही. मुख्य प्रश्न असा की, देवाने जग कसे निर्माण केले ? देवाच्या

अस्तित्वाचे मंडण अथवा खंडण या प्रश्नाच्या उत्तराने होईल. यादृष्टीने महत्त्वाचा प्रश्न असा "देवाने हे जग अभावातून निर्मिले की, पूर्वी अस्तित्वात असलेल्या कशातून तरी निर्मिले ? " काहीच नव्हते त्यातून काहीतरी निर्मिले या गोष्टींवर माणसाच्या बुद्धीला विश्वास ठेवता येत नाही. जर या तथाकथित देवाने हे जग पूर्वी काहीतरी होते त्यातून निर्मिले असेल तर जे नवे काहीतरी त्याने निर्मिले ते आपल्या निर्मितीपूर्वीही अस्तित्वात होते असे मानावे लागते. मग जे पूर्वी होते त्याच्या निर्मितीचा कर्ता देव ठरू शकत नाही. देवाने काहीतरी निर्मिण्यापूर्वी कोणीतरी काहीतरी निर्मिलेले असेल तर देवाला आद्यनिर्माता किंवा आदिकारण म्हणता येणार नाही. एकूण कारण अस्तित्वासंबंधीची विचारसरणी तर्कदुष्ट असल्यामुळे देवावरील श्रद्धा बुद्धाच्या समदिठ्ठीप्रधान धम्माला अमान्य आहे.

वेदांतातील मोक्ष सिद्धांत म्हणजे आत्म्याने ब्रह्मात विलीन होणे यालाही तर्कदुष्ट ठरवून आणि मानवी जीवन सुखी करण्याच्या दृष्टीने निरूपयोगी म्हणून बुद्धाने विरोध केला आहे. ब्रह्मविषयक बुद्धाची विचारसरणी त्याच्या वसिष्ठ व भारद्वाज या दोन ब्राह्मणांशी झालेल्या संवादात व्यक्त झाली आहे. बुद्धाचे आत्म्याच्या अस्तित्वावरील व्यावहारिक दृष्टीचे आक्षेप त्याच्या देवकल्पनेवरील आक्षेपासारखे आहेत. शिवाय तो आत्म्याचे म्हणून समजले जाणारे व्यापार नामरुप या सिद्धांताच्या आधारे स्पष्ट करून दाखवितो. कायेच्या उत्पत्तीबरोबरच जाणिवेचा (Consciousness) प्रारंभ होतो. इच्छात्मक, भावनात्मक आणि विचारात्मक कार्य ही जाणिवेचीच आहेत. तेव्हा आत्मा हे वेगळे तत्त्व गृहीत धरण्याची आवश्यकताच उरत नाही.

अशारितीने वैदिक धर्माशी विरोध असणाऱ्या बौद्ध धर्माचा पाडाव करण्यासाठी ब्राह्मणांनी भल्याबुऱ्या सर्व प्रकारच्या साधनांचा उपयोग केला. बौद्ध धम्म ज्या गोष्टींमुळे लोकप्रिय झाला त्या गोष्टी आपल्या पूर्वापार धर्मास सम्मत नसल्या तरी त्यांचा त्यांनी उपयोग केला. या प्रचार पद्धतीस अनुसरूनच वेरूळच्या बौद्ध लेण्याजवळ त्यांनी आपली ब्राह्मणी लेणी कोरली. वस्तुतः ब्राह्मण हा गृहस्थाश्रमी. अग्निहोत्र हे त्यांचे नित्यव्रत. त्याला परिमार्जित भिख्खुसारखे गुहेत राहाण्याचे कारण नव्हते. भिख्खुंना पावसाळयाच्या तीन महिन्यात कुठेतरी निवाऱ्याच्या जागी वास करण्याचा बुद्धाचा आदेश होता. त्यामुळे त्यांना लेण्याची आवश्यकता होती. गृहस्थाश्रमी ब्राह्मणाला ती तशी नव्हती. परंतु बौद्ध लेण्यांकडे उपासकांचा मोठा मेळावा आकृष्ट होतो म्हणूनच केवळ त्यांच्या

लेण्याच्या बाजूला आपली लेणी कोरून आपल्या धर्माकडे उपासक ओढून घेण्याचा त्यांनी प्रयत्न केला. बौद्ध धर्माच्या ऱ्हासाचे मुख्य कारण म्हणजे, हिंदू पंडित सांगतात त्याप्रमाणे, कुमारिल, शंकराचार्य इत्यादींनी बुद्धमताचा वाग्‌युद्धात केलेला पराभव हे नव्हे. कारण दोघांनीही बुद्धाच्या शिकवणुकीचे मध्यवर्ती सिद्धांत जे सामाजिक समता, जगातील दुःख परिहारासाठी प्रत्येक व्यक्तिचे मनःपरिवर्तन, नीति तत्त्वांची सामाजिक जीवनातील प्रतिष्ठापना, बुद्धिवाद इत्यादी, त्यावर या पंडितांनी मुळीच आघात केलेला नाही. या दोघाही पंडितांनंतर बौद्ध धर्म भारतात कित्येक वर्षे समृद्धावस्थेत होता. बौद्ध धर्माच्या ऱ्हासाचे मुख्य कारण म्हणजे ज्या भिन्न संस्कृतीच्या व भिन्न सांस्कृतिक पालळीच्या लोकांमध्ये त्याचा प्रचार झाला, त्यांच्या आचारांची व समजुतीची बौद्ध धर्मावर झालेली अनुचित प्रतिक्रीया. भारतातील बौद्ध धर्मावर झालेला सर्वात मोठा आघात म्हणजे इस्लामी आक्रमणाचा. भारताकडे वळताना मुसलमान आक्रमकांना जे परधर्मी लोक भेटले ते बौद्धधर्मीयच होते. त्यांच्या भाषेत मूर्तिला '' बुत् '' असे म्हणत, बुत्‌शिकन म्हणजे मूर्तिभंजक होणे हे त्यांच्या मते गाझीपणाचे लक्षण होते. हिंदूपेक्षा बौद्धांवर चढविलेले त्यांचे हल्ले अधिक हिंस्त्र व विध्वंसक स्वरूपाचे होते. त्यांनी केलेल्या बौद्ध भिख्खुंच्या कत्तलीने ११ पासून १३ व्या शतकापर्यंतची इतिहासाची पाने रक्ताने रंगलेली आहेत. नालंदा सारख्या जगविख्यात बौद्ध विद्यापिठाचा त्यांनी पूर्ण नाश केला. हिंदुंप्रमाणे बौद्धांमध्ये धर्मप्रचाराचे पिढिजात काम करणारा ब्राह्मणासारखा वर्ग नसल्याने, भिख्खुंच्या कत्तलीनंतर बौद्ध धर्माचा झपाट्याने ऱ्हास सुरू झाला. सत्याचाही कधी कधी पराभव होतो हे ह्याचे हे एक उदाहरण आहे. परंतु आज त्यानंतर सहाशे वर्षांनी भारताला बुद्धाची आठवण होत आहे आणि आज जर त्याने बुद्धाच्या विचारसरणीचा स्वीकार केला नाही तर त्याचे भवितव्य ठीक नाही.

भाषणानंतर विद्यार्थी व प्राध्यापक वर्गाने विचारलेल्या सर्व प्रश्नांची बाबासाहेबांनी उत्तरे दिली. ती प्रश्नोत्तरे एका स्वतंत्र वृत्ताचा विषय होतील. विषय ऐतिहासिक असूनही व्याख्यानाच्या अभिनव दृष्टिकोनाने प्रतिगामी मानलेल्या काशी विद्यापिठाच्या विद्यार्थी व आचार्य गणांस चांगलेच खडबडविले.''[१]



[१]प्रबुद्ध भारत : २४ ऑगस्ट १९५७.

३५१

# माणसा-माणसातील संबंध प्रेम, करुणा या तत्त्वानुसार जोडणाऱ्या बौद्ध धर्माचा मध्यवर्ती सिद्धांत समता आहे

'' दिनांक २५ नोव्हेंबर १९५६ ला सायंकाळी सारनाथ येथील मूलगन्ध कुटी विहाराच्या मैदानात महाबोधी सभेद्वारा डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या स्वागताप्रित्यर्थ कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता.

सुरवातीला मंगलाचरण झाल्यानंतर लद्दाखचे लामा लोबजङ् यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना 'खदा' (वस्त्रे विशेष) भेट केली. त्यानंतर वाराणसीच्या १८ संस्थांनी त्यांना हार प्रदान केले. सेवासंगम ट्रस्टच्या वतीने डॉ. एन. एन. शर्मा यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना दोन सुंदर सुवर्ण स्मृतिचिन्ह भेट केले. डॉ. बाबासाहेबांचे भाषण ऐकण्याकरिता सारनाथच्या जवळपास असलेल्या जिल्ह्यातील जनसमुदाय प्रचंड प्रमाणात उपस्थित होता. ''[१]

सदरहू कार्यक्रमाचे वैशिष्ट्य म्हणजे '' ही सभा महाबोधीच्या बुद्ध मंदिराच्या आवारात, धम्मेक स्तुपाच्या सावलीत होती. बुद्धाने ज्या ठिकाणी पंचवग्गीय भिख्खुंना आपला पहिला उपदेश करून धम्मचक्रप्रवर्तन केले त्या जागी अशोकाने एक स्तूप उभारला. त्या स्तुपास धम्मेक स्तूप असे नाव आहे. तेथेच डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे दलित जनतेला उद्देशून शेवटचे भाषण व्हावे हा हृदयंगम व क्रांतिकारक योगायोग होय.

बाबासाहेबांसंबंधी चार शब्द सांगताना भिख्खु धर्मरक्षित म्हणाले, ''बौद्ध देशात अशी एक श्रद्धामय समजूत प्रचलित आहे की, बुद्धाच्या महापरिनिर्वाणापासून अडीच हजार वर्षांनी भारतात बौद्ध धर्माचे पुनरूत्थान घडणार आहे. ते कार्य जो बोधिसत्त्व तडीस नेईल, तो आज बाबासाहेबांच्या रूपाने आमच्यामध्ये उपस्थित आहे, अशी माझी श्रद्धा आहे. याच सारनाथात, पंचवीस शतकामागे, पाच भिख्खुसमोर आजच्या सारख्याच एका रविवारी, या समोरच्या धम्मेक स्तुपाच्या जागी भगवंतांनी धर्मचक्राचे परिवर्तन केले. त्याच धर्मचक्राला नागपूर येथे गति देऊन, पाच लाख लोकांच्या हृदयात धम्माचा पवित्र संदेश ज्याने नेऊन पोचविला, त्याच महापुरूषाचे आज आम्ही स्वागत करीत आहोत. ''

---

[१] धर्मदूत : सारनाथ, डिसेंबर १९५६, पृ. २४६-२४७.

सारनाथचे प्रशांत व पवित्र स्मृतीने भारलेले वातावरण, सभोवार भक्तिभावाने बसलेली दलित जनता आणि लंका, तिबेट, ब्रह्मदेश, जपान या देशातील काही लामा, भिख्खु व उपासक मंडळी, या सर्व घटनांमुळे की काय बाबासाहेबांचे मन भरून आले. कंठ किंचित् सद्गदित झाला.

पाणावल्या डोळयांनी आणि भरल्या कंठाने केलेले ते कारूणिक भाषण होते. बाबांचा तो अंतिम संदेश ठरला.

स्वागताला उत्तर देताना केलेल्या आपल्या भाषणात बाबासाहेब म्हणाले,

'' दीर्घ प्रवासाच्या दगदगीने मला शीण आला आहे. मी येथे केवळ तुमच्या स्वागताच्या फुलमाळेसाठी आलो होतो. परंतु माझ्या भेटीसाठी तुम्ही जी उत्सुकता व आस्था दाखविलीत तिची परतफेड म्हणून तुम्हाला चार शब्द सांगणे मी माझे कर्तव्य समजतो. तुम्हांपैकी पुष्कळसे लोक अस्पृश्य गणले जातात. भगवान बुद्धाच्या काळी अस्पृश्यता नव्हती. सांस्कृतिकदृष्ट्या कमी प्रतीच्या जमाती त्यावेळी होत्या परंतु त्यांना अस्पृश्य मानीत नसत. अस्पृश्यतेचा शाप गेल्या दीड हजार वर्षांचा आहे आणि त्याला जबाबदार हिंदू धर्म आहे. अस्पृश्यता हा आमचा कलंक नसून तो उच्च हिंदू जातींच्या हृदयाचा कलंक आहे. आज इतकी वर्षे झाली परंतु तो कलंक धुवून काढण्याची हिंदुंना कधीही प्रामाणिक इच्छा झाली नाही. आमच्या राहाणी व करणीवरून काही ते आम्हाला अस्पृश्य मानीत नाहीत. आम्ही स्वच्छता राखली, स्वच्छ कपडे घातले, उच्च व्यवसाय केले, मन निष्पाप व चारित्र्य निष्कंलक ठेवले आणि निर्भयतेने वागू लागलो तरीही हे हिंदू आम्हाला अस्पृश्य मानतात. तेव्हा हा हिंदू धर्म आम्हाला सोडलाच पाहिजे व जो बौद्ध धर्म भारतात उदयाला आला आणि ज्याने माणसामाणसात भेद करण्याचे नाकारले, ज्या धर्माचा मध्यवर्ती सिद्धांत समतेवर आधारलेला आहे, तो आता आम्ही स्वीकारला पाहिजे. भगवंतानी आपला धर्म जगातील दु:ख नाहीसे करण्यासाठी स्थापिला. इतर धर्म, देव व मनुष्य यांच्यामधील संबंध जोडणारे आहेत. माणसामाणसातील संबंध प्रेम, करुणा या तत्त्वानुसार जोडणारा धर्म बौद्ध धर्म हा एकमेव आहे. बुद्धाने आपल्या धर्माचरणाचा आदर्श संघाच्या रूपाने जगासमोर मांडला. त्या समाजात जातपात नाही. समुद्रात नदी मिळाल्यावर ती जशी समुद्राशी एकरूप होते त्याप्रमाणे बुद्धाच्या समाजात जातपात नाहिशी होऊन सर्व एकरूप होतात.

आज दीड हजार वर्षे हिंदू समाजाची सुधारणा होईल आणि त्यात समता येईल, शहाणपणा येईल याची गाव शिंदेवर बसून आम्ही वाट पाहात आलो. परंतु कोणालाही सुधारणा सुचली नाही आणि कोणीही आम्हाला आत बोलाविले नाही. उलट धर्मांच्या नावाखाली आमची शतकानुशतके अधिकच विटंबना आणि गळचेपी होऊ लागली. कोणी म्हणतात, समता ही भारताला अज्ञात होती. गेल्या शतकातच समतेची कुजबूज येथे सुरू झाली आहे. तेव्हा हळूहळू हिंदू धर्मही सुधारेल आणि समतेचा अंगीकार करील ! हिंदू धर्म सुधारला जाईल हा एक भ्रम आहे. इतिहास ग्वाही देत आहे की सामाजिक समतेचा संदेश भगवान बुद्धाने अडीच हजार वर्षांमागे या भारताला दिला. परंतु हा संदेश दडपून टाकण्याचा या देशात बुद्धिपुरःसर नीच असा प्रयत्न झाला आणि अगदी त्याच्या विरूद्ध विषमतेवर आधारलेला आणि काही विशिष्ट वर्गाच्याच हिताची पर्वा करणारा हिंदू धर्म प्रभावशाली करण्यात आला. जोपर्यंत हिंदू धर्म पाळला जात आहे तोपर्यंत या देशातून सामाजिक विषमतेचे उच्चाटन होणार नाही. हिंदू धर्माने बौद्धिक पातळीवर कितीही उदात्त तत्त्वांचा उद्घोष केला तरी त्यांचा आचार हा वर्ण, जातपात, स्पृश्यास्पृश्यता असलेल्या विषमतेचा असतो. चातुर्वर्ण्य हा त्याचा पृष्ठकणा आहे. तेव्हा हिंदू धर्म सोडल्याशिवाय तुम्हाला तरणोपाय नाही. तुम्ही बौद्ध झालात तर तुम्हाला बांधव म्हणून मानणारे या जगात काही लोक लाभतील. आज आमच्या देशात जो अन्याय होत आहे त्याने आम्ही विव्हळत आहोत, परंतु त्याला सहानुभूतीची साथ कोठे तरी मिळत आहे काय ? नाही. कारण अन्याय करणारे सर्व हिंदू आहेत व त्यांच्या शब्दाप्रमाणे येथील राज्यतंत्र हालत आहे. तुम्ही बौद्ध झालात तर परदेशस्थ बौद्धधर्मीय तुम्हाला बंधु मानतील व तुमच्या दुःखाच्या हाकेला ते ओ दिल्याशिवाय राहाणार नाहीत.'' [१]



[१]प्रबुद्ध भारत : ३१ ऑगस्ट १९५७.

## ३५२

# माझ्या जीवनाचे तात्त्विक अधिष्ठान

मला पाच मिनिटांत माझ्या जीवनाचे तत्त्वज्ञान सांगावयाचे आहे. तत्त्वज्ञान शब्दाचा अर्थ या संदर्भात मी सामाजिक तत्त्वज्ञान असाच समजतो. प्रत्येक मनुष्याला काहीतरी जीवनविषयक तत्त्वज्ञान असणे इष्ट आहे. आपल्या वर्तणुकीचे मोजमाप करण्यासाठी मनुष्याला काहीतरी निकष ठरविणे आवश्यक आहे आणि जीवनविषयक तत्त्वज्ञान हाच तो निकष. प्रत्येक मनुष्याला जीवनविषयक तत्त्वज्ञान असणे आवश्यक आहे असे मी म्हणतो याचे कारण या तत्त्वांच्या निकषानेच आपण वाईट केले आहे याचे त्याला आकलन होते. आणि जेव्हा आपण चुकलो आहोत असे त्याला समजेल तेव्हाच त्याला आपल्या तत्त्वानुरोधाने आपली उन्नती साधण्याची जबाबदारी पटेल. माझे जीवनविषयक तत्त्वज्ञान मी निश्चित केलेले आहे. त्याच्या नास्तिपक्षी, अस्तिपक्षी अशा दोन बाजू मी आता स्पष्ट करणार आहे.

नास्तिपक्षी, सांख्य तत्त्वज्ञानातील त्रिगुणांवर आधारित असलेले व भगवत्‌गीतेत विशद केलेले हिंदूंचे सामाजिक तत्त्वज्ञान मला नापसंत आहे. कारण माझ्या मताप्रमाणे कपिलांच्या तत्त्वज्ञानाचे ते एक निर्घृण विकृत स्वरूप आहे. आणि त्याचमुळे जातिव्यवस्था आणि क्रमवार विषमता पद्धती हा हिंदूंच्या सामाजिक जीवनाचा एक मूलभूत नियम ठरला आहे. अस्तिपक्षी, माझे जीवनविषयक तत्त्वज्ञान तीन शब्दांतच समूर्त झालेले आहे. स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव, फ्रेंच राज्यक्रांतीवरून माझे जीवनविषयक तत्त्वज्ञान मी उसने घेतले आहे असे मात्र कोणी समजू नये. तसे मी केलेले नाही असे मी निक्षून सांगतो. माझ्या तत्त्वज्ञानाचे मूळ राजकारणात नसून धर्मात आहे. माझे गुरू भगवान बुद्ध यांच्या शिकवणीतूनच हे तत्त्वज्ञान मी स्वीकृत केलेले आहे.

माझ्या जीवनविषयक तत्त्वज्ञानात स्वातंत्र्याला स्थान आहे हे मला आग्रहपूर्वक सांगावयाचे आहे. पण त्याचबरोबर अनिर्बंध स्वातंत्र्य समतेला मारक ठरते. माझ्या तत्त्वज्ञानात समतेचे स्थान स्वातंत्र्यापेक्षा वरचे आहे. तरीसुद्धा त्यात संपूर्ण समतेला मात्र मुळीच थारा नाही. कारण अमर्याद समता ही स्वातंत्र्याच्या अस्तित्वाआड येते आणि स्वातंत्र्याला वाव असणे तर आवश्यक आहे.

माझ्या तत्त्वज्ञानात स्वातंत्र्य व समतेच्या अतिक्रमणापासून संरक्षण मिळावे म्हणूनच फक्त कायदेकानूंचे स्थान गृहीत धरलेले आहे. पण कायद्याचे स्थान मी फारच गौण मानतो. कारण स्वातंत्र्य व समतेच्या भंगाबाबतीत कायदा

खात्रीने समर्थ ठरेल असा मला विश्वास वाटत नाही. मी बंधुभावाला सर्वोच्च स्थान देऊ इच्छितो; कारण स्वातंत्र्य व समता नाकारली जाण्याप्रसंगी बंधुभाव हाच खराखुरा रक्षक ठरतो. सहभाव हे बंधुभावाचे दुसरे नाव आहे आणि बंधुभाव अथवा मानवता हे धर्माचे दुसरे नाव आहे. कायदा वा सहभावाचे मूल्यमापन करताना हा फरक जाणवतो याचे कारण कायदा हा धर्मातीत असल्यामुळे तो कोणीही मोडू शकतो; या उलट सहभाव अथवा धर्म हा पवित्र असल्यामुळे त्याला मान देणे हे प्रत्येकाचे कर्तव्य गणले जाते.

माझे तत्त्वज्ञान हे कोणा सुखवस्तू माणसाचा ध्येयवाद आहे असे मानू नये. सामाजिक जीवनातल्या त्रिगुण तत्त्वांचा नाश करून हिंदू समाजात क्रांती घडवून आणू शकेल असेच माझे क्रांतिकारक तत्त्वज्ञान आहे. म्हणून मी इतका चढावखोर आहे. आणि मला पुष्कळ शत्रू आहेत. पण मला हे शत्रू आवडतात. कारण मला माहीत आहे की, माझे बोलणे ते कान देऊन ऐकत असतात.

माझे तत्त्वज्ञान हे फक्त माझ्यासाठी नाही तर ते इतरांसाठीही आहे. निराळ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे माझ्या तत्त्वज्ञानाच्या मागे विशिष्ट उद्दिष्ट आहे. मला मतपरिवर्तन करावयाचे आहे. त्रिगुण तत्त्वाच्या अनुचरांना त्याचा त्याग करावयास लावून माझ्या तत्त्वज्ञानाचा स्वीकार करावयास लावायचा आहे. हे एक भव्य कार्य आहे आणि त्याला पुष्कळ अवधी लागण्याचा संभव आहे.

आज भारतीय व्यक्ती दोन निरनिराळ्या ध्येयवादांनी नियंत्रित आहेत. राज्यघटनेच्या उद्देशपत्रिकेत सूचित केलेला ध्येयवाद आणि धर्मात अंतर्भूत केलेला सामाजिक ध्येयवाद. ज्याला समज आहे त्याला कळू शकेल की, हे दोन परस्पर विसंगत ध्येयवाद आहेत. राजकीय ध्येयवादामुळे स्वातंत्र्य, समता व बंधुभाव या जीवनमूल्यांना मान्यता मिळाली आहे. तथापि प्रचलित सनातनी वृत्तीच्या सामाजिक ध्येयवादामुळे ही तत्त्वे व्यवहारात नाकारली गेली आहेत. असे हे विसंगत जीवन किती काळ चालणार आहे ? कधीतरी एक दुसऱ्याला शरण गेल्याशिवाय उपायच नाही. माझ्या जीवनतत्त्वज्ञानावर माझा पुरेसा विश्वास आहे आणि म्हणूनच जो आज बहुसंख्य भारतीयांचा राजकीय ध्येयवाद आहे तो सर्वांचा सामाजिक ध्येयवाद होईल, अशी मला उमेद आहे.

•••

---

३ ऑक्टोबर १९५४ रोजी आकाशवाणी दिल्ली केंद्रावरून केलेल्या भाषणाचा अनुवाद : मुक्तछंद १९७६. पुनर्मुद्रण : गांजरे खंड ७, पृ. १४९-५०.

## ३५३

# मला बौद्ध धम्म का प्रिय आहे ?

देण्यात आलेल्या अल्पवेळात मला दोन प्रश्नांचा शोध घ्यावयाचा आहे : एक म्हणजे, मला बौद्ध धम्म का प्रिय आहे ; आणि दुसरा म्हणजे वर्तमान परिस्थितीत तो जगासाठी कसा उपयुक्त आहे.

इतर सर्व धर्म ईश्वर, आत्मा, मृत्यूनंतरची अवस्था अशा गोष्टींचा शोध घेतात. बौद्ध धम्मात मात्र ज्या तीन तत्त्वांचा एकत्रितपणे विचार केला आहे तसा इतर धर्मांमध्ये दिसून येत नाही. हा धम्म प्रज्ञा (अंधश्रद्धा आणि अलौकिक घटनांविरुद्ध आकलनशक्ती), करुणा (प्रेम) आणि समतेची शिकवण देतो. मनुष्याला या पृथ्वीवर सुखमय जीवन व्यतीत करण्यासाठी यापेक्षा वेगळे काय हवे ? म्हणून ही तीन तत्त्वे देणारा बौद्ध धम्म मला आकृष्ट करतो. जगाला तारण्याचे सामर्थ्य न ईश्वरात आहे न आत्म्यामध्ये ; ही तीन तत्त्वेच जगाच्या दृष्टीने तारक आहेत.

एक बाब अशी आहे जी जगाच्या, विशेषत: आग्नेय आशियाई देशांच्या संदर्भात विशेषत्वाने आकृष्ट करणारी ठरू शकते. जग सध्या कार्ल मार्क्स आणि त्यांनी जन्माला घातलेला साम्यवाद यांच्या आवर्तात सापडलेले आहे. हे आव्हान अतिशय गंभीर आहे. सर्व देशांच्या धार्मिक प्रणालींचा पाया या आव्हानामुळे हादरला आहे. याचे कारण म्हणजे मार्क्सवाद आणि साम्यवाद निधार्मिक बाबींशी निगडित आहेत. सध्याच्या धार्मिक अधिष्ठानाला बसणारा हा धक्का समजावून घेणे कठीण नाही. आजची धार्मिक प्रणाली जरी निधार्मिक रचनेपासून अलिप्त असली तरी याच प्रणालीच्या आधारावर प्रत्येक निधार्मिक बाब टिकून आहे. दूरान्वयाने का होईना, धर्माची मान्यता असल्याशिवाय निधार्मिक रचना फार काळ टिकणे शक्य नाही.

आग्नेय आशियातील बौद्ध राष्ट्रांची मानसिकता साम्यवादाकडे झुकलेली पाहून मला अतिशय आश्चर्य वाटते. मी तर असेच मानतो की त्यांना बौद्ध धम्माचे आकलन झालेले नाही. मार्क्स आणि त्याचा साम्यवाद यांना परिपूर्ण उत्तर बौद्ध धम्मात आहे, असा माझा ठाम विश्वास आहे. रशियन पद्धतीच्या साम्यवादाने रक्तरंजित क्रांती हे समर्थनीय साधन मान्यच केले आहे. साम्यवादी प्रणालीसाठी आसुसलेल्या लोकांना कदाचित हे माहीत नसावे की बौद्ध धम्मातील 'संघ' हे एक साम्यवादी संघटनच आहे. त्यामध्ये खाजगी मालमत्तेला जागा नाही ; आणि विशेष म्हणजे हे परिवर्तन हिंसेतून आलेले नाही. मानसिक

परिवर्तनातून झालेला हा बदल गेली २५०० वर्षे टिकून आहे. अर्थात या रचनेत प्रदीर्घ काळात काही विचलन झाले असेल, परंतु त्यातील आदर्श मात्र आजही अनिवार्यपणे दिसून येतात. रशियन साम्यवादाने या प्रश्नांची उत्तरे द्यावीत.

त्यांनी आणखी दोन प्रश्नांची उत्तरे द्यायला हवीत. एक साम्यवादी रचना ही सर्वकाळ असणे आवश्यक आहे काय ? मला हे मान्य आहे की रशियनांना एरवी जी कामे जमली नसती ती साम्यवादी चौकटीमुळे करणे शक्य झाले ; परंतु ही कामे झाल्यानंतर तेथील लोकांना बुद्धाने उपदेशिलेले प्रेमासह स्वातंत्र्य का मिळू नये ? ते मिळत नाही यावरूनच दक्षिण आशियाई देशांनी सावध व्हावे आणि रशियन साम्यवादाच्या जाळ्यात अडकू नये ; अन्यथा त्यामधून ते कदापि बाहेर पडू शकणार नाहीत. त्यांना हे आवश्यक आहे की, त्यांनी बुद्धांची शिकवण अनुसरावी आणि तिला राजकीय रचनेत सम्मीलित करावे. दारिद्र्य पूर्वीही होते आणि पुढेही राहणार आहे. रशियातसुद्धा दारिद्र्य आहेच. म्हणून दारिद्र्याचे कारण पुढे करून मानवी स्वातंत्र्याचा बळी देणे सुज्ञपणाचे नव्हे.

दुर्दैव हे आहे की, बुद्धांच्या शिकवणीचा अन्वयार्थ लावणे व आकलन होणे या गोष्टी नीट झालेल्याच नाहीत. त्यांची तत्त्वे आणि सामाजिक पुनर्रचना याबाबत पूर्णतः गैरसमज झालेला आहे. बुद्ध धम्म ही एक सामाजिक तत्त्वप्रणाली आहे हे सर्वांना समजल्यानंतरच त्याचे पुनरुज्जीवन ही एक शाश्वत घटना ठरेल, कारण सर्वांना आकृष्ट करणारी किंवा प्रभावित करणारी कोणती महानता या धर्मात आहे ते जगाला कळलेले असेल.

२६, अलिपूर रोड, (सही) बी. आर. आंबेडकर,
नवी दिल्ली.
तारीख, १२ मे १९५६.

• • •

---

१२ मे १९५६ रोजी 'ब्रिटिश ब्रॉडकास्टिंग कॉर्पोरेशन' च्या नभोवाणी केंद्रावरून केलेल्या भाषणाचा अनुवाद, अनुवादक : संपादक मंडळ.

## ३५४

# भारतीय लोकशाहीचे भवितव्य काय ?

भारतीय लोकशाहीचे भवितव्य काय ? हा विषय मला देण्यात आला आहे. भारतात जणू काही पूर्वीपासूनच लोकशाही नांदते आहे अशा थाटात अनेक लोक या विषयावर मोठ्या गर्वाने बोलतात. विदेशी लोकसुद्धा राजनैतिक मानसन्मानांचा एक भाग म्हणून भारताची महान लोकशाही व भारताचे महान प्रधानमंत्री असा उल्लेख करतात.

कोणत्याही चर्चेची प्रतीक्षा न करता असे गृहीत धरले जाते की जेथे गणराज्य असते तेथे लोकशाही असलीच पाहिजे. प्रौढ मतदानाच्या तत्त्वानुसार जेथे संसदेचे गठण होऊन कायदे करण्याचे काम विशिष्ट कालावधीसाठी लोकांनी निवडून दिलेले प्रतिनिधी करतात तेथे लोकशाही असणारच, असेही सर्वजण मानतात. दुसऱ्या शब्दात, लोकशाही हे एक राजकीय साधन मानले जाते व जेथे हे राजकीय साधन अस्तित्वात असेल तेथे लोकशाहीसुद्धा आहे असे गृहीत धरले जाते.

भारतात लोकशाही आहे की भारतात लोकशाही नाही ? सत्य काय आहे ? गणराज्य आणि लोकशाही तसेच लोकशाही आणि सांसदीय शासन यांना समान मानल्याने जो गोंधळ होतो तो दूर केल्याशिवाय या प्रश्नांचे निश्चित उत्तर समोर येणार नाही.

लोकशाही, गणराज्यापेक्षा तसेच सांसदीय शासनापेक्षा पूर्णत: भिन्न आहे. लोकशाहीची मुळे, शासनाचा प्रकार सांसदीय असो वा अन्य, यात दिसून येत नाही. लोकशाही सहजीवनाची एक पद्धत आहे. लोकांनी निर्मिलेल्या समाजात सामाजिक संबंध तसेच लोकांच्या परस्परातील सहजीवनात लोकशाहीची मुळे शोधावी लागतात.

'समाज' हा शब्द काय ध्वनित करतो ? थोडक्यात सांगावयाचे झाल्यास जेव्हा आपण समाजाविषयी बोलतो तेव्हा त्याविषयी आपल्या मनात एकत्वाची धारणा असते. सामुदायिक प्रेरणा व व्यापक कल्याणाची इच्छा, सार्वजनिक उद्दिष्टांबद्दल निष्ठा, परस्पर तळमळ आणि सहकार्य ही समाज या एककाची गुणवैशिष्ट्ये असतात.

भारतीय समाजात हे आदर्श आढळून येतात काय ? या समाजात व्यक्तींना अस्तित्व नसून तो असंख्य जातींचा समूह आहे. परस्परांपासून विभक्त अशा या जातीसमूहामध्ये समान अनुभूती नाही किंवा अनुकंपेचे बंधही नाहीत. अर्थात, भारतीय समाजात उपरोक्त आदर्श आहेत काय हा प्रश्नच अप्रस्तुत ठरतो. जातिव्यवस्था अस्तित्वात असल्याने या आदर्शांना, पर्यायाने लोकशाहीला या समाजातून कायमचे हद्दपार केले आहे.

भारतीय समाज जातिव्यवस्थेच्या कर्दमात इतका रुतला आहे की, येथे प्रत्येक गोष्ट जातीच्या आधारावरच केली जाते. भारतीय समाजात प्रवेश करताक्षणीच जातिव्यवस्थेचे उग्र रूप तुमच्या दृष्टोत्पत्तीस येऊ शकते. भारतीय माणूस दुसऱ्या कोणत्याही भारतीयासोबत अन्न ग्रहण करू शकत नाही किंवा विवाह करू शकत नाही. याचे एकमेव कारण म्हणजे तो किंवा ती त्याच्या किंवा तिच्या जातीशी संबंधित नाही. एक भारतीय दुसऱ्या भारतीयाला स्पर्शसुद्धा करू शकत नाही याचे कारण तो किंवा ती त्याच्या किंवा तिच्या जातीचा नाही. राजकारणात प्रवेश करा, जातिप्रथेचे प्रतिबिंब तेथेही पाहायला मिळेल. भारतीय माणूस निवडणुकीत कसे मतदान करतो ? तो इतरांना नव्हे, स्वतःच्या जातीच्याच उमेदवाराला मतदान करतो. इतर राजकीय पक्षांप्रमाणेच काँग्रेस पक्षसुद्धा निवडणूक जिंकण्याच्या उद्देशाने जातिव्यवस्थेचा दुरुपयोग करतो. मतदार संघाची सामाजिक रचनेच्या पार्श्वभूमीवर उमेदवारांची यादी तपासून पाहा आणि आपणास असे दिसून येईल की, विशिष्ट मतदारसंघात बहुमतात असणाऱ्या जातीच्या व्यक्तीलाच उमेदवारी दिली जाते. जातिप्रथेविरुद्ध उघडपणे भूमिका घेणारा काँग्रेस पक्ष आपल्या कृतीतून नेमका त्याच व्यवस्थेला खतपाणी घालतो आहे.

औद्योगिक क्षेत्रात आपल्याला काय दिसून येते ? उद्योगांची मालकी ज्या विशिष्ट उद्योगपतीची असते त्याच्या जातीच्या लोकांचीच सर्वाधिक वेतन असणाऱ्या उच्चपदी नियुक्ती केली जाते. बाकीचे मात्र क्षुल्लक वेतनाच्या खालच्या पातळीवर आयुष्यभर लोंबकळत राहतात. व्यापाराच्या क्षेत्रातसुद्धा हेच चित्र पाहावयास मिळेल. संपूर्ण व्यापारगृहावर एका जातीचा ताबा असून दारावर इतरांना प्रवेश नाही अशी पाटी लावण्यात आली आहे.

दानधर्माच्या क्षेत्राकडे पाहा. एखाद-दुसरा अपवाद वगळता भारतात दानधर्म सुद्धा जातीच्याच आधारावर करण्यात येतो. एखादा पारशी आपल्या मृत्युनंतर तो स्वतःची संपत्ती पारशी लोकांसाठीच राखून ठेवतो. जैनाचा मृत्यू झाल्यावर स्वतःची संपत्ती तोही जैनांसाठीच राखून ठेवतो. मृत्युनंतर मारवाडी आपली संपत्ती मारवाडी समाजासाठीच ठेवतो. ब्राह्मणाचा मृत्यू झाल्यावर तोही स्वतःची संपत्ती ब्राह्मणांसाठीच राखून ठेवतो. अशाप्रकारे राजकारण, उद्योग, वाणिज्य आणि शिक्षण कोणत्याही क्षेत्रात मागासवर्गाला स्थान नाही.

जातिव्यवस्थेची आणखीही काही खास वैशिष्ट्ये आहेत, ज्याचे अनिष्ट परिणाम होतात आणि जे लोकशाहीला प्रतिकूल ठरतात. जातिव्यवस्थेचे असेच एक खास वैशिष्ट्य म्हणजे 'श्रेणीबद्ध विषमता' तिच्याशी जुळणे होय. जातींचा दर्जा समान नसतो. त्या एकदुसऱ्याच्या वर उभ्या असतात. त्या एक दुसऱ्यांचा द्वेष करतात. तिच्यात चढत्या क्रमाने द्वेष आणि उतरत्या क्रमाने तिरस्कार, तुच्छता असते. जातिव्यवस्थेच्या या विशेषाचा होणारा सर्वाधिक घातक परिणाम म्हणजे परस्पर सहकार्य करण्याच्या भावनेला आणि इच्छेलाच ती उद्ध्वस्त करते.

वास्तवतेत जात आणि वर्ग यामध्ये भिन्नता अशी की, जातिव्यवस्थेत असल्याप्रमाणे वर्गव्यवस्थेत संपूर्ण बहिष्कृतता नसते. विषमता हा जातिव्यवस्थेचा दुसरा दुष्ट परिणाम आहे. प्रत्यक्षात दोन जातीतील उत्तेजना आणि प्रतिसाद हे मुळातच एकांगी आहेत असे दर्शविते. उच्च जातींनी एका ठरावीक पद्धतीने वागावे आणि खालच्या जातींनी एका रूढ झालेल्या पद्धतीनेच प्रतिसाद द्यावा. याचा अर्थ असा की, विविध जातींना प्रोत्साहनाची आणि त्यानुसार प्रतिसाद देण्याची समान संधी उपलब्ध नसल्याने परिणामतः यामुळे काहींना मालक होण्याचे शिक्षण मिळते तर इतरांना गुलाम होण्याचे शिक्षण मिळते. जीवनातील विविध अनुभवांच्या मुक्त आदान प्रदानाला प्रतिबंध केल्यामुळे प्रत्येक घटक त्याच्या नैसर्गिक अधिकाराला मुकतो. यामुळे विशेषाधिकार असणारे आणि नैसर्गिक अधिकार हिरावून घेतलेले असे दोन वर्ग समाजात निर्माण होतात. असे विभाजन, सामाजिक अभिसरणाला (Social Endosmosis) प्रतिबंध करते.

जातिव्यवस्थेच्या तिसऱ्या वैशिष्ट्याचा दुष्टपणा असा की, ती लोकशाहीची मुळेच निखंदून टाकते. प्रत्येक जात एका विशिष्ट व्यवसायाला बांधलेली असते. प्रत्येक व्यक्ती इतरांना उपयुक्त होईल अशा पद्धतीने स्वतःच्या नैसर्गिक आवडीनिवडीप्रमाणे व्यवसायाची निवड करीत असेल तर त्यामुळे निश्चितपणे समाज सुसंघटितरीत्या स्थिर राहील. अशा प्रकारच्या आवडीनिवडींचा शोध घेणे आणि समाजोन्नतीसाठी त्या दिशेने त्यांना घडविणे हे समाजाचे कर्तव्य आहे. परंतु प्रत्येक माणसात क्षमतेची आणि कृतिशीलतेची अमर्याद विविधता असते जी व्यक्तीला घडवू शकते. लोकतांत्रिक स्वरूप असलेल्या समाजाने व्यक्तीतील सर्व क्षमतांना मार्ग मोकळा करून द्यायला हवा. स्तरीकरण हे व्यक्तिविकासाला खुंटविते आणि जाणीवपूर्वक केलेली खुंटविण्याची प्रक्रिया लोकशाहीला हेतुपुरस्सर नकार देते.

जातिव्यवस्था कशी संपविता येईल ? पहिला अडथळा म्हणजे जातिव्यवस्थेचा प्राण असलेली श्रेणीबद्ध विषमता होय. जेव्हा लोक उच्च आणि निम्न अशा दोनच वर्गात विभागलेले असतात तेव्हा वरच्या वर्गाशी संघर्ष करण्याच्या उद्देशाने निम्न वर्गाला संघटित होणे सोपे जाते. परंतु येथे निम्न जातीचा एकच वर्ग नाही. हा वर्ग निम्न आणि अतिनिम्नांचा असतो. निम्न हे अतिनिम्नांसोबत संघटित होऊ शकत नाही. निम्नांना अशी भीती वाटत असते की, जर तो अतिनिम्नांचा स्तर उंचविण्यात यशस्वी झाला तर त्याला आणि त्याच्या जातीला समाजात असलेले वरचे स्थान गमवावे लागेल.

दुसरा अडथळा असा की आपले समाजहित कशात आहे हे ओळखता न आल्यामुळे एकत्रितपणे कृती करण्याच्या प्रसंगी भारतीय समाज पंगू ठरतो. प्लेटोने म्हटल्याप्रमाणे सामाजिक संघटन अंतिमत: जीवित साध्याच्या जाणिवेवर अवलंबून असते. जर आपण आपल्या साध्याबद्दल अनभिज्ञ असू, आपले हित कशात आहे हे जर आपणास माहीत नसेल तर सर्व बाबींसाठी आकस्मिकता आणि लहरीपणा यांच्या कृपेवर अवलंबून राहावे लागेल. जोपर्यंत आपल्याजवळ सुपरिणामाबाबत बुद्धिवादी निर्णयाचे निकष नसतील, तोपर्यंत कोणत्या शक्यतांना आपण चालना द्यावी हे आपल्याला ठरविता येणार नाही. प्रश्न असा आहे की, न्याय्य आणि एकजिनसी समाज निर्माण करण्याच्या ध्येयप्राप्तीच्या मार्गातील जातिबद्ध रचनेचा अनुल्लंघनीय अडथळा दूर केल्याशिवाय भारतीय समाज हे ध्येय साध्य करू शकेल काय ? जातिबद्ध समाज रचना अस्तित्वात असताना एकजिनसी समाज निर्माण होणे शक्य आहे काय ? चुकीचे मूल्यमापन आणि चुकीचे वास्तवदर्शन यामुळे सर्व भारतीयांच्या मनात गोंधळ उडालेला आहे आणि त्यांना चुकीच्या दिशेने नेले आहे. असंघटित आणि खंडित समाज विविध प्रकारची प्रारूपे आणि प्रमाण निर्धारित करतो. अशा परिस्थितीत जातीच्या प्रश्नामुळे प्रत्येक भारतीयाला मनाची सुसंगतता प्राप्त करणे अशक्यप्राय झाले आहे.

शिक्षणामुळे जातींचा विध्वंस होऊ शकतो काय ? याचे उत्तर 'होय' त्याचप्रमाणे 'नाही' असे आहे. आज जे शिक्षण दिले जाते तेच जर दिले जाणार असेल तर त्या शिक्षणाचा जातीवर काहीच परिणाम होणार नाही. ती ज्या स्वरूपात आहे त्याच स्वरूपात राहील. ब्राह्मण जात याचे ज्वलंत उदाहरण आहे. तिच्यातील शतप्रतिशत शिकलेले आहेत, नव्हे तिच्यातील बहुसंख्य उच्चशिक्षित आहेत, असे असताही एकही ब्राह्मण जातिविरुद्ध असल्याचे दिसत नाही. वास्तविकता अशी आहे की वरच्या जातीतील शिक्षण घेतलेल्या माणसास शिक्षण घेण्यापूर्वीच्या

अवस्थेच्या तुलनेत शिक्षण प्राप्त केल्यानंतर जातिव्यवस्था टिकून राहावी असे प्रकर्षाने वाटत असते. कारण हेच शिक्षण त्याला मोठे पद उपलब्ध होण्याची अधिकची संधी देत असल्यामुळे जातिव्यवस्था कायम ठेवण्यासाठी तो अधिक रुची घ्यायला लागतो. या दृष्टीने पाहता जातिव्यवस्था समाप्त करण्यासाठी शिक्षण उपयुक्त साधन ठरत नाही. ही झाली शिक्षणाची नकारात्मक बाजू. भारतीय समाजाच्या खालच्या स्तरातील लोकांना शिक्षण दिले तर हे शिक्षण जातिव्यवस्थेला विरघळून टाकेल. ते त्यांच्यात बंडखोरीची प्रवृत्ती निर्माण करील. त्यांच्या सद्यःपरिस्थितीतील अज्ञानामुळे, ते जातिव्यवस्थेचे समर्थक बनलेले आहेत. एकदा त्यांचे डोळे उघडले तर ते जातिव्यवस्था नष्ट करण्यासाठी उद्युक्त होतील.

वर्तमान धोरणातील प्रमुख दोष असा की, शिक्षण हे मोठ्या प्रमाणावर दिले जात असले तरी भारतीय समाजाच्या वाजवी वर्गातील लोकांना दिले जात नाही. भारतीय समाजातील ज्या लोकांचा जातिव्यवस्थेत निहित स्वार्थ दडलेला आहे आणि जिच्यामुळे त्यांना फायदा होतो त्याच स्तरातील लोकांना जर तुम्ही शिक्षण दिले तर जातिव्यवस्था अधिक मजबूत होईल. असे न करता भारतीय समाजाच्या खालच्या स्तरातील जे लोक जातिव्यवस्था उद्ध्वस्त करू इच्छितात त्यांना जर शिक्षण दिले तर जातिव्यवस्था निश्चितच उद्ध्वस्त होईल. प्रत्येक वेळी कोणतेही तारतम्य न पाळण्याचे भारत सरकार आणि अमेरिकन फाउंडेशनचे शिक्षणाला मदत करण्याचे धोरण, जातिव्यवस्था मजबूत करीत आहे. श्रीमंताला अधिक श्रीमंत आणि गरिबाला अधिक गरीब करणे हा काही दारिद्र्य नष्ट करण्याचा मार्ग नाही. जातिव्यवस्था नष्ट करण्यासाठी शिक्षणाचा साधन म्हणून उपयोग करण्याच्या धोरणाला ही गोष्ट लागू होते. जातिव्यवस्था कायम ठेवू इच्छिणाऱ्यांना शिक्षण देण्यामुळे भारतीय लोकशाहीचे भवितव्य उज्ज्वल होणार तर नाहीच, उलट हे धोरण भारतीय लोकशाहीला मोठ्या संकटात टाकेल.

२६, अलिपूर रोड, (सही) बी. आर. आंबेडकर,
नवी दिल्ली,
तारीख, २० मे १९५६.

• • •

---

२० मे १९५६ ला 'व्हॉइस ऑफ अमेरिका' या नभोवाणी केंद्रावरून केलेल्या भाषणाचा अनुवाद. अनुवादक : संपादक मंडळ.

# आधारभूत वाङ्मय सूची

## (१) ग्रंथ


कांबळे बी. सी. — समग्र आंबेडकर चरित्र

कीर धनंजय — डॉ. बाबासाहेब आंबेडकर

कोसारे एच. एल. — विदर्भातील दलित चळवळीचा इतिहास

खैरमोडे चांगदेव भवानराव — डॉ. भीमराव रामजी आंबेडकर चरित्र

गणवीर रत्नाकार — आंबेडकर-गांधी : तीन मुलाखती

गणवीर रत्नमित्रा (अनुवादिका) — बुद्ध, मार्क्स आणि धम्माचे भवितव्य

गांजरे मा. फ. (संपादक) — डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे

गोडबोले वामनराव — बोधिसत्त्व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या धम्मदीक्षेचा अविस्मरणीय इतिहास

तासगावकर सचित (अनुवादक) — यशस्वी संसदीय लोकशाहीच्या प्राथमिक शर्ती

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई — डॉ. बाबासाहेब आंबेडकर गौरव ग्रंथ

मून वसंत — फुले-आंबेडकर संशोधनातील प्रदूषणे

सांकृत्यायन महापंडित राहुल — आधुनिक संसार का महान व्यक्तित्व : डॉ. आंबेडकर

सुमेध भिक्षु — मी पाहिलेले बोधिसत्त्व डॉ. बाबासाहेब आंबेडकर

हातोले शंकरराव (संपादक) — डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना समर्पित मानपत्र

Keer Dhananjay — Dr. Ambedkar : Life and Mission

Surwade V. G. (Editor) — Dr. B. R. Ambedkar through Correspondence, Vol. I

## (२) वर्तमानपत्रे व मासिकें

| | |
|---|---|
| अरुण - नागपूर | संपादक - ना. खं. तिरपुडे |
| अस्मितादर्श - औरंगाबाद | संपादक - डॉ. गंगाधर पानतावणे |
| गरुड - कोल्हापूर | संपादक - दा. म. शिर्के |
| चित्रा | .. |
| जनता - मुंबई | संस्थापक - डॉ. भीमराव रामजी आंबेडकर |
| तरुण भारत - नागपूर | संपादक - ग. त्र्यं. माडखोलकर |
| दलित बंधु - पुणे | संपादक - पां. ना. राजभोज |
| धर्मदूत - सारनाथ | संपादक - त्रिपिटकाचार्य भिक्षु धर्मरक्षित |
| नवयुग - मुंबई | संपादक - आचार्य अत्रे |
| नवा काळ - मुंबई | .. |
| निर्भिड - | .. |
| प्रबुद्ध भारत - मुंबई | संस्थापक - डॉ. भीमराव रामजी आंबेडकर |
| बहिष्कृत भारत - मुंबई | संपादक - डॉ. भीमराव रामजी आंबेडकर |
| मूकनायक - मुंबई | संस्थापक - डॉ. भीमराव रामजी आंबेडकर |
| लोकयुद्ध - | .. |
| विविध वृत्त - मुंबई | .. |
| समता - मुंबई | संपादक - दे. वि. नाईक |
| ज्ञानप्रकाश - | |

•••

**Dr. BABASAHEB AMBEDKAR**
**WRITINGS AND SPEECHES**

**Vol. 13**
*Pages 1240, Rs. 190.00*
Dr. Ambedkar as the Principal Architect of the Constitution of India.
1st Edi. 1994.

**Vol. 14 in Two parts**
*Pages 1385, Rs. 200.00 (Overseas $ 20.00)*
Dr. Ambedkar and the Hindu Code Bill.
1st Edi. 1995.

**Vol. 15**
*Pages 1110, Rs. 110.00 (Overseas $ 10.00)*
Dr. Ambedkar as Free India's First Law Minister and Member of Opposition in Indian Parliament
(1947 to 1956).
1st Edi. 1997.

**Vol. 16**
*Pages 752, Rs. 75.00 (Overseas $ 10.00)*
Dr. Ambedkar's (i) The Pali Grammar
(ii) The Pali Dictionary-
(a) Pali into English
(b) Pali into English, Marathi, Hindi and Gujarathi.
(iii) Bouddha Pooja Path.
1st Edi. 1998, 2nd Edi. 2015, 3rd Edi. 2016.

**Vol. 17 in Three Parts**
*Pages1606, Rs. 375.00*
Dr. Babasaheb Ambedkar and his Egalitarian Revolution
1st Edi. 2003.

**Vol. 18 in Three Parts**
*Pages1779, Rs. 300.00*
डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची भाषणे (भाग १ ते ३)
1st Edi. 2003.

**Vol. 19 (Marathi)**
*Pages 639, Rs. 200.00*
डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची पत्रकारिता.
1st Edi. 2005.

**Vol. 20**
*Pages 663, Rs. 200.00*
डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची पत्रकारिता.
1st Edi. 2005.

**Vol. 21**
*Pages 434, Rs. 225.00*
Correspondence
1st Edi. 2006.

**Vol. 22 in Two Parts**
*Pages 212, Rs.*
Photo Biography (English) & चित्रमय चरित्र (मराठी)
1st Edi. 2010.

**Other Published Volumes (Source Material)**
Source Material on Dr. Babasaheb Ambedkar and the Movement of the untouchables.
Vol. 1: Pages 468, Rs. 10.00 (Out of Print)
1st Edi.

**Vol. 2:** *(मराठी)*
*पृष्ठे ५००, मूल्य रू. ७५.००*
डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे बहिष्कृत भारत मूकनायक.
1st Edi. 1990, 2nd Edi. 2008.

---

**Special issue on the occasion of Diamond Jubilee (1936 -2012) of the book.**
**Annihilation of Caste**
*Pages 98, Rs. 15.00*
1st Edi. 14 Apr. 2013, 2nd Edi. 2016.

**जातीव्यवस्थेचे निर्मूलन**
*पृष्ठे ९०, मुल्य १५.००*
प्रथम आवृत्ती २०१५, द्वितीय आवृत्ती २०१६.

मी बौद्ध धर्म का स्वीकारला हे तुम्हाला सांगू इच्छितो. मी बौद्ध धर्म का स्वीकारला ? कारण त्यात समता, बंधुभाव आणि स्वातंत्र्य आहे. इतर धर्मामध्ये ईश्वर व आत्मा यांचेशिवाय दुसरे काही नाही. मनुष्यमात्राच्या उन्नतीला ही जी तीन कारणे आहेत त्यांचा इतर धर्मामध्ये समावेश केलेला नाही. बौद्ध धर्माचे अधिष्ठान, जगात दुःख आहे ह्या तत्वावर बसविलेले आहे. ईश्वर व आत्मा यांच्यावर बसविलेले नाही. माणसे जगात दुःखी आहेत ह्या तत्वावर बसविलेले आहे. इतकेच नव्हे तर त्या दुःखाचे निवारण करणे व ते निवारण्याचे मार्ग दाखविणे हे धर्माचे अंतिम ध्येय आहे, असे भगवंताने सांगितले आहे. जो धर्म कसाला (कसोटीला) उतरणार नाही त्याला धर्म म्हणता येणार नाही. असे भगवंताने आपल्या पहिल्या सूत्रामध्ये-धर्मचक्र प्रवर्तनामध्ये--सांगितले आहे. असे कोणत्याच धर्मसंस्थापकाने सांगितले नाही. या कारणामुळे मी बौद्ध धर्म स्वीकारला आहे. दुःख निवारण्याकरिता प्रज्ञा पारमिता बुद्धाने सांगितली आहे. ---(पृ. क्र. ५४१)

— डॉ. बाबासाहेब आंबेडकर